परब्रह्म

ज्ञानं विज्ञानसहितम् ।

'ज्ञान तेच देव'
या ग्रंथाच्या तिनही आवृत्तींना
वाचकांनी अतिशय उत्तम
प्रतिसाद दिला. त्यामुळेच हे
नवीन पुस्तक लिहण्याचे
प्रोत्साहन मिळाले.
या पुस्तकाचेही वाचक
असेच स्वागत करतील अशी
अपेक्षा आहे.

# ‘परब्रह्म’

## ज्ञानं विज्ञानसंहितम् ।

लेखक
रमेश बावकर

पुस्तक मिळण्याचे ठिकाण
रमेश के बावकर, फ्लॅट नं १, धृव अपार्टमेंट, ६२अ, मयूर कॉलनी,
जोग शाळेसमोरील गल्ली, कोथरुड, पुणे ४११०३८.
फोन २५४६२६२५. मोबाइल ९८८१४९८४३६.

'परब्रह्म' : ज्ञानं विज्ञानसहितम् ।
लेखक : रमेश बावकर

प्रथम आवृत्ती : जून २००१ द्वितीय आवृत्ती : डिसेंबर २००९

पुस्तक मिळण्याचे ठिकाण :
रमेश के. बावकर, फ्लॅट नं. १, ध्रुव अपार्टमेंट, प्लॉट नं. ६२ अ, मयूर कॉलनी,
जोग शाळेसमोरील गल्लीत, कोथरूड, पुणे ४११ ०३८.
फोन : २५४६२६२५. मोबाईल नं. : ९८८१४९८४३६

पुस्तके खालील ठिकाणीसुद्धा मिळतील :
आर. आर. बावकर आणि कं.
फ्लॅट क्र. ७, बळवंत अपार्टमेंटस्,
प्लॉट क्र. २९, शिवप्रसाद सोसायटी,
गणेश मळा (धुमाळ बेकरीचे वर),
पुणे ४११ ०३०. फोन : ०२०-२४३३००८८

श्री. ज्योती बुक स्टोअर्स अँड स्टेशनर्स
'जीवनछाया' मुरकुटे कॉलनी, गंगापुर रोड,
नाशिक, ४२२ ००२
फोन (९५२५३) २३०६७०२/३/४



अक्षर जुळवणी :
अभंग टाईपसेटिंग, १, अमित कॉम्प्लेक्स, न्यू इंग्लिश स्कूल समोर,
टिळक रोड, पुणे ४११ ०३०. फोन २४४८५९५४

मुखपृष्ठ :
जितेंद्र गोळसंगी

मुद्रक :
आनंद लाटकर, कल्पना मुद्रणालय,
४६१/४ सदाशिव, टिळक रोड, पुणे ४११ ०३०.

किंमत रु. २४०/- फक्त.
(पुण्यात घरपोच, बाहेरगावी M.O. किंवा D.D. पाठवल्यास पोष्टाने पाठवले जाईल.)

हरिः ॐ तत् सत्

एक चिंतन, मनन

ज्ञानं विज्ञानसहितम्।

*॥ श्री ॥*

*श्री गणेशाय नमः ।*

*श्री गोपालकृष्णाय नमः ।*

*श्री प्रभुरामचंद्राय नमः ।*

*श्री गुरुभ्यो नमः ।*

*श्री ज्ञानेश्वर महाराज की जय ।*

*श्री अक्कलकोट स्वामी महाराज की जय ।*

*श्री एकनाथ महाराज की जय ।*

*श्री गावबा महाराज की जय ।*

*श्री गोंदवलेकर महाराज की जय ।*

*श्री मुकुंदाचार्य महाराज की जय ।*

*श्री पंथनाथप्रभु महाराज की जय ।*

*श्री गुरुदेव दत्त, दत्त, दत्त ।*

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं

पूर्णात् पूर्णमुदच्यते ।

पूर्णस्य पूर्णमादाय

पूर्णमेवावशिष्यते ।।

ॐ ते पूर्ण आहे. हे पूर्ण आहे. पूर्णापासून पूर्ण निष्पन्न होते. पूर्णातून पूर्ण काढून घेतले तरी पूर्णच शेष राहते.

(तसेच पूर्णाचा लय होऊन ते पुन्हा पूर्णात मिळून गेले तरी त्या पूर्णात काहीच वाढ होत नाही.)

ॐ शांतिः । शांतिः ।। शांतिः ।।।




**PARA BRAHMA**

*Nothing which is Everything,*
*Once wanted to become many things,*
*In the process, It created everything,*
*But Everything actually turnout*
*to be nothing but nothing,*
*Still everything has something to do with nothing,*
*If you can think, everything actually-*
*is nothing other than nothing,*
*As only nothing can be created out of nothing.*

- R. Rajamani

## अभिप्राय

या पुस्तकाचे लेखक श्री. रमेश बावकर हे एक भगवद्भक्त आहेत. गेली १० वर्षे माझा त्यांचा परिचय आहे, त्यांनी 'ज्ञान तेच देव' हे ज्ञानेश्वर माऊलींच्या जीवनावर आधारित कादंबरीवजा पुस्तक लिहिले. त्या वेळी त्याचे हस्तलिखित त्यांनी वाचनासाठी माझ्याकडे दिले होते. त्या पुस्तकाला बऱ्यापैकी प्रसिद्धी मिळाली आहे. आज अनेकांच्या घरी त्या पुस्तकाचे वाचन होत आहे.

त्यानंतर श्री. बावकरांनी, 'परब्रह्म ज्ञानं विज्ञानंसहितम्।' हे पुस्तक श्रद्धेने लिहून अभिप्रायासाठी माझ्याकडे दिले. या पुस्तकात श्री. बावकर यांनी ब्रह्मांड-बीज म्हणजेच परब्रह्म, त्यापासून झालेला सृष्टीचा विस्तार आणि सृष्टीची होत जाणारी उत्क्रांती हा अवघड विषय हाताळला आहे. त्यात त्यांचे धाडसही आहे आणि कौतुकही आहे.

सृष्टीची उत्पत्ती, स्थिती आणि लय हा क्रम त्यांनी ज्ञान म्हणजेच योग आणि विज्ञान या दोहोंच्याही दृष्टिकोनातून विस्तृत स्वरूपात मांडला आहे. हे लिखाण करीत असताना त्यांनी स्वत:च्या विचारांबरोबरच अनेक भारतीय आणि पाश्चात्त्य संतांच्या, वैज्ञानिकांच्या सिद्धांताचा आणि मतांचा अभ्यास करून त्यातील उतारे या पुस्तकात उद्धृत केले आहेत. वेदान्तामध्ये, पुराणांमध्ये परब्रह्माविषयी सांगितलेली रहस्ये येथे ठिकठिकाणी त्यांनी उलगडून सांगितली आहेत. ब्रह्मांड-बीजापासून मानवापर्यंत झालेली उत्क्रांती आणि मानवजन्माचे मुख्य लक्ष- पुन्हा त्या परब्रह्म स्थितीपर्यंत जाणे हे वर्तुळ त्यांनी सोप्या शब्दांत मांडले आहे. त्या स्थितीच्या प्राप्तीकरिता लागणारी उपासना, साधना हाही भाग त्यांनी येथे हाताळला आहे.

अलीकडे या ब्रह्मांडरचनेबद्दल काही विद्वानांचेही बारीकसारीक ग्रंथ आहेत. याही ग्रंथांत काही तर्कवितर्क केलेले आहेत. त्याबाबत सर्वच वाचक सहमत होतील असे नाही. तरी जिज्ञासू अभ्यासकांना ब्रह्मांड-बीज, ब्रह्मांड आणि परब्रह्म प्राप्ती यांबाबत या पुस्तकातून मार्गदर्शन मिळू शकेल. परब्रह्म हा प्रत्यक्ष उपासनेतून अनुभूतीचा विषय आहे. असा अवघड विषय श्री. बावकरांनी सोप्या भाषेत मांडण्याचा प्रयत्न केला आहे. जिज्ञासूंना त्याचा उपयोग होऊ शकेल असे मला वाटते.

*ज्ञाननाथजी रानडे*

## प्रास्ताविक

श्री. रमेश बावकर यांचा व माझा परिचय अलीकडच्या दशकातला. एक तत्त्वचिंतक सश्रद्ध असे गृहस्थ, लेखक म्हणून कोणतीही प्रभावळ नावाभोवती नाही. पण मुंबईच्या जागतिक ऋग्वेद परिषदेत त्यांचे एक ऋग्वेदावरचे पुस्तक 'ऋग्वेदीय सूक्ते' या नावाने प्रसिद्ध झाले. या ग्रंथात ऋग्वेदातील महत्त्वाच्या म्हणजे 'उषा, सवितृ, पर्जन्य, मरुत्' अशा २६ सूक्तांचा त्यांनी समश्लोकी अनुवाद केला आहे. त्यांमध्ये एकूण २३५ ऋचांचा समावेश आहे. ऋग्वेदी ऋचांसारख्या जड ग्रंथाचा समश्लोकी अनुवाद हे कष्टसाध्य होते. नव्हे, मराठीतील हा पहिलाच प्रयत्न म्हणावा लागेल. पण श्री. बावकर या कसोटीला उतरले आहेत. पद्यमय अनुवाद सुंदर झाला आहे. पण हा छोटा ग्रंथ 'वेचे' स्वरूपात असल्याने पाठ्यपुस्तक वा वैचारिक ग्रंथ पदवीला तांत्रिक अडचणींमुळे पोहोचला नाही. या ग्रंथाच्या मागची प्रेरणा त्यांच्या आधीच्या लेखनाची होती असे मागाहून कळले आणि आधीचा 'ज्ञान तेच देव' कादंबरीमय ग्रंथ मागाहून वाचायला मिळाला.

सश्रद्ध बावकरांची संतश्री ज्ञानेश्वर महाराजांवर अनन्य निष्ठा आहे. आपल्या मित्र-मंडळींत अनेक वेळा झालेल्या चर्चेतून ज्ञानदेवांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाचा, त्यांच्या देवरूपी चमत्काराचा आणि संतमंडळींतील अग्रस्थानाचा विचार त्यांच्या मनात घोळत होता. एवढ्या लहान वयात, आभाळाएवढे कर्तृत्व त्यांना कसे लाभले असावे याचा कार्य-कारणभाव लावताना, श्री. बावकरांना माऊलींच्या बालपणातील संस्कारांची ही फलश्रुती असावी असे जाणवले आणि त्यातूनच श्री ज्ञानेश्वर महाराजांच्या बालपणात माता-पित्याकडून जे संस्कार झाले, जी विद्या लाभली, त्यातूनच चारी वेद, सहा शास्त्रे, अठरा पुराणे, श्रुती-स्मृती-सहित सर्व ग्रंथांचा आविष्कार त्यांच्या बालमनावर घडला असावा आणि त्यातूनच किशोरवयात, अद्वितीय अन् अभूतपूर्व स्वरूपाची वाङ्मयीन कलाकृती त्यांच्या वाणीतून उतरली, असे विधान त्यांनी मनात पक्के केले. त्याला चरित्रमय कादंबरीचे रूप देऊन शब्दांकित केले. चारी वेदांचा, त्यातील निसर्गरम्य वर्णनाचा, पंचमहाभूतांच्या विविधस्पर्शी साक्षात्काराचा विषय, 'ज्ञान तेच देव' ग्रंथाच्या तीन आवृत्त्या निघूनही मनात रेंगाळत राहिला आणि त्याचे मूर्त स्वरूप 'ऋग्वेदीय सूक्ते'मध्ये प्रकटले.

१९७३ सालापासून श्री. बावकर यांचा ग्रंथश्रेष्ठ भगवद्गीतेचा अभ्यास होता. मित्रमंडळींत गीतेवर एक विवेचक ग्रंथ असावा असा मनोदयही त्यांनी बोलून

दाखविला आणि स्वान्तःसुखाय २५०० पानांचा 'मकरंद' नावाचा ग्रंथही त्यांनी १९८८ ते ९० या काळात तयार केला. कोणी प्रकाशक मिळाला नाही आणि स्वतः एवढा मोठा ग्रंथ प्रकाशित करणे म्हणजे काही लाख रुपयांचा प्रश्न होता. श्री. बावकरांना 'प्रतिष्ठित लेखक' म्हणून वलय नसल्याने त्यांच्या ग्रंथाला बासनातच पडून राहावे लागले. आजही तो ग्रंथ उजेडात आलेला नाही. या सर्व वाटचालीत बावकर थकले नाहीत किंवा चढ-उताराने उद्विग्न झाले नाहीत. या सर्व प्रवासात त्यांना एका प्रश्नाने भेडसावले आणि त्याचा पाठपुरावा म्हणजे 'परब्रह्माचा शोध' घेण्याचा प्रयत्न त्यांनी चालू ठेवला आणि गेल्या काही वर्षांच्या परिश्रमांनंतर 'परब्रह्म ज्ञानं-विज्ञानसहितम्'ची संहिता त्यांनी तयार केली.

वास्तविक परब्रह्माचा शोध ही सर्वच मुमुक्षू वृंदांची आंतरिक अभिलाषा होती, आहे आणि असेल. वेदान्तात परब्रह्माचे वर्णन 'न-इति' म्हणजे नकारात्मक स्वरूपात केलेले आढळते. परब्रह्म कसे? तर 'असे नव्हे, तसे नव्हे, हे नव्हे, ते नव्हे.' असेच परंपरा सांगते. ज्ञानपरंपरेत ते अव्यक्त, अरूप, अनाम असे सांगितले गेले. भक्तिपरंपरेत उपासकाच्या दैवतात परब्रह्माचा शोध घेण्याचा उपदेश केला गेला. म्हणूनच आचार्य शंकराचार्यांनी विटेवरच्या पांडुरंगाला लिंगदेहीधारी परब्रह्म संबोधले आणि–

*महायोगपीठे तटे भीमरथ्यां*
*वरं पुंडरीकाय दातु मुनीद्रैः ।*

*समागत्यतिष्ठं तमानन्दकन्दं*
*परब्रह्मलिंगं भजे पाण्डुरंगम् ॥*

या स्तोत्राने आळवले. बाराव्या शतकात महानुभावांनी कृष्णरूपातील परब्रह्माची उपासना केली. त्यानंतरच्या जवळजवळ आठशे वर्षांच्या काळात भागवत संप्रदायात, वारकरी पंथाने कृष्णाचे प्रौढरूप विठ्ठलाची उपासना सुरू केली आणि सगुणोपासनेचा एकमेव मार्ग महाराष्ट्रात प्रचलित केला. 'नाथ संप्रदायाचा दंशु' झालेल्या निवृत्तिनाथाला आपल्या परमशिष्याकडून ज्ञानदेवाकडून ज्ञान आणि योगमार्गाची अपेक्षा सोडून देऊन भक्तिमार्गात विचरताना पाहावे लागले. निवृत्तिनाथांचा परमशिष्य 'ज्ञाननाथ' झाला नाही. इतकेच नव्हे तर निवृत्तिनाथांनाही गहिनीनाथांची परंपरा आपल्यापुरती मर्यादित ठेवावी लागली. सगुणोपासनेची एवढी प्रचंड लाट महाराष्ट्रात आली. या काळात संतांच्या अभंगवाणीने सर्वसामान्य उपासकांना सगुण विठ्ठलरूपाशी गुंतवून ठेवले

आणि मग अव्यक्त अरूप परब्रह्माचा शोध घेण्याचा प्रयास मागे पडला असे म्हणावा लागेल.

आता गेल्या दोन शतकांत, विशेषत: पाश्चात्त्यांच्या संपर्काने आम्ही अधिक विज्ञाननिष्ठ होत चाललो आणि सर्वच विधिविधाने विज्ञानाच्या निकषावर घासून घेऊ लागलो. ज्ञानमार्गात वाटचाल करताना परब्रह्मस्वरूपाच्या साक्षात्काराची परंपरा आम्ही मानत होतो. नव्हे ज्ञानाचा शेवट, ज्ञानसाधनेची इतिश्री, ब्रह्मस्वरूपी लीन होत असे, नव्हे आयुष्याची आखणीही ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यास अशा चार आश्रमांत करत होतो. शेवटचे दोन आश्रम हे परब्रह्माच्या सान्निध्यात जात असत. त्यामुळे मुद्दाम परब्रह्म जाणून घेणे, आत्मज्ञानासाठी प्रयत्न करणे या गोष्टी गौण होत्या. जीवनाच्या अखेरीस या अवस्थेतून जायचे आहे. तो मार्ग नियतीने योजलाच आहे, असे गृहीत धरत असत, पण विज्ञान आले आणि ग्राह्य कल्पना प्रत्यक्षात प्रायोगिक स्वरूपात दाखविण्याची प्रथा पडली. आम्ही ज्ञान कर्णद्वारा स्वीकारून 'बहुश्रुत' ज्ञानी होत होतो आणि कर्णावर विश्वास राहिला नाही. नेत्रांनी दिसणारे सत्य, बाकी 'ऐकीव' अशी धारणा आली आणि या दृष्टिकोनाचा नव्या पिढीत अधिक प्रचार झाल्यावर 'परब्रह्म ज्ञानं-विज्ञानसहितम्'चा विचार करण्याची पाळी आली. ही कल्पना सविस्तरपणे तपासून घेताना श्री. बावकरांना या ग्रंथाची फलश्रुती वाचक 'श्रद्धेय होण्यात' अपेक्षित आहे. लेखकाने मांडलेले विचार थोडक्यात पाहावे लागतील.

लेखकाच्या मते आधुनिक काळात अध्यात्मविद्या आणि विज्ञान यांमध्ये एक प्रकारची दरी दिसून येते. हा वैचारिक फरक कमी व्हायला हवा. अध्यात्म आणि विज्ञान हे दोन वेगळे मार्ग नसून एका ध्येयाचे दोन पाश आहेत. अध्यात्म हे उच्च दर्जाचे विज्ञानच आहे. आणि पूर्वीच्या ऋषी-मुनींना विज्ञानाची जाण होती नव्हे, ते उत्तम ज्ञाते होते. भौतिक सोयी देणारे ते विज्ञान, या सोयी व्यक्तिमात्रात विविध विकार निर्माण करतात, हे विकार आत्मज्ञानापासून वंचित ठेवतात आणि शेवटी मनुष्य अधोगतीला जातो. म्हणजे प्रवृत्तीपर जीवनात विज्ञानाचा अधिक पगडा आणि निवृत्तीपर जीवनात ईश्वरप्राप्तीचा मार्ग अधिक सुलभ, हे निवृत्तीमय जीवन म्हणजे अध्यात्म असा एक सूरही त्यातून निघतो. प्रवृत्तीपर जीवनात विकारवश न होता आत्मिक उत्क्रांतीच्या मार्गाने गेल्यास, प्राप्त कर्तव्ये करीत, समाधानी, आनंदी जीवन जगल्यास व्यक्ती-समष्टीचा उद्धार होईल आणि अध्यात्म-विज्ञानाचा समन्वय साधला जाईल. लेखकाला मुक्तीमध्ये अध्यात्माचा शेवट अपेक्षित आहे. अशुभापासून मुक्ती मिळवून देणारे

ज्ञान-विज्ञानासहित जे ईशस्वरूप ते परब्रह्म अशी धारणा लेखकाची आहे, हे विचार मांडताना त्यांनी अनेक संतांचे, सत्पुरुषांचे, जुन्या ग्रंथांचे दाखले घेतले आहेत.

ग्रंथाचे मुख्यतः चार भाग आहेत. पहिल्या विषयप्रवेशात आत्मा, सृष्टीची उत्पत्ती, विराट पुरुषापासून जगाची निर्मिती, महास्फोट, उत्क्रांतीवाद, विज्ञानाधिष्ठित अशा आदर्श विचारसरणीतून श्रद्धा, दैव, साधना, योगविचार, कुंडलिनी असा प्रवास करत लेखक परमेश्वरापाशी येऊन पोहोचतो आणि अतर्क्य ब्रह्म, ईश्वर हाच सृष्टीचा आधार, त्याची भक्ती, साधक, कर्म-भक्ती-ज्ञानयोग आणि अज्ञान वृक्षाचे छेदन (भगवद्गीतेचा विचार) तत्त्वज्ञानात्मक विचार येथे विराम घेतो.

दुसऱ्या विभागात निर्गुण-निराकार परब्रह्म, ब्रह्माचे स्वरूप, अध्यात्माची व्याख्या, त्याचे ताटस्थ्य आणि पुन्हा परब्रह्माच्या स्वरूपाची चिकित्सा, ते व्यापक, दहा अंगुळे उरून राहिलेले, त्याची उपासना सगुण-निर्गुण, सृष्टीतील त्याचे अस्तित्व हा तत्त्वज्ञानात्मक विचार मांडून लेखक विज्ञानातील परब्रह्म शोधण्याचा प्रयत्न करतो. परब्रह्माचे वर्णन अनेक ग्रंथांत आढळते. त्याचे स्वरूप, ब्रह्मानंदाची इतर आनंदांशी तुलना करून लेखक विश्वरूपापाशी येऊन थांबतो.

तिसऱ्या विभागात भक्तांचे वर्णन आले आहे. भक्तांची लक्षणे सांगून जीवन-मुक्ताचा बराच विचार केला आहे. जीवनमुक्ताचे गुण, लक्षण, त्याला कर्तव्ये नाहीत, तो नित्य संन्यासी, ब्रह्मप्राप्तीनंतर देहाची अवस्था या भक्तस्थितीचे वर्णन क्रमशः येते.

चवथ्या विभागात परब्रह्मांची नावे, नाम-रूपामधील अभेद, नामाधिष्ठित ब्रह्माचे स्वरूप आणि मग विष्णुसहस्रनामाचे वर्णानुक्रम आणि त्यांचा शास्त्रीय अर्थ यांसाठी सुमारे पंधरा पाने दिली आहेत.

शेवटी परिशिष्टामध्ये तत्त्वज्ञानात्मक कल्पनांचे विवरण, पहिल्या परिशिष्टात विविध शारीरिक विकार व त्यांचे स्वरूप, अन्नाचा विचार करताना धान्याची आरोग्यविषयक गुण-लक्षणे, भाज्या, फळे, द्रवपदार्थ, पेय, विविध रस आणि त्यांची शरीराच्या दृष्टीने उपयुक्तता, असा एक उपयुक्त आणि आरोग्यदायक विभाग आहे. दुसऱ्या परिशिष्टातील तक्त्यात प्रत्येक पदार्थातील रस, गुण, रासायनिक संघटन, पंचमहाभूतांचे अस्तित्व, आणि त्रिविध गुणांचे अस्तित्व, अशा रीतीने पन्नास पदार्थांचा विचार केला आहे.

चित्रमय विवरणात विज्ञानातील अमिबाचे विभाजन, महास्फोट, संकल्पना, ज्ञान-क्षेत्रातील षट्चक्रे, ओंकाराचा मेंदूवर होणारा परिणाम आणि जुन्या सापशिडीच्या खेळाचा तक्ता दिला आहे.

ग्रंथाचे स्थूलरूपाने असे वर्णन करता येईल. परब्रह्माच्या स्वरूपाची जिज्ञासा परमार्थमधील एक महत्त्वाची पायरी आहे. आपापल्या परीने प्रत्येक जण त्याचे स्वरूप जाणून घेत राहतो. कधी ही आत्मानुभूती असते, जे जाणून घेतले, ज्याचा साक्षात्कार झाला, त्याचा स्वान्तःसुखाय परमानंद भोगायचा, हा ब्रह्मानंद 'परमसुखदं' असतो, तो शब्दातीत असतो, अवर्णनीय राहतो. जेथे शब्द थकतात, कल्पनाशक्ती पांगुळते आणि वर्ण्य आणि वर्णन एक होऊन जाते, तेथे उपनिषदातील 'ओम् पूर्णमदः पूर्णमिदं—' अशी अवस्था होते. मग सामान्यांसाठी ते वर्णन करणे अवघड गोष्ट होते.

परब्रह्मस्वरूप ही अनुभूती आहे. वर्ण्य विषय नाही. त्यासाठी अनंत काळाची साधना हवी असते, ही साधना इंद्रिये अंतर्मुख होतात त्या वेळी सुरू होते. चित्ताची एकाग्रता आणि मनाची निर्विषयता ज्यामध्ये अपेक्षित असते, ही अवस्था वाणीचा विषय होऊ शकत नाही. तथापि ज्यांनी अशा विषयांचे जाणिवेतून वा नेणिवेतून चिंतन केले, जे त्यांना युक्त शब्दात मांडता आले, त्यांचे कौतुक करावयाला हवे. श्री. बावकर त्यांपैकी एक होत. परब्रह्माचे रूप ही तत्त्वज्ञानात्मक चिकित्सा आहे. त्याचा भौतिक ज्ञानाशी काही संबंध नाही, असे परंपरा सांगते. आज सारे काही भौतिक ज्ञानाच्या मापाने मोजावे लागते, वैज्ञानिक मीमांसेतून मोजावे लागते; जे खरोखरच अवघड आहे. असे म्हणतात, जेथे विज्ञानाचा अर्थ लावता येत नाही तेथून अध्यात्म सुरू होते. म्हणजेच ज्ञान-विज्ञानाच्या कक्षा अतितरल आहेत. त्यांचा साधक-बाधक विचार, आमच्या पारंपरिक शास्त्राधारे, आणि पूर्वासूरींच्या वचनांद्वारे करून सोप्या रीतीने परब्रह्म समजावून देण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखकांनी उत्तम तऱ्हेने केला आहे.

ग्रंथशास्त्रीय असो की तत्त्वचिंतनात्मक असो, त्यामधील विषयविचार, विशिष्ट शब्दांची योजना, तर्कबद्ध मांडणी यामुळे ग्रंथ पचायला अवघड जातो. ज्या पातळीवरून लेखक विषय मांडतो त्या पातळीवर वाचकाला पोहोचण्यास अवधी लागतो. परब्रह्माच्या चर्चेचा हा ग्रंथ थोडा अशाच स्वरूपाचा आहे. पूर्वाचार्यांची उदाहरणे, दृष्टान्त आणि प्राचीन ग्रंथांचे आधार यांमुळे विवेचन विस्तारात्मक होते आणि साहजिक शास्त्रीय ग्रंथांचे जे लक्षण– 'सूत्रमयता' आणि 'अल्पाक्षरत्व' याला किंचितसा बाध आला आहे.

ज्ञान-विज्ञानासहित जे ईशस्वरूप ते परब्रह्म अशी धारणा लेखकाची आहे, हे विचार मांडताना त्यांनी अनेक संतांचे, सत्पुरुषांचे, जुन्या ग्रंथांचे दाखले घेतले आहेत.

ग्रंथाचे मुख्यत: चार भाग आहेत. पहिल्या विषयप्रवेशात आत्मा, सृष्टीची उत्पत्ती, विराट पुरुषापासून जगाची निर्मिती, महास्फोट, उत्क्रांतीवाद, विज्ञानाधिष्ठित अशा आदर्श विचारसरणीतून श्रद्धा, दैव, साधना, योगविचार, कुंडलिनी असा प्रवास करत लेखक परमेश्वरापाशी येऊन पोहोचतो आणि अतर्क्य ब्रह्म, ईश्वर हाच सृष्टीचा आधार, त्याची भक्ती, साधक, कर्म-भक्ती-ज्ञानयोग आणि अज्ञान वृक्षाचे छेदन (भगवद्‌गीतेचा विचार) तत्त्वज्ञानात्मक विचार येथे विराम घेतो.

दुसऱ्या विभागात निर्गुण-निराकार परब्रह्म, ब्रह्माचे स्वरूप, अध्यात्माची व्याख्या, त्याचे ताटस्थ्य आणि पुन्हा परब्रह्माच्या स्वरूपाची चिकित्सा, ते व्यापक, दहा अंगुळे उरून राहिलेले, त्याची उपासना सगुण-निर्गुण, सृष्टीतील त्याचे अस्तित्व हा तत्त्वज्ञानात्मक विचार मांडून लेखक विज्ञानातील परब्रह्म शोधण्याचा प्रयत्न करतो. परब्रह्माचे वर्णन अनेक ग्रंथांत आढळते. त्याचे स्वरूप, ब्रह्मानंदाची इतर आनंदांशी तुलना करून लेखक विश्वरूपापाशी येऊन थांबतो.

तिसऱ्या विभागात भक्तांचे वर्णन आले आहे. भक्तांची लक्षणे सांगून जीवन-मुक्ताचा बराच विचार केला आहे. जीवनमुक्ताचे गुण, लक्षण, त्याला कर्तव्ये नाहीत, तो नित्य संन्यासी, ब्रह्मप्राप्तीनंतर देहाची अवस्था या भक्तस्थितीचे वर्णन क्रमश: येते.

चवथ्या विभागात परब्रह्मांची नावे, नाम-रूपामधील अभेद, नामाधिष्ठित ब्रह्माचे स्वरूप आणि मग विष्णुसहस्रनामाचे वर्णानुक्रम आणि त्यांचा शास्त्रीय अर्थ यांसाठी सुमारे पंधरा पाने दिली आहेत.

शेवटी परिशिष्टामध्ये तत्त्वज्ञानात्मक कल्पनांचे विवरण, पहिल्या परिशिष्टात विविध शारीरिक विकार व त्यांचे स्वरूप, अन्नाचा विचार करताना धान्याची आरोग्यविषयक गुण-लक्षणे, भाज्या, फळे, द्रवपदार्थ, पेय, विविध रस आणि त्यांची शरीराच्या दृष्टीने उपयुक्तता, असा एक उपयुक्त आणि आरोग्यदायक विभाग आहे. दुसऱ्या परिशिष्टातील तक्त्यात प्रत्येक पदार्थातील रस, गुण, रासायनिक संघटन, पंचमहाभूतांचे अस्तित्व, आणि त्रिविध गुणांचे अस्तित्व, अशा रीतीने पन्नास पदार्थांचा विचार केला आहे.

चित्रमय विवरणात विज्ञानातील अमिबाचे विभाजन, महास्फोट, संकल्पना, ज्ञान-क्षेत्रातील षट्चक्रे, ओंकाराचा मेंदूवर होणारा परिणाम आणि जुन्या सापशिडीच्या खेळाचा तक्ता दिला आहे.

ग्रंथाचे स्थूलरूपाने असे वर्णन करता येईल. परब्रह्माच्या स्वरूपाची जिज्ञासा परमार्थामधील एक महत्त्वाची पायरी आहे. आपापल्या परीने प्रत्येक जण त्याचे स्वरूप जाणून घेत राहतो. कधी ही आत्मानुभूती असते, जे जाणून घेतले, ज्याचा साक्षात्कार झाला, त्याचा स्वान्त:सुखाय परमानंद भोगायचा, हा ब्रह्मानंद 'परमसुखदं' असतो, तो शब्दातीत असतो, अवर्णनीय राहतो. जेथे शब्द थकतात, कल्पनाशक्ती पांगुळते आणि वर्ण्य आणि वर्णन एक होऊन जाते, तेथे उपनिषदातील 'ओम् पूर्णमदः पूर्णमिदं—' अशी अवस्था होते. मग सामान्यांसाठी ते वर्णन करणे अवघड गोष्ट होते.

परब्रह्मस्वरूप ही अनुभूती आहे. वर्ण्य विषय नाही. त्यासाठी अनंत काळाची साधना हवी असते, ही साधना इंद्रिये अंतर्मुख होतात त्या वेळी सुरू होते. चित्ताची एकाग्रता आणि मनाची निर्विषयता ज्यामध्ये अपेक्षित असते, ही अवस्था वाणीचा विषय होऊ शकत नाही. तथापि ज्यांनी अशा विषयांचे जाणिवेतून वा नेणिवेतून चिंतन केले, जे त्यांना युक्त शब्दात मांडता आले, त्यांचे कौतुक करावयाला हवे. श्री. बावकर त्यांपैकी एक होत. परब्रह्माचे रूप ही तत्त्वज्ञानात्मक चिकित्सा आहे. त्याचा भौतिक ज्ञानाशी काही संबंध नाही, असे परंपरा सांगते. आज सारे काही भौतिक ज्ञानाच्या मापाने मोज़ावे लागते, वैज्ञानिक मीमांसेतून मोजावे लागते; जे खरोखरच अवघड आहे. असे म्हणतात, जेथे विज्ञानाचा अर्थ लावता येत नाही तेथून अध्यात्म सुरू होते. म्हणजेच ज्ञान-विज्ञानाच्या कक्षा अतितरल आहेत. त्यांचा साधक-बाधक विचार, आमच्या पारंपरिक शास्त्राधारे, आणि पूर्वासूरींच्या वचनांद्वारे करून सोप्या रीतीने परब्रह्म समजावून देण्याचा प्रयत्न प्रस्तुत लेखकांनी उत्तम तऱ्हेने केला आहे.

ग्रंथशास्त्रीय असो की तत्त्वचिंतनात्मक असो, त्यामधील विषयविचार, विशिष्ट शब्दांची योजना, तर्कबद्ध मांडणी यामुळे ग्रंथ पचायला अवघड जातो. ज्या पातळीवरून लेखक विषय मांडतो त्या पातळीवर वाचकाला पोहोचण्यास अवधी लागतो. परब्रह्माच्या चर्चेचा हा ग्रंथ थोडा अशाच स्वरूपाचा आहे. पूर्वाचार्यांची उदाहरणे, दृष्टान्त आणि प्राचीन ग्रंथांचे आधार यांमुळे विवेचन विस्तारात्मक होते आणि साहजिक शास्त्रीय ग्रंथांचे जे लक्षण– 'सूत्रमयता' आणि 'अल्पाक्षरत्व' याला किंचितसा बाध आला आहे.

विष्णुसहस्रनामाची अकारविल्हे सूची आणि प्रत्येकाचे विश्लेषण येथे अनाहूत असले तरी उपयुक्त वाटते. विशेषत: शेवटी पदार्थांची दिलेली सूची आणि आरोग्य दृष्ट्या योग्यायोग्यता फार महत्त्वाची वाटते. पूर्वीच्या काळात खेळण्यासाठी सापशिडी (मोक्षपट) खेळाचे चित्र कैवल्य-मोक्षापर्यंत जाताना काय काय करावे लागते सांगण्यासाठी उपयुक्त आहे. (याचे एक जुने चित्र भांडारकर संस्थेत आहे.) इतर सचित्र वर्णने उपयुक्त आहेत.

स्वत: लेखकाने सर्वज्ञ समजून मते मांडली नसून जी-जी मते मांडली ती-ती त्या विषयाच्या तज्ज्ञाकडून तपासून घेतली आहेत. अशा तज्ज्ञांचा उल्लेख प्रस्तावनेत केला आहे. ग्रंथाची फलश्रुती सांगताना लेखकांनी म्हटले आहे की, 'अश्रद्ध सश्रद्ध व्हावा, श्रद्धावानाची श्रद्धा दृढ व्हावी, अध्यात्म आणि विज्ञान दोन नसून, परस्पर विरुद्ध नसून एकच स्वरूपाचे आहे, वगैरे'– ग्रंथ वाचल्यावर श्रद्धेपेक्षा चिंतनशीलता अधिक वाढते, विचाराला चालना मिळते आणि अधिक डोळस दृष्टी तयार होते. मोक्षाची अपेक्षा नव्या पिढीला अजिबात नाही. पण जिज्ञासा मात्र भरपूर आहे. त्या दृष्टीने ग्रंथ उपयुक्त आहे.

एका वेगळ्या दृष्टिकोनातून 'परब्रह्माची' चर्चा करणारे, चाकोरीबाहेर जाऊन वाट चालणारे प्रस्तुत लेखक श्री. बावकर त्या दृष्टीने अभिनंदनास पात्र आहेत.

वा. ल. मंजूळ
(संचालक)
म. ए. सो. विश्वभारत सांस्कृतिक केंद्र, पुणे.

## दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

'वक्ता तो वक्ता नोहे श्रोतेविण' या संत ज्ञानेश्वरांच्या उक्तीप्रमाणेच 'लेखक तो लेखक नोहे वाचकाविण', असेच म्हणावेसे वाटते. अहो, वाचकांनी पुस्तक वाचले, तर लेखक लिहिणार, आणि या पुस्तकाची दुसरी आवृत्ती प्रकाशित करण्याची वेळ येते म्हणजे अशा गंभीर व क्लिष्ट विषयांचे वाचकही चिकित्सकच असणार म्हणजे आहेतच. म्हणून त्यांच्या जिज्ञासेची पूर्तता करण्यासाठीच पुन्हा ही आवृत्ती प्रकाशित करत आहोत. या आवृत्तीचेही चोखंदळ वाचक स्वागत करतील अशी आशा ठेवतो. धन्यवाद.

रमेश बावकर

## लेखकाचे मनोगत

४-८-९५ रोजी सकाळी ६ वा. ४ मि.नी जेव्हा मी मच्छरदाणीतून बाहेर तोंड काढले तेव्हाच 'परब्रह्म' या विषयावर काही लेखन करावे असा माझ्या मनात विचार स्फुरून गेला. एक काम संपल्यावर अधिकारी जसे लगेच दुसरे काम पुढे टाकतो, अगदी तसे झाले. २-८-९५ रोजी 'ज्ञान तेच देव' या श्री ज्ञानेश्वर महाराज यांच्या चरित्रात्मक कादंबरीचा प्रकाशन सोहळा संपन्न झाला होता. त्या सोहळ्याच्या आनंदातून मी अजून पूर्णपणे बाहेरही आलो नव्हतो, तोच परमेश्वराने हा विषय माझ्यासमोर टाकला.

परब्रह्म सगळीकडे भरून राहिले आहे. अनेक नामरूपांनी, स्थूलरूपांनी त्याचे अस्तित्व सर्व चराचरात पसरून राहिले आहे, पण त्याचा प्रत्यय काही येत नाही. कारण 'उपाधिमाजी गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।।' असे म्हटले आहे. असे हे चैतन्य ओळखू येणे, त्याचा प्रत्यय येणे अवघड आहे, पण या सर्व चराचराला त्याचे अधिष्ठान आहे, हे निश्चित होय. यावरून एक गोष्ट आठवते.

एक राजा होता. त्याला ब्राह्मणभोजन घालण्याची आवड होती. ब्राह्मणांच्या पंक्तीला तो स्वत: बसत असे. ब्राह्मण जेवू लागले की एकेका पदार्थाचे वर्णन करीत. 'स्वयंपाक उत्तम झाला आहे', 'खीर सुरेख झाली आहे', 'असे श्रीखंड आम्ही आमच्या आयुष्यात प्रथमच खात आहोत', 'पदार्थ असावेत तर असे असावेत.' वगैरे शब्द राजाच्या कानांवर येत. त्या ब्राह्मणांच्या चेहऱ्यावरील आनंद पाहून राजालाही खूप आनंद होत असे. त्याला अभिमान वाटत असे व मोठ्या आढ्यतेने तो त्या ब्राह्मणांकडे पाहात असे. एकदा असेच ब्राह्मणभोजन चालले होते. नेहमीप्रमाणे ब्राह्मण पदार्थांची स्तुती करीत होते व पदार्थ मागमागून जेवत होते, पण राजाच्या समोरच्या एका ब्राह्मणाचे जेवण अगदी शांतपणे व चेहऱ्यावरील निर्विकारी भावाने चालले होते. राजा त्याच्याकडे पाहात होता, पण त्याचे राजाकडे अजिबात लक्ष नव्हते. जेवणे झाली. राजा व ब्राह्मण मंडळी उठली. राजाने सर्वांना महालात बसवून घेतले. हडप्याकरवी तांबुलाचे देणे झाले. राजाने दक्षिणा दिली. सर्व ब्राह्मण मंडळी हळूहळू जाऊ लागली. राजाने त्याच्या समोरील ब्राह्मणाला मुद्दामच शेवटी तांबूल व दक्षिणा दिली. ब्राह्मण निघाला. राजाने त्याला थांबवून विचारले, 'महाराज, आपणास जेवण आवडले नाही काय?' ब्राह्मण म्हणाला, 'राजा, जेवण तर उत्तमच झाले होते. त्यात न आवडण्यासारखे काहीच नव्हते.' राजा म्हणाला, 'मग आपण जेवताना तसे म्हणाला

नाहीत म्हणून विचारले.' ब्राह्मण म्हणाला, 'राजा, इतक्या सर्व मसाल्याच्या पदार्थांची व सुकामेव्याची मुबलकता असताना पदार्थ वाईट होईलच कसा? तेव्हा पदार्थ उत्तम होणारच. त्यात सांगावयास पाहिजे असे नाही. हे पदार्थ नसताना पदार्थ उत्तम होणे हे विशेष असते, होय ना!' राजा म्हणाला, 'तेही खरे आहे?' आणि ब्राह्मण निघून गेला.

राजा मनात म्हणाला, 'हा बेटा रोज खातो तरी काय? म्हणून त्याला माझ्याकडील पदार्थांची विशेष गोडी वाटली नाही? एकदा याच्या घरी जेवावयास जायलाच पाहिजे', असा विचार करून एकदा राजा त्याच्या घरी भोजनसमयीच्या आधी केवळ दोन घटकाच गेला. राजाने सांगितले की, 'मी आज तुझ्या घरी जेवावयास आलो आहे. मी जेवण तयार होईपर्यंत थांबावयास तयार आहे, पण एक अट आहे. बाहेरून एकही वस्तू आणावयाची नाही. घरात असेल त्यातच पदार्थ तयार करावयाचे.'

ब्राह्मण म्हणाला 'ठीक आहे'. त्याने घरात जाऊन चौकशी केली व राजा जेवायला येणार असल्याची सूचना दिली व राजाबरोबर वेदवेदान्ताच्या गप्पा मारू लागला.

दोन घटका झाल्यावर घरात जेवण तयार झाल्याची सूचना आली. राजा पानावर बसला. एका मोठ्या ताटात अनेक पदार्थ मांडून ठेवले होते. काय काय पदार्थ होते त्या ताटात? थालपीठ, भाजी, आमटी, चटणी, कोशिंबीर, रायते, भरीत, भजी, वडे, खीर, हलवा, लोणचे, घारगे, पापड्या, सांडगे, कोहळापाक वगैरे. राजाने सर्व पदार्थांची चव घेतली. खरोखरीच सर्व पदार्थ उत्तम झाले होते. राजाने विचारले, 'हे सर्व पदार्थ कशापासून तयार केले?'

ब्राह्मण म्हणाला, 'कोहळा.'

एक कोहळा. पण त्यात साखर, मीठ व तिखट यांची सरमिसळ केली की अनेक पदार्थ तयार झाले. तसेच परब्रह्म हे निर्गुण निराकार असले तरी त्यात सत्त्व, रज व तम या त्रिगुणांची सरमिसळ झाली आणि या विविध सृष्टीने आकार धारण केला. हा आकार कसा धारण केला वा झाला याचीच चर्चा पुढे आली आहे. या सृष्टीमध्ये कोहळ्याप्रमाणे एक चैतन्यच वास करीत आहे. त्याच अधिष्ठानावर या सृष्टीची उभारणी झाली आहे. फक्त ती दृष्टी आली की त्यातील नावीन्य, विविधता संपून जाते व केवळ तत्त्वच लक्षात येते. असो.

मी मुळात लेखक नाही. १९७३पासून मी ज्ञानेश्वरी, गीतेचा वाचक, अभ्यासक आहे. त्यावर चिंतन, मनन करणारा आहे. आमच्या मित्रमंडळींत आमची थोडी चर्चाही

चालत असे. त्यांच्या अनेक प्रश्नांच्या चर्चेचा व गीतेमधील विविध विषयांच्या विवेचनाचा एक विस्तृत ग्रंथ असावा असे मला स्फुरले. गीतेच्या प्रत्येक श्लोकाचे अर्थ, गुह्यार्थ, भावार्थ असा विवेचनात्मक भाग लिहिता लिहिता त्याचा 'मकरंद' नावाचा एक ग्रंथच निर्माण झाला. विवेचन लिहिताना त्याच्या विस्तृतपणाचा मी कधीच विचार केला नाही आणि त्यामुळे ग्रंथ जवळजवळ २५०० पानांचा झाला. पुस्तके प्रकाशित करावयाची तर ती स्वत:च्या पैशातच प्रकाशित करावयाची व वाचकांना ती अगदी परवडेल अशा किमतीत उपलब्ध करून द्यावयाची, असे माझे धोरण असल्याने एवढे मोठे पुस्तक छापण्यासाठी माझे आर्थिक बळ नसल्याने ते राहून गेले. माझे हे हस्तलिखित ४-५ जणांनी वाचले व ते त्यांना खूप आवडले. (त्याचा लेखन काळ १२-१०-८८ ते २६-९-९०).

पुष्कळ वेळा श्री ज्ञानेश्वर महाराज यांच्याविषयीही चर्चा होत असे. श्री ज्ञानदेवांनी वयाच्या पंधराव्या वर्षी ज्ञानेश्वरीसारखा ग्रंथ लिहिला. त्यात वेद, उपनिषदे, पुराणे, ब्रह्मसूत्र यांचे बरेच दृष्टांत आले आहेत. तेव्हा हे ज्ञान त्यांना कोणी दिले असेल अशी चर्चा एकदा आमच्या मित्रमंडळींत निघाली होती. अशा प्रकारचे वर्णन असणारे एकही पुस्तक नाही. याचीही चर्चा झाली. विठ्ठलपंत, ज्ञानदेवादी भावंडांच्या वडिलांनीच मुलांना सर्व शिक्षण दिले असून याबाबत विठ्ठलपंतांना कोणीही न्याय दिला नाही. तेव्हा असे वर्णन असणारे एखादे पुस्तक असावे असा विचार आमच्या चर्चेतून निष्कर्ष म्हणून बाहेर पडला. तेव्हा हे कार्य कोणी करावे, या विचारात आमची मित्रमंडळी असताना ते म्हणाले की, हे कार्य मीच करावे आणि त्यांचा हा आदेश मानून मी 'ज्ञान तेच देव' हे पुस्तक लिहावयास घेतले. (लेखन काळ २२-४-९१ ते २२-१२-९३) आणि परमेश्वराचीच इच्छा जेव्हा काम करते तेव्हा आपण त्याच्या हातातील बाहुले बनतो. श्री अरविंदांनीच म्हटले आहे की, 'You be the instrument in my hand and I will do the rest.—' आणि असे परमेश्वराचे Instrument होण्याचे भाग्य मला मिळाले यातच मला आनंद आहे. हे पुस्तक ७४० पानांचे झाले. या पुस्तकाचा खर्च माझ्या क्षमतेत होता. निवृत्तीनंतर मिळालेल्या पैशांचा विनियोग करून मी हे पुस्तक छापले आणि ते घरीच विकावयास ठेवले. ज्यांना जमते ते पुस्तक घरी येऊन घेऊन जातात. ज्यांना शक्य नसते त्यांना मी पुस्तक नेऊन देतो. ते केवळ ज्ञानेश्वर महाराजांच्या भक्तांची सेवा म्हणून. २-८-९५ रोजी पहिल्या आवृत्तीचे प्रकाशन झाले. दुसरी आवृत्ती १६-८-९७ रोजी प्रकाशित झाली. लोकांना पुस्तक इतके आवडले की काही वाचकांनी लग्न, मुंज, भाऊबीज, एकसष्टी, वाढदिवस अशा

प्रसंगांना भेट देण्यासाठी ३०-४० प्रती विकत घेतल्या आहेत. वाचकांच्या प्रचंड प्रतिसादामुळे दुसरी आवृत्तीही संपली. (दोन्ही आवृत्त्या ११०० प्रतींच्या होत्या.) आणि ११-२-२००० रोजी 'ज्ञान तेच देव' या पुस्तकाच्या तिसऱ्या आवृत्तीचेही प्रकाशन झाले. ७४० पानी पुस्तकाची किंमत आता रु. १८०/- फक्त आहे. पुस्तकाचे बाह्य स्वरूपही सुरेख आहे.

दुसऱ्या आवृत्तीपर्यंत वाचकांची अनेक पत्रे आली. त्यातून उत्तम अभिप्रायाचा वर्षाव झाला. 'ज्ञान तेच देव' या ग्रंथामध्ये विठ्ठलपंतांनी मुलांना ऋग्वेद शिकवताना ऋग्वेदातील काही ऋचा सकाळी उषास्तवन, सवितृस्तवन, पर्जन्यकाली पर्जन्यस्तवन, मरुतस्तवन, रात्रीच्या वेळी रात्रीच्या ऋचा असे प्रसंगोत्पात म्हणून त्यांचा अर्थ समजावून सांगितला. त्या ऋचा मी शार्दूलविक्रीडित किंवा शिखरिणी वृत्तात रूपांतरित करून विठ्ठलपंतांच्या तोंडी घातल्या आहेत. ती रूपांतरेही लोकांना खूप आवडली. त्यांची तशी पत्रे आली व त्यांनी विचारणा केली की ही रूपांतरे मी कोठून घेतली? तेव्हा वाचकांची ती आवड पाहून मी मुंबई (पार्ले) येथे २७/२८/२९ डिसेंबर ९६ रोजी भरलेल्या जागतिक ऋग्वेदीय परिषदेमध्ये 'ऋग्वेदीय सूक्ते' (समश्लोकी रूपांतर) या पुस्तकाचे प्रकाशन केले. या पुस्तकात एकूण दहाही मंडलांतील निवडक २६ सूक्ते आणि २३५ ऋचा आहेत. यात उषा, सवितृ, पर्जन्य, विष्णू, मरुत, अग्नी, मंडुक व पुरुष अशा सूक्तांचा समावेश आहे. यात ज्ञान-विज्ञान-निसर्गसौंदर्य असा विषय घेतला आहे. असो. येथपर्यंतचा काळ असाच गडबडीत गेला (१९९५ ते १९९७). आणि पुन्हा 'परब्रह्म' या विषयाची आठवण परमेश्वराने करून दिली. सूक्ष्माहून सूक्ष्म व मोठ्याहून मोठ्या, निर्गुण, निराकार, निर्विकार अशा परमेश्वराविषयी मी काय लिहावे, हा प्रश्न मला पडला व विचार करून थकल्यावर मी हा प्रश्न त्याच्यावरच सोपवला.

'परब्रह्म-ज्ञानं विज्ञानसहितम्' हे नाव दिले खरे; 'ज्ञान' या विषयावर संतांनी लेखन केले आहे. तेव्हा त्यांची विधाने गोळा करावीत व त्याचा भावार्थ, मतितार्थ लिहावा व ते जास्तीत जास्त सुस्पष्ट, खुलासेवार करावे म्हणून प्रथम ज्ञानेश्वरी ग्रंथातील ओव्यांचे संकलन केले. अर्थात त्यात भगवद्गीताही आलीच. मग विचार झाला की केवळ गीता, ज्ञानेश्वरी यांच्या विधानांवर भागणार नाही, कारण कोणत्याही विषयाचा सर्वांगाने, परिपूर्णतेने (अर्थात या पुस्तकात असा सर्वांगीण परिपूर्ण विचार झाला आहे असा माझा दावा नाही. परमेश्वराने मला ज्या पद्धतीने विचार करण्याची दिशा दिली आहे, त्या दृष्टीने परिपूर्ण असे मला म्हणावयाचे आहे) विचार करावयाचा झाला तर

त्या विषयावर ज्या ज्या कोणी विचार केला असेल, लिहून ठेवले असेल त्यांचा त्यांचा अभ्यास विचारात घेणे आवश्यक आहे, असे मला वाटले म्हणून मी एकनाथी भागवत, अमृतानुभव, दासबोध, उपनिषदे या ग्रंथांचाही आधार घेतला. तसेच वेद, ब्रह्मसूत्र आणि माझ्या वाचनात आलेले तुलसी रामायण, आत्माराम, सुबोध अद्वैत सिद्धांत, संत तुकाराम गाथा, भारतीय दर्शनसंग्रह याही ग्रंथांचा आधार घेतला. त्याशिवाय धन्य- तुकोबा समर्थ- सदेह वैकुंठगमन, युगानुयुगे चाललेला ईश्वराचा शोध- अशाही काही विद्वानांच्या पुस्तकांचाही आधार घेतला व ज्ञानाची व्याप्ती जास्तीत जास्त पुरी करण्याचा प्रयत्न केला आहे. या विषयावर चर्चा करीत असताना अनेकांनी याशिवाय अनेक पुस्तकांची नावे सुचविली होती. या विषयाचा सखोल अभ्यास करणारेही अनेक विद्वान आहेत. त्यांनीही या विषयावर लेखन केले आहे, यात शंकाच नाही. पण ती सर्व पुस्तके मला उपलब्ध होणे अवघड होते. त्या त्या ज्येष्ठ श्रेष्ठ व्यक्तींशी या विषयावर बोलावे असे वाटत असूनही माझी चर्चेला हिंमत झाली नाही, कारण 'बाळक बापाचिये ताटी रिगे। आणि बापातेचि जेवऊ लागे। की तो संतोषलेनि वेगे। मुखचि वोढवी ॥ (ज्ञानेश्वरी ९-१५) असे माझे पहिल्या दोन चरणांप्रमाणे झाले असते. पुढील दोन चरणांत प्रत्यक्षात उतरले असते की नाही याची मला शंका होती. त्यामुळे अशा अनेक पुस्तकांचा परामर्श घेणे मला जमले नाही व श्रेष्ठ, ज्येष्ठ व्यक्तींशी चर्चा करणेही जमले नाही हे मात्र खरे. असो.-

हे पुस्तक सर्व थराच्या लोकांनी वाचावे, त्यांनाही वाचनात गोडी वाटावी, त्यांचे बौद्धिक, मानसिक, आध्यात्मिक समाधान व्हावे, म्हणून ज्ञानाबरोबर विज्ञानालाही तितकेच महत्त्व आहे. एवढेच नव्हे तर विज्ञानच आधी जाणावे असे संत ज्ञानेश्वरांनीच म्हटले आहे, 'एथ विज्ञाने काय करावे। ऐसे घेसी जरी मनोभावे। तरी पै आधी जाणावे। तेचि लागे ॥ (ज्ञानेश्वरी ७-३) म्हणून विज्ञान विषयाचा विचार सुरू केला.

विज्ञानामध्ये सृष्टीच्या उत्पत्तीचा विचार केला. परब्रह्मापासूनच हे सर्व विश्व उत्पन्न झालेले आहे, असे आपण नेहमी म्हणतो; पण परब्रह्म हे तर निर्गुण, निराकार असे असता विश्वाच्या निमित्ताने ते सगुण साकार कसे झाले? सूक्ष्मातीत सूक्ष्म असता जडात जड कसे झाले? हे स्थूल रूप कोणत्या पद्धतीने झाले? याविषयीचे विज्ञान काही उपलब्ध आहे काय? याविषयी चर्चा करताना आमचे मित्र श्री. जितेंद्र गोलसंगी यांनी सांगितले की सध्याच्या विज्ञानाच्या मते एका महास्फोटातून (Big Bang) हे विश्व निर्माण झाले आहे व त्यांनी पुष्कळशी माहितीही दिली, पण महास्फोट कशाचा झाला? त्या ठिकाणी कोणत्या वस्तूचा- वस्तुमात्राचा साठा होता? याविषयी मात्र

कोणाकडूनही माहिती मिळाली नाही. तेव्हा त्याविषयी श्री. गोलसंगी यांनी मला 'आकाशाचे जडले नाते' हे डॉ. जयंत नारळीकर यांचे पुस्तक वाचावयास दिले. त्यात त्यांनी स्पष्ट म्हटले आहे की, शास्त्रज्ञांनाही हा स्फोट कशाचा झाला, का झाला हे निश्चितपणे माहीत नाही. हा सर्व त्यांचा तर्कच आहे. त्यामुळे माझा प्रश्न अनुत्तरितच राहिला. असो.

या विषयाचा विचार करीत असताना भागवत चाळता चाळता त्यात त्रिगुणाचा महाक्षोभ झाला असा उल्लेख आला आहे, तो वाचला. म्हणजे आध्यात्मिक दृष्ट्या विचार करता परब्रह्मापासून शबल ब्रह्म (चैतन्यरूप कार्यप्रवृत्त झालेले), शबलब्रह्मापासून पुरुष व प्रकृतीपासून त्रिगुण (सत्त्व, रज, तम) व या त्रिगुणाचा महास्फोट होऊन स्थूलस्वरूपाची सृष्टी उत्पन्न झाली असा उल्लेख आहे. महास्फोटातून आकाश (पोकळी), वायू (नानाविध), अग्नी, आप (पाण्याची वाफ) व पृथ्वी (सर्व ग्रहगोल) निर्माण झाले असे म्हटले आहे, तर विज्ञान म्हणते की, महास्फोटातून इलेक्ट्रॉन, प्रोटॉन, न्यूट्रॉन निर्माण होऊन त्यांच्या नैसर्गिक संयोगाने मूलद्रव्ये निर्माण होऊन, त्यांपासून सर्व विश्व स्थूलरूपाने आकाराला आले आहे. या मूलद्रव्यांमध्ये प्रथम अनशन (Inorganic) रसायने निर्माण झाली व पुढे त्यांच्यातच नैसर्गिक प्रक्रिया होऊन साशन (Organic) रसायने तयार झाली व त्यापासूनच पुढे सजीवाची निर्मिती झाली. सृष्टीच्या उत्पत्तीचा विचार करताना अगदी प्रथम सृष्टीच्या उत्पत्तीच्या वेळी काय होते? प्रथम एकपेशी जीव कसा तयार झाला व त्यानंतर अनेकपेशी जीव कसे तयार झाले याचा उल्लेख वेदांमधून आला आहे व त्यानंतर विज्ञान काय म्हणते याचीही सविस्तर माहिती येथे दिली आहे. जिवाची उत्क्रांती हा विषयही येथे घेतला आहे. उत्क्रांतीचे वैज्ञानिक स्वरूप व आध्यात्मिक स्वरूप याची चर्चाही येथे केली आहे. सृष्टीच्या उत्पत्तीविषयी वैज्ञानिकांनी मांडलेल्या सिद्धांताचा विचार करून जिवाची उत्क्रांती कशी झाली, याची माहिती दिली असून वेदामधील नासदीय सूक्तानेही जिवाच्या उत्पत्तीविषयी केलेली चर्चा ही इतक्या पुरातनकाळची असूनही अगदी सूत्रबद्ध व चिंतनीय आहे. असे विधान वाचनात आले होते की, 'ध्यानामध्ये जे ज्ञान होते ते पूर्णतया खरे असते.' त्याला 'अतींद्रिय ज्ञान' म्हणतात.

वैज्ञानिक उत्क्रांतीवादाचा विचार या पुस्तकात केला आहे. जिवाच्या उत्क्रांतीचा विचार करताना विज्ञानाने सांगितलेला क्रम, तसाच वेदपुराणातून सांगितलेला क्रम हा तुलनात्मक विचार केला आहे. पण मनुष्यप्राणी ही सर्वात शेवटची उत्क्रांतीची पायरी आहे, असे जे विज्ञानाला वाटते त्याच्याही पुढे जाऊन, पूर्वीच्या ऋषींनी वेदान्ताचा

विचार मांडून, मानवाची उत्क्रांती ही देवत्वापर्यंत जाऊ शकते हा महत्त्वाचा मुद्दा सांगून उत्क्रांतीची खरी ओळख करून दिली आहे व त्याचाही विचार प्रामुख्याने या पुस्तकात केला आहे. मनुष्य उत्क्रांत होत असताना या उत्क्रांतीमध्ये मनोविज्ञानाचा केवढा मोठा सहभाग आहे याचे स्पष्टीकरण यात केले आहे. हे मनोविज्ञान शरीरविज्ञानावर कसे नियंत्रण ठेवू शकते याचाही विचार येथे केला आहे. तो विचार आयुर्वेदामधील शरीर-विज्ञानाचा आधार घेऊन मांडला आहे. शिवाय तो विचार डॉक्टर, वैद्य अशा जाणकारांपुढे मांडून त्यांच्याकडून त्याची पसंती मिळविली आहे. या उत्क्रांतीमध्ये उपासना हा मुख्य दुवा आहे. या उपासनेपासूनच पुढे अध्यात्म चालू होते. आहार, विहार व आचार या पायरीने त्याची प्रगती सुरू होते. पुढे वाचन, चिंतन, मनन या मधल्या पायऱ्या आहेत, तर यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यानधारणा, समाधी या अष्टांगयोगसाधनेमध्ये प्रथम शरीर विज्ञानाचा विचार झाला असून मनोविज्ञानाचाही विचार केला गेला आहे. ही अष्टांगयोगसाधना हीच खरी मानवाची उत्क्रांतीची शिडी होय. या उपासनेत शरीरप्रक्रिया म्हणजे षट्चक्र शुद्धी, शरीर शुद्धी, स्थूल जडतत्त्वे (पृथ्वी, आप), नंतर कुंडलिनी जागृती (तेज तत्त्व हेसुद्धा जड तत्त्व असले तरी पृथ्वी व आपपेक्षा सूक्ष्म आहे) यानंतर ध्यानधारणा व समाधी या उपासनेच्या पायऱ्या हळूहळू सूक्ष्माकडे म्हणजेच मनोविज्ञानाकडे जाऊ लागतात. समाधीमध्ये मनाचा, बुद्धीचा, चित्ताचा, अहंकाराचा लय होतो व जीव परब्रह्मस्वरूप होतो. हीच मानवाच्या उत्क्रांतीची शेवटची अवस्था होय. इतका विचार येथे केला आहे. या पद्धतीची प्रक्रिया जरी काही पानांमध्ये वर्णन केली असली तरी ही शेवटची अवस्था प्राप्त होण्यास कित्येक जन्मांचा अवधी लागतो व तो का लागतो याचे वर्णन या पुस्तकात केले आहे.

त्याआधी म्हणजे सुरुवातीलाच जीवन हे कशासाठी आहे? सुख म्हणजे काय? प्रत्येक जीव सुखासाठीच धडपडत असतो. तेव्हा त्याला ते सुख मिळते का? ते इतर कशातही म्हणजे कोणत्याही भौतिक वस्तूतून मिळत नसून ईश्वर ही संकल्पना मान्य केल्यास परमेश्वर याच विषयाचे वाचन, चिंतन, मनन, निदिध्यास घेतल्यास सुख प्राप्त होऊ शकते, ही कल्पना विस्तृतपणे पहिल्या लेखात मांडली आहे. हल्लीच्या विज्ञानयुगात ईश्वराची संकल्पना बुद्धिवादी लोकांना पटत नाही. जे दिसते त्यावरच विश्वास ठेवावयाचा, जे सिद्ध होऊ शकते तेच मानायचे, बाकी सर्व खोटे, असा त्यांचा मुख्य विचार असतो. त्यामुळे ईश्वराची संकल्पना खरी आहे का? येथपासून विचार करण्याची गरज वाटू लागली. म्हणून ईश्वरसिद्धीची उपपत्ती हा लेख आला.

यामध्ये ईश्वराचे स्वरूप कसे आहे? ते सत् आहे का असत्? चिद्रूप का आनंदरूप याचा विचार आला आहे. त्यापुढे अनेक उपपत्तींचा विचार आला आहे. त्यांमध्ये प्रयोजनवादी, पर्यावरणवादी, नैतिक, मूल्यात्मक, ज्ञानशास्त्रीय यांचाही विचार घेतला आहे. नंतर आत्मा कसा आहे यामध्ये उपनिषदाने केलेले आत्म्याचे वर्णन आले आहे. विराट पुरुषाच्या शरीरापासून, ब्रह्मदेवाच्या शरीराच्या प्रत्येक अवयवापासून, कश्यपमुनींच्या अनेक पत्नींपासून सृष्टीची निर्मिती व विस्तार झाला आहे. तसेच संकल्पापासून सृष्टीची निर्मिती झाली आहे याचाही खुलासा येथे आला आहे.

'श्रद्धा' ही जीवनाची मूळ बैठक आहे, हा लेख मुद्दाम टाकलेला आहे. वैज्ञानिकांच्या- शास्त्रज्ञांच्या शब्दकोशात 'श्रद्धा' हा शब्द नाही. त्यांचा सर्व भार प्रयोगाने सिद्ध होणाऱ्या गणिती सिद्धांतावरच असतो. पण एक महत्त्वाची गोष्ट लक्षात घ्यावयास पाहिजे की ज्या वेळी एखाद्या सिद्धांताची कल्पना मनात येते किंवा एखाद्या शोधाचा विचार मनात येतो, त्या वेळी त्या शास्त्रज्ञांची त्यांनी कल्पनेने तयार केलेल्या आराखड्यावर 'श्रद्धाच' असते. कारण त्याच मार्गाने ते प्रयोग करून सिद्धीच्या प्रगतिपथावर वाटचाल करीत असतात, पण ते 'श्रद्धा' शब्द न वापरता अन्य शब्दाने त्याचा खुलासा करीत असतात. पण 'यच्चयावत् पदार्थांच्या मूळ अधिष्ठानाचा सिद्धांत' किंवा 'कंपन धाग्याचा सिद्धांत' (Theory of Vibrating Strings) मांडणारे प्रा. श्वाईझ यांना सर्व बाजूंनी त्यांच्या सिद्धांताला विरोध होत असूनही त्यांनी तो प्रयोग चालू ठेवला व त्यात यश मिळविले, ते केवळ 'श्रद्धेच्या' जोरावरच व तसे त्यांनी स्वतः कबूल केले. तेव्हा 'श्रद्धा' ही महत्त्वाची आहे. ती श्रद्धा कोणावर आहे हेही महत्त्वाचे आहे कारण 'श्रद्धा'सुद्धा त्रिगुणात्मक आहे. असो. तेव्हा 'श्रद्धा' असेल तरच त्यात यश आहे हे निश्चित. 'मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयोः।' या प्रकरणात मन, मनाची धारणा म्हणजेच मनोविज्ञान हे शरीरविज्ञानाशी कसे संबंधित आहे? मन हे सत्त्व, रज, तमात्मक अशा तिन्ही गुणांनी विकसित होत असते व त्याप्रमाणे शरीरात प्रक्रिया घडत असतात. तेव्हा प्रथम शरीरातील महत्त्वाच्या ग्रंथी व त्यांचे कार्य यांचे वर्णन केले असून पुढे आहार, विहार, आचार व साधना यांच्या साह्याने मनाची धारणा कशी बदलत जाते याचे वर्णन केले आहे. आहाराचे महत्त्व लक्षात घेऊन आहाराप्रमाणे याचा विचार करून दोनही परिशिष्टांमध्ये आपल्या रोजच्या संबंधात असलेली धान्ये, फळे, भाज्या, पालेभाज्या वगैरे यांचे रसयुक्त गुण, त्रिगुणात्मक प्रमाण, पंचमहाभूतात्मक संबंध व शेवटी रासायनिक संगठनही दिले आहे. त्यांचाही उपयोग वाचकांना त्यांच्या उपासनेच्या दृष्टीने होण्याची शक्यता आहे. असो.

पण त्याआधी जेव्हा माझा 'परब्रह्म' या विषयावर लिहिण्याचा विचार झाला तेव्हा सहज सभोवताली असलेल्या विविध गुणाधिक्यांच्या लोकांचा विचार मनात आला. अनेक प्रश्न मनात उभे राहिले. विचार आला की सर्व माणसे एकाच प्रकारचे अन्न खातात. त्यांच्या वृत्तींमध्ये एवढा फरक कसा? सात्त्विक अन्नाचे सेवन करणाऱ्या माणसाच्या शरीराची रचना व तामस अन्नाचे सेवन करणाऱ्या माणसाच्या शरीराची रचना यांत नेमका काय फरक असतो? काही माणसे कमालीची सहनशील, शांत तर काही उतावीळ व कोपि  का? एक नम्र तर दुसरा उद्धट व एक हुशार तर दुसरा मूर्ख का? अन्नामुळे शरीरावर नेमका काय परिणाम होतो. तेव्हा याविषयी मी अनेकांशी विचारविनिमय केला, पण शरीरातील अमीनो ॲसिड्स, प्रोटिन्स, कार्बोहायड्रेट्स, डीएनए, क्रोमोसोम्स वगैरेंमध्ये काहीही फरक होत नाही असे मला सांगण्यात आले. तेव्हा शरीरविज्ञानाचा व मनोविज्ञानाचा काही संबंध आहे काय? अन्न हे त्रिगुणात्मक व पंचमहाभूतात्मक आहे काय? याविषयी माहिती मिळविण्याच्या खटपटीत माझी श्री. आशुतोष पाटणकर (वैद्य) यांच्याशी गाठ पडली. त्यांनी आयुर्वेदातील काही पुस्तके मला वाचावयास दिली. त्यांमध्ये मला आवश्यक असलेली सर्व माहिती मिळाली. पण अन्नाचा शरीरविज्ञानाशी काय संबंध आहे, हा प्रश्न या माहितीतून सुटत नव्हता. शिवाय मुखपृष्ठावरील साधूची अवस्था पाहता मनात प्रश्न उभा राहतो की, मनुष्य कित्येक वर्षे अन्नपाण्याशिवाय राहू शकतो का? त्या वेळी त्याच्या शरीरात काय प्रक्रिया होत असतात. जर त्या प्रक्रिया थांबल्या असतील तर मनुष्य जिवंत राहू शकतो का? शरीरविज्ञान त्याला दुजोरा देते का? आध्यात्मिक दृष्ट्या शेकडो, हजारो वर्षे तपश्चर्या करणाऱ्या ऋषिमुनींचे वर्णन पुराणात आले आहे. पण सध्याच्या वैज्ञानिक दृष्टीने ते शक्य आहे काय? तेव्हा पुस्तकाच्या नावाप्रमाणे 'ज्ञानं विज्ञानसहितम् ।' असल्याने यामागील विज्ञानाची माहिती देणे आवश्यक आहे, असा माझा निश्चय असल्यामुळे मी तसे श्री. पाटणकरांना विचारले. तेव्हा त्यांनी मला सौ. भुतडा (वैद्य) यांच्याकडे पाठविले. त्यांना मी मुखपृष्ठावरील फोटो दाखविला व विचारले की 'या साधूच्या शरीराची सर्व हाडे बाहेर स्पष्ट दिसत आहेत आणि ज्या अर्थी तो बसून आहे त्या अर्थी तो जिवंत असला पाहिजे. तेव्हा मला आपण शरीरातील सर्व ग्रंथींच्या कार्याची माहिती समजावून सांगा.' आणि त्यांनी मला सर्व माहिती अगदी संगतवार व मोकळेपणाने सविस्तर सांगितली. त्यावरून मी 'मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयो: ।' हे प्रकरण लिहिले व त्यांना वाचून दाखविले. त्यांना विचारले की जर मनुष्याच्या मनाची धारणा अशा प्रकारे बदलत गेली तर त्याचे शरीर व त्यातील ग्रंथी

त्याला साह्य होतील का? त्याला इतका वेळ समाधीचा लाभ घेता येईल का? तेव्हा त्यांनी सांगितले की, 'शरीराच्या सर्व प्रक्रिया या मनाच्या धारणेवरच अवलंबून असतात. तेव्हा हे शक्य आहे'. अशा प्रकारे या विषयाची पूर्तता होण्यास अनेकांचे साह्य झाले. त्यानंतर हे प्रकरण मी आणखी दोन डॉक्टरांना वाचून दाखविले की ज्यांना अध्यात्मशास्त्राची तशी जास्त ओळख नव्हती. त्यांनीही मन व शरीर यांच्यामध्ये घडणाऱ्या प्रक्रियेच्या वर्णनाला संमती दिली. यामध्ये मला साह्य करणारे श्री. चंद्रकांत काळे ('झूलॉजी' विभाग युनिव्हर्सिटी, पुणे) यांचाही उल्लेख आवर्जून करावासा वाटतो.

याच विषयाला अनुसरून षट्चक्र भेदन, कुंडलिनी, शरीरातील पंचकोष व समाधी यांविषयी शरीरविज्ञानाच्या दृष्टिकोनातून व आध्यात्मिक प्रगतीच्या दृष्टीनेही त्याचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न केला आहे. सृष्टीच्या निर्मितीविषयी विज्ञानाने एका महास्फोटाचा सिद्धांत मांडला. त्यातही काही प्रश्नांची उत्तरे अजूनही अनुत्तरित आहेत. या सर्व विश्वात इतके असंख्य ग्रहगोल, तारे फिरत आहेत की विज्ञानाच्या दृष्टिकोनातून त्यांच्यातील गुरुत्वाकर्षणामुळे ते एकमेकांपासून ठराविक अंतरावरून फिरत आहेत हे खरे. तसा आपल्या सूर्यमालेचा विचार करताही गुरुत्वाकर्षणाला महत्त्व आहे यात शंकाच नाही. पण त्यामुळे पृथ्वीवर होणारे ऋतुमानाचे चक्र हे मानव व प्राणी यांच्या जीवनक्रमाच्या दृष्टीनेही महत्त्वाचे आहे व त्यांचा काळही नियमित आहे. त्यांचे हे नियंत्रण हे एका आदिशक्तीच्या नियंत्रणावर चालते हीसुद्धा एक 'श्रद्धा' आहे व त्या शक्तीलाच परमेश्वर- परब्रह्म मानले गेले आहे. असे जेव्हा वेद व उपनिषदे यांनी मानले तेव्हाच त्यांना विश्वाचे कोडे उलगडण्यास सोपे गेले असे दिसून येते.

प्राण्यांचे जीवन हे अतिशय नियमित व सुसंबद्ध असते. त्यामुळे त्यांच्या जीवनात, समाजात कोणतीही क्रांती होण्याची शक्यता नसते. कारण ते सर्व निसर्गावरच अवलंबून असतात, पण मानवाचे तसे नाही. मानवाला 'मन' हे एक वैशिष्ट्यपूर्ण इंद्रिय असल्याने व मानवाला स्वतःची विचारशक्ती असल्याने, संकल्पशक्ती असल्याने निसर्गाच्या विरुद्ध जाण्याची इच्छा त्याच्या ठिकाणी निर्माण होते. निसर्गनियम म्हणजे नीतिनियम, नैतिकता होय. त्याविरुद्ध मनुष्य वागू लागल्याने नीतिनियमांची स्थापना झाली, धर्माची उभारणी झाली, तरीही मनुष्याने आपले वागणे बदलले नाही आणि त्यामुळे परमेश्वराचे अवतरण सुरू झाले. हा अवतार त्या त्या काळी निसर्गाला अनुकूल व त्या त्या उत्क्रांती-अवस्थेतील श्रेष्ठतर, श्रेष्ठतम अशा रूपाचा होता याचाही विचार येथे केला आहे. ज्ञान-विज्ञानाची संकल्पना गीता,

ज्ञानेश्वरी, दासबोध यांतील ओव्यांच्या आधारे स्पष्ट करण्याचा प्रयत्न केला आहे. मनुष्याला खऱ्या अर्थाने उत्क्रांत व्हावयाचे असेल तर परमेश्वरी ज्ञान व भक्ती हाच एक मार्ग आहे, असा याचा निष्कर्ष आहे. यातच मनुष्याचे सुख, आनंद साठलेला आहे. परमेश्वराविषयीचे अज्ञान हेच मनुष्याच्या दु:खाचे मूळ आहे. त्यासाठी परमेश्वरावर श्रद्धा ठेवून व उपासना करून परमेश्वरप्राप्तीचा प्रयत्न करावयास पाहिजे. कारण 'परमेश्वर' ही वस्तू कोणत्याही गणिती सिद्धान्तात वा प्रयोगशाळेतील साधनांत बसणारी नाही. तसेच ती कोणत्याही बुद्धिवादी लोकांच्या तर्काच्या कक्षेतही येणारी नाही, हे महत्त्वाचे आहे.

परब्रह्म हा दुसरा भाग आहे. ज्या परब्रह्म, परमेश्वराची प्राप्ती करावयाची तो तरी नेमका कसा आहे, याचा विचार या भागात केला आहे. यावरून असा गैरसमज होण्याची शक्यता आहे की, परमेश्वराची मला प्राप्ती झालेली आहे किंवा मला त्याची अनुभूती आली आहे किंवा मी तेथपर्यंत पोहचलो आहे, पण यांपैकी काहीही झाले नाही. असे असता मी हे वर्णन करण्याचे धाडस कसे केले? यावरून एक दृष्टांत आठवतो. जेवताना कोणी पुरुष म्हणतो की 'काय ग! काय भाजी केली आहेस? तिला काही चवच नाही. या भाजीच्या फोडी किती मोठ्या मोठ्या केल्या आहेत. मीठही कमी झाले आहे.' वगैरे वगैरे. हे जो पुरुष समजू शकतो त्याला स्वत:ला काहीही विळीवर चिरता येत नसते व भाजीला किती तिखट, मीठ, पाणी घालावयाचे हेही समजत नसते. तरीही त्याला हा दोष किंवा याउलट गुणही सांगण्याचा अधिकार असतो. कारण भाजी कशी असते, लागते याचा त्याला अनुभव असतो. तसेच कोणी एखाद्या गाण्याच्या बैठकीतून उठून जाऊ लागला तर त्याचा मित्र विचारतो 'का रे निघालास?' तर तो म्हणतो, 'अरे काय सूर लावलाय? कोणाचा कोणाला मेळ नाही आणि गाणाराही बेसूर गातोय.' काय असे म्हणणाऱ्याला चांगले गायला येते? का त्याला वाद्यांना कसे जुळवावयाचे हे माहीत असते? तर नसते. यांतील त्याला काहीच येत नसते, पण गाणे कसे ऐकावयाचे हे मात्र त्याला चांगले माहीत असते. असो. अशी कितीतरी उदाहरणे देता येतील. मला जरी प्रत्यक्ष परमेश्वराचा साक्षात्कार झालेला नसला वा प्रत्यक्षानुभूती आलेली नसली, तरी ज्या काही तत्त्ववेत्त्यांनी परब्रह्माचे तर्कसंगत वर्णन करून ठेवले आहे, पूर्वीच्या ऋषिमुनींनी परमेश्वराचा ध्यानामध्ये, अतींद्रिय अवस्थेमध्ये अपरोक्ष साक्षात्कार करून घेतला आहे व त्याचे त्यांनी उपनिषदासारख्या वेदान्ताच्या ग्रंथातून मंत्ररूपाने वर्णन करून ठेवले आहे, त्यांचा आधार घेऊन मी ते आपणापुढे मांडले आहे. त्यांनी केलेले ब्रह्माचे निरूपणही दिले आहे. तसेच संतांना जी अनुभूती आली होती, त्यांनी ज्या शब्दांत वर्णन करून ठेवले

आहे ते वाचून त्यावर चिंतन, मनन करून आपणाला त्याची थोडी तरी कल्पना यावी असे विस्तारपूर्वक लिहून या भागाची उभारणी केली आहे. त्यामुळे ज्या प्रकारे वर्णन आले आहे त्या त्या प्रकाराने त्याचे वर्णन करण्याचा येथे प्रयत्न केला आहे. यात एक महत्त्वाचा भाग लक्षात ठेवावयास पाहिजे. संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'पै बाळ जै जेवविजे। तै घासु विसा ठायी कीजे। तैसे एकचि हे चतुर्व्याजे। कथिले आम्ही॥' (ज्ञानेश्वरी १३-९५१). एकच घास पण बाळाचे वय पाहता त्याच्या तोंडात मावेल व त्याला गिळता येईल असे त्याचे छोटे छोटे घास करावे लागतात. तसे परब्रह्माची अनुभूती संतांना आली होती. ते त्यांनी अनेक ठिकाणी, अनेक प्रकारे, अनेक ओव्यांतून, वेगवेगळ्या शब्दांतून वर्णन करून सांगितले आहे. त्या सर्वांचेच आपण वाचन, चिंतन, मनन केले तर आपणांस त्या परमेश्वराची थोडी तरी कल्पना येऊ शकेल. त्याच ओव्यांची मांडणी मी आपणासमोर करीत आहे. मी त्या बाळकाप्रमाणे अगदीच लहान आहे. म्हणून संतांनी वर्णन केलेल्या जास्तीत जास्त ओव्या घेण्याचा मी प्रयत्न केला आहे. जे माझ्याइतके लहान असतील त्यांना परमेश्वराचे स्वरूप समजण्यास सुलभ होईल. जे माझ्याहून मोठे, खूप मोठे असतील त्यांच्यासाठी तात्त्विक चर्चा दिली असली तरी त्यांनी त्या ओव्या वगळून मोठा घास घ्यावा, कारण या पुस्तकाच्या लेखनाचा मूळ उद्देशच असा आहे (त्यांचा शेवटी उल्लेख येईलच) की हे सर्वांनाच वाचनीय, चिंतनीय व्हावे. त्यामुळे विद्वान लोकांना परमेश्वराच्या वर्णनाच्या ओव्यांची संख्या जास्त असल्याचे वाटून थोडे रटाळ वाटण्याची शक्यता आहे, पण त्याला नाईलाज आहे. असो.

परमेश्वर सर्व सृष्टीत भरून राहिला आहे. परब्रह्मच केवळ भरून राहिला आहे असे नसून सर्व सृष्टी हे परमेश्वराचे रूप आहे. तेव्हा ते कशा पद्धतीने आहे याचा विचार येथे केला आहे व तसे करण्याचा प्रयत्न आहे. परब्रह्माची व्यापकता पाहता हे सर्व वर्णन पुरेपणाने असेल असे मला म्हणावयाचे नाही, पण 'शितावरून भाताची परीक्षा' या न्यायाने परब्रह्माच्या व्यापकतेची थोडी तरी कल्पना येण्याची शक्यता आहे असे मला वाटते. प्रत्यक्षात वाचकांच्या अभिप्रायावरूनच ते स्पष्ट होईल.

परब्रह्म हे निर्गुण निराकार अशा स्वरूपाचे आहे. त्याचे वर्णन करताना अनेक विशेषणे लावली जातात. तरीही ते स्वरूप कसे ते कळत नाही, पण जर परब्रह्मस्वरूप 'याची देही याची डोळा' पाहावयाचे असेल तर ते जीवन्मुक्ताच्या स्वरूपाने पाहता येईल. 'उपाधिमाजी गुप्त। चैतन्य असे सर्वगत॥' असे परमेश्वराचे स्वरूप संत ज्ञानेश्वरांनी वर्णन करून ठेवले आहे. त्याचा अर्थ 'चैतन्य' सर्व पदार्थमात्रांत अधिष्ठित

असले तरी त्या वस्तुमात्रापासून ते पूर्णपणे अलिप्त आहे. त्या वस्तुमात्राच्या ठिकाणी असलेल्या गुणदोषांचा कोणताही परिणाम त्या चैतन्यावर होत नाही. त्याप्रमाणे जे जीवन्मुक्त असतात, विदेही असतात, ते या संसारात असूनही संसारापासून अलिप्त असतात म्हणून जीवन्मुक्तांचे वर्णन करणे, त्याची स्वरूप लक्षणे सांगणे ओघानेच आले. म्हणून या पुस्तकाचा तिसरा भाग 'जीवन्मुक्त दशा' या वर्णनाचा घातला आहे. त्यामध्ये सर्वसामान्य जीव हा उत्क्रांत होऊन जीवन्मुक्त, विदेही अवस्थेपर्यंत कसा पोहचतो याचा विचार केला आहे. त्याच्या ठिकाणी कोणते गुण आवश्यक आहेत याचे वर्णन केले आहे. जन्मोजन्मीच्या प्रगतीचे टप्पे दिले आहेत. जन्म येण्याची कारणेही दिली आहेत. ऋणानुबंध हे जन्माला कसे कारण होतात हेही स्पष्ट केले आहे. 'मारिलियाचेनि रागे। पाठीचा जेवी सूड मागे। तेणे आक्षेपे लागे। जन्मापाठी ॥' (ज्ञानेश्वरी १३-५४३) म्हणजे माराने चिडून जसा एखादा मारणाऱ्याचा द्वेषाने पाठलाग करतो, त्याचप्रमाणे जो आवेशाने जन्माच्या मागे हात धुऊन लागतो, याचा विचार करून काही जीव या जन्माची जी कारणे आहेत तीच नाहीशी करण्याच्या मागे लागतात व जन्मोजन्मी अतिशय निष्ठेने, सातत्याने उपासना करून जप, तप, ध्यान, धारणा, समाधी यांसारखी साधना करून मुक्तीच्या मार्गातील शेवटचा म्हणजेच जीवन्मुक्तीचा टप्पा गाठतात. हे सर्व वर्णन करून सांगितले आहे. नासदीय सूक्तामध्ये जीवन्मुक्ताचे आलेले वर्णनही येथे दिले आहे. शेवटी 'ब्रह्मप्राप्तीची दुर्लभता' जरी वर्णन केली असली तरी मला वाटते ज्या अर्थी परमेश्वराचे अस्तित्व मानणारी, परमेश्वराचे पूजन-अर्चन करणारी, जप, ध्यान, तप, करणारी, अध्यात्म-ग्रंथांचे वाचन करणारी आपणांसारखी माणसे हा दुर्लभतेचा प्रवास खूपच चालून आलेली आहेत असे आपणास हे प्रकरण वाचले असता कळून येईल. आता केवळ याच निष्ठेने, सातत्याने हीच उपासना, साधना, चालू ठेवली गेली, हाच अभ्यास होत गेला, तर जीवन्मुक्तीच्या अवस्थेला पोहचण्यास फार काळ वाट पाहावी लागणार नाही व परमेश्वराच्या साक्षात्काराची, ब्रह्मानंदप्राप्तीची वेळ अगदी जवळ येऊन ठेपली आहे याची आपणांस जाणीव होईल.

'जिही विशेषणी विशेषिजे। ते दृश्य नव्हे रूप तुझे। हे जाणे मी म्हणोनि लाजे। वानणा इही ॥' (ज्ञानेश्वरी १८-१२). संत ज्ञानेश्वर म्हणतात जो जो तुझे वर्णन करण्याकरिता विशेषणांचा उपयोग करावा, तो लक्षात येते की तुझे रूप हे त्या विशेषणांहून खूप वेगळे, चांगले व सुंदर आहे आणि म्हणून केलेल्या वर्णनामुळे लाज वाटते. संत ज्ञानेश्वरांचा अनुभव जमेस धरूनही मी काही विशेषणे गोळा केली आहेत.

अर्थात ती सर्व विशेषणे ही या संतांच्या अभंगांतून, गाथेतून, विष्णुसहस्रनाम वगैरेंमधून घेतली आहेत. एकत्र जमविण्याचे कष्ट फक्त केले आहेत. ती सर्व शेवटच्या 'परब्रह्माची नामे' या भागात दिली आहेत. परब्रह्माची नामे ही त्याची विशेषणेच आहेत. त्यातील काहींचे अर्थही दिले आहे, शब्दांची व्युत्पत्ती दिली आहे व शेवटी वर्णानुक्रमाप्रमाणे नामे दिली आहेत. ती जरी खूप आहेत असे वाटले तरी त्यात आणखीनही भर पडण्याची शक्यता आहे. असो.

ज्ञान आणि विज्ञान दोन्हींचाही विचार करणे आवश्यक आहे. दोघांनी एकमेकांना समान मान देऊन त्याचे ऐकून घेणे, समजून घेणे महत्त्वाचे आहे. नाही तर यावरून एक गोष्ट आठवते. दोन सैनिक होते. ते एका बागेत फिरत होते. अर्थात वेगवेगळे. फिरता फिरता एक जण पुतळ्याच्या पुढच्या बाजूला आला व दुसरा मागच्या बाजूला आला. ते दोघेही पुतळ्याचे सौंदर्य वर्णन करू लागले. पण एक जण एका स्त्रीचे वर्णन करीत होता तर दुसरा एका पुरुषाचे. तेव्हा त्या दोघांमध्ये वाद सुरू झाला. एक म्हणत होता की, हा पुतळा स्त्रीचा आहे, तर दुसरा म्हणत होता की हा पुतळा पुरुषाचा आहे. हा वाद शब्दावरून शस्त्रावर आला. युद्ध जुंपले. शेवटी दोघेही जखमी होऊन पडले पण विरुद्ध बाजूला जेव्हा दोघांनी पुतळा पाहिला. तेव्हा त्यांना कळले की दोघांचेही म्हणणे बरोबर होते. कारण त्यांनी 'दुसरी बाजू पाहिली नव्हती.' असो.

जगाच्या उत्पत्तीपासून मानवाच्या उत्क्रांतीपर्यंत, आध्यात्मिक साक्षात्कारापर्यंत या विषयाचा ओघ सारखा संथपणे वाहता ठेवण्याचा प्रयत्न केला आहे. नदी उगम पावते ते ती सागराला जाऊन मिळेपर्यंत वाहातच असते. असाच एक पाण्याचा थेंब जो सागरातून वाफेच्या रूपाने सागरापासून अलग झाला होता, तो पुन्हा पावसाच्या वर्षावातून प्रवास करीत करीत पुन्हा सागराला मिळाल्यावरच त्याची मुक्ती संभवते. तोपर्यंत त्याचा प्रवास कसा कसा होतो हे पाहणेही महत्त्वाचे आहे. सागरातून निघाल्यापासून परत सागराला मिळणे हाच त्याचा संकल्प असणार, हेच त्याच्या जीवनाचे ध्येय असणार आणि म्हणूनच तो सागरात मिळताच मुक्त होतो, विदेही होतो, जीवन्मुक्त होतो. अगदी याचप्रमाणे ज्या वेळी आपण प्रथम अहंभावाने, देहभावाने जीवदशेला आलो, त्या क्षणापासून आजच्या आपल्या जन्मापर्यंत आपण कोठे कोठे जन्माला आलो असू हे आपणास आठवत नाही. पण सध्याच्या अवस्थेवरून आपण आपले जन्म जाणून, पुढील जन्मापासून नव्हे याच जन्मापासून, याच क्षणापासून आपल्याला कसे उत्क्रांत करून घ्यावयाचे याचा विचार करावयास पाहिजे. भगवंत म्हणतात,

*उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत् ।*
*आत्मैव ह्यात्मनो बन्धुः आत्मैव रिपुरात्मनः ।।*

*(भ. गी. ६-५)*

कारण आपला उद्धार आपणांस करून घ्यावयाचा आहे व एक दिवस त्या थेंबाप्रमाणे परब्रह्मरूपी सागरामध्ये मिळून मुक्त व्हावयाचे आहे हे निश्चित.

अशा प्रकारे हे पुस्तक 'परब्रह्म - ज्ञानं विज्ञानसहितम्' अशा सर्व प्रकारे पूर्ण करण्याचा प्रयत्न केला आहे. त्यात अनेकांच्या दृष्टिकोनातून त्रुटी राहण्याची शक्यता आहे. याबाबत आपण काही पत्रव्यवहार केलात किंवा प्रत्यक्षात काही चर्चा केलीत, तर पुढील आवृत्ती काढण्याचा योग आल्यास त्यात जरूर सुधारणा करता येईल. चित्रे ही शब्दांपेक्षा जास्त बोलकी असतात. म्हणून काही चित्रांचाही समावेश केला आहे.

**ग्रंथाचा विषय** – 'परब्रह्म - ज्ञानं विज्ञानसहितम्'

*ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते ।*
*पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।।*
*ॐ शांतिः । शांतिः ।। शांतिः ।।।*

**ग्रंथाचा वाचक** – सर्व स्तरांचे, जाती जमातींचे, ज्ञानी, अज्ञानी, विज्ञानवादी, अध्यात्मवादी, नास्तिक, आस्तिक, अश्रद्ध, सश्रद्ध, लहान, थोर, स्त्री-पुरुष वगैरे.

**ग्रंथाचे प्रयोजन** – अध्यात्म व विज्ञान यांमध्ये जी वैचारिक दरी आहे ती कमी व्हावी. अध्यात्म व विज्ञान हे वेगळे नसून अध्यात्म हे उच्च दर्जाचे विज्ञान आहे. पूर्वीचे ऋषी-मुनी हे सर्व विज्ञानाचे ज्ञातेच होते. त्यांनीही भौतिक विज्ञान जाणले होते, पण भौतिक विज्ञानाने, सुखसोयींनी मनुष्य हा विकारवश व परावलंबी होतो व अधोगतीला जातो. तेव्हा तो मार्ग सोडून आत्मिक उत्क्रांतीच्या मार्गाने गेल्यास सर्व प्रकारच्या विकारांतून मुक्त होईल. शिवाय व्यक्तीवर, समाजावर योग्य संस्कार होऊन त्यांना योग्य दिशा दाखविली जाईल. समाज संघटित होईल. प्राप्त कर्तव्यकर्मे करून समाधानी, आनंदित होईल. अशा तऱ्हेने सर्वच समाज उत्क्रांत होऊन मुक्त होईल.

ग्रंथाची फलप्राप्ती – हा ग्रंथ वाचून अध्यात्मावर श्रद्धा नसल्यास श्रद्धा बसावी. श्रद्धावानांची श्रद्धा दृढ व्हावी. अध्यात्म व विज्ञान हे दोन नसून व परस्पर विरोधी नसून एकच आहेत. अध्यात्म हे प्रगत विज्ञान आहे याची जाणीव व्हावी. सर्वांनी श्रद्धापूर्वक अध्यात्ममार्गाचे अवलंबन करून स्वत:ची उत्क्रान्ती करून घ्यावी ही इच्छा, आशा– 'ज्ञानं-विज्ञानसहितम् यज्ज्ञात्वा मोक्ष्यसेऽशुभात् ॥'

ॐ शांतिः । शांतिः ॥ शांतिः ॥।

रमेश बावकर

## अनुक्रमणिका



### *विभाग - १ : विषय प्रवेश*



### *विभाग - २ : परब्रह्म*

• • •

# विभाग १ – विषय प्रवेश

## वर्तुळ

वर्तुळाची सुरुवात कोठून होते, असा प्रश्न मनात आला तर त्याचे उत्तर देणे अवघड होते. कारण वर्तुळाच्या परिघावरील प्रत्येक बिंदू हा वर्तुळाची सुरुवात होऊ शकतो. त्याचप्रमाणे निर्गुण निराकार अशा परमेश्वराविषयी विचार करावयास गेले की असाच प्रश्न उभा राहतो. वास्तविक पाहता परमेश्वराला, परब्रह्माला निर्गुण निराकार असे जरी म्हणत असले तरी सर्व चराचर, स्थूल, सूक्ष्म, सृष्टी हीसुद्धा परमेश्वराचेच स्वरूप आहे असे म्हटले जाते. मग त्या परमेश्वराचे वर्णन करताना स्थूलापासून, साकारापासून, सगुणापासून सुरुवात करावी का सूक्ष्मापासून, निराकारापासून, निर्गुणापासून सुरुवात करावी. हा प्रश्न समोर उभा राहतोच.

सूक्ष्म, निर्गुण निराकार यांचे वर्णन शब्दांत करणे हे तर केवळ अशक्यच आहे, असे सर्व संतमहंतांनी सांगितले आहे. कोणतेही स्थूल स्वरूप, सगुण, साकार स्वरूप हे त्या परमेश्वराचे वर्णन करण्यास, साधर्म्य दाखविण्यास, तुलना करण्यास, उपमान म्हणून सांगण्यास पुरेसे नाही. कारण त्या परमेश्वराच्या तुलनेत त्या वस्तूमध्ये खूपच त्रुटी राहतात. शिवाय कोणतीही सगुण, साकार, वस्तू ही परब्रह्माच्या बरोबर होऊच शकणार नाही. कारण ते स्वरूप अशा कोणत्याही वस्तूत सामावून राहूच शकणार नाही. कारण ते सर्व विश्व व्यापून आहे. ते नुसते निर्गुण निराकारच नाही तर ते व्यापक, विशाल वगैरे अशा अनेक विशेषणांनी वर्णन करूनही त्याचे वर्णन पुरे होण्यासारखे नाही व त्याचे स्वरूप शब्दांत आकळता येण्यासारखे नाही. म्हणूनच ते तर्काच्या, विचाराच्याही पलीकडील आहे.

असे असूनही त्याविषयी सर्व वेद, उपनिषदे, पुराणे, ब्रह्मसूत्रादी ग्रंथांमधून उल्लेख आला असून सर्व संतांनी त्याचे वर्णन करण्याचा प्रयत्न केला आहे. म्हणून संत ज्ञानदेव म्हणतात, 'तेणे कारणे मी बोलेन । बोली अरूपाचे रूप दावीन । अतींद्रिय परि भोगवीन । इंद्रियां करवी ॥' (ज्ञानेश्वरी ६-३६), तर श्रुती वर्णन करतात 'नेति' 'नेति'. मग असे असून ते कोणालाच कळले नाही का? नाही कसे? कळले. ते कळण्यासारखे आहे का? अनुभवण्यासारखे आहे. ते अनुभवण्यासारखे आहे. त्याची अनुभूती सर्व संत-सत्पुरुषांना आली आहे आणि म्हणूनच संत ज्ञानदेवांनी वरील ओवीतून आश्वासन देऊन सांगितले आहे की ते सर्वांनाच अनुभूतीला आणून देतील.

असे असता आता मी काय करणार आहे?

एखाद्या शिल्पकाराला जर एखाद्या व्यक्तीचा पुतळा तयार करावयाचा असेल तर त्या व्यक्तीची सर्व बाजूंनी घेतलेली बरीच छायाचित्रे लागतात तेव्हाच त्या व्यक्तीच्या शरीराचे आकारमान, ढब, उंची, रुंदी वगैरे सर्व काही कळून येते. मगच त्या शिल्पकाराला ती प्रतिकृती तयार करणे शक्य होते. त्याचप्रमाणे परब्रह्माविषयी अनेकांनी अनेक ग्रंथांत, अनेक शब्दांत वर्णन करून ठेवलेले आहे. ते सर्व वर्णन एका व्यक्तीच्या एका वेळी वाचनात येणे शक्य नाही. कारण ते सर्व ग्रंथ त्याला उपलब्ध होणे, तेवढा वेळ मिळणे वगैरे अनेक अडचणी असतात. त्यामुळे परब्रह्माविषयीं स्वतःच्या अनुभूतीने ज्या ज्या संतांनी वर्णन करून ठेवले आहे त्याची उपलब्धता एकाच ठिकाणी करून वाचावयास मिळाली तर ते जास्त सोपे जाईल. शिवाय वस्तू जरी एकच असली तरी वर्णन करण्याची शैली वेगवेगळी असू शकते. शिवाय काही शब्दांचा अर्थ एकाने सांगितला असला व तो आपणास कळला नसला तर कदाचित् दुसऱ्याच्या वर्णन शैलीने कळण्याची शक्यता असते. म्हणून जास्तीत जास्त संतांच्या वचनांचा आधार घेतला गेला तर बुद्धीला ते समजण्यास जास्त उपयोगी होईल असे मला वाटल्यावरून मी अशा तऱ्हेचा हा प्रयोग करीत आहे आणि माझ्याप्रमाणेच कदाचित कोणा दुसऱ्यांचीही अशी अडचण असेल तर त्यांनाही याचा फायदा होईल या विचाराने हा सर्व खटाटोप केला आहे.

या लेखनाचे एकूण चार भाग करण्याचा विचार आहे. पहिल्या भागात विषय प्रवेश म्हणून परब्रह्मापासून निर्माण झालेले हे जगत्. त्यातून मनुष्यप्राणी हा परमेश्वराला, स्व-स्वरूपाला विसरूनच गेला आहे. तेव्हा ईश्वरसिद्धीपासून सुरुवात करून जगाची उत्पत्ती परमेश्वरापासून झाली असून प्राणी उत्क्रांत होत पुन्हा परमेश्वराप्रत कसा जाऊ शकतो हे दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. दुसऱ्या भागात परब्रह्माचे वर्णन

करणारी वचने असतील व त्यांचे विवेचनही असेल. तिसऱ्या भागात परब्रह्मस्वरूप प्राप्त करून घेतलेल्या जीवन्मुक्तांची, विदेही अवस्था प्राप्त झालेल्यांची लक्षणे काय आहेत? कोणत्या लक्षणांवरून ते संत, सत्पुरुष ब्रह्मस्वरूप झाले आहेत ती लक्षणे आणि शेवटी चौथ्या भागात परब्रह्माची नामे म्हणजेच विशेषणे असतील. कारण जी वस्तू, व्यक्ती आपण पाहिलेली नसेल आणि एका समारंभात जर ती व्यक्ती आपणास शोधावयाची असेल तर आपल्याला त्या व्यक्तीविषयी बरीच माहिती पाहिजे. त्या व्यक्तीची उंची, रंग, जाडपणा, सडपातळपणा, चेहऱ्याची ठेवण, केसांची ठेवण, बोलण्याची पद्धत, एखादी लकब, डोळे, नाक, शिवाय एखादी खूण या सर्व गोष्टी ज्या व्यक्तीशी पूर्णपणे जुळतात तीच व्यक्ती आपणास हवी असते. त्याप्रमाणे निर्गुण, निराकार परमेश्वराविषयीही आपणास जेव्हा अनेक विशेषणे मिळतील त्यावरून आपणास ते पडताळून पाहण्यास सोपेही जाईल. म्हणून परब्रह्माची विशेषणे व त्यांचे अर्थ दिले आहेत. पुढे काही परिशिष्टे दिली आहेत.

'सर्व सुखाचे आगरु । बापरखुमादेवीवरु ।।' असे संत ज्ञानदेवांनी म्हटले आहे. या जगाचा प्रवाह जो वाहतो आहे त्याचे लक्ष्य, ध्येय हे 'सुखाचा आगरु' मिळविण्यासाठीच आहे. नदी जशी समुद्राला मिळाली म्हणजे शांत होते, तिचा प्रवाह, प्रवास थांबतो. तसा अनादी कालापासून वाहात असलेला हा सुखाच्या शोधासाठीचा प्रवाह, प्रवास अजून थांबलेला नाही. का? तर तो सुखाचा आगर, सागर अजून मिळाला नाही. का मिळाला नाही? त्याचा रस्ता चुकला? का दिशा चुकली? का प्रयत्न चुकले? कारण एक तर सुख म्हणजे काय हे तरी समजले नसेल आणि म्हणूनच हा प्रयत्नांचा प्रवाह सतत वाहात आहे. मग 'सुख' ही वस्तूच नाही काय? व असली तर ते सुख देणारी तरी वस्तू नसावी, पण तसे नाही. कारण संत ज्ञानदेवांच्या अभंगाच्या वरील ओवीवरून त्यांना 'सुखाचा आगरु' मिळाला होता हेच सिद्ध होते. त्यांनाच नव्हे तर अनेक संत महात्म्यांना हे सुखाचे आगर मिळाले होते. त्यांनी ते प्राप्त करून घेण्याचे मार्गही सांगितले आहेत, उपासनापद्धती सांगितली आहे. आपण योग्य मार्गावरून चाललो आहे हे समजण्यासाठी त्या मार्गातील जशा काही खुणा सांगितलेल्या असतात तशा खुणाही सांगून ठेवल्या आहेत. खुणा का सांगितल्या? कारण जसा एखाद्या निर्जन भागातून रस्ता जात असेल तर रस्त्यावरील त्या खुणांवरूनच आपणास आपण जात असलेला मार्ग बरोबर आहे याची खात्री होईल. कारण त्या निर्जन भागात चौकशी करावयास कोणी भेटण्याची शक्यताच नसते. तेव्हा

या खुणाच उपयोगी पडतात. तसे भगवंतांनी म्हटल्याप्रमाणे 'मनुष्याणां सहस्त्रेषु कश्चिद्यतति सिद्धये । यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वत: ।।' (भ. गीता ७-३).

अर्थ- सिद्धी (साध्य प्राप्त करून घ्यावयाचे ते) करिता हजारो माणसांपैकी एखादाच प्रयत्न करतो (आणि अशा) प्रयत्न करणाऱ्या सिद्धांपैकी एखाद्यालाच माझे (परमेश्वराचे) यथार्थ ज्ञान (साक्षात्कार) होते.

यावरून परमेश्वरावर निष्ठा असणारे, प्रयत्नांचे सातत्य ठेवणारे व शेवटपर्यंत टिकून राहणारे साधक, प्रवासी कमी-कमी होत जातात. त्यामुळे या रस्त्यावर फारच तुरळक प्रवासी असतात. आणि म्हणूनच त्या निर्मनुष्य रस्त्यावर खुणाच जास्त उपयोगी ठरण्याची शक्यता असते. अशा प्रवासामध्ये शंभर-दोनशे वर्षांइतके अंतर असते, असेच संत मालिका पाहिली की लक्षात येते आणि तरीही सर्व संतांचे 'निजधाम' परब्रह्म एकच आहे. सर्वांच्या अनुभूतीच्या खुणा त्याच आहेत. कारण सर्वांना सद्‌गुरूचे मार्गदर्शन लाभले होते. श्री ज्ञानदेव म्हणतात–

*'आणि बापु पुढां जाये । ते घेत पाउलांची सोये ।*
*बाळ ये तरी न लाहे । पावो कायी ।।'*

*(ज्ञानेश्वरी १८-१७२१).*

सद्‌गुरूने केलेले मार्गदर्शन, साधकांनी केलेली वाटचाल व त्यांना प्राप्त झालेले 'निजधाम' म्हणजेच 'परब्रह्म' स्वरूप हे एकच आहे. कारण त्यांच्या खुणा सर्वांना आलेल्या अनुभूतींमध्ये सारख्याच आहेत आणि म्हणून शाश्वत सुखाचे स्थानही तेच आहे. या सुखाची संत ज्ञानदेवांनी थोडीशी झलक दाखविली आहे. आपणास प्राप्त झालेल्या सुखाची लक्षणे त्याच्याशी जुळतात का ते पाहता येईल. ते म्हणतात, 'परि भोगाचिये ऐली कडिलिये मेरे । चित्त उभे ठेले सुखा भरे । ऐसे सुलभ आणि सोपारे । वरि परब्रह्म ।। पै गा आणिकही एक याचे । जे हाता आलिया तरी न वचे । आणि अनुभवितां कांही न वेचे । वरि विटेही ना ।।' (ज्ञानेश्वरी ९-५१, ५२). पहिल्या ओवीच्या पहिल्या चरणाचे महत्त्व फार मोठे आहे असे दिसते. कारण आपण भोगानंतर सुखाची अपेक्षा करत असतो, पण खरे सुख 'भोगाचिये ऐलीकडिलिये मेरे ।' या 'मेरे'वर आहे हेच आपण नेमके विसरतो. पाय घसरण्यापूर्वीच तो सावरला पाहिजे. तो न सावरला तर पडण्याचीच वेळ येते आणि मग केवळ दु:खच असते. तसे भोग घेण्यापूर्वीच्या अलीकडच्या 'मेरे'वरच सर्व सुखाची उभारणी आहे. त्याच ठिकाणी मनाला, बुद्धीला, चित्ताला आवर घातला, त्याला सावरले तर सुखाने भरून येते

आणि मगच पुढील लक्षणे लागू पडतात. मार्गाने चालताना उजव्या बाजूस न वळता डाव्या बाजूस आपण चुकून जरी वळलो तरी पुढील सर्व खुणा बदलतात. आणि अंतिम ध्येयच पूर्णपणे चुकीचे हाती येते. त्यामुळेच पुन्हा जन्म-मरण-जन्म सुरू होते. आणि 'सुखाच्या आगराला' काही मिळणे होत नाही, त्यामुळेच प्रवाह शांत होत नाही.

नदीचा प्रवाह सागराला मिळाल्यानंतर शांत होतो. सागराला नदीचे स्वगृह म्हणता येईल. म्हणजे नदी स्वगृही गेल्यावर तिचा प्रवाह शांत होतो, थांबतो. तसे साधकाचा प्रवास हाही त्याच्या स्वगृही गेल्यावरच थांबतो. तेच त्याचे 'निजधाम'. 'यद् गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम।' (भ. गी. १५-६). परब्रह्मस्वरूप होणे म्हणजेच 'निजधामाला' जाणे की जेथून पुन्हा येणे नाही. जन्म-मृत्यू-जन्म या चक्रातून सुटणे, पुन्हा प्रवास नाही. परंतु आपला प्रवास जन्म-मरण-जन्म थांबत नाही कारण जसे सुखाविषयीचे आपले समज चुकलेले असतात तसे 'धामा'विषयीही आपला समज चुकलेला असतो. प्रत्येक जन्मात जसे आपले आई-वडील बदलतात तसे आपले 'घर'ही बदलते, पण चालू जन्मातील घराविषयी आपली एवढी प्रचंड ओढ असते– पण आपण आपल्या 'घरी' येऊन तरी शांतता, स्वस्थता मिळते का? तर नाही. म्हणजे हे 'घर' खरे 'घर' नसून केवळ 'घरघर' लावणारे 'घर' आहे हे आपणास शेवटपर्यंत लक्षात येत नाही व जन्मोजन्मी आपण तीच चूक करीत राहतो आणि आपली 'घरघर' थांबत नाही. म्हणून संत ज्ञानदेव उपाय सांगतात. 'हे विश्वचि माझे घर। ऐसी मति जयाची स्थिर। किंबहुना चराचर। आपणचि जाहला ॥' (ज्ञानेश्वरी १२-२१३). हे 'माझे घर' हे 'दुसऱ्याचे घर' अशा भेदभावाची भावना जर नाहीशी झाली व सर्व विश्वालाच 'एक घर' समजून राहिले तर, एवढेच नव्हे तर चराचराविषयीचीही भेदभावना दूर सारून सर्वांशी 'आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ॥' (भ. गीता. ६-३२). असे समजून जो राहिला, वागला तरी भगवंतांनी सांगितलेल्या निजधामाला प्राप्त होण्यास कोणतीच अडचण येणार नाही व पुन्हा जन्म-मृत्यूच्या चक्रामध्ये अडकणे होणार नाही व पूर्ण शांती, समाधान, सुख प्राप्त होईल.

*ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते।*
*पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते॥*
*ॐ शांतिः। शांतिः॥ शांतिः॥।*

ॐ ते पूर्ण आहे: हे पूर्ण आहे. पूर्णापासून पूर्ण निष्पन्न होते. पूर्णातून पूर्ण काढून घेतले तरी पूर्णच शेष राहते.

'ते' परब्रह्म, परमेश्वर कसा आहे? सूक्ष्म, निर्गुण, निराकार, निरविकारी, निरपेक्ष वगैरे आहे. पूर्ण आहे. पूर्ण म्हणजे ज्यात कोणतीही गोष्ट कमी नाही, अपुरी नाही, उणी नाही, नको असणारी नाही, अयोग्य नाही, जादा असलेली नाही, म्हणजेच सर्वांगाने, सर्वार्थाने, सर्व कालात ती पूर्ण आहे. 'हे' विश्व, चराचर, अवकाश, आकाश, ग्रह, नक्षत्र, तारे, आकाशगंगा वगैरे जेवढे आपणांस दिसते, माहीत आहे तेवढे व जे दिसत नाही, माहीत नाही, पण त्याचे सूक्ष्म रूपाने अस्तित्व आहे ते सर्व पूर्ण आहे. 'पूर्णापासून पूर्ण निष्पन्न होते'– 'बीजं मां सर्वभूतानाम् ॥' (भ. गीता. ७-१०). बीजामध्ये मग त्या बीजाचे स्वरूप कितीही लहान असो– उदा. वटवृक्षबीज. या बीजात वृक्षाचे अतिसूक्ष्म स्वरूप अस्तित्वात असते. ते बीज अंकुरल्यावर, विस्तारल्यावर तो वृक्ष विशाल रूपाने साकारला जातो. ते बीज पूर्ण होते व त्यापासून साकारलेला वृक्षही पूर्णच असतो. त्याचप्रमाणे भगवंत स्वत: भगवद्गीतेमध्ये म्हणतात की, परमेश्वर हेसुद्धा या सर्व विश्वाचे बीजच आहे. ते बीज पूर्ण आहे. बीजापासून, पूर्णापासून पूर्ण वृक्ष, विश्व, चराचर, आकाश, अवकाश, ग्रह, नक्षत्र, तारे वगैरे सर्व निर्माण झाले, निष्पन्न झाले. हा वटवृक्षबीजाचा दृष्टांत जरा कमी प्रतीचा आहे कारण वटवृक्षबीज वृक्षाला जन्म देऊन स्वत: नाहीसे होते, नष्ट होते. त्याचे स्वरूप स्थूल रूपाने दाखवता येत नाही. ते वृक्षरूपाने अस्तित्वात येते. तसे परमेश्वर-परब्रह्म हे बीज नाही. त्यापासून ही सृष्टी, चराचर वगैरे सर्व जरी अस्तित्वात आले असले, निर्माण झाले असले, स्थूल रूपाने अवतरले असले, तरी परमेश्वराचे-परब्रह्माचे सूक्ष्म स्वरूप बीज नाहीसे, नष्ट झालेले नाही. त्याचे स्वरूप अबाधित राहते. एवढेच काय पण पूर्व स्थितीमध्ये व नंतरच्या स्थितीमध्ये काहीच फरक पडलेला नसतो. म्हणून म्हटले आहे की 'पूर्णातून पूर्ण काढून घेतले तरी पूर्णच शेष राहते' म्हणजे शेष राहिलेला भागही पूर्णच असतो.

या शांतिमंत्रामध्ये पुढील भाग अध्याहृत आहे. 'कधी काळी ही सर्व सृष्टी, विश्व, अवकाश, ग्रह, नक्षत्र, तारे वगैरे सर्व विरून गेले व सूक्ष्मात सूक्ष्म रूपात गेले तरी परमेश्वराच्या, परब्रह्माच्या स्वरूपात, अवस्थेत काही वाढ झाली आहे असे होणार नाही, तर ते प्रथम जसे पूर्ण होते तसेच-पूर्ण राहणार आहे.' म्हणजे विश्वनिर्मितीमुळे जसे त्यात कमीपणा येत नाही तसे विश्व विरून गेल्यामुळे त्यात काही वाढही होणार नाही,' होत नाही आणि म्हणूनच ते खऱ्या अर्थाने पूर्ण' आहे. याला साधा दृष्टांत

द्यावयाचा झाला तर एक दृष्टांत देता येईल. साखरेपासून तांब्या, भांडे, ताट, वाटी अशा वस्तू तयार करता येतात. साखर ओली करून ती या आकारात दाबून वस्तू तयार होते. आता समजा दहा किलो साखरेपासून या वस्तू बनवल्या तरी दहा किलो साखर कमी झालेली नसते व या वस्तू मोडून पुन्हा साखर तयार झाली तरी दहा किलोंमध्ये काही वाढ झालेली नसते. असाच काहीसा हा परमेश्वरापासून विश्वनिर्मितीचा प्रकार होत असावा.

हा दृष्टांत एकदम साधा आहे असे म्हटले याचे कारण तांब्या, भांडे, ताट, वाटी यांतून साखरेचे कण प्रत्यक्ष दिसतच असतात. त्यामुळे साखरेची जाणीव नाहीशी झालेली नसते. त्यामुळे त्या वस्तूचे पुन्हा साखरेत रूपांतर झाले तरी जाणिवेमध्ये काहीच फरक पडलेला नसतो, पण तसे परमेश्वर-परब्रह्म व हे विश्व यांमध्ये महत् अंतर आहे. एक सूक्ष्म, दुसरे स्थूल, निराकार-साकार, निर्गुण-सगुण, निर्विकारी-विकारी, अविनाशी-विनाशी, स्थिर-चल, अनंत-सांत, अमर्याद-मर्यादित, निरावयव-सावयव वगैरे अनेक तुलनात्मक विशेषणे दाखवता येतील. असो. त्यामुळे सहजपणाने तर शक्य नाही पण विचाराने, तर्काने, शोधूनही परमेश्वराचे स्वरूप या विश्वात दिसत नाही, भासत नाही व जाणवतही नाही आणि त्यामुळेच 'मति स्थिर' होत नाही आणि निजधाम मिळत नाही, सुखाचे आगर मिळत नाही.

मग याला उपाय काय? उपाय आहेत कारण त्या उपायांनीच साधकांचे सिद्ध झाले, संत, सत्पुरुष झाले, महंत-महात्मे झाले, परमेश्वरस्वरूप झाले, ते ज्या मार्गाने गेले त्यांनी त्या मार्गाची माहिती दिली आहे. त्या मार्गावरील खुणा सांगून ठेवल्या आहेत. आपण ग्रंथ हेच गुरू समजून वाटचाल सुरू करावी. वेळ येताच सद्गुरूची भेट होईल आणि मग कानमंत्र देताच 'मोटके गुरुमुखे उदैजत दिसे। आणि हृदयी स्वयंभूचि असे। प्रत्यक्ष फावो लागे तैसे। आपैसयाचि।।' (ज्ञानेश्वरी ९-४९). गुरुमुखातून बीजमंत्राची, शक्तिपाताची दीक्षा मिळताच साधकाच्या ठिकाणी ज्ञानाचा उदय होतो. आणि मग साधकाने उपासनेने ते ज्ञान दृढ करावयाचे असते. त्या वेळी साधक शम, दम, यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी अशा चढत्या क्रमाने साधना करून ज्ञान प्राप्त करून घेतो. जे ज्ञान हृदयात स्वयंभू असते आणि अनुभूतीने आपोआपच दृढ होत जाते व शेवटी साक्षात्कार होऊन ब्रह्मस्वरूपाची प्राप्ती करून देते.

ज्ञान हे हृदयात स्वयंभूच असते. गुरुमुखातून शक्तीचे क्षेपण होताच ते आपोआप विकास पावते. ज्याप्रमाणे चंद्रकिरणांनी स्पर्श करताच कुमुदिनी विकास पावतात

त्याप्रमाणे. या ठिकाणी असा प्रश्न उत्पन्न होतो की शक्तिपाताने दीक्षा देता येते का? तर त्याचे उत्तर 'येते' असेच आहे. फक्त जशी गुरूची शक्ती असेल तसाच परिणाम शिष्यावर होतो व तेवढेच ज्ञान त्याच्या ठिकाणी उत्पन्न होते. त्यापुढे शिष्य स्वत: साधना करून ते ज्ञान किती प्रमाणात पक्के करतो यावरही सर्व अवलंबून असते. कारण शाळेतसुद्धा शिक्षक हे शक्तिपात पद्धतीनेच ज्ञानाचे क्षेपण करीत असतात. जशी शिक्षकाची शक्ती स्वत:चा अभ्यास, शिकवण्याची कला, तसे ते विद्यार्थ्यांत उतरते व विद्यार्थी पुढे स्वत: अभ्यास करून ते ज्ञान किती दृढ करतो यांवरही सर्व अवलंबून असते. म्हणजे शक्तिपात पद्धतीने ज्ञान देता येते हे स्पष्ट व सिद्ध होते.

आता याला दृष्टांत देताना असेही म्हणता येईल की चंद्रकिरणांनी ज्याप्रमाणे कुमुदिनी विकसित होतात तशा इतर कोणत्याही प्रकारच्या किरणांनी कुमुदिनी विकसित होणार नाहीत, कारण चंद्रकिरणांची जी शक्ती आहे ती इतर कोणत्याही किरणांमध्ये नाही. असो.

'मनुष्याणां सहस्रेषु' असे भगवंतांनी गीतेत का म्हटले आहे? कारण उपासना, ज्ञाननिष्ठा, तपश्चर्या, साधना खूप अवघड आहे. अवघड कशासाठी आहेत? तर स्थूल इंद्रियांना स्थूल विषयांविषयीच जास्त आकर्षण असते. 'मन एव मनुष्याणां कारणं बंध-मोक्षयो: ।' असे जे म्हटले आहे त्याचे कारण मनही इंद्रियांच्या बरोबर स्थूल विषयांचा उपभोग घेण्यात रममाण होते. त्यामुळे त्या चंचल मनाला निग्रहाने आवरून उपासनेमध्ये लावणे अवघड होते. या मनाला आवर घालण्याचे काम काही थोड्या साधनापर्यंत असते असे नाही, तर ते अगदी शेवटपर्यंत असते. कारण प्रकृतिस्वभावच तसा असतो. भगवंत म्हणतात,

*सदृशं चेष्टते स्वस्या: प्रकृतेर्ज्ञानवानपि ।*
*प्रकृतिं यान्ति भूतानि निग्रह: किं करिष्यति ॥*

*(भ. गीता. ३-३३).*

*इन्द्रियस्येन्द्रियस्यार्थे रागद्वेषौ व्यवस्थितौ ।*
*तयोर्न वशमागच्छेत्तौ ह्यस्य परिपन्थिनौ ॥*

*(भ. गीता. ३-३४).*

अर्थ : ज्ञानी मनुष्यदेखील आपल्या प्रकृतिस्वभावाप्रमाणे वागतो. (सर्वच) प्राणिमात्र प्रकृतीच्या वळणावर जातात (तिथे कर्माचा) निग्रह काय करणार? इंद्रियांच्या (शब्दादी) विषयांविषयी इंद्रियांची आवडनावड निसर्गसिद्ध असते (परंतु) मनुष्याने या

दोहोंच्याही अधीन होऊ नये. कारण (रागद्वेष) हे दोघे यांचे (जिवाचे किंवा त्याच्या उच्च ध्येयाचे) शत्रू (वाटमारे) आहेत.

साधकाची साधना शेवटपर्यंत जात नाही त्याला कारण भगवंतांनी वरील वचनांनीच सांगितले आहे. प्रकृतीचा स्वभाव जसा असेल तसेच तिचे वर्तन होत राहते. त्याला ज्ञानीसुद्धा अपवाद नाहीत, असे भगवंतांचे सांगणे आहे. यावरून एक कथा आठवते–

श्री व्यासांनी भागवत लिहिले व त्यातही हा उल्लेख केला की, 'ज्ञानी पुरुषांनाही मोह होतो' हे वाक्य वाचून वैशंपायन मुनीने व्यासांजवळ या वाक्याला हरकत घेतली. ते म्हणाले, 'गुरुदेव! ज्ञानी पुरुषांना जर मोह होत असेल तर तो ज्ञानी नाही असेच म्हणावे लागेल व जर ज्ञानी असेल तर त्याला मोह व्हावयास नको आहे. त्यावर व्यास महर्षी म्हणाले, 'वैशंपायना! अरे, इंद्रिये ही फार प्रबळ असतात. मोहाच्या क्षणी ज्ञानी पुरुषाला ज्ञानाची विस्मृती होते व तो मोहाला बळी पडतो. त्यामुळे ज्ञानी काही एकदम अज्ञानी होत नाही. मोहाचा क्षण जाताच तो सावध होतो व झालेल्या चुकीची त्याला जाणीव होते. जो या मोहाच्या क्षणीही सावध असतो तो खरा श्रेष्ठ होय.' हे ऐकून वैशंपायन ऋषींचे समाधान झाले नाही. व्यास निघून गेले. काही दिवसांनी, ग्रीष्माच्या शेवटी शेवटी वादळी वारे सुरू झाले. आश्रमाला पावसाने झोडपून काढले. घटकाभराने सर्व शांत झाले. म्हणून वैशंपायन ऋषीने सहज बाहेर डोकावून पाहिले तर त्यांना एका वृक्षापाशी एक युवती पावसाने भिजली असून गारठ्याने कुडकुडत उभी आहे असे दिसले. ते ताबडतोब तिच्याजवळ गेले व त्यांनी तिला आश्रमात येण्याविषयी सुचविले, पण लज्जेमुळे ती जागची हललीसुद्धा नाही. ऋषींनी तिची विचारपूस केली पण तिने एक शब्दही उच्चारला नाही. त्यातून ती गारठून गेलेली दिसत होती. तिने कपडे बदलणेही आवश्यक होते असे ऋषींना वाटत होते. तेव्हा त्यांनी त्या युवतीला तसे सुचवूनही पाहिले पण कोणत्याही प्रकारची प्रतिक्रिया तिने व्यक्त केली नाही. तेव्हा ऋषींना वाटले की ती आपणास लाजत आहे. शिवाय आश्रमात कोणीही नव्हते. तेव्हा आपणच पुढाकार घेऊन आता हिला आश्रमात नेले पाहिजे व कपडे बदलण्यास भाग पाडले पाहिजे. असा विचार करून वैशंपायन ऋषींनी तिला हाताला धरून आश्रमात आणले. तिच्यापुढे सुकी आश्रमीय वस्त्रे ठेवली व तिला कपडे बदलण्यास सांगितले, पण ती काहीच हालचाल करेना व तशीच ओलेत्याने उभी राहिली. तेव्हा वैशंपायन ऋषींनी आपण होऊनच तिचे कपडे उतरविण्यास सुरुवात केली. तरीही त्या युवतीने कोणताही प्रतिकार केला नाही आणि एका क्षणी

मोहाचा उच्चांक झाला. वैशंपायन ऋषींनी तिला बाहूपाशात घेतले व पाठमोऱ्या तिचे मुखावलोकन करण्यासाठी तिचे मुख वळविले आणि त्यांना तिथे श्री व्यास महर्षींचे दर्शन झाले. तेव्हा व्यासांनी वैशंपायन ऋषींना विचारले; 'आता मला सांग की तू ज्ञानी आहेस की नाहीस?' वैशंपायन ऋषींनी ते वाक्य बरोबर असल्याचे कबूल केले.

अशा तऱ्हेने ही इंद्रिये शेवटच्या क्षणापर्यंत धोका देण्याची शक्यता असते. त्यामुळे साधकाला साधनेची निष्ठा टिकवून ठेवणे फारच कष्टाचे जाते. जितका इंद्रियांवर दबाव आणावा तितकी ती प्रसंग पडताच स्वैर सुटल्यासारखी करतात व साधकाला आवरता आवरता मुष्किल होऊन जाते. कारण परिस्थिती समोर येऊन उभी राहिली की केलेला अभ्यास आठवतोच असे नाही. म्हणून सतत अभ्यास करीत राहणे म्हणजेच कोणत्याही परिस्थितीत केलेला अभ्यास लक्षात राहतो व मनाचा तोल सावरणे शक्य होते.

मग या इंद्रियांना आवरण्याचा अभ्यास कोठून सुरू करावा, असा प्रश्न मनात उभा राहतो. त्याचे उत्तरही भगवंतच देतात–

*तस्मात्त्वमिन्द्रियाण्यादौ नियम्य भरतर्षभ ।*
*पाप्मानं प्रजहि ह्येनं ज्ञानविज्ञाननाशनम् ॥*

*इन्द्रियाणि पराण्याहुः इन्द्रियेभ्यः परं मनः ।*
*मनसस्तु परा बुद्धिः यो बुद्धेः परतस्तु सः ॥*

*(भ. गीता. ३-४१, ४२).*

अर्थ : म्हणून हे भरत कुलश्रेष्ठ अर्जुना! तू प्रथम इंद्रियांचे नियमन करून या ज्ञानाचा (आध्यात्मिक ज्ञानाचा) व आधिभौतिक विज्ञानाचा (व्यावहारिक ज्ञानाचा) नाश करणाऱ्या पाप्याला (कामाला) नाहीसा कर. (विषयांपेक्षा) इंद्रिये श्रेष्ठ, इंद्रियांपेक्षा मन श्रेष्ठ, मनापेक्षाही बुद्धी श्रेष्ठ, परंतु आत्मा बुद्धीहूनही श्रेष्ठ आहे असे (श्रुती) म्हणतात.

*संकल्पाख्यं मनोरूपं बुद्धिर्निश्चयरूपिणी ।*
*अभिमानात्मकस्तद्वद्वाहंकारः प्रकीर्तितः ।*
*अनुसंधानरूपं च चित्तमित्यभिधीयते ॥*

अर्थ : संकल्पविकल्परूप वृत्तीवाल्या अंत:करणास मन, निश्चयरूप वृत्तीवाल्या अंत:करणास बुद्धी, अभिमानरूप वृत्तीवाल्या अंत:करणास अहंकार व स्मरणरूप वृत्तीवाल्या अंत:करणास चित्त म्हणतात. (सुबोध अद्वैत सिद्धांतदर्शन) असो.

मन, बुद्धीविषयी संत ज्ञानदेवांनी सुरेखच खुलासा केला आहे, पण हाही अर्थ अगदी थोडक्यात म्हणजे सूत्ररूपाने असल्याने मुद्दाम दिला आहे.

आधी विषयांपासून मनाला आवरले पाहिजे, बुद्धीने, विवेकाने विषयातील क्षणिक सुखाचा व अनंत काळच्या दु:खाचा विचार करून मनाला आवरले पाहिजे. बुद्धीने सतत विवेक जागृत ठेवून मनासहित चित्तामध्ये स्वत:चा लय करावयाचा अभ्यास करावयास पाहिजे म्हणजे मगच आत्मरूपाची ओळख होते. आपल्या स्वरूपाची जाण निर्माण होऊन खऱ्या सुखाची प्राप्ती होते. देवांची उपासना करणारे– येथे देव याचा अर्थ गणपती, देवी, शंकर, विष्णू वगैरे कार्यदेवतांची नव्हे, तर परमेश्वर, परब्रह्म अशा निर्गुण स्वरूप देवांची; कारण लोक कोणत्यातरी उद्देशाने, सांसारिक सुखाच्या अपेक्षेने, उपासना करीत असतात आणि उपासनेचा उद्देश जी फलप्राप्ती असते ते फळ मिळाले की फळाचे बंधन सुरू होते. फळाचे बंधन म्हणजेच फलवासनेचे बंधन होय. फलप्राप्तीचा उद्देश हाच बंधनकारक असतो. फळ बंधनकारक नसते. ईशावास्य उपनिषदामध्ये म्हटलेच आहे की, 'न कर्म लिप्यते नरे ।' मनुष्याला कर्म चिकटत नाही तर फलवासना चिकटते, बंधनात घालते. म्हणून परमेश्वरप्राप्ती असाच संकल्प करावा, उद्देश असावा, वासना असावी म्हणजे परमेश्वराचीच प्राप्ती होते. तुकाराम महाराजांनी म्हटलेच आहे की, 'सत्यसंकल्पाचा दाता । सर्व करी पूर्ण मनोरथा ।।' तर छांदोग्य उपनिषदामध्येही या संकल्पाला विशेष महत्त्व दिले आहे.

*'यं यं अंतं अभिकामो भवति, यं कामं कामयते ।*
*सोऽस्य संकल्पादेव समुत्तिष्ठति तेन संपन्नो महीयते ।।'*

अर्थ : ज्या ज्या गोष्टींची इच्छा करणारा होतो. ज्या कामनांची कामना करणारा होतो ते सर्व संकल्प करताक्षणीच त्याला प्राप्त होतात. त्यामुळे संपन्न होऊन तो सुखी होतो.

मूळ परब्रह्माचे स्वरूप कसे आहे याचे थोडे मार्गदर्शन या ठिकाणी केले आहे.

*यत् श्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदं श्रुतम् ।*
*तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ।।*

*(केनोपनिषद)*

अर्थ : जे श्रोत्राने ऐकले जात नाही. ज्याने श्रोत्र ऐकले जाते (म्हणजे ज्याच्यामुळे कान ऐकतात) तेच ब्रह्म तू जाण. हे नव्हे ज्याची लोक उपासना करतात. (असे सर्वच अवयवांच्या बाबतीत म्हटले आहे.) तसेच–

*एतद्ध्येवाक्षरं ब्रह्म एतद्ध्येवाक्षरं परम् ।*

*एतध्द्येवाक्षरं ज्ञात्वा यो यदिच्छति तस्य तत् ॥*

*(कठोपनिषद)*

अर्थ : हे अक्षरच ब्रह्म, हे अक्षरच परम आहे. हे अक्षरच जाणून जो ज्याची इच्छा करतो ते त्याचे होते.

परमेश्वराचा, परब्रह्माचा साक्षात्कार झाला की सर्वाठायी त्याचीच प्रचीती येऊ लागते. म्हणजे स्वत:पासूनच स्वत:मध्येही ती प्रचीती येते व तसेच इतरत्रही भासू लागते. तसेच आपणही चराचरातील सर्वरूप होऊन आहोत. जे होऊन गेले आहेत व होणार आहेत हीसुद्धा सर्व रूपे आपणच आहोत याचा प्रत्यय येऊ लागतो. भगवंतांनी गीतेमध्येही तेच म्हटले आहे. व पुढील मंत्रामधून तीच अनुभूती वामदेवांनी आत्मसाक्षात्कार झाल्यावर बोलून दाखविली आहे.

*'ब्रह्म वा इदमग्रे आसीत् । तद् आत्मानमेवावेत् ।*

*अहं ब्रह्मास्मि इति । तस्मात् तत् सर्वम् भवत् ।*

*तद्यो यो देवानां प्रत्यबुध्यत्, स एव तद् भवत् ॥'*

अर्थ : पूर्वी हे ब्रह्म एकच होते (दुसरे काहीच नव्हते) 'मी ब्रह्म आहे' असे त्याने आपल्यालाच जाणले. म्हणून ते सर्व झाले. देवांपैकी ज्याने ज्याने हे ओळखले तो तो तेच झाला. तसेच ऋषींपैकी आणि मनुष्यांपैकी (ज्याने ज्याने हे ओळखले तो ते झाला.) ते हे पाहणाऱ्या ऋषी वामदेवाने 'मी मनू झालो, सूर्य झालो' असे अनुभवले. तसेच आजसुद्धा जो हे जाणतो की 'मी ब्रह्म आहे'. तो हे सर्व होतो. त्याच्या अकल्याणाला देवही समर्थ होत नाहीत. कारण यांचा (सर्वांचा) अकल्याण करू इच्छिणाऱ्यांचाही तो आत्मा होतो.

परमेश्वराची उपासना करण्यासाठी अन्यत्र कोठेही जाण्याची आवश्यकता नाही. तो तर सर्वांठायी भरून राहिला आहे. 'मय' होणे म्हणजे तेच रूप होणे. 'मय' झालेली वस्तू विभक्त होऊ शकत नाही, करता येत नाही. तेथे वेगळेपणा उरतच नाही. असा

या श्लोकांचा अर्थ आहे (एकूण श्लोकातील फक्त एकच चरण येथे दिला आहे व पुढे सर्वच श्लोकांचा अर्थ दिला आहे.)

*'स वा अयमात्मा ब्रह्म ।*

*विज्ञानमयः, मनोमयः, प्राणमयः, चक्षुर्मयः, श्रोत्रमयः ।*

*(बृहदारण्यक १६, ११२ मंत्र)*

तो हा आत्मा ब्रह्म आहे. विज्ञानमय, मनोमय, चक्षुर्मय, श्रोत्रमय, पृथ्वीमय, आपोमय, वायुमय, आकाशमय, तेजोमय, अतेजोमय, काममय, अकाममय, क्रोधमय, अक्रोधमय, धर्ममय, अधर्ममय, सर्वमय आहे. 'इदं-मय' आणि 'अदो-मय' (म्हणजे हेही आणि तेही) आहे. (अर्थात प्रत्यक्ष आणि परोक्ष आहे.) जसे कर्म करतो आणि जसे आचरण करतो तसा होतो. साधू-कर्म करणारा साधू होतो. पापकर्म करणारा पापी होतो. पुण्याचरणाने पुण्यरूप होतो. पापाचरणाने पापरूप होतो. म्हणूनच म्हटले आहे, ''हा पुरुष काममय आहे. त्याला जशी इच्छा होईल तसा निश्चय (क्रतु) करतो. जसा निश्चय करतो, तसे कर्म करतो; जसे कर्म करतो, तसे फळ मिळते.''

शेवटी संकल्पच फळाला येतो हे सिद्ध होते. म्हणून परमेश्वरी प्राप्तीचा म्हणजेच आत्मज्ञानाचा संकल्प करावा असेच मुंडकोपनिषद सुचवत आहे.

*यं यं लोकं मनसा संविभाति विशुद्ध सत्त्वः कामयते यांश्च कामान् ।*

*तं तं लोक जयते तांश्च कामान् तस्मात् आत्मज्ञं हि अर्चयेद् भूतिकामः ॥*

अर्थ : विशुद्ध चित्त पुरुष मनाने (पितृलोक आदी) ज्या ज्या लोकांचा संकल्प करतो. त्या त्या लोकांना जिंकतो. ज्या ज्या भोगाची इच्छा करतो. ते ते भोग मिळवितो. म्हणून कल्याणाची इच्छा करणाराने आत्मज्ञानाची अर्चना करावी.

रामदास स्वामी यांनाही हीच अनुभूती आलेली आहे असे त्यांनी वर्णन केलेल्या त्यांच्या खालील ओवीवरून दिसते.

*'निश्चलास ध्यातो तो निश्चल । चंचलास ध्यातो तो चंचल ।*

*भूतास ध्यातो तो केवळ । भूत होये ॥'*

*(दासबोध- दशक १५, समास १० ओवी ३०).*

'जो साधक या ईश्वराची अभेदोपासना करतो त्यास ईश्वरभावरूप फल मिळते.' म्हणजे तो ईश्वररूप होतो. ही गोष्ट श्रुती-स्मृती-सिद्ध आहे. 'साधक त्या परमात्म्याची

ज्या ज्या रूपाने उपासना करतो त्या त्या रूपाने विशिष्ट अशा परमात्म्यास तो प्राप्त होतो.' अशा अर्थाची श्रुती व 'हे मर्त्य मज एकाच परमेश्वराची ज्या ज्या आकाराने उपासना करतात त्या त्या आकृतीनेच मी प्रसन्न होऊन त्या उपासकास इष्ट अर्थ देतो.' या अर्थाची स्मृती याविषयी प्रमाण आहे. श्रीमत् भगवद्गीतेमध्येही 'ज्या ज्या भावा(स्वरूपा)चे स्मरण करून प्राणी अंतकाली शरीर सोडतो त्या त्या भावासच तो सदा तद्रूप होऊन पोचतो' असे म्हटले आहे. आता भावना पूर्ण झालेली नसल्यास ईश्वरभाव कसा प्राप्त होईल? अशी शंका येते व त्याचे समाधानही सप्रमाण सिद्ध करता येते. ईश्वराविषयी ज्याची भावना दृढ झालेली असते त्यास ईश्वरत्व प्राप्त होते, हे तर निर्विवाद आहे. निर्गुण ब्रह्मास जाणण्याची मात्र ज्यास प्रबळ इच्छा असते ते श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ अशा गुरूच्या मुखाने निर्गुण ब्रह्माच्या स्वरूपाचा निश्चय करतात, व त्यानंतर 'स्थूल, सूक्ष्म व कारण या उपाधिंनी रहित व सच्चिदानंदरूप असे निर्गुण ब्रह्म मी आहे' अशी निर्गुण ब्रह्मोपासना करतात. त्या उपासनेच्या योगाने या अधिकारी पुरुषास याच शरीराने जिवंत असताना किंवा मरणसमयी अथवा ब्रह्मलोकी, ब्रह्मसाक्षात्कार होऊन निर्गुण ब्रह्माची प्राप्ती' हे फळ मिळते. निर्गुण ब्रह्माची निदिध्यासनरूप उपासना केल्यास उपासकास निर्गुण ब्रह्माची प्राप्ती होते. याविषयी 'निर्गुण ब्रह्माची उपासना करून ज्याचे चित्त अतिशय शुद्ध झाले आहे अशा त्या साधकास ध्यान करताना निर्गुण ब्रह्माचा साक्षात्कार होतो' अशा अर्थाची श्रुती प्रमाण आहे. असो– (सुबोध अद्वैत सिद्धांत दर्शन)

सर्व देवता ही मूळ परमेश्वराची– परब्रह्माचीच रूपे आहेत. असे असले तरी वेळोवेळी कारणाने जे अवतार घेतले आहेत, ते म्हणजेच परमेश्वराची कार्यरूप देवता होय. त्यांच्या कार्याचा जो मूळ हेतू तेवढीच त्या देवताच्या कार्याची व्याप्ती आहे. त्यामुळे गणपती देवतेजवळ बुद्धी, तर शंकराजवळ संपत्ती, ऐश्वर्य मागितले जाते. देवीची स्वरूपेही अशीच. कामना पूर्ण करण्यासाठीच त्या देवता उपासल्या जातात, पण म्हणून इतर देवतांची उपासना केली असता ब्रह्मस्वरूपाची प्राप्ती होणे अशक्य असते. कारण वर म्हटल्याप्रमाणे उपासनेमागील संकल्पच होय.

भगवंत म्हणतात,

*'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम् ।*
*मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः ॥'*

*(भ. गीता ४-११).*

अर्थ : अर्जुना, जे ज्या हेतूने मजकडे येतात त्यांना तसेच फल मी देतो. (म्हणून) सर्व लोक (कोणत्या ना कोणत्या हेतूने) माझ्याच मार्गाला (भक्तीला) अनुसरतात.

म्हणून ब्रह्मप्राप्ती हाच हेतू ठेवून परमेश्वराची उपासना करावयास पाहिजे, पण ही उपासना अनेक जन्मांची असते. त्यामुळे त्याला यज्ञाची उपमा देणेच योग्य होईल. जन्मोजन्मी आपल्या सर्व विषयसुखाची आहुती देऊन व त्याचप्रमाणे मन, बुद्धी, अहंकार यांचाही लय करून जे निष्ठेने चालवले जाते तो यज्ञच होय आणि अशा यज्ञातून जे 'हुतशेष' उरेल त्याचे सेवन करावे. त्या 'हुतशेषाला' म्हणतात, 'तीर्थ व प्रसाद'. तीर्थप्रसादाला खूप अर्थ आहे. कारण त्याचे सेवनाचे प्रमाणच त्या शब्दामधून स्पष्ट झालेले आहे आणि म्हणूनच आपण जेवताना म्हणतो की,

*वदनि कवळ घेता नाम घ्या श्रीहरिचे ।*
*सहज हवन होते नाम घेता फुकाचे ।।*

*जिवन करि जीवित्वा अन्न हे पूर्णब्रह्म ।*
*उदरभरण नोहे जाणिजे यज्ञकर्म ।।*

जन्मोजन्मींच्या यज्ञकर्मानेच परमेश्वरप्राप्ती होते याचे आश्वासन भगवंतांनीच दिलेले आहे. भगवंत म्हणतात,

*यज्ञशिष्टामृतभुजो यान्ति ब्रह्मसनातनम् ।*

*(भ. गीता ४-३१).*

यज्ञ करून उरलेले (हवनीय द्रव्य) हेच अमृत होय. या अमृताचा उपभोग घेणारी अविनाशी ब्रह्माला प्राप्त होतात. हा जो अभ्यास आहे तो आवडी-निवडीवर नियंत्रण आणतो. विषयाची जी विविधता मनाला भुरळ पाडते त्या विविधतेत एकरूप पाहण्याचा अभ्यास होत राहतो. त्यामुळे भेदज्ञान जाऊन अभेदत्व मनात बिंबत जाते. स्थूल, सूक्ष्म यांचे नाते लक्षात येते. ज्ञान व विज्ञान यांतील एकरूपता हळूहळू समजू, जाणवू लागते आणि त्यामुळे मनाची विषयाविषयीची, भेदामुळे भासणाऱ्या विविधतेविषयीची ओढ नाहीशी होते. मनाचा चंचलपणा कमी कमी होत नाहीसा होतो व ते परमेश्वरापाशी स्थिर होते. मग कर्मामधील आसक्ती कमी होत जाते. कर्म हे कर्तव्य म्हणून निष्काम, निरासक्त भावनेने केले जाते. दातेरी चाकांच्या जोडीमध्ये जसे एका चाकाकडून दुसऱ्या चाकाला त्याच्या परिघावरील दातांच्या सायाने गती मिळत

राहते, त्या वेळी प्रत्येक दात हा स्वतःच्या कर्माचे निष्ठेने पालन करतो म्हणून चाकांची गती अबाधित राहते. तसे हे सृष्टी चक्र चालण्यासाठी, या समाजाची गती अबाधित राहण्यासाठी प्रत्येक व्यक्तीने त्या दाताप्रमाणे आपल्या वाट्याला आलेले कर्म चोख केले पाहिजे म्हणजे समाजाबरोबर व्यक्तीचाही विकास होत जातो.

'विकास' या शब्दाचा जेव्हा विचार केला जातो तेव्हा त्या विकासात घडणाऱ्या प्रक्रियेचा विचार मनात येतो. 'विकास' म्हणजे नेमके काय? विकासाची परिणती लयात होते, असेच लक्षात येते. लय, नाश, मृत्यू हे सर्व एकाच अर्थाचे शब्द आहेत. जी जी वस्तू उत्पन्न होते, प्राणी जन्मास येतो त्या त्या क्षणापासून त्याचा विकास चालू होतो. 'बी'ला अंकुर फुटतो, त्याला प्रथम तीन पाने येतात. ते वाढते, त्याला फांद्या, पाने, फुले येतात. ते झुडूप होते, वृक्ष होतो वा वेल होते. तरीही त्याची वाढ चालूच असते. त्याला एक बारीक कळी येते. ती हळूहळू मोठी होते. ती उमलण्यास सुरुवात होते. तिचा विकास चालू असतो. ते फूल पूर्ण उमलते तरीही त्याचा विकास चालूच असतो. त्या फुलाच्या पाकळ्या उमलत राहतात. उमलता, उमलता पाकळ्या गळू लागतात, विकास चालू असतो. सर्व पाकळ्या गळून जातात. फक्त मधील केशराचे बोंड राहते. हळूहळू केशरही गळून जातात. शेवटी बोंडही सुकून जाते. काही दिवसांनी ते केशराचे बोंडही गळून जाते व तेथे फूल होते याची खूणही शिल्लक राहात नाही. अशा पद्धतीने हजारो-लाखो वर्षांपासून चालत आलेल्या सृष्टीकडे पाहिले तर असेच दिसते. एके काळी वैभवात असणारी साम्राज्ये पूर्ण लयाला जाऊन त्यांच्या खुणाही इतक्या बुझलेल्या असतात की केवळ त्यांची आठवण राहिलेली असते, तर काहींच्या आठवणीही शिल्लक राहिलेल्या नसतात.

भगवंतांनी दिलेल्या दिव्य दृष्टीसमोर उभ्या असलेल्या काळपुरुषाचे अर्जुनाने केलेले वर्णनही अशाच प्रकारचे आहे. अर्जुन म्हणतो–

*'यथा प्रदीप्तं ज्वलनं पतंगा विशन्ति नाशाय समृद्धवेगाः ।*
*तथैव नाशाय विशन्ति लोकाः तवापि वक्त्राणि समृद्धवेगाः ।।*

*(भ. गीता ११-२९).*

अर्थ : ज्याप्रमाणे पतंग मोठ्या वेगाने प्रज्वलित अग्नीमध्ये नाश पावण्याकरताच पडत असतात त्याप्रमाणे (हे सर्व सैनिक) लोकदेखील स्वतःचा नाश करून घेण्याकरिता तुझ्या मुखामध्ये वेगाने शिरत आहेत. हा नाश सर्वसामान्य वस्तूंचा, प्राण्यांचा, मानवाचा होतो. हा नाश लौकिक, भौतिक आहे. आध्यात्मिक विकासात,

अतिविकासात असा नाश नसतो. वर सांगितलेल्या समानार्थी शब्दांमध्ये लय, नाश, विनाश, मृत्यू हे शब्द होते, पण पहिला 'लय' शब्दाचा अर्थ जरी वरवर पाहता पुढील तिन्ही शब्दांप्रमाणेच वाटत असला तरी त्यात फार मोठा फरक आहे. तो फरक भगवंतांनीच स्पष्ट करून सांगितला आहे–

*'यथा नदीनां बहवोऽम्बुवेगा: समुद्रमेवाभिमुखा द्रवन्ति ।*
*तथा तवामी नरलोकवीरा विशन्ति वक्त्राण्यभिविज्वलन्ति ।।'*

*(भ. गीता ११-२८).*

वरील २९व्या श्लोकामध्ये नाश, विनाश, मृत्यू याचे वर्णन आहे तर २८व्या श्लोकात 'लया'चे वर्णन आहे. नदी नावारूपाने जरी अस्तित्वात नसली तरी अवस्थारूपाने, पाणीपणाने ती नाहीशी झाली नाही. नदी सागरात विलीन होते, लय पावते; पण पाणीपणाने ती सागरात असतेच असते. सागराच्या लाटा उत्पन्न होतात, वाढतात, उंचावतात व खाली येत येत सागरात लय पावतात, विलीन होतात, मिळून जातात. म्हणजे पाणीपणाने त्या लाटा सागरात असतातच.

*'इंद्रियाणां मनो नाथा मनोनाथास्तु मारुत: ।*
*मरुतस्य लयो नाथा स लयो नादमाश्रित: ।।*

*लयो लय इति प्राहु: किमेतल्ल्यलक्षणं ।*
*अपुनर्वासिनो त्यानाल्ल्यो विषयविस्मृति: ।।'*

*(हटयोग प्रदीपिका अ. ४).*

अनाहत नादाच्या अनुसंधानाविषयी हटयोग प्रदीपिकेमधील काही श्लोकांचा अर्थ खाली दिला आहे.

''मन इंद्रियांचा स्वामी आहे, प्राण मनाचा स्वामी आहे. लय प्राणाचा स्वामी आहे. अर्थात नादात प्राणाचा लय होतो. म्हणजे अनाहत नादच ब्रह्म आहे आणि नादानुसंधानाच्या प्रक्रियेत मन या नादरूपी ब्रह्मात प्रविष्ट झालेले असते. त्यातच शेवटी ते लय पावते. हा लय म्हणजे विष्णूचे परमपद अर्थात ब्रह्मरूपत्व. हा लय म्हणजेच मोक्ष असे एक मत आहे. परंतु नादात प्राण, मन यांचा लय झाल्याने विशेष आनंद होतो. हाच परमानंद होय. या लयात अखंड सुख आहे. लयाचे लक्षण हे की अखंड आनंदाने सर्व वासना पूर्णत: नष्ट झाल्याने त्या पुन्हा उत्पन्न होऊ शकत नाहीत आणि वासना नसल्यामुळे विषयांचेही स्मरण होत नाही. अशी विषयांची विस्मृती

म्हणजेच लय. सारांश, सदा नादानुसंधानाने पापसंचय म्हणजे वासना नष्ट होतात आणि प्राण व मन यांचा निरंजन ब्रह्मस्वरूपात लय होतो. याप्रमाणे नादासंधानाच्या प्रक्रियेने आत्मानंदामुळे देहभावाचा पूर्ण विसर पडून साधक ब्रह्मस्वरूप होतो. स्वरूपानुसंधानाने हेच घडते. नाद व स्वरूप दोन्ही ब्रह्माचे आविष्कार आहेत.'' (धन्य तुकोबा समर्थ)

हा एक प्रकारचा लय आहे. मानवी विकासात लयाचा अर्थ कसा होतो हे वरील विवेचनावरून स्पष्ट झालेले आहे.

जीवात्मा हा जेव्हा वर सांगितलेल्या उपासना जन्मोजन्मी निष्ठेने चालू ठेवतो, निष्काम भावनेने कर्तव्यकर्मे करतो, परमेश्वराने निर्माण केलेल्या या सृष्टिचक्राला, समाजाच्या विकासाला साहाय्य होतो, त्याच वेळी तो स्वत: अभ्यास करून परमेश्वराविषयीचे ज्ञान प्राप्त करून घेतो. म्हणजे त्याचे ज्ञान हे विज्ञानासहित परिपूर्ण होते. त्यालाच भगवंताने योगारूढ म्हटले आहे.

भगवंत गीतेत म्हणतात,

*'ज्ञानविज्ञानतृप्तात्मा कूटस्थो विजितेन्द्रिय: ।*
*युक्त इत्युच्यते योगी समलोष्टाश्मकाञ्चन: ।।'*

*(भ. गीता ६-८).*

अर्थ : आत्मज्ञान व सृष्टिज्ञान यांनी ज्याचे अंत:करण तृप्त झाले आहे. (सर्व ज्ञान-विज्ञानासहित ज्याला पूर्णपणे प्राप्त झाले आहे) जो जितेंद्रिय आहे, ज्याला माती, दगड व सोने हे सारखेच वाटते. (उपभोगतृष्णाशून्यतेमुळे ज्याला त्याचे महत्त्व उरले नाही) जो बुद्धीच्या ठिकाणी प्रकाशकत्वाने (निर्विकार) असतो. (आत्मज्ञानाने प्रकाशित झालेल्या सात्त्विक बुद्धीने नियत कर्मे करीत असतो) अशा कर्मयोगी पुरुषाला युक्त म्हणजे योगारूढ म्हणतात.

'ज्ञानविज्ञान तृप्तात्मा', 'आत्मज्ञान व सृष्टिज्ञान यांनी ज्याचे अंत:करण तृप्त झाले आहे' परमेश्वर स्वरूप होणाऱ्याला, ब्रह्मरूपामध्ये विलीन होणाऱ्याला हे विधान पूर्णपणे लागू पडते. श्रीमत् भगवद्गीतेवर अनेक टीकात्मक पुस्तके लिहिली गेली आहेत. त्यांमध्ये विशेषत्वाने कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग असे स्पष्ट तीन भाग पडतात. यांपैकी कोणत्याही एका योगाने परमेश्वरप्राप्ती होऊ शकते असे दिसते. पण बाह्यत: तसे दिसत असले तरी, तरी ते एकमेकांत वेणीचे तीन पेड हे जरी स्वतंत्र दिसले तरी

गुंफूनच एक सुंदर वेणी तयार होते तसे हे तीनही योग आहेत. इडा, पिंगळा व सुषुम्ना या तीन नाड्यांमुळेच शरीरामध्ये चैतन्याचा प्रवाह सतत चालू राहतो. पाने, फुले व फळे या तिन्हीमुळेच वृक्षाला पूर्णत्व येते. त्याप्रमाणे कर्मयोग, ज्ञानयोग व भक्तियोग यांच्या समन्वयाने मनुष्याला, आत्म्याला पूर्णत्व येते व तो परमेश्वरस्वरूप होतो. असे असूनही गीतेत दोन विषयांची चर्चा प्रामुख्याने येते, ती म्हणजे सगुण-निर्गुण, असार-सार, नाशवंत-अविनाशी, क्षर-अक्षर, प्रकृती-पुरुष, साकार-निराकार, जीव-ब्रह्म. यांतील निर्गुण, सार, अविनाशी, अक्षर, निराकार, पुरुष, ब्रह्म यांचे ज्ञान होणे अवघड आहे. कारण ते मन, बुद्धी, चित्त यांच्याही पलीकडे आहे. त्यामुळे ते 'जाणण्याचा' विषय होऊ शकत नाही. तर सगुण, असार, नाशवंत, क्षर, प्रकृती, साकार, जीव, यांच्या माध्यमामधून जाणणे शक्य आहे असे दिसते. म्हणजे स्थूलातून सूक्ष्माकडे, साकारातून निराकाराकडे, सगुणातून निर्गुणाकडे जाता येईल. म्हणून आधी स्थूल, साकार, सगुण वगैरेची माहिती करून घ्यावयास पाहिजे.

*'मज समग्राते जाणसी ऐसे । आपुलिया तळहातीचे रत्न जैसे ।*
*तुज ज्ञान सांगेन तैसे । विज्ञानेंसी ॥*

*एथ विज्ञाने काय करावे । ऐसे घेसी जरी मनोभावे ।*
*तरी पै आधी जाणावे । तेचि लागे ॥'*

*(ज्ञानेश्वरी ७-२ व ३).*

कारण ज्ञान आणि विज्ञान या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. साखरेविषयी केवढाही मोठा ग्रंथ लिहिला व तिचे वर्णन केले तरी जोपर्यंत एक चिमूटभर साखर तोंडात टाकून तिची चव पाहिली जात नाही म्हणजे तिच्या गोडीची अनुभूती घेतली जात नाही तोपर्यंत ते पुस्तकी (वि) ज्ञान अपूर्णच राहते. याउलट लहान मुलाच्या तोंडात चिमूटभर साखर घातली असता त्याला आपण काय खाल्ले व त्याला काय म्हणतात व ती वस्तू कशापासून तयार झाली आहे वगैरे विज्ञान जोपर्यंत कळत नाही तोपर्यंत त्या गोडीची अनुभूतीही अपूर्णच राहते. पण जेव्हा या दोन्ही गोष्टींचा संयोग होतो तेव्हाच ते ज्ञानविज्ञानासहित असल्याने पूर्ण होते.

तसे परमेश्वराचे निर्गुण, निराकार स्वरूप पूर्णपणे कळण्यासाठी या सृष्टीची, विश्वाची, त्याच्या विज्ञानाची पूर्ण कल्पना येणे आवश्यक आहे आणि म्हणून भगवंतांनी गीतेत सातवा व नववा अध्याय घातला आहे व ज्ञान हे विज्ञानासहित स्पष्ट करून सांगितले आहे.

ज्ञान हे विज्ञानासहित प्राप्त करून घ्यावयाचे झाले तर ते एका जन्मात सर्व काही प्राप्त करून घेणे शक्य नाही. मग त्यासाठी अनेक जन्मांचा प्रवास करावा लागतो. ज्याप्रमाणे मनुष्याला विद्यापीठापर्यंतच्या उच्च पदवी अभ्यासासाठी साधारण सोळा-सतरा वर्षे अभ्यास करावा लागतो; प्रत्येक परीक्षा पास झाली असता व वरच्या वर्गात गेले असता मागीलही अभ्यास आठवणीत ठेवावा लागतो कारण पुढील अभ्यास कळण्यास तो उपयोगी होतो; त्याप्रमाणे एका जन्मात जेवढा अभ्यास झाला असेल तो अपुरा राहिल्याने त्याला पुढील जन्मी तसा त्यापुढील अभ्यास करण्याची प्रेरणा मिळते. तशी परिस्थिती प्राप्त होते व तो पुढील अभ्यासास सुरुवात करतो व काही एका विशिष्ट टप्प्यापर्यंत जातो. अशा प्रकारे अनेक जन्मांनंतर तो (साधक) विज्ञानासहित ज्ञानाच्या पूर्णावस्थेस प्राप्त करून घेतो व ब्रह्मस्वरूप होतो.

याला साधा दुसरा दृष्टान्त देणे झाल्यास, ज्याप्रमाणे इमारतीच्या वरच्या मजल्यावर जाणे असल्यास जिन्याची प्रत्येक पायरी ही एका विशिष्ट उंचीची मर्यादा पार करते व दुसरी पायरी चढण्यासाठी उपयोगी पडते, असे शेवटच्या पायरीपर्यंत न घसरता चढत गेल्यास शेवटी वरच्या मजल्यावर जाता येते. तद्वतच जिवाचा प्रत्येक जन्म हा एका पायरीसारखा उपयोगी होतो. म्हणून पुनर्जन्म हा मानला आहे. भगवंतांनीसुद्धा त्या गोष्टीचा खुलासा भगवत्गीतेमध्ये केला आहे. त्यात प्रगतिपथावर असलेल्या जिवांची जन्माजन्मातून कशी प्रगती होते याचेही स्पष्टीकरण केले आहे.

*प्राप्य पुण्यकृताँल्लोकानुषित्वा शाश्वतीः समाः ।*
*शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते ॥*

*अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम् ।*
*एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम् ॥*

*तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम् ।*
*यतते च ततो भूयः संसिद्धौ कुरुनंदन ॥*

*पूर्वाभ्यासेन तेनैव ह्रियते ह्यवशोऽपि सः ।*
*जिज्ञासुरपि योगस्य शब्दब्रह्मातिवर्तते ॥*

*प्रयत्नाद्यतमानस्तु योगी संशुद्धकिल्बिषः ।*
*अनेकजन्मसंसिद्धः ततो यांति परां गतिम् ।।*

*(भ. गीता ६-४० ते ४५).*

अर्थ : योगभ्रष्ट (ज्याचा योगाभ्यास अर्धवट राहिला आहे तो) मनुष्य पुण्य करणाऱ्या लोकांना प्राप्त होणाऱ्या (स्वर्गादी) लोकांस प्राप्त होऊन, तेथे दीर्घकालपर्यंत राहून, पवित्र आणि वैभवशाली पुरुषांच्या घरात (घराण्यात) पुन्हा जन्मास येतो. किंवा ज्ञानवान योग्यांच्याच कुळात उत्पन्न होतो आणि अशा प्रकारच्या इहलोकी जन्म घेणे हे अधिकच दुर्लभ होय. अर्जुना! तेथे (त्या नव्या जन्मात) तो पूर्वजन्मीचा (अर्धवट राहिलेला) बुद्धियोग त्याला प्राप्त होतो आणि तेथून पुढे तो योग पूर्ण करण्याविषयी (तो) फिरून यत्न करू लागतो. तो परतंत्र असला तरी त्याच्या पूर्वजन्मीच्या अभ्यासाने (अभ्यासजन्य संस्कारांनी) (योगाकडे) पुन्हा आकर्षिला जातो. बुद्धियोगाची (नुसती उत्कट) जिज्ञासा ज्याला झाली आहे असा पुरुषदेखील निव्वळ वेदज्ञानापेक्षा (केवळ वेदपठण करणाऱ्यापेक्षा) श्रेष्ठ असतो. अशा प्रकारे प्रयत्नांनी अभ्यास केल्यामुळे निष्पाप झालेला (आणि शिवाय ज्ञानानी परिपूर्ण झालेला) अभ्यासयोगी अनेक जन्मांनी सिद्ध (ध्यानयोग सिद्ध) होऊन नंतर परमगतीला जातो, ब्रह्मस्वरूप होतो.

ज्ञानाबरोबर विज्ञानाचे तसेच विज्ञानाबरोबर ज्ञानाचे महत्त्व वर्णन करताना संत एकनाथ महाराज भागवतात म्हणतात–

*'ज्ञानविज्ञान निजसंपत्ति । जाहलियावीण माझी प्राप्ति ।*
*कोणासी नव्हे स्वरूपस्थिती । मत्पदी गती ज्ञानविज्ञाने ।।*

*करिता गुरुमुखे शास्त्रशुद्ध श्रवण । तेणे जाहले ते म्हणिजे ज्ञान ।*
*त्याचा अनुभव तेचि विज्ञान । ऐक लक्षण त्याचेही ।।'*

*(ए. भा. अध्याय १९ ओवी ४८ व ४९).*

खरोखरीच याच विज्ञानरूप यज्ञाने, विचारवंत थोर पुरुषांनी, सर्व यज्ञाचा स्वामी अशा मज परमात्म्याची आपल्या अंतःकरणात प्रकर्षाने आराधना करून माझी प्राप्ती करून घेतली आहे.

*'जे ज्ञानधने अतिसंपन्न । परमपवित्र विज्ञाने जाण ।*
*ऐसे ब्रह्मभूत जे ब्राह्मण । यज्ञद्वारा यजन करिती माझे ।।*

*शुद्धसत्त्वाचे घृत तेथ । रजतमद्रव्येसी मिश्रित ।*
*वैराग्य स्रुवेने आहुती देत । मंत्र तेथ युक्तिचे ॥*

*ज्ञानेवीण वैराग्य आंधळे । ते अरडी दरडी आदळे ।*
*वैराग्येवीण ज्ञान पांगळे । युक्ति देखे परि न चले पुरुषार्थ ॥*

*विवेक वैराग्य दोनी । प्रवेशल्या हृदयभुवनी ।*
*ती विषयावस्था निरसुनी । सोहंपणी जीव वर्ते ॥*

*जंव ज्ञानासी न भेटे विज्ञान । तंव न निरसे जीवपण ।*
*यालागी सांगावे विज्ञान । जीवशिवपण निवारी ॥'*

*(ए. भा. अध्याय १९ ओवी ७२, ७५, १०० ते १०२).*

ब्रह्मस्वरूपाच्या प्राप्तीसाठी ज्ञान-विज्ञान हे दोनही आवश्यक आहे, पण ते साध्य करता येते. याविषयी भगवंत सांगत आहेत व एकनाथ महाराज त्याचे विवरण करताना म्हणतात,

*'शास्त्रे श्रवणे दृढ 'ज्ञान' । मननध्यासे होय 'विज्ञान' ।*
*या दोहीची जाणोनी खूण । ब्रह्मसंपन्न तो होई ॥'*

*(ए. भा. अध्याय ७ ओवी १०२).*

ज्याप्रमाणे उच्च पदवी परीक्षा पास झाल्यावर पुढे शिक्षण घेणे हा भाग राहात नाही, तर प्राप्त झालेल्या शिक्षणाचा उपयोग करून समाजाच्या विकासाला त्याचा उपयोग करून देण्याचा कर्तव्यकर्माचा भाग शिल्लक राहतो. त्याप्रमाणे सिद्ध पुरुष परमेश्वर स्वरूप होऊन जातात. पण अशी ब्रह्मानुभूती आलेले पुरुषही काही कारणाने परमेश्वरी कार्य करण्यासाठी संत-सत्पुरुषांच्या रूपाने जन्माला येतात व अनेक भरकटलेल्या जिवांना, संसारात पिडलेल्यांना थोडासा दिलासा देण्यासाठी व परमेश्वरावरील भक्ती उत्पन्न होऊन दृढ होण्यासाठी, कार्य करतात, समाज उन्नत करतात, समाजाला सावरतात. अशा जन्मात ते संसारातील सुखदुःखाशी तादात्म्य पावत नाहीत. ज्याप्रमाणे वादळी वारे व पाऊस, उन ही पर्वताला विचलित करू शकत नाहीत तसे ते या संसारात अलिप्त, अविचल असतात व कार्य झाल्यावर देह ठेवून जातात.

या संत मालिकेतील नामावली पाहिली म्हणजे कळून येते व त्यांनी संसारात जन्माला येऊन स्वत:च्या संसारापेक्षा जगाचा, समाजाचा संसार केला, त्याला वळण लावले. संत ज्ञानेश्वर, निवृत्तिनाथ, सोपानदेव, मुक्ताबाई, नामदेव, जनाबाई, चोखामेळा, सावतामाळी, गोराकुंभार, सेना न्हावी, परिसा भागवत, नरहरी सोनार, तुकाराम महाराज, एकनाथ महाराज, कान्होपात्रा, गोंदवलेकर महाराज, रामदास स्वामी, अक्कलकोट स्वामी आदी महाराष्ट्रीय संत झाले, पण महाराष्ट्राबाहेरील संतही खूप आहेत. संत मीराबाई, तुलसीदास, गौरांगप्रभू, विवेकानंद, रामकृष्ण परमहंस, कबीर, नरसी मेहता वगैरेही अनेक संत आहेत. गजानन महाराज, शेगांव वगैरे अनेक सत्पुरुषही आहेत. हे सर्व आले, समाजाला जागृत केले आणि गेले, पण त्यांनी जी आपली अनुभूती लिहून ठेवली आहे ती समाजाला आजही मार्गदर्शक व प्रेरणा देणारी आहे आणि म्हणून सदासर्वकाळी असे संतसत्पुरुष जन्म घेत राहतील व समाजामध्ये धर्माला, श्रद्धेला आलेली ग्लानी घालवून समाजाला जागृत करून सश्रद्ध बनवतील व भारतीय परंपरा चालू ठेवतील.

## ईश्वरसिद्धीची उपपत्ती

'परब्रह्म' या विषयावर लिहिण्यास सुरुवात करण्यापूर्वी मुळात ईश्वर म्हणून एखादी अशी वस्तूच आहे का, हा प्रश्न उभा राहील. ईश्वर ही संकल्पना आजच्या विज्ञाननिष्ठ युगात मागे पडत चालली आहे. विज्ञानाने केलेल्या देदीप्यमान क्रांतीने (आणि खरोखरीच तशी क्रांती झालेली आहे.) सर्वांचेच म्हणजे बुद्धिवादी, नास्तिक, विज्ञानवादी, यांचा उत्साह वाढत चालला आहे. ईश्वराच्या अस्तित्वाचे पुरावे मागितल्यामुळे सश्रद्ध माणसेसुद्धा बिथरून विज्ञानालाच श्रेष्ठ समजू लागली आहेत. (अर्थात विज्ञान श्रेष्ठ आहेच यात शंका नाही, पण सर्वश्रेष्ठ नाही हेही तितकेच खरे आहे.) पण त्यामुळे एकाला श्रेष्ठ ठरवताना दुसरा कनिष्ठ कसा होतो? दुसऱ्याच्या अपयशावर आपले यश अवलंबून नसावे. म्हणून ईश्वर म्हणून एक महान शक्ती आहे. तिचे अस्तित्व हे स्थूल रूपाने सिद्ध करता येत नसेल तर अन्य काही प्रकाराने सिद्ध करता येते. एवढेच नव्हे तर ते शेवटी मान्यही करावे लागते. तात्त्विक दृष्ट्या ईश्वराची सिद्धी जी आपल्या पूर्वजनांनी केली आहे. त्याचाही संदर्भ येथे विज्ञाननिष्ठ विचाराबरोबर तुलना करण्यासाठी ठेवला आहे. असो.

''सबंध ईश्वरवाद किंवा ईश्वरशास्त्रामध्ये ईश्वराच्या अस्तित्वाच्या उपपत्त्या येतातच. पण त्याशिवाय ईश्वराचे स्वरूप, ईश्वर-जीव संबंध, ईश्वर-जगत् संबंध, ईश्वरतत्त्व

आणि ब्रह्मतत्त्व, ईश्वर साक्षात्काराचे स्वरूप व साधनाशास्त्र इत्यादी विषय येतात. परंतु ईश्वराचे अस्तित्व हा विचार या सर्वांचा केंद्रबिंदू आहे म्हणून तो महत्त्वाचा आहे. ईश्वर हा एवढा महान आहे की तो मानवी तर्कबुद्धीला अगम्य म्हणून त्याच्या पलीकडच्या श्रेष्ठ भूमिकेवर आहे. तो स्वयंसिद्ध आहे, तर्कसिद्ध नाही.

## जे आहे ते ईश्वरस्वरूप आहे काय?

ईश्वर आहे काय? या प्रश्नामध्ये असे गृहीत धरले आहे की जे आहे ते ईश्वर नाही. आणि जे नाही त्या ठिकाणी ईश्वर असण्याची शक्यता नाही, कारण दोनच पर्याय संभवतात. आहे किंवा सत् आणि नाही किंवा असत्. म्हणजे प्रश्न जर अर्थपूर्ण करावयाचा तर असे विचारले पाहिजे की जे आहे ते ईश्वरस्वरूप आहे काय? कारण जे नाही त्या ठिकाणी कसल्याही अस्तित्वाचा शोध घेणे निरर्थक होय. परंतु जे आहे ते ईश्वरस्वरूप नाही असे गृहीत धरून चालण्याने मुळातच ईश्वर नाकारण्यासारखे आहे. आपण ज्यास आहे म्हणतो, अस्तित्व म्हणतो, सत् म्हणतो, ते नाकारणे शक्यच नाही; म्हणून जर ईश्वर असेल तर तो या अस्तित्वातच असे प्रमाणित करावयास पाहिजे. म्हणजे अस्तित्वाचे, सत्‌चे विश्लेषण करून पाहावयास हवे.

## सत् आणि असत्

तर्कतः दोन गोष्टी संभवतात. काहीही नसणे किंवा काहीतरी असणे. संपूर्ण असत्‌ची, अभावाची, नास्तित्वाची, शून्यत्वाची कल्पना ही केवळ कल्पनाच आहे. तेव्हा काही आहे, अस्तित्व, भाव, सत् हा दुसरा पर्याय शिल्लक राहतो. कारण ती अनुभवाची गोष्ट आहे. तेव्हा दोन पर्यायांतील 'अस्तित्व' आणि 'नास्तित्व'मधील 'अस्तित्व' हा पर्याय शिल्लक राहिला. गीतेमध्ये म्हटल्याप्रमाणे 'नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।' हेच सत्य शिल्लक राहते.

## सत् हे चिद्रूप आहे

जे अस्तित्व आहे ते प्रकट आहे किंवा अप्रकट आहे. दुसऱ्या शब्दात ते अस्तित्व त्याच्या जाणिवेसकट म्हणजे सचेतन आहे किंवा नाही? अस्तित्वाला अस्तित्वाची जाणीव नसणे म्हणजे अचेतन असणे किंवा ते प्रकट नसणे, म्हणजे असून नसल्यासारखेच झाले नसण्याची स्वाभाविक जशी नसण्याची स्थिती तशी असण्याची परंतु प्रकट नसण्याची स्थिती स्वाभाविक समजली तर असणे आणि नसणे सारख्याच

योग्यतेचे झाले. अस्तित्वाची जाणीव अस्तित्वाच्या ठिकाणी नसेल म्हणजे ते अचेतन असेल तर ते अस्तित्व आहे म्हणण्याला काहीच अर्थ राहात नाही. अस्तित्वाच्या भानासकट अस्तित्व असणे हेच अस्तित्वाचे लक्षण आहे. अप्रकट अचेतन अस्तित्व हे अस्तित्व नव्हेच. प्रकट सचेतन अस्तित्व हेच वास्तविक अस्तित्व होय. म्हणजे अस्तित्वाचे भान, जाणीव, ज्ञान अस्तित्वाच्या ठिकाणी असण्यानेच अस्तित्व स्वयंभूपणे प्रकट आहे असे जाणावयास हवे. सत् किंवा सत्‌चा बोध, अस्तित्व आणि अस्तित्वाची जाणीव ही स्वाभाविकच असायला हवी, हे सिद्ध आहे. म्हणजे सत् हे चिद्‌रूप आहे आणि ते अनुभवासकट आहे.

## सत् आणि चित् आनंदरूप आहे

सत् आणि असत् यांमध्ये 'सत्'ची प्रतिष्ठा आहे. सत्‌चे स्वयंभू सामर्थ्य आहे. सत्‌चे स्वाभाविक मूल्य आहे. असत्‌ला काही प्रतिष्ठा नाही, सामर्थ्य, मूल्य नाही. ज्ञान आणि अज्ञान यांमध्ये ज्ञानाला स्वयंमूल्य, प्रतिष्ठा व सामर्थ्य आहे. सत् हे म्हणूनच आनंदमय, आनंदकारक, आनंदरूप आहे. ज्याप्रमाणे सत्‌मध्ये बाहेरून ज्ञानाची भर टाकल्याने सत् हे ज्ञानरूप झाले असे म्हणता येत नाही. तर ते स्वतः ज्ञानरूप, ज्ञानमयच आहे. त्याचप्रमाणे सत्‌चे स्वरूप उलगडून पाहता ते खरोखरी सत्-चित्-आनंदरूप आहे. हे जरी तीन शब्द आहेत तरी ते तीन एकाच वस्तूचे अभिन्न स्वरूप आहे. या तीन शब्दांनी निर्देश केलेली वस्तू एकमेवाद्वितीय आहे. म्हणजे जे आहे ते एक सच्चिदानंदरूप ब्रह्मच आहे.

## कारणात्मक किंवा वैश्विक उपपत्ती

(कॉझल किंवा कॉस्मॉलॉजिकल उपपत्ती) या उपपत्तीमध्ये कार्यकारणांची परंपरा जेथून सुरू होते त्या आद्यकारणास ईश्वर म्हणतात. जगताच्या उपपत्तीला काही कारण लागते, तेच ईश्वररूपाने प्रथम म्हणून सिद्ध आहे. परंतु या उपपत्तीची त्रुटी एवढीच, पण जी अनुप्रेक्षणीय आहे ती अशी की कार्यकारण परंपरा ही विश्वात दृगोचर होते, म्हणून सर्व जगतालाच एक कार्य समजून त्याचे कारण म्हणून ईश्वराला जगताबाहेर असलेले अस्तित्व प्रदान करणे होय. त्यामुळे या उपपत्तीबद्दल शंका निर्माण होणे स्वाभाविकच आहे. या त्रुटीची दुरुस्ती करून मी एवढेच म्हणेन की या उपपत्तीमध्ये विश्वात असलेली कार्यकारण परंपरा ही खरीच विचारार्ह आहे. भौतिक विज्ञानामध्ये निरनिराळ्या घटनांच्या कारणांचा शोध घेतला जातो व त्याचे स्पष्टीकरण देता येते हे

फारच महत्त्वाचे आहे. सृष्टीमधील ही कार्यकारणात्मक संरचना अद्‌भुत आहे, जटिल आहे. त्या रचनेचे पूर्ण आकलन न होण्यामुळे ती अचिन्त्य पण आहे. माझा असा आग्रह आहे की सृष्टीमधील कोणतीही रचना ही अंतिमत: एक प्रकारच्या क्रियात्मक ज्ञानाचे अस्तित्व दर्शवितात. निसर्गातील अत्यंत जटिल व्यवस्था ही निसर्गात अनुस्यूत असलेली ज्ञानगर्भता प्रकट करते. जेथे ज्ञान आहे तेथे चैतन्य आहे. तेच ईश्वररूप होय. ईश्वराला जगताच्या अस्तित्वाबाहेर राहून त्याची व्यवस्था पाहण्याचे कारण नाही. जगताची व्यवस्था हेच ईश्वराचे जगतामध्ये ज्ञानरूपात अस्तित्व होय.

## प्रयोजनवादी उपपत्ती

जे कार्यकारण भावाच्या व्यवस्थेने सिद्ध होते, तेच विश्वाच्या एकूणच रचनात्मकतेने निराळ्या उपपत्तीने सिद्ध होते. कार्यकारणभाव हा यंत्रवत्‌ किंवा यांत्रिक असायला पाहिजे असे नाही. ती व्यवस्था प्रयोजनात्मक साध्य-साधनरूपही असू शकते. अमुक गोष्टीमुळे अमुक गोष्ट झाली हे जसे खरे तसेच अमुक गोष्टीसाठी अमुक गोष्ट झाली हेही खरे. कारणाच्या शोधासाठी भूतकाळाकडे पाहावे लागते, तर साध्यप्राप्तीसाठी भविष्याकडे पाहावे लागते, एवढाच फरक. प्रयोजकता ही यांत्रिकतेचे उरफाटे स्वरूप आहे असे बर्गसॉने म्हटले आहे. तथापि व्यवस्थेचे रूप मात्र बिघडत नाही. प्रयोजनवादी उपपत्तीत जगताचे अंतिम साध्य म्हणजे ईश्वर असे मानले जाते.

## पर्यावरणवादी संरचनेची तात्त्विक उपपत्ती

पर्यावरण विज्ञानाचा तात्त्विक अभ्यास केल्यावर हेच लक्षात येते की, सर्व सृष्टी ही अंतर्गत रीत्या अतिविशाल सुसंवादी संरचनेचे जाळे आहे. एकसमयावच्छेदे करून सृष्टीतील सर्व गोष्टी एकमेकांत निरनिराळ्या प्रकारांनी संबंधित झालेल्या आहेत. सबंध सृष्टी ही एक महान कुटुंब आहे. तीमधील सर्व घटक परस्परांची धारणा करीत असतात. सृष्टीमधील या अद्‌भुत व्यवस्थेची शक्यता तीमध्ये वसत असलेल्या सर्वज्ञतेचे आणि सर्वशक्तिमत्तेचे निदर्शन आहे. ईश्वरत्वाचा शोध सृष्टीच्या बाहेर करण्याचे कारण नाही. सृष्टी हीच चैतन्याने रसरसलेली आहे. पर्यावरण विज्ञानाने तात्त्विक अधिष्ठान अद्वैत वेदान्त आणि धारणात्मक धर्माचे आहे.

सर्व विज्ञान त्यांच्या त्यांच्या परीने सृष्टीतील एका-एका अंगाचे किंवा एका-एका दृष्टिकोनातून सबंध सृष्टीचे अध्ययन करीत असतात. गणितात्मक, पदार्थविज्ञानात्मक, रासायनिक, शारीरिक, जैविक, मनोवैज्ञानिक इत्यादी विविध प्रकारच्या रचना

कौशल्याची प्रचीती ही विज्ञाने आणून देतात. विज्ञानाने किंवा वैज्ञानिकाने सृष्टीवर रचनात्मक व्यवस्थेचे आरोपण केलेले नसते, पण आपापल्या अभ्यासाने सृष्टीमध्ये स्वयंपणे असलेल्या नक्षीकामाचे यथार्थ चित्रीकरण मात्र उपलब्ध करून दिलेले असते. सर्व विज्ञानपद्धती निसर्गाला साक्षी ठेवून झालेली असते.

निसर्ग हा अनंत ज्ञानाने भरलेले भांडार आहे. वैज्ञानिक या निसर्गाला-निसर्गरूपी गुरूला शरण जाऊन आपले ज्ञानभांडार वृद्धिंगत करीत असतो. निसर्गाला अचेतन, जड समजून मानवी वैज्ञानिक स्वत:लाच फक्त ज्ञानाचे अधिष्ठान समजत असेल तर हा केवळ त्याचा अहंकारच त्याच्या आड येत आहे असे म्हणावे लागेल. सृष्टीच्या रूपाला अचेतन किंवा जड समजून स्वत:लाच चेतन मानणारा वैज्ञानिक हा आपल्या बौद्धिक जडतेचे मात्र प्रदर्शन करतो. ज्ञान हे केवळ सैद्धान्तिकच असते असे नसून ते क्रियात्मकही असू शकते. सैद्धान्तिक ज्ञान वैज्ञानिकांपाशी आहे आणि क्रियात्मक ज्ञान निसर्गापाशी आहे. स्वत:ला जाणीव असणारा मानव अज्ञानी असू शकतो परंतु निसर्गाच्या ठिकाणी मानवी प्रकारची जाणीव नसूनही निसर्ग हा प्रत्यक्ष क्रियात्मक ज्ञानाचे असीम भांडार असू शकतो. सैद्धान्तिक ज्ञान अपुरे व क्वचित चुकीचेही असू शकेल. निसर्गांतर्गत क्रियात्मक ज्ञान अनंत व अचूक असते हेच त्याचे ईश्वरीय रूप आहे.

पर्यावरणाच्या तत्त्वज्ञानात काही महत्त्वाचे शब्द वापरले जातात. सबंध सृष्टीमध्ये एक प्रकारचे समायोजन पाहावयास मिळते. सृष्टीतील निरनिराळ्या पदार्थांमध्ये, घटनांमध्ये जणू काही एकमेकांना एकमेकांशी जुळवून घेण्याची आपसूक प्रवृत्ती दिसते. कोठेही कसल्याही प्रकारची उणीव किंवा अधिकता होण्यापासून सांभाळण्याची प्रक्रिया चालूच असते. त्यामुळे उणीव असल्यास भरपाई केली जाते व अधिकता असल्यास काटछाट केली जाते. त्यामुळे सृष्टीमध्ये एक प्रकारे संतुलन राखले जाते. तोल बिघडणार नाही याची जागरूकता दिसते म्हणजे समतोल राखला जातो. यासाठी सूक्ष्म बुद्धिमत्तेची तसेच विशाल बुद्धिमत्तेची आवश्यकता असून निसर्गात ती स्वयंभूपणे उपलब्ध असल्याचे दिसते. व्यवस्था, पद्धतशीरपणा, साम्यावस्था, नियमितपणा, सुसंवादिता इत्यादींचे दर्शन निसर्गचित्रात दिसून येते. म्हणून सृष्टीला अचेतन समजणे मोठीच चूक आहे. त्यात जागरूकता असलेले चैतन्य हेच ईश्वराचे स्वरूप आहे. ईश्वर नावाचा तिटकारा असणाऱ्याने तो शब्द वापरला नाही तरी चालेल पण प्रकृती, सृष्टी, निसर्ग, जगत्, विश्व यांपैकी कोणतेही नाव स्वीकारल्यानेच केवळ त्यात सुप्रतिष्ठित असलेले ज्ञान किंवा चैतन्य नाकारले जाऊ शकत नाही. म्हणूनच

सांख्यांच्या अचेतन प्रकृतिवादाचा निरास करून वेदान्ताने, विशेष करून अद्वैताने सच्चिदानंद ब्रह्माची किंवा ईश्वराची त्या ठिकाणी स्थापना केली आहे. जड प्रकृतिवादाने रचनेची उपपत्ती लागत नाही असे ब्रह्मसूत्रात स्पष्टच म्हटले आहे.

## नैतिक उपपत्ती

नैतिक जीवन हीसुद्धा एक व्यवस्था आहे. जशी तथाकथित बाह्यविश्वात व्यवस्था आहे तशी मानवी जीवनविश्वातही त्याच्या आंतरिक नैतिक जीवनाची व्यवस्था आहेच. ऋग्वेदातील 'ऋतं च सत्यं च' ही धारणा सर्व विश्वांतर्गत व्यवस्था सुचविते. तशीच ती कर्मसिद्धान्तात परिणत झालेली व्यवस्थाही सुचविते. कोणतीही व्यवस्था ज्ञानाशिवाय संपन्न होत नाही, त्या अर्थी नैतिक व्यवस्थेबाहेर ईश्वर न पाहता ही व्यवस्थाच ईश्वररूप आहे, असे समजणेच योग्य होय. आपल्या कोणत्याही उपपत्तीचा केंद्रबिंदू म्हणजे व्यवस्था, रचना पद्धत जेथे आहे तेथे ज्ञानरूप ईश्वराचा वास आहेच.

## मूल्यात्मक उपपत्ती

नैतिक व्यवस्था ही मूल्यात्मक व्यवस्था आहे. सत्यं, शिवं, सुंदरम् ही तीन प्रमुख मूल्ये आहेत. नैतिक त्याचबरोबर धार्मिक मूल्येही शिव, शुभ, मंगल, श्रेयस, कल्याणकारक मूल्ये होत. सर्व कला या सुंदररूप मूल्यांची जोपासना करतात. तर्कशास्त्र, ज्ञानशास्त्र आणि सर्व प्रकारची विज्ञाने आणि दर्शने ही सत्याची उपासना करतात. या सर्व मूल्यांचे अंतिम अधिष्ठान विश्वांतर्गत रचनेमध्ये अनुस्यूत आहे. सर्व विश्वच एक दिव्य शिल्प आहे. ते एक आकृतिक सौंदर्याने विनटलेले चित्र आहे. ते पाहण्याची दृष्टी हवी. म्हणजे त्याचा आस्वाद हरतऱ्हेने घेता येतो. मूळ सृष्टीची रचनाच अशी आहे की तीमध्ये निरनिराळ्या प्रकारच्या मूल्यांच्या आविष्कारानांही स्थान आहे. ईश्वर हा स्वयमेव 'सत्यं शिवं सुंदरम्'चा अधिष्ठाता आहे.

## ज्ञानशास्त्रीय उपपत्ती

शेवटी ज्ञानशास्त्रीय उपपत्तीची नवीन मांडणी करून ज्ञान आहे, जाणीव आहे, अनुभूती आहे, हे कोणास नाकारता येण्याजोगे नाही. ईश्वर हा ज्ञानस्वरूप आहे म्हणूनच ज्ञानाची उपलब्धी सहजच आहे. कोणी म्हणतात आधी अचेतन, जड अस्तित्व होते; कालांतराने त्यात चैतन्याचा उदय झाला. परंतु हे म्हणणे सत्कार्यवादाला धरून बरोबर नाही. मूळच्या अस्तित्वात, सत्तेमध्ये चैतन्य नसेल तर

त्यातून चैतन्य निर्माण होण्याची सुतराम शक्यता नाही. म्हणूनच ज्ञानाच्या अस्तित्वामुळेच त्याचे अनादी असणे सिद्ध होते. ते ईश्वररूपच होय. सत्चे विश्लेषण सुरुवातीस करतानाच हे आपण पाहिले आहे. फरक एवढाच की तेथे सत्चे विश्लेषण करून त्यातील ज्ञान प्रकट केले. आता ज्ञानाच्या अनुभूत अस्तित्वावरून त्याचे अनादी सिद्धत्व सांगितले तेच ईश्वरत्व होय. दुसरे असे की ईश्वर हाच सर्वज्ञ, आदिगुरू असून त्याच्यापासूनच सर्वज्ञान प्रवाहित झाले आहे असे योगसूत्रांचे म्हणणे आहे. त्यामागील विचारधारा अशी की प्रमाणाचा अनुक्रम सामान्यत: मानतो त्याप्रमाणे प्रत्यक्ष, अनुमान, शब्द असा नसून शब्द, प्रत्यक्ष, अनुमान असा क्रम आहे. एखाद्या नवजात मुलाशी आई अथवा इतर कोणत्याही व्यक्तीचा संपर्क बोलण्याने साधला नाही तर त्याला आपसूकपणे प्राप्त झालेल्या आपल्या ज्ञानेंद्रियांचा काही सार्थ उपयोग करता येणार नाही. वारंवार आई त्याच्याशी बोलून बालकाच्या डोळ्यांना जे दिसते, कानांना जे ऐकू येते, त्यांची शब्दाने ओळख करून देते. 'हे बाबा, ही ताई, हा घोडा, ही घंटा' इ. या शब्दांशिवाय बाळाला नुसत्या संवेदना होत राहतील, पण त्याची प्रत्यक्ष प्रमाणरूप ज्ञानामध्ये परिणती होणार नाही. शब्दामुळे प्रत्यक्षाला जाग येते. नंतर अनुमान प्रमाणाचा उपयोग करता येतो. म्हणून प्रथम शब्द, नंतर प्रत्यक्ष, त्यानंतर अनुमान असा हा क्रम सहजच असतो. म्हणूनच आई हा मानवी बालकाचा आद्य गुरू, पण आईही कधी बालक होती. तिची आई, तिची आई अशी गुरुपरंपरा जेथून सुरू होते त्या मानवजातीच्या किंवा सर्वच जिवांच्या आद्यगुरूला ईश्वर म्हणतात. 'एव पूर्वेषामपि गुरु: कालेन अनवच्छेदात । तत्र निरतिशयं सर्वज्ञत्व बीजम् ।।' अशी ती योगसूत्रे सर्वज्ञ ईश्वराची सिद्धी करतात. पशूंच्या ठिकाणी सहज उपलब्ध असलेल्या उपजत ज्ञानाचा स्रोत शेवटी ईश्वरच आहे. 'वेदान्तही पढविता आद्यगुरु तू' हा ज्ञानेश्वर माऊलीचाही अभिप्राय आहे. 'ज्ञान आणि ज्ञानाला प्रामाण्य देणारा ईश्वरच आहे' (परामर्श- लेखक - अ. ग. जावडेकर).

'आपल्या येथे वेदकाळापासूनच ईश्वर संकल्पना अव्याहतपणे चालू आहे. ईश्वराचे अस्तित्व कोणत्यातरी रूपात सर्वांनी स्वीकारले आहे. उदयनाचार्यांनी आपल्या न्यायकुसुमांजली नावाच्या ग्रंथातील प्रस्तावनेत म्हटले आहे की वेदान्ती शुद्ध, बुद्ध, मुक्त स्वभाव असलेला ईश्वर मानतात. तर 'आदिविद्वान सिद्ध' असे सांख्य म्हणतात. तर योगी 'पुरुषविशेष' मानतात, 'निर्लेप' आणि 'स्वतंत्र' म्हणून पाशुपत त्याची स्तुती करतात, तर शैव त्याला 'शिव' म्हणतात. याज्ञिकांच्या दृष्टीने तो 'यज्ञपुरुष' आहे. तर बौद्धांच्या मते 'सर्वज्ञ' आहे. दिगंबर त्याला 'निरावरण' म्हणून भजतात. तर मीमांसक

त्याला ‘उपास्य’ म्हणून स्वीकारतात. तोच ‘ईश्वर’ आहे, तर नैयायिकांच्या मते तो ‘सृष्टिकर्ता, सर्वज्ञ, परमात्मा’ आहे. किंबहुना सुतार इत्यादी ज्याची ‘विश्वकर्मा’ म्हणून उपासना करतात अशा ईश्वराविषयी संदेहच कोठून?’ (ले. ब. ह. शुक्ल).

आता ‘देव’ कोणास म्हणावे याविषयी रामदास स्वामी काय म्हणतात तेही पाहणे आवश्यक आहे.

*देव कोणासी म्हणावे । कैसे तयासी जाणावे । तेचि बोलणे स्वभावे । बोलिजेल ॥*
*जेणे केले चराचर । केले सृष्ट्यादि व्यापार । सर्वकर्ता निरंतर । नाम ज्याचे ॥*
*तेणे केल्या मेघमाळा । चंद्रबिंबी अमृतकळा । तेज दिधले रविमंडळा । जया देवे ॥*
*ज्याची मर्यादा सागरा । जेणे स्थापिले फणिवरा । जयाचेनि गुणे तारा । अंतरिक्ष ॥*
*च्यारी खाणी च्यारी वाणी । चौऱ्यांशी लक्ष जीवयोनी । जेणे निर्मिले लोक तिनी ।*
*तया नांव देव ॥ ब्रह्मा विष्णु आणि हर । हे जयाचे अवतार ।*
*तोचि देव हा निर्धार । निश्चयेसी ॥*
*देवे निर्मिली हे क्षिती । तिचे पोटी पाषाण होती । तयासचि देव म्हणती । विवेकहीन ॥*
*जो सृष्टि निर्माण कर्ता । तो ये सृष्टि पूर्वी होता । मग हे तयाची सत्ता । निर्माण झाली ॥*

*(दासबोध-निवडक ओव्या, दशक ८, समास १).*

अशा प्रकारे ‘ईश्वर’ आहे असे सिद्ध होत आहे. कदाचित त्याचे नाव, रूप, पोषाख, पूजाअर्चा करण्याची पद्धत वेगवेगळी असेल. पण प्रत्येकाची कोठेतरी श्रद्धा असते, असणे आवश्यक आहे आणि तीच श्रद्धा त्याला फळ देत असते हे निश्चितच.

परमेश्वरापासूनच या सृष्टीची निर्मिती झालेली आहे. या सृष्टीनिर्मितीचे वैज्ञानिक स्पष्टीकरण कसे आहे व त्याचप्रमाणे आपल्या वेदांतून, पूर्वीच्या ग्रंथांतून व संतमहात्मे यांनी आपल्या ग्रंथांतून सृष्टीनिर्मितीचे स्वरूप कसे वर्णन केले आहे हे पाहता शब्द वेगळे असतील पण रीत तीच आहे असे दिसते.

## आत्मा कसा आहे?

‘ईश्वरा’ची सिद्धी झाली. ईश्वर हा जगाचा निर्माता व नियंता आहे. पण त्याचबरोबर ‘आत्मा’ म्हणूनही एक वस्तू आहे की तोच ईश्वर आत्मरूपाने या जगतामध्ये प्रत्येक प्राणीमात्राच्या ठिकाणी वास करीत असून सर्व सृष्टीचा उपभोग घेत आहे असे म्हटले आहे. ‘एकोऽहं बहुस्याम् ।’ या संकल्पाने ईश्वरच आत्मरूपाने अवतरला आहे असे जे

म्हणतात तो 'आत्मा' म्हणजे काय व कसा आहे याविषयी माहिती असणे आवश्यक आहे. म्हणजे ईश्वराचे संपूर्ण स्वरूप स्पष्ट होण्यास मदत होईल. चराचरात परमेश्वर कशा प्रकारे भरून राहिला आहे व आत्मरूपाने तो काय कार्य करतो याचाही उलगडा होईल असे वाटते.

''जरा शांतपणे विचार केला तर असे दिसून येईल की जगाकडे पाहण्याची ही भौतिक दृष्टीच एकांगी, अवास्तव व क्वचित प्रसंगी अघोरी आहे. या जगात जे भव्य, दिव्य, आणि मंगल आहे आणि ज्याच्यासाठी अनेक महात्म्यांनी आपले जीवन झिजवले आहे ते या भौतिक शास्त्राच्या कक्षेत येत नाही. गीता, बायबल, कुराणादी धर्मग्रंथांत जीवनाला उदात्ततेची प्रेरणा देणारे संदेश, मानवतेच्या सेवेपासून होणारे समाधान सत् चित् आनंद याचा प्रतीक मानलेल्या ईश्वराला जीवन समर्पित केल्याने काहींना जो आनंद प्राप्त होतो, तो आनंद यांपैकी काहीही शुष्क भौतिक नियमांनी बद्ध असलेल्या वैज्ञानिकांच्या सृष्टीत सापडणार नाही. कारण त्यांच्या सुखाची कल्पना भौतिक व इंद्रियगोचर सुखाच्या पलीकडे जातच नाही. झरतुष्ट्र, जीझस, महंमद, शंकराचार्य, रामकृष्ण परमहंस आदी महामनांना जो ईश्वर साक्षात्कार झाला असे मानले जाते तो तुम्हां-आम्हांला होत नाही म्हणून विवाद्य मानून जरा बाजूला ठेवला तरी मानवतेच्या मंदिराची उभारणी करण्याकरिता भव्य, दिव्य, मंगल सद्‌गुण एकत्र आले पाहिजेत. त्याचे प्रतीक म्हणून ईश्वराची संकल्पना मान्य करण्यास काहीच हरकत असू नये. याचमुळे व्होल्टेअरने म्हटले आहे की ईश्वर प्रत्यक्षात नसला तरी मानवाच्या हितासाठी ईश्वराची संकल्पना निर्माण करणे आवश्यक आहे. (If God does not exist, it would be necessary to invent him) व्होल्टेअरच्या मतांना ईश्वरविषयक संदर्भात विशेष किंमत आहे. कारण तो भौतिकवादाला उचलून धरणाऱ्या फ्रेंच प्रबोधन युगाचा (Age of french enlightenment) एक जनक होता. भौतिकवादाने भारावलेल्या वातावरणातदेखील त्याला ईश्वरावरील श्रद्धेची आवश्यकता वाटली, हे ध्यानात घेण्यासारखे आहे. साहजिकच पुढचा प्रश्न असा निर्माण होतो की ईश्वराचा साक्षात्कार होईल तरी कोणाला व त्यासाठी काय केले पाहिजे? कठोपनिषदाने दिलेले उत्तर हेच या प्रश्नाचे अखेरचे उत्तर आहे. त्या उपनिषदाचा वल्ली २-२३चा मंत्र खालीलप्रमाणे आहे. (त्यात आत्म्याचा अर्थ जीवात्मा नसून ईश्वर आहे. उपनिषदात बहुतेक सर्व ठिकाणी आत्मा याचा अर्थ ईश्वर असाच आहे.)

*'नायमात्मा प्रवचनेन लभ्य: न मेधया न बहुना श्रुतेन ।*
*यमेवैष वृणुते तेन लभ्य: तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्याम् ॥*

अर्थ : हा आत्मा म्हणजे वाक्चातुर्याने (व्याख्यानाने), यज्ञाने किंवा धर्मग्रंथांच्या अध्ययनाने प्राप्त होत नाही. ज्याच्यावर ईश्वर कृपा करतो त्यालाच तो प्राप्त होतो या कृपाप्राप्त माणसापुढे ईश्वर आपणहून प्रकट होतो.

हाच मंत्र मंडुकोपनिषद २-३मधे पुनरुद्‌धृत करण्यात आला आहे. ईश्वर-साक्षात्कार कोणाला होतो, एवढेच सांगून कठोपनिषद थांबले नाही. आत्मा म्हणजे ईश्वर या संकल्पनेच्या अनेक अंगोपांगांची त्याने चर्चा केली आहे व त्याची अनेक वैशिष्ट्ये दाखविली आहेत. आत्म्याचे अस्तित्व सिद्ध करण्यास तर्कशास्त्र असमर्थ आहे असे २-८ मधील मंत्राच्या शेवटच्या चरणात त्याने खालील शब्दात मांडले आहे–

*'अतर्क्यमणुप्रमाणात्'*

अर्थ : आत्मा अणूसारखा लहान असल्यामुळे तर्काने त्याचे ज्ञान होत नाही.

जर्मन तत्त्वज्ञ कांट याचेही मत असे होते की तर्कशास्त्राच्या कोणत्याही प्रमाणांनी ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करता येत नाही. हीच कल्पना पुढील म्हणजे ९ नंबरच्या मंत्रात कठोपनिषदाने खालील शब्दांत स्पष्ट केली आहे.

*'नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्ताऽन्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ ।'*

अर्थ : आत्मज्ञान देणारी बुद्धी तर्काने साध्य होत नाही. ती दुसऱ्या आत्मज्ञानी माणसाकडूनच मिळवावी लागते.

आत्म्याच्या स्वरूपाचे वर्णनदेखील कठोपनिषदात अनेक मंत्रांतून अतिशय सुबोध शब्दांत करण्यात आले आहे. वल्ली ३-१२चा मंत्र म्हणतो.–

*एष सर्वेषु भूतेषु, गूढोऽऽत्मा न प्रकाशते ।*
*दृश्यते त्वग्रयया बुद्‌ध्या, सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥*

अर्थ : सर्वत्र गुप्तपणे वास करणारा हा आत्मा कोणालाही ज्ञात होत नाही. तो केवळ सूक्ष्म विचार करणाऱ्यांना सूक्ष्म बुद्धीने ज्ञात होतो.

सर्वसाधारण ज्ञानेंद्रियांना आत्मा का ज्ञात होत नाही याचे एक मानसशास्त्रीय स्पष्टीकरणदेखील वल्ली ४-१ व २मध्ये खालीलप्रमाणे देण्यात आले आहे.

*'पराङ्चि खानि व्यतृणत् स्वयम्भू: तस्मात् पराङ् पश्यति नान्तरात्मन् ।*
*कश्चिद्धीर: प्रत्यगात्मानमैक्षदावृत्त चक्षुरमृतत्त्वमिच्छन् ॥*

*पराच: कामाननुयन्ति बाला: ते मृत्योर्यान्ति विततस्य पाशम् ।*
*अथ धीरा अमृतत्वं विदित्वा, ध्रुवमध्रुवेष्विह न प्रार्थयन्ते ॥'*

अर्थ : परमेश्वराने इंद्रियांना बहिर्मुख केले आहे. त्यामुळे अंतर्यामी वसत असलेल्या आत्म्याला ती पाहू शकत नाहीत. ईश्वरसाक्षात्कारासाठी उत्सुक असलेला एखादा बुद्धिमान पुरुष मात्र इंद्रियांना अंतर्मुख करून आत पाहतो व ईश्वरसाक्षात्कार प्राप्त करून घेतो. मूर्ख लोक बहिर्गत विषयांच्या मागे लागतात व मृत्युपाशांनी बांधले जातात. बुद्धिमान लोक मात्र अमृतत्व म्हणजे ईश्वरैक्य चिरकालीन आहे हे ओळखून इहलोकीच्या अनिष्ट गोष्टीची इच्छा करीत नाहीत.

ईश्वरसाक्षात्कारासाठी इंद्रियांना अंतर्मुख करण्याप्रमाणेच शीलवर्धनाचीही आवश्यकता आहे. वल्ली ६-९चा मंत्र हा खालीलप्रमाणे स्पष्ट करतो.

*न संदृशे तिष्ठति रूपमस्य, न चक्षुषा पश्यति कश्चनैनम् ।*
*हृदा मनीषा मनसाऽभिक्लृप्तो, य एतद्विदुरमृतास्ते भवन्ति ॥*

अर्थ : आत्म्याचे रूप दिसू शकत नाही. नेत्रांनी कोणी त्याला पाहू शकत नाही. मनाचे नियमन करणाऱ्या बुद्धीने म्हणजे शुद्ध व संयमी मनाने तो जाणता येणे शक्य आहे. हे जे जाणतात ते अमर होतात.

शुद्ध व संयमी मनाप्रमाणेच ईश्वरसाक्षात्कारासाठी वासनाक्षय करणे आवश्यक आहे. वल्ली ६-४ याबाबत म्हणतो की–

*यदा सर्वे प्रमुच्यन्ते, कामा येऽस्य हृदि श्रिता: ।*
*अथ मर्त्योऽमृतो भवति, अन्नब्रह्म समश्नुते ॥*

*(तसेच बृहदा. ४.४-७ पाहा).*

अर्थ : हृदयात वास करणाऱ्या सर्व इच्छांचा मानव जेव्हा त्याग करतो, तेव्हा तो अमृतत्व पावतो व ब्रह्मत्वाला पोहोचतो.

याचा अर्थ ईश्वरसाक्षात्कारासाठी वासनाक्षय, इंद्रियदमन व शीलसंवर्धन करून इंद्रियांना अंतर्मुख केले पाहिजे. इतके करूनही ईश्वराची कृपा असणे आवश्यक आहे (यमेव एष वृणुते ।) ते वेगळेच. ध्यानधारणादी योगसाधनांचा अवलंब न करताही या

मार्गाने ईश्वरसाक्षात्कार होऊ शकेल. योगसाधनांची माहिती नसलेल्या अनेकांना या मार्गाने साक्षात्कार झाला आहे. आत्म्याची काही वैशिष्ट्ये वल्ली २-१८, २-२०, २-२२, ५-१३, ६-१२ व ६-१७ मध्ये पाहावयास मिळतात. ती खालीलप्रमाणे- (कठोपनिषद्)

*न जायते म्रियते वा कदाचिन्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।*
*अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो, न हन्यते हन्यमाने शरीरे ॥*

*(भ. गीता २-२०).*

अर्थ : हा आत्मा कधी उत्पन्न होत नाही व कधी नाशही पावत नाही. हा कशापासून उत्पन्न झालेला नाही किंवा स्वतःपासून वेगळाही झालेला नाही. हा जन्मातीत व नित्य आहे. शरीराचा नाश झाला तरी हा नाश पावत नाही.

थोडक्यात म्हणजे हा जन्ममरणातीत व शाश्वत आहे.

*अणोरणीयान्महतो महीयानात्माऽस्य जन्तोर्निहितो गुहायाम् ।*

*(२-२०).*

अर्थ : अणूपेक्षाही सूक्ष्म व मोठ्यात मोठा असा हा आत्मा सर्व प्राणिमात्रांच्या हृदयात निवास करतो.

*अशरीरं शरीरेष्वनवस्थेष्ववस्थितम् ।*
*महान्तं विभुमात्मानं, मत्वा धीरो न शोचति ॥*

*(२-२२)*

अर्थ : शरीरात निवास करूनही शरीररहित असलेल्या महान आणि व्यापक आत्म्याला जाणले असता बुद्धिमान मनुष्य शोकरहित होतो.

*नित्योऽनित्यानां चेतनश्चेतनानां, एको बहूनां यो विदधाति कामान् ।*
*तमात्मस्थं येऽनुपश्यंति धीरास्तेषां शान्तिः शाश्वती नेतरेषाम् ॥*

*(५-१३).*

अर्थ : अनित्य वस्तूंमध्ये राहूनही जो नित्य आहे, जो चैतन्यशील वस्तूंना चैतन्य देणारा आहे, एकच असून जो अनेकांना वासना देतो, त्या आपल्या अंतर्यामी वसत असलेल्या आत्म्याला जे विचारवंत जाणतात त्यांना चिरंतन शांती लाभते, इतरांना नाही.

*नैव वाचा न मनसा, प्राप्तुं शक्यो न चक्षुषा ।*
*अस्तीति ब्रुवतोऽन्यत्र, कथं तदुपलभ्यते ॥*

*(६-१२).*

अर्थ : वाचा, मन, नेत्र इत्यादी इंद्रियांकडून आत्मा जाणला जात नाही. परंतु त्याचे अस्तित्व मान्य करणाऱ्यांशिवाय इतरांना तो कसा प्राप्त होऊ शकेल?

*अङ्गुष्ठमात्रः पुरुषोऽन्तरात्मा सदा जनानां हृदये सन्निविष्टः ।*

*(११६-१७).*

अर्थ : मानवाच्या हृदयात सतत निवास करणारा अंगठ्याएवढा पुरुष म्हणजे अंतरात्मा.

कठोपनिषदाने आत्म्याचे म्हणजे ईश्वराचे केलेले हे वर्णन भारतीय अध्यात्मशास्त्राचा पाया बनले आहे. आत्मा इंद्रियगोचर नाही, तो जन्ममरणातीत आहे, त्याचे ज्ञान तर्काने होत नाही. तो सर्वात सूक्ष्म व सर्वात मोठा आहे. हृदय हे त्याचे निवासस्थान आहे. ईश्वरसाक्षात्कारासाठी तळमळणाऱ्या शुद्ध चरित्र्याच्या व वासनारहित माणसांनाच त्याचा साक्षात्कार होण्याची शक्यता आहे. इतके सर्व झाले तरी अखेर ईश्वरच आपल्या साक्षात्काराची कृपा कोणावर करावयाची हे तो ठरवीत असतो व तो ज्यावर कृपा करतो त्यालाच तो प्राप्त होतो. असे आहे त्याचे थोडक्यात वर्णन–

अतिप्राचीन काळी कठोपनिषदाने आत्म्याबद्दल मांडलेले बहुतेक सर्व सिद्धांत गीतेने स्वीकारले आहेत व कित्येक तर जसेच्या तसे पुनरुद्धृत केले आहेत. आत्म्याबद्दलचे हे सिद्धांत पाश्चात्त्यांच्या नजरेस १८व्या व १९व्या शतकात आले. थोडीशी खळखळ केल्यानंतर आता त्यांच्यापैकी चिद्वादी (Idealist) म्हणविणारे काही लोक हे सिद्धांत मान्य करू लागले आहेत. त्यांच्यापैकी कोणीही आत्म्याबद्दल म्हणजेच ईश्वराबद्दल इतका सखोल व सर्वांगीण विचार केलेला नाही. उपनिषदे व गीता यांप्रमाणे ज्ञानेश्वरांनीही आत्म्याबद्दलचे संशोधन आपल्या अमृतानुभव या तत्त्वविवेचक ग्रंथात केले आहे. प्रत्यक्ष, उपमा, अनुमान व शब्द या तर्कशास्त्रातील चारही सर्वमान्य प्रमाणांनी आत्म्याचे अस्तित्व सिद्ध करता येत नाही. हे त्यांनी सरळ भाषेत अमृतानुभवाच्या ५-५४मध्ये खालीलप्रमाणे मांडले आहे.

*एवं प्रमाणे अप्रमाण । पण केले प्रमाण ।*
*दृष्टांती वाइली आण । दिसावयाची ॥*

अर्थ : ही सर्व म्हणजे चारही प्रमाणे व दृष्टांत यांनी शपथेवर सांगितले आहे म्हणजे स्पष्टपणे मान्य केले आहे की, आम्हांला आत्म्याचे वर्णन करता येत नाही. अशा प्रकारे ज्ञानेश्वरांनी कठोपनिषदाचे सर्व सार याच ओवीत मांडले आहे.

ज्ञानेश्वर हे ईश्वरावर नितांत प्रेम करणारे, अद्वैतवादी व भक्तिमार्गी साधक होते, हे सर्वश्रुतच आहे. भारतीय तत्त्वज्ञानात आत्मा म्हणजेच ईश्वर हा अज्ञात व अवर्णनीय आहे. पाश्चात्त्यांच्या आत्म्याबद्दलच्या कल्पना अगदी अलीकडे म्हणजे तेराव्या शतकापासून स्पष्ट होऊ लागल्या आहेत व आता तर भारतीयांचे आत्म्याबद्दलचे बहुतेक सर्व सिद्धांत मान्य करण्यास त्यांनी सुरुवात केली आहे. त्यांच्या 'सोल' व 'माइंड' या दोहोंपेक्षाही अधिक मूलगामी व अधिक सर्वस्पर्शी अशी भारतीयांची आत्म्याबद्दलची कल्पना आहे. असा हा युगानुयुगे चाललेला ईश्वराचा शोध आहे.

## सृष्टीची निर्मिती

सृष्टीच्या निर्मितीचा विचार करता दोन भाग पडतात. एक वेदकालीन सृष्टीनिर्मितीचे वर्णन व दुसरा वैज्ञानिकांनी सृष्टी निर्मितीचा मांडलेला सिद्धांत. वेदकालीन ऋषींनी सृष्टीनिर्मितीचा विचार करताना सृष्टीनिर्मितीचा– पुनरावृत्तीचाच केवळ विचार केला आहे असे नव्हे तर प्रथम प्रलयापूर्वी सृष्टीनिर्मितीची सुरुवात कशी झाली असावी याचाही विचार केला आहे, असे नासदीय सूक्ताच्या श्री. राजवाडे यांनी केलेल्या विवेचनावरून दिसते. त्यामुळे सृष्टीनिर्मितीच्या मुळापाशी जाऊन ऋषींनी सृष्टीनिर्मितीच्या क्रमाची शक्यता स्पष्ट केली आहे. त्यास आता इतका काळ लोटून गेला तरी कोणाही भारतातील विद्वांनानी त्यात काहीही बदल सुचवलेला नाही. गेल्या शतकापासून पाश्चात्त्य शास्त्रज्ञांनी सृष्टीनिर्मिती विषयात रस घेऊन त्यात काही संशोधन केले आहे व काही वेगवेगळे सिद्धांत प्रसिद्ध केले आहेत (त्यांतील काहींची चर्चा पुढे येईलच) पण अजूनही त्या सिद्धांतांबाबत सर्वांमध्ये एकमत होत नाही. Big Bang नावाचा एक सिद्धांत सध्या जास्त विचारात आहे. एका प्रचंड महास्फोटानंतर या सृष्टीच्या निर्मितीला सुरुवात झाली असून त्याच्या कालमर्यादेचा एक तक्ताही त्यांनी प्रसिद्ध केला आहे. तरीही तो त्यांचा केवळ अंदाज आहे. शिवाय तो महास्फोट कशाचा झाला याचे उत्तरही कोणाकडे नाही. तर काहींच्या खुलाशामध्ये असे आले की

जशी एखादी वस्तू विखुरली गेली याचा अर्थ त्याच वस्तूंचे संगठन त्या एका ठिकाणी पण अगदी सूक्ष्म रूपात एकत्रित होते. जेव्हा त्या संगठनामध्ये होणाऱ्या स्वाभाविक प्रक्रियेने निर्माण होणारी ऊर्जा त्यामध्ये मावेनाशी झाली त्याच वेळी त्याचा स्फोट झाला असावा व त्यापुढे त्यातूनच सृष्टीची निर्मिती झाली. याविषयी 'आकाशाशी जडले नाते'मध्ये लेखक श्री. जयंत नारळीकर म्हणतात,

१) "विश्वाचा आरंभ महास्फोटात झाला असे म्हटले तर हा स्फोट कुठल्या कारणामुळे झाला, अमुकवेळीच का झाला, स्फोट होण्यापूर्वी कशाचे अस्तित्व होते इत्यादी प्रश्नांची उत्तरे महास्फोटाच्या सिद्धांतात नाहीत.

२) विश्वात पदार्थ प्रथम कसे अस्तित्वात येतात याची महास्फोटाच्या सिद्धांतात माहिती मिळत नाही.

३) महास्फोटाच्या क्षणी अवकाशकालाची भूमिती अशा विचित्र स्थितीत होती की तिचे गणितीय वर्णन करणे शक्य होत नाही. कारण सर्व समीकरणे त्या क्षणी मोडकळीस येतात. एखाद्या भौतिकशास्त्रीय सिद्धांतात अशा प्रकारची विशिष्ट परिस्थिती येणे हा त्या सिद्धांताचा दोष समजला जातो."

या ठिकाणी दोनही सिद्धांतांचे विवेचन दिले आहे. कारण काही एका विशिष्ट टप्प्यापासून काही विशिष्ट टप्प्यापर्यंत दोनही सिद्धांत सारख्या क्रमाने चालले आहेत. सृष्टीनिर्मितीचा विचार हा या निर्माण झालेल्या सृष्टीत या सृष्टीचा अनुभव घेतलेल्या व सृष्टीनिर्मितीविषयी विचार करण्याची क्षमता असलेल्या विद्वानांकडूनच होऊ शकणारा आहे. वेदकालीन ऋषींनी ध्यानामध्ये, समाधीच्या निर्विकल्प अवस्थेमध्ये, मनाच्या निर्विकारी अवस्थेमध्ये जे जाणले ते सिद्धांत मांडले. असे म्हणतात की, अशा अवस्थेमध्ये जे ज्ञान होते ते शुद्ध व बरोबरच असते. पण तर्काने, भौतिक साधनांच्या आधारे जे विधान केले जाते, सिद्धांत मांडले जातात ते शंभर टक्के बरोबर नसतात. त्यात वैयक्तिक संस्कारांचा, ज्ञानाच्या क्षमतेचा, सभोवतालच्या परिस्थितीचा, भौतिक साधनांच्या अपरिपूर्णतेच्या अवस्थेचा बराचसा भाग असतो. त्यामुळे शास्त्रज्ञांनी मांडलेल्या कोणत्याही प्रकारच्या सिद्धांतामध्ये पुढे पुढे हळूहळू बदल होत गेले आहेत. अर्थात हा काही कोणाचा दोष नाही. फक्त कार्यपद्धतीचे दिग्दर्शन आहे व त्यातून ज्ञान हे विज्ञानाची पुढची व वरची पायरी आहे असे दिसते.

तेव्हा वेदामधील नासदीय सूक्तामध्ये म्हणजे श्री. राजवाडे यांनी या सूक्तांचे जे विवेचन केले आहे तो भाग येथे प्रथम दिला आहे व त्यानंतर बिग बँग

(Big Bang) विषयीचा भाग वर्णन केला आहे. तसेच आणखी काही सिद्धांतांचा विचार येथे केला आहे.

## नासदीय सूक्ते

*नासदासीन्नो सदासीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमा परोयत् ।*
*किमावरीवः कुह कस्य शर्मन्नम्भः किमासीग्दहनं गभीरम् ॥१॥*

अर्थ : सृष्टीच्या मूलारंभी असत् आणि सत् तसेच अंतरिक्ष आणि आकाश यांपैकी काहीच अस्तित्वात नव्हते. अशा स्थितीत कोणी कोणाला आवरण घातले? कोणाच्या सुखासाठी हे सारे झाले? अगाध जल तरी त्या काळी अस्तित्वात होते काय? (दुसऱ्या ऋचेचा अर्थ) – त्या काळी मृत्यू (मृत्युग्रस्त नाशवंत सृष्टी) नसल्याने 'अमृत'ही (अविनाशी पदार्थ) अस्तित्वात नव्हते. अहोरात्रीविभेदक काही साधन नव्हते. तत्कालीन अबोध सृष्टी स्वबलाने वायूशिवायच श्वासोच्छ्वास करीत स्फुरत होती. त्याखेरीज अथवा त्यापलीकडे अन्य काहीच नव्हते. (तिसऱ्या ऋचेचा अर्थ) – समस्त जल तमोव्याप्त आणि भेदाभेदविरहित असून तपमहिम्याने प्रकट झालेले सर्वव्यापी ब्रह्म (आभु) फोल मायेने (तुच्छ) आच्छादिले होते.

*कामस्तदग्रे समवर्तताधि मनसो रेतः प्रथमं यदासीत् ।*
*सतो बन्धुमसति निरविन्दन् हृदि प्रतीष्या कवयोमनीषा ॥४॥*

अर्थ : (ब्रह्माच्या मनोबीजातून सर्वप्रथम काम (सृष्टीनिर्माण प्रवृत्ती) उत्पन्न झाली. मूळ परब्रह्माच्या (असत्) विनाशी आणि दृश्य सृष्टीशी (सत्) जडलेला हा पहिला संबंध होय.

पाचव्या ऋचेचा अर्थ : सत् आणि असत् यांमधील हा धागा (रश्मी) खालपासून वरपर्यंत आडवा पसरला. त्या धाग्यापैकी काही भाग बीजप्रद (रेतोधा) होऊन मोठा झाला. या धाग्याचीच 'स्वशक्ती' अलीकडे आणि 'प्रभाव' (प्रयति) पलीकडे पसरली.

सहाव्या ऋचाचा अर्थ : 'सत्'चा हा पसारा (विसर्ग) कशापासून आणि कोठून उत्पन्न झाला, हे यापेक्षा अधिक विस्ताराने (प्र)कोण सांगू शकेल? 'सत्' सृष्टीच्या विसर्गानंतर उत्पन्न झालेल्या देवांनाही हे ज्ञात नाही. मग सृष्टी कोठून निघाली हे कोण जाणणार?

*इयं विसृष्टिर्यत् आवभूव यदि वा दधे यदि वा न।*

*यो अस्याध्यक्ष: परमे व्योमन् त्सो अङ्ग वेद यदि वा न वेद ॥७॥*

अर्थ : 'सत्'चा हा पसारा (विसर्ग) जेथून निर्मिला गेला ते स्थान आकाशनिवासी जगताध्यक्षास (हिरण्यगर्भ) कदाचित् ज्ञात असेल अथवा नसेलही.

सृष्टीनिर्मितीविषयीच्या नासदीय सूक्तातील काहीच ऋचांच्या संस्कृतसंहिता नमुन्यादाखल दिलेल्या आहेत पण सर्वांचे अर्थ फक्त दिलेले आहेत. या ऋचांचे श्री. राजवाडे यांनी जे विवेचन केले आहे त्याचाही अगदी संक्षिप्त भाग येथे देत आहे की, जेणेकरून त्या वेळच्या ऋषींना त्यांच्या द्रष्टेपणात जाणवलेले सृष्टीच्या उत्पत्तीच्या स्वरूपाचे वर्णन वाचून आपणास त्यांच्या द्रष्टेपणाच्या अचूकतेची कल्पना येऊ शकेल. असो.

"प्राग्जगत्काळी असत् नव्हते, सत् नव्हते, म्हणून रज नव्हते, परमव्योम नव्हते, म्हणून आवरक नव्हते, आवार्य नव्हते म्हणून आवरण कर्म नव्हते म्हणून स्थल नव्हते, निमित्त नव्हते, म्हणून व्यक्त नव्हते, अथवा अव्यक्त कसलेच गहन व गंभीर अंभ नव्हते.

जगदुत्पत्तिपूर्व अजगत्स्थितीत प्रकृती-पुरुषादी द्वंद्व नव्हते. सत्त्व, रज, तमादी त्रिगुण नव्हते, भूरंतरिक्षदिवादी त्रिलोक नव्हते, पृथ्वी - आप - तेज - वायू - आकाशादी पंचमहाभूते नव्हती, भोक्ता - भोग्य - भोगादी त्रिपुटी नव्हती, दिक्कालद्वय नव्हते, अधिष्ठान - कर्ता - करण - चेष्टादी कारणचतुष्टय नव्हते, अर्थात व्यक्ताव्यक्त कसलेच अंभरूप, तेजोरूप, वायुरूप वा आकाशरूप जगत्तत्त्व नव्हते.

जगदुत्पत्तीपूर्वी जे कसलेच गतिमत्व नव्हते ते गत्यगतिरूप किंवा गतिस्थितीरूप द्वंद्वाच्या पलीकडे निर्द्वंद्व होते, निरपेक्ष होते, निस्त्रैगुण्य होते, निस्त्रैलोक्य होते, पंचमहाभूतातीत होते, त्रिपुटीच्या पार होते, दिक्कालद्यनवच्छिन्न होते, निराधार होते, निष्क्रिय होते, निरूप होते, निर्मूर्त होते, निर्व्यक्त होते, म्हणून पूर्ण निर्जगत होते. वरील संक्षिप्त साराचे खालील विस्तृत विवेचन–

मूळारंभी 'असत्' नव्हते म्हणून 'सत्' नव्हते. म्हणून सत्‌भावाचे दर्शक 'रज' नव्हते. रज म्हणजे अंतरिक्ष. ते प्रत्यक्षाने जाणले जाते. तेच नाही तर त्यापलीकडे व्योम आहे किंवा नाही, कसे समजणार? म्हणून व्योम नव्हते. रज व व्योम या एकावर एक आवरक वस्तू होत. रज हे भूलोकाला आवरण घालते व व्योम रजाला आवरण

घालते. असे रज व व्योम नाही म्हणजे आवरकत्व नाही, अर्थात 'किं आवरीव: ।' = कोणी कोणाला आवरण घातले म्हणावे? 'किं' पदात आवरक व आवार्य दोन्ही ध्वनित होतात. म्हणून पृथ्वी, अंतरिक्ष व दिव हे तीनही लोक नव्हते. तीन लोक नाहीत व त्यांतील विषयी-विषय द्वंद्व नाही, मग कर्म तरी कसे घडणार? म्हणून कर्म नाही. म्हणून स्थल नाही, काल नाही व हेतू नाही. आता कोणी म्हणेल मूळारंभी पाणी होते व ते गहन गंभीर होते, तर पाणी तरी तेव्हा होते काय? अगोदर आवरकावार्यभाव म्हणून आवरणाभाव म्हणून प्रदेशाभाव, म्हणून निमित्ताभाव, या प्रकारे सर्व ब्रह्मांडाचाच जेथे अभाव तेथे त्यातील पाणी तरी कोठे व कसे असणार? म्हणून तेही नव्हते. तथापि मूळारंभी पाणी नव्हते हा सिद्धांत घेतला तर मूळारंभी पाणी होते 'आपो वा इदमग्रे सलिलमासित् ।' अशी श्रुतिवचने आहेत. यांची वाट काय? त्याचे उत्तर होते व नव्हते दोन्ही. जगताची उत्पत्ती मानली तर मूळारंभी पाणी होते व न मानली तर नव्हते. येथे प्रथमत: सदर पहिल्या ऋचेत प्राग्जगत्स्थितीचा विचार चालला आहे. त्या वेळी जगत् नव्हते तर जगतात सिद्ध होणारे काय असणार? अर्थात त्या वेळी सलिल काय, तेज काय किंवा आकाश काय, काहीच नव्हते. एकदा जगताच्या उत्पत्तीचा संकेत मानला की त्याचा आरंभ कोठे झाला? पाण्यात झाला, का तेजात झाला, का आकाशात झाला? हे प्रश्न आलेच. मॅक्सम्युलरने 'अंभ: किमासीग्दहनं गभीरं' याचा अर्थ Was it water, the profound abyss = ते पाणी होते काय, गहन गंभीर? असा केला आहे. हा अर्थ त्याने 'मूळारंभी पाणी होते' अशा वचनाच्या आधारे केला आहे. पण What water was it = ते कोणते पाणी होते? पुढे ऋचा तीनमध्ये सांगितलेले तमाने झाकलेले सलिल होते काय? असा अर्थ करणे अधिक सयुक्तिक आहे व त्याचे उत्तर जगदुप्पत्तीपूर्वीच्या केवळ अजगत् स्थितीत कसलेच पाणी नव्हते हे आहे. सायणाचार्यांनी मूळ पहिली उत्पत्ती व अवांतर प्रलयोत्तर उत्पत्ती असे भेद करून प्रलयोत्तर उत्पत्तीच्या अनुषंगाने 'आपो वा इदमग्रे सलिलमासीत् ।' ही श्रुतिवचने आहेत असा अभिप्राय दिला आहे. जगताची पुनरुत्पत्तीही आली. अशा पुनरुत्पत्तीच्या पूर्वीच्या स्थितीचे वर्णन आहे. अर्थात याच्याशी प्रलयोत्तर उत्पत्तीचे वर्णन जमणार नाही. हे उघड आहे. या प्रलयोत्तर उत्पत्तिवर्णनाचा नमुना पुढील ऋचात्मक सूक्तात उत्तम दृष्टीस पडतो.

*ऋतं च सत्यं चाभीद्धात्तपसोऽध्य जायत ।*
*ततो रात्र्यजायत तत: समुद्रो अर्णव: ॥१॥*

आपल्याच ठिकाणी तप्त असलेल्या किंवा सर्व बाजूंनी प्रकाशमान झालेल्या तपापासून ऋत आणि सत्य वगैरे प्रकर्षाने उदय पावले, त्यापासून पुढे रात्र जन्मास आली. त्यापासून पुढे पाण्याने युक्त असा समुद्र उत्पन्न झाला.

*समुद्रादर्णवादधि संवत्सरो अजायत ।*

*अहोरात्राणि व्यदधद्विश्वस्य मिषतो वशी ॥२॥*

पाण्याने युक्त अशा समुद्रानंतर त्यापासून पुढे संवत्सर उद्‌भव पावला. दिवस आणि रात्र या युग्माला धारण करणारा जो (धाता ब्रह्मदेव) तो दृष्टी उघडून पाहणाऱ्या सकल भूतमात्रांचा अधिपती झाला.

*सूर्याचंद्रमसौ धाता यथापूर्वमकल्पयत् ।*

*दिवं च पृथिवी चांतरिक्षमथो स्वः ॥३॥*

त्या धात्याने सूर्यचंद्रांना आणि तसेच तेजोमय द्युलोकाला, आणि पृथ्वीला आणि अंतरिक्षाला यथापूर्व म्हणजे पूर्वीप्रमाणेच निर्माण केले.

* 'येथे प्रलयोत्तर जगदुत्पत्तीचे वर्णन आहे म्हणून ही उत्पत्ती पूर्वी जशी अनेकवार घडली तशीच पुन: घडल्याचे शेवटच्या ऋचेत 'यथापूर्व' या पदात व्यक्त केले आहे.

---

* रामचरित्र सांगणाऱ्या काकमुशुंडीची कथा अशी आहे की, प्रभू रामचंद्र लहान असताना अंगणात त्यांची आई कौसल्यामाता त्यांना भात भरवत होती व त्या भातासाठी एक कावळा सारखा प्रभू रामचंद्रांजवळ जात होता. काही कामानिमित्त कौसल्यामाता घरात गेली असता हा कावळा प्रभू रामचंद्रांजवळ आला तेव्हा प्रभू रामचंद्रांच्या श्वासाबरोबर तो कावळा त्यांच्या पोटात गेला. त्याला तेथे सर्व ब्रह्मांडाचे दर्शन झाले. त्यातही त्याला प्रभू रामचंद्र अंगणात जेवत आहेत व तेथेही त्या कावळ्याने स्वत:ला पाहिले.

या कथेवरून व पुराणातील अनेक कथांवरून असे दिसते की पहिल्या सृष्टीच्या उत्पत्तीनंतर पुन्हा पुन्हा प्रथम जशी सृष्टीची निर्मिती झाली होती तशीच ती व त्याच पद्धतीने होत होती. त्याच क्रमाने सृष्टीचा विकास होत गेला व त्याच पद्धतीने प्रलयात तिचा नाश झाला असे 'यथापूर्वम् अकल्पयत्' या सूत्रावरून वाटते. याला समप्रमाण दृष्टांत द्यावयाचा झाला तर चित्रपटाचा देता येईल. एकदा चित्रपट तयार झाला की तो पुन्हा पुन्हा कितीही वेळा पाहिला तरी त्यातील प्रसंग, घटना, संभाषणे या त्याच त्याच व त्याच त्याच वेळेला घडणार यात शंका नाही. कदाचित ही कल्पना कोणाला पटणार नाही. पण प्रलयापूर्वीची सृष्टी कशी होती हे तरी आपणास कसे कळणार, समजणार? याचाही विचार केला तर उत्खननात अशा कितीतरी गोष्टी निघतात की ज्या आजच्या सुधारलेल्या जगामध्ये अस्तित्वात आहेत. त्या वस्तूंचे स्वरूप, नाव जरी वेगळे असले तरी त्यांचे कार्य मात्र तेच असते असे दिसते. असो.'

सृष्टी निर्माण करावयास तप करावे लागते. मूळ ब्रह्मालासुद्धा प्रथम जगत् निर्माण करण्यास तप करावे लागले, ही गोष्ट नासदीय सूक्ताच्या तिसऱ्या ऋचेतील शेवटच्या पादात नमूद आहे. तथापि अव्यक्त ब्रह्माला व्यक्त होण्याकरिता एकदाच तप करावे लागले. त्यानंतर पुढे सर्व सृष्टी त्या व्यक्त ब्रह्माने किंवा ब्रह्मदेवाने पुन: पुन: आपल्या तपाच्या महिम्याने चालविली. तपावाचून कोणतीच सिद्धी नाही हा महत्त्वाचा मुद्दा आहे. तपश्चर्या गतीत सिद्ध होते. गती नाही तर तप नाही. किंबहुना तप हा गतीचाच परिणाम होय. तथापि या प्रकारे तप जरी गतीत स्फुट होत असले तरी गतीला व्यक्तता तपात येते, म्हणून ब्रह्मदेवाने तप केले नाही तर जगताला व्यक्तता नाही. तप म्हणजे तापणे. तापणे म्हणजे उष्ण होऊन तेज प्रसवणे. कष्ट सोसल्यावाचून तप:सिद्धी नाही. तप नाही म्हणजे तेज नाही व तेज नाही म्हणजे प्रजा नाही. प्रजा म्हणजे प्रकृष्ट जन्म. स्वत:चा प्रकृष्ट जन्म स्वत:च्याच तेजात आहे व स्वत:चे तेज स्वेच्छेने घडणाऱ्या कष्टप्रद तपात आहे. म्हणून ब्रह्मदेवाने स्वेच्छेने तप केले आणि त्या तपात सर्व बाजूंनी प्रकाशमान होऊन त्याने आपणास जे प्रकर्षाने जन्मून घेतले, तेच जगत् झाले. सारांश जगताचा आरंभ वर पहिल्या ऋचेत म्हटल्याप्रमाणे 'अभीद्धात् तपस:' आहे. अभीद्धात् (अभी + इद्धात्) = १) अभितप्तात् किंवा २) अभित: प्रकाशमानात् 'अभीद्धात् तपस:' = आपल्या ठिकाणी तप्त असलेले जे तप त्यापासून किंवा सर्व बाजूंनी प्रकाशमान झालेले जे तप त्यापासून. हे तप कसे? तर आपल्याच ठिकाणी तापलेले. या तापलेल्या तपापासून जो तेजाचा प्रकर्ष होतो, त्यातच 'आकाश' म्हणजे सर्व बाजूंनी प्रकाशमान तत्त्व निर्माण होते, व त्यात अव्यक्त स्थितीतून जगताला व्यक्तता येते. या व्यक्ततत्त्वात प्रथम द्वंद्वाची स्फुटता होते. ते द्वंद्व येथे 'ऋत व सत्य' यात निर्दिष्ट केले आहे. 'ऋतं च सत्यं च' ऋत आणि सत्य वगैरे. 'ऋ' हा शब्द – 'ऋ' = हा गमन करणे, गतिमान होणे, या धातूपासून बनला आहे. अर्थात ऋत व सत्य हे शब्द अनुक्रमे गतीमत्व व स्थितीमत्व यांचे दर्शक आहेत. ऋत-सत्य-गती-स्थिती = Becoming = Being होणे, असणे, येथे गती अगोदर व स्थिती नंतर असा निर्देश आहे. कारण जगतातच सिद्धी होणाऱ्या ज्ञानाला प्रथम साक्षात्कार गतीचा येतो आणि नंतर गतीवरून स्थितीचा येतो. या प्रकारे ऋत, सत्य हे द्वंद्व आहे. जगदुत्पत्तीत हे द्वंद्व प्रथम निर्माण झाले आणि नंतर पुढे पंचमहाभूतादी सृष्टीचा पसारा वाढला. असा सृष्टीचा पसारा दुसऱ्याच पदात ध्वनित केला आहे व हे सर्व 'अध्यजायत' असे म्हटले आहे. अध्यजायत (अधि + अजायत) = उपर्य जायत, प्रजायत = उंच, प्रकर्षाने जन्म पावले. सृष्टीच्या उत्क्रांतीतील ऊर्ध्व गतीला किंवा प्रगतीला धरून हे वर्णन आहे.

ब्रह्मदेवाने जे तप केले ते इतके अभितप्त झाले की त्यापासून समंतात प्रकाश पडला व त्या प्रकाशात हे जगत् उंच गतीने प्रस्फुट झाले.

आता तप म्हटले की तेथे उष्णता आली आणि उष्णता आली की तिच्या मागे पाणी आलेच. म्हणून गोपथ ब्राह्मणाच्या आरंभी ब्रह्माने तप केले. त्यायोगे त्याच्या अंगातून घामाच्या धारा वाहू लागल्या असे वर्णन आहे. हेच मूळ जगदारंभीचे आद्य 'अर्णः' किंवा पाणी होय. या एकच एक अर्णाने मूळारंभी जे संपूर्ण ब्रह्मांड भरून गेले त्याला उद्देशून येथे 'अर्णवः समुद्रः' म्हटले आहे. 'अर्णवः समुद्रः' म्हणजे पाण्याने युक्त समुद्र असा अर्थ सायणाचार्याने दिला आहे. नुसता समुद्र घेतला तर त्याचा अर्थ अंतरिक्ष होईल. म्हणून त्याला अर्ण = पाणी, त्यापासून मूळ रूप अर्णसः = पाण्याने युक्त यातील 'स'चा लोप होऊन आणि मत्वर्थी 'व' प्रत्यय लागून जे 'अर्णवः' विशेषण होते ते जोडले आहे. असे त्याने त्यावर निर्वचन केले आहे. 'अर्णवः' म्हणजे गतिमत्वाने युक्त. गतिमान पदार्थाने म्हणजे वाहणाऱ्या पाण्याने युक्त. 'समुद्रः' हा शब्द सम् (सह. बरोबर) + उत् (ऊर्ध्व-वर) रः (गती, वेग) या तीन पदांच्या संयोगात सिद्ध झाला आहे. त्याचा अर्थ ऊर्ध्व गतीबरोबर साहचार्याने असणारा किंवा ऊर्ध्व वेगाबरोबर चालणारा असा आहे. म्हणून वेगवान पाण्याच्या उंच बळावणाऱ्या लाटांबरोबर साहचाऱ्याने असणारा. ईशावास्योपनिषदातील पहिल्या मंत्राच्या पहिल्या चरणात जे 'जगत्यां जगत्' म्हणून म्हटले आहे तेच हे गतीला ऊर्ध्व धारण करणारे जगत् होय. हे जगत् प्रकट होण्यापूर्वी तमाने व्याप्त होते कारण गतीचे प्राकट्य तेजात आहे. म्हणून येथे ऋत सत्याचा द्वंद्वानंतर प्रथम रात्र निर्माण झाली असे म्हटले आहे. ही रात्र पुढे अहोरात्रीचे जे युग्म निर्दशित केले आहे, त्यातील रात्र नव्हे, तर ही रात्र गतीला अव्यक्त भावात ठेवणारी आदितमिस्रा (Primeval darkness) होय. पण त्या जगतातील गतीचा प्रकर्ष होऊन जेव्हा त्या तमाचा प्रतियोगी काश समंतात् विनटला तेव्हा त्या आकाशात 'अर्णवः समुद्रः' म्हणजे गतिमान जगत् 'अध्यजायत' म्हणजे वर उसळी मारून प्रगट झाले. अशा प्रकारे हे गतीने सळसळणारे जगत् किंवा अर्णव समुद्र सर्व बाजूंनी विराजमान झाल्यानंतर त्यात संवत्सर उदय पावला. संवत्सर हा शब्द येथे सामान्य कालार्थाने योजला आहे. संवत्सर (संवसति ऋतवः अत्र) म्हणजे ज्या ठिकाणी ऋतू एकत्र वास करतात. 'ऋतू' हा शब्द गतिवाचक 'ऋ' धातूपासून बनला आहे व तोही कालदर्शक आहे. काल हा गतिमान आहे. म्हणून जगत् निर्माण झाल्याबरोबर कालही प्रस्फुट व्हावा यात नवल नाही. अशा कालात सिद्ध असणाऱ्या अहोरात्रीच्या युग्माला धारण करणारा जो धाता तो सकल भूतमात्रांचा अधिपती झाला.

कारण त्यानेच आपल्या तपश्चर्येने जगत् निर्माण करून त्यातील नानाविध प्रजांना जन्म दिला म्हणून तो प्रजापती होय.

सृष्टीच्या निर्मितीकरिता ब्रह्माला वा ब्रह्मदेवाला तप करावे लागले. 'तपस्तप्त्वा इदं सर्वं असृजत' तप तापून हे सर्व सृजन केले अशी श्रुती आहे. व तप करणाराचे हे तप ज्ञानमय आहे. 'यस्य ज्ञानमयं तप:' अशी त्या तपाच्या स्वरूपासंबंधी औपनिषदिक वचने आहेत. कारण उघड आहे. कोणत्याही विसृष्टीला प्रथमज्ञान, नंतर इच्छा व शेवटी कर्म– 'जानाति इच्छति करोति' अशी कारणपरंपरा असते. तपामध्ये या तिन्ही बाबी येतात. म्हणून हे ब्रह्माचे तप जरी मूळ ज्ञानमय असले तरी पुढे इच्छामय झाले. 'स कामयत' आणि शेवटी कर्ममय झाले. 'स असृजत' या सृष्टीनिर्मितीचा आरंभ मूळ पाण्यात झाला. 'आप आदौ ससर्ज' असे म्हटले आहे. परंतु हे मूळारंभीचे पाणी कोणत्या स्वरूपाचे होते? ते 'अर्णवः समुद्र:' या शब्दात येथे ध्वनित केले आहे. गतिमत्वातील गती किंवा जगतातील जगत् हेच ते पाणी होय. अर्थात या गतीतच आकाश, वायू, अग्नी व पाणी सिद्ध होत असल्यामुळे किंबहुना आकाश, वायू, अग्नी व पाणी ही महत् भूते गतिरूपच असल्यामुळे हा मूळ अर्णव समुद्र आकाशरूप, वायुरूप, अग्निरूप किंवा जलरूप यांपैकी कोणत्याही स्वरूपाचा असणे शक्य आहे.

सारांश जगत् निर्माण झाल्याबरोबर त्यात ऋत-सत्य, रात्री, अर्णव समुद्र, संवत्सर, अहोरात्र, निमिषवान, प्राणीमात्र, सूर्यचंद्र, स्वर्दिव, पृथिवी आणि अंतरिक्ष हे सर्व यथापूर्व निर्माण व्हावे व त्या सर्वांचा अधिपती विधाता, ब्रह्मदेव असावा हे साहजिक आहे. परंतु जगत् निर्माण होण्यापूर्वी जेव्हा ब्रह्मदेवही नव्हता तेव्हा तेथे काय होते, हा प्रश्न घेऊन त्याचे उत्तर देण्याचा प्रयत्न सदर नासदीय सूक्ताच्या प्रारंभी करण्यात आला आहे. अर्थात त्या वेळी काही नव्हते अशा नकारार्थाचे हे उत्तर आहे. त्या वेळी 'आहे' नव्हते, 'नाही' नव्हते, रज नव्हते, व्योम नव्हते, आवरक नव्हते, आवार्य नव्हते, 'दिक्काल' नव्हते, शर्म नव्हते, मग गहन गंभीर अंभ तरी कोठून असणार? अंभही नव्हते. अंभ ही व्यक्त जगताच्या गुणविकासातील पहिली पायरी आहे. असे अंभ जगताच्या उत्पत्तीबरोबर प्रथमारंभी निर्माण झाल्याचे वेदान्त पुष्कळ ठिकाणी दाखले आहेत. प्राचीन बाबिलोनी पुराणात हीच कल्पना आहे व आद्य ग्रीकतत्त्ववेत्ता थेलीज यानेही हेच मत स्वीकारले आहे. पण या सर्वांना मूळ आधार वेदान्त आहे. आता जेव्हा जगत् नव्हते तेव्हा त्या अजगत् स्थितीतील अव्यक्त भावात व्यक्तातील कोणती पर असणे शक्य आहे? कोणतीच नाही. मग ती आप असो, तेज असो, वायू असो, आकाश असो. आप, तेज, वायू, आकाश ही सर्व गतीची साक्षात

परिणामरूपे होत. ती गत्यांभावात कशी संभवणार? गती सुरू झाली की तिच्याबरोबर आपोआप ही सर्व रूपे एकसमयावच्छेदे करून स्फुट होतात आणि उलट आपल्याबरोबर गतीला प्रस्फुट करतात. म्हणून जगदारंभी मूळ पाणी झाले म्हटले काय किंवा तेज, वायू अथवा आकाश झाले म्हटले काय, सर्व सारखेच. अर्थात या दृष्टीने मूळारंभी क्वचित पाणी होते. 'आपो वा इदमग्रे सलिलमासित्।' असे म्हणण्यात येते, तर क्वचित् आकाश होते. 'आकाशः परायणं' असेही म्हणण्यात येते. आकाश, वायू, तेज आणि आप या चार गतिरूप तत्त्वांना पाचवे एक स्थितिरूप पृथिवी तत्त्व जोडले की तेथे अजडा (Immaterial) कडून जडा (Material) कडे किंवा सूक्ष्मा (Imponderable) कडून स्थूला (Ponderable) कडे वाहणारा पंचमहाभूतात्मक सृष्टीचा पसारा निदर्शनास येतो. अशा या सृष्टीत पुनः साशन (Organic) आणि अनशन (Inorganic) असे दोन भाग पडतात. त्यांपैकी प्रथमतः येथे पहिल्या ऋचेत अनशन सृष्टीचा म्हणजे पर्यायाने जगताच्या मूळारंभीचे 'सदसत्' द्वंद्व घेतले आणि त्याला अनुसरून निघणाऱ्या त्रिगुण, त्रिलोक, पंचमहाभूते इत्यादी सर्वांचा नास्तिभावाने विचार केला. आता पुढे दुसऱ्या ऋचेत साशन सृष्टीच्या आरंभीचे 'मृतामृत' द्वंद्व घेऊन व त्यातील दोन्ही कोटीचा निषेध करून या सर्व द्वंद्वाच्या पलीकडच्या निर्द्वंद्व व निर्जगत वस्तूचे स्वरूप कसे असेल व त्यापासून जगताचा व द्वंद्वाचा उगम कसा झाला याचा ठाव घेण्याचा उपक्रम केला आहे.

आता जगताच्या विसृष्टीत दोन भाग आहेत. १) अनशन सृष्टी व २) साशन सृष्टी. सर्व साशनानशन सृष्टीला व्यापून सदसत् हे द्वंद्व आहे. ते प्रथम घेऊन त्यावरून पहिल्या ऋचेत जगत्पूर्वकाळाचा विचार केला. आता येथे सदर दुसऱ्या ऋचेत केवळ साशन सृष्टीला व्यापून असणारे मृतामृत हे द्वंद्व घेतले व त्यावरून त्या काळी मृत्यू नव्हता व अमृतही नव्हते असे म्हटले. पुनः सदसत् द्वंद्व काय किंवा मृतामृत द्वंद्व काय, ही द्वंद्वे पृथ्वीसारख्या मृत्युलोकावरील जीवसृष्टीतील ज्ञानवान मनुष्यप्राण्यालाच अवगत होतात व त्याबरोबर त्याला रात्र व दिवस यांची उपपत्ती समजून कालभाग पाडता येतात. त्या कालाचे मापन करता येते. म्हणूनच येथे म्हटले की, त्या काळी रात्र व दिवस समजण्याचे प्रकेत नव्हते. म्हणजे चंद्र, सूर्य नव्हते. अर्थात तो काल कालातीत होता. काल सुरू होण्यापूर्वीचा होता. तथापि हे काही नसले म्हणून ते काही नव्हते असे नाही. तेथे द्वंद्वातील कोणतीच एकेक कोटी नव्हती, म्हणजे असत् नव्हते किंवा सत् नव्हते. मृत्यू नव्हता किंवा अमृत नव्हते, पण निर्द्वंद्व होते. हा निर्द्वंद्वाचा असणेपणा व एकपणा सदर ऋचेत 'आनीदवातं स्वधया तदेकं' या वाक्यात दर्शविला आहे.

मनुष्याला आपले सर्व ज्ञान स्वत:च्या क्रियेवरून साक्षात्कारिता येते, हाच त्याचा अनुभव. या अनुभवाने तो आपले अस्तित्व कसे जाणतो? तर स्वत:च्या प्राणधारणेवरून. प्राणधारणा कशी होते? प्राणनकर्मावरून. प्राणनकर्म कसे घडते? हवेतील प्राणवायू श्वासोच्छ्वासाने आत घेऊन. अर्थात यावरून मनुष्याला आपला जिवंतपणा म्हणजे आहेपणा श्वसनकर्मावरून ज्ञात होतो. कारण तो त्याला साक्षात्कारिता येतो हे उघड आहे.

मनुष्याला प्रथम आपले श्वसन समजते आणि नंतर त्यावरून तो आपल्या अस्तित्वाचा साक्षात्कार घेतो. अर्थात स्वत:च्या अस्तित्वाला कारणीभूत जी क्रिया मनुष्याला आपल्या ठिकाणी दिसते, भासते व अनुभविता येते तिचाच आरोप निर्द्वंद्वावर करून त्याद्वारे त्याचे अस्तित्व जाणण्याची त्याने खटपट करावी यात नवल नाही. किंबहुना त्यावाचून त्याला दुसरा सयुक्तिक मार्गच नाही. म्हणून 'ते आहे' का? तर 'ते' श्वासोच्छ्वास करीत आहे?' आता ते जे श्वासोच्छ्वास करीत आहे त्याच्या त्या श्वासोच्छ्वासाचे स्वरूप काय? तर संपूर्ण जगत् हाच त्याचा श्वासोच्छ्वास होय. म्हणून बृहदारण्यकोपनिषदात एका ठिकाणी स्पष्ट म्हटले आहे– 'अस्य महतो भूतस्य निश्वासितमेतद्यदृग्वेदो यजुर्वेद: सामवेदोऽथर्वांगिरस इतिहास: पुराणं विद्या उपनिषद: श्लोका: सूत्राण्यनुव्याख्यानानि व्याख्यानानीष्टँ हुतमाशितं पायितमयं च लोक: परश्च लोक: सर्वाणि च भूतान्यस्यैवैतानि सर्वाणि निश्वासितानि'. हे जे ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद, अथर्वांगिरस, इतिहास, पुराण, विद्या, उपनिषदे, श्लोक, सूत्रे, अनुव्याख्याने, व्याख्याने, इत्यादी म्हणून काही ज्ञान आहे ते त्या महान् भूताचे निश्वासित आहे. तसेच त्या ज्ञानाला धरून इष्ट, हुत, आशित, पायित इत्यादी जी कर्मे आहेत, कर्मांना धरून इहलोक आणि परलोक ही जी फळे आहेत आणि फलांवर दृष्टी ठेवून चालणारी जी संपूर्ण भूतमात्रे आहेत ती सर्वत्र त्याची निश्वासिते आहेत. अशा महान भूताला त्या उपनिषदात तेथेच जी आत्मा म्हणून संज्ञा दिली आहे ती फार मार्मिक आहे. कारण गतिमान व श्वसनवान् तो आत्मा असा त्या शब्दाचा अर्थ आहे. गतिमान जे जगत् तेच त्याचे श्वसन होय. अशा श्वसनाने त्याला अस्तित्व आहे. पुन: सायणाचार्याने वेदभाष्याच्या आरंभी 'यस्य निश्वासितं वेद:' या प्रकारे वेदांनाच केवळ त्याचे नि:श्वासित ठरविले आहे. तेही समर्पक आहे.

आता जगदातीत ते अजगत ते आपल्या श्वसनकर्माने अस्तित्वात होते असे म्हटले तर भौतिकशास्त्र दृष्ट्या त्या श्वसनाला जो वायू पाहिजे, तो त्याला त्याकाळी त्या स्थितीत कसा मिळाला? कारण वायू हा जगतातील पंचमहाभूतांपैकी एक आहे, तर

त्याचे निश्वासन 'आनीदवातं' या प्रकारे वायूवाचूनच चालले होते. असे वायूवाचून निःश्वसन करण्याला त्याला कोणाचे बळ मिळाले? कारण मनुष्य हा केवळ वायूच्या बळाने श्वसन करून जिवंत राहतो, तर 'स्वधया' म्हणजे स्वतःच्याच बळाने, दुसऱ्या कोणाच्याही बळाने नाही. अर्थात अशा वायुरहित स्वधेने श्वसन करणाऱ्याचे स्वरूप कसे असेल? तर 'एकं' म्हणजे एकच एक. पण एकं म्हटले तरी दोन प्रकारचे असते. १) संख्येतील एकं व २) संख्यातीत एकं. संख्येतील एकं हे द्वंद्वातील एकं होय. म्हणून ते सापेक्ष असते. संख्यातीत एकं हे द्वंद्वातीत एकं होय. म्हणून ते निरपेक्ष असते. सापेक्ष 'एकं'ला 'द्वितीयं'ची गरज असते. म्हणून ते 'सद्वितीयं एकं' होय. निरपेक्ष 'एकं'ला द्वितीयं ची अपेक्षा नसते. म्हणून ते 'अद्वितीयं एकं' होय. हे त्याचे अद्वितीयत्व येथे 'तस्माद्धान्यन्न परः किंचनास' या वाक्यात दर्शविले आहे. त्यावाचून खरोखर दुसरे पलीकडे काहीही नव्हते. म्हणजे याच्या अपेक्षेने जे अद्वितीय म्हणून गणले जाईल असे काही त्याच्याशिवाय निराळे नव्हते. म्हणजे ते खरे 'एकमेवाद्वितीयं' होते.

सारांश, जगत निर्माण होण्यापूर्वी त्याकाळी काय होते, हा मुख्य प्रश्न आहे. त्याचे उत्तर जगतावरूनच अप्रत्यक्षपणे द्यावयाचे असल्यामुळे साशनानशन जगतातील एकेक कोटी येऊन तिचा निषेध केला. त्या वेळी असत् नव्हते, सत् नव्हते, रज नव्हते, व्योम नव्हते, आवरक नव्हते, आवार्य नव्हते, अंभही नव्हते. या प्रकारे पहिल्या ऋचेत अनशन सृष्टीतील निरनिराळ्या कोटी दर्शवून सदर दुसऱ्या ऋचेत साशन सृष्टीला आधारभूत जे मृत्यू-अमृताचे द्वंद्व, ते घेतले व त्याचाही व्यक्तिशः निषेध केला. त्या वेळी मृत्यू नव्हता, अमृत नव्हते. जिवांना साक्षात उपकारक चंद्र, सूर्य नव्हते, म्हणून मनुष्यालाच केवळ त्याचे ज्ञान व्हावे असा कालभेद नव्हता. मग काही नव्हते. अशा स्थितीत काय होते? त्याचे उत्तर ते एक आपल्या बळाने वायूवाचून स्फुरत होते, त्याखेरीज त्यापलीकडे दुसरे काही नव्हते; असे देऊन त्यात मोठ्या युक्तीने ते 'एकमेवाद्वितीयं' होते असे दर्शविले आहे. त्या 'एकमेवाद्वितीयं'चे पतन हे सुपतन असल्याकारणाने त्याला 'सुपर्ण' हे नाव प्राप्त झाले. अशा सुपर्णाचे सलिलातील प्रवेशन सदर धर्मसूक्तात येणेप्रमाणे कथन केले आहे.

*एकः सुपर्णः स समुद्रमाविवेश*
*स इदं विश्वं भुवनं विचष्टे ।*
*तं पाकेन मनसा पश्यमंतितस्तं*
*माता रेळ्हि स उ रेळ्हि मातरं ।।*

अर्थ : तो एकटाच एक सुपतनशील (सुपर्णः) समुद्रामध्ये सर्व बाजूंनी प्रवेश करिता झाला. (आ विवेश) त्याने हे सर्व भुवन विशेष रीतीने अवलोकन केले (वि चष्टे) त्याला मी परिपक्व मनाने (पाकेन मनसा) समीप पाहिले. त्याला माता आस्वादिते किंवा चाटते व तो मातेला आस्वादितो किंवा चाटतो (रेळ्हि).

येथे समुद्र म्हणजे आत्म्याच्या तपापासून ज्या स्वेदधारा अभिस्रवण पावल्या व त्याचे पाण्याचे थारळे बनले ते होय. हाच तापस धर्म या अभितप्त तपापासून उत्पन्न झालेल्या जलसमूहाला अद्यमर्षण ऋषीच्या सूक्तात 'अर्णवः समुद्रः' म्हटले आहे. हेच सृष्टीच्या मूळारंभी सृजन पावलेले निधी. सायणाने 'समुद्र' शब्दाच्या 'समुद्रवं सर्वतो गमनं' असा विकल्पाने अर्थ केला आहे. तो फार मार्मिक आहे. त्यावरून समुद्र म्हणजे गतिमान जगत्. अशा समुद्रात म्हणजे गतिमान जगतात तो एकच एक सुपर्ण म्हणजे तेजाचे किरण धारण करणारा दीप्तिमान सुंदर पक्षी आसमंतात प्रवेश करता झाला. अर्थात त्याने आपल्या तेजाने सर्व बाजूंनी भरून टाकले. त्याबरोबर त्या सलिलावरील तमाचे पटल किंवा आभूवरील तुच्छाचे आवरण नाहीसे होऊन आकाश प्रकट झाले व त्याखाली जगताला पूर्णपणे व्यक्तता आली. या प्रकारे त्या सुपर्णाने समुद्रात प्रवेश करून संपूर्ण भुवन विशेष रीतीने न्याहाळून पाहिले. म्हणजे त्याने या जगताला नाना गुणरूपांमध्ये अनंतत्वात पूर्णतेला कसे न्यावे या दृष्टीने अवलोकन केले. येथे हा तपःपुत्र धर्म किंवा सध्रिनामक वैरूप ऋषी म्हणतो, 'मी या सुपर्णाला आपल्या समीपवर्ती माझ्या परिपक्व मनाने म्हणजे ज्ञानदृष्टीने पाहिले.' अर्थात या मनीषीला त्या ब्रह्मस्वरूप आत्म्याचा किंवा आत्मस्वरूप ब्रह्माचा आपल्याभोवती जगत्कार्यातच जो साक्षात्कार झाला, तो त्याने येथे अत्यंत स्पष्ट असंदिग्ध शब्दांनी निवेदन केला आहे.

सायणाने 'माता' शब्दाचा अर्थ वाक् दिला आहे. ज्या अर्थी वाचेत त्याचे वर्णन होते, त्या अर्थी वाक् त्याला आवडले आणि उलट वाचेलाही वर्णन करण्याला तो आवडतो. हा सायणाचा आशय आहे व पुढील ऋचेत या अर्थाला पुष्टी आहे. 'सुपर्ण विप्राः कवयो वचोभिरेकं संतं बहुधा कल्पयन्ति ।' म्हणजे मेधावी व क्रांतप्रज्ञ पुरुष त्या एकच एक सुपर्णाला आपल्या स्तुतिवचनांनी अनेक प्रकारे कल्पितात. तथापि येथे

माता शब्दाचा अर्थ जगत् घेणे योग्य आहे. आत्मा - जगत् - ब्रह्म या त्रिकूटात आत्मा हा पतिरूप, जगत् जायारूप व ब्रह्म प्रजारूप आहे. पती हा भार्येच्या ठिकाणी संप्रवेश करून गर्भहोत्साता पुत्ररूपाने आपला जन्म करून घेतो आणि म्हणून ज्या अर्थी तो तिच्या ठिकाणी पुनर्जन्म पावतो त्या अर्थी जायेला जायात्व प्राप्त होते, अशी श्रुतिस्मृतिंची कल्पना आहे. अर्थात आत्मा हा जगताला एका बाजूने पती व दुसऱ्या बाजूने पुत्र आहे. कारण त्याचेच रेत धारण करून ही जगन्माता पुढे प्रजावर्धन करीत आहे. म्हणून सदर ऋषीच्या मते ही जगन्माता त्या सुपर्णाला एका बाजूने पतिप्रेमाने आस्वादिते व दुसऱ्या बाजूने पुत्रवात्सल्याने चाटते. तर उलट तो सुपर्णही या जगताला जाया कामनेने आस्वादितो व मातृभक्तीने चाटतो. सारांश आत्मा व जगत् या दोघांनाही परस्परांबद्दल अत्यंत प्रेम असल्याकारणाने हे जगत्कार्य ब्रह्माचे ठिकाणी सुफलित होते.

जगद्रूपी सलिलात विश्वातील नानाविध गुणरूपधारी पदार्थांचे सृजन कसे झाले हा प्रश्न उत्पन्न होतो. त्याचे उत्तर वेदांत हे विश्व निर्माण करणाऱ्या विश्वकर्मन् ऋषीच्याच तोंडून ऐकण्यास सापडते. हा विश्वकर्मा ऋषी भुवनपुत्र म्हटला आहे. विश्वकर्मन् हे नाव वरील धर्मसूक्तात निर्दिष्ट केलेल्या सुपर्णाला त्याच्या विश्व निर्माण करण्याच्या क्रियेवरूनच देण्यात आले आहे. हा विश्वकर्मन् ज्या विश्वाला निर्माण करतो त्याचेच पुन: तो यज्ञात हवन करतो व त्याबरोबर मागोमाग आपले स्वत:चेही हवन करून घेतो. कारण असा हा सर्वस्वाचा यज्ञ करून घेतल्याखेरीज ब्रह्माची सिद्धी होत नाही.

*य इमा विश्वा भुवनानि जुह्वदृष्टिर्होता न्यसीदत्पिता न: ।*
*स आशिषा द्रविणमिच्छमान: प्रथमच्छदवराँ आ विवेश ।।*

ज्या हवनकर्त्या ऋषीने या सर्व भुवनांचा होम केला त्या आमच्या पित्याने आपल्या स्वत:लाही अग्नीमध्ये हवनरूपाने फेकून दिले. तो आशि: प्रतिपादक वचनांनी ऐश्वर्याची इच्छा करणारा आपले प्रथमरूप झाकून दुसऱ्या रूपात सर्व बाजूंनी प्रवेश करता झाला. सदर ऋचेबद्दल निरुक्तात म्हटले आहे-

*'विश्वकर्मा सर्वमेधे सर्वाणि भूतानि जुहवांचकार स*
*आत्मानमप्यंततो जुहवांचकार'*

अर्थ : 'विश्वकर्माने सर्वमेध यज्ञात सर्व भूतमात्रांचे हवन केले आणि शेवटी आपले स्वत:चेही हवन केले. मूळ स्वयंभू ब्रह्माने तप तपले. परंतु त्याने पाहिले की तपामध्ये

खरोखर आनंत्य नाही. म्हणून तो म्हणाला, आपण भूतांच्या ठिकाणी आपला यज्ञ करावा, व भूतांना आपल्या ठिकाणी यज्ञ करण्यास लावावे. याप्रमाणे हवन केले. इ.' अशी शतपथ ब्राह्मणात श्रुती आहे. यावरून जगताच्या सृजनाला जरी केवळ आत्म्याचे तप पुरे असले तरी त्या जगतात प्रजावृद्धी ब्रह्माचे इष्टफल सिद्ध होण्यास यज्ञ पाहिजे, हे उघड आहे. म्हणून मूळ आत्म्याने तप तपून धर्मरूप सलिल निर्माण केले व त्यात तो रेतरूपाने संप्रविष्ट झाला, पण आता त्या रेतापासून जे हिरण्यमय अंडे बनले, त्यातून विश्वाला नाना रूपांत आणण्याकरिता त्याला 'विश्वकर्मन्' बनून यज्ञाचा सर्व खटाटोप करावा लागला. त्यात त्याला हौत्रकर्म करणे प्राप्त झाले. म्हणून तो ऋषित्व पावला व 'होता' झाला. अशा त्या पित्याने त्या विश्वहुत यज्ञात सर्व भुवनांचे हवन केले व आपलेही हवन करून घेतले. म्हणजे त्याने जगतातील सर्व भूतमात्रांना आपल्या ठिकाणी सूत्रात मणिगणांप्रमाणे ओवून घेतले व आपण त्यांच्या ठिकाणी प्रवेश करून राहिला.

जगत् हे आपल्या गतिमत्वाच्या गुणानेच अग्निरूप आहे. त्यातील भूतमात्र अन्नरूप आहेत व त्यांची धारणा यज्ञावर आहे. जेथे अग्नी तेथे यज्ञ व जेथे यज्ञ तेथे अन्न आहे. यज्ञाची सिद्धी अन्नात आहे. अन्नाची सिद्धी यज्ञात आहे व दोहोंची सिद्धी अग्नीत आहे. अन्न नाही तर यज्ञ नाही व यज्ञ नाही तर अन्न नाही, पण अग्नी नाही तर अन्न, यज्ञ काहीच नाही. तथापि अन्न व यज्ञ काहीच नाही म्हटले तर अग्नीही नाही. म्हणून आत्मा अग्नी झाला व आत्मधारणेकरिताच त्याने भूतमात्रांच्या ठिकाणी आपले अन्न निर्माण केले. परंतु उलट भूतात्म्यांची धारणा घडण्याकरिता त्याला त्याच्या ठिकाणी प्रवेश करून राहणे भाग पडले.

असा हा परस्परांच्या धारणेकरिता परस्परांचा एकमेकांच्या ठिकाणी आत्मयज्ञ आहे. अशा या यज्ञकर्त्या विश्वकर्मात्म्याला जी द्रविणाची इच्छा झाली ते मिळविण्याकरिता त्याने आपले प्रथमरूप टाकून दुसऱ्या रूपात प्रवेश केला असे येथे म्हटले आहे. ऐश्वर्याची वृद्धी गुणविकासात, नवीन नवीन रूपे तयार होण्यात आहे व कोणतेही नवीन रूप तयार व्हावयाचे म्हणजे त्यात मागील रूप झाकले जाते, हा उत्क्रांतीचा नियम आहे.

---

* वनस्पती, प्राणी, कीटक, मृग, मनुष्य वगैरे ही जी विविधता सृष्टीमध्ये दिसते त्याचे वैज्ञानिक स्पष्टीकरण देणे झाल्यास असे सांगता येईल की त्यांच्या गुणसूत्रांची संख्या व न्युक्लोटाईडचा क्रम होय. सोबत वेगवेगळ्या प्राणीमात्रांच्या व वनस्पतींच्या गुणसूत्रांच्या संख्या दिल्या आहेत. गुणसूत्रे ही प्रथिनांची, प्रथिने अमीनो ॲसिडची, अमीनो ॲसिड ही जीन्सची, जीन्स ही डीएनएची, डीएनए

अर्थात येथे त्या विश्वकर्मात्म्याला जगदुत्क्रांतीचे कार्य करण्याकरिता पहिले रूप टाकून नवीन रूप धारण करणे भाग पडले. हाच त्याचा यज्ञ. या यज्ञात प्रथम आत्मत्व गेले व सुपर्णत्व आले. नंतर सुपर्णत्व गेले व विश्वकर्मत्व आले. आता पुढे विश्वकर्मत्व जाऊन जेव्हा प्रजापतित्व येईल व शेवटी प्रजापतित्वाचाही त्याग घडेल, तेव्हा अंतिम 'एकमेवाद्वितीय' ब्रह्माची सिद्धी होईल.

*विश्वतश्चक्षुरुत विश्वतोमुखो विश्वतो बाहुरुत विश्वतस्पात् ।*
*सं बाहुभ्यां धमति सं पतत्रैर्द्यावाभूमी जनयन्देव एकः ॥*

---

न्यूक्लोटाईड्सची, ही कार्बन, हायड्रोजन, ऑक्सिजन, नायट्रोजन व फॉस्फरस यांपासून बनलेली असतात. यामध्ये गुणसूत्रांची संख्या जशी महत्त्वाची आहे तसेच त्यांतील जीन्स यांची संख्या व त्यांतील न्युक्लोटाईड्स क्रमही महत्त्वाचा आहे. त्यांचा क्रम बदलला की वेगळीच आकृती निर्माण होते, वेगळेच बीज निर्माण होते. त्यामुळे गुणसूत्रे सारखी असली तरी जीन्स यांच्या अनुक्रमामध्ये फरक पडला तरी वेगळेच प्राणी, वनस्पती तयार होतात. किंवा जीन्सचा क्रम सारखा असूनही गुणसूत्रांची संख्या कमी-जास्त झाली असताही वेगळेच प्राणी, वनस्पती तयार होतात. शेजारील तक्त्यात प्राणी व वनस्पती यांच्या गुणसूत्रांची संख्या दिली आहे. पुढे प्राण्यांतील समान गुणसूत्रे असूनही प्राणी वेगळे आहेत. तसेच वनस्पतीतील समान गुणसूत्रे असून वनस्पती वेगवेगळ्या आहेत. या ठिकाणी प्राणी व वनस्पती यांच्यात फरक असण्याचे कारण केवळ त्यांच्यातील न्युक्लोटाईड व जीन्स यांची संख्या व क्रम वेगळा असणार. त्यानंतर पुढे प्राणी व वनस्पती यांच्यातीलही समान गुणसूत्रांची संख्या असलेली उदाहरणे दिली आहेत. त्यांतही गुणसूत्रे सारखी असली तरी न्युक्लोटाईड व जीन्स यांची संख्या व क्रम वेगळे असणारच. शिवाय त्याच्याबरोबर वनस्पतीमध्ये हरितद्रव्य (Chlorophyl) तयार होण्यासाठी त्याच्या कार्बन, हायड्रोजन, ऑक्सिजन या रचनेत मॅग्नेशियम असते. तसेच प्राण्यांमध्ये रक्त निर्मितीकरिता लोहाची गरज असते व त्यामध्ये हिमोग्लोबिन हे प्रथिन असते. हीच सृष्टीतील गुणविकासाची नवीन नवीन रूपे होण्याची पद्धत आहे असे दिसते. सृष्टी वनस्पतींपासून प्राणिमात्रांपर्यंत उत्क्रांती झाली व प्राणिमात्रांपासून मानवांपर्यंतही उत्क्रांती झाली. यामध्ये काही सादृश्य दिसते. कारण त्यांच्यामधील न्युक्लोटाईड्, जीन्स यांच्या रचनेमध्ये असलेला किरकोळ फरक असतो. असा वनस्पतीमध्ये व प्राण्यांमध्ये सारखेपणा दिसत असला तरी ती निसर्गतः उत्क्रांत पावली आहेत. त्यांची बीजेच उत्क्रांत पावली आहेत. त्यांची बीजे ही स्वतंत्र आहेत. मानवी प्राणी हा इथून तिथून सारखाच आहे. असे असले तरी प्राणीजीवनातून नुकताच उत्क्रांत पावलेला मनुष्य हा नैसर्गिक अवस्थेत राहात असतो. त्याची गरज प्राण्यांप्रमाणेच आहार, निद्रा व मैथुन यांच्या पलीकडे गेलेली नसते असे दिसते. पण जेव्हा संस्काराने ते बीज उत्क्रांत पावत जाते, (बीजे ही केवळ संस्कारानेच उत्क्रांत पावतात. हे संस्कार प्राणी व वनस्पती यांच्या बाबतीत निसर्गतः होतात. त्यामुळे त्यांच्या उत्क्रांतीला खूप कालावधी लागतो, तर मनुष्यजन्मात त्यांच्यावर बुद्धिपुरस्सर, हेतूपुरस्सर संस्कार केले जातात व उत्क्रांतीचा वेग वाढवला जातो. याविषयी पुढे चर्चा आलीच आहे.)

---

विश्वतश्चक्षु: = (सर्वतो व्याप्तचक्षु:) उत = (अपि च) विश्वातोमुख:, विश्वतोबाहु: उत विश्वतस्पात् एक: देव: द्यावाभूमी (द्यौश्चभूमिश्च) जनयन् बाहुभ्यां (दिवं) सं धमति = (सम्यक् प्रेरयति) पतत्रै: (भूमि) सं (धमति) ।

ज्याला सर्वत्र डोळे आहेत आणि तशीच तोंडे आहेत, ज्याला सर्वत्र हात आहेत, आणि तसेच सर्वत्र पाय आहेत, असा तो एकटाच एक देव, द्यू आणि भूमी यांना जन्म देऊन द्युलोकाला आपल्या बाहूंनी व भूलोकाला आपल्या गमनशील पायांनी सम्यक् प्रकारे गतीची प्रेरणा देतो. सदर ऋचेत त्या परमेष्ठीस्वरूप एकच एक विश्वकर्मन् देवाने हे विश्व निर्माण केले असे स्पष्ट सांगितले आहे. पुन: निर्माण केले इतकेच नाही,

---

तेव्हा आहार, निद्रा व मैथुन यांच्यापेक्षाही माणूस म्हणून जगण्यासाठी पुष्कळ काही आवश्यक आहे, याची जाणीव होत जाते आणि अशाच संस्काराने ती बीजे (जीव) उत्क्रांत पावत पावत शेवटी परमेश्वरस्वरूप होण्यासाठी लागणाऱ्या सर्व गुणांचा समुच्चय त्याच्या ठिकाणी होतो. उत्क्रांतीच्या शेवटच्या टप्प्यापर्यंत त्याची मजल जाते. ते संत-चरित्राचे जेव्हा ज्ञान होते, तेव्हा कळून येते.

वेगवेगळ्या प्राणिमात्रांची व वनस्पतीची गुणसूत्रे

प्राणी – माणूस-४६, गोरिला-४६, घोडा-६४, गाय-६०, सुसर-३२, मेंढी-५४, कुत्रा-७८, मांजर-३८, उंदीर-४०, घूस-४२, वानर-४८, मुंगी(लाल) -४८, गाढव-६२, बेडूक (Frog)-२६, मोठा बेडूक (Toad)-२२, माशी-१२, माशी (Fruit Fly)-८, मधमाशी-३२, ससा-४०, मासा-१०४, स्टार फिश ३६, रेशमी किडा ५६, शेळी ६०, डास ६, कोंबडी ७८, नाकतोडा २४, कबूतर ८०, डुक्कर ३८, केळावरील माशी ८.

वनस्पती – तांदूळ २४, गहू ४२, मका २०, बारली १४, कापूस ५२, तंबाखू ४८, घेवडा १२, हिरवा वाटाणा १४, टोमॅटो २४, बटाटा ४८, कांदा १६, घेवडा २२ (Kidney bean), शेवाळे १६.

प्राण्यांमध्ये समान गुणसूत्रे

गोरिला माणूस = ४६, वानर मुंगी = ४८, मेंढी माकड = ५४, मांजर डुक्कर = ३८

वनस्पतींमध्ये समान गुणसूत्रे

तंबाखू-बटाटा = ४८, कांदा-शेवाळ = १६, तांदूळ-टोमॅटो = २४, बारली-हिरवा वाटाणा = १४

प्राणी-वनस्पती यांच्यातील समान गुणसूत्रे

माशी-घेवडा = १२, घूस-गहू = ४२, मोठा बेडूक-घेवडा = २२, नाकतोडा-टोमॅटो = २४, वानर-तंबाखू = ४८.

(केवळ नमुन्यासाठी उदाहरणे दिली आहेत.)

तर त्याने त्यातील द्यावापृथ्वीच्या गतीला उत्तम प्रकारे प्रेरणा दिली. आता हा विश्वकर्मा कसा? त्याचे डोळे, तोंड, हात, पाय, विश्वात सर्वत्र व्यापून आहेत असा. हे विश्वकर्म्याचे वर्णन पुरुषसूक्तातील 'सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपातः = ज्याला हजारो डोकी, हजारो डोळे, हजारो पाय आहेत, अशा परमपुरुषाच्या वर्णनाप्रमाणेच आहेत व त्यातच त्याचे परमेष्ठीत्व सिद्ध होत आहे.

*किं स्विद्वनं क उ स वृक्ष आस*
*यतो द्यावापृथिवी निष्टतक्षुः ।*
*मनीषिणो मनसा पृच्छतेदु*
*तद्यदध्यतिष्ठद्‌भुवनानि धारयन् ॥*

किं स्वित् वनं क उ सः वृक्षः आस यतः द्यावापृथिवी निष्टतक्षुः (निःऽततक्षुः तक्षणेन निष्पादितवंन्तः); (हे) मनीषिणः (= मनसः ईश्वराः) भुवनानि धारयन् यत् अध्यतिष्ठत् (अधि ऽ अतिष्ठत्) तत् मनसा (= जिज्ञासायुक्तेन) पृच्छत इत् उ (= पृच्छतैव)।

असे कोणते वन होते व त्यात असा कोणता महान वृक्ष होता की त्यापासून तासून द्यावा, पृथिवी निष्पादन केली? ज्यांनी मनावर प्रभुत्व मिळवलेले आहे अशा मनीषी हो, तुम्हाला केवळ जिज्ञासाभावाने विचारण्यात येत आहे, की जे भुवनांना धारण करून अधिष्ठित झाले ते काय आहे? त्याचे उत्तर आत्मबीजापासून उदय पावलेला व जगताला धारण करणारा हा ब्रह्मवनातील ब्रह्मवृक्ष होय असे तैत्तिरीय ब्राह्मणात दिले आहे–

*'ब्रह्मवनं ब्रह्मस वृक्ष आसीत् यतो द्यावापृथिवी निष्टतक्षुः ।*
*मनीषिणो मनसा विब्रवीमि वः ब्रह्माध्यतिष्ठद्‌भुवनानि धारयन् ॥'*

अर्थ : ज्यापासून तासून द्यावा-पृथिवी निष्पादन करण्यात आली तो ब्रह्मवनातील ब्रह्मवृक्ष होता. हे मनीषी हो, मी तुम्हाला मनाने निश्चित करून सांगतो की भुवनांना धारण करून ते ब्रह्मच अधिष्ठित झाले.

मूळारंभी हे तमः स्वरूप अप्रयात, अलक्षण, अप्रतर्क्य, अविज्ञेय, असे सर्वतः प्रसुप्ताप्रमाणे जगत होते. ते पुढे स्वयंभू व अव्यक्त अशा परमेश्वराने प्रकाशात आणून महाभूतांना प्रवृत्त करण्यात आपल्या बलाचे प्रकटीकरण करणारा तो तमोहंता प्रादुर्भाव पावला जो हा अतींद्रिय ग्राह्य, सूक्ष्म, अव्यक्त, सनातन, सर्वभूतमय व अचिंत्य होता.

तोच केवळ स्वत: उद्भव पावला. त्याने अंतर्ध्यान करून स्वत:च्या शरीरापासून ज्या विविध प्रजा निर्माण केल्या, त्यांत प्रथमत: केवळ पाण्याचे सृजन झाले आणि त्यानंतर त्या पाण्याच्या अंतर्भागी त्याने बीज निर्माण केले. ते सहस्र किरणांप्रमाणे तेजस्वी सुवर्णमय अंडे बनले. या ब्रह्माच्या हिरणमय अंड्यामध्ये जो 'सर्वलोक पितामह' ब्रह्मदेव जन्मला त्याला त्याच कारणाने 'हिरण्यगर्भ' नाव पडले. तोच प्रजापती. म्हणून 'प्रजापतिर्वै हिरण्यगर्भ:' अशी तैत्तिरीय श्रुती आहे. कारण तो जन्म पावल्याबरोबर विश्वाला व्यापून पुढील सर्व भूतजातांचा एकटाच एक पती झाला. ह्या हिरण्यगर्भ प्रजापतीबद्दल ऋग्वेदात प्रजापतीपुत्र हिरण्यगर्भ नामक ऋषीचेच एक त्रिष्टुभ छंदात सूक्त आहे. त्याची देवता 'क' म्हटली आहे. या सूक्तात दहा ऋचा आहेत. त्यांपैकी पहिल्या नऊ ऋचांमध्ये प्रत्येक ऋचेच्या पहिल्या तीन चरणांत प्रजापतीच्या सामर्थ्याचे निरनिराळ्या प्रकारे वर्णन असून शेवटच्या चरणात 'कस्मै देवाय हविषा विधेम।' हे प्रश्नोत्तर रूपाचे वाक्य आहे. या वाक्यात 'कस्मै' शब्दावर व्द्यर्थी कोटी आहे. म्हणजे त्या एकाच शब्दात प्रश्न व उत्तर दोन्ही आहेत. प्रश्न - 'कस्मै देवाय हविषा विधेम।' म्हणजे आम्ही कोणत्या देवाला हवि द्यावा? उत्तर – 'कस्मै देवाय हविषा विधेम।' आम्ही 'क' नामक देवाला हवि द्यावा. हा 'क' म्हणजेच सर्व देवांचा देव प्रजापती. आता 'क' हा आपल्या प्रजापतित्वाच्या गुणाने सर्व भूतमात्रांचा प्रजननकर्ता असल्यामुळे हाच सूर्य आहे, सविता आहे, त्वष्टा आहे व विश्वकर्मा आहे. कारण हे सर्व देव निरनिराळ्या प्रकारे वेदान्त जननकर्ते म्हणून वर्णिले आहेत. परंतु मुख्यत: सूर्य हा पृथ्वीचा व पृथ्वीवरील सर्व चराचर वस्तुमात्राचा उत्पत्तिकर्ता आहे व या त्याच्या गुणावरून त्याला सविता 'प्रसविता जनानां' म्हणजे जनांन। प्रसविणारा असा म्हटला आहे. म्हणून असुरांच्या झंदोवेस्त्यात 'क' हा सूर्य मानला आहे. परंतु वेदान्त सूर्य हा सर्व 'स्थावर-जंगमाचा आत्मा' म्हणून वर्णिला आहे. 'सूर्य आत्मा जगतस्तस्थुषश्च।' अर्थात यावरून 'क' आत्मा ही कल्पना प्राचीन मिसर देशातील तत्त्वज्ञानात वैदिक सूर्यदेवाबरोबरच शिरली आहे.

*'अदितिर्द्यौरदितिरंतरिक्षमदितिर्माता स पिता स पुत्र: ।*
*विश्वे देवा अदिति: पंच जना अदितिर्जामदितिर्जनित्वं ॥'*

अर्थ : अदिती ही द्यौ, अदिती अंतरिक्ष, अदिती ही माता, तो पिता, तोच पुत्र, विश्वदेव म्हणजे अदिती, पंचजनही अदिती, जन्य अदिती, व जनकही अदितीच. या प्रकारे विश्वव्यापी वर्णन आहे. अदिती-अदीना - अखंडनीया - या अर्थाने ती जगताच्या बुडाशी असलेले अव्ययत्व निर्दिष्ट करिते. तिला स्त्रीरूप केवळ देवमाता म्हणून

देण्यात आले आहे. इतकेच. बाकी ती जशी स्त्रीरूप आहे तशीच पुरुषरूपही आहे. हे वरील ऋचेवरून स्पष्ट सिद्ध होत आहे. वस्तुत: ती निरूप आहे आणि म्हणून सर्वरूपधारी आहे.

सारांश, मूळारंभी असत् नव्हते, व सत् नव्हते. मृत्यू नव्हता व अमृत नव्हते. अर्थात सत् झाले म्हणून असत् झाले. अमृत झाले म्हणून मृत्यू झाला. जे असत् तोच मृत्यू, तेच तम होय. म्हणून मूळारंभी 'तम आसित्'; तथापि एकटे तमच नव्हते तर 'तमसा गूळ्हं अप्रकेतं सलिलं आसीत्।' सलिलाचे स्वरूप काय? तर तपाच्या योगाने अंगापासून स्रवलेले धर्म. तप कोणाचे? तर आत्म्याचे. म्हणून 'आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्॥' जो आत्म्यानेच ब्रह्म म्हणून 'ब्रह्म ह वै इदमग्र आसीत्।' त्या आत्म्याने प्रजा कामनेने तप तपले. त्या 'अभीद्धात् तपस:' अर्णव समुद्र झाला. त्यात आत्म्याच्या रेतापासून सुपर्ण जन्मला. जो सुपर्ण तोच हिरण्यगर्भ, तोच 'क', तोच प्रजापती. त्याने विश्व केले म्हणून तो विश्वकर्मा. त्याने विश्वाच्या गर्भाला आकार दिला म्हणून तो त्वष्टा. त्याने स्थावर-जंगम भूतमात्रांना जन्म दिला म्हणून तो सूर्य. त्याने प्राणिमात्राला प्रसूतीने जन्मास आणले म्हणून तो सविता. विश्व करण्यात तो अत्यंत चतुर म्हणून 'दक्ष' होय. तसाच तो कधीही खंडित न होणारा म्हणून 'अदिति'. अशा अदितीपासून दक्षाने जे आपले अनेक ज्योतींत पुनर्जनन करून घेतले ते देव. याप्रमाणे देव हे अदितीचे पुत्र म्हणून आदित्य होत. पुन: ते दक्षाची प्रजा असून दक्ष हा त्या सर्वांचा एकच एक पती म्हणून प्रजापती होय. या प्रजापतीला ब्रह्मदेव ही संज्ञा आहे. ती फार मार्मिक आहे. तो निर्द्वंद्व आणि द्वंद्व यांच्या मधला दुवा आहे. ब्रह्म हे 'एकमेवाद्वितीयं' असल्याकारणाने निर्द्वंद्व आहे. देव हे द्वंद्व सृष्टीत प्रजारूपाने निर्माण झाले आहेत. म्हणून ब्रह्मदेव हा निर्द्वंद्वाचे व द्वंद्वाचे दोन्ही गुण दर्शविणारा द्वंद्वातील दोन्ही कोटी एकत्र धारण करून आहे. अर्थात त्याचे वर्णन मागे उद्धृत केलेल्या 'क' सूक्तात 'यस्य छायामृतं यस्य मृत्यु:' असे जे केले आहे, ते यथायोग्य आहे. अशा सदसत्, मृतामृत, व्यक्ताव्यक्त द्वंद्वे धारण करणाऱ्या ब्रह्मदेवाचे स्वरूप रेखाटायाचे म्हणजे ते प्रकृतिपुरुषान्वित (Androgynous) किंवा पुरुषप्रकृत्यन्वित (Gynandrial) दिसणार आहे. पौराणिक देवकल्पनेप्रमाणे तोच अर्धनारीनटेश्वर (Hermophrodite) होय.

## सृष्टीचा विस्तार

पुराणातील एक कथा. संज्ञा ही सूर्याची पत्नी. तिला सूर्याचा ताप सहन होईना म्हणून तिने आपली छाया-संध्या हिला सूर्याजवळ ठेवून ती पृथ्वीतलावर अश्वीच्या रूपात आली. संध्याला सूर्यापासून शनिश्चर वगैरे अपत्ये झाली. नंतर सूर्याच्या लक्षात ही गोष्ट आली की, संध्या ही काही त्याची खरी पत्नी नव्हे. म्हणून त्याने सूक्ष्म दृष्टीने अवलोकन केले असता त्याला संज्ञा, त्याची खरी पत्नी अश्वीच्या रूपात भूतलावर वावरत असलेली दिसली. तेव्हा सूर्याने अश्वाचे रूप घेतले व तोही भूतलावर आला व त्या अश्वीरूप संज्ञाला त्याच्यापासून अश्विनीकुमार असे दोन पुत्र झाले. याच कथेबरोबर महाभारतातील एक कथाही अशीच आहे. कदम्ब नावाचे एक ऋषी मृगाचे रूप घेऊन मृगीबरोबर समागम करीत होते. त्या वेळी पंडूने त्या कदम्ब ऋषींची मृग समजून हत्या केली व त्यामुळे पंडूला शाप मिळाला. असो.

या दोन्ही कथांमध्ये एक साम्य आहे. ते असे की देव, ऋषी यांना देहाचे रूप बदलण्याची सिद्धी होती. ते कोणतेही रूप घेऊ शकत होते. याच शक्तीचा उपयोग करून कश्यपमुनींनी आपल्या सतरा (प्रकारच्या) पत्नींपासून विविध स्वरूपाची सृष्टी निर्माण करून या सृष्टीचा विस्तार केला आहे असे दिसते. कश्यपच्या पत्नी अदिती, दिती, दनू, काष्ठा, अरिष्टा, सुरसा, इला, मुनी, क्रोधावशा, ताम्रा, सुरभि, सरसा, तिमी, विनता, कद्रू, पतङ्गी, यामिनी अशा होत्या. यांच्यापासून कश्यपाने अनुक्रमे, देव, दैत्य, दानव, घोडे वगैरे एक खुराचे प्राणी, गंधर्व, राक्षस, वृक्षलता वगैरे सर्व प्रकारच्या वनस्पती, अप्सरा, साप, विंचू वगैरे विषारी प्राणी, गिधाड वगैरे शिकारी पक्षी, गाय, म्हैस वगैरे दोन खुरांचे प्राणी, वाघ, सिंह वगैरे हिंसक प्राणी, जलचर, जंतू, गरुड, अरुण, नाग वगैरे सरपटणारे प्राणी, पक्षी, किडे, कीटक वगैरे सर्व प्रकारचे प्राणी जन्माला घालून सृष्टीची पोकळी भरून टाकली. तसेच मूर्ती या दक्ष कन्येपासून कश्यप मुनींना नर, नारायण झाले. या ठिकाणी जर विचार केला तर एक तर कश्यपमुनी हे अशा प्रकारचे मुनी होते की त्यांना या सर्व विविध रूपांत अवतरण्याची सिद्धी साध्य होती व त्या त्या रूपात अवतरून त्यांनी त्या त्या प्रकारची सृष्टी निर्माण केली असेल किंवा असेही म्हणता येईल की कश्यपमुनी हे अशा प्रकारचे शास्त्रज्ञ वा संशोधक होते की जे अंतर्बीज युक्त पिंडामधील औषधीजनक जीवस्फोट (वनस्पती) व अनधिजनक जीवस्फोट (प्राणी) यांच्यामध्ये बदल करून अनेकविध मूलद्रव्याच्या संमिश्रणाने, संयुगांच्या योगाने, त्यांनी स्वतंत्र बीजाची निर्मिती करून विविधता निर्माण केली असेल व ही सृष्टी विविधतेने नटवली असेल.

सध्या क्लोनिंग करून प्राण्याच्या पेशींपासून त्याच प्रकारचा प्राणी निर्माण करण्याचा प्रयोग सिद्ध झाला आहे, तर कदाचित पुढे कालांतराने अशा या पेशींच्या संमिश्रणाने, संयोगाने कदाचित् एखादा नवीन प्राणीही शास्त्रज्ञ बनवू शकतील व त्या वेळी या कश्यप मुनींच्या सामर्थ्याची कल्पना येईल.

तसेच ब्रह्मदेवाने सृष्टीनिर्मितीसाठी स्वतःच्या शरीरातून म्हणजे शरीराच्या वेगवेगळ्या अवयवांपासून एकेका देवतेची, ऋषींची निर्मिती केली व त्यांना पुढे सृष्टीनिर्मिती– विस्ताराविषयी आज्ञा दिली. प्रथम सनकादिक चार ऋषी उत्पन्न केले. त्यांना सृष्टीनिर्मिती करण्याची आज्ञा दिली. त्यांनी सृष्टीनिर्मितीला नकार दिला. त्यामुळे ब्रह्मदेवाला राग आला व त्यापासून त्यांनी रुद्र नावाच्या बालकाला जन्म दिला. ब्रह्मदेवाने रुद्राला सृष्टी निर्माण करण्याची आज्ञा दिली. रुद्राने अतिशय विचित्र, भयंकर, अक्राळ-विक्राळ, विद्रूप, तसेच मानव व प्राणी यांच्या शरीराची, अवयवांची सरभेसळ करून अनेकविध प्राणी निर्माण केले व करू लागला व असा सृष्टीचा विस्तार करू लागला. त्याचे जे वर्णन भागवतात आले आहे त्यावरून रुद्राने निर्माण केलेली प्रजा ही सर्व प्राणीमात्र व मानव यांचे किमेराच होते असे दिसते. (सकाळ १६ १० ९९ श्री. सुधीर थत्ते यांच्या लेखातील वर्णनावरून हल्लीचे नाव) म्हणून सर्वात बुद्धिमान असा शेवटी 'श्रीगजानन' हा गणपती म्हणजे सर्वांचा मुख्य असे व्यक्तिमत्त्व निर्माण केले होते असे दिसते.

## विराट पुरुषाच्या शरीरापासून उत्पन्न झालेली सृष्टी

विश्वनिर्मितीचा विचार करता, भागवतात आलेल्या विराटपुरुषाच्या शरीरापासून निर्माण झालेल्या सृष्टीच्या निर्मितीच्या माहितीचा विचार करावयास पाहिजे. विराटपुरुषाच्या (विराट पुरुष व ब्रह्मदेव हे एकच रूप आहे) अंगाअंगातून त्या त्या गुणधर्माचे वस्तुमात्र, पदार्थ, प्राणी निर्माण झालेले आहेत, याचे वर्णन आले आहे. तेव्हा कोणत्या अवयवांपासून काय काय निर्माण झाले आहे ते खालीलप्रमाणे आहे–

मुख = वाणी, अधिष्ठातृ देवता अग्नी, अंगिरा ऋषी. ओठ = लोभ. सप्तधातू = सात छंद (गायत्री, त्रिष्टुप, अनुष्टुप, उष्णिक, बृहति, पंक्ति, जगती). जिह्वा = अन्न, सर्व रस, रसनेंद्रिय आणि अधिष्ठातृ देवता - वरुण. नासिका = पंचप्राण (प्राण, अपान, व्यान, समान, उदान) वायू, घ्राणेंद्रिय, अश्विनीकुमार, समस्त ओषधि, गंध. नेत्र = रूप, तेज, नेत्रेंद्रिय, नेत्रगोलक, स्वर्ग, सूर्याची जन्मभूमी, अत्रिऋषी. कान = सर्व दिशा, पवित्र तीर्थे तसेच आकाश शब्द. पुलस्त्य ऋषी. शरीर = संसारातील

समस्त वस्तूंचा व सौंदर्याचा खजिना. त्वचा = सर्व यज्ञ, स्पर्श, वायू व भृगुऋषी. रोम = उद्भिज पदार्थांचे जन्मस्थान. केश = मेघ. दाढी = बिजली. मिशा = शिला. नखे = लोह. भुजा = लोकपाल, क्रतू. प्राण = वसिष्ठ ऋषी. भुवई = क्रोध. बेंबी = पुलह ऋषी. अंगठा = दक्ष. चरण = असलेल्या वस्तूंचे संरक्षण. भयाला पळवितात. सर्व कामनांची पूर्ती. लिङ्ग = जल, वीर्य, सृष्टी, प्रजापतीचा आधार. पायु = यम, मित्र. गुदद्वार = हिंसा, मृत्यू, नरक, निऋति. पाठ = पराजय, अधर्म, अज्ञान. नाड्या = नद्या. हाडे = पर्वत, काम. हृदय = मन. मन = मरीचि, स्तन = धर्म. पोट = मूळ प्रकृती, रस नावाचे धातू, समुद्र, समस्त प्राणी आणि त्यांचे मृत्यू. चित्त = नारदऋषी, ब्रह्मदेव, सनकादिक, शंकर, देवता, दैत्य, मनुष्य, नाग, पक्षी, मृग, गंधर्व, सरपटणारे प्राणी, अप्सरा, यक्ष, राक्षस, भूत, प्रेत, सर्प, पशू, पितर, सिद्ध, चारण, विद्याधर, वृक्ष आणि नाना प्रकारचे जीव, ग्रह, नक्षत्र, तारे, धूमकेतू ही सर्वच विराट पुरुषाची स्वरूपे आहेत. जे काही होते, आहे व असेल या सर्वांना तो व्यापून आहे आणि हे केवळ एका अंशानेच तयार झाले आहे. गीतेमध्ये भगवंतांनीही असेच म्हटले आहे.

*अथवा बहुनैतेन किं ज्ञातेन तवार्जुन ।*
*विष्टभ्याहमिदं कृत्स्नम् एकांशेन स्थितो जगत् ।।*

*(भ. गीता १० ४२).*

अवयव, त्यांचे गुणधर्म, कार्य व त्यांपासून निर्माण झालेली वस्तू, प्राणिमात्र यांचा जो संबंध आहे त्याचा विचार पुढे केला आहे. सध्या चाललेल्या क्लोनिंगच्या प्रयोगात याचा विचार केला गेला आहे असे दिसत नाही, पण ब्रह्मदेवाने निर्माण केलेल्या वस्तुमात्रांत, प्राणिमात्रांत मात्र त्या त्या अवयवांचे गुणधर्म उतरले आहेत. येथे काही अवयवांचा नमुन्यादाखल विचार केला आहे. त्याप्रमाणे इतरही अवयवांचा व त्यांपासून निर्माण झालेल्या पदार्थांचा विचार करता येईल.

मुखापासून वाणी व अग्नी निर्माण झाले. मुख हे अग्नीचे उगमस्थान आहे. कारण तशी एक देवता आहे की जिच्या मुखातून अग्निज्वाला बाहेर पडलेल्या दाखवल्या आहेत. अग्नी जसा उपकारक तसा सर्वसंहारकही आहे. म्हणून वरदानाने मनुष्याचे कल्याण होते व शापवाणीने सर्वनाशही होतो. शब्द हे अस्त्राप्रमाणे आहेत असे म्हणतात, तेही याच कारणाने. जिह्वेचे जे कार्य तेच तिची निर्मिती होय. सर्व रस, अन्न

यांची निर्मिती जिह्वेकडून झाली आहे. प्राणिमात्रातील रसनेंद्रिय व तिची अधिष्ठातृ देवता वरुण हे जिह्वेपासून निर्माण झाले आहेत. भगवंतांनी गीतेमध्ये 'जलातील रस मी आहे' असे सांगितले आहे. एकूण अन्न, रस, वरुण हे सर्व एकमेकांना सहाय्यकच आहेत. त्या रसांचा आस्वाद घेणारे इंद्रियही त्यापासून निर्माण झाले असल्यास नवल नाही. नासिकेपासून सर्व (दहा) प्राण, घ्राणेंद्रिय, गंध, औषधी निर्माण झाल्या आहेत व त्यांची देवता अश्विनीकुमारही निर्माण झाले आहेत. कानापासून दिशा, आकाश व शब्द. कानाचा शब्दाशी संबंध आहे व ऐकू येण्यासाठी पोकळी, वायुलहरी व दिशा यांचाही संबंध नव्हे, आवश्यकता आहे. त्वचेपासून स्पर्श, रोमापासून– ज्याप्रमाणे रोम सर्व शरीरभर उगवतात त्याप्रमाणे उद्‌भिज पदार्थांचा जन्म झाला. केसांना मेघांची व मेघांना केसांची उपमा दिली जाते, कारण तशीच त्यांची निर्मिती आहे. दाढीचे केस कुरळे असतात व ते वीजसदृश दिसतात म्हणून विजेची निर्मिती दाढीपासून झाली असण्याची शक्यता नाकारता येत नाही. भुजांचे कार्य रक्षण म्हणून भुजांपासून लोकपाल निर्माण झाले. चरणांचे कार्य सेवा, लिंगाचे कार्य पुनरुत्पत्ती; प्रजापती ही देवता, वीर्य व जल यांची निर्मिती लिंगापासून. नाड्या या नद्यांप्रमाणे शरीरात पसरलेल्या आहेत व त्या सर्व शरीराला रक्तपुरवठा करतात. अगदी याच धर्तीवर नद्या या सर्व सृष्टीमध्ये पसरलेल्या असून पाणीपुरवठा करतात. हृदय हे मनाचे जन्मस्थान आहे. ज्याप्रमाणे हृदयाशिवाय शरीर उभे राहू शकत नाही, तसे मनाशिवाय मनुष्य असूच शकत नाही. मन आहे म्हणून प्राण्यांमध्ये मनुष्य हा वेगळा, बुद्धिमान प्राणी झाला आहे. मनच सर्व संकल्प करते, त्या संकल्पपूर्तीसाठी कार्य करते, करवून घेते. जसे हृदयाचे अनन्यसाधारण महत्त्व आहे तसे मनाचेही अनन्यसाधारण महत्त्व आहे. हृदय-मन याआधीच्या अवयवांपासून झालेली सृष्टी जड आहे. तिच्यामध्ये कधीही फरक पडणार नाही. अनादिकालापासून झालेली ती जशी होती तशीच ती आजही आहे व अनादिकालापर्यंत तशीच राहणार आहे. त्या जडसृष्टीत उत्क्रांती होऊ शकत नाही, पण मानवाला मन दिले असल्याने त्याच्या ठिकाणी विचारशक्ती आहे व योजकशक्ती आहे व त्याप्रमाणे कार्य करण्याचीही शक्ती आहे. त्यामुळे तो उत्क्रांत होऊ शकतो, उत्क्रांत होत आहे व उत्क्रांत होत राहील, यात शंका नाही. चित्त ही संस्काराची जागा आहे. चित्त हे सत्त्व, रज व तमात्मक असे त्रिगुणी आहे. त्यामुळे त्याच्यापासून जे निर्माण झाले ते जसे सर्वात उत्तम असेल तसे ते सर्वात खराबही असेल. हृदय, चित्त, सोडून बाकीचे अवयव हे सर्व एका विशिष्ट गुणाचे कार्य करणारी इंद्रिये आहेत. ती इंद्रिये सर्व प्राणिमात्रांच्या ठिकाणी एकाच प्रकारचे कार्य करतात. त्यांच्यावर संस्कारच होऊ शकत नाही. त्यामुळे चांगल-वाईट असे कार्य

करणे हे त्यांच्या अखत्यारीत नसते. तसे मन व चित्त यांचे नसते. मनाला चांगले वळण लावले, चांगले संस्कार केले की मन चांगले कार्य करते. 'मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयो:।' असे श्रुतिप्रमाण आहे. तसेच चित्तातून उत्पन्न होणाऱ्या विचारलहरी यासुद्धा ज्या पद्धतीचे चित्तात संस्कार आहेत त्या पद्धतीनेच उत्पन्न होणार. चांगल्या संस्काराने चांगले विचार तर वाईट संस्काराने वाईट विचार. मूळ ईश्वराच्या ठिकाणी असे चांगले व वाईट विचार का निर्माण झाले, असा प्रश्न निर्माण होतो. तर तसे नव्हे. ईश्वराच्या ठिकाणी सदैव चांगलेच निर्माण होत असते, झालेले आहेत. वाईटाचा प्रकार आपोआप निर्माण होतो, तयार होतो. नाणी तयार करताना एक बाजू तयार केली जाते तर दुसरी बाजू आपोआप तयार होते. मुख हे अन्नग्रहणासाठी तयार की आपोआप मलविसर्जनासाठी गुदाची निर्मिती झाली. औषधी निर्माण झाल्या की त्या विरोधात रोग निर्माण होणार हे ठरलेलेच आहे. प्रकाश निर्माण झाला की विरोधात छायाही आपोआप निर्माण झाली. 'खरे बोलावे' हा उपदेश आला की आपोआपच 'खोटे बालू नये' हा उपदेश येतोच. धर्म-अधर्म, सत्य-असत्य, चैतन्य-जड, देव-दानव अशा अनेक जोड्या आहेत. म्हणून चांगल्याची निर्मिती देवांनी केली तर वाईटाची निर्मिती दानवांनी केली असे म्हणतात. म्हणून चित्तातून या सर्वांचीच निर्मिती झाली आहे.

विज्ञानाच्या दृष्टीने विचार करता ब्रह्मदेवाच्या शरीरातील वेगवेगळ्या अवयवातून पेशी काढून त्यांपासून त्या त्या गुणधर्मांचे प्राणी, वस्तू तयार करण्यात आल्या असतील, असेही म्हणता येईल. असेच वरील विवेचनाने दिसते.

अशा प्रकारे सृष्टीची निर्मिती झाली आणि पुढे सृष्टीचा विस्तारही झाला, तसा विकासही झाला, उत्क्रांती झाली. या उत्क्रांतीचा विचार करता सहज म्हणून परमेश्वराच्या अवतारांचा क्रमही आठवला आणि विशेष म्हणजे त्याच्या अवताराचा क्रम व उत्क्रांती तत्त्वाचा क्रम हा अगदी मिळताजुळता आहे असे दिसते. भगवान विष्णूच्या अवताराचा क्रम मत्स्य, कूर्म, वराह, नरसिंह, वामन, परशुराम, राम, बैद्ध व कृष्ण असा आहे. (आतापर्यंत झालेले अवतार) सृष्टीची उत्पत्ती ही पाण्यापासून सुरू झाली आहे. म्हणून प्रथम मत्स्य, पाणी व जमीन या दोहोंवर वावरू शकणारे असे उभयचर प्राणी म्हणजे कासव, म्हणून दुसरा अवतार कूर्म, नंतर पूर्ण भूचर– वराह हा अवतार झाला. प्राणी आणि मानव यांमधील दुवा म्हणजे अर्धप्राणी व अर्धमानव म्हणून नरसिंह किमेरा हा त्या प्रकारच्या प्राण्यांचे प्रतीक होय. नागकन्या, मस्त्यकन्या, तुंबरू (घोड्याचे तोंड व मानवी शरीर) अशा काही प्राण्यांच्या जातीची नावे आहेत.

आतापर्यंत तमोगुणाची सृष्टी होती. आता रजोगुणी सृष्टीच्या निर्मितीची सुरुवात झाली, ती प्रथम वामन अवताराचे प्रतीक घेऊन. मानवाची बुद्धिमत्ता व त्याची क्षमता ईश्वराच्याही बरोबरची असू शकते हे दाखविण्यासाठीच जणू वामनाने महाकाय रूप धारण करून सर्व विश्व व्यापून टाकले होते. रजोगुणाचा विकास म्हणजे ही सर्व सृष्टीच होय. परशुराम हा अवतार हा मूर्तिमंत रजोगुणाचा पुतळा. त्याने दुष्टप्रवृत्तीचा पूर्ण संहार केला. त्या कार्यात त्याने विवेकाला, विचाराला जागा दिली नाही. ती उणीव सत्त्वगुणप्रधान अशा रामाने भरून काढली. संहाराबरोबर विवेक, उपभोगाबरोबर त्याग, निरागस वृत्ती, आणि सर्व प्राणिमात्रांशी सख्य ठेवण्याकडे कल असा हा अवतार झाला. आणि त्यापुढे कृष्ण अवतार. या अवताराला पूर्णावतारच म्हणतात. कृष्णाच्या ठिकाणी पूर्ण मानवत्व, पूर्ण देवत्व यांचा सुरेख संगम झालेला आहे. देवत्व म्हणजे मानवाचे पूर्णत्व, वर्तुळाचे पूर्णत्व असा हा अवतार आहे.

अशा प्रकारे सृष्टीची उत्पत्ती झाली, विकास झाला, विस्तार झाला, व पूर्ण विकसित असा मानवही निर्माण झाला असला तरी मत्स्य, कूर्म, वराह हे सर्व प्राणी अजूनही अस्तित्वात आहेत. याचा अर्थ असा की निसर्गाने (परमेश्वराने) हा विकास घडवून आणला असला तरी मत्स्य, कूर्म, वराह हे प्रकार नष्ट झाले नाहीत, कारण ते सृष्टीच्या विकासातील टप्पे असून त्यांची गरज आहे. आता मानवनिर्मित कापसापासून धागा, धाग्यापासून कापड व कापडापासून वेगवेगळी वस्त्रे जरी तयार करता आली असली तरी कापसाची गरज नष्ट झालेली नाही. अगदी याच विचाराने निसर्गाने विकास करून मानवापर्यंत जरी मजल मारली असली तरी मागील सर्व अवस्था (पायऱ्या) ही निसर्गाची गरज आहे. हेच त्यांच्या आतापर्यंतच्या अस्तित्वावरून दिसून येते, कळून येते, सिद्ध होते.

'माणूस कोणाला म्हणावयाचे' हा श्री. सुधीर थत्ते यांचा लेख १६ १० ९९ रोजी सकाळमध्ये आला होता. त्यावरून अशी खात्री होते की आपल्या वेद, पुराणे या धर्मग्रंथांतून ज्या ज्या प्रकारच्या सृष्टीचे वर्णन केले आहे, त्या केवळ कविकल्पना नव्हत्या तर त्यांत खूपच सत्यांश आहे. त्या वेळी अशी सृष्टी होती. त्या वेळी कदाचित, ('कदाचित्' म्हणण्याचे कारण आताचे विज्ञानवादी म्हणतील की आत्ताच्यासारखी प्रगत साधने त्या वेळी नव्हती, की जेणे करून डीएनए, आरएनए यांत काही बदल करून काही पेशी, जीन्स यांचे रोपण करून वा त्यांतील काही कमी करून कोणाच्या गर्भाशयात त्याचे रोपण करणे शक्य होईल, प्राण्यांचे क्लोनिंग करून नवीन प्राणी तयार करणे वगैरे) कोणी एखाद्या शास्त्रज्ञाने अशा प्रकारचे प्रयोग केले

असतील, शस्त्रक्रिया केल्या असतील; नाही तर निसर्गच हा सर्वात मोठा संशोधक आहे, शास्त्रज्ञ आहे की त्यानेच त्याच्या गरजेनुसार हे विविध पेशींचे संयोजन घडवून आणून हे प्राणी जीवन, वनस्पती जीवन उत्क्रांत केले असेल व आजच्या स्तरापर्यंत आणून सोडले असेल. पाश्चिमात्यांना प्रयोग करून पाहण्याची उत्सुकता आहे, आवड आहे, संशोधक वृत्ती आहे म्हणून आज आपण आपल्या पूर्वीच्या पौराणिक कथांना त्यांचा आधार घेऊ शकत आहोत. नाही तर ते ज्ञान केवळ कविकल्पनेतच पडून राहिले असते. तरीही अजून पुष्कळ प्रकारे प्रयोग होऊन या उत्क्रांत तत्त्वावर विचार व्हावयास पाहिजे. असो.

## वेदविज्ञानाप्रमाणे जगाची उत्पत्ती व विस्तार

साशन (Organic) सृष्टीच्या आरंभी कोणते मूलतत्त्व आहे की ज्यातून या सृष्टीचा उगम झाला? व जे आहे त्याचे स्वरूप कसे आहे? जीव-विज्ञानशास्त्राप्रमाणे हे आद्य जीवरसात्मक तत्त्व उज्ज-प्राणादी अनशन (Inorganic) सृष्टीत सिद्ध असलेल्या अनेकविध मूलद्रव्यांच्या रासायनिक संमिश्रणाने बनले असून अर्धवट प्रवाही स्वरूपाचे एकविध आहे. त्यात कर्बद्रव्याचा अधिक अंश असल्यामुळे त्याला कर्ब-संमिश्रण (Carbon Compound) म्हणण्यात येते. अशा आद्यजीवरसातून पुढील सर्व प्रकारच्या जीवसृष्टीची निर्मिती झाली. तीत प्रथम बीजरहित एक पिंडात्मक जीवदेह (Unnucleated, unicellular protists) उद्भवले आणि नंतर त्यातून पुढे बीजयुक्त जीवपिंडाची उत्पत्ती झाली. बीजवान जीवपिंड (Nucleated cell) म्हटला की त्याला दोन विभाग आलेच. १) बीजदेह (Nuclear) आणि २) पिंडदेह (Cytos) या दोहोंमध्ये त्यांच्या आकारमानाने जे जीवरसाचे अंश असतात त्यात स्थानपरत्वे गुणधर्म निराळे होतात. आता पिंड यद्यपि बीजवान् असला तरी निरवयव असतो आणि म्हणून त्यात कसलाच स्त्री किंवा पुरुष असा लिंगभेद उमटत नाही. जीवदेहाच्या नियमानुसार त्यात मूळ क्षुधाविकार असतो आणि तदनुसार तो अन्नग्रहणार्थ धडपड करतो. तथापि क्षुधा ही काही मानसिक वृत्ती नाही तर केवळ शारीरिक परिस्थिती आहे. अशा क्षुधेच्या शमनार्थ त्याला ज्या बाजूने अन्न दिसेल त्या बाजूने तो आपल्या प्रसरणशील देहातून जितके कर प्रसृत करता येईल तितके पसरून व जेवढे अन्न ग्रहण करता येईल तेवढे घेऊन ते आत्मसात करतो. हेच त्याचे पोषण. ‘तथापि पोषण हे काही त्याचे अंतिम साध्य नव्हे. त्याचे अंतिम साध्य म्हणजे बलाचे संवर्धन होय. पोषण ही केवळ तदनुषंगाने सहज समापत्ती आहे. बलाचे संवर्धन खुंटले

की तेथे जे वैक्लव्य (गोंधळ) उत्पन्न होते त्यात त्याचे फुटून दोन तुकडे होतात. हेच त्या आद्यजीवाचे मूळ प्रजोत्पादन होय. जीव शरीराचा मुख्य नियम वृद्धी, अधिक वृद्धी, अधिकाधिक वृद्धी होय. पोषणात ही वृद्धी एका देहापुरती असते. परंतु प्रजोत्पादनात मात्र ती एकाचे दोन तुकडे पडून आणि पुढे दोहोचे चार, चाराचे आठ, आठाचे सोळा असे उत्तरोत्तर विभाग होत जाऊन असंख्य समकार्य करण्यात समगुणांच्या समरूप पिंडदेहात परमोत्कर्ष पावते.




१. पिंडदेहातील स्पंजाकार जीवरसाचा भाग २. पिंडदेहातील फेसाकार जीवरसाचा भाग
३. केंद्रदेहाची तारका आणि त्यातील दोन केंद्रबिंदू ४. अंतर्बीजाचे कवच ५. बीजकबिंदू
६. पिंडदेहातील लहान मोठे पोकळ भरीव कण

मूळ जीवसृष्टीची उत्पत्ती पाण्यात आहे आणि वृद्धी पृथ्वीवर आहे. कारण मूळ आद्यबीजद्रव्य रसात्मक आहे. म्हणून ज्याप्रमाणे पाण्याच्या पृष्ठभागावर वायूच्या योगे बुडबुडे उद्भवतात त्याप्रमाणे या आद्यजीवरसावर त्यातील गतीच्या योगे मूळारंभी साधे देहाकार (Cytodes) स्फुटता पावतात. या बुब्दुदाकार देहात अंतर्बीज नसते. तथापि त्यात जीवनाचे पुढील सर्व व्यापार चाललेले दिसतात. १) मन व त्याचा परिणाम संवेदना. २) संवेदनेने अन्नग्रहण व त्याचा परिणाम पोषण. ३) पोषणाने वर्धन व

त्याचा परिणाम प्रजोत्पादन, या प्रकारे बुब्दुदाकार आद्यजीव देहाची सिद्धी दोन प्रकारे होते. १) मूळ आद्य जीवरसात्मक द्रव्यात ठायी ठायी प्रस्फोट होऊन व २) एका बुब्दुद देहातून दुसरा कलल उद्भेद पावून या उद्भेदाने बनलेल्या कललात कालांतराने जेव्हा अन्तर्बीज उमटते तेव्हा तोच बुब्दुदाच्या व कललाच्या किंचित वरच्या दर्जाचा पिंडदेह (cell किंवा Cytula) सिद्ध होतो. हा पिंडदेह पुढील सर्व उच्च जीवसृष्टीचा आद्य घटक आहे. मानवदेहासारख्या अत्युन्नत जीवदेहाच्या रचनेत जे अनेकविध परमाणू सदृश जीवदेह व्यापून आहेत ते अन्तर्बीजरहित बुब्दुदाकार नाहीत, तर अन्तर्बीज पिंडाकार आहेत. * म्हणजे मानवदेह हा रक्तपिंड, मज्जापिंड, स्नायुपिंड, अस्थिपिंड, रेतपिंड, इत्यादी नाना गुणकर्मात्मक असंख्य पिंडदेहाच्या संगतिकरणात बनला आहे. आणि हा प्रत्येक अंतर्बीजयुक्त पिंड स्वतंत्र जीव धारण करणारा आहे.

---

* या ठिकाणी केवळ मानव देहातील पिंडाचाच विचार केला असला तरी तो अखिल सजीवांस म्हणजे वनस्पती व प्राणिमात्रांस लागू होण्यासारखा आहे. कारण सध्या जे क्लोनिंग करून नवीन मेंढीला जन्म दिल्याचे प्रसिद्ध झाले आहे, त्याचप्रमाणे मानवाच्याही पेशींचा उपयोग करून क्लोनिंग पद्धतीने नवीन मानवी देह निर्माण करता येण्याची शक्यता बोलली जाते. त्याचे बीज या पिंडात्मक पेशींबाबत पूर्वीच्या ऋषीमुनींनी केलेल्या विधानातून स्पष्ट होत आहे. रामायणातील अहिरावण, महिरावण व प्रभू रामचंद्र यांच्यात झालेल्या युद्धाच्या वेळी महिरावण याच्या रक्ताच्या प्रत्येक थेंबापासून तसाच महिरावण उत्पन्न होत होता. या कथेचा संबंध मानवी क्लोनिंग पद्धतीच्या उत्पादनाशी व वर उल्लेखलेल्या गुणकर्मात रक्तपिंडाशी जुळत आहे, असेच विचार करता दिसून येते. त्याचप्रमाणे प्रथम सृष्टीनिर्मितीच्या वेळी ब्रह्मदेवानेही आपल्या शरीरातील वेगवेगळ्या अवयवांपासून वेगवेगळ्या देव, देवता, प्राणी, वनस्पतीरूप सृष्टी निर्माण केल्याचा उल्लेख आधीच आला आहे. शिवाय वरील वाक्यात 'गुणकर्मात्मक' हा शब्द विशेष करून लक्ष वेधून घेतो की, ज्या ज्या अवयवांपासून जे जे उत्पन्न केले ते ते त्या त्या गुणधर्मांनी युक्त असेच होते. यावरून भागवतात वा पुराणात ज्या काही कथा आल्या आहेत, त्यांच्यामागे शास्त्रीय उपपत्तीचा निश्चितच आधार आहे, पण हे सर्व सर्वसामान्य जनांपर्यंत पोहचविण्याकरिता त्या वेळी शास्त्रीय विश्लेषणाचा आधार न घेता कथारूपाने त्यांची मांडणी केली गेली असे दिसते. कारण हे शास्त्रीय विश्लेषण सर्वसामान्य जनांना कळले नसते. जे कोणी वेदज्ञानी असतील वा होतील त्यांना ही शास्त्रीय उपपत्ती लक्षात येईलच असा त्यांनी त्या वेळी विचार केला असेल व जे कोणी अज्ञानी जन असतील त्यांची या गोष्टीवरील श्रद्धाच त्यांना त्यांच्या ज्ञानप्राप्तीला व उन्नतीला कारण होईल. कारण गीतेत म्हटलेच आहे की,

*'श्रद्धावान् लभते ज्ञानम् ।'*

आता मूळ साधे जे बुब्दुदाकार जीवस्फोट शाश्वत त्याच स्थितीत असतात, त्यांना 'मोनेरा' = मूलैक अविकार्य पिंड ही संज्ञा आहे. त्यातील जीवनरस अगदी मूळ स्वरूपाचा, बिनआकाराचा, मृदू व सांद्र असतो. त्याला 'प्लेसॉन' = मूळ जीवन-धाररस हे नाव आहे. हा 'प्लेसॉन' रसायनशास्त्रामध्ये 'अल्ब्युमिन' वर्गात म्हणजे श्वेतकल्क कल्पात नत्रीयकर्ब-संमिश्रण (Nitrogenouscarbon Compound) म्हणून गणण्यात येतो आणि त्यातच जिवाचे संवेदन, पोषण, अन्तर्वर्धन, प्रस्फोटन व स्वयंचलन हे गुण सिद्ध होतात. या प्रकारे हे रासायनिक संमिश्रण संपूर्ण जीवसृष्टीला आश्रयभूत आहे. हे संमिश्रण मूळ साध्या स्वरूपात बुब्दुदात होते. नंतर कल्लात ते किंचित विकास पावते व शेवटी पिंडदेहाच्या ठिकाणी त्याचे दोन भाग होतात. १) बीजातील जीवरस व २) पिंडातील जीवरस. मूळ बुब्दुदाकार किंवा कललाकार जीवस्फोटात बीज नाही. म्हणजे कसलेच अवयवरूप किंवा इंद्रियरूप नाही. तथापि हे जीवस्फोट द्विविध आहेत. १) औषधीजनक जीवस्फोट (Phyto-Monera) व २) अनधीजनक जीवस्फोट (Zoo Monera). औषधी = ज्या ठिकाणी 'ओष' म्हणजे अशनाला उपयुक्त असा अन्नरसपाक धारण केला जातो. अशी वनस्पतीसृष्टी, अनधी = ज्या ठिकाणी 'अन्न' म्हणजे जीवनाला कारणीभूत असा श्वासोच्छ्‌वास धारण केला जातो अशी प्राणीसृष्टी. पहिला स्फोट हिरवा किंवा निळा असा रंगात्मक असतो म्हणून त्याला 'क्रोमॅशिया' = रंगात्मक जीवस्फोट असे नाव आहे. पाण्यातील शेवाळ हे त्याचे उदाहरण होय. दुसरा स्फोट प्राणीसृष्टीतील आद्यजंतू होय. त्याला 'बॅक्टेरिया' = सूक्ष्मदंडाकार जंतू ही संज्ञा आहे. तथापि तो गोल, दंडाकार, सर्पिल, तत्त्वाकार असा चतुर्विध आहे.

हे दोन्ही आद्यजीवाणू (Protists) अंतर्बीजविहीन असले आणि म्हणून समसमान दिसले तथापि त्यांच्या पोषणकर्मात भेद असतो. एकाचे पोषण प्रत्यक्ष पंचमहाभूताकार घडते तर दुसऱ्याचे शुद्ध जीवरसावर चालते. म्हणून एक आद्यवनस्पती स्फोट (Proto-Phyta) हा पंचमहाभूतापासून आद्यजीवरस बनविणारा असतो तर दुसरा आद्यप्राणीस्फोट (Proto-Zoo) हा त्या रसाला भक्षण करणारा होतो. जीवसृष्टीत असे हे दोन पृथक् जीवरसाचे उत्पादक व संहारक वर्ग आहेत. त्या दोहोंवर मिळून जीवसृष्टीची धारणा अवलंबून आहे. या दोहोंत वरील प्रकारे जरी पोषण भिन्न असले तरी उत्पादन मात्र एकाच रीतीने उद्‌भेदनाने घडून येते. पोषणमार्गात हे दोन्ही जीवस्फोट आपआपल्या परीने खाऊन ते आत्मसात करतात. आणि काही एका सीमेपर्यंत वृद्धी पावले म्हणजे फुटून दोन होतात. या दोहोंत माता कोण आणि पिता कोण हे समजण्यास मार्ग नसतो.

कारण दोन्ही समान आकार विकाराचे असतात आणि त्यायोगे समकार्य करून जीवन चालवतात. म्हणजे खातात, वाढतात व फुटून दोन होतात.

आता या साध्या बिनआकाराच्या जीवस्फोटातील आद्यजीवरसात विकास होऊन जे वरच्या दर्जाचे देह बनतात ते पिंडाकार असतात म्हणून वर सांगितले. अशा देहाला युरोपातील शास्त्रीय परिभाषेत चुकीने 'सेल' ही संज्ञा देण्यात आली आहे आणि तिला अनुसरून मराठी भाषेत 'पेशी' हे नाव प्राप्त झाले आहे. पण सेल किंवा पेशी ही जशी पोकळ असते तसा हा देह पोकळ नसतो. अर्थात त्यात भरून असलेल्या जीवरसाकडे पाहून व त्यातील पोषण, वर्धन, उत्पादन घडवून आणणारी जीवशक्ती लक्षात घेऊन त्याला 'पिंड' हा शब्द लावणे यथायोग्य ठरते. या पिंडात जीवशक्तीने जे कार्य घडून येते ते अन्तर्बीजाचे प्रस्फोटन होय. त्यायोगे पिंडातील आद्यजीवरसात दोन विभाग पडून मूळच्या बुब्दुदसदृश निरवयव अतएव निराकार देहाला जो विशिष्ट आकार प्राप्त होतो त्यात दोन अवयव सिद्ध होतात. १) बीजभूत अवयव व २) पिंडभूत अवयव. पिंडातील जीवरस सांद्र व मृदू असतो. बीजात तो किंचित घट्ट व कठीण होतो. त्या कारणाने दोहोंत निरनिराळ्या गुणधर्मांची वाढ होते व त्यांची कार्येंही निरनिराळी बनतात. जीवसृष्टीतील या मूळ प्रकृतिपिंडाला 'अमिबा' अशी संज्ञा आहे. आणि जीवोत्क्रांतीशास्त्राने हा अमिबा पुढील अनेकपिंडात्मक उच्च सावयव जीवशरीरांचा आद्यघटक मानला आहे. याचे विभाजन मागील साध्या मोनेरोच्या विभाजनापेक्षा अधिक संश्लिष्ट आहे. कारण त्याच्या ठायी आता नुसता एकच साधा बीजबिंदू नसून त्या बीजाचे आत दुसरा बीजक आहे आणि शिवाय पिंडात निराळा एक केंद्रदेह सिद्ध झाला असून त्या दोहोंच्या संयोगात प्रथम बीजाचे आणि नंतर पिंडाचे उद्‌भेदन होणार आहे. हे उद्‌भेदन मोनेरोच्या उद्‌भेदनाप्रमाणे मूळच्या साध्या बीजात प्रत्यक्ष खंड पडून होत नाही तर केंद्रदेहात एक तर्कुट बनून तद्वारे तीन अवस्थांतरांतून अप्रत्यक्षपणे घडून येते. याला युरोपी भाषेत 'मायटोसिस' किंवा 'कारिओकायनेसिस' (बीजोद्‌भेदन प्रधान पिंडोद्‌भेदन) अशी संज्ञा आहे. 'मायटोसिस' हा शब्द ग्रीक 'मिटॉस' = तंतू यापासून बनला आहे. व 'कारिओकायनेसिस' हा शब्द 'कारुऑन' = बीज आणि किनेसिस = गती यापासून सिद्ध झाला आहे. जीवसृष्टीत जे जीवकर्म चालते ते जीवशक्तीने होय. विश्वामध्ये जीवसृष्टी हे जसे आजीव सृष्टीचे परिणत रूप आहे. तसेच जीवशक्ती हे त्या विश्वातील सर्वव्यापी भौतिक शक्तीचे परिणत रूप आहे. म्हणून मूळ भौतिक शक्ती (Cosmical Energy) हीसुद्धा पोषणोत्पादनात्मक चयापचयरूप द्विविध आहे.

## महास्फोट – **Big Bang**

प्रथम प्रचंड स्फोट झाल्यानंतर काहीच कालावधीमध्ये फोटॉन्सकडून (Photons) प्रोटॉन्सचे (Protons) आणि ॲन्टीप्रोटॉन्स (Anti-Protons) चे महाप्रचंड वस्तुमान तयार झाले आणि त्याचप्रमाणे क्वॉर्क्स (Quarks) आणि ॲन्टीक्वॉर्क्स (Anti-Quarks) ही तयार झाली. फोटॉन्समधील सुप्तशक्तीच्या साह्याने प्रोटॉन्स व ॲन्टीप्रोटॉन्सचे हलक्या वस्तुमानाच्या जोड्या तयार झाल्या. त्यांची इलेक्ट्रॉन्स (Electrons) आणि पोझिट्रॉन्स (Positrons) अशी नावे आहेत. प्रोटॉन्स आणि इलेक्ट्रॉन्स यांच्यामध्ये प्रक्रिया होऊन न्यूट्रॉन्स (Neutrons) तयार झाले. अशा प्रकारे केवळ फोटॉन्स, इलेक्ट्रॉन्स यांनीच सर्व पोकळी भरून गेली. प्रोटॉन्स व न्यूट्रॉन्स यांच्यामधील प्रक्रियेमुळे न्यूक्लिय (Nuclci) म्हणजेच अणू तयार झाला. त्याचे नाव डेटेरिअम (Deuterium) आणि हेलियम (Helium-Plus) आणि थोड्या प्रमाणात बेरेलियम (Berylium) आणि लिथियम (Lithium) तयार झाले. इलेक्ट्रॉन्स आणि वरील अणू यांच्या संयोगाने हायड्रोजन आणि हेलियम तयार झाले आणि पुढे हळूहळू हायड्रोजन व हेलियम यांचे ढग तयार झाले.




महास्फोट The Big Bang

त्यांच्यामध्ये गती निर्माण होऊन त्यांचे एक स्वत:भोवती फिरणारे वस्तुमान तयार होऊ लागले. यालाच दीर्घिका, आकाशगंगा (Galaxy) म्हणतात. तेव्हा त्यांचा आकार प्रचंड होता. या ढगांमधूनच अनेक ग्रह-तारे यांचे जन्म झाले. अशा अनेक दीर्घिकांपैकी आपली एक आकाशगंगा आहे व त्या आकाशगंगेमध्ये आपली सूर्यमाला आहे. आपल्या सूर्याभोवती फिरणाऱ्या ग्रहामध्येच आपली पृथ्वी आहे. आपल्या पृथ्वीवरच केवळ पाण्याचे अस्तित्व आहे म्हणून आपल्याकडेच जीवसृष्टी आहे.

श्रीमद्भागवतात अशाच प्रकारचा क्षोभ (स्फोट) झाल्याचा उल्लेख आहे व तो कशाचा झाला हेही त्यांनी सांगून ठेवले आहे. तो संदर्भ असा आहे–

*दैवेन दुर्वितर्क्येण परेणा निमिषेणच ।*
*जात क्षोभाद्भगवतो महानासीद्गुणमयात् ॥*

*(स्कंद ३, अध्याय २०, श्लोक १२).*

मैत्रेयऋषी म्हणाले, "विदुरा, ज्याची गती जाणणे अत्यंत कठीण आहे, अशा जिवांचे प्रारब्ध, प्रकृतीचा नियंता पुरुष आणि काल या तीन हेतूंनी आणि परमेश्वराच्या सन्निधपणाने त्रिगुणमयी प्रकृतीमध्ये क्षोभ (ह्या क्षोभाविषयी पुढे सविस्तर उल्लेख आला आहे) होण्याने महत्तत्त्वाचे निर्माण झाले. परमेश्वराच्या प्रेरणेने रज:प्रधान महत्तत्त्वापासून वैकारिक (सात्त्विक), राजस व तामस असा तीन प्रकारचा अहंकार उत्पन्न झाला व त्यातून आकाशादी पाच-पाच तत्त्वांचे अनेक वर्ग (पञ्चतन्मात्रा, पञ्चमहाभूते, पाच ज्ञानेंद्रिये, पाच कर्मेंद्रिये आणि त्यांच्या पाच-पाच देवता यातच समाविष्ट आहेत असे समजावे) प्रकट झाले. हे सर्व वेगवेगळे राहून भूतांची कार्यरूप ब्रह्मांडाची रचना करण्यास असमर्थ होते, म्हणून परमेश्वरी शक्तीच्या साह्याने त्यांचे परस्पर संगठन झाले आणि त्यातूनच ब्रह्मदेवाचा जन्म झाला.

त्याचप्रमाणे एकनाथी भागवतातही संत एकनाथांनी कपिल गीतेमधील १९व्या श्लोकावर केलेली टीकाही महास्फोटाचा उल्लेख करते. त्यात ब्रह्म, माया आणि कालगती यांचे ऐक्य दाखवते.

*माया ब्रह्मीची शक्ती जाण । तेही ब्रह्मेसी असे अभिन्न । वेगळी नव्हे अर्धक्षण ।*
*सदा सुलीन ब्रह्मेसी ॥ जेवी शूरांची शौर्यशक्ति पूर्ण । शूराहून नव्हे भिन्न ।*
*तेवी ब्रह्मी मायाशक्ति जाण । असे सुलीन सर्वदा ॥ माया ब्रह्मी असता जाण ।*
*क्षोभेविण नव्हे सर्जन । मायाक्षोभकू काळ पूर्ण । काळास्तव जन जन्मती ॥*

*ब्रह्मीची सत्ता तो काळ जाण । प्रकृति क्षोभवून आपण । दावी उत्पत्ति स्थिती निदान । तो काळहि अभिन्न ब्रह्मेसी ॥ जेवी रायाच्या राजपुत्रासी । राजाचि दमू शके त्यासी । तेवी झाले जे प्रकृतिचे कुशी । ते निजसत्तेसी निर्दळी ॥ विवेकदृष्टि पाहता जाण । सकळ परमात्मा दोन्ही अभिन्न । प्रकृति पुरुष काळ जाण । तिहीसी एकपण या हेतु ॥ ब्रह्म-माया-काल संबंध । हे तिनी मूळीचि अभेद । दिसे जो व्यवहारिक भेद । तो हि अबद्ध मिथ्यात्वे ॥ वस्तु एकलःचि आपण । प्रकृति-पुरुष काळरूपे जाण । अखंडत्वे दाविता पूर्ण । तो मी श्रीकृष्ण परमात्मा ॥ उत्पत्तिपूर्वी मी ब्रह्मपूर्ण । उत्पत्तिचे मी ब्रह्म आदिकारण । स्थिती काळी मी ब्रह्मरूपे जाण । एकी अनेकपण स्वये दावी ॥*

*(अध्याय २४, ओवी ४८० ते ४८८).*

या विधानाला रामदासस्वामी यांच्या दासबोध या ग्रंथातूनही पुष्टी मिळते. पंचमहाभूतांच्या निर्मितीचा क्रम सांगताना रामदासस्वामी म्हणतात,

*आकाशापासून वायो होतो । हा तो प्रत्यये येतो । वायोपासून अग्नि जो तो । सावध ऐका ॥ वायोची कठीण घिसणी । तेथे निर्माण जाला वह्नि ।*

*मंद वायो सीतळ पाणी । तेथूनि जाले ॥ आपापासून जाली पृथ्वी । ते नाना बीजरूप जाणावी । बीजापासून उत्पत्ति व्हावी । हा स्वभावचि आहे ॥*

*(दशक ११ समास १, ओवी १ ते ३ दासबोध)*

वायूपासून अग्नी निर्माण झाला. तो वायू साधा नव्हता. तर 'कठीण घसणी' म्हणजे वेगाने वाहणारा, प्रचंड वेगाने वाहणारा होता म्हणून त्यातून अग्नी निर्माण झाला. अग्नीपासून पाणी निर्माण झाले. असाच एक प्रयोग न्यूझीलंडमधील ऑकलंड येथील हायड्रोक्स कॉर्पोरेशनने केला आहे. त्यांनी पाण्याचे हायड्रोजन व ऑक्सिजन या दोन वायूंमध्ये विघटन करून त्यापासून प्रोपेन व ऑक्सी ॲसिटोलिन हे ज्वालाग्रही वायू तयार केले. हे वायू इलेक्ट्रॉनिक यंत्रणेद्वारे या यंत्रात तयार होतात. असे २८ ७ ८८ गुरुवारच्या सकाळमध्ये आले होते, पण निसर्गच आपल्या प्रयोगशाळेत असे वायूपासून अग्नी व अग्नीपासून पाणी तयार करून, पाण्यापासून पृथ्वीची निर्मिती करतो. या परिवर्तनाला दासबोधात रामदासस्वामींनी 'आकाशाचा कर्दम वायू, वायूचा कर्दम अग्नी, अग्नीचा कर्दम पाणी व पाण्याचा कर्दम पृथ्वी असे म्हटले आहे. (दशक ९ समास ६, ओवी ११ ते १९ दासबोध).

पाण्यापासून जिवाची उत्पत्ती झालेली आहे, याविषयी दासबोधात स्वामी म्हणतात,

*'त्या निरामध्ये जीव असती । पाहो जाता असंख्याती । त्या विशाल जीवांची स्थिती । कोण जाणे ॥ जेथे जीवन तेथ जीव । हा उत्पत्तिचा स्वभाव । पाहता याचा अभिप्राव । उदंड असे ॥ पृथ्वी गर्भी नाना नीरे । त्या नीरामध्ये शरीरे । नाना जिनस लहान थोरे । कोण जाणे ॥'*

*(दशक १५, समास ८, ओवी १६ ते १८ दासबोध).*

जीवनाला उदकच अत्यावश्यक आहे हे निश्चितच होय. म्हणून ज्या ग्रहावर पाणी नाही त्या ठिकाणी जीवसृष्टीची शक्यताच नाही असे ठरते. कारण प्राणीजिवाच्या ज्या चार खाणी आहेत (जारज, स्वेदज, मणिज, उद्भिज) या प्रकारामध्ये मोठ्या प्रमाणात जलांश असतो असे वर्णन आहे. तसेच पंचमहाभूते, मन, बुद्धी अहंकार यांची संयुगे समतोल झाली की त्या ठिकाणी उत्पत्ती होते, असे भगवंत गीतेमधील अध्याय सातमधील चौथ्या श्लोकातही म्हणतात. या संयुगांची प्रमाणे प्रत्येक जिवाप्रमाणे वेगवेगळी असतात आणि त्यामुळेच इतके असंख्य प्राणी, जीव निर्माण झाले. या चार प्रकारच्या खाणींमधून चौऱ्यांशी लक्ष योनी निघाल्या आहेत आणि जिवाच्या या उत्पत्ती अवस्थेला श्रीज्ञानेश्वर महाराज साम्यावस्था म्हणतात.

*'या आठांची जे साम्यावस्था । ते माझी परम प्रकृति पार्था । तिये नाम व्यवस्था । जीव ऐसी ॥ जे जडाते जीववी । चेतनेते चेतवी । मनाकरवी मानवी । शोक मोहो ॥'*

*(अध्याय ७, ओवी १९, २० ज्ञानेश्वरी).*

प्रोटॉन, न्यूट्रॉन व इलेक्ट्रॉन यांच्या अणूंच्या संयोगाने, संमीलनाने पुढे निसर्गतः अनेक मूलद्रव्ये निर्माण झाली. ती एकूण ९६ आहेत. त्यानंतर पुढील ११ मूलद्रव्ये नोबेल पारितोषिकाचे मानकरी श्री. लेन सीबोर्ग यांनी शोधून काढली व ही सर्व अनैसर्गिक आहेत. या मूलद्रव्यांच्या परस्परांच्या संयोगाने पुढे निरिंद्रिय (Inorganic) रसायने निर्माण झाली व त्या रसायनांमधून नैसर्गिक प्रक्रिया होऊन सेंद्रिय (Organic) रसायने निर्माण झाली आणि सजीव सृष्टीचा पाया घातला गेला. सजीवांच्या निर्मितीचे मूळ खालील मूलद्रव्यांमध्ये आहे- ती म्हणजे कार्बन (C), हायड्रोजन (H), ऑक्सिजन (O), नायट्रोजन (N) व फॉस्फरस (P). यांपासून एक पेशी आणि त्यापासून पुढे असंख्य पेशींनी बनलेले जीव निर्माण झाले. त्या पेशींमध्ये केंद्रक असते व केंद्रकात गुणसूत्रे असतात. ही गुणसूत्रे प्रथिनांची बनलेली असतात. प्रथिने अमीनो ॲसिड्सपासून बनलेली असतात. ही अमीनो ॲसिड्स वीस प्रकारची असून एका विशिष्ट क्रमाने जोडली गेली की एक विशिष्ट काम करणारी प्रथिने तयार




होतात. अमीनो ॲसिड्समध्येही कार्बन, हायड्रोजन, ऑक्सिजन आणि नायट्रोजन हीच मूलद्रव्ये असतात. म्हणजे प्रथिनांनी गुणसूत्रे बनतात. या गुणसूत्रांचे बारीक खंड म्हणजेच त्यांना जीन्स म्हणतात. हे जीन्स पुढील पिढीत आनुवंशिकता संक्रमित करतात. तसेच पेशींमधील इन्झाईम्स (Enzymes) व प्रथिने तयार करण्याचे काम न्यूक्लिक ॲसिड्स (Nuclice Acid) च करतात व हीसुद्धा कार्बन, हायड्रोजन, नायट्रोजन, ऑक्सिजन व फॉस्फरसचीच बनलेली असतात. ही न्यूक्लिक ॲसिड्स फॉस्फेट समूह (Phosphate group), साखर (Sugar) व बेस (Base) एकत्र येऊन बनतात. म्हणजेच न्यूक्लिओटाईड बनतात. अशी असंख्य न्यूक्लिओटाईड (Nucleotide) विशिष्ट बंधांनी जोडली जातात व त्यांची एक पीळदार दोऱ्याची शिडी तयार होते. तिलाच डी.एन.ए (D.N.A) म्हणतात. हा दोर (०,००००० २५ m.m.) व्यासाचा असतो. डी.एन.ए.मध्ये जीन्स असतात. पेशीतील आर.एन.ए. (R.N.A.) पासून 'डी.एन.ए.'ची निर्मिती करणे एन्झाईमन्सना सोपे जाते. कारण डी.एन.ए. शिडीत व आर.एन.ए. शिडीत फक्त एकाच न्यूक्लिक ॲसिडचा फरक असतो. म्हणजे न्यूक्लिक ॲसिडमधील मूलद्रव्येसुद्धा कार्बन, हायड्रोजन, ऑक्सिजन, नायट्रोजन यांची बनलेली असतात. तेव्हा याचा जर क्रम पाहिला तर – मूलद्रव्ये (C.H.O.N.P.) – न्यूक्लिक ॲसिड – न्यूक्लिओटाईड – डी.एन.ए. – जीन्स – अमीनो ॲसिड्स –प्रथिने – गुणसूत्रे – केंद्रकात – पेशीद्रव्यात पेशी – असंख्य पेशी – सजीव.

जर सर्वच पेशी, गुणसूत्रे व जीन्स अशा प्रकारे प्रथिनांचीच बनलेली आहेत, तर प्राणी वेगवेगळा कसा निर्माण झाला? प्रत्येक वनस्पती वेगवेगळी कशी निर्माण झाली? त्यांचे गुणधर्म वेगवेगळे कसे निर्माण झाले? तर त्यांच्या पेशींच्या केंद्रकातील गुणसूत्रांवरील जीन्सची संख्या वेगळी असते. तसे त्यांचा क्रमही वेगळा असतो. या जीन्समुळेच शरीरातील बदल ठरवले जातात. डोके, कान, नाक, डोळे, नखे, शरीराची ठेवण, रंग, रूप, लांबी, उंची, रुंदी, एवढेच काय तर सर्व साधारण जीवन जगण्याची रूपरेषासुद्धा यामुळेच ठरलेली असते, असे म्हणावयास हरकत नाही. जीन्सचा एका विशिष्ट क्रमाचा व संख्येचा समूह हे एक बीजच होय. त्यामुळे त्या त्या बीजामधून तीच तीच आकृती, शरीर, गुणदोष, पाने, फुले, फळे, बाहेर पडतात. त्यात कधीच फरक होत नाही.

*बीज मोडे झाड होये । झाड मोडे बीजी समाये ।*
*ऐसे कल्प कोडी जाये । परि जाती न नशे ।।*

*(१७ – ५९ ज्ञानेश्वरी).*

एकदा बीज तयार झाले की त्यापासून त्याच प्रकारच्या झाडाची, पानांची, फुलांची, फळांची उत्पत्ती होणार यात काहीच शंका नाही. म्हणूनच त्याला बीज म्हटले जाते. मग उत्क्रांती काठे होते? उत्क्रांती बीजातच होते. एका मूळ बीजापासून जी अनेक मूलद्रव्ये निर्माण झाली ती मूलद्रव्ये निसर्गानेच निर्माण केली आहेत. या मूलद्रव्यांना बीजच का म्हणू नये? तीसुद्धा बीजच आहेत, पण त्या बीजांचे जे वेगवेगळे गुणधर्म आहेत. त्यांच्या संयोगापासून वेगळेगळ्या गुणधर्मांच्या बीजांची निर्मिती झाली. ही संयुगेसुद्धा निसर्गतःच झालेली आहेत. जी संयुगे काळाच्या ओघात, हवामानाच्या प्रतिकारात उभी राहिली ती जगली व पुढे पुढे आली. जी नाश पावली ती तेथेच संपली. त्याचप्रमाणे काही बीजे काही काळ टिकली असतील पण पुढे ती काही कारणाने, नैसर्गिक आपत्तीत नष्ट झाली असतील व काही नवीन निर्माण झाली असतील, तरी त्यांतील मूळ तत्त्वे तीच राहिली आहेत.

वस्तू एकच असली तरी कार्यरूपाने त्याला नवीन नवीन नावे दिली जातात. तसे बीज एकच असले तरी स्थानपरत्वे, देशपरत्वे त्यांची नावे वेगवेगळी असू शकतात, पण त्यांचा अर्थ वा गुणधर्म बदलत नाही हे निश्चितच. त्याचे एक उदाहरण म्हणून विश्वबीजाला त्याच्या कार्याप्रमाणे व गुणधर्माप्रमाणे जी नवनवीन नावे देण्यात आली आहेत ती येथे देण्यात आली आहेत, म्हणून ईश्वरस्वरूप एकच आहे. नाव व रूपे बदलली तरी मूळ तत्त्व बदलत नाही हेच महत्त्वाचे आहे.

श्री. शुकदेवजी म्हणतात, 'परीक्षित । या भागवत पुराणात सर्ग, विसर्ग, स्थान, पोषण, ऊति, मन्वन्तर, इशानुकथा, निरोध, मुक्ती आणि आश्रय या विषयांचे वर्णन आहे. ईश्वराच्या प्रेरणेने गुणामध्ये क्षोभ उत्पन्न होऊन रूपांतर होण्याने जी आकाशादी पंचमहाभूते, शब्दादी तन्मात्रा, इंद्रिये, अहंकार आणि महत्‌तत्त्वाची उत्पत्ती होते त्याला सर्ग म्हणतात. विराट पुरुषापासून उत्पन्न झालेल्या ब्रह्माकडून उत्पन्न झालेल्या चराचर सृष्टीच्या निर्मितीला विसर्ग म्हणतात. प्रत्येक क्षणी विनाशाकडे जाणाऱ्या सृष्टीला एका मर्यादेमध्ये स्थिर राखण्यात भगवान विष्णूची जी श्रेष्ठता सिद्ध होते त्याला 'स्थान' म्हणतात. अशा आपल्या स्थिर व सुरक्षित सृष्टीत त्यांच्या (भगवंतांच्या) भक्तावर जी कृपा होते त्याचे नाव 'पोषण' असे आहे. मन्वन्तराचा अधिपती जो भगवत्‌भक्ती आणि

प्रजापालनरूप शुद्ध धर्माचे अधिष्ठान करतो त्याला 'मन्वन्तर' म्हणतात. भगवंताच्या विभिन्न व त्यांच्या भक्तांच्या प्रेमकथा, विविध आख्याने अशा ग्रंथांना 'ईशकथा' म्हणतात. जेव्हा परमेश्वर योगनिद्रेचा आश्रय करतात तेव्हा जीव आपल्या उपाधीसहित त्यांच्यात लीन होऊन जाणे याला 'निरोध' म्हणतात. अज्ञानकल्पित कर्तृत्व, भोक्तृत्व इत्यादी अनात्मभावाचा परित्याग करून आपल्या स्वाभाविकस्वरूप भगवंतामध्ये स्थित होणे याला 'मुक्ती' म्हणतात. परीक्षित! या चराचर जगताची उत्पत्ती व प्रलय ज्या तत्त्वाने प्रकाशित होते ते परब्रह्मच 'आश्रय' आहे. शास्त्रामध्ये यालाच परमात्मा म्हटले गेले आहे. जो नेत्र इत्यादी इंद्रियांचा अभिमानी द्रष्टा जीव आहे तोच इंद्रियांच्या अधिष्ठातृ देवता सूर्य वगैरेंच्या रूपाने आहे. जो नेत्रगोलक इत्यादींनी युक्त शरीर आहे तोच पुन्हा त्यांना वेगवेगळे करणाराही आहे. या तीनपैकी (सत्त्व, रज, तम,) जरी पूर्णपणे एकाचा अभाव झाला तरी उरलेले दोनही आपोआप नाहीसे होतात, म्हणून या तिघांना जो जाणतो तो परमेश्वरही सर्वांचा अधिष्ठान 'आश्रय' तत्त्व आहे. दुसरे कोणी नाही. (स्कंद- २, अध्याय- १०, श्लोक १ ते ९ भागवत) ज्याप्रमाणे परमेश्वराची कार्यकारण रूपाने अनेक नावे आहेत, त्याचप्रमाणे प्रकृतीचीही कार्यकारण रूपाने वेगवेगळी नावे आहेत. त्यांचा श्री विष्णुबुवा जोग यांनी अमृतानुभवाचे केलेल्या विश्लेषणामध्ये उल्लेख आला आहे.

'प्रकृतिभावाची कल्पना उत्पन्न झाली. हीच प्रकृती कार्यरूपाने अनेक नामाने प्रसिद्धीला आली. ती शिवाची शक्ती झाली. तसेच पुरुषाहून भिन्न नसते म्हणून तिला 'शक्ती' म्हणावयाचे. तीच तमःप्रधान होत्साती भूतभौतिक प्रपंचास निर्माण करते म्हणून तिला 'प्रकृती' म्हणतात. निर्विकल्प ब्रह्माच्या ठिकाणी तीच दुर्घट इच्छादी उत्पन्न करते म्हणून तिला 'माया' म्हणतात. ब्रह्मस्वरूपाला झाकते म्हणून तिला 'अज्ञान' म्हणतात. ब्रह्मविद्येने तिची निवृत्ती होते म्हणून 'अविद्या' म्हणतात. सर्व भूतभौतिक सृष्टी तिच्या पोटात लीन होऊन असते. म्हणजे यावत् जीव आपआपल्या कर्म व अदृश्य वासनेसह तिच्यामध्ये लीन होऊन असतात. अशा तऱ्हेने प्रलयकाळी सर्व जगत आपल्या पोटात नाहीसे करून ती उदासीनपणे असते म्हणून तिला 'प्रधान' ही संज्ञा आहे. ही सर्व प्रकृतीचीच नावे आहेत. अशा या शक्तीस शिवानेच निर्माण केले म्हणजे शक्ती या कल्पनेस केवळ शिवरूपच आधार आहे.'

### जगाची उत्पत्ती परब्रह्म संकल्पातून

जगताच्या उत्पत्तीचे रहस्य स्पष्ट करताना भगवंतांनी त्याला राजगुह्य असे म्हटले आहे. 'राजगुह्य' म्हणजे सर्व गुह्यातील सर्वश्रेष्ठ गुह्य होय. ते गुह्य श्रीमत् भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायात उघड करून सांगितले आहे. परब्रह्मरूप भगवान श्रीकृष्णांनी अर्जुनाला सांगितले की–

*पिताहमस्य जगतो माता धाता पितामहः ।*
*वेद्यं पवित्रमोकारं ऋक्साम यजुरेव च ॥*

*(९ १७ भ. गीता).*

उत्पत्ती – पुनर्उत्पत्तीमध्ये बीज हा भाग पित्याचा असतो. 'संकल्प'हेच बीज होय. 'एकोऽहं बहुस्याम्' हा संकल्प हे ब्रह्माचे बीज होय. बीजाची धारणा ही मातेची वृत्ती असते आणि पुढचे पालनपोषणही माताच करते. मग या अद्वैतात माता कोण? 'अर्धनारीनटेश्वरी। जो पुरुष तोचि नारी॥ तेवी मी चराचरी। माताही होय॥ (९ २७० ज्ञानेश्वरी). परमेश्वरानेच पुरुषाचे रूप घेतले व तोच नारीरूपाने म्हणजे प्रकृतिरूपाने निर्माण झाला. तेव्हा माताही तोच होय. प्रकृतीनेच या पुरुषाच्या, चैतन्याच्या आधारे या सृष्टीचा प्रसव केला, सांभाळ केला व विस्तारही केला. हा संकल्प कोठे निर्माण झाला? संकल्प हा मनातच निर्माण होतो, पण परमेश्वर जर निर्गुण-निराकार आहे आणि त्याला जर शरीरच नाही तर त्याला मन कोठून असणार? पण मनाशिवाय संकल्प नाही. म्हणून संत ज्ञानदेवांनी म्हटले आहे की 'इये प्रकृति पुरुष दोन्ही। उपजली जयाचिया अमनमनी। तो पितामह त्रिभुवनी। विश्वाचा मी॥ (९ २७२ ज्ञानेश्वरी). 'एकोऽहं बहुस्याम्।' या संकल्पातूनच पुरुष-प्रकृतीचा जन्म झाला. म्हणजे ती दोघे परमेश्वराच्या 'अमनमनी' उपजली आहेत. 'अमनमनी' म्हणजे जे 'मन' आहे ते 'अमन' आहे. कोणताही स्वार्थ वा हेतू याविरहित जे संकल्प होतात व कार्ये होतात, त्यांचे बंधन पडत नाही. लहान मुलांचे कार्य वा कृती अशा प्रकारची असते. लहान मुले खूप हालचाल करतात, कर्मे करतात पण ती सर्व हेतूरहित, स्वार्थरहित असतात आणि म्हणून त्यांना 'लीला' म्हणतात. तसे परमेश्वराच्या 'अमनमनी' जो संकल्प उठून पुरुष व प्रकृती व जगाची उत्पत्ती झाली ही परमेश्वराची 'लीला' म्हणतात. लहान मुलांच्या मनाची जडणघडण हेतूपूर्वक, स्वार्थीपणाने कार्य करण्याची नसते म्हणून त्यांचे मन हे अमन असते. तसेच परमेश्वराचे असते, पण

परमेश्वराचे स्वरूपच निर्गुण-निराकार असल्याने त्याच्या ठिकाणी 'मन' हे इंद्रिय असण्याचा संभवच नाही म्हणून ते मन अमन आहे असे वाटते.

'जैसे जळाचे कल्लोळ। आणि कल्लोळी आथी जळ। ऐसेनि वसवितसे सकळ। तो निवासु मी ।।' (९ २८७ ज्ञानेश्वरी). ज्याप्रमाणे पाण्यावर लाटा उत्पन्न होतात व पुन्हा पाण्यातच लय पावतात, त्यांचे उत्पन्न होणे व लय पावणे हे जसे पाण्यातच होते, शिवाय त्यांचे अंग व त्यांना असलेला आधार हेसुद्धा पाणीच असते, तसे हे सर्व विश्व परब्रह्मापासून उत्पन्न होते, परमेश्वराच्या आधारावर जगते, जगताचे अस्तित्वही परब्रह्मातच असते, परमेश्वराची शक्तीच त्याच्यात असते, परमेश्वराच्या प्रेरणेनेच ते संकल्प करतात, कार्य करतात. या सृष्टीचा उपभोग घेतात व शेवटी परमेश्वरामध्येच विलीन होतात. संत ज्ञानेश्वर म्हणतात– 'बीज शाखाते प्रसवे। मग ते रुखपण बीजी सामावे। तैसे संकल्पे होय आघवे। पाठी संकल्पी मिळे।। ऐसे जगाचे बीज जो संकल्पु। अव्यक्त वासनारूपु। तया कल्पांती जेथ निक्षेपु। होय ते स्थान मी ।। इये नामरूपे लोटती। वर्ण व्यक्ति आटती। जातीचे भेद फिटती। जै आकारु नाही ।। तै संकल्पवासना संस्कार। माघौते रचावया चराचर। जेथ राहोनि असती अमर। ते निधान मी ।।' (९ २९२ २९५ ज्ञानेश्वरी).

एकनाथी भागवतातही अशाच प्रकारचे वर्णन संत एकनाथांनी भागवताच्या विवेचनामध्ये केले आहे. 'ब्रह्मापूर्वी एकाकी एक। तेचि केवि झाले अनेक। तो मायायोगपरिपाक। विशद अर्थ देख पिप्पलायनु सांगे ।। मुळी मुख्य ब्रह्म 'ओंकार'। ते एकचि झाले त्रिप्रकार। अकार-उकार-मकार। सत्त्वादि विकार गुण-त्रयात्मक।। साखरेचा फणस प्रबळ। तेथे कांटे त्वचाबीजगोळ। अवघी साखरचि केवळ। तेवी ब्रह्माचि सकळ जगदाकारे ।। जेवी पाटाऊ पुतळीकृत। तेथ विषमायवी समान सूत। तेवी जगदाकारे आकारवंत। दिसे अविकृत परब्रह्म ।।'जग-विश्व-प्रपंचु' नाम। परी ते निखळ परब्रह्म। हा उपनिषदार्थ उत्तम। वेदांती परम परमार्थु तो हा ।। (अध्याय ३, ओवी ६९९ ते ७०७ निवडक ए. भा.).

तो एकच ईश्वर, स्वतःच स्वतःचा आधार असून (कारण तो निराश्रय आहे. आश्रय म्हटले तर सत्तेला कमीपणा येईल) सर्व कार्यकारणात्मक ब्रह्मांडाचा आश्रय झालेला आहे. तोच कालस्वरूप होतो आणि त्याच्या विशाल सामर्थ्याने सत्त्वतमरजात्मक सर्व शक्ती एकाच अवस्थेत गेल्यानंतर (प्रलयकाली त्या एक होतात.) प्रकृती-पुरुषाचा ईश्वर, पर म्हणजे अज (देव) प्रमुख आणि अवर म्हणजे स्थावरांतक या सर्वांचा नियंता कैवल्यस्वरूप, (म्हणजे ज्याच्या स्वरूपामध्ये सम वा

अधिक वा न्यून नाही असा) केवलस्वरूपाच्या अनुभवापासून उत्पन्न होणारा जो आनंद त्याचा मूर्तिमंत सागर असा तो कोणत्याही उपाधीपासून निर्मुक्त अशा स्थितीत असतो. या श्लोकांवर विवेचन करताना संत एकनाथ महाराज एकनाथी भागवतात म्हणतात "एकला एकु नारायण। हेही तेथ म्हणे कोण। हे अद्वितीय लक्षण। भेदशून्यअवस्था ।। 'विजातीयभेद' ते ठायी। नसे 'सजातीयभेद' काही। स्वगतभेदु तोही नाही। भेदशून्य पाही ये रीती ।। प्रकृति पुरुष हे दोन्ही। कल्पिली जेणे अमन-मनी। तो ईश्वर होय भरवसेनी। त्याचे सामर्थ्ये करुनि वर्तती ।। प्रकृतिते चेतविती सत्ता। तेचि याची पुरुषता। यालागी प्रकृतिचा भर्ता। होय सर्वथा हाचि एकु ।। ज्याचे आज्ञेवरी पाहे। सैरा वायु जाऊ न लाहे। समुद्र वेळे माजी राहे। सूर्य वाहे दिनमान ।। ज्याची आज्ञा करुन प्रमाण। बारा आंगुळे विचरे प्राण। परता जाऊ न शके जाण। आज्ञेभेणे सर्वथा ।। हो कां ग्रीष्माच्या अंती। बीजे लीन होती क्षिती। तैशी लीन होऊनी प्रकृति। केवळ सुखमूर्ति उरलासे ।। ऐसा निरूपाधिकु केवळ। सुखस्वरूपानंद कल्लोळ। चिन्मात्र तेजे बहळ। नित्य निर्मळ सदंशे ।। (अध्याय ९, ओव्या १९१ ते २०५ निवडक, ए. भा.).

परमेश्वरच अनेक रूप-नामांनी सर्वत्र भरून राहिला आहे. याबाबत भगवंतच उद्धवाला सांगत आहेत. तेच संत एकनाथ यांनी त्यांच्या शब्दात मांडले आहे.

मूळ मायेच्या योगाने गुणांचा विकास झाला असता (गुणांना वैषम्याचे योगाने वेकसित रूप आले असता) काल, आत्मा, वेद, लोक, स्वभाव, धर्म अशा अनेक नावांनी लोक मला (परमेश्वराला) संबोधतात.

'तेवी निजात्मा मी पुरुषोत्तम। त्या मज नाना रूपे नाना कर्म। काळू, आत्मा, आगम, स्वभावधर्म। मज म्हणती ।। अदृष्टांचे फळ नाना लोक। लोक म्हणावया हेतु हे देख। एवं मज एकाते अनेक। मिथ्या मूर्ख मानिती ।। नाना रंगाचिया वृत्ती। चित्र लिहिले यथानुगती। तेही नानाकारे दिसे भिंती। सर्व व्यक्तिद्योतक ।। तैसे नानाकार नानाधर्म। नाना नामे नानाकर्म। ते मी आघवा आत्माराम। सर्वोत्तम सर्वथा ।। मज वेगळा रिता कांही। अणुभरी ठाव उरला नाही। मी सर्वात्मा सर्व देही। सर्वगत पाही सर्वदा ।। जैसे सागरामाजी तरंग। तैसे मजमाजी दिसे जग। जग नव्हे ते मीचि चांग। सुख अव्यंग मजमाजी ।। मी शुद्ध-बुद्ध-मुक्त स्वभाव। त्या मज नानात्वे ठेविती नाव। उद्धवां ज्यासी जैसा भाव। तैसा मी देव तयासी ।। (अध्याय १०, ओवी ६८८ ते ६९५ ए.भा.).

संत तुकारामांचाही असाच अनुभव आहे. तो त्यांच्याच शब्दांत–

‘अवघे ब्रह्मरूप रिता नाही ठाव। प्रतिमा तो देव कैसा नव्हे ॥’ (३०८ अभंग). याला दृष्टांत देताना संत तुकाराम पुढे म्हणतात–

‘गोडीपणे जैसा गूळ। तैसा देव जाला सकळ॥ आतां भजो कवणे परी। देव सबाह्य अंतरी॥ध्रु॥ उदका वेगळा। नव्हे तरंग निराळा। हेम अलंकारा नामी। तुका म्हणे तैसे आम्ही॥’ ह्या दृष्टान्तातून परमेश्वराचे अस्तित्व स्पष्ट करता करता स्वतःचीही स्थिती ते सांगून गेले. होही अनुभूती लक्षात घेण्यासारखी आहे.

सृष्टीची निर्मिती, उत्पत्ती करूनच केवळ परमेश्वर थांबला नाही. त्याने या सृष्टीचे नियमनही आपल्याच हातात ठेवले आहे. निसर्गाने परमेश्वराने ठरवून दिलेल्या नियमाने वागावे, वेळेप्रमाणे कार्य करावे अशीच परमेश्वराची इच्छा आहे कारण त्यामुळे प्राणिमात्रांचे जीवनही नियमित होईल, सुखकर होईल, निसर्ग नियमाप्रमाणे चालेल. श्री भगवान श्रीकृष्णांनी गीतेत जे सांगितले त्याचा खुलासा करताना संत ज्ञानदेव म्हणतात–‘मी सूर्याचेनि वेषे। तपे तै हे शोषे। पाठी इंद्र होऊन वर्षे। तै पुढती भरे॥ (९ २९६ ज्ञानेश्वरी). ‘आकाशे सर्वत्र वसावे। वायुने नांवभरी उगे नसावे। पावके दाहावे। वर्षावे जळे॥ पर्वती बैसका न सांडावी। समुद्री रेखा नोलांडावी। पृथ्वीया भूते वाहावी। हे आज्ञा माझी॥ म्या बोलविल्या वेदु बोले। म्या चालविल्या सूर्यु चाले। म्या हालविल्या प्राणु हाले। जो जगाते चाळिता॥ मियांची नियमिला सांता। काळु ग्रासितसे भूतां। इये म्हणियागते पांडुसुता। सकळे जयांची॥ (९ २८१ ते २८४ ज्ञानेश्वरी). कोणी काय कार्य करावे व केव्हा करावेत हेसुद्धा परमेश्वराने ठरवून दिले आहे व त्याप्रमाणे त्यांनी वागावेच अशी परमेश्वराची आज्ञा आहे आणि सर्व निसर्ग परमेश्वराच्या आज्ञेने कार्य करतो एवढेच नव्हे, तर परमेश्वराच्या धाकाने कार्य करतो. तैत्तिरीय उपनिषदात याविषयीचे मंत्र आले आहेत.

*‘भीषास्माद् वातः पवते। भीषोदेति सूर्यः।*
*भीषास्माद् अग्निचेंद्रश्च मृत्युर्धावति पंचमः। इति॥’*

याच्या भयाने वायू वाहतो, याच्या भयाने सूर्य उगवतो, याच्या भयाने अग्नी, इंद्र आणि पाचवा मृत्यू धावतो (याच्या म्हणजे ब्रह्माच्या).

या परमेश्वराचे नियमन जसे सर्व प्राणिमात्रांना आहे तसेच मनुष्यालासुद्धा आहे. जोपर्यंत मनुष्य परमेश्वराने घालून दिलेल्या नियमाने वागतो, बहिर्मनापेक्षा अंतर्मनाच्या सूचना ऐकतो, अंतर्मनाच्या प्रेरणेने कार्य करतो तोपर्यंत त्याचे जीवन सुरळीत व सुखाने चालते; पण जेव्हा स्वत:च्या बुद्धीचा दुरुपयोग करून मनुष्य निसर्गाच्या विरुद्ध वागू लागतो तेव्हा त्याला त्याचा फटका बसल्याशिवाय राहात नाही, पण या गोष्टी मनुष्याच्या लक्षात येत नाहीत. अहंकाराने त्याला अंधत्व आलेले असते. मीपणाने त्याला माज आलेला असतो.

पण परमेश्वराने केलेले नियमन इतके अचूक असते की शेवटी त्याला परमेश्वरापुढे मान तुकवावीच लागते. या बाबतीत भगवंतांनी म्हटले आहे की-

*अधिष्ठानं तथा कर्ता करणं च पृथग्विधम् ।*
*विविधांश्च पृथक्चेष्टा दैवं चैवात्र पंचमम् ।।*

*(१८ १४ भ. गी).*

अर्थ-अधिष्ठान (कर्मास आधारभूत शरीर), त्याचप्रमाणे कर्ता (बुद्धीचे ठिकाणी असणारा जीवात्मा), निरनिराळ्या जातीची इंद्रिये (कर्मेंद्रिये, ज्ञानेंद्रिये व अंत:करण), कर्मेंद्रिये यांच्या निरनिराळ्या प्रकारच्या हालचाली आणि यातच (या दृष्ट कारणातच) दैव (म्हणजे इंद्रियांना सामर्थ्य देणाऱ्या देवतांची प्रेरकशक्ती) हे पाचवे (कारण) असते.

शरीर, कर्ता (जीव), इंद्रिये आणि कर्म (वेगवेगळ्या कृत्या, कार्य) या चारही गोष्टींपेक्षा दैव हे पाचवे कारण सर्वश्रेष्ठ आहे. कारण या दैवानेच चांगले किंवा वाईट शरीर मिळते. निरोगी किंवा सरोगी इंद्रिये ही (सक्षम वा अक्षम) असतात. बुद्धीचा संस्कार हा पूर्वीच्या जन्मातील प्रारब्धाप्रमाणे चांगला किंवा वाईट असतो. त्याप्रमाणे कर्म घडते व दैव हे शेवटी ते कर्म पूर्णत्वाला जावे किंवा अर्धवट राहावे वा होऊ नये हे ठरवते. ते कर्म शेवटाला गेले तर ते चांगल्या प्रकारे शेवटास जावे का वाईट प्रकारे शेवटास जावे हेही दैवच ठरवते. या सगळ्याचा परिणाम जिवाला (कर्त्याला) उपभोगावा लागतो. कारण चांगले-वाईट, योग्य-अयोग्य या गोष्टीची धारणा त्याने योग्य संस्काराने तयार केलेली नसते आणि त्यामुळे त्याला अयोग्य धारणेने दु:खाचा भोग भोगावा लागतो व योग्य धारणेने सुखाचा भोग मिळतो.

## प्रकृतीचा विस्तार

पुरुष-प्रकृती, क्षेत्रज्ञ-क्षेत्र, वगैरे अनेक नामांच्या जोड्या जरी असल्या तरी त्या सर्वांचा अर्थ एकच आहे. ब्रह्माचा जेवढा विस्तार आहे तेवढाच प्रकृतीचा विस्तार आहे. कारण ब्रह्म हे निर्गुण निराकार आहे. ब्रह्म हे चैतन्यरूप आहे तर प्रकृती ही जड आहे. पुरुषामुळेच प्रकृतीचे अस्तित्व प्रत्ययाला येते, जाणवते. प्रकृती ही जड असल्यामुळे इंद्रियगोचर आहे. तेव्हा निर्गुण-निराकार चैतन्यरूप ब्रह्मापासून सगुण-साकार, जडरूप प्रकृती कशी उत्पन्न झाली याचा विचार होणे आवश्यक आहे. उपादान कारणातून पुष्कळ वेळा त्याच्या विरुद्ध गुणधर्माची वस्तू तयार होते. यालाच विवर्त म्हणतात. म्हणून जगत् हे ब्रह्माचे विवर्त आहे, हे सिद्ध झाले आहे. तरीही ते कशा प्रकारे झाले हे समजून आले तर पाहावे. तसेच याविषयी संतांनी काय काय विधाने केली आहेत त्याचाही अर्थ समजून घेता येईल व ते सर्व आजच्या प्रगत विज्ञानाच्या विधानाशी सांगड घालता येते का ते पाहता येईल.

ईश्वराची उपाधी जी माया ती सत्त्व, रज, तम या तीन गुणरूप आहे. म्हणजे माया तीन गुणांहून भिन्न नाही. कारणातील गुण कार्यातील गुणांचा आरंभ करीत असतात, असा नियम आहे. आकाशादी पाच भुते प्रथम सूक्ष्म व अपंचीकृत असतात. या अपंचीकृत भुतांपासून सतरा लिंगांचे सूक्ष्म शरीर होते. श्रोत्र, त्वक्, चक्षू, रसन, व घ्राण ही ज्ञानसाधने असल्यामुळे त्यांस ज्ञानेंद्रिये म्हणतात. वाक्, पाणी, पाद, पायू व उपस्थ ही पाच कर्मसाधने असल्यामुळे त्यांस कर्मेंद्रिये म्हणतात. प्राण, अपान, व्यान, समान व उदान हे पाच प्राण आहेत आणि मन व बुद्धी ही दोन अंतरिंद्रिये आहेत. ही सतरा लिंगे मिळून सूक्ष्म शरीर होते. ही आत्म्याच्या अस्तित्वाची सूचना करीत असतात, म्हणून त्यास लिंग असे नाव प्राप्त झालेले आहे.

## पंचीकृत

प्रत्येक भुतांची आठांमध्ये विभागणी करावयाची. त्यांतील चार भाग स्वतःजवळ ठेवून उरलेले चार भाग इतर भुतांना दिले.

| | आकाश | वायू | तेज | आप | पृथ्वी |
|---|---|---|---|---|---|
| आकाश | ४ | १ | १ | १ | १ |
| वायू | १ | ४ | १ | १ | १ |
| तेज | १ | १ | ४ | १ | १ |
| आप | १ | १ | १ | ४ | १ |
| पृथ्वी | १ | १ | १ | १ | ४ |
| पंचीकरण | ८ | ८ | ८ | ८ | ८ |

पंचीकरण भावास प्राप्त झालेल्या पाच भुतांस स्थूल भुते म्हणतात. ही पूर्वोक्त अपंचीकृत पंचभुतातील तमोगुणांच्या अंशापासून उत्पन्न होतात. आता हे पंचीकरण करण्याचे प्रयोजन काय? पंचीकृत आकाशामध्ये शब्दगुण व्यक्त होतो. वायूमध्ये शब्द व स्पर्श हे दोन गुण व्यक्त होतात. तेजामध्ये शब्द, स्पर्श व रूप हे तीन गुण व्यक्त होतात. जलामध्ये शब्द, स्पर्श, रूप, व रस हे चार गुण व्यक्त होतात. पृथ्वीमध्ये शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पाच गुण व्यक्त होतात. शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध हे पाच गुण क्रमाने अपंचीकृत सूक्ष्म आकाश, वायू, तेज, आप व पृथ्वी यामध्ये जरी पूर्वीच होते तरी ते प्रत्यक्ष ज्ञानाच्या योग्य नव्हते, पण तेच पंचीकरण केल्यावर प्रत्यक्ष ज्ञानाच्या योग्य झाले.

पंचीकृत भुतापासून ब्रह्मांडाची उत्पत्ती झाली. सचेतन ब्रह्मांडासच विराट म्हणतात. त्या विराट पुरुषापासून मनू व शतरूपा झाली. ब्रह्मांडातील पृथ्वीपासून औषधी व वनस्पती उत्पन्न झाल्या. औषधीपासून अन्न निर्माण झाले. पित्याने खाल्लेल्या अन्नाचा 'रेत' हा परिणाम झाला व मातेने खाल्लेल्या अन्नाचा 'शोणित' हा परिणाम झाला. पित्याचे 'रेत' व मातेचे 'शोणित' यांच्या संयोगापासून स्थूल शरीर झाले. हे स्थूल शरीर जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज असे चार प्रकारचे आहे. मनुष्य, पशू, पक्षी, कृमी, इत्यादिकांकडे पाहून हे जीवात्म्याचे शरीर आहे त्याची प्रतीती येते. त्याप्रमाणे वृक्ष, वेली, इत्यादिकांकडे पाहून येत नाही. यास्तव त्यास शरीर म्हणणे युक्त नव्हे, पण ही शंका विचार करू गेले असता टिकत नाही. वृक्षादिकांच्या आकाराशी प्राणवायूचा संबंध झालेला असतो व ज्या ज्या द्रव्यांशी प्राणवायूचा संबंध

येतो ते द्रव्य शरीर असते. आता मनुष्यादी शरीराशी झालेला प्राणवायूचा संबंध जसा प्रत्यक्ष दिसतो, तसा वृक्षादिकांच्या शरीराशी आलेला दिसत नाही हे खरे, पण त्याची सिद्धी अनुभवावरून होते. वृक्षादिकांच्या शरीराशी प्राणवायूचा जर संबंध नसता तर त्याची वाढ होणे व तुटलेल्या टाळ्या पुन्हा फुटल्या नसत्या. कारण कोणत्याही पदार्थाची वाढ होणे व त्यांची झीज व जखम भरून येणे हे प्राणवायूचे कार्य आहे.

आत्म्यापासून सर्व सृष्टीची उत्पत्ती झाली. याविषयी तैत्तिरीय उपनिषदातील पंचकोश मंत्र–

*'तस्माद् वा एतस्माद् आत्मन् आकाशः संभूतः । आकाशाद् वायुः । वायोरग्निः । अग्नेरापः अद्भ्यः पृथिवी । पृथिव्या औषधयः । औषधीभ्यः अन्नम् । अन्नात् पु षः । स वा एष पुरुषः अन्नरसमयः । तस्य इदमेव शिरः । अयं दक्षिणः पक्षः । अयं उत्तर पक्षः । अयमात्मा । इदं पुच्छं प्रतिष्ठा । तदप्येष श्लोको भवति-*

*अन्नात् भूतानि जायन्ते जातान्यन्नेन वर्धन्ते ।*
*अद्यते अत्ति च भूतानि तस्माद् अन्नं तदुच्यते ॥ इति ॥.'*

अर्थ – त्या या आत्म्यापासून आकाश उत्पन्न झाले, आकाशापासून वायू, वायूपासून अग्नी, अग्नीपासून पाणी, पाण्यापासून पृथ्वी, पृथ्वीपासून औषधी, औषधीपासून अन्न, अन्नापासून पुरुष (झाला.) तो हा पुरुष अन्नरसमय आहे. त्याचे हे मस्तक आहे. ही दक्षिण (उजवी) बाजू, ही उत्तर (डावी) बाजू. हा आत्मा आहे. ही आधाररूप बैठक आहे. त्या अर्थाचा हा श्लोक आहे–

अन्नापासून भुते उत्पन्न होतात. उत्पन्न झालेली अन्नाने वाढतात. भुतांकडून खाल्ले जाते आणि भुतांना खाते म्हणून त्याला अन्न म्हणते.

आता पंचमहाभूते, मन, बुद्धी व अहंकार यांच्या संयोगाने अष्टधा प्रकृती तयार होऊन त्यापासूनच देह निर्माण झाला. हिलाच अपरा प्रकृती म्हणतात. या देहाची जेव्हा धारणा होते त्या वेळी त्यात जिवाचा प्रवेश होतो. जीव हा परा प्रकृतीमध्ये येतो. जीव हा चैतन्यरूप परमेश्वराचा अंश जरी असला तरी देहामध्ये प्रवेश करून स्वतःच्या स्वस्वरूपाचे विस्मरण झाल्याने व देहभावाशी तादात्म्य पावल्याने तो सुख-दुःखाचा भोक्ता होतो व सूक्ष्म प्रकृतीचे रूपांतर एका स्थूल प्रकृतीत होते. या स्थूल प्रकृतीचा

जो संघात निर्माण झाला आहे त्याचे वर्णन भगवंतांनी गीतेत केले आहे व त्याचे स्पष्टीकरण अगदी विस्तारपूर्वक ज्ञानेश्वरीत केले आहे. ही स्थूल प्रकृती आहे. तीही एकूण छत्तीस तत्त्वांच्या संघात आहे. ती तत्त्वे अशी, पंचमहाभुते- मन, बुद्धी, अहंकार-देह-जीव. ज्ञानेंद्रिये (५), कर्मेंद्रिये (५), चेतना, धृती, विषय (५), सुख, दुःख, इच्छा, द्वेष, प्राण (५). पंचमहाभूतांची निर्मिती त्रिगुणांपासून कशी झाली याचे वर्णन वर आले आहेच. आता मन, बुद्धी, अहंकार हेही त्रिगुणांपासून निर्माण झाले आहेत. त्याचप्रमाणे त्यांचे कार्य काय याचेही वर्णन संत ज्ञानदेवांनी केले आहे.

सत्त्वगुणापासून बुद्धी उत्पन्न झाली. 'जे तेजतत्त्वाची आदि। जे सत्त्वगुणांची वृद्धि। जे आत्मया जीवाचि संधि। वसवीत असे जे ॥' (१३ ८८ ज्ञानेश्वरी). मन हे विषयांशी रममाण होते. फुलपाखरे जशी या फुलावरून त्या फुलावर उडतात किंवा माशी जशी गोडावर व घाणीवर बसते, तिला जसे गोड व घाण यातील फरक कळत नाही, तसे मन हे विषयांत रममाण होताना हे विषय चांगले व वाईट याचा निर्णय घेऊ शकत नाही. ते कार्यबुद्धी करते. विषय चांगले व वाईट हे अर्थातच बुद्धीवर झालेल्या संस्कारावरून ठरते. हे महत्त्वाचे आहे कारण जर बुद्धी निरपेक्षपणे चांगल्या-वाईटाचा निर्णय घेण्यास समर्थ असती तर सर्व लोक चांगल्या मार्गालाच लागले असते. कोणीही पाप केले नसते, पण तसे होत नाही. असो. बुद्धीच्या निवडीप्रमाणे विषयांचा भोग देहाला म्हणजेच देहातील जिवाला घडतो व त्यामुळे जिवाला कर्माचे बंधन होऊन जन्माला कारण होते. काही वेळा बुद्धीने जरी योग्य निर्णय दिला तरी बुद्धीवर मनाचा प्रभाव एवढा जबरदस्त असतो की, बुद्धीची हार होऊन मनाप्रमाणे विषयांचा भोग जिवाला घडतो व त्यामुळे जिवाची अधोगती होते. बुद्धीचे स्थान हे मन व जीव यांच्यामध्ये आहे तर आता मनाचे स्थान कोठे आहे? संत ज्ञानदेव म्हणतात– 'जे इंद्रिया आणि बुद्धि। माझरिलीये संधी। रजोगुणांच्या खांदी। तरळत असे ॥' (१३ १०४) आकाशाचा नीलिमा किंवा मृगजळाच्या लहरी या दिसतात खऱ्या पण प्रत्यक्षात नसतात. तसेच हे मन आहे. अष्टधा प्रकृतीपासून देहाची उभारणी झाली. वायुतत्त्व हे शरीरात दहा ठिकाणी विभागले जाते व शरीरात चैतन्य निर्माण करते. या वायुतत्त्वापासूनच मन तयार झाले आहे. 'तेथ चांचल्य निखळ। एकले ठेले निढाळ। म्हणोनि रजाचे बळ। धरिले तेणे ॥' (१३ १०८ ज्ञानेश्वरी). मन हे रजोगुणी असून चांचल्य हा त्याचा स्वभाव आहे. या मनामुळेच जिवाला जीवपण आले व जन्म-मरणाचे चक्र त्याच्या मागे लागले. 'वळले तर सूत नाही तर भूत' अशीही म्हण मनाच्या बाबतीत वापरतात. कारण मन जसे वाईट मार्गाला लागते तसेच चांगल्या

मार्गालाही लागते म्हणून म्हटले आहे 'मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयो: ।' मन हेच मनुष्याला बंधनात घालण्यास किंवा मोक्षाला नेण्यास कारण होते. तेव्हा जिवाने ज्याप्रमाणे संस्कार करण्याचा प्रयत्न केला असेल त्याप्रमाणे मनाची धारणा होत जाते. यालाच अभ्यास म्हटले आहे. भगवंतांनी चंचल मनाला आवरण्याचा जो अभ्यास सांगितला आहे त्याचे वर्णन करताना संत ज्ञानदेव म्हणतात- 'का जे यया मनाचे एक निके । जे देखिले गोडीचिया ठाया सोके । म्हणोनि अनुभवसुखचि कवतिके । दावीत जाई जे ॥' (६ ४२० ज्ञानेश्वरी). मनाला ज्या विषयाची गोडी लागते तेथेच मन सतत धाव घेत असते. जर मनाला वाईट विषयांची गोडी लागली असेल तर, त्याची गोडी चांगल्या विषयाकडे वळवली की ते मन चांगल्याच विषयांचे सेवन करते. म्हणून ईश्वरी भजन, कीर्तन, पुराण, श्रवण, वाचन, चिंतन, मनन, पूजा-अर्चा या विषयांची मनाला गोडी लावली की मन तेथेच रमेल व जिवाला कालांतराने मोक्ष प्राप्त होईल. म्हणून मन चंचल असले तरी ते ताब्यात येऊ शकते. मनाचे वर्णन करताना संत ज्ञानदेव म्हणतात 'जे इच्छेते वाढवी । आशेते चढवी । जे पाठी पुरवी । भयासी गा ॥ द्वैत जेथे उठी । अविद्या जेणे लाठी । जे इंद्रियाते लोटी । विषयांमाजी ॥ संकल्पे सृष्टि घडी । सवेचि विकल्पूनि मोडी । मनोरथांच्या उतरडी । उतरी रची ॥ जे भुलीचे कुहर । वायुतत्त्वांचे अंतर । बुद्धीचे द्वार । झाकविले जेणे ॥ ते गा किरीटी मन । या बोला नाही आन ।' (१३ ११२ ते ११६ ज्ञानेश्वरी). अहंकार हे बंधनात अडकविणारे द्रव्य आहे. (Bonding Material) पंचमहाभुते एकत्र जखडून ठेवण्यास, देहाचा आकार सुदृढ ठेवण्यास अहंकारच कारण आहे. 'अहं'कार जोपर्यंत आहे तोपर्यंत देहाचे देहत्व आहे. देहाच्या ठिकाणी ममत्व आहे, देहाकडून कार्य होत आहे, देहाचे अस्तित्व आहे आणि तसेच देहाचे महत्त्व आहे. जिवाची जीवदशा या अहंकारामुळेच आहे. हा अहंकारच जिवाला, देहाला सगळीकडे नाचवतो. अहंकारचे वर्णन करताना संत ज्ञानदेव म्हणतात- 'नवल अहंकाराची गोठी । विशेषे न लागे अज्ञानापाठी । सज्ञानाचे झोंबे कंठी । नाना संकटी नाचवी ॥' (१३ ८२ ज्ञानेश्वरी). अहंकार हा उपाधीमुळे वाढत जातो. जेवढ्या उपाध्या जास्त तेवढा अहंकार जास्त. अज्ञानी माणसाला काहीच उपाधी नसतात. त्यामुळे त्यांना अहंकार त्रास देत नाही. याउलट जेवढा माणूस श्रीमंत, शिकलेला, मोठ्या हुद्यावर काम करणारा, घरदार, गाडी, घोडा असलेला, तेवढा त्याचा अहंकार मोठा असतो. तोच अहंकारामुळे अनेक संकटांतही पडतो. जेव्हा हा अहंकार मावळून जाईल तेव्हा खाली शून्य उरेल. जेथे देहभावाचीच जाणीव उरत नाही तेथे देहभावामुळे निर्माण झालेल्या उपाधी कोठे शिल्लक राहतात आणि त्यामुळेच मनुष्य जीवन्मुक्तीकडे, विदेही अवस्थेकडे वाटचाल करू लागतो.

एकदा माताजी अरविंदबाबूंना म्हणाल्या होत्या, 'मी माझा अहंकार विरघळवून टाकते' तेव्हा अरविंदबाबू म्हणाले, 'माताजी! अहंकार गेला तर देहधारणाच शिल्लक राहणार नाही. तेव्हा त्या अहंकाराचे सूक्ष्म रूपात अस्तित्व असणे आवश्यक आहे.' म्हणून जोपर्यंत देहधारणा आहे तोपर्यंत अहंकार सूक्ष्म रूपाने अस्तित्वात असतोच.

'जैसा ज्वरु धातुगतु। अपथ्याचे मिष पहातु। मग जालिया आंतु-। बाहेर व्यापी ॥' (१३ ८० ज्ञानेश्वरी). ज्याप्रमाणे रोग शरीरात सूक्ष्म रूपाने असतातच, पण ज्या वेळी कुपथ्य होते त्या वेळी ते रोग उठाव करून प्रगट होतात. तसा अहंकार हा देहभावाच्या जाणिवेत व उपाधीच्या संबंधाने प्रगट होतो व नाना प्रकारच्या कर्मांच्या मागे लावतो व बंधनात घालतो. या संघात सुख एक तत्त्व आहे. 'सुख' एवढेच भगवंतांनी सांगितले त्यामुळे प्रत्येकाने सुखाचा अर्थ त्याला जसा पाहिजे तसा घेतला, पण ते त्यांना सुख न होता दुःखालाच कारण झाले. म्हणून संत ज्ञानदेवांनी सुखाचा अर्थ जास्त स्पष्ट करून सांगितला की, जेणे करून लोकांनी त्याच सुखाच्या मागे लागून खरे सुख प्राप्त करून घ्यावे व खऱ्या अर्थाने सुखी व्हावे. ते सुख म्हणजे काय तर- ज्याच्यामुळे जिवाला सर्व गोष्टींचा विसर पडतो, जे देहाच्या आठवणीला निराधार करून सोडते, जे जन्माला आल्याबरोबर प्राणाला पांगळेपणा येतो व सात्त्विकाला मात्र उधाण येते. सर्व इंद्रियांच्या वृत्तींना हृदयामध्ये शांतपणे झोपवते, इतकेच नव्हे तर जिवास आत्मस्वरूपाचा मार्ग ज्या अवस्थेत सापडतो त्या अवस्थेत जे भासमान होते त्याला सुख हे नाव आहे, असे संत ज्ञानदेवांनी वर्णन करून सांगितले आहे. ही सर्व वाक्ये तामस सुखासाठी वळवता येण्यासारखी आहेत, म्हणून या ठिकाणी आणखी एका वाक्याची जोड आवश्यक आहे. ते असे-

*'यत्तदग्रे विषमिव परिणामेऽमृतोपमम् ।*
*तत्सुखं सात्त्विकं प्रोक्तम् आत्मबुद्धिप्रसादजम् ॥'*

*(१८ ३७ भ. गी.).*

अर्थ – आणि जे प्रथम (अज्ञानावस्थेत) विषासारखे (दुःखकारक) भासते, परंतु तेच शेवटी (ज्ञानावस्थेत) अमृततुल्य (आल्हादकारक) असते. ते स्वतःच्या बुद्धीच्या प्रसन्नतेपासून उत्पन्न होणारे (बाह्य विषयांच्या संयोगामुळे होणारे नव्हे) सुख सात्त्विक होय.

याच सात्त्विक सुखाचे वर्णन संत ज्ञानदेवांनी वरीलप्रमाणे केले आहे. देहातील चैतन्य हे सर्वश्रेष्ठ आहे. शरीरातील प्राण हाच चैतन्यमय होय. या चैतन्यानेच

शरीरातील सर्व इंद्रिये कार्यप्रवृत्त होत असतात. त्या इंद्रियांना प्राणामुळे, चैतन्यामुळे शक्ती मिळत असते. याविषयी छांदोग्य उपनिषदात उत्तम दृष्टांत आला आहे. छांदोग्य उपनिषदात प्राणाची श्रेष्ठता वर्णन केलेला अध्याय असा आहे–

एकदा सर्व इंद्रियांमध्ये वाद सुरू झाला की कोण श्रेष्ठ आहे? सर्व इंद्रिये म्हणू लागली की 'मी श्रेष्ठ आहे?' या वादाचा निकाल लागावा म्हणून सर्व इंद्रिये पिता प्रजापतीकडे गेली. त्यांनी पिता प्रजापतीला विचारले, 'आमच्यात श्रेष्ठ कोण?' पिता प्रजापती म्हणाले, 'तुमच्यापैकी जो शरीरातून बाहेर गेला असता शरीर दुर्बल होईल तो श्रेष्ठ होय?'

आणि वाणी (शरीरातून) बाहेर निघून गेली. ती वर्षभर बाहेर राहून परतल्यावर म्हणाली, 'माझ्यावाचून तुम्ही कसे जगू शकला?' तिला इतरांनी उत्तर दिले, 'जसे न बोलणारे मुके जगतात तसे आम्ही प्राणाने श्वास घेत, चक्षूने पाहात, कानाने ऐकत, मनाने मनन करीत असे जगलो.' वाणीने शरीरात प्रवेश केला. चक्षू शरीरातून बाहेर निघून गेले. ते वर्षभर बाहेर राहून परत आले व म्हणाले, 'माझ्यावाचून तुम्ही कसे जगू शकला?' 'जसे न पाहणारे आंधळे जगतात, तसे आम्ही प्राणाने श्वास घेत, वाणीने बोलत, कानाने ऐकत, मनाने मनन करीत असे जगलो.' चक्षू शरीरात प्रवीष्ट झाले. श्रोत्र शरीराच्या बाहेर गेले व वर्षभराने परत आले. ते म्हणाले, 'तुम्ही माझ्याशिवाय कसे जगू शकलात?' 'जसे न ऐकणारे बहिरे जगतात तसे, प्राणाने श्वास घेत, वाणीने बोलत, चक्षूने पाहात, मनाने मनन करीत असे जगलो.' श्रोत्र शरीरात प्रवीष्ट झाले. मन शरीरातून निघून गेले. ते वर्षभर बाहेर राहून परतल्यावर म्हणाले, 'तुम्ही माझ्याशिवाय कसे जगू शकलात?' 'जशी अमनस्क (मननशक्ती नसलेली) बालके जगतात, प्राणाने श्वास घेत, वाणीने बोलत, चक्षूने पाहात, श्रोत्राने ऐकत असे जगलो. मनाने शरीरात प्रवेश केला. नंतर प्राणाने बाहेर जाण्याची इच्छा करताच, ज्याप्रमाणे उमदा घोडा पादबंधनास खुंट्यासह उपटून टाकतो त्याप्रमाणे, त्याने इतर इंद्रियांना तोडले. (ती सर्व इंद्रिये) त्याच्या जवळ येऊन म्हणाली, 'भगवंता ये-तू आमच्यामध्ये श्रेष्ठ आहेस. तू बाहेर जाऊ नको.'

वर सुखाचे वर्णन आले आहे. त्याविरुद्ध जे ते दुःख. 'जिये वृत्तिचिया आवडी। बुद्धि होय वेडी। विषया जिया गोडी। ते गा इच्छा॥ आणि इच्छिलिया सांगडे। इंद्रिया आमिष न जोडे। जेथ जोडे ऐसा जो डावो पडे। तोचि द्वेष॥' (१३ १२५ १२६, ज्ञानेश्वरी).

सुख, दुःख, इच्छा, द्वेष यांविषयीच्या कल्पनेत व्यक्ती व्यक्तीमध्ये फरक असतो. हा फरक संस्काराने येतो. जे एकाचे सुख ते दुसऱ्याचे दुःख असते, असे का होते? कारण सुख-दुःखाच्या इच्छा-द्वेषाच्या वृत्तीचे खरे स्वरूप लक्षात आलेले नसते. यामध्ये श्रेयस-प्रेयस असे दोन भेद आहेत. श्रेय व प्रेय यांविषयी कठोपनिषदात यमराजाने नचिकेताला सांगितले होते. यमराज म्हणतो, ‘श्रेय निराळे व प्रेय निराळे आहे. ती दोन्ही वेगवेगळ्या अर्थाने पुरुषाला गाठतात. त्या दोहोंपैकी श्रेय घेणाऱ्याचे कल्याण होते. जो प्रेय स्वीकारतो तो कल्याणापासून च्युत होतो. श्रेय व प्रेय माणसाकडे येतात. धीट पुरुष त्यांचे चांगले परीक्षण करून पृथक्करण करतो. धीट पुरुष प्रेयापेक्षा श्रेयाचा अंगिकार करतो. जो निर्बुद्ध असतो तो योगक्षेमाकरिता प्रेय स्वीकारतो.’ प्रेय हे व्यक्तिशः वेगवेगळे असते. ज्याला ज्याची आवड असेल ते त्याला प्रिय असते. दारू पिणे ज्याला आवडते त्याला दारू प्रिय असते आणि म्हणून प्रिय वस्तू अनेक आहेत, वेगवेगळ्या आहेत, एकमेकांच्या विरुद्ध आहेत, म्हणून प्रेय हे चांगले असेलच असे नाही. हितकारक, सुखकारक, आत्मकल्याणकारक असेलच असे नाही. हे मात्र निश्चित की ते उलट, ते वरील सर्वांच्या विरुद्ध म्हणजे अहितकारक, दुःखदायक, आत्म अकल्याणकारकच असणार, पण श्रेयस हे सर्वांचे सारखे असते. हितकारक, सुखकारक, व आत्मकल्याणकारकच असते. श्रेयस म्हणजे काय? श्रेयस हे खाणे, पिणे, वागणे, व्यवहार, संस्कार या सर्व बाबतीतच विचार करावयास पाहिजे अशी प्रेरणा देते. या सर्वातून आत्मोन्नती साधली जाते काय? जर त्याचे उत्तर ‘होय’ असे असेल तर ते श्रेयस आहे. केवळ स्वतःचा फायदा, स्वतःचे सुख, स्वतःचा आनंद साधून इतरांना दुःख, इतरांचे नुकसान होत असेल तर ते कर्म हे प्रेयस असले तरी दुःखदायकच आहे. त्याने आत्मनाश होतो. प्रेयस हे जसे व्यक्तीव्यक्तीमध्ये भिन्न असते तसे ते एका व्यक्तीतही प्रसंगोत्पात वयोमानाप्रमाणे व स्थलकालाप्रमाणे बदलत असते. तसे श्रेयस हे कधीही बदलत नाही. कारण त्याचा अखेरचा परिणाम आत्मकल्याणाचाच असतो. ते श्रेयस केवळ एका जन्मापुरते नसते तर ते जन्मोजन्मी कायम तेच असते व सर्व व्यक्तिभेदासाठीही तेच योग्य असते. असो. अशी ही प्रकृती छत्तीस गुणांची, तत्त्वांची असून सूक्ष्मापासून स्थूलापर्यंत खाली खाली आली आहे.

सृष्टीची उत्पत्ती व विस्तार झाला हे खरे पण त्याचा क्रम कसा असणार याचाही विचार महत्त्वाचा आहे. ‘जीवो जीवस्य जीवनम्।’ याच तत्त्वावर सृष्टीचा विस्तार झाला असे दिसते. ‘आधी चोच का आधी चारा’ असा विचार करता आधी चारा मग चोच असाच क्रम असणार, कारण उपभोगाच्या वस्तू आधी निर्माण झाल्या असतील व

मगच उपभोक्ता निर्माण झाला असेल. आधी प्राणी निर्माण करून मग त्याच्यासाठी अन्न झाले असेल हे शक्य वाटत नाही, कारण निर्माण झालेल्यांच्या पोटाची खळगी अन्न निर्माण होईपर्यंत कशी भरणार? म्हणून स्वामी रामदास यांनी सृष्टीच्या विस्ताराचा क्रम त्यांच्या ओव्यांमधून असाच दिला आहे असे दिसते. 'विधि प्रपंच तरु वाढला । वाढता वाढता विस्तीर्ण झाला । फळे येता विश्रांती पावला । बहुत प्राणी ।। नानाफळे रसाळे लागली । नाना जिनसी गोडीस आली । गोडी पाहावया निर्माण केली । नानां शरीरे ।। निर्माण झाले उत्तम विषये । शरीरेवीण भोगितां न ये । म्हणोनि निर्मिली उपाये । नाना शरीरे ।। ज्ञान इंद्रिये निर्माण केली । भिन्न भिन्न गुणांची निर्मिली । येका शरीरास लागली । परी वेगळाली ।। कर्मेंद्रिये लागवेगी । जीव भोगी विषयांलागी । ऐसा हा उपाये जगी । ईश्वरे केला ।।' (दशक २०, समास ८, ओवी १ ते ४, ९ दासबोध).

याचे वर्णन श्रीगीतेत वेगळ्या शब्दांत केलेले आहे.

*'भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च ।*
*अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ।।*

*अपरेयमितस्त्वन्यां प्रकृतिं विद्धि मे पराम् ।*
*जीवभूतां महाबाहो ययेदं धार्यते जगत् ।।'*

*(७ - ४ व ५ भ. गी.).*

अर्थ – पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि त्याचप्रमाणे अहंकार अशी आठ प्रकारांनी भिन्न भिन्न (दिसणारी) माझी प्रकृती होय. अर्जुना! ही (वरील) माझी (परमेश्वराची) अपरा प्रकृती होय आणि हिच्याहून वेगळी, जिच्या योगाने हे जग धारण केले आहे अशी जीवस्वरूप ही माझी (परमेश्वराची) परा प्रकृती होय असे समज.

पंचमहाभुते (पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश) व मन (रजोगुण), बुद्धी (सत्त्वगुण) व अहंकार (तमोगुण) अशी ही अष्टधा प्रकृती होय. या आठ मूळ द्रव्यांच्या एक एक प्रमाणाच्या विषम संयुगापासून एक एक जिवाचे बीज तयार झाले असे समजले तरी ते तिन्ही गुण शंभर शंभर टक्के धरले असता एकूण एक कोटी अब्ज एवढी मोठी संख्या त्या बीजांची झाली असेल. या अष्टधा प्रकृतीची साम्यावस्था झाली की त्यात जीव प्रवेश करतो म्हणजे एक कोटी अब्ज जीव निर्माण झाले असतील पण निसर्गाच्या परिस्थितीशी जुळवून घेऊन टिकाव धरू शकतील एवढ्याच जिवांचे

अस्तित्व या पृथ्वीवर राहिलेले आहे असे म्हणावे लागेल व त्यांची वेदपुराणातून जी संख्या दिली आहे ती चौऱ्यांशी लक्ष योनी म्हणजे जीव अशी दाखविली आहे. पंचमहाभुते व तीन गुण यांच्या एक एक टक्केच्या संयुगामुळे वेगवेगळी बीजे निर्माण झाली असतील आणि तशी ती जर जवळ जवळ असतील तर त्यांच्यात साधर्म्य सादृश असण्याची शक्यता आहे. म्हणजे ती बीजे निसर्गाने उत्क्रांत केली आहेत असे दिसते. उदा:- कोणतीही एक संख्या घेऊ- ९६१, ९६२, ९६३, ९६४, ९६५. या संख्यांतील पहिले दोन आकडे जरी सारखे असले तरी शेवटचा आकडा वेगळा असल्यामुळे त्यांना वेगळेपण प्राप्त झालेले आहे हे सिद्ध होते. म्हणजे त्या संख्या वेगळ्या आहेत हे सिद्ध होते. तसेच एक पेशी व लक्षावधी पेशी असलेले जीव हे वेगवेगळेच सिद्ध होतात. त्यांचा क्रम साधारण असा असावा (म्हणजे आहेच) (१) जलवनस्पती, (२) जलचर, (३) भूवनस्पती, (४) कीटक, (५) खेचर, (६) मृग (जनावरे), (७) मनुष्य. यांमध्ये अष्टधा प्रकृतीच्या संयुगाचा विचार करता असे दिसते की जडात जड व गुणांमध्ये तमोगुण यांचे अधिक्य असणारे जीव हे प्रथम म्हणजे खालचे जीव निर्माण झाले. जसे प्रथम जलवनस्पती, नंतर जलचर नंतर भूवनस्पती, कीटक, खेचर, मृग व सर्वात शेवटी सत्त्व, रज व तम यांच्या अधिकतम प्रमाणातील संयुगापासून मनुष्य निर्माण झाला असेल. म्हणजे मनुष्यामध्ये त्या आठही प्रकारच्या सर्वात उच्च दर्जाच्या प्रकृतीची संयुगे निर्माण होऊन त्यांतून मनुष्याची निर्मिती झाली असेल, कारण सध्या तरी मानवाहून अधिक प्रगत देह कोणालाही लाभलेला दिसत नाही. मानव हा बुद्धिमान असून सत्त्व, रज, व तम या गुणांच्या बाबतीत ९९% अंशाच्या संयुगापासून उत्पन्न झालेला आहे असे दिसते. कारण मनुष्यामध्येच सर्व गुणांच्या उच्चतम अशा संयुगांचे मिश्रण झाले असे वाटते. कारण मनुष्यच सात्त्विक गुणांनी उत्क्रांत होऊन देवत्वापर्यंत जाऊ शकतो. प्रचंड उद्योगशीलता हा गुणही मानवामध्येच दिसून येणारा आहे. तेथे रजोगुणाचे आधिक्य स्पष्ट होते. तसे सर्व प्राण्यांना, हिंसक प्राण्यांनाही मागे टाकणारा तामसीपणाही मानवाजवळच आहे हेही सिद्ध होते. कारण क्रूरपणात मनुष्याने सर्वांनाच मागे टाकले आहे. असो.

मनुष्य जसा हवामानाप्रमाणे कपड्यात व खाण्यापिण्यात बदल करतो तसा निसर्गही या बीजामध्ये आवश्यक बदल घडवून आणत असून त्या त्या काळाला योग्य असेच बीज निर्माण करतो, यात शंका नाही. असे असूनही प्राणिमात्रांची व वनस्पतींची एवढी संख्या का, असाही प्रश्न मनात उभा राहतो. त्याचे उत्तर असे असू शकेल की 'जीवो जीवस्य जीवनम्।' या तत्त्वावर पृथ्वीवरील प्राणिमात्रांचे जीवन पृथ्वीवरील

प्राणिमात्रांच्या, वनस्पतींच्या जीवनावरच, अस्तित्वावरच अवलंबून आहे. जेव्हा मोठा मासा लहान माश्याला खातो तेव्हा लहान माश्याला खाण्याला वनस्पती आवश्यकच आहेत आणि अशा परस्पर उपयुक्ततेचा विचार यामध्ये समाविष्ट असल्यामुळेही पृथ्वीवरील वनस्पतींच्या व प्राणिमात्रांच्या अस्तित्वाचा, संख्येचा समतोल कधीही बिघडलेला नाही, नव्हता व नसेल असे दिसते.

### उत्क्रांतीवाद - विज्ञानाप्रमाणे

सतत बदलत राहणे हा निसर्गाचा स्वभाव आहे. हजारो, लाखो वर्षांपासून ही प्रक्रिया चालू आहे. आजची ही जी सृष्टी दिसत आहे ती त्यामागील सृष्टीच्या बदलातूनच प्राप्त झालेले सुधारित स्वरूप आहे. या बदलात काही ठिकाणी बेशिस्तपणा दिसत असेल तर पुष्कळ ठिकाणी त्यात काही नियमबद्धताही दिसते. हा बदल म्हणजे सृष्टीची-सृष्टीतील सजीवाची, निर्जीवाची उत्क्रांतीच होय. या उत्क्रांतीचे टप्पे स्वेदजापासून सुरू होत असून उद्भिज, अंडज व जारजापर्यंत पोहचलेले दिसत आहेत. या चार प्रकारांतही हजारो प्रकार निर्माण झालेले आहेत व त्यातही वंशपरंपरेने हळूहळू बदल घडत गेलेला आहे. आज आपणांस जे दिसते आहे त्या अवस्थेला ते आलेले आहेत असे दिसते. या सातत्याने बदलत जाणाऱ्या अवस्थेत असणारा सजीव, बदलते हवामान (थंडी, वारा, उन, पाऊस) यांच्या माऱ्यापुढे टिकण्यासाठी धडपड करीत गेला व निसर्गाशी जुळते घेण्यासाठी बदलत गेला तो या आजच्या अवस्थेला आलेला आहे म्हणून सध्याच्या सजीव, निर्जीव सृष्टीला अत्यंत सुधारलेली सृष्टी म्हणावयास हरकत नाही. या सृष्टीच्या उत्पत्तीविषयी संशोधकांनी वेगवेगळे अंदाज बांधलेले आहेत. हे अंदाजही सध्याच्या परिस्थितीचा अभ्यास करूनच वर्तवलेले आहेत. त्यामुळे ते अवाजवी असण्याची शक्यता नाही. तेव्हा त्यांच्याही अभ्यासाचा विचार येथे करावयास हरकत नाही.

#### विशिष्ट निर्मितीचा सिद्धांत–

हा सिद्धांत हेब्रयू यांनी मांडला. त्यांच्या म्हणण्यानुसार प्रत्येक सजीव व निर्जीव स्वतंत्र रीत्या निर्माण झाले. यालाच विशिष्ट निर्मितीचा सिद्धांत म्हणतात. या सिद्धांताला आधार म्हणून फादर स्वारेझ याने असे म्हटले आहे की, सर्व सृष्टी परमेश्वराने निर्माण केली आहे आणि हे जग सहा दिवसांत उत्पन्न केले. पहिल्या दिवशी स्थूल वस्तू, तिसऱ्या दिवशी वनस्पती, पाचव्या दिवशी जलचर आणि पक्षी, सहाव्या दिवशी प्राणी आणि मानव निर्माण केला. (परमेश्वराचा एक दिवस म्हणजे

आपली हजारो वर्षे होत). मानवामध्ये प्रथम मनूला (Adam) परमेश्वराने निर्माण केले. तो प्राणिज पदार्थापासून बनवला व नंतर त्यात प्राण घातला. तसेच त्याने देहाहुती (Eve)ला बनवले आणि नंतर सृष्टिचक्राला स्वाभाविक गती मिळाली.

### सातत्याने निर्मितीचा सिद्धांत–

या सिद्धांतानुसार सजीवाची निर्मिती निर्जीव कार्बनी पदार्थांपासून झाली आहे. ॲनॅक्सिमॅन्डर आणि ॲनॅक्झिगोरस हे शास्त्रज्ञ लहानशा बीमध्ये दिसतो, जो पृथ्वीपासून आणि पावसाच्या पाण्यापासून तयार होतो असे मानतात. यावर ॲरिस्टॉटलचे म्हणणे आहे की, कीटक, कृमी, मासे, बेडूक हेसुद्धा ओलसर माती व घाणी (Filth) पासून तयार झाले आहेत. एवढेच काय माणूससुद्धा कृमीप्रमाणेच तयार झाला आहे. फ्रॅन्सिस्को रेडी यांनी सर्वात प्रथम प्रयोगाच्या साह्याने हे दाखवून दिले की सजीवाची निर्मिती ओली माती किंवा पाणी यांपासून होत नाही. माशीची निर्मिती अंड्यापासून होते. लॅझॅरो स्पलेन्झनी या इटालियन शास्त्रज्ञाने वरील सिद्धांत खोडून काढला. त्याने मटण शिजवून एका बाटलीत बंद केले. पुष्कळ महिन्यांनी त्यात सजीवाची निर्मिती दिसली नाही. निधाम या शास्त्रज्ञाने त्यावर असा युक्तिवाद केला की, मटण उकडल्याने त्यातील जीव निर्मितीची आवश्यक शक्ती काढून घेतली गेली असेल. त्यानंतर बंद बाटलीचे झाकण उघडे ठेवले. काही दिवसांनी तेथे कृमी दिसू लागल्या. यावरून असे सिद्ध होते की, सजीवाची निर्मिती पूर्वी असलेल्या सजीवापासूनच झाली.

### जीवन अखंडत्वाच्या साखळीचा सिद्धांत–

रिचर, प्रेयर, आरहेनियस, बोंडी, होयले या शास्त्रज्ञांनी हा सिद्धांत मांडला आहे. त्यांच्या म्हणण्यानुसार सजीव एका प्रकारातून दुसऱ्या प्रकारात जातो, पण तो कधीही निर्जीव पदार्थांपासून तयार होत नाही. मुळातच त्याचे अस्तित्व होते. म्हणजे जेव्हा पृथ्वी द्रवरूप गोळा होती तेव्हासुद्धा तो जीव होताच. रिचर म्हणतो, परग्रहावरून जिवाणू आले व त्यांपासूनच ही सर्व सृष्टी, वनस्पती निर्माण झाली.

### प्रलयानंतर सजीव निर्मितीचा सिद्धांत–

कुवीअर (Cuvier) ने हा सिद्धांत जगाला दिला. त्याच्या म्हणण्यानुसार संपूर्ण विनाशानंतर (प्रलयानंतर) की जे प्रलय अनेक प्रकाराने होत होते, त्यांमध्ये घडलेल्या

उलथापालथीनंतर प्रत्येक वेळेला संपूर्ण नवीनच सजीवाची निर्मिती झाली आहे. या निर्मितीत मागील निर्मितीत आवश्यक सुधारणा निसर्गत: झालेली असते.

### सजीवातील क्रांती–

या सिद्धांतानुसार सजीव हा मंद गतीने व क्रमश: घडत गेला आहे. सजीवाच्या तत्त्वानुसार यातील प्रकार व वर्ग हे कधीही कायम स्वरूपाचे नसून सतत बदलणारे असतात. सद्यस्थितीतील सजीव हा निसर्गत: उत्क्रांत होत होत अगदी सध्याच्या स्वरूपात घडलेला आहे आणि पुढे त्याची रचना अगदीच सोपी व साधी न राहता सुधारत सुधारत गुंतागुंतीची होत राहते. या सिद्धांताचे श्रेय चार्ल्स डार्विन, लामार्क, वालेस आणि हुगोदेर्हिस् यांच्याकडे जाते.

### सजीव निर्मितीविषयीचा आधुनिक विचार–

पृथ्वी थंड झाल्यावर त्यावर निर्माण झालेल्या महासागरामधील पाण्यात अमोनिया, मिथेन, खनिजे व मीठ भरपूर प्रमाणत होते. त्यामुळेच त्याच्यात सजीव सृष्टीच्या निर्मितीच्या दृष्टिकोनातून महत्त्वाच्या घटना घडल्या. रसायनशास्त्रज्ञ ओपॅरिन याने हा सिद्धांत मांडला. त्याच्या म्हणण्यानुसार सजीव सृष्टीची निर्मिती ही अकार्बनी पदार्थांपासून झाली, की जे प्राचीन वातावरणात (साधारण दोन कोटी वर्षांपूर्वी) साध्या स्वरूपात अस्तित्वात होते; व जे बाहेरील विशिष्ट बलाच्या परिणामाने सजीव आकारण्यास मदत करणारे ठरले, ते बल म्हणजे विद्युतबल, अतिनील किरण आणि किरणोत्सारी मूलद्रव्यातून बाहेर पडणारे किरण यांमुळे अकार्बनी पदार्थांमध्ये जीवसृष्टी निर्माण झाली. कार्बनी पदार्थांच्या निर्मितीची घटना–

### अ) हायड्रोकार्बनची निर्मिती–

जेव्हा पृथ्वीचे तापमान एक हजार डिग्री सेंटिग्रेडपेक्षा खाली आले त्या वेळी हायड्रोजन व कार्बन एकत्र येऊन विविध संयुगे तायर झाली.

उदा.– ॲसिटिलीन $CH + CH \rightarrow HC \equiv CH$

एथिलीन $CH_2 + CH_2 \rightarrow H_2C \equiv CH_2$

मिथेन $CH_2 + CH_2 \rightarrow CH_4 + C$

ब) ऑक्सिजनयुक्त कार्बनी पदार्थांची निर्मिती–

जेव्हा कार्बनी पदार्थ उच्च तापमानाला ऑक्सिजनशी संयोग पावतात तेव्हा हायड्रो-आक्सि संयुगे तयार होतात.



$$HC \equiv CH + H_2O \rightarrow CH_3\ CHO$$

ॲसिटिलीन पाणी $\rightarrow$ Acctade Hyde.

क) कार्बोहायड्रेट्सची निर्मिती– (पिष्ठमय पदार्थांची निर्मिती)

कार्बन, हायड्रोजन आणि ऑक्सिजनच्या छोट्या-छोट्या साखळ्यांनी प्रथम विविध प्रकारच्या शर्करा तयार झाल्या. उदा.– फळातील ग्लुकोज व फ्रेक्टोज, उसातील साखर, बटाटा, तांदूळ, डाळी, यांमधील पिष्टमय पदार्थ.

ड) स्निग्ध पदार्थांची निर्मिती–

ऑक्सिजनयुक्त, कार्बनी पदार्थांच्या ऑक्सिडीकरणामुळे फॅटी ॲसिड्स (स्निग्ध पदार्थांची) निर्मिती होते. हे स्निग्ध पदार्थ म्हणजेच शरीरातील मेद होय.



$$2HCHO \xrightarrow{\text{Polymarization}} CH_2\ OH\ CHO.$$

ई) अमीनो ॲसिड व प्रथिनांची निर्मिती–

कार्बनी पदार्थ, अमोनिया आणि पाणी हे पृथ्वीवर भरपूर प्रमाणात उपलब्ध असतात. त्यांच्या एकत्रित अभिप्रक्रियेने अमीनो ॲसिड्स तयार होतात. हे अमीनो ॲसिड्स एकमेकाला जोडून होणाऱ्या साखळीला प्रथिने म्हणतात.

फ) प्युरिनस पिरिमिडीन्स आणि केंद्रकीय आम्ले यांची निर्मिती–

वरील सर्व अभिक्रिया अतिशय गरम समुद्राच्या पाण्यात झाल्या असाव्यात. त्या पाण्यात प्रथम मूलद्रव्यांच्या संयुगाचा साठा प्रचंड प्रमाणात होता. होल्डेने या शास्त्रज्ञाने या समुद्राच्या पाण्याला 'गरम सौम्य साबणाचे मिश्रण' असे म्हटले आहे. नवीन तयार झालेली संयुगे एकमेकांवर आदळून त्यांच्यात अभिक्रिया होऊन एक नवीनच मोठा जटिल संयुगाचा रेणू तयार होतो. उदा.– प्युरिन पिरिमिडीन, केंद्रकीय आम्ल, न्यूक्लिओटाईड, न्यूक्लिक ॲसिड आणि शेवटी न्यूक्लिओप्रोटिन्स यांच्या निर्मितीमुळे सजीव व निर्जीव यांना विभागणारी रेषा तयार झाली. कारण हे सर्व पदार्थ पेशीतील

केंद्रकात आढळतात. यालाच जिवाची उत्क्रांती म्हणतात. (The Text Book of Zoology T.Y.BSc. by Mr. Prof. Jabade).

## सृष्टीच्या उत्पत्तीचा उत्क्रांतीवाद

सृष्टीमध्ये प्राण्यांची उत्पत्ती उत्क्रांतीने झालेली आहे. असे उत्क्रांतीवादाचे म्हणणे आहे. ती कशी झाली असेल त्याची माहिती खाली दिलेली आहे.

अनेक अविकसित, अपूर्ण व वेडेवाकडे प्राणी निर्माण करता करता (आधी उल्लेख आलेल्या रुद्राने निर्माण केलेल्या सृष्टीप्रमाणे) निसर्ग प्रगल्भ व पूर्ण प्राणी निर्माण करू लागला. जगण्यास अयोग्य अशा प्राण्यांचा नाश होऊन जास्त पूर्ण व कणखर प्राणी जन्मास येतात, असे शास्त्रज्ञांचे मत होते. या त्यांच्या म्हणण्यात योग्य तमांचे जीवन (Survival of the fittest) व स्वाभाविक संवरण (Natural Selection) या तत्त्वांची बीजे सापडतात ती अशी–

१) वनस्पती प्राण्यांच्या आधी अस्तित्वात आल्या.

२) जिवाची उत्पत्ती व वाढ ही पायरीपायरीने होणारी (Gradual) क्रिया आहे.

३) सव्यंग (Imperfect) प्राण्यांच्या जागी अव्यंग (पूर्ण-Perfect) प्राणी क्रमशः जन्मास आले.

प्रस्तरीभूत प्राणिशास्त्र- सूर्यापासून अलग झाल्यावर पृथ्वीवर पहिल्या १२५ कोटी वर्षांपर्यंत जीवसृष्टी अस्तित्वात नव्हती, अशी शास्त्रज्ञांची खात्री आहे. कारण त्या काळी पृथ्वी निरनिराळ्या वायुरूप पदार्थांची बनलेली होती. ती हळूहळू थंड होत जाऊन या काळाच्या शेवटी शेवटी पाणी व समुद्र ही अस्तित्वात आली. या कालखंडास अझोइक (Azoic) किंवा प्राणी व वनस्पती अस्तित्वात नसलेला कालखंड म्हणतात. त्यानंतरचा पॅलिओझोइक (Palocozoic) किंवा प्राथमिक खंड होय. त्यातच प्रोटोझोइक आणि आर्किओझोइक खंडांचाही समावेश होतो. या काळात भूस्तरात अनेक स्थित्यंतरे होऊन प्राथमिक अवस्थेतील शेवाळ (Algae), बुरशी (Funge) सारख्या वनस्पती व अमिबा (Amaeba) सारखे एकपेशी प्राणी अस्तित्वात आले. त्यानंतर मोल्यूसेस (Molusces) सारखे शंख, शिंपल्यात राहणाऱ्या अनेक प्राण्यांचे अवशेष सापडण्यास सुरुवात होते. त्या काळात पहिले जिवंत प्राणी निर्माण झाले. इतकेच नसून सर्व पृष्ठवंशी प्राण्यांचे पूर्वज 'काटेरी' म्हणजेच पाठीचा कणा असलेले व श्वासोच्छ्श्वास करणारे (Lung Fish) मासे या

काळाच्या शेवटी जन्मास आले. त्यानंतर जमीन व पाणी या दोहोंवरही वास्तव्य करू शकणारे बेडकासारखे, कासवासारखे प्राणी जन्मास आले. त्यानंतर पृष्ठवंशी प्राण्यांची जमिनीवर राहणाऱ्या जाती वाढीस लागून त्यांनी जमिनीचा कब्जा घेतला. प्रचंड वनस्पती पण या काळात अस्तित्वात आल्या असल्या पाहिजेत, कारण या काळातील भूस्तर कोळशाचा बनलेला होता. या चरात माशांच्या अनेक जाती सापडतात. शार्क मासे याच काळात निर्माण झालेले आहेत. त्याचप्रमाणे जमीन व पाणी यांवर जगणारे खवलेदार (Scaled) व सपाट डोक्याचे (Roof Headed) प्राणी भरपूर प्रमाणात अस्तित्वात होते असे दिसते. हे प्राणी सरपटणाऱ्या व सस्तन प्राण्यांचे (Reptiles) पूर्वज होते. या प्रथम कालखंडात जमिनीवर कोळी, कीटक, गोगलगायी, विंचू तसेच अनेक तऱ्हेच्या पालीही पुष्कळ होत्या. सबंध कालखंड अत्यंत थंड हवामानाचा असल्याने बहुतेक सर्व प्राण्यांची नाजूक नाजूक पिले कोषात वाढत असली पाहिजेत. हा प्राथमिक कालखंड सुमारे एकशेसात कोटी वर्षांचा असला पाहिजे.

त्यानंतर द्वितीय किंवा मेसोझोइक (Mesozoic) कालखंड 'रेप्टाईल्स युग' म्हणून प्रसिद्ध आहे. अनेक तऱ्हेचे लहान-मोठे सरपटणारे प्राणी या काळात अस्तित्वात आले. समुद्रात माशांच्यासुद्धा अनेक जाती निर्माण झाल्या. इन्थिऑसूरस् (Inthyosaurs), प्लेसिओसूरस् (Plesiosaurs) व मेझोसूरस् (Mesosaurs), यांचे समुद्रावर साम्राज्य होते व रेप्टाईल्सचे जमीन, पाणी व आकाश यांच्यावर साम्राज्य होते, तर टेरोसूरस्, (Ptarosaurs) सारखे पंख असलेले व उडणारे रेप्टाईल्स आकाशात भराऱ्या मारीत होते व दिनोसूरस् (Dinosaurs) सारख्या अजस्र व हिंस्र रेप्टाईल्सनी भूभाग व्यापला होता. पृथ्वीवर यापूर्वी व यानंतर एवढे मोठे भयंकर प्राणी केव्हाही निर्माण झाले नाहीत. त्यांच्यातील सर्वांत मोठा टायरॅनोसूरस (Tyrannosaurs) म्हणजे तर रक्तपिपासू प्राण्यांचा राजा होता. तो वीस फूट उंच व चाळीस फूट लांब असून त्याचे वजन मोठ्यात मोठ्या हत्तीच्या वजनापेक्षासुद्धा जास्त होते. त्याला तीन ते सहा इंच लांबीचे खंजिरासारखे दात असून त्याच्या पायांची बोटे माणसाच्या हाताएवढी लांब होती. रेप्टाईल्सचे हे वर्चस्व सुमारे एक कोटी वर्ष चालले, परंतु याच काळात रेप्टाईल्सच्या जातीचेच परंतु डोक्यावर दोन किंवा तीन शिंगे असलेले प्राणी उत्क्रांत होऊन त्यांनी या अजस्र रेप्टाईल्सना जीवनकलहाच्या झगड्यात पराभूत केले. हे प्राणी पृथ्वीवरून नामशेष झाले. हा काळ सुमारे बारा कोटी वर्षांचा होता असे दिसते.

रेप्टाईल्स युगात दुसरेही अनेक मोठे प्राणी जन्मास आले. मातेच्या उदरातून अंड्याशिवाय जिवंत अवस्थेत हे प्राणी जन्मू लागले. अशा रीतीने प्रसवणाऱ्या (Viviparous) प्राणिजातीने पृथ्वीवरील प्राणिसृष्टीत कल्पनातीत बदल घडवून आणला. हे प्राणी उष्ण रक्ताचे असल्यामुळे जास्त बुद्धिमान होते व म्हणून रेप्टाईल्ससारख्या अजस्र परंतु मंद बुद्धीच्या प्राण्यांच्या तडाख्यातून शिल्लक राहून वाढले. यात कांगारूसारखे पोटाला पिशव्या असणाऱ्या प्राण्यांसारखे अनेक प्राणी होते. त्यानंतरचा 'कॅनोझोइक' (Coinozoic) किंवा टरशरी (Tertiary) म्हणजेच तृतीय कालखंड. हा सुमारे पाच ते सहा कोटी वर्षांचा आहे. परंतु मानवाच्या उत्क्रांतीच्या दृष्टीने हा सर्वात महत्त्वाचा कालखंड म्हटला पाहिजे. वाळू, दगड, यांनी पृथ्वीवर आलेपन केलेले दृष्टीस पडते. समुद्राऐवजी मैलन् मैल जमीन अस्तित्वात येऊ लागली होती. अजस्र रेप्टाईल्सची जागा त्याच्याच जातीच्या परंतु नवीन जगाशी मिळते घेणाऱ्या सुसर, मगर, पाण्यातील साप, कासव वगैरे प्राण्यांनी घेतलेली दिसून येते. या काळाच्या सुरुवातीस हत्तीसारखे मोठे परंतु लहान मेंदू असलेले, गेंड्यासारखे मंद बुद्धीचे प्राणी पृथ्वीवर बरेच होते, पण याच काळात लेमूरसारखे लहान परंतु उच्च दर्जाचे प्राणीही अस्तित्वात आले. हे रात्री भटकणारे प्राणी लहान असून किडे खाणारे होते. या प्राण्यांच्या पुढच्या पायाला माणसाच्या हाताच्या अंगठ्यासारखा अंगठा असून तो बाकीच्या बोटांशी जुळविण्याची क्रिया त्यांना करता येत होती. त्याचप्रमाणे मागील पायाला आपल्या पायाच्या अंगठ्यासारखा अंगठापण दृष्टीस पडतो. त्याच्या मेंदूला थोड्याफार सुरकुत्या असून एका वेळी एकच पिलू जन्मास येते.

सुक्या जमिनीवर गवताची राने उगवू लागली व झाडपाला खाणाऱ्या प्राण्यांची जागा गवतावर चरणाऱ्या प्राण्यांनी घेतली. प्रथमावस्थेतील घोडे व हरणे जन्मास आली. मांजरे, कुत्रे, अस्वले व डुकरे यांच्याही जातीचे मांसाहारी पण पायाला खूर असलेले प्राणी जन्मास आले. परंतु सर्वात महत्त्वाची पायरी म्हणजे अनेक जातीची वानरे, एपस् व मानवसदृश (Anthro poidapas) वानरे या काळातच अस्तित्वात आलेली दृष्टीस पडतात. या कालखंडात पृथ्वीवरील वातावरण व हवापाणी पृष्ठवंशीय, सस्तन प्राण्यांच्या पैदाशीला व वाढीला अनुकूल असल्यामुळे या जातींनी उत्क्रांतीच्या पायऱ्या भराभर ओलांडल्या. चौथा कालखंड म्हणजे चालू युग. यास अंथ्रोपोझोइक (Anthropozoic) असे म्हणतात.

एकूण एकपेशी प्राण्यापासून मानवापर्यंत जवळ जवळ सर्व पायऱ्यांचा थोडक्यात परामर्श घेणे असल्यास तो खालीलप्रमाणे असेल असे दिसते.

१) मोनिरा (Monera) – वनस्पती जगतातील सर्वात खालच्या थरातील प्राणी हा थोडासा प्रोटोप्लॅझम व प्राणिज द्रव्य यांचा बनलेला असतो.

२) अमिबा (Amoeba) – या एकपेशी प्राण्याला शरीर असते. त्यात प्रोटोप्लॅझम व न्यूक्लिअस असतो. या तऱ्हेचे काही प्राणी आजही अस्तित्वात आहेत. माणसाचे स्त्री-बीज किंवा स्पंजाचे बीज अमिबासारखेच असते.

३) मोरिॲड्स (Moraeads) – अनेक पेशींचा चेंडूसारखा परंतु भरीव गोळा. या जातीचेही काही प्राणी अस्तित्वात आहेत. माणसाचा गर्भ एका अवस्थेत या प्राण्यासारखा असतो.

४) ब्लास्टेडा किंवा मोयूला (Blastaeads or morula) – अनेकपेशी परंतु आतमध्ये चेंडूसारखा पोकळ असा गोळ्यासारखा प्राणी. अशा तऱ्हेचे प्राणी पाण्यात पोहताना काही ठिकाणी सापडतात.

५) गॅस्ट्रिआड्स (Gastraeads) – लांबट आकाराचे दोन पेशींची किनार असलेले हे प्राणी समुद्रात तळाशी सापडतात. यात प्राथमिक अवस्थेतील तोंड, अन्ननलिका, फिकट त्वचा यांचे अस्तित्व दाखविता येते.

६) प्लॅटोड्स (Platodes) – हे आळीसारखे लांबट प्राणी असून ते दुसऱ्या जिवावर जगतात. त्यांच्यात पहिले आतडे तयार झालेले दृष्टीस पडते. ही एक सरळ नळी असते. त्याचप्रमाणे एकाच प्राण्यात प्राथमिक अवस्थेतील स्त्री-बीजे व पुरुष-बीजे उत्पन्न करणाऱ्या ग्रंथी सापडतात.

७) व्हर्मालिया (Vermalia) – निरनिराळ्या अवयवांचे वैशिष्टीकरण होऊ लागलेला हा पहिला प्राणी. यात तोंडापासून जवळजवळ सर्व पंचनेंद्रिये, मलमूत्र विसर्जन इंद्रिये, प्राथमिक मूत्रपिंड, संवेदनाक्षम केस, डोळा, स्नायूंच्या प्राथमिक पेशी व सर्वात महत्त्वाचे म्हणजे मेंदूचे काम करणाऱ्या मज्जातंतूच्या दोन बाजूंस दोन ग्रंथी हे सर्व प्राथमिक अवस्थेत या प्राण्यांत सापडतात. बीजयुक्त बीजपिंड पण यात अस्तित्वात होते. नोटोकॉर्डसारखी शरीराला कडकपणा आणणारी परंतु शरीराच्या पुढच्या बाजूस असलेली एक नासिकाही या प्राण्यांना असते. नोटोकॉर्ड ही पूर्वावस्था असे म्हटल्यास हे प्राणी म्हणजे पृष्ठवंशीय प्राण्यांचे मूळ पुरुषच होत.

८) प्रोकॉर्डेनिया (Pro-chordonia) – यात ॲसिडिअन्स किंवा ट्युनिकेट्स (Ascidians or tunicates) जातीचे प्राणी मोडतात. यांतील काही प्राण्यांत नोटोकॉर्ड (Noto Chord) म्हणजे पाठीचा कणा व नर्व्हकॉर्ड (Nerve chord) म्हणजे मज्जारज्जू यांचे अस्तित्व जन्मभर असते.

९) ॲक्रेनिआ (Acrania) – म्हणजे डोके नसलेले प्राणी. या जातीचे प्राणी माशांचे पूर्वज समजले जातात. ॲम्फिऑक्सस हा एकच या जातीचा प्राणी सध्या अस्तित्वात आहे.

१०) लॅम्प्रेस (Lamprey) – यांना हाडे नसतात. परंतु प्रथमावस्थेतील डोके असते. यांना नोटोकॉर्ड व नर्व्हकॉर्ड असून नर्व्हकॉर्डच्या दोन्ही बाजूंस कार्टिलेजचे लहान चपटे तुकडे असतात. न्यूरलआर्चेसची ही पूर्वप्रतीकेच होत. सुरुवातीस यांचा मेंदू म्हणजे नर्व्हकॉर्डचाच एक लहानसा गोळा असतो. परंतु पुढे तो इतर उच्चजातीय प्राण्यांच्या मेंदूसारखा पाच कप्प्यांचा बनतो. हे प्राणी ॲम्फिऑक्स व मासे यांच्यातील दुवे होते.

११) शार्क (Sharks) – अनेक प्रथमावस्थेतील अवयव व कार्टिलेजचा सांगाडा या माशात सापडतो.

१२) क्रोसोटेरिजिअन मासे अथवा फॉसिल गेनॉइड्स (Crossopterygain fishes or foscil ganoids) शार्क माशांच्या पेक्षा प्रगल्भ जातीचे मासे. यांचे सापळे भूस्तरात खूप सापडतात.

१३) दिपन्यूस्ट (Dipneust or Double breathing fish) – हे मासे पाण्यात व हवेत श्वसन करत असत. हे मासे म्हणजे पाण्यात व जमिनीवर जगणाऱ्या प्राण्यांतील मधली अवस्था होत.

१४) ॲफिबिअन्स (Amphibians) – जमिनीवर व पाण्यात राहणारे बेडकासारखे प्राणी यांच्यापासून रेप्टाईल्सचा जन्म झाला.

१५) रेप्टाईल्स (Reptiles) – हे एका बाजूस जमिनीवर राहणाऱ्या पृष्ठवंशी सस्तन प्राण्यांचे पूर्वज, तर दुसऱ्या बाजूस पक्ष्यांचेही पूर्वज होत.

१६) प्रो-मॅमल्स (Pro mammals) – हे अंडी घालणारे पहिले सस्तन प्राणी होते.

१७) मार्स्युपिअल्स (Marsupails or pouched animals) - हे कांगारूसारखे प्राणी. यांच्या पोटाला पिल्ले ठेवण्याकरिता पिशव्या असतात. यांचे उत्क्रांतीच्या साखळीतील स्थान अजूनही दुर्बोध आहे.

१८) किडे खाणारे (Insect feeders or Insectivores) - हे खारीसारखे प्राणी एप्सचे अतिप्राचीन सस्तन पूर्वज होत.

१९) लेमुर्स (Lemurs) - अर्ध वानर. हे लहानसे प्राणी निशाचर असून विषुववृत्ताच्या आसपासच्या जंगलात अजूनही पुष्कळ आहेत. ते माणसांचे खरे पूर्वज होत.

२०) प्लॅटेऱ्हाइन मंकीज (Platyrrhine monkeys) – दक्षिण अमेरिकेच्या जंगलात सापडणारी चपट्या नाकाची वानरे. यांच्या घशाशी (Larynx) आतील बाजूची रचना बरीचशी माणसासारखी असते.

२१) कॅटेऱ्हाईन मंकीज (Catarzhine monkeys) – हे जुन्या जगातील प्राणी असून आफ्रिका व भारत या दोन्ही खंडांतील वानरे याच जातीची होत. यांच्याच प्रगल्भ जाती म्हणजे मानवसदृश गोरीला, चिपांझी, ओरांग, किंवा गिबन जातीची वानरे होत. सर्वात खालच्या पातळीवरील माकड व उच्च मानव एप यांच्यामध्ये फारच थोडे साम्य सापडते. परंतु उच्च जातीची वानरे व अगदी खालच्या पातळीवरील माणूस यांच्यात मात्र कमालीचे साम्य आढळते. (उत्क्रांतीवाद-इंदुमती पारिख)

वर ज्याप्रमाणे उत्क्रांतीचा क्रम विज्ञानाने दाखविला आहे त्याच पद्धतीचे वर्णन भागवतात आलेले आहे. गीता प्रेस गोरखपूर यांनी प्रकाशित केलेले भागवत सुधासागर या हिंदी पुस्तकातून त्याचे मराठी केलेले रूपांतर–

परमेश्वराचे स्थूल व सूक्ष्म, व्यक्त आणि अव्यक्त ही दोन्ही रूपे परमेश्वराच्या मायेने निर्माण केलेली आहेत. म्हणून विद्वान, ज्ञानी पुरुष या दोन्हींचाही त्याग करतो. वास्तविक परमेश्वर निष्क्रिय आहे. तो शक्तीच्या आश्रयानेही सक्रिय बनतो. पुन्हा तो ब्रह्मरूपाचे विराट रूप धारण करून वाच्य, वाचक, शब्द आणि त्याचा अर्थ या रूपाने प्रगट होतो आणि अशाच प्रकारे अनेक नावे व क्रिया यांचा स्वीकार करतो. परीक्षित, प्रजापती, मनू, देवता, ऋषी, पितर, सिद्ध, चारण, गंधर्व, विद्याधर, असुर, यक्ष, किन्नर, अप्सरा, नाग, सर्प, किम्पुरुष, उरवा, मातृका, राक्षस, पिशाच, प्रेत, भूत, विनायक, कूष्मांड, उन्माद, वेताळ, यातुधान, ग्रह, पक्षी, मृग, पशू, वृक्ष, पर्वत, सरीसृप इत्यादी. जितकी या संसारात नामरूपे आहेत ती सर्व परमेश्वरच आहेत.

संसारामध्ये चर, अचर या भेदरूपाने दोन प्रकार, जरायुज, अण्डज, स्वेदज, उद्भिज या चार प्रकारांच्या भेदाने जितकेही जलचर, स्थलचर, विहंग आहेत. हे सर्व शुभ-अशुभ तसेच मिश्रित कर्माची फलरूप आहेत. सत्त्वगुण प्रभावाने देवता, रजोगुण प्रभावाने मनुष्य व तमोगुण प्रभावाने नारकीय योनी मिळते.

जेव्हा तीन गुणांमध्ये एका गुणाचा प्रभाव वाढून बाकीचे दोन दबले जातात तेव्हा त्यांच्या गतीप्रमाणे आणखीन तीन-तीन प्रकार होतात. (स्कंद २, अध्याय १०, श्लोक ३५ ते ४१).

हे विश्व सध्या जसे आहे तसेच पूर्वी होते आणि भविष्यकालीही तसेच राहणार आहे. या विश्वातील सृष्टी ही नऊ प्रकारची आहे. त्याचप्रमाणे प्राकृत-वैकृत भेदाने दहावी सृष्टीसुद्धा आहे. पहिली सृष्टी महत्त्वाची आहे. परमेश्वराच्या प्रेरणेने सत्त्वादी गुणांमध्ये विषमता निर्माण होते. हेच या सृष्टीचे स्वरूप आहे. दुसरी सृष्टी अहंकाराची होय. ज्याच्या योगाने पृथ्वी आदी पंचमहाभुते, ज्ञानेंद्रिये, आणि कर्मेंद्रियांची उत्पत्ती होते. तिसरी सृष्टी भूतसर्ग होय, ज्यामध्ये पंचमहाभुतांना उत्पन्न करणाऱ्या तन्मात्रा असतात. चौथी सृष्टी इंद्रियांची. ही इंद्रिये ज्ञान आणि क्रिया यांनी संपन्न असतात. पाचवी सृष्टी सात्त्विक अहंकाराने उत्पन्न झालेल्या इंद्रियाधिष्ठित देवतांची होय. मनसुद्धा या सृष्टीमध्येच अंतर्गत असते. सहावी सृष्टी अविद्याची होय. यामध्ये तामिस्त्र, अंधतामिस्त्र, तम, मोह आणि महामोह ही पाच असतात. ही जिवाच्या बुद्धीला आवरण घालणारी आणि विक्षेप निर्माण करणारी असतात. सातवी प्रधान वैकृत सृष्टी ही सहा प्रकारच्या स्थावर वृक्षांची असते. वनस्पती (जिला मोहर न येता फळे येतात), औषधी (जी फळ देताच सुकून जातात), लता (जी दुसऱ्याच्या आश्रयाने वाढतात), त्वक्सार (ज्यांची साल जाड असते. उदा. बांबू), वीरुध (ज्या वेली जमिनीवर पसरतात.) आणि द्रुम (ज्यांच्या ठिकाणी प्रथम फूल येते व फुलातच फळाची धारणा होते.) यांची मुळे जमिनीत व वाढ वर होते. या प्रकारामध्ये ज्ञान, शक्ती प्रकट होत नाही. या केवळ आत व बाहेर स्पर्शाचा अनुभव करतात. यांच्या प्रत्येकाच्या ठिकाणी काही विशिष्ट गुण आहेत. आठवी सृष्टी तिर्यग योनी होय (पशू-पक्षी) ही अठ्ठावीस प्रकारची आहे. यांच्या ठिकाणी विचारशक्ती व दूरदर्षिता असत नाही.. यां तिर्यक योनीमध्ये गाय, बकरा, म्हैस, कृष्णमृग, डुक्कर, नीलगाय, रूरू नावाचा मृग, भेंड, आणि उंट येतात. हे दोन खुरांचे पशू होय. गाढव, घोडा, खेचर, गौरमृग, शरभ आणि वनगाय हे एक खुराचे पशू यामध्ये मोडतात. आता पाच नखांचे पशु पक्षी यांची यादी पाहा. कुत्रा, कोल्हा, तरस, वाघ, बिबळा, ससा, अस्वल, साळी, सिंह, माकड, हत्ती,

कासव, घोरपड आणि मगर हे पशू आहेत. बगळा, गिधाड, होला, खंड्या, मोर, हंस, सारस, चक्रवाक, कावळा, घुबड हे पक्षी होत. नववी सृष्टी मनुष्याची. ही फक्त एक प्रकारचीच आहे. याचा आहार प्रवाह वरून (तोंडाने) खालच्या बाजूला होत असतो. मनुष्य रजोगुणप्रधान, कर्मपरायण आणि दुःस्वरूप विषयांमध्ये सुख मानणारा आहे. देवता, असुर, पितर, गंधर्व-अप्सरा, यक्ष, राक्षस, सिद्ध-चारण-विद्याधर, भूत-प्रेत-पिशाच आणि किन्नर किम्पुरुष-अश्वमुख इत्यादी भेदाने ही देवसृष्टी आठ प्रकारची आहे. अशा प्रकारे ब्रह्माने रचलेल्या दहा प्रकारच्या सृष्टी आहेत (स्कंद-३, अध्याय-१०, श्लोक ११ ते २९ सारांशरूपाने).

सर्व प्राण्यांत मनुष्यप्राणी हा जास्त बुद्धिमान आहे. तेव्हा त्याचे बीजही तसेच असावयास पाहिजे. हीसुद्धा निसर्गाला वाटलेली गरज आहे असे वाटते आणि म्हणून वरीलप्रमाणे गुणसूत्रे व जीन्सच्या विशिष्ट संयोगाने, क्रमाने, संख्येने मनुष्याचे बीज निर्माण केले आणि ते आजपर्यंत अस्तित्व टिकवून आहे आणि यानंतर तरी अजून कोणतेही बीज निर्माण झाले नाही की, जे मनुष्याहून अन्य प्रकारचा प्राणी निर्माण करून निसर्गाची भूक भागवू शकेल. निसर्गाच्या उत्क्रांतीचा हा टप्पा कदाचित शेवटचा असेल, पण मनुष्याने त्यावर समाधान न मानता निसर्गाने दिलेल्या खास देणगीने त्याने आपली आणखी उत्क्रांती करून घेतली आहे. त्याची उत्क्रांतीची वाटचाल अजूनही चालू आहे व पुढे ती चालत राहील यात शंका नाही. अर्थात मनुष्याला पूर्णत्वाला पोहचण्यास किती कालावधी लागेल हे आता तरी सांगणे केवळ अशक्य आहे. हे पूर्णत्व कशात आहे? पूर्णत्व म्हणजे तरी काय असावे? याचाही विचार कदाचित कोणाच्या तरी डोक्यात चालू असेल. त्या दिशेने संशोधक, शास्त्रज्ञ पाऊलही टाकत असतील. निसर्गावर मात करण्याचे अनेक प्रयोग पूर्वी होऊन गेले, आता होत आहेत व पुढेही होत राहतील, पण निसर्गावर मात करणे म्हणजे काय? निसर्ग म्हणत असेल की 'अरे मानवा, मी जे जे तयार केले आहे ते ते सर्व तू करून दाखवावेस?' आणि असे ज्या दिवशी कोणी मानव करून दाखवू शकेल त्या वेळीच त्याने निसर्गावर मात केली असे होईल आणि अशीच अपेक्षा निसर्गाला असेल.

मनुष्याने धान्याच्या अनेक संकरित जाती निर्माण केल्या. फळातील बिया नाहीशा करूनही कमाल केली तरीही मानवाचे समाधान झाले नाही. त्याची संशोधने अजून चालूच आहेत. याचा अर्थ निसर्गाचेही अजून समाधान झाले नाही. कारण अजून खूप लांबचा पल्ला गाठावयाचा आहे याची मानवाला व निसर्गाला कल्पना आहे. या महान उत्क्रांतीसाठी मानवाचे बीजही संकरित व्हावयास पाहिजे. या ठिकाणी संकरित शब्दापेक्षा 'सुसंस्कारित' असा शब्द वापरला पाहिजे. सुसंस्कारित प्रक्रियेमुळे मानवाचे बीज उत्क्रांत पावेल असे वाटते, दिसते.

याविषयी वृत्तपत्रात जे लेख आलेले आहेत यांचा उल्लेख करणे आवश्यक आहे, असे वाटते. 'पुरुषाच्या शरीरातील य-गुणसूत्र (वाय-क्रोमोसोम) हे त्याला वडिलांकडून मिळालेले असते, तर मायटोकाँड्रियल डी.एन.ए (एम टी-डी एन ए) हा त्याच्या आईकडून आलेला असतो. प्रत्येक पिढीत हा वारसा अशाच रीतीने पुढे पुढे जात असल्याने य-गुणसूत्रातील जनुकीय घटकावरून वडील, वडिलांचे वडील... वगैरे साखळीकडून आलेल्या जनुकीय घटकाचा अंदाज येतो, तर मायटोकाँड्रियल डी एन एच्या घटकातून आई, आईची आई...वगैरे साखळीकडून आलेल्या घटकांविषयी माहिती मिळते. या अभ्यासातून शास्त्रज्ञांना असे आढळले आहे की, जातीपातीच्या उतरंडीवरच्या लगेच वरच्या पायरीवरच्या पुरुषाशी लग्न करण्याचे स्वातंत्र्य स्त्रियांना असते, पण पुरुषांना मात्र आपल्या किंवा खालच्या स्त्रियांशी लग्न करणे शक्य होई. (सकाळ १८-८-९८ ले. सुधीर थत्ते).

वरील लेखातून वरची व खालची जात हा संदर्भ ब्राह्मण, मराठा, वगैरे असा नसावा, तर उत्तम संस्कारित व साधारण किंवा कुसंस्कारित जाती वा पुरुष-स्त्रिया असा असावा व तोच योग्य आहे. ज्याप्रमाणे बियांवर संस्कार करून प्रगत जातीची बियाणे तयार केली जातात, त्याप्रमाणे मानवी बीजांवर संस्कार करणे प्रयोगशाळेत शक्य नाही. प्रयोगशाळेतील संस्काराने भौतिक प्रगतीची बीजे कदाचित रुजविली जातील. असे म्हणतात की, परदेशात कोणत्या शाखेचा किती उच्चशिक्षित मुलगा पाहिजे याचा पुरवठा करणारी दुकाने, प्रयोगशाळा आहेत, पण अशा बीजांपासून अशी उच्चशिक्षित मुले जरी होत असली तरी ती उत्तम संस्कारित असतीलच असे नाही. कारण संस्कार हे कोणत्याही भौतिक रसायनाच्या मिश्रणाने तयार होणारी वस्तू नव्हे, तर संस्कार हे मनाच्या, बुद्धीच्या, चित्ताच्या स्तरावर करावयाच्या प्रक्रिया आहेत. सततच्या चिंतनाने, मननाने, अभ्यासाने हे संस्कार होत असतात. संस्कार हे अपक्रांतीचे व उत्क्रांतीचेही असू शकतात. आपण अपक्रांतीच्या संस्कारांचा विचार करणार नाही. अहो,

डोंगरावरून खाली पडण्याला, सज्जनाचा दुर्जन होण्याला एका क्षणाचाही अवधी लागत नाही. पण डोंगर चढण्याला, उत्तम संस्कार होऊन सज्जन, संत होण्याला फारच कालावधी लागतो. 'फार' याचा अर्थ कित्येक वर्षे, कित्येक जन्मसुद्धा लागतात. वरील लेखात सांगितलेल्या पद्धतीने वंशपरंपरेने उत्तम संस्कारित कुळाशी संबंध ठेवून बीजाला उत्क्रांत करणे ही गोष्ट जशी शक्य आहे, (रामदास स्वामींच्या जन्माआधी आठ-नऊ पिढ्यांपासून रामाची उपासना चालू होती) तसेच व्यक्तिशः उत्तम संस्कार करणाऱ्या ग्रंथांच्या वाचनाने, चिंतनाने, मननाने नैतिकतेच्या आचरणाने, कुटुंबाशी, समाजाशी आपल्या कुवतीप्रमाणे असलेल्या कर्तव्यकर्माच्या आचरणाने, शांत, सौम्य, आनंदी अशा वृत्तीची जोपासना करण्याने हे संस्कार आपले आपण करू शकतो. याचीच पुढची पायरी उत्तम साधना करून, तपाने, जपाने, निर्लोभ वृत्तीने, समाजाच्या उपयोगी पडण्याने, दानानेही उत्तम संस्कार होऊ शकतात. जशा काही गोष्टी जोडावयाच्या असतात तशा काही गोष्टी या काढूनही टाकावयाच्या असतात. कारण कोणतीही वस्तू ही पूर्ण शुद्ध स्वरूपात नसतेच. त्यामुळे शुद्धीकरणाचाही प्रयोग येथे आवश्यक आहे. म्हणून काम, क्रोध, लोभ, मद, मोह व मत्सर यांसारखे विकार काढून टाकले पाहिजेत- कारण हेच विकार माणसाला पशू बनवतात. म्हणजे अपक्रांत करतात. वाळूतील अशुद्धपणा काढून त्याच्यावर योग्य संस्कार केले की मलहीन, शुद्ध, पारदर्शक, नितळ अशी काच तयार होते. तसे आपले मन, बुद्धी, चित्त, वृत्ती शुद्ध झाली पाहिजे. म्हणजेच बीज उत्क्रांत झाले असे होईल. अशा नितळ, स्वच्छ, काचेतून ज्याप्रमाणे कोणताही पदार्थ अगदी स्पष्ट व जसा आहे तसा दिसतो. तसे या निसर्गातील मूलतत्त्वांचा गाभा स्पष्ट दिसू लागेल. नव्हे तर केळाच्या सोपट्यांचे एक एक पापुद्रे काढून टाकले असता जसे शुद्ध, निर्मळ, निर्गुण, निराकार आकाशच प्रत्ययाला येते. तसे या सृष्टीतील, निसर्गातील मूलतत्त्वाचे दर्शन होईल. निसर्गात घडणाऱ्या प्रक्रियांचा अर्थ उलगडू लागेल, पण या गोष्टींच्या अभ्यासासाठी आणखी एका गोष्टीची जरुरी आहे. ती कोणती? तर त्यासाठी खालील लेख वाचला पाहिजे.

विश्वोत्पत्ती आणि विश्वधारणेविषयीच्या त्यांनी मांडलेल्या नवीन सिद्धांताने सध्याच्या पदार्थविज्ञान शास्त्रामध्ये नवीन क्रांती होऊ पाहात आहे. एक नवीन सिद्धांत पदार्थविज्ञानशास्त्रात विकास पावू पाहात आहे. या नवीन सिद्धांताचे नाव जरा चमत्कारिकच आहे. शास्त्रज्ञांनी याचे नाव ठेवले आहे 'यच्चयावत पदार्थाच्या मूल अधिष्ठानाचा सिद्धांत (Theory of everything) किंवा कंपित महाधाग्याचा सिद्धांत (Theory of vibrating superstings). रोमन तत्त्ववेत्त्यापासून

आजतागायत शास्त्रज्ञांची मूलधारणा होती की निसर्गातील यच्चयावत पदार्थ सूक्ष्म कणांनी बनलेले आहेत, पण नवीन सिद्धांताची धारणा अशी आहे की, या कणांचीही रचना अतिसूक्ष्म अशा कंप पावत असलेल्या महाधाग्यांनी झालेली आहे. म्हणून त्यांना कंपित महाधागे (Vibrating superstings) म्हटले आहे. याचा अर्थ असा की, विश्वातील सर्व पदार्थांच्या मुळाशी-म्हणजे अगदी आपल्या शरीरातील पेशीपासून ते सर्वात दूरवरच्या ताऱ्यापर्यंत– आतापर्यंत आपण जे प्रोटॉन्स व न्यूट्रॉन्स आहेत असे समजत होतो तसे नसून त्यांच्याही मुळाशी हे कंपित महाधागे आहेत. कसे आहेत ते महाधागे? शास्त्रज्ञ म्हणतात, 'हे धागे आजपर्यंत कुणीही पाहिले नाहीत. कारण अति, अति अतिसूक्ष्म अतींद्रिये आहेत. ते पाहता येतील की नाही हे सांगता येत नाही. पण बुद्धीला समजू शकतील. कंपित महाधाग्यांच्या सिद्धांतानुसार विश्वनिर्मितीची सुरुवात दहा मितींमध्ये (Ten dimensions) झालेली आहे. सध्याच्या विश्वात आपल्याला चारच मिती माहीत आहेत. उदा- लांबी, रुंदी, जाडी आणि काल या त्या चार मिती होत. नवीन सिद्धांतानुसार विश्वारंभाच्या वेळेला जास्तीच्या सहा मितींची गुंडाळी होऊन त्याचा एक चेंडू तयार झाला. हे कसे झाले ते शास्त्रज्ञांना कळलेले नाही, पण ते म्हणतात की, उरलेल्या चार मिती वेगाने प्रसरण पावत जाऊन महास्फोट पावल्या. यालाच महास्फोटाचा (Big bang) सिद्धांत म्हणून ओळखतात. कंपित महाधाग्याचा सिद्धांत सांगतो की महास्फोटामागे किंवा प्रकाशामागेही कोणीतरी होतं. त्याची संकल्पना महाधाग्याच्या रूपाने केली आहे. महाशक्तीचा सिद्धांत (The Strong force theory) विश्वातील यच्चयावत चार क्रिया म्हणजे फूल उगवण्यापासून ते सूर्य उगवण्यापर्यंत महाशक्तीद्वारेच घडतात, असा या सिद्धांताचा निष्कर्ष आहे. या चार महाशक्ती म्हणजे १) विद्युत चुंबकीय शक्ती (Electro magnetism) की जी प्रकाशाच्या द्वारा आपल्याला परिचित आहे. २) गुरुत्वाकर्षणाची शक्ती (gravity) ३) व ४) शक्ती म्हणजे सशक्त व दुर्बल (Strong and weak forces) ओज पण गेली अनेक वर्षे शास्त्रज्ञांचा अंदाज आहे की या चारही शक्ती खरं म्हणजे एकाच महाशक्तीची वेगवेगळी दर्शने आहेत. शक्तीच्या मूळस्रोताचा विचार (Verified field Theory) निश्चित करता येत नाही. प्रा. आईनस्टाईननी आयुष्याची शेवटची तब्बल तीस वर्षे याच सिद्धांताचा पाठपुरावा करण्यात घालवली होती पण त्यांना तो गवसू शकला नाही.

दहा मितींची संकल्पना जर खरी असेल तर उरलेल्या सहा मितींचा समावेश असलेलं विश्व आपल्या बरोबरच अस्तित्वात असतं. कुठं असतं हे सहा मितींचं विश्व? शास्त्रज्ञ म्हणतात 'ते इतकं सूक्ष्मातिसूक्ष्म आहे की ते मानवाजवळच आहे पण त्याचा त्याला पत्ता नाही.' श्वार्झ म्हणतात की मला सतत जाणवत होतं की या दहा मितींच्या संकल्पनेमध्ये विलक्षण आकर्षकता आहे. मला तिचं नेमकं ज्ञान नव्हतं पण ती आहे हे कळत होतं. गणित पद्धतीने जेव्हा मी त्याचा शोध घेत होतो तेव्हा अनेक गणिती चमत्कार (Mathematical miracles) नजरेला येत होते. चमत्कार कळत नव्हते पण अनुभवास येत होते. त्यामुळे एक प्रकारची खोल श्रद्धा उदयास आली. कंपित महाधाग्यांच्या सिद्धांताची अनेक वैशिष्ट्ये आहेत. त्यांपैकी एक म्हणजे एक मितीमधील धाग्याची संकल्पना आणि दहा मितींतील विश्वनिर्मितीची संकल्पना. चार शक्तींचा मूलस्त्रोत असणारी महाशक्ती गणिताच्या साह्याने जाणणाऱ्या या सिद्धांतातील दुसरा कोणताच उपाय शास्त्रज्ञांना आता तरी माहीत नाही. प्रा. श्वार्झना वृत्तपत्रकारांनी जेव्हा प्रश्न विचारले की, सुरुवातीला अनेकांची टीका, विरोध आणि अपमान सहन करूनही तुम्ही या सिद्धांताचा पाठपुरावा कसा केला तेव्हा त्याचे उत्तर त्यांनी एका शब्दात दिले- 'श्रद्धा.'

---

*सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रता: ।*
*नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥*

*(९-१४ गीता).*

गीतेच्या वरील श्लोकाचे विवरण करताना संत ज्ञानदेवांनी केलेल्या विवेचनात खालील ओव्या समाविष्ट केल्या आहेत- 'ऐसे हे गहन। अर्जुना माझे भजन । आतां ऐके सांगेन। जे करिती एक ॥ तरी दोन्ही पालववेरी । जैसा एक तंतु अंबरी । तैसा मीवाचूनि चराचरी । जाणती ना ॥ आदि ब्रह्म करूनी । शेवटीं मशक धरूनी । माजी समस्त हे जाणोनी । स्वरूप माझे ॥ मग वाड धाकुटे न म्हणती । सजीव निर्जीव नेणती । देखिलिये वस्तु उजु लुंठिती । मीचि म्हणोनी ॥ (९-२२०, २१, २२, २१९ ज्ञानेश्वरी). ज्ञान हे सूक्ष्म आहे. निर्गुण, निराकार आहे. ते सर्वांच्या हृदयी स्वयंभूही आहे. त्यामुळे त्याचे प्रगटीकरण करण्याकरिता कोणीतरी सांगणे आवश्यक आहे आणि हे ज्ञान गुरुमुखातून ऐकले की हृदयातून ते स्वयंभू बाहेर येऊ लागते. संत ज्ञानदेव म्हणतात. 'मोटके गुरुमुखे उदैजत दिसे। आणि हृदयी स्वयंभचि असे। प्रत्यक्ष फावो लागे तैसे। आपैसयाचि ॥ (४९-९ ज्ञानेश्वरी). असे गुरुमुखातून ज्ञान प्राप्त झाल्यावर साधकाचा सिद्ध होतो. तो भक्तीच्या मार्गावर चालू लागतो. नामजप हा भक्तीचा एक प्रकार आहे. कीर्तन भक्ती ही नवविधा भक्तीतील दुसरी भक्ती होय. या कीर्तन भक्तीमध्ये भजन हा एक भक्तीचा प्रकार आहे.

### श्रद्धा ही जीवनाची मूळ बैठक आहे–

श्रद्धा ही जीवनाची मूळ बैठक आहे व शंकेखोर, संशयी मनाची धारणा ही प्रगतीचा अडथळा असून अधोगतीला कारण आहे, म्हणून भगवंतांनी श्रीमत् भगवद्गीतेच्या चौथ्या अध्यायातील चाळिसाव्या श्लोकात म्हटले आहे-

*'अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।*
*नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ।।*

*(४-४० भ. गी.).*

अर्थ– अज्ञ, श्रद्धाहीन व संशयी स्वभावाचा मनुष्य नाश पावतो. संशयी स्वभावाच्या मनुष्याला इहलोक किंवा परलोक किंवा सुख मिळत नाही.

---

भजन म्हणजे अभ्यास. परमेश्वराची नामे ही परमेश्वराच्या ठिकाणी असलेले गुण आहेत. भक्त त्या गुणांची उपासना भजन मार्गाने करतो आणि त्यातून स्वतःला देहभावाला विसरतो. 'कृष्ण विष्णु हरि गोविंद। या नामांचे निखळ प्रबंध। माझी आत्मचर्चा विशद। उदंड गाती ।। (९-२१० ज्ञानेश्वरी). पहिल्या दोन चरणांची परिणती 'माझी आत्मचर्चा विशद। उदंड गाती ।।' या पुढील दीड चरणात व्हावयास हवी. हीच खरी भक्तीची फलश्रुती आहे आणि ज्ञानी भक्तांना विज्ञानाचे साकडे कधीही पडत नाही. भजनाची गहनता कशात आहे, याचे उत्तर संत ज्ञानदेव स्वतःच वरील ओव्यांतून देत आहेत. वरील ओव्यांवरून ज्ञानदेवांना महाधाग्यांचा सिद्धांत माहीत होता असे दिसते. 'जैसा एक तंतु अंबरी।' शब्द वेगळे असले तरी तात्पर्य तेच आहे हे लगेच कळून येते. या ओवीतील 'मी' हे परमेश्वर परब्रह्म या अर्थी आलेले आहे. यावरून त्यांना सिद्धांताची पूर्ण कल्पना होती असे दिसते.

'उरलेले सहा मितींचे विश्वही मानवाच्या ठिकाणीच आहे, पण त्याची मानवाला कल्पना नाही' असे जे वरील लेखात म्हटले आहे, तर तसे नसून संत, महात्मे या पुरुषांनी या विश्वातील दहा मितींनाही जाणले होते. एवढेच नव्हे तर त्या त्यांच्या ताब्यातही, हुकुमातही होत्या असे त्यांनी केलेल्या चमत्कारांवरून लक्षात येते. हे चमत्कार, चमत्कार नसून आपल्या सर्वसाधारण संकल्पनांमध्ये बदल घडवून आणण्याचे त्यांचे सामर्थ्य होते, असेच दिसते आणि हे सामर्थ्य विज्ञानाला धरूनच होते. त्याला कार्यकारण भावही असतो. शास्त्रज्ञांना जे गणिती चमत्कार अनुभवास येत होते पण कळत नव्हते त्याच्या पुढची पायरी संतमहात्म्यांची होती. संतमहात्म्यांना त्यांच्या ध्यान-धारणेमधून, समाधीमधून, भक्तीने केलेल्या भजनातून, नामसंकीर्तनातून अनुभवास येत होते व कळतही होते. त्यांना विश्वाचे कोडे उलगडले होते, म्हणून ते शांत, समाधानी व अखंड आनंदात होते.

दहा मितींची संकल्पना जर खरी असेल तर उरलेल्या सहा मितींचा समावेश असलेलं विश्व आपल्या बरोबरच अस्तित्वात असतं. कुठं असतं हे सहा मितींचं विश्व? शास्त्रज्ञ म्हणतात 'ते इतकं सूक्ष्मातिसूक्ष्म आहे की ते मानवाजवळच आहे पण त्याचा त्याला पत्ता नाही.' श्वार्झ म्हणतात की मला सतत जाणवत होतं की या दहा मितींच्या संकल्पनेमध्ये विलक्षण आकर्षकता आहे. मला तिचं नेमकं ज्ञान नव्हतं पण ती आहे हे कळत होतं. गणित पद्धतीने जेव्हा मी त्याचा शोध घेत होतो तेव्हा अनेक गणिती चमत्कार (Mathematical miracles) नजरेला येत होते. चमत्कार कळत नव्हते पण अनुभवास येत होते. त्यामुळे एक प्रकारची खोल श्रद्धा उदयास आली. कंपित महाधाग्यांच्या सिद्धांताची अनेक वैशिष्ट्ये आहेत. त्यांपैकी एक म्हणजे एक मितीमधील धाग्याची संकल्पना आणि दहा मितींतील विश्वनिर्मितीची संकल्पना. चार शक्तींचा मूलस्त्रोत असणारी महाशक्ती गणिताच्या साह्याने जाणणाऱ्या या सिद्धांतातील दुसरा कोणताच उपाय शास्त्रज्ञांना आता तरी माहीत नाही. प्रा. श्वार्झना वृत्तपत्रकारांनी जेव्हा प्रश्न विचारले की, सुरुवातीला अनेकांची टीका, विरोध आणि अपमान सहन करूनही तुम्ही या सिद्धांताचा पाठपुरावा कसा केला तेव्हा त्याचे उत्तर त्यांनी एका शब्दात दिले- 'श्रद्धा.'

---

*सततं कीर्तयन्तो मां यतन्तश्च दृढव्रता: ।*
*नमस्यन्तश्च मां भक्त्या नित्ययुक्ता उपासते ॥*

*(९-१४ गीता).*

गीतेच्या वरील श्लोकाचे विवरण करताना संत ज्ञानदेवांनी केलेल्या विवेचनात खालील ओव्या समाविष्ट केल्या आहेत- 'ऐसे हे गहन। अर्जुना माझे भजन । आतां ऐके सांगेन। जे करिती एक ॥ तरी दोन्ही पालववेरीं । जैसा एक तंतु अंबरी । तैसा मीवाचूनि चराचरी । जाणती ना ॥ आदि ब्रह्म करूनी । शेवटी मशक धरूनी । माजी समस्त हे जाणोनी । स्वरूप माझे ॥ मग वाड धाकुटे न म्हणती । सजीव निर्जीव नेणती । देखिलिये वस्तु उजु लुंठिती । मीचि म्हणोनी ॥ (९-२२०, २१, २२, २१९ ज्ञानेश्वरी). ज्ञान हे सूक्ष्म आहे. निर्गुण, निराकार आहे. ते सर्वांच्या हृदयी स्वयंभूही आहे. त्यामुळे त्याचे प्रगटीकरण करण्याकरिता कोणीतरी सांगणे आवश्यक आहे आणि हे ज्ञान गुरुमुखातून ऐकले की हृदयातून ते स्वयंभू बाहेर येऊ लागते. संत ज्ञानदेव म्हणतात. 'मोटके गुरुमुखे उदैजत दिसे । आणि हृदयी स्वयंभचि असे । प्रत्यक्ष फावो लागे तैसे । आपैसयाचि ॥ (४९-९ ज्ञानेश्वरी). असे गुरुमुखातून ज्ञान प्राप्त झाल्यावर साधकाचा सिद्ध होतो. तो भक्तीच्या मार्गावर चालू लागतो. नामजप हा भक्तीचा एक प्रकार आहे. कीर्तन भक्ती ही नवविधा भक्तीतील दुसरी भक्ती होय. या कीर्तन भक्तीमध्ये भजन हा एक भक्तीचा प्रकार आहे.

### श्रद्धा ही जीवनाची मूळ बैठक आहे–

श्रद्धा ही जीवनाची मूळ बैठक आहे व शंकेखोर, संशयी मनाची धारणा ही प्रगतीचा अडथळा असून अधोगतीला कारण आहे, म्हणून भगवंतांनी श्रीमत् भगवद्‌गीतेच्या चौथ्या अध्यायातील चाळिसाव्या श्लोकात म्हटले आहे-

*'अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति ।*
*नायं लोकोऽस्ति न परो न सुखं संशयात्मनः ॥*

*(४-४० भ. गी.).*

अर्थ– अज्ञ, श्रद्धाहीन व संशयी स्वभावाचा मनुष्य नाश पावतो. संशयी स्वभावाच्या मनुष्याला इहलोक किंवा परलोक किंवा सुख मिळत नाही.

---

भजन म्हणजे अभ्यास. परमेश्वराची नामे ही परमेश्वराच्या ठिकाणी असलेले गुण आहेत. भक्त त्या गुणांची उपासना भजन मार्गाने करतो आणि त्यातून स्वतःला देहभावाला विसरतो. 'कृष्ण विष्णु हरि गोविंद। या नामांचे निखळ प्रबंध। माझी आत्मचर्चा विशद। उदंड गाती॥ (९-२१० ज्ञानेश्वरी). पहिल्या दोन चरणांची परिणती 'माझी आत्मचर्चा विशद। उदंड गाती॥' या पुढील दीड चरणात व्हावयास हवी. हींच खरी भक्तीची फलश्रुती आहे आणि ज्ञानी भक्तांना विज्ञानाचे साकडे कधीही पडत नाही. भजनाची गहनता कशात आहे, याचे उत्तर संत ज्ञानदेव स्वतःच वरील ओव्यांतून देत आहेत. वरील ओव्यांवरून ज्ञानदेवांना महाधाग्यांचा सिद्धांत माहीत होता असे दिसते. 'जैसा एक तंतु अंबरी।' शब्द वेगळे असले तरी तात्पर्य तेच आहे हे लगेच कळून येते. या ओवीतील 'मी' हे परमेश्वर परब्रह्म या अर्थी आलेले आहे. यावरून त्यांना सिद्धांताची पूर्ण कल्पना होती असे दिसते.

'उरलेले सहा मितींचे विश्वही मानवाच्या ठिकाणीच आहे, पण त्याची मानवाला कल्पना नाही' असे जे वरील लेखात म्हटले आहे, तर तसे नसून संत, महात्मे या पुरुषांनी या विश्वातील दहा मितींनाही जाणले होते. एवढेच नव्हे तर त्या त्यांच्या ताब्यातही, हुकुमातही होत्या असे त्यांनी केलेल्या चमत्कारांवरून लक्षात येते. हे चमत्कार, चमत्कार नसून आपल्या सर्वसाधारण संकल्पनांमध्ये बदल घडवून आणण्याचे त्यांचे सामर्थ्य होते, असेच दिसते आणि हे सामर्थ्य विज्ञानाला धरूनच होते. त्याला कार्यकारण भावही असतो. शास्त्रज्ञांना जे गणिती चमत्कार अनुभवास येत होते पण कळत नव्हते त्याच्या पुढची पायरी संतमहात्म्यांची होती. संतमहात्म्यांना त्यांच्या ध्यान-धारणेमधून, समाधीमधून, भक्तीने केलेल्या भजनातून, नामसंकीर्तनातून अनुभवास येत होते व कळतही होते. त्यांना विश्वाचे कोडे उलगडले होते, म्हणून ते शांत, समाधानी व अखंड आनंदात होते.

आपण म्हणाल श्रद्धा असून काय उपयोग आहे. श्रद्धा डोळस पाहिजे. 'डोळस श्रद्धा' याचा नेमका अर्थ काय होतो हे फक्त 'श्रद्धा' 'डोळस' पाहिजे असे म्हणणाऱ्यांना माहीत असेल, पण जेव्हा जेव्हा 'श्रद्धे'चा विचार केला जातो तेव्हा तेव्हा 'श्रद्धा' ही 'अंध' असते असेच दिसते व अंधश्रद्धेमध्येच जीवनाची प्रगती आहे असे दिसते. श्रद्धा 'डोळस' पाहिजे असे म्हणणारे बुद्धिवादीसुद्धा अंधश्रद्धेतूनच बुद्धिवादी झालेले असतात, हे त्यांनी जरा सिंहावलोकन केले असता त्यांना कळून येईल. मुलांना शिक्षण देताना वा त्याला अगदी बोलणे शिकवताना त्याच्या ओठांच्या हालण्याच्या क्षणापासून शिकवले जाते. त्या वेळी ''आई'', ''बाबा'', ''पापा'' हे शब्द त्या बाळाच्या तोंडून त्याला न कळत बाहेर पडत असतात. त्या वेळी ते बालक तुमच्या शिकवण्यावर अंधश्रद्धाच ठेवून शिकत असते. त्याला ''आई'', ''बाबा'', ''पापा'' या शब्दांच्या उलट सुलट संबोधनाने काय बिघडते, हा प्रश्न विचारता येत नाही आणि असा प्रश्न विचारला गेलाच तर त्याच्या वडिलांकडे त्याला उत्तर काहीच नाही. फक्त ते म्हणतील की 'आमच्या वाडवडिलांनी आम्हांला हेच शिकवले होते!' तेव्हा असे शंकेखोर मन तयार होण्यापूर्वीच मुलांना मूलभूत शिक्षण दिले जात असावे. एक ते दहा अंक, बेरीज, वजाबाकी, गुणाकार, भागाकार, पाढे, अ, आ, इ, ई-पासून ह, ळ, क्ष, ज्ञ व त्यांची बाराखडी यांचा अभ्यास मुलांनी पहिल्या दोन वर्षांत शेकडो वेळा केलेला असतो की, त्याला शंका घेण्याला, विचारण्याला सवडच मिळत नसेल आणि हा अभ्यास जेव्हा त्याच्या दृढ श्रद्धेने पूर्ण होतो त्याच वेळी त्याला पुढील जीवनात त्या शिक्षणाची अनुभूती मिळते. 'आपण जे शिकलो ते बरोबर शिकलो' व त्याच्या समजुती व समाजातील त्याच्या इतर सहकाऱ्यांच्या समजुती एकमेकाला जुळलेल्या असतात, हीच त्याची अनुभूती असते. असो.

आपल्या आई-वडिलांनी धर्म, अर्थ, काम, मोक्ष या चारही पुरुषार्थांविषयी शिक्षण देण्याचा प्रयत्न केलेला असतो व वयाप्रमाणे ते देतही असतात, पण धर्म या विषयाच्या शिक्षणाविषयी योग्य वय होताच वडील काही सांगत असतात. तेव्हा वाढत्या वयामुळे मुलांना शंका येऊ लागतात. दुसरी गोष्टी अर्थ व काम हे विषय मुलांच्या स्वार्थाचे, गरजेचे व जीवनाला तत्काळ उपयोगी पडणारे असतात, त्यामुळे त्याविषयी त्या मुलांना शंका नसते; पण धर्म या विषयावाचून त्यांचे जीवन कोठेच अडणारे नसते. तेव्हा नसत्या गोष्टीचे लचांड कशाला मागे लावून घ्या म्हणून प्रथमपासून मुलांच्या शंकांना, प्रश्नांना सुरुवात होते. 'देवाची पूजा कशाला करावी? पूजा करण्यात वेळ घालवण्यापेक्षा इतर उद्योग केला तर चार पैसे तरी मिळतील.'

सत्यनारायणाची पूजा, हळदी-कुंकू, संक्रांतीचे उत्सव या गोष्टी अकारण खर्चाच्या वाटू लागतात. श्राद्ध, पक्ष करून पितरांना अन्न द्यावयाचे असेल तर ते इथल्या ब्राह्मणांना जेवू घालून त्यांना कसे पोहचते? ब्राह्मणांनी स्वत:चे पोट भरण्यासाठी या सर्व कल्पना काढल्या आहेत, अशी विधाने बुद्धिवादी करतात, कारण या सर्व गोष्टीला 'हा सूर्य हा जयद्रथ' असा पुरावा नाही. शिवाय ही धार्मिक कृत्ये न केल्याने त्यांच्या जीवनाची, उपभोगाची गाडी कुठेच अडत नसते. त्यामुळे 'धर्म' हा विषय आता कालबाह्य होऊ पाहात आहे. 'देव' ही कल्पना असून खुळचटपणा आहे असे म्हणावयास हे लोक कमी करीत नाहीत. जेथे धर्माची ही अवस्था, तेथे मोक्षाला कोण विचारतो आणि त्यामुळे श्रद्धेचे अगदीच दिवाळे निघाले आहे. अर्थ आणि काम या विषयांच्या वेळी जी अंधश्रद्धा पक्की असते व त्या श्रद्धेच्या बळावर पुढील सर्व आयुष्य अर्थार्जन करून, भौतिक जीवनाचा उपभोग घेऊन, बाह्यत: आनंदात काळ घालवू शकतात, पण मानसिक समाधानाची तेथे मोठी उणीव जाणवते. ती उणीव धर्मावरील श्रद्धेने भरून निघाली असती, याची कल्पना त्यांना येत नाही. ती अंधश्रद्धा धर्म व मोक्ष याचे ज्ञान घेताना मात्र जागृत होऊन डोळस होऊ पाहात असते. जी गोष्ट मनापासून नको असते तिच्या बाबतीत अनेक फाटे फोडले जातात, हा मनुष्याचा स्वभावच आहे. अर्थात तोपर्यंत आयुष्याची गाडी एवढी पुढे गेलेली असते की त्याचे नंतर महत्त्व पटून काहीच उपयोग नसतो व दुसरे म्हणजे एकदा बुद्धिवादी म्हणून घेतल्यावर पुन्हा ईश्वराचे अस्तित्व मानून त्याच्या पुढे नम्र होणे अवघड होऊन जाते. मग 'आमचेच म्हणणे खरे' हा खोटा अभिमान बाळगून दिवस रेटणे भाग पडते. 'सुंभ जळला तरी पीळ जळत नाही' असे जे म्हणतात तेच येथे प्रत्ययाला येते. असो.

धर्माबद्दल एवढी अनास्था का? तत्काळ फळाची अपेक्षा (Result Oriented) असणारी वृत्ती. कोणतीही गोष्ट करताना 'त्यात माझा काय फायदा आहे' याचा विचार प्रथम केला जातो व तो फायदासुद्धा शक्य तितक्या लवकर व अगदी उशिरात उशिरा म्हणजे याच जीवनात, त्याचा उपभोग घ्यावयास मिळाला पाहिजे ही धारणा. धर्माची फळे याच जन्मात मिळतील असे नाही. कदाचित ती पुढील जन्मीही मिळतील. शिवाय या जन्मात मिळाली तरी सूक्ष्म स्वरूपाची व मानसिक, भावनिक स्तरावरची असणार, ती प्रत्यक्ष पैशाच्या, भौतिक उपभोगाच्या स्वरूपात नसतात. त्यामुळे धर्माचरणापासून जरी काही फायदा झाला असला तरी तो तसा स्थूल स्वरूपात दिसत नाही, कळत नाही. अर्थात जे या मानसिक, भावनिक स्तरावर विचार करतात, ते हेही मानतात की 'हा झालेला फायदा हेच आमच्या धर्माने वागण्याचे फळ

आहे.' पुढील जन्मापर्यंत थांबण्याची हल्लीच्या प्रजेची तयारी नसते. मग जन्मोजन्मीच्या गोष्टी बोलावयासच नको. असो–

आणखी एक प्रश्न नेहमी लक्ष वेधून घेतो. संशोधकांनी खूप शोध लावले. सर्वांचे जीवन भौतिक सुखाच्या दृष्टीने अतिशय समृद्ध केले. असे असता कोणते बुद्धिवादी लोक त्याची जाणीव ठेवतात? कोणत्या संशोधकांची मंदिरे बांधली आहेत? त्यांच्या पूजा केल्या जातात? त्यांची स्मृती ठेवली जाते! त्यांचे उपकार मानले जातात! पण एकदा बुद्धिवादी म्हटले की तेथे भावनांना थारा नसतो. त्यामुळे उपकार, स्मृती, आदर, प्रेम, भक्ती या भावनांना तेथे वाव नाही. जो तो स्वत:च्या फायद्यासाठी, नावासाठी, लौकिकासाठी काम करतो. त्यातून तो स्वत: कमवत असतो, फायदा घेत असतो. त्यामुळे कोणी कोणावर उपकार करणे हे यांच्या हिशोबात बसत नाही. याउलट संतांनी जे जे काही केले, शिकवले ते जीवनाला खऱ्या अर्थाने उपयोगी पडणारे, सुख, समाधान, शांती देणारे असेच आहे. उपभोगातून शांती मिळत नसून उपभोगाच्या त्यागात शांती आहे, हे संतांनी स्वत: आचरून इतरांना सांगितले, शिकवले व त्याची जाणीव ठेवून आज शेकडो वर्षे होऊन गेली तरी त्या संतांची सर्व ठिकाणी मंदिरे आहेत. त्यांची पूजा-अर्चा होत असते. याचा अर्थ संतांच्या शिकवणीशी लोक अंधश्रद्ध आणि कृतज्ञ आहेत. ते संतांची आठवण ठेवतात. जयंती, पुण्यतिथी साजरी करतात. याचा अर्थ अंधश्रद्धाळू लोक हीच सर्व प्रकारे चांगली माणसे असतात. 'माणूस' म्हणून घडविण्याचे काम 'अंधश्रद्धा' करते हे निश्चित होय.

जगात एकही असा धंदा नाही की ज्यात बनवाबनवी नाही, खोटेपणा नाही. लबाडी नाही, फसवणूक नाही, विश्वासघात नाही. सर्व धंद्यांत या गोष्टी घडतात. बुद्धिवादी लोक त्याच्या विरुद्ध कधीच आरडाओरडा करीत नाहीत, कारण ते जो काही धंदा करत असतील त्यात ते या गोष्टी करीत असतातच. लोकांची पद्धत आहे आपण करतो ते नीती, व इतर जे करतात ते अनीती. त्यामुळे 'तेरी भी चुप और मेरी भी चुप' या तत्त्वावर कोणीच कोणाच्या धंद्याविषयी आरडाओरडा करीत नाही. पण 'धर्म' हा असा विषय आहे की तो जे आचरतात, तो समाजातील एक गरीब, साधा, सरळ राहणारा वर्ग आहे. हातावर त्याचे पोट असते. असेल त्या वेळी लाडू, बासुंदी व नसेल त्या वेळी शिळी भाकरी मिठाबरोबर खावी व पाणी प्यावे. यजमान देतील त्यावर गुजराण करणारा हा वर्ग. श्रद्धाळू यजमानांच्या धार्मिक कार्याचे काम करून त्यांच्या श्रद्धा बळकट करणारा व अध्ययन, अध्यापन, यजन, याजन अशा स्वधर्माचे आचरण करणारा हा समाजातील घटक आहे. झाडावर जशी बांडगुळे वाढतात, तसे

या समाजातही काही धंदेवाईक लोक घुसलेले आहेत. ते यजमानांच्या श्रद्धेचा गैरफायदा घेऊन त्यांना लुबाडत असतील. तेव्हा ती चूक ही धर्माची नसून अशा धंदेवाईकांची आहे, हे लक्षात घ्यावयास पाहिजे.

ज्याप्रमाणे धान्यात खडे असता काढून टाकले जातात. कोणी सर्व धान्यच टाकून देत नाही. कोणी घर बांधणाऱ्यांनी सिमेंटऐवजी माती वापरून घर बांधले असता ते पडले तर कोणीही झाडाखाली संसार मांडत नाही. कोणी एखाद्याने बांधलेला पूल पडला तर पूल बांधण्याचे शास्त्रच चूक आहे म्हणून ते शास्त्र कोणी मोडीत काढून टाकत नाही. तसे कोणी एखाद्याने धर्माच्या नावाखाली यजमानांच्या श्रद्धेचा फायदा घेऊन फसवणूक केली तर धर्मशास्त्रच चूक आहे हे म्हणणे कितपत योग्य आहे? वरील उदाहरणात प्रत्येक गोष्टीचीच लोकांना गरज आहे. त्यामुळे लोक त्यातून मार्ग काढत आले आहेत. रस्ता खराब म्हणून कोणी चालण्याचेच सोडून दिले नाही, तर त्यातून वाट काढत प्रवास करीत असतात. कारण रस्त्यावाचून लोकांचे अडत असते तसे धर्मावाचून लोकांचे जीवन काहीच अडत नाही आणि म्हणून बुद्धिवाद्यांनी अंधश्रद्धेच्या निर्मूलनाखाली धर्मच मोडीत काढण्याचा जणू चंगच बांधला आहे, पण ज्या धर्माला संतांनी डोक्यावर धरले तो धर्म असा धर्माची जाण नसणाऱ्यांकडून नाहीसा करण्याचा प्रयत्न म्हणजे फुंकीने मेरू पर्वत उडविण्यासारखे व्यर्थ जाईल. असो.

खरी मानवता, सर्वभूती परमेश्वर असण्याची जाण संतांना होती. तसे त्यांनी अनुभवले, त्याप्रमाणे ते वागले आणि अजरामर झाले. कारण ते धर्म जाणत होते म्हणून ते मोक्षालाही गेले. त्यांनी चारही पुरुषार्थ साधले. बाकीचे अर्थ व काम साधून (तेही पूर्णपणे साधले की नाही याबद्दल शंकाच) अर्धवटच राहिलेले आहेत, असे म्हणावे लागेल. जे धर्माचे आचरण करू लागले आहेत ते कधीतरी मोक्षाचे अधिकारी होतील यात शंका नाही. तेव्हा श्रद्धा ही बळकट हवी, निष्ठा पक्की हवी, तरच त्याचे फळ मिळते. तेव्हा संतांनी याविषयी काय सांगितले तेही बघणे प्राप्त आहे.

अनेकांची अनुभूती हासुद्धा एक पुरावा होऊ शकतो. भौतिक जगातील प्रत्येक वस्तुमात्राची सर्वांची अनुभूती एकच आहे. नाम व रूप यांचे कोष्टक सर्वांचे सारखे आहे आणि त्यामुळे आंबा, फणस, खुर्ची, टेबल, गाय, म्हैस, वाघ, सिंह या नामरूपाबद्दल कोणतेही पुरावे लागत नाहीत, कारण नामरूपाची अनुभूती सर्वांची सारखी आहे. या वस्तू सर्व ठिकाणी सहज सर्वांना उपलब्ध असल्याने पुराव्याचा कधीच प्रश्न निर्माण होत नाही. पण परमेश्वराच्या अनुभूतीबद्दल, परमेश्वराच्या

अस्तित्वाबद्दल पुरावा मागितला जातो. (Absence of Evidence is no Evidence of Absence – कोणा एका इंग्रजी माणसाची उक्ती). कारण परमेश्वराची अनुभूती ही सर्वांना सर्वांठायी कधीच उपलब्ध नव्हती आणि त्यामुळे ज्यांना ती अनुभूती नाही ते ज्यांना अनुभूती आली आहे व जे श्रद्धा ठेवून परमेश्वराविषयी बोलतात त्यांना परमेश्वराच्या अस्तित्वाचा पुरावा मागतात. साधारण शंभर वर्षांपूर्वी भारताबाहेरील देशाविषयी बहुसंख्य लोक अज्ञानी होते. सुशिक्षितांतसुद्धा प्रत्यक्ष परदेश पाहून आलेले फार थोडे लोक म्हणजे हाताच्या बोटावर मोजण्याइतके होते. त्या वेळी परदेश पाहून आलेले लोक परदेशाविषयी जे सांगतात त्यावर लोक विश्वास ठेवतात. कारण 'आप्तवाक्यं प्रमाणम्।' त्याचप्रमाणे सर्व संतांचा परमेश्वराविषयीचा अनुभव सारखाच आहे. त्यातून असे नाही की त्या संतांनी एकत्र बसून परमेश्वराविषयीचे वर्णन ठरवून ते लिहिले, लोकांना सांगितले. त्या संत मंडळींत कालस्वरूपानेसुद्धा खूप अंतर आहे. संत ज्ञानेश्वर ७२५ वर्षांपूर्वीचे तर संत एकनाथ ४५० वर्षांपूर्वीचे, संत तुकाराम ३५० वर्षांपूर्वीचे झालेले, पण तरीही त्यांचे परमेश्वराचे वर्णन मात्र एक आहे. संत ज्ञानेश्वर– 'तुज सगुण म्हणू की निर्गुण रे। सगुण निर्गुण एकु गोविंदु रे ॥' संत तुकाराम– 'दोन्ही टिपरी एकचि नाद। सगुण निर्गुण नाही भेद रे ॥'

### 'मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयो: ।'

कोणतेही गणिती प्रमेय सोडवायचे झाले तर कल्पनेने का होईना पण काही भाग गृहीत धरावा लागतो. त्या गृहीतावरच पुढील रचना करून ते गणित सोडवायचे असते. आणि शेवटी गणिताचे उत्तर बरोबर आले की ते गृहीत धरल्याचे महत्त्व कळते. त्या गृहीतालाच आध्यात्मिक भाषेत 'श्रद्धा' म्हणतात. विश्वनिर्मितीची काही प्रक्रिया असेल, तिच्या मुळाशी कसे जायचे असा प्रश्न महत्त्वाचा आहे. तेव्हा प्रथम गृहीत धरले पाहिजे. ते गृहीत म्हणजे परमेश्वर, परब्रह्म आहे आणि त्याच ठिकाणी श्रद्धा आहे. आतापर्यंत ज्या कोणी साधू, सत्पुरुष, संतांनी त्या विश्वनिर्मितीचा आणि विश्वनिर्मात्याचा विचार केला तेव्हा त्यांनी परमेश्वरावर श्रद्धा ठेवली आणि विश्वनिर्मितीचा सिद्धांत मांडण्यास सुरुवात केली. तेव्हा त्यांना त्यांच्या गुरूकडून दाखविलेल्या मार्गाने, पद्धतीने हे कोडे उलगडण्यास मदत झाली आणि शेवटी त्यांनी ते कोडे सोडविले. कारण सर्व संतांचा अनुभव एकच आहे, होता व असणार. कारण सर्वांचे गृहीत 'श्रद्धा' परमेश्वरच आहे, हे महत्त्वाचे आहे. इतर कोणत्याही भौतिक वस्तूच्या गृहीतावर हे कोडे उलगडणे शक्य नाही, कारण गृहीत चुकले की गणित

चुकते हा सर्वांचा अनुभव आहे. गणितामध्ये आणखी एक गंमत आहे, ती म्हणजे काही वेळा जे गृहीत असते तेच सिद्ध करावयाचे असते, पण त्यासाठी उलट बाजूने रचना करून ते पुन्हा मूळ पदावर यावे लागते. तसे येथेही परमेश्वरावर श्रद्धा ठेवून भौतिक मार्गाने म्हणजे मायेच्या मार्गाने उपासना करून पुन्हा शेवटी परमेश्वराची प्राप्ती करून घ्यावयाची असते आणि हीच पद्धत सर्व संतांनी, भक्तांनी उपयोगात आणली आहे. आता ती कशी असेल याचा थोडा विचार करायचा आहे.

एकटा प्रवास करणारा प्रवासी हा बायकोमुळे आणि इतर उपाधीच्या योगाने बांधला गेलेल्या प्रवाशापेक्षा वेगाने जाऊ शकतो तसेच पिढ्यान्‌पिढ्या शुद्धीकरणाच्या व उत्क्रांतीच्या प्रक्रियेने प्रचंड कालावधी लागण्याची शक्यता आहे. त्यापेक्षा वैयक्तिक साधना करून शुद्धीकरणाच्या प्रक्रियेला निश्चितच कमी वेळ लागेल. याचाच विचार करून संतसज्जनांनी, भक्तांनी हा मार्ग स्वीकारला. बाकी साऱ्या उपाध्या या हातावेगळ्या, शरीरावेगळ्या, मनावेगळ्या केल्या व आपण आपला मार्ग चालत राहिले आणि शेवटी त्यांनी त्यांचे ध्येय गाठले. त्यांनी खरी निसर्गावर मात केली आणि वर्तुळ पूर्ण केले. त्यांनी काय केले? साधना, उपासना, अष्टांग योगसाधना, यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी; साधनेमध्ये-पूजा, अर्चा, जप, तप, दान, ध्यान, धारणा, समाधी.

भक्ती-नवविधा भक्ती–

*'श्रवणं-कीर्तनं विष्णोस्मरणं पादसेवनम् ।*
*अर्चनं वन्दनं दास्यं सख्यं आत्मनिवेदनम् ॥'*

सीताशोधामध्ये प्रभू रामचंद्र व लक्ष्मण दंडकारण्यातून प्रवास करीत असता शबरीच्या आश्रमात गेले होते. त्या वेळी शबरीला उपदेश करताना भक्तीचा महिमा सांगताना प्रभू रामचंद्रांनी उपदेश केला की,

'नवविधा भक्तीचे स्वरूप' विषयी तुलसीदास म्हणतात.

*नवधा भगति कह उँ तोहि पाही ।*
*सावधान सुनु धरुं मन माही ।*

*प्रथम भगति सन्तव्ह कर संगा ।*
*दूसरि रति मम कथा प्रसंगा ।*

*(३ सोपान. ३५ तुलसीरामायण)*

अर्थ – मी तुला नवविधा भक्ती कथन करतो. ती सावधानपणे श्रवण करून मनात ठेव. संतजनांशी संग करणे ही प्रथम भक्ती असून माझ्या कथाप्रसंगी अनुशक्ती असणे ही दुसरी भक्ती होय.

*दो-गुरु-पद-पंकज-सेवा तीसरी भगति अमान ।*
*चौथी भगति मम गुनगान करइ कपट तजि गान ।।३६।।*

*चौ-मंत्र, जाप, मम, दृढ बिस्वास । पंचम भजन सो बेद प्रकासा ।*
*छठ दम सील बिरतिबहु कर्मा । निरत निरंतर सज्जन धर्मा ।*
*सातव सम मो हि मय जग देखा । मो ते संत अधिक करि लेखा ।*

*आठव जथा लाभ संतोषा । सपनेहु नहि देखइ परदोषा ।*
*नवम सरळ सब सन छल हीना । मम भरोस हिय हरष न दीना ।।*

अर्थ– अभिमानाचा त्याग करून गुरुचरणकमलाची सेवा करणे ही तिसरी भक्ती असून निष्कपटपणे माझ्या गुणांचे गान करणे हे चतुर्थ भक्तीचे लक्षण आहे. माझ्या मंत्राचा जप करून, माझ्या ठिकाणी दृढ विश्वास ठेवून माझे भजन करणे ही वेदप्रतिपादित पंचम भक्ती होय. इंद्रियांचे दमन करून सच्छीलपूर्वक अनेक कर्मांच्या ठिकाणी विरक्त होऊन सज्जनांच्या धर्माच्या ठिकाणी निरंतर प्रेम करणे हे भक्तीचे सहावे लक्षण आहे. सर्व जग मत्स्वरूप पाहून माझ्यापेक्षाही संतांना अधिक मानणे हा भक्तीचा सातवा प्रकार असून यदृच्छालाभाने संतुष्ट असणे व स्वप्नातदेखील दुसऱ्याच्या दोषाकडे न पाहणे हे भक्तीचे आठवे लक्षण होय. सर्वांशी निष्कपट आणि सरळपणे वागणे व हृदयात माझ्याविषयी विश्वास बाळगून हर्ष किंवा विषाद न मानणे हा भक्तीचा नववा प्रकार आहे.’ (तुलसी रामायण)

साक्षात्कार, परमेश्वराची अपरोक्ष अनुभूती, जीवन्मुक्त दशा, परमेश्वर स्वरूपात पूर्ण लय- ‘यद् गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ।।’ संसारात राहून, सर्व उपाधींच्या कोंडाळ्यात राहून, सर्व प्रकारचे विषय सभोवती वावरत असूनही त्यांतून अलिप्तता कशी साधावयाची याचा अभ्यास त्या साधनेतून असतो. मनावर, बुद्धीवर, चित्तावर संस्कार केले जातात आणि त्यांतूनच प्रगती होत राहते. मंत्राचा जप केल्याने मनावर संस्कार कसे होतात? तर प्रथम मनावर योग्य संस्कार होतात व मनःस्वास्थ्यामुळे, शुद्धीमुळेसुद्धा शरीरावर संस्कार होतात. संस्कारांमधून वैराग्य प्राप्त होते. वैराग्यातून ज्ञान प्राप्त होते आणि पुन्हा ज्ञानातून वैराग्य वाढते. वाढत्या वैराग्यातून उत्तम संस्कार होतात आणि हे वर्तुळ असेच मागेपुढे होत होत साधनेनेच शिखर केव्हा येते हे कळत

नाही. काळाचे भान नसते. सभोवतालच्या सृष्टीची जाणीव नसते. आळवावरील पाण्याप्रमाणे असून नसल्यासारखे ते जीवन असते आणि एक दिवस परमेश्वराच्या अपरोक्ष साक्षात्कार होतो. जीवन्मुक्त दशा प्राप्त होते आणि प्रारब्ध संपेपर्यंत देहाचे अस्तित्व असते. प्रारब्ध संपले की तो देह पडतो आणि आत्मा परमेश्वररूप होऊन जातो आणि पुन्हा येणे नाही.

वर वर्णन केलेली जीवन्मुक्त अवस्था साधनेने प्राप्त होते असे म्हटले आहे, पण शरीरविज्ञानाच्या दृष्टीने अशा तऱ्हेची साधना, तप, समाधी, तीसुद्धा काही तास नव्हे तर महिने, वर्षानुवर्षे शक्य आहे का? आणि त्याचा काय परिणाम शरीरावर, मनावर होतो, या साधनेमुळे शरीर कसे साथ देते याचा विचार आता करू– तत्पूर्वी एका वृत्तपत्रामधील लेखाचा संदर्भ पाहू.

वैज्ञानिक दृष्ट्या मंत्रजपाने शरीरावर काय प्रक्रिया होते, याविषयी 'महाराष्ट्र टाईम्स'मध्ये आलेल्या लेखाचा आवश्यक भाग येथे देत आहोत.

एकाक्षरी ॐ या मंत्राची येथे माहिती दिली आहे. मंत्राला अर्थ हवाय असाही आग्रह नसतो. मंत्राची उपयुक्तता व शक्ती त्याच्या उच्चाराने निर्माण होणाऱ्या कंपनांत असते. मंत्र उच्चारण करणाऱ्याच्याही शरीरात तसेच ते ऐकणाऱ्याच्याही शरीरात विशिष्ट कंपने निर्माण करतात. मंत्र हे शरीरात सूक्ष्म कंपने निर्माण करण्याचे साधन आहे. सर्व मंत्रांत प्रमुख, सर्व भारतीयांना सुपरिचित असा एकाक्षरी मंत्र ॐ हा आहे. हा ओंकार वा प्रणव ईश्वराचा निदर्शक आहे असे पतंजली सांगतात. हा ॐकार कोठून उद्भवतो व कोठवर जातो? माणसाची बेंबी हे माणसाच्या सर्व शक्तीचे उगमस्थान आहे. ओंकाराने सुरू होणारी कंपने नाभिप्रदेशापासून सुरू होऊन मज्जारज्जूतून छोटा मेंदू व मोठ्या मेंदूकडे जाऊन मोठ्या मेंदूत घुमतात. मेंदू सर्व शरीराच्या क्रिया व हालचाली यांचे नियंत्रण करतो. त्यामुळे या कंपनांचा चांगला परिणाम शेवटी पूर्ण शरीरावर होणार हे स्वाभाविक आहे. तथापि नेमके काय होते हे जाणणे आवश्यक आहे. 'ॐ'ची कंपने तोंडात घुमतात, त्याच वेळी ॐकारापेक्षाही वेगळ्या प्रकारची गुँ ऽ गुँ ऽ अशा आवाजाची वेगळी कंपने श्वासनलिकेतून वर नाकाकडे जात असतात. तेव्हा हेही लक्षात येऊ लागेल की ओंकारातील ३ हा आकार जणू आपल्या तोंडाचाच आहे. (या लेखातील चित्रेही येथे दिली आहेत) तसेच ओंकाराची शेपटी ही घशातून निघून फुप्फुसाकडे जाणारी श्वासनलिकाच आहे. 'म' कार हा अर्धचंद्राकृती कंपने दर्शविणारा आहे.


वरील टाळू
वर जाणारी कंपने
जीभ
श्वासनलिका
खालचा जबडा
फुप्फुसे


पुढील सायनस
पिट्युटरी ग्रंथी
स्फेनॉयडल सायनस
ॐ काराचे तरंग - कंपने


मोठा मेंदू
हायपोथॅलॅमस
थॅलॅमस
लहान मेंदू
पिट्युटरी
ग्रंथी

ही 'म' काराची कंपने ओंकार संपल्यावर, ओठ मिटल्यावर अनुनासिक होऊन श्वासनलिकेवर चढून तिच्यावरील छतात कंपने निर्माण करीत नाकाद्वारे बाहेर पडतात. या छताची वरची बाजू कवटीच्या पातळ हाडांनी, कपालास्थींनी, बनलेली असते. ही कंपने नाकामागील श्वसनमार्गावरील छतावर आदळत त्याच्या पलीकडील पदार्थात म्हणजे मेंदूत त्याचा प्रसार करतात. यात पहिला टप्पा येतो स्फेनॉयडल सायनस या पोकळीचा. त्यात ती कंपने अधिक घुमत असावीत व त्या पोकळीत ही कपालास्थीची एक डबी असते. तिच्यात आहे पिट्युटरी ग्रंथी. स्वाभाविकपणे पोकळीत घुमलेली कंपने या पिट्युटरीच्या आवरणाला अधिकाधिक कंप देणार व त्यातून पिट्युटरी ग्रंथीला कंप पोहोचणार. पिट्युटरी ग्रंथी शरीरातील सर्वात महत्त्वाची, ऐच्छिक क्रियांवर नियंत्रण करणारी ग्रंथी मानली जाते. तिच्यातून होणारे स्राव शरीराच्या अनेकविध घडामोडींसाठी प्रेरक असतात. पिट्युटरीचे दोन मुख्य भाग आहेत. एक पुढचा अर्धगोल व मागचा अर्धगोल. पुढील गोलातून अनेक हार्मोन म्हणजे संप्रेरके निघतात. त्यांपैकी चार पुढे दिल्याप्रमाणे आहेत व ती शरीरातील इतर संप्रेरके निर्माण करणाऱ्या ग्रंथींना प्रेरणा देतात. पिट्युटरी ग्रंथी ज्याच्याशी जोडलेली असते त्या मेंदूच्या पोटाकडील भागाचे हायपोथॅलॅमसचे कामही जाणणे आवश्यक आहे. हा भाग शरीरातील सर्वच ऐच्छिक व अनैच्छिक हालचालीचा नियंत्रक आहे. येथून श्वासो-च्छ्वास व रक्ताभिसरण यांचे नियंत्रण होते. तसेच येथून निघणारे स्राव पिट्युटरी ग्रंथीला प्रेरणा देतात. हायपोथॅलॅमसचा एक भाग शरीराचे तापमान, श्वास, झोप, भूक, तहान, मल-मूत्रभावना, पुनरुत्पादन भावना व इतर भावनांवर नियंत्रण करतो.

ओंकाराची कंपने व हायपोथॅलॅमस, पिट्युटरी यांचा संबंध ओंकारातील 'म'ची कंपने नाकाच्या मागील पोकळीत घुमत वर चढतात व स्फेनॉयडल सायनस या पोकळीतील पिट्युटरीच्या डबीला ठोकवत जातात. पिट्युटरीचा गोल हा घंटेतील टोलासारखा बसलेला असल्यामुळे जणू घंटानादच या ओंकाराने आपल्या डोक्यात होत असावा. पिट्युटरी पहाटे जास्त स्राव सोडते कारण त्या वेळी शरीराच्या हालचालींत वाढ होण्याची आवश्यकता असते. पिट्युटरीला ब्राह्म मुहूर्तावरील या 'ओं'कार नादाने हळुवार व नियमित कंपनांनी अधिक स्राव देण्यास मदत होत असावी. गाईचे दूध काढताना जसे आचळास ओढतात तसाच काहीसा परिणाम होत असावा. 'ओं'कार नादातून मिळणारे फायदे ही काही एक-दोन दिवसांची गोष्ट नाही. तिचा अनुभव घ्यायला वर्षानुवर्षांची नियमितताच हवी. दिवसातल्या उपक्रमांतला एक भाग असेच या साधनेचे स्वरूप असावे. ('ओंकाराचा वैज्ञानिक आधार' महाराष्ट्र टाइम्स १०.९.९७ – ले. प्रकाश तेंडुलकर).

परमेश्वरापासून निघालेला जीव हा पुन्हा परमेश्वराप्रत जाऊन मिळाला म्हणजेच वर्तुळ पूर्ण होते. जसे–

१) समुद्राच्या पाण्याची वाफ होते. त्याचे ढग बनतात. ते ढग पावसाच्या रूपाने पाणी परत पृथ्वीवर टाकून, ते पाणी पुन्हा नदीच्या रूपाने समुद्राला जाऊन मिळते. म्हणजे वर्तुळ पूर्ण होते.

२) बीपासून झाड तयार होते. झाडाला खोड, पाने, फुले व फळे येतात व त्या फळातून बीज तयार होते व वर्तुळ पूर्ण होते.

३) जमिनीतील व हवेतील मूलद्रव्यांपासून प्रथिने, कार्बोहायड्रेट्स तयार होतात. प्रथिने, कार्बोहायड्रेट्सपासून अन्न बनते. ते अन्न प्राणी व वनस्पती सेवन करतात. त्यांनी उत्सर्जिलेल्या टाकाऊ पदार्थांचे पुन्हा मूलद्रव्यात रूपांतर होऊन निसर्गात विलीन होतात आणि वर्तुळ पूर्ण होते.

४) तसेच परमेश्वराने ही सृष्टी निर्माण केली आहे. त्यात चौऱ्याऐंशी लक्ष योनी निर्माण केल्या. त्यांतील मानव हा सर्वात श्रेष्ठ व उच्च दर्जाचा प्रगत प्राणी निर्माण केला. मानवाने स्वत: उत्क्रांत होऊन परमेश्वराप्रत जाणे व परमेश्वराशी एकरूप होणे, हा या विश्वातील वर्तुळाचा शेवट आहे. म्हणजे वर्तुळ पूर्ण होण्यासारखे आहे.

मनुष्याला बंध घालण्याला, संसारात अडकवण्याला, संसारातील सुखदु:खांचा भोग देण्याला, अनेक जन्मांच्या चक्रामध्ये फिरण्याला मनच कारण आहे आणि मनच बंधनातून सोडवून मोक्षाला नेण्याला, योग्य अशा उपासनेच्या मार्गामध्ये साथ देणारे आहे. कोणत्याही किल्ल्यावर चकवे असतात. किल्ल्यावर जाणाऱ्या या चकव्यांच्या रस्त्यामध्ये अनेक ठिकाणी दोन मार्ग फुटलेले असतात. एका मार्गाने मनुष्य किल्ल्याबाहेरील खंदकात, भुयारात, अंधारकोठडीत जाऊन पडतो व दुसऱ्या रस्त्याने बरोबर बालेकिल्ल्यातील राजाच्या महालात जाऊन पोहोचतो. तसे हे मन आहे. आता मन हे कसे आहे. श्री गीता म्हणते–

*'इंद्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्य: परं मन: ।*
*मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धे: परतस्तु स: ॥*

*(३-४२ भ. गी.).*

इंद्रियांच्या पलीकडे, इंद्रियांपेक्षा श्रेष्ठ असे मनाचे स्थान आहे. इंद्रिये ही जड आहेत. विषयांचे सेवन करण्याची ती साधने आहेत. त्या साधनांतून मनाचे अस्तित्व असेल तर त्या विषयांचा उपभोग घेता येतो. मृताच्या ठिकाणी सर्व इंद्रिये असतात,

पण त्या ठिकाणी आत्म्याचे चैतन्य नसते आणि त्यामुळे मनही नसते. त्यामुळे त्या इंद्रियांना विषयांचा उपभोग घेता येत नाही. विषयांत रममाण होण्याला मनाला सांगावे, शिकवावे लागत नाही. तो त्याचा मूळ स्वभावच आहे; पण विषयांपासून दूर जाणे, विषयांपासून अलिप्त असणे, राहणे हे मनाला शिकवावे लागते. काय, मनाला हे शिकवणे सोपे आहे? निश्चितच नाही. कारण अर्जुनालाही हाच प्रश्न पडला होता, की–

*'चंचलं हि मनः कृष्ण प्रमाथि बलवत् दृढम् ।*
*तस्याहं निग्रहं मन्ये वायोरिव सुदुष्करम् ॥*

*(६-३४ भ. गी.).*

वाऱ्याला अडवणे, ताब्यात घेणे हे जसे दुष्कर आहे तसे मनाला ताब्यात घेणे हे अवघड काम आहे आणि खरोखरीच ते अतिशय अवघड आहे आणि भगवान श्रीकृष्णांनीही ते मान्य केले आहे. ते म्हणतात–

*असंशयं महाबाहो मनो दुर्निग्रहं चलम् ।*
*अभ्यासेन तु कौन्तेय वैराग्येण च गृह्यते ॥*

*(६-३५ भ. गी.).*

'मनाला आवरणे अतिशय अवघड आहे' असे म्हटले असले तरी भगवंतांनी 'ते अशक्य आहे' असे म्हटले नाही, तर ते मन आवरणेही शक्य आहे. पण त्यासाठी अभ्यास व वैराग्य यांची आवश्यकता आहे, असे त्यांचे म्हणणे आहे. आता अभ्यास व वैराग्य या गोष्टी कोणकोणत्या स्तरावर कशा शक्य होतात हे पाहणे आले आहे. या गोष्टीचा विचार करता अनेक प्रश्न उभे राहतात. 'जसं अन्न तसं मन' असे एक सूत्र आहे. मग अन्न, अभ्यास व वैराग्य या तीन आघाड्यांवर मनाशी सामना केला तर मनाला ताब्यात ठेवणे शक्य आहे असा अर्थ होतो. त्यांतील पहिले अन्न. प्रत्येक पदार्थ हा षड्रसांमध्ये येतो. मधूर, कडू, तुरट, खारट, आंबट, तिखट हे रस त्रिगुणात्मक आहेत आणि सत्त्व, रज, तम या त्रिगुणांपासूनच पंचमहाभुते निर्माण झाली आहेत. दोन भुतांचा संयोग होऊन एक रस तयार होतो असे आयुर्वेदांमध्ये म्हटले आहे. पृथ्वी + जल = मधुर, पृथ्वी + अग्नी = आम्ल, अग्नी + जल = लवण, आकाश + वायू = तिखट, अग्नी + वायू = कडू, पृथ्वी + वायू =तुरट. असा आहे हा पंचमहाभुते व रसांचा संबंध. आता त्रिगुण व पंचमहाभुतांचा संबंध असा आहे- आकाश व वायू = सत्त्वगुण, वायू व तेज व जल = रजोगुण, जल व पृथ्वी = तमोगुण. असो. यावरून सर्व पदार्थ हे या सहा रसांच्याच स्वरूपात असतात. म्हणजे सर्व पदार्थ हे पंचमहाभुतात्मक म्हणजेच

त्रिगुणात्मक असतात. याचाच अर्थ अशा प्रकारचे अन्न हे सर्व प्राणिमात्रांचा आधार आहे, पण त्यांतील कोणत्या प्रकारचा आहार स्वीकारावा व कोणत्या प्रकारच्या आहाराचा त्याग करावा यांविषयी गीता मार्गदर्शन करते. की–

*आयु:सत्त्वबलारोग्य सुखप्रीतिविवर्धना: ।*
*रस्या: स्निग्धा: स्थिरा हृद्या आहारा: सात्त्विकप्रिया: ॥*
*कट्वम्ललवणात्युष्णतीक्ष्णरूक्ष विदाहिन: ।*
*आहारा राजसस्येष्टा दु:खशोकामयप्रदा: ॥*
*यातयामं गतरसं पूतिपर्युषितं च यत् ।*
*उच्छिष्टमपि चामेध्यं भोजनं तामसप्रियम् ॥*

*(१७-८ ते १० भ. गी.).*

अर्थ– आयुष्य, बुद्धी, शक्ती, आरोग्य, सुख व प्रीती वाढविणारे असून रुचकर स्निग्ध, शरीरास कायमचे हितकारक परिणाम करणारे निर्दोष आहार सात्त्विक स्वभावाच्या लोकांना प्रिय असतात. तिखट, आंबट, खारट, झणझणीत, नीरस व दाहकारक इत्यादी दु:ख, शोक व रोग उत्पन्न करणारे आहार राजस स्वभावाच्या लोकांना आवडतात. जे शिळे, तळलेले, दुर्गंधीयुक्त, नासलेले, आणि उष्टे, अपवित्र (अन्न) (ते) तामसी स्वभावाच्या मनुष्यास प्रिय असते.

परिशिष्टामध्ये अन्न, धान्य, भाजीपाला, फळफळावळ वगैरे पदार्थांच्या चवी, रस, त्यांमध्ये असलेले त्रिगुणात्मक व पंचमहाभुतात्मक प्रमाणांचे तक्ते दिलेले आहेत. त्यांतील सात्त्विक आहाराचे सेवन करणे हे महत्त्वाचे आहे. सात्त्विक आहाराच्या प्रमाणशीर सेवनाने सर्व इंद्रिये ही आवश्यक तितकी उत्तेजित होऊन कार्यक्षम राहतात व शरीराच्या गरजा भागवतात. राजस आहारामुळे अन्नाचे अतिसेवनही होते. शिवाय इंद्रिये अतिउत्तेजित होऊन अनावश्यक कार्यप्रवृत्त होतात आणि त्यामुळे अतिआहार व अतिविषय सेवन यांचे दुष्टचक्र होऊन अनेक रोग निर्माण होतात. तसेच मन व शरीर अस्थिर होते. शिळे, तळलेले, दुर्गंधीयुक्त अन्नाने इंद्रिये अकार्यक्षम होतात. त्यांना आवश्यक असणारी ऊर्जा मिळत नाही. त्यामुळे ते मलूल, कमज़ोर, विकल होतात आणि त्यामुळे रोगाला आमत्रंण तर मिळते शिवाय शारीरिक विकृती निर्माण होऊन आळस, निद्रा यांचेही प्रमाण वाढते. म्हणजे एकूण सात्त्विक आहाराने शरीरस्वास्थ्य वाढते. आयुष्यवृद्धी होते, सुख-समाधान राहते. राजस आहाराने शरीरस्वास्थ्य राहात

नाही. शरीर अनेक रोगांचे माहेरघर बनते. एकूण दु:ख, असमाधान निर्माण होऊन आयुष्य कमी होते. तामस आहारानेही राजस आहाराप्रमाणेच परिणाम होतात.

आहाराप्रमाणे भाव –

तरि धरावा तैसा संगु। जेणे पोखे सात्त्विक लागु। सत्त्ववृद्धीचा भागु। आहारू घेपे ।। एऱ्हवी तरी पाही। स्वभाववृद्धीचां ठाई। आहारावाचूनि नाही। बळी हेतु ।। प्रत्यक्ष पाहे पां वीरा। जो सावध घे मदिरा। तो होऊनि ठाके माजिरा। तियेचि क्षणी ।। कां जो साविया अन्नरसु सेवी। तो व्यापिजे वातश्लेष्मस्वभावी। काई ज्वरु जालिया निववी। पयादिक ।। ना तरि अमृत जयापरी। घेतलिया मरण वारी। कां आपुलिया ऐसे करी। जैसे विष ।। तेवि जैसा घेपे आहारु। धातु तैसचि होय आकारु। आणि धातु ऐसा अंतरु। भावो पोखे ।। जैसे भांडियाचेनि तापे। आतुलें उदकही तापे। तैसा धातुवशे आटोपे। चित्तवृत्ति ।। म्हणोनि सात्त्विक रसु सेविजे। तै सत्त्वाची वाढी पाविजे। राजसा तामसा होईजे। येरी रसी ।। (ज्ञानेश्वरी १७.१११ ते ११८).

अर्थ– म्हणून जेणे करून सत्त्वगुणाच्या संबंधाला जोर येईल असाच संग करावा आणि सत्त्वगुणाची वाढ होईल असाच आहार सेवन करावा. सामान्यत: स्वभावाच्या वाढीला बळ देणारे अन्नावाचून दुसरे साधन नाही. वीरा अर्जुना! एखाद्या सावध माणसाने दारू घेतली तर तो तत्क्षणी बेभान होतो, हे तर आपण प्रत्यक्षच पाहतो. जो नेहमी अन्नरस सेवन करतो त्याला सहजच वातकफादी विकृती होते. एखाद्याला ताप आला तर तो ताप दूध वगैरे पिऊन कधी कमी होतो का? अरे जसे अमृत सेवन केले असता ते मरण टाळते किंवा जसे विष सर्वांगात विखार उत्पन्न करते, त्याचप्रमाणे ज्या प्रकारचा आहार घ्यावा त्याच प्रकारचा देहगत धातुरस बनतो आणि धातुरसाप्रमाणेच मनुष्याच्या मनात भावना पोसल्या जातात. ज्याप्रमाणे भांडे तापले असता आतले पाणीही तापते त्याचप्रमाणे धातुरसाचा संस्कार चित्तवृत्तीवर होतो. म्हणून जेव्हा सात्त्विक अन्न खावे तेव्हाच सत्त्वगुणाची वाढ होते. इतर प्रकारचे अन्न खाल्ले असता चित्तवृत्ती राजस किंवा तामस होते. आहाराचे महत्त्व विशद करताना संत ज्ञानदेवांनी वरील ओव्या प्रकट केल्या आहेत.

जसे अन्न तसे मन, जसे मन तसा स्वभाव, जसा स्वभाव तसा आचार, जसा आचार तशी कर्मे आणि जशी कर्मे तशी फळे. त्यामुळे सात्त्विक आहार हाच सर्वश्रेष्ठ होय. जर या मनुष्यजन्मात जिवाची उत्क्रांती व्हावी असे वाटत असेल तर सात्त्विक आहारच योग्य होय. राजस, तामस आहाराने राजस, तामस वृत्ती जोर धरतील. यावरून

एक आठवते– एक साधू होता. प्रवासात तो मुक्काम करीत चालला होता. एका मुक्कामावर येताच त्याच्या लक्षात आले की त्याच्या झोळीत एक तांब्या आलेला आहे आणि हा तांब्या मागील मुक्कामाच्या बाईच्या घरचा आहे. त्याच्या लक्षात येईना की तांब्या झोळीत कसा आला? थोडा विचार करता त्याच्या लक्षात आले की तो तांब्या त्यानेच झोळीत टाकला होता. त्याने विचार केला की 'मला त्या बाईचा हा तांब्या माझ्या झोळीत टाकण्याची बुद्धी का झाली?' तो परत मागील मुक्कामी त्या बाईकडे गेला. त्याने विचारले 'बाई'! काल तुम्ही मला जी भाकरी-भाजी खायला दिली त्या वस्तू तुम्ही कोठून आणल्या होत्या?' साधूच्या प्रश्नाने भ्यायलेल्या त्या बाईने साधूचे पाय धरले व म्हणाली, 'साधू महाराज, क्षमा करा. मी त्या वस्तू चोरून आणल्या होत्या.' साधूने तो तांब्या त्या बाईला परत केला व पुढील प्रवासाला सुरुवात केली.

चोरीच्या धान्यावर त्या बाईच्या वृत्तीचे संस्कार झाले होते व ते अन्न त्या साधूने सेवन केले. त्यामुळे त्याचीही तशी वृत्ती झाली आणि हेच ज्ञानदेवांच्या शब्दांत 'तेवि जैसा घेपे आधारु । धातू तैसाचि होय आकारू । आणि धातू ऐसा अंतरू । भावो पोखे ॥' म्हणून अन्न केवळ सात्त्विकही असून चालत नाही तर ते कोणत्या पद्धतीने मिळवलेले आहे? कोणी शिजवलेले आहे? कोणी वाढलेले आहे? ते विकत घेण्यासाठी दिलेला पैसा कोणत्या पद्धतीने मिळवलेला आहे? हे सर्व मुद्दे अतिशय महत्त्वाचे आहेत आणि यावरूनच खाण्याऱ्याचे भाव, वृत्ती तयार होत असते. हे लक्षात ठेवावयास पाहिजे. आध्यात्मिक प्रगतीला ही सर्व बंधने पाळावयास पाहिजेत. जितकी जास्त शुद्धता पाळता येईल तितक्या वेगाने प्रगती होईल. कोणी म्हणेल की मग आमच्या ठिकाणी कसा या अन्नाचा परिणाम होत नाही? त्याला उत्तर असे आहे की, अगदी शुद्ध पाण्यात एक थेंब लाल रंग घातला तर त्या लाल रंगाची वलये अगदी स्पष्ट दिसून येतात. तेच पावसाळ्यातील नदीच्या पाण्याच्या भांड्यात तो लाल थेंब पडलेला कळूनच येणार नाही. हा फरक आहे. असो.

एकूण आहाराप्रमाणे मन, मनाप्रमाणे विचार, विचाराप्रमाणे आचार, आचाराप्रमाणे विहार अशी ही साखळी आहे. म्हणून आहाराचे संयमन केले की मनाला वळण लावणे, त्याच्यावर संस्कार करणे ही पुढील पायरी येते. आहारानंतर अभ्यास. अभ्यासाची सुरुवात विहारापासून करावी.

**सात्त्विक विहार–**

पुढील गोष्टी टाळाव्या– सारखे विनाकारण हिंडणे, उतावळेपणा, अनावश्यक

आहार, अतिझोप, नास्तिकपणा, अहंकार, खोटे बोलणे, निर्दयीपणा, ढोंगीपणा, स्वार्थीपणा, कामासक्ती.

या गोष्टी जरूर कराव्या– संयम ठेवणे (मनावर, इंद्रियांवर, विषयोपभोगावर) पावित्र्य राखणे (मनाचे, शरीराचे, विचारांचे), सुचरित असणे, ग्रंथवाचन, पूजा-अर्चा करणे, चिंतन, मनन करणे, वगैरे.

### सात्त्विक आचार–

खरे बोलणे, मद्य-मैथुन न करणे, न रागावणे, अधिक कष्टदायक काम न करणे, अहिंसा, शांतपणा, प्रियभाषी, जप-तप करणे, धैर्यवान असणे, देव-गोब्राह्मण, आचार्य, गुरू, माता, पिता यांची पूजा करणे, अहंकार, संकीर्णता यांचा त्याग करणे, अध्यात्मवृत्ती, अनासक्ती यांची जोपासना करणे, संत, महात्मे यांची सेवा करणे, धर्मशास्त्राचा अभ्यास करून त्याचे अनुशीलन करणे, त्यामुळे स्वस्थपणा येतो. या प्रकारच्या आचारामुळे मानसिक अवस्था सर्व प्रकारच्या योगिक प्रक्रिया करण्यास योग्य होते. दीर्घायुष्य प्राप्त होते.

अशा सात्त्विक पुरुषाची धारणा– दयावान, अक्रूर, दानी, क्षमाशील, सत्यव्रती, धार्मिक, ज्ञानवान, मेधा, स्मृती, धृती आणि अनासक्ती या गुणांनी युक्त होते. सत्यासत्याचा विवेक जागृत होतो. उदार हृदय, आत्मबोधी, आत्मसंयमी, सहिष्णुता, अद्वेष्य, शोच इत्यादी सदाचाराच्या गुणांनी विद्यमान होते. आत्मविश्वास, आत्मानंद हे गुण त्याच्या ठिकाणी स्वाभाविक असतात. ''सर्व प्रकारचे रोग, मानसिक तणाव, हृद्रोग या सर्वांवर उपाय म्हणजे योग, म्हणजेच ध्यान, धारणा, जप यांचा अतिशय चांगला उपयोग होतो,'' असे नोबेल पारितोषिकप्राप्त झालेले कॅनडामध्ये जन्मलेले श्री. सेले यांनी आपल्या ग्रंथात नमूद करून ठेवले आहे.

सात्त्विक आहार, विहार, आचार यांची शरीरात नेमकी काय प्रक्रिया होते, त्यामुळे शरीरात काय काय हालचाली होतात याचे विवेचन आता करूया. तत्पूर्वी शरीरातील मुख्य ग्रंथींचे काय काय कार्य असते याची प्रथम माहिती घेऊ.

## शरीरातील मुख्य ग्रंथी

हायपोथायलम्स – हा मेंदूचा एक अवयव आहे. त्याने पिट्युटरी ग्रंथीच्या स्राव निर्माण करण्याच्या प्रक्रियेवर नियंत्रण ठेवले जाते व त्यामुळे अप्रत्यक्ष रीत्या सर्वच ग्रंथींच्या स्रावावर नियंत्रण होते. शरीराचे उष्णतामान समतोल करण्याचा प्रयत्न करणे,

भावनात्मक प्रक्रियांचे नियंत्रण करणे. उदा- राग, भय, प्रेम, इच्छा, वगैरे. त्याचप्रमाणे पिट्युटरी ग्रंथीकडून आलेल्या सूचना ज्या त्या ग्रंथींना पोचवणे व निरनिराळ्या ग्रंथींकडून आलेल्या सूचना पिट्युटरी ग्रंथीला पोचवणे व नियंत्रण राखणे व ठेवणे, वगैरे.

पिट्युटरी ग्रंथी – या ग्रंथीचे खालील सर्व ग्रंथींवर नियंत्रण असते. शरीराला आवश्यक असणारे अंतरस्त्राव सोडण्याबाबत व नको असलेले अंतस्त्राव आवरून घेण्याबाबतच्या महत्त्वाच्या सूचना या ग्रंथीकडून दिल्या जातात. त्यामुळे शरीराचा समतोल राखण्याचे, रोगाचा प्रतिबंध, प्रतिकार करण्याचे कार्य या ग्रंथीमुळे होते. तहान, भूक, तसेच शरीराची वाढ होणे व न होणे या ग्रंथीवर अवलंबून आहे. त्याचप्रमाणे अनेक विकारांच्या प्रक्रिया निर्माण करणारे अंतरस्त्राव सोडणे किंवा सोडण्याचे नियोजन करण्याचे कार्य ही ग्रंथी करते.

थायरॉइड ग्रंथी – शरीरातील पिट्युटरी ग्रंथीबरोबरच हीसुद्धा एक महत्त्वाची ग्रंथी आहे. शरीरात होणाऱ्या सर्व चयापचयाच्या प्रक्रियांमध्ये या ग्रंथीमधून उत्पन्न होणाऱ्या स्त्रावांची मोठी मदत होते. शरीरातील उष्णता धारणाशक्तीचे (BMR) नियंत्रणही या ग्रंथीकडे आहे. रक्ताभिसरणाचे मुख्य कार्य या ग्रंथीमुळे सुव्यवस्थित चालते. हृदयाचे ठोके व नाडीचे ठोके यांचे नियंत्रण या ग्रंथीकडे आहे. तसेच श्वासोच्छ्वासाची खोली वा उथळपणा, जोर वा हळुवारपणा, श्वासोच्छ्वासाची संख्या या सर्वांचे नियंत्रण या ग्रंथीकडे आहे. शिवाय अ‍ॅड्रेनल ग्रंथीच्या कार्यातही या ग्रंथीचा महत्त्वाचा सहभाग असतो. या ग्रंथीतील स्त्राव आयोडिनपासून तयार होतात. त्यामुळे आयोडिनच्या कमी-जास्त प्रमाणाने हिची कार्यपद्धती बदलते व शरीरस्वास्थ्यात कमी-जास्तपणा येतो. त्याचप्रमाणे बुद्धिमत्तेची उंचीसुद्धा या ग्रंथीमुळे कमी-अधिक होते. स्मरणशक्तीवरही या ग्रंथीचा कमी-अधिक परिणाम होतो. ही ग्रंथी महत्त्वाची आहे.

अ‍ॅड्रेनल ग्रंथी– याचे दोन भाग आहेत- १) कॉर्टेक्स, २) मेड्यूला

१) कॉर्टेक्स– हा भाग सर्व ग्रंथींना साहाय्य करणारा आहे. याचे कार्य म्हणजे उत्तेजित झालेल्या ग्रंथींना शांत करण्याचे आहे. शीघ्र कोपित्व, चिडखोरपणा व निद्रानाश यांसारखे विकार उत्पन्न झाले की त्यांना शमविण्यासाठीचे कार्य, रक्तदाब कमी करण्यासाठीचे, स्त्राव सोडण्याचे कार्य व प्रतिकारशक्ती वाढविण्याच्या यंत्रणेला मदत करणारे स्त्राव सोडणे, व पुन्हा शरीरस्वास्थ्य निर्माण करणे हे या भागाचे कार्य आहे. काही वेळा शरीरात शिथिलता निर्माण होते, तेव्हा शरीरातील कार्यपद्धती

उत्तेजित व्हावी म्हणून स्राव सोडणारा हा भाग आहे. साधारण प्रत्येक ग्रंथीमध्ये अशा प्रकारचे एकमेकांविरुद्ध कार्य करणारे स्राव सोडण्याची योजना असल्याने शरीराचा, विकारांचा, भावनांचा, शरीरस्वास्थ्याचा समतोल राखण्याचे काम त्या त्या ग्रंथींकडून वा त्यांच्या भागांकडून होत असते.

२) मेड्यूला– या भागाचे कार्य म्हणजे राग, भीती, दु:ख, श्रम यांच्या भावना वाढविण्याचे कार्य करणारे स्राव सोडणे व त्याचबरोबर त्यांना कमी करणारे स्राव सोडून शरीराचे स्वास्थ्य सर्वसाधारण राखण्याचे कार्य करणे. राग, भीती, दु:ख, श्रम, विकाराने श्वासोच्छ्वास जोरात चालतो, रक्तदाब वाढतो, स्नायूंची ओढाताण होते. शरीराचे उष्णतामान वाढते, घाम येतो आणि ही अवस्था झाल्याबरोबर त्याच्या विरुद्धचे स्राव सोडून राग, भीती, दु:ख, श्रम कमी करणे. श्वासोच्छ्वास हळूहळू करणे, रक्तदाबावर नियंत्रण करणे, स्नायूंची ओढाताण कमी करणे, शरीराचे उष्णतामान योग्य करणे, येणारा घाम थांबवणे अशा प्रक्रिया केल्या जातात व शरीरस्वास्थ्य राखले जाते. हृदयाचे ठोके नियंत्रित केले जातात. भयाने डोळ्यांतील बाहुल्यांचा आकारही कमी होतो. तो पुन्हा योग्य प्रमाणात आणला जातो. या प्रकारचे कार्य हा भाग करतो. शिवाय बाकीच्या ग्रंथींना मदत करण्याचेही कार्य हा भाग करतो.

लिम्बीक एरिया, लिम्बीक सिस्टिम–

भावनात्मक प्रक्रियांबाबत ही ग्रंथी व यंत्रणा विशेष सहभाग घेते. कोणत्याही क्रियेला प्रतिक्रिया निर्माण करण्याचे कार्य ही ग्रंथी करते. राग, भय, प्रेम, आशा, इच्छा, द्वेष, मत्सर, उत्सुकता इत्यादी भावनांचे शारीरिक प्रकटीकरण ही ग्रंथी करते. भयामुळे डोळ्यातील बाहुली आकुंचन-प्रसरण पावणे, अंगावर काटा येणे, घाम येणे, शब्द न सुचणे, पोटातील आतडी गोळा होणे अशाच प्रक्रिया इतर भावनिक विकारांबाबत होतात. या परिस्थितीतील ही प्रक्रिया शरीरावर प्रकट होणे व थोड्याच वेळात त्यांचे शमन करणे अशा प्रकारचे कार्य ही यंत्रणा करते. असो.

मनोविज्ञान जाणण्यापूर्वी शरीरविज्ञान जाणून घेणे महत्त्वाचे वाटले म्हणून जरा बाजूचा विषय घेतला एवढेच. वृक्ष म्हणजे त्याला अनेक शाखा असतातच, नव्हे तर शाखा हेच वृक्षाचे खरे रूप आहे, असेच म्हणावयास पाहिजे. शाखोपशाखांचा विचार करणे म्हणजेच संपूर्ण वृक्षाचा विचार करण्यासारखे आहे आणि ब्रह्म, परब्रह्म या वस्तूचे जर ज्ञान करून घ्यावयाचे असेल तर भगवंतांनी म्हटल्याप्रमाणे 'ज्ञानं विज्ञानसहितम्।' असे शाखोपशाखांचे थोडे बहुत (अगदी पूर्णपणे शक्यच नाही) तरी

ज्ञान करून घेणे आवश्यक आहे, असे वाटल्यावरून या विषयाचा (शरीरशास्त्राचा) विचार केला. आता याचा आपल्या आध्यात्मिक विषयांशी कसा संबंध येतो याचा विचार करूया.

शरीरातील काही ग्रंथींचा वर विचार केला आहे पण षड्चक्रे व त्यांमध्ये गुंतलेल्या, त्यावर अवलंबून असलेल्या इतर अवयवांचाही विचार होणे आवश्यक आहे. त्याशिवाय संपूर्ण शरीरशास्त्राचा अभ्यास (आध्यात्मिक दृष्टीनेही) पूर्णपणे होऊ शकणार नाही. म्हणून षड्चक्रे, पंचकोश व समाधी यांचा स्वतंत्र प्रकरणात विचार केला आहे असो.

## साधना

परब्रह्मप्राप्तीचे साधन ध्यान, धारणा, वगैरे आहे. समाधी लावून साधक बसतात ते कित्येक दिवस, महिने, वर्षे जागचे उठतच नाहीत. त्यांचे सर्व व्यवहार पूर्णपणे थांबलेले असतात. असे असूनही ते जिवंत कसे राहतात? त्यांना अन्न-पाणी वगैरे अगदी वरून दिसणाऱ्या साध्या नि नित्याच्या पण तितक्याच महत्त्वाच्या गरजा कशा लागत नाहीत. पाण्यावाचून आपण एक दिवसही राहू शकत नाही. मग समाधी लावून बसणाऱ्या साधूंना पाणीसुद्धा लागत नाही का? मग त्यांची शरीरयात्रा कशी चालते? याची सर्व माहिती वरील शरीरविज्ञानामध्ये आलेली आहे. त्याचा अर्थ आता आध्यात्मिक दृष्टीने लावावयाचा आहे.

या ठिकाणी एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, ही प्रक्रिया जरी सलगपणे येथे काही पानांत उतरविली गेली असली तरी या प्रक्रिया घडण्याला कित्येक वर्षांचा, कित्येक जन्माचा कालावधी आवश्यक आहे. अध्यात्मशास्त्राने पुनर्जन्म मानला आहे, ज्याप्रमाणे शिक्षणाची सुरुवात बालवाडीपासून होते. त्याचप्रमाणे आहार, विहार, आचार या पायऱ्यांपासूनच मनावर संस्कार करण्याचे ठरवावयास पाहिजे. कारण विषयोपभोग हे सर्व क्षणभंगूर असून केवळ दुःखदायक आहेत व परमेश्वरप्राप्ती हेच सर्वश्रेष्ठ सुख आहे, याची मनाला जाणीव होणे. मनाने हळूहळू विषयांपासून रस काढून ते ईश्वराकडे लावणे ही गोष्ट विषयांविषयी हळूहळू निर्माण होणाऱ्या वैराग्यामुळेच शक्य आहे आणि मनाची ही धारणाच अतिशय महत्त्वाची आहे. कारण मनच आपल्या वासनांची पूर्तता इंद्रियांद्वारे करीत असते. इंद्रिये ही सर्व ग्रंथींची बनलेली असतात. शरीरातील महत्त्वाच्या ग्रंथी की ज्याचा वर उल्लेख आलेला आहे. त्याच ग्रंथी या शरीरातील सर्व ग्रंथींना प्रोत्साहित करून मनाची वासनापूर्ती करण्यास

मदत करीत असतात. जर मनामध्ये वासनाच निर्माण झाल्या नाहीत तर इंद्रियांना प्रोत्साहनच मिळणार नाही आणि त्यामुळे इंद्रिये विषयांचा उपभोग घेण्यास पुढे सरसावणारच नाहीत. आहार, विहार, आचार यांमध्ये दिलेले गुण आत्मसात करण्यासही खूप कालावधी जाऊ शकेल. पुढे यम, नियम, यांचे पालन करणे हा अभ्यास राहील. त्यामुळे इंद्रियांवर नियंत्रण येईल. इंद्रिये कार्यप्रवृत्त होत नाहीत, याचा अर्थ ती कमजोर झालीत किंवा अकार्यक्षम झालीत असा मात्र होत नाही, हे निश्चित लक्षात ठेवावे. एखाद्या सामर्थ्यवान पुरुषाने एखाद्याला क्षमा केली याचा अर्थ क्षमा करणाऱ्याच्या अंगी शिक्षा करण्याचे सामर्थ्य नव्हते असा होत नाही, तर उलट त्याच्या सामर्थ्याला क्षमेने जास्त तेजस्विता प्राप्त होते. त्याचे सामर्थ्य आणखीन वाढते. त्याचप्रमाणे इंद्रियांच्या संयमनाने त्याचे सामर्थ्य वाढत जाते. या अवस्थेपर्यंत साधक हा पूर्ण व्यवहारी, संसारी असू शकतो. तरी त्याच्या ठिकाणी पूर्ण वैराग्य असू शकते. कारण आहार, आचार, विहार यांत वर्णन केलेले गुण त्याने आत्मसात केलेले असतात. ध्यानाचा अभ्यास वाढत असतो. तो काही तासांवरून दिवसावर जातो. त्या वेळी त्याच्या शरीरामध्ये नेमका काय काय बदल होत जातो ते पाहू. या वर्णनात कोणत्याही विशिष्ट ग्रंथींचा उल्लेख येणार नाही. कारण थोड्याबहुत प्रमाणात या प्रक्रिया सर्वच ग्रंथींकडून होत असतात.

ध्यानाला बसणाऱ्या साधकाचा मुख्य भाग म्हणजे त्याचे शारीरिक श्रम कमी झालेले असतात. त्यामुळे रक्ताभिसरणाची क्रिया वेगाने होत नाही. शारीरिक श्रम कमी झाले असल्याने वेगाने श्वासोच्छ्वास घेण्याची जरुरी वाटत नाही. अन्नाचे सेवन कमी होते. त्यामुळे पचनसंस्थेवर ताण पडत नाही. डोळे मिटलेले असल्याने डोळ्याच्या प्रक्रिया थंडावलेल्या असतात. विषयांशी संबंध येत नसल्याने भावनांना प्रोत्साहन मिळत नाही. त्या सम, शांत होतात. त्यामुळे साहजिकच इंद्रियांनाही उत्तेजित करणाऱ्या, स्राव सोडणाऱ्या ग्रंथीही शांत असतात. त्या त्या प्रकारचे स्रावच सोडत नाहीत. हीच साधकाची समाधी अवस्था होय.

प्राण्यांमध्ये बेडूक, साप, सरडे हे प्राणी जमिनीखाली स्वतःला गाडून घेतात. ६/६ महिने ते त्या अवस्थेतून बाहेर येत नाहीत, पण सहा महिन्यांनी ते पुन्हा जिवंत अवस्थेत बाहेर येतात. पावसाळ्याच्या अखेरीस अदृश्य झालेले बेडूक, साप वगैरे प्राणी पुन्हा एक-दोन पाऊस पडून गेल्यावर दिसू लागतात. त्या वेळी त्यांच्या शरीरात काय घडत असते? त्यांनाही हवा, पाणी, अन्न लागत नाही. तरीही ते जिवंत कसे राहतात? काही लोकांना सतत तोंड चालू ठेवण्याची सवय असते. काही लोक

दिवसातून चार वेळा, तर काही दोन वेळा, तर काही एक वेळाच खातात, जेवतात, तेव्हा त्यांच्या त्यांच्या वेळेला पोटामध्ये विशिष्ट स्राव सोडण्याची व भूक लागली असल्याची जाणीव निर्माण करण्याची प्रक्रिया घडविण्याचे काम ग्रंथी करतात, पण जो समाधी अवस्थेत असतो, त्याच्या ग्रंथींना तशीच सवय होते. त्या ग्रंथी भुकेची जाणीव निर्माण करणारे स्राव सोडण्याचे हळूहळू कमी करून बंद करून टाकतात. त्याचप्रमाणे तहानेचीही प्रक्रिया होते. ध्यानात सतत बसल्याने शरीराला कोणतेच कार्य राहात नाही. एके ठिकाणी शांत बसल्याने, मनाचे व्यवहारही मंदावल्यामुळे श्वासोच्छ्वासही मंदावत जातो.

ज्याप्रमाणे बेडूक, साप हे प्राणी स्वत:ला जमिनीत गाडून घेतात. त्या वेळी त्यांच्या शरीरातील पुष्कळ प्रक्रिया मंदावलेल्या, थंडावलेल्या असतात. समाधीमध्ये बसलेल्या साधकाचा मांडी, पाय यांच्यावर शरीराचा भार पडलेला असतो. शिवाय पायात कोणतीच हालचाल नसल्याने त्या अवयवांमध्ये बधिरपणा येतो. बधिरपणाचे लक्षण म्हणजे रक्ताभिसरणाचा अभाव होय. किंवा रक्ताभिसरणाची क्रिया अगदी मंद चालू असते. झोपेत हात अंगाखाली आला की तो हात स्वत:हून उचलण्याची शक्ती त्या हातात नसते. थोड्याशा प्रयत्नाने, हात चोळण्याने रक्ताभिसरणाची क्रिया चालू होते व हातात शक्ती येते. त्याचप्रमाणे समाधीमध्ये शरीराच्या भाराने पाय, मांडी हे अवयव बधिर होतात. म्हणजे ते अर्धवट मृतच झालेले असतात. समाधीचा काल जास्त असेल तर शरीराला आवश्यक असणारे (व्यवहार करण्यासाठी) स्राव ग्रंथी सोडत नाहीत. त्यामुळे ग्रंथीही स्तब्ध झालेल्या असतात. शरीरात कोणतीच प्रक्रिया घडत नाही. त्यामुळे शरीरातील सर्व स्नायू, ग्रंथी या स्तब्ध व बधिर होऊ लागतात. कारण शरीराची मागणी नसल्याने मेंदूकडून म्हणजे मेंदूतील ग्रंथींकडून कोणत्याच प्रकारची नियंत्रणाची आवश्यकता राहात नाही आणि त्यामुळे शरीराचे कार्य हळूहळू मंदावत जाते. या समाधी अवस्थेचे संत ज्ञानदेवांनी सुरेख वर्णन केले आहे. ते म्हणतात 'नासा पुटौनि वारा। जो जातसे अंगुळे बारा। तो गच्च धरूनि माघारा। आतुं घाली ।।' (६-२३६ ज्ञानेश्वरी). सर्वसाधारण मनुष्याचा श्वासोच्छ्वासाचा नाकातून निघणारा वारा हा बारा अंगुले खालपर्यंत जाणवतो. म्हणजे नाकापासून आडवी बारा बोटे जितकी लांब येतात (साधारण ९ इंच) तिथपर्यंत नाकातून निघालेला उच्छ्वास (वारा) जाणवतो, पण समाधी अवस्थेत असलेल्या साधकाचा श्वास इतका मंद चालतो की तो नाकापाशीही जाणवत नाही.

याचे वर्णन करताना संत ज्ञानदेव म्हणतात– 'मग शशी आणि भानु। ऐसा कल्पिजे जो अनुमानु। तो वातीवरी पवनु। गिंवसिंता न दिसे।।' (६-२४५ ज्ञानेश्वरी). याचा अर्थ दिव्याची ज्योत जरी त्याच्या नाकपुडी जवळ धरली तरी ती त्या श्वासोच्छ्वासामुळे हलत नाही. इतका तो मंद चालत असतो. म्हणजे आपल्या व्यवहारी भाषेत तो मेलेलाच असतो, पण तसे नसते. तो जिवंत असतोच. त्याच्या शरीराच्या गरजा इतक्या कमी झालेल्या असतात की श्वास घेण्याचीही आवश्यकता त्या शरीराला राहिलेली नसते. म्हणजे त्याच्या शरीरातील सर्व नियंत्रण कक्षा स्तब्ध (बंद नव्हे) झालेल्या असतात आणि अशा अवस्थेत तो साधक महिने, वर्षे इतकेच काय पण शतकेही राहू शकतो, असाच त्याचा अर्थ होऊ शकतो. अर्थात एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, अशा प्रकारे समाधी लावून बसणारे सर्व साधू हे हिमालयातील थंड वातावरणात असतात. या समाधिकालात शरीरातील चयापचयासाठी लागणारी उष्णता शरीरातून निर्माण होत नाही. व हिमालयातील बाहेरील वातावरणातूनही मिळत नाही. त्यामुळे ही चयापचयाची क्रिया एकदम थंडावलेली असते. त्याचप्रमाणे श्वासोच्छ्वासाची क्रिया अति थंडावलेली असल्यानेही शरीरातील चयापचयाच्या प्रक्रियाही होत नाहीत. ज्याप्रमाणे बंद डब्यातील पदार्थ बहुत काळ टिकतात, त्यांच्यात कोणतीही प्रक्रिया होऊन खराब होत नाही, त्याचप्रमाणे शीतगृहात ठेवलेले पदार्थही खूप काळ टिकतात; अगदी याच तत्त्वावर ही शरीरे हिमालयातील थंड वातावरणात वर्षानुवर्षे टिकून राहतात आणि याचाच प्रत्यय मुखपृष्ठावरील चित्रावरून येतो. फोटोतील साधुपुरुषाचे वय त्याच्याकडे पाहिले असता अगदीच जरी लक्षात येत नसले तरी त्याला समाधी लावून बसण्याला कित्येक वर्षे होऊन गेली असतील असेच दिसते. म्हणजे त्याचे शरीर जे टिकून राहिले ते केवळ वर वर्णन केलेल्या सर्व प्रकारच्या कारणांनीच होय. *

---

* साधना म्हणजे अभ्यास. एका विशिष्ट प्रक्रियेचा अभ्यास. उपासनेचा अभ्यास. सातत्याने, निष्ठेने वर्षानुवर्षे अभ्यास करणे म्हणजे साधना होय. ही साधना चालू असतानाच काही काही सिद्धींची प्राप्ती होत असते. ज्या वेळी साधक समाधी अवस्थेपर्यंत जातो व त्याला वर्षानुवर्षे समाधी लावून बसण्याची क्षमता प्राप्त होते, त्या वेळी त्याला सर्वच सिद्धी प्राप्त झालेल्या असतात. अशा या वर्षानुवर्षांच्या समाधीकाळात त्याचे जीवन कसे चालते याचा उल्लेख वर आलाच आहे. पण कोणतीही गोष्ट पाश्चिमात्याने सांगितली की ती खरी अशी आपली धारणा झाली आहे म्हणून त्यांचीही उदाहरणे येथे देत आहे.

वर वर्णन केलेल्या साधनेचा साधा क्रम लावल्यास असा असेल–

१) आहार, विहार, आचार यांतून मनावर संस्कार केले जातात.

२) यम, नियम या अष्टांग योगसाधनेने मनाला वळण लावले जाते.

---

'योगी कथामृत' हे परमहंस योगानंद यांचे चरित्र आहे. ते जेव्हा अमेरिकेला गेले होते त्या वेळी त्यांनी 'आइकस्टाट' गावी जाऊन एका बाईंची मुलाखत घेतली. त्यांनी दिलेली माहिती– 'त्या बाईचे नाव थेरेसा नॉयमन. कॅथोलिक पंथ. जन्म १८९८ साली गुडफ्रायडे या दिवशी झाला. १९२३पासून त्या कोणतेही अन्नपाणी ग्रहण करीत नव्हत्या. फक्त रोज सकाळी एक लहानसा पवित्र केलेला वेफर त्या घेत. त्या त्याला होस्ट म्हणत. होस्ट म्हणजे पापुद्रासारखा व लहान नाण्याच्या आकाराचा वेफर. त्या म्हणाल्या, 'परमेश्वर जो प्रकाश देतो त्यावर मी जगते.' ईथर, सूर्य व हवा यांकरवी आपल्या शरीरात शक्ती येते. बायबलमधील मॅथ्यू ४ : ४ या उताऱ्यात म्हटले आहे की, 'मनुष्याची शरीररूपी विजेरी ही काही फक्त ओबडधोबड अन्नावर चालते असे नाही. तर ती स्पंदनात्मक अशा विश्वशक्तीवर (शब्द किंवा ओम्) चालत असते.' मेरुदंडशीर्ष हे विश्वशक्ती (ओम्) ग्रहण करण्याचे शरीरातील प्रमुख द्वार आहे. याच्या दोन्ही भुवयांमध्ये स्थित असलेल्या एकमेव नेत्रांशी, कूटस्थ चैतन्यकेंद्राशी ध्रुव टोकासारखा सरळ संवंध आहे. हे कूटस्थ चैतन्य केंद्र म्हणजे माणसाच्या इच्छाशक्तीचे वसतिस्थान होय. त्यानंतर विश्वशक्ती ही मेंदूमधील सातव्या केंद्रामध्ये ग्रहणशक्ती असलेल्या या कोठारामध्ये साठविली जाते. (या सातव्या केंद्रास वैदिक वाङ्मयामध्ये सहस्रदलकमल म्हणून संबोधिलेले आहे.) बायबलमध्ये 'ओम्'चा उल्लेख 'होली घोस्ट' म्हणून केला आहे. होली घोस्ट म्हणजे साऱ्या सृष्टीस दिव्यरूपाने धारण करणारी अदृश्य अशी प्राणशक्ती होय. असो.

त्याचबरोबर या पुस्तकात दुसऱ्या एका बंगाली बाईंचा उल्लेख आलेला आहे. तोही महत्त्वाचा आहे. तीव्र इच्छाशक्तीचा किती प्रचंड प्रभाव असतो हे या कथेवरून कळून येईल. ती कथा अशी–

बंगालमधील अतिअंतर्गत असलेल्या बिऊर खेड्यामध्ये या गिरिबाली नावाच्या बाई राहात होत्या. ज्या वेळी परमहंस योगानंदांनी त्यांची मुलाखत घेतली त्या वेळी त्या सत्तर वर्षांच्या होत्या. गिरिबालींनी स्वतःची माहिती सांगितली ती अशी– 'लहानपणापासून मी अतिशय खादाड होते. आई मला वारंवार या खाण्याविषयी सावध करावयाची. माझे लग्न ९व्या वर्षी झाले. सासरी गेल्यावर माझ्या खादाडपणासाठी सासू मला खूप बोलायची. एके दिवशी माझ्या सहनशक्तीचा अंत झाला. माझ्या खादाडपणाबद्दल मलाही तिटकारा आला. मी त्या दिवशी गावाबाहेरील नदीकाठच्या देवळात गेले व देवाला प्रार्थना करून सांगितले की त्याने माझे जेवण, खाणे, पाणी सर्व बंद करावे. माझ्या गुरूलाही मी शरण गेले. त्याने मला साधना दिली. त्या साधनेचे मी नियमित पालन केलेच, पण त्या दिवसापासून मी अन्नपाणी याचा पूर्ण त्याग केला. केवळ हवेवर माझा निर्वाह होतो.'

परमहंस योगानंदांच्या एका प्रश्नाला उत्तर देताना त्या म्हणाल्या, 'माझे पोषण हवा व सूर्यप्रकाश यांमधून येणाऱ्या सूक्ष्मतर अशा शक्तीच्या द्वारा होत असते. तसेच मेरुदंडशीर्षामधून जी विराट विश्वशक्ती शरीरात पुनःपुन्हा ताकद देत असते तिच्याकरवीही होत असते.

३) मनाची विषयाविषयीची आसक्ती जशी जशी कमी होईल तसे तसे इंद्रियांना प्रोत्साहित करणाऱ्या ग्रंथी स्राव सोडण्याचेही हळूहळू कमी करतात.

४) म्हणजेच इंद्रियेही शांत होतात.

५) मन जितके शांत असेल तितक्या प्रमाणात चांगली समाधी लागेल.

---

'योगी कथामृत; या पुस्तकात या मुद्यावर जी टीप दिली आहे ती अशा प्रकारची आहे. मेंफिस येथे १७ मे १९३३ रोजी भरलेल्या डॉक्टरांच्या मेळाव्यापुढे क्लीव्हलँडचे डॉ. जॉर्ज डब्ल्यू. काईल हे भाषण देत असताना म्हणाले, 'अत्यंत महत्त्वाचे असे हे किरणोत्सर्जन शरीरातील विद्युतवलयास सूक्ष्म असा विद्युतप्रवाह पुरवीत असते. शरीरातील विद्युतवलय म्हणजे शरीरातील मज्जासंस्था, नाड्या वगैरे. या नाड्यांना, मज्जासंस्थेतून अशा तऱ्हेने सूर्यकिरणांकरवी अन्न मिळत असते. एक-एक अणू गुंडाळून ठेवलेल्या स्प्रिंगसारखी सूर्यकिरणांच्या उत्सर्जनांनी भरलेली वाहने होत. शक्तीने भरलेल्या या असंख्य अणूंचा अन्नासारखा उपयोग होतो. शक्तीने भरलेली ही वाहने जेव्हा शरीरात प्रवेश करतात तेव्हा ती हळूहळू शरीरातील धातूमध्ये रूपांतर पावतात. अशा तऱ्हेने हे किरणोत्सर्जन शरीरामध्ये नवीन नवीन रासायनिक शक्ती, नवीन नवीन विद्युतप्रवाह निर्माण करीत असते. हे शरीर असे अणू-परमाणूंनी बनलेले आहे. स्नायू, डोळे, मेंदू, कान यांसारखी ज्ञानेंद्रियेही अशा अणू-परमाणूंचीच बनलेली आहेत.

एक दिवस असा येईल की, मनुष्यप्राणी हा या सूर्यशक्तीवर सरळपणे कशाच्याही मध्यस्थीखेरीज जगू शकतो हे शास्त्रज्ञांना आढळून येईल. 'न्यूयार्क टाइम्स'मध्ये विल्यम एल. लॉरेन्स लिहितात, 'सूर्यप्रकाश पकडून ती सूर्यशक्ती ओढून घेण्याची ताकद क्लोरोफिल या एकमेव द्रव्याच्या ठिकाणी असते. निसर्गामध्ये क्लोरोफिल हे सूर्यप्रकाशातून शक्ती पकडून घेते व ती वनस्पतीमध्ये साठवून ठेवते. या शक्तीखेरीज कोणताही जीवजंतू, कोणतीही वनस्पती जगू शकणार नाही. आपण या वनस्पती खातो किंवा या वनस्पती खाणाऱ्या प्राण्यांचे मांस खातो आणि अशा तऱ्हेने आपल्या जीवनाला आवश्यक तेवढी सूर्यशक्ती आपण प्राप्त करून घेतो. तसे पाहिले तर आपणही सूर्यावरच क्लोरोफिलच्या मध्यस्थीने जगात असतो.' सूर्यप्रकाशबरोबर चंद्रप्रकाशही तितकाच महत्त्वाचा आहे. गीतेमध्ये भगवान श्रीकृष्ण म्हणतात–

*पुष्णामि चौषधीः सर्वाः सोमो भूत्वा रसात्मकः ॥ (१५-१३).*

रसरूप सोम (चंद्र) होऊन (सर्व) वनस्पतींचे मी पोषण करतो. गिरिबालींची ही निराहारी अवस्था एक सिद्धी आहे. ती पातंजली योगसूत्रामध्ये पाद ३, सूत्र ३१मध्ये दिलेली आहे. विशुद्ध चक्रावर परिणाम करणारा एक विशिष्ट प्राणायाम त्या करत. विशुद्धचक्र हे मेरुदंडातील सूक्ष्म शक्तिप्रवाहाचे पाचवे चक्र होय. हे चक्र घशाच्या पाठीमागे असून ते आकाश व ईथर या पाचव्या तत्त्वावर (पंचामहाभुतांपैकी पाचवे) नियंत्रण करते. हे महाभूत जड पेशींच्या अणू-परमाणूंमधील मोकळी जागा व्यापून असते. त्या विशुद्धचक्रावर ध्यान लावल्याने साधकाला केवळ आकाशशक्तीवर किंवा हवेवर जगता येते.

६) समाधीचा काल जसा जसा वाढत जाईल तस तशा शरीरातील प्रक्रिया थंडावत जातील. तहान, भूक, या नेहमीच्या गरजा कमी होतील.

७) स्थिरपणे एकाच आसनावर बसल्याने शारीरिक क्रिया होणार नाहीत. शरीराची झीज नाही, म्हणून तहान, भूक नाही. श्रम नसल्याने रक्ताभिसरणाचा वेगही मंदावत जातो.

८) शरीर स्वस्थपणे एका जागी असल्याने श्वसनाचा वेग मंदावत जातो. श्वसनाची संख्या कमी होते आणि मंदगतीने श्वसन होता होता अशी एक वेळ येते की त्या वेळी श्वासोच्छ्वास चालू आहे की नाही अशीच शंका येईल.

या अवस्थेला मनाचा लय होतो. म्हणजे जे मन इंद्रियांशी संयोग पावून विषयांचा उपभोग घेत असते व नंतर सात्त्विक गुणामध्ये प्रवेश करून, योग्य संस्कारित होऊन, मनाला वैराग्य प्राप्त होते व ईश्वराशी संयोग पावून ध्यान, धारणा, समाधी या अवस्थांतून जाते. या मनाचा ईश्वरप्राप्ती हा संकल्प पुरा होतो. साध्य प्राप्त होते. साध्य प्राप्त झाले की साधने हळूहळू खाली ठेवली जातात. गाव जवळ आल्यावर, घर आल्यावर, रस्ता संपून जातो व प्रवासात घेतलेले ओझे खाली ठेवले जाते. जेवण घेत असता पोट भरल्यावर ताट बाजूला सारले जाते. तसे ब्रह्मप्राप्तीचा समय जवळ आल्यावर साधकाचा सिद्ध होतो. त्याची साधना हळूहळू थंडावत जाते. कारण ईश्वरप्राप्ती हा जो मनाचा संकल्प असतो तो संकल्प पुरा झालेला असतो. तसेच पुढील कोणताच संकल्प राहिला नसल्याने व मनाचे कार्यही राहिले नसल्याने मनाचा लय होतो. मनाचे उन्मन होते. सिद्धाला ईश्वरी साक्षात्कार होतो. ईश्वराचे अपरोक्ष ज्ञान होते.

हिलाच तुरीया अवस्था म्हणतात, सविकल्प समाधी म्हणतात, तीच पुढे निर्विकल्प समाधी होते. हिलाच पूर्णावस्था म्हणतात. याच स्थितीत परब्रह्माशी ऐक्य होते. अभेद भावाने तो परब्रह्माशी एकरूप झालेला असतो. हीच शेवटची अवस्था होय. यातून आणखीन काहीच मिळवावयाचे शिल्लक राहिलेले नसते.

*'यद् गत्वा न निवर्तन्ते तत् धाम परमं मम ॥'*

मनाचा लय होणे, मन निःसंकल्प होणे, या अवस्थेचे वर्णन संत ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीमध्ये अगदी सुरेख शब्दांत वर्णन केले आहे. मनच विषयांच्या संयोगाने, उपभोगाच्या आसक्तीने बंधनात पडते व तेच मन विषयातील दुःखाचे स्वरूप समजून आल्यावर, क्षणभंगुरत्व पटल्यावर मनाला विषयांविषयी वैराग्य उत्पन्न होत मनाचा लय होतो.

त्याला दृष्टांत देताना संत ज्ञानदेव म्हणतात,

*'जेथ हे संसार चित्र उमटे । तो मनोरूप पटु फाटे ।*
*जैसे सरोवर आटे । मग प्रतिमा नाही ॥*

*तैसे मन एथ मुद्दल जाये । मग अहंभावादिक के आहे ।*
*म्हणोनि शरीरेचि ब्रह्म होये । अनुभवी तो ॥*

*(ज्ञानेश्वरी ५.१५६, १५७).*

मनोरूपी पटावर, पडद्यावरच या संसाराचे चित्र उमटत असते. चित्रित केले जाते. मनच वेगवेगळ्या वासनांची, कल्पनेची चित्रे, इच्छेची चित्रे रंगवत असते आणि आशांच्या जिव्हा लांब लांब होत जातात. त्या इतक्या लांब होतात की जन्मजन्मांतरी गेल्या तरी त्यांची हाव संपत नाही. पण ज्या वेळी वैराग्याच्या काट्याने, साधनेच्या, तपाच्या, ओढाताणीने तो मनोरूपी पट फाटून जातो, जसे सरोवर आटून गेले म्हणजे त्यामध्ये प्रतिबिंबच पडत नाही तसे मनोरूपी पट फाटून गेला की संसाराची चित्रे त्यावर रंगवताच येणार नाहीत आणि मग मनाच्या आधाराने अहंकार, चित्त यांचाही लय होतो. हा लय परमेश्वरापाशी होतो आणि शरीरधारी असूनही तो सिद्ध ब्रह्मानंदाचा आनंद घेत राहतो, ब्रह्मानंदाची अनुभूती घेत राहतो.

## षड्चक्र परिचय

योगशास्त्रानुसार इडा, पिंगला व सरस्वती या नाड्या प्राणवायूचे धारण करून शरीराचे सर्व व्यवहार करतात. याच नाड्यांची आधारभूत असलेली सहा चक्रे क्रमाने खालून वर अशी आहेत. प्राणवायूचा सतत संचार याच नाड्यांतून व चक्रांतून होत असतो. प्रत्येक चक्राच्या ठिकाणी त्याच्या शरीरातील स्थानावरून काही विशिष्ट शक्ती असते व त्या शक्तीवर ताबा मिळवण्यासाठी योगशास्त्रात निरनिराळे उपाय व आसने सांगितली आहेत. षड्चक्रे ही स्वतंत्र नाडी संस्थानातील नाडीची चक्रे होत व त्यांच्यावर आपल्या इच्छेचे नियंत्रण असते. योगसाधनेमुळे जर त्यांच्यावर ताबा ठेवता आला तरच ते शक्य होते.

१) मूलाधार चक्र – (Pelvic plexus coccygeum gangion)

२) स्वाधिष्ठान चक्र – (Hypogastric or abdominal aortic plexus)

३) मणिपूर चक्र – (Solar plexus) सूर्याप्रमाणे तेजस्वी व प्रकाशदायक असते.

४) अनाहत चक्र – (Cardiac plexus)

५) विशुद्ध चक्र – (Cervical or corolid plexus)

६) आज्ञा चक्र – (Cavernous plexus, optic thalsmus)




१) मूलाधार चक्र – 'ध्वजाधो गुदोर्ध्वदेशे ।' (Sacral and Coecygeal plexus) - शिस्न आणि गुद यांच्यामध्ये शिवणीच्या ठिकाणी हे असते.

*'गुदमेद्रान्तलस्थं मूलाधारम् त्रिकोणम् ।*
*यत्र कुंडलिनी नाम पराशक्तिः प्रतिष्ठिता ॥'*

*(योग शिखोपनिषद्.)*

हे शिवणीच्या आत व त्रिकास्थीच्या पूर्व बाजूस असते. त्रिकास्थीच्या आकारामुळेच यालाही त्रिकोणी समजले जाते. येथेच कुंडलिनी नावाची शक्ती वास करते.




सर्व चक्रांचा आधार ही शक्ती आहे व याच्यावर इतर सर्व चक्रे आहेत. म्हणून याला मूल आधार मानलेले आहे. हे स्वतंत्र नाडी संस्थानच्या नाडीचे चक्र (Sypathetic nerve plexus) आहे. याच्यापासून गुद, बस्ती, योनी, गर्भाशय इत्यादी अवयवांना नाडी तंतू जातात. याला चार दले आहेत.

अ) Inferior Naemarrhoidal plexus हे पश्चिम बाजूस असते. यापासून गुदद्वार व गुदनलिकेला तंतू जातात.

ब) Vesical Plexus – हे पूर्व बाजूस असते. बस्तीला व शुक्रप्रपाला यांचे तंतू जातात.

क) Prostatic plexus – हे अधोबाजूस पौरुष ग्रंथीच्या आसपास असते. स्त्रियांमध्ये याला Vaginal plexus म्हणतात.

ड) Uterine plexus – हे ऊर्ध्व बाजूस असते. स्त्रियांमध्ये याच्यापासून गर्भाशय, बीजग्रंथी, बीजनलिका यांकडे तंतू गेलेले असतात.

या चार दलात वं, शं, षं, सं, हे चार वर्ण असतात व गुप्ता, प्रासका, कराळा व विकराळा या चार शक्ती असतात. मूलाधार चक्राचे ठिकाणी अपान वायूचे अधिष्ठान व कार्य आहे. या ठिकाणी गजाननाचे अधिष्ठान व मंगळवाराची कल्पना केलेली आहे. सहस्त्रदल कमल हे शिराच्या ठिकाणी ब्रह्मरंध्रात आहे. त्यापासून मूलाधार चक्र दूर व शेवटचे आहे, म्हणून या चक्रावर ताबा मिळवता आला तर इतर चक्रांवर सहज ताबा मिळवता येतो. याचा वर्ण (रंग) आरक्त आहे. कुंडलिनी शक्ती साध्य करण्यासाठी सिद्धासन करतात.

२) स्वाधिष्ठान चक्र – (Hypogastric plexus) 'ध्वजमुळे' हे उपस्थ इंद्रियाच्या पातळीत पृष्ठवंशाच्या समोर औदार्या महाधमनीच्या शेवटच्या भागाभोवती असते. म्हणून यास Aortic plexus म्हणता येईल. यापासून आंत्र, मलाशय, वृषण, इत्यादींना तंतू गेले आहेत. याची सहा दले आहेत.




अ) Spermatic – अंड कोषांना हे तंतू जातात.

ब) Left colic – अवरोही बृहदांत्र यांना हे तंतू गेले आहेत.

क) Sigmoid – बृहदांत्रांच्या कुंडलिका भागाला हे तंतू गेले आहेत.

ड) Superior haemorrhoidal – मलाशयाच्या ऊर्ध्व भागाला हे तंतू गेले आहेत. चक्राच्या या दलावर ताबा मिळवता आल्यास मूळव्याध (अर्श) व भगंदर व्याधी बरे करणे शक्य होते.

इ) Inferior mesenteric – औदार्या महाधमनीची शाखा अधरांत्रिकी धमनी आहे. हिच्या भोवती हे असते.

ई) Hypogastric – उदराच्या अधोभागात, बस्ती प्रदेशात हे असते, श्रोणी गुहेतील अवयवांना तंतू जातात.

*'स्वाधिष्ठानाव्हयं चक्रं लिंगमूले षड्चक्रे ।'*

*(योगशिखा)*

याच्या सहा दलात 'बं, भं, मं, यं, रं, लं हे सहा वर्ण आहेत. तसेच त्या दलात अव्यंगता, शारदा, वाणी, अमृता, पूर्णा व रोहिणी या सहा शक्ती वास करतात. याचा रंग पिवळा आहे. या चक्राची देवता ब्रह्मा ही आहे. ब्रह्मदेव सृष्टिनिर्माता आहे. यात बुधवारची कल्पना केली आहे. येथे अपानवायूचे वास्तव्य आहे. उपवायूंपैकी धनंजय वायू येथे आहे. तो शब्द उत्पन्न करतो. मृत्यूनंतर काही काळ असतो.

३) माणिपूर चक्र – (Solar or coeliac plexus) स्वाधिष्ठानाच्या वर व नाभीच्या मुळाशी हे असते.

*'नाभिदेशेस्थितं चक्रं दशास्त्रं मणिपूरकम्' ।*

*(योगशिखा)*

या चक्राला नाभिकमल किंवा उदरातील मेंदू (Abdominal brain) म्हणतात. यात श्वेत व धूसर वस्तू असतात. याचे शिसस्थ मेंदूप्रमाणे महत्त्व आहे. हे पृष्ठवंशाच्या दोन्ही बाजूंस आहे व मोठे आहे. औदार्या महाधमनीची एक शाखा अर्द्धोदरिका धमनी आहे (Coeliac artery). हिच्याभोवती हे असते. या चक्राचे नाभी हे स्थान सांगितले असले तरी 'शाखाचंद्र न्यायाने' नाभीच्या पातळीत हे पृष्ठवंशासमोरच असते. साधारणपणे प्रथम कटिकशेरूकाच्या पूर्व बाजूस असते. यात कुंडलिनी शक्ती वास करते. येथे प्राण व अपमान यांचे ऐक्य करता येते. याची दहा दले आहेत.




अ) Pherenic येथून महाप्रचीरा पेशी व वृक्क यांना तंतू जातात.

आ) Hepatic हे सर्वात मोठे दल आहे. उदरातील सर्वच रक्तवाहिन्यांवर व यकृताच्या व आमाशयाच्या रक्तवाहिन्यांवर याचे नियंत्रण असते.

इ) Splenic प्लीहा व त्याच्या रक्तवाहिन्यांना यांचे तंतू जातात.

ई) Superiorgastic आमाशयाच्या स्कंद भागाला याचे तंतू जातात.

ए) Suprarenal अधिवृक्कग्रंथीवर याचा ताबा असतो.

ऐ) Renal वृक्काला हे तंतू जातात. येथूनच ते गवीनी व वृषणाकडे जातात.

ओ) Supermatic पुरुषांच्या शुक्रवाहिनी व स्त्रियांच्या बीजग्रंथी व गर्भाशय यांकडे याचे तंतू जातात. तेव्हा त्याला Ovarian Plexus म्हणतात.

याचा सहाव्या चक्राशी घनिष्ठ संबंध आहे.

औ) Superior Mesenteric लघ्वांत्र व आंत्र आवरण (उदरावरण) यांना तंतू जातात.

अं) Pancreatic अग्नाशयाला येथून तंतू जातात.

अः) Colic plexus लघ्वांत्राचा काही भाग, लघू व बृहदांत्राचा संधिभाग, बृहदांत्राचा आरोही भाग यांना येथून तंतू जातात.

थोडक्यात, अन्नाचे पचन, शोषण, रसोत्पादन, मलविसर्जन, मूत्रनिर्मिती व वहन, प्रजोत्पत्ती, श्वासोच्छ्वास व रुधिराभिसरण या सर्व महत्त्वाच्या क्रियांवर मणिपूर चक्राचे नियंत्रण असते. याचे काही तंतू अनाहत चक्राकडे जातात. तसेच काही स्वाधिष्ठान चक्राकडेही जातात. याच्या दहा दलांत डं, ढं, णं, तं, थं, दं, धं, नं, पं, फं हे दहा वर्ण आहेत, त्यांना मातृका किंवा बीजे म्हणतात. समानवायू येथे वास करतो. उपवायूंपैकी कृकलवायू क्षुधा व पिपासा उत्पन्न करतो. शिंक येणे हे याचे कार्य आहे. 'परा' ही श्रेष्ठ वाणी येथे आहे. विष्णू देवतेचे अधिष्ठान आहे. प्लीहा, यकृत, आमाशय, पक्वाशय, वृक्क इत्यादी अवयवांवर ताबा असतो. गुरुवारची येथे कल्पना केली आहे. या चक्राचा वर्ण निळा आहे. यात सवर्गा, सोमा, यामा, भद्रा, तक्षिणी, सौंदर्या, शांतमुद्रा, विशाखा, दर्षिनी व रुचिरा या शक्ती आहेत.

४) अनाहत चक्र – (Cardiac and pulmonary plexuses) यालाच हृत्कमल म्हणतात. 'हृद्प्रदेशेः' हे हृदयाच्या ठिकाणी असते.

*'द्वादशारं महाचक्रं हृदये चाप्यनाहतम् ।'*

*(योगशिखा)*

हे हृदयाच्या पश्चिम बाजूस असते. फुप्फुस व हृदय या महत्त्वाच्या अवयवांना याचे तंतू जातात. येथे मनाचे वास्तव्य मानले आहे. तेथे प्राण आला की मन व प्राण यांचे ऐक्य होते. चित्त एकाग्र झाल्याने प्राण व मन यांचा लय होऊ लागतो. तेव्हा कर्णामध्ये अतींद्रिय ज्ञान होऊ लागते व निरनिराळे आवाज उत्पन्न होतात. त्यांना अनाहत नाद किंवा अनामाहात (आघाताशिवाय) नाद म्हणतात. किंणी, चिंचणी, घंटानाद, वीणारव, टाळ, मृदंग, भेरी, शंख, मेघ, मुरली असे दहा प्रकारचे आवाज ऐकू येतात. हे चक्र छातीच्या पाचव्या व सहाव्या वक्षकशेरूकांच्या समोर असते. हे हृदयाच्या पश्चिम बाजूस असते. याला बारा दले असतात.




(१) Right deep Cardiac – कंठनाडीच्या विभाजनासमोर व तोरणी महाधमनीच्या मागे हे आहे. याचे तंतू दक्षिण फुप्फुस व हृदयाच्या ठिकाणी अलिंद यांना जातात.

(२) Left deep cardiac – हे हृदयाच्या पश्चिमेस असून याचे तंतू वाम आलिंदाला जातात.

(३) Anterior plumonary – फुप्फुसे व फुप्फुसावरण यांना तंतू गेले आहेत.

(४) Superficial Cardiac – महाधमनी तोरणीच्या अधोभागी हे असून हृद्‌कोषाला याचे तंतू गेले आहेत.

(५) Post plumonary – फुप्फुसावरण व फुप्फुसे यांना तंतू गेले आहेत.

(६) Cardiac gaglian of wrisberg – हे चौथ्याच्या (वरील) शेजारी असते.

(७) Right coronary – हे दक्षिण हार्दिक धमनीभोवती असते.

(८) Ventricular – हृदयाच्या निलयांना याचे तंतू जातात.

(९) Left coronary – हे वाम हार्दिक धमनीभोवती पूर्वेस आहे.

(१०) Endocardiac – हृदयाच्या अन्तरावरणास याचे तंतू जातात.

(११) Remark – हृदयाच्या भिंतीत हे आहे. हे मंदगती असते (Myocardiac).

(१२) Bidder's Ganglia – हृद्पेशींना याचे तंतू जातात. हे जलदगती असते.

अनाहत चक्राचे तंतू प्राणदा नाडीच्या तंतू बरोबर सर्वतः पसरलेले आहेत. या दलात कं, खं, गं, घं, ङं, चं, छं, जं, झं, ञं, टं, ठं हे बारा वर्ण वास करतात. येथे प्राणवायूचे वास्तव्य आहे. श्वसन व हृदय यांच्या क्रियांवर या चक्राचे नियंत्रण असते. मनाचे वास्तव्य याच्या शेजारीच असते. मणिपूर चक्रापासून प्राण वर येतो. तेव्हा प्राण व मन हे दोन वेगळे दिसतात. म्हणून त्यांचा येथे विरोध करून लय करावा. असे योगशास्त्रात सांगितले आहे.

*'तावदेव निरोद्धव्यं यावत् हृदि गतक्षयम् ।*
*एतत् ज्ञानं च ध्यानं च शेषोन्यायश्च विस्तरः ॥'*

*(अमृतबिंदू, मैत्रायणी.)*

म्हणजे हृदयस्थ आत्म्याच्या ठिकाणी संपूर्ण लय होईपर्यंत मनाचा रोध करावा हेच ज्ञान, हाच मोक्ष, बाकी सर्व ग्रंथ विस्तार होय. उपवायूंपैकी देवदत्त वायू येथे असतो. त्याची कार्ये जांभई येणे, निद्रा येणे ही होत. पश्यन्ति वाणीचे हे आश्रयस्थान आहे. त्यामुळे मनातील विचार स्पष्ट व्यक्त होतात. येथे महेश वास करतो. याचा शुक्लवर्ण आहे. शुक्रवारची कल्पना येथे केली आहे. येथे पद्मिनी, संदर्भा, रतिप्रिया, वैजयंती, सौभद्रा, अत्रिभार्या, कुहवासिनी, धोकिनी, रेखा, श्रिया, तरंगिणी, व तारा या बारा शक्ती येथे वास करता.

५) विशुद्ध चक्र – (Cervical carotid plexus)

'कंठ प्रदेशे' - कंठाजवळ हे चक्र आहे.

*'कंठकूपे विशुद्धाख्यं यच्चक्रं षोडशारकम् ।*
*पीठं जालंधर नाम तिष्ठत्यत्र सुरेश्वरः ॥'*

*(योगाशिखोपनिषत्.)*




मणिपूर व अनाहत चक्राचे भेदन करून प्राण कंठाच्या ठिकाणी या चक्रावर येतो. तेथून आज्ञाचक्रावर जाऊन शेवटी सहस्रदल कमलात जातो. विशुद्ध चक्रावरून आज्ञाचक्रावर प्राण नेण्यास हटयोग व राजयोग यांत भिन्न मार्ग सांगितले आहेत. राजयोगात कंठकूपापासून पूर्व बाजूने सरळ भ्रूमध्याच्या ठिकाणी प्राण जातो. पण हटयोगाचा अभ्यास करणाऱ्यांमध्ये तो पश्चिम बाजूने श्रीहट, गोल्हाट, वेणूगुंफा या मार्गाने आज्ञाचक्रावर आणता येतो. म्हणून विशुद्ध चक्रापासून प्राणाची गती भिन्न होते. आज्ञाचक्रापासून तर तो सहस्रदल कमलात प्रवेश करतो. याचा ताबा कंठातील रक्तवाहिन्या व मातृका, धमनी, कंठनाडी, अन्ननलिका, मुख, जिव्हा, दात, तालू, डोळे, अवटुक, ग्रंथी, ग्रसनिका, या महत्त्वाच्या अवयवांवर चालतो. तसेच यातून फुप्फुस व घसा यांनाही तंतू गेले आहेत.

या चक्राचा वर्ण (धूसर) धूम्रवर्ण आहे. यात सोळा दले आहेत. त्यात अं, आं, इं, ईं, उं, ऊं, ऋं, ॠं, लृं, ॡं, एं, ऐं, ओं, औं, अं, अः हे सोळा वर्ण आहेत. या चक्राचे ठिकाणी प्राण दोन घटिका सेहेचाळीस पळापर्यंत नित्य वास करतो. हे उदान वायूचे स्थान आहे.

बोलणे, इच्छा, उत्साह, बल, वर्ण व स्मृती या क्रिया तो करतो. उपवायूंपैकी कूर्मवायू येथे राहतो. त्यामुळे पापण्यांची उघडझाप होते. मध्यमावाणी येथे असते. तसेच त्याच्या दलात सर्वतोभद्रा, प्राणधारिणी, सप्तद्योतिणी, ब्रह्मायणी, शबीर, लोहिता, यक्षिणी, सौभाग्यदायिका, भानुमती, मदालसा, शिखरिणी, छाया, विष्णुप्रिया, विखोदरा, माया व चित्रघंटा या शक्ती राहतात. कंठातील शिरा, धमन्या, घशातील सप्तम, श्वासनलिका, अवटुक, बालग्रवेयक यांच्यावर याचा ताबा असतो. याची सोळा दले पुढीलप्रमाणे असतात.

अ) Superior cervical – हे ऊर्ध्व बाजूस असून याचे तंतू ब्रह्मरंध्रातून मस्तिष्कापर्यंत गेले आहेत.

आ) Carotid – हे अंतर्मातृका धमनीचे भोवताली असून याचे तंतू, नेत्र, नासा, जिव्हा व धमनी बरोबरच मस्तिष्क गुहेकडे व मस्तिष्कावरणाला जातात.

इ) Cavernouss plexus – यापासून मुख, दंत, नेत्र, नासा, कर्ण या अवयवांना तंतू जातात.

ई) Interior and Exterianal carebral plexus – याचे तंतू मस्तिष्कीय नाड्या व विशेषत: प्राणदा नाडीला जातात.

उ) Pharygeal – ग्रसनिका (सप्तपथ) कडे याचे तंतू जातात.

ऊ) Laryngeal – स्वरयंत्र व श्वासनलिका यांकडे यांचे तंतू जातात.

ऋ) Superficial Cardiac – हे बहिर्मातृका धमनीचे पश्चिम बाजूस असून हृदय व श्वासनलिका यांना याचे तंतू जातात.

ॠ) External carotid – हे बहिर्मातृका धमनीभोवती असून, धमनी, मुख, कर्ण व मस्तिष्क मातृका धमनी या स्थानांना याचे तंतू जातात.

ऌ) Superior, Inferior, middle cervical – यापासून या चक्राच्या ऊर्ध्व व अध: दलाला तंतू जातात.

ॡ) External midalle cervical – हे अत्यंत सूक्ष्म आहे. धमनीला याचे तंतू जातात.

ए) Thyreoid – अवटूक (ग्रैवक) ग्रंथीला याचे तंतू जातात.

ऐ) Middle cardiac – हृदयाकडे याचे तंतू जातात.

ओ) Superior or Inferior cervical – हे प्रथम पर्शुकाच्या पातळीत प्रथम वक्षकशेरुका समोर आहे. इतर दलांना येथून तंतू जातात.

औ) Sybclavian – हे अक्षकाधरा धमनीच्या उगमाजवळ असून त्या रोहिणीला येथून तंतू जातात.

अं) Inferior cardiac – हृदय व श्वासनलिकेला याचे तंतू जातात.

अः) Vertebral – कशेरुकांना जाणाऱ्या धमनीला याचे तंतू जातात. या चक्राच्या दलातील तीन स्तर आहेत. त्यातील बाह्य बाजूची दले मोठी आहेत व आतील दले लहान असून सूक्ष्म आहेत.

६) आज्ञाचक्र – (Cavernous plexus, optic Thalamus) दोन्ही भुवयांमध्ये पूर्व बाजूच्या मागे मस्तिष्कामध्ये असते.



*‘आज्ञानाम् भ्रुवोर्मध्ये द्विदलं चक्रमुत्तमम् ।’*

*(योगशिखोपनिषत्)*

यालाच ‘अग्निचक्र’ म्हणतात. हे मस्तिष्कात पूर्व बाजूस आहे.

*‘आज्ञाचक्रं च मस्तकम् । योग कुंडल्युपनिषत् ।*
*नादरूपं भ्रुवोर्मध्ये मनसा मंडलं विदुः ।’*

*(योगशिखोपनिषत्)*

याचे काही तंतू नेत्राच्या ज्ञाननाडीकडे (दृष्टीनाडी) गेलेले आहेत. मस्तिष्काच्या दोन्ही अर्धगोलांच्या मध्यावर दोन लांबट आकाराचे कंद आहेत. त्यांना आज्ञाकंद (Optic Thalamus) म्हणतात. हीच आज्ञाचक्राची दोन दले आहेत. या दोहोच्यांमध्ये तृतीय गुहा (Third Ventricle) असते. या दोन्हीत धूसर वस्तू (Gray matter) असते व भोवती श्वेतवस्तूचे पातळ आवरण असते. या दोन्ही दलांचे पार्श्व (बाह्य) बाजूस मस्तिष्कातील पोकळी असते. तिला पार्श्व गुहा म्हणतात. (Lateral Ventricle.) हे कंद म्हणजे शरीर व्यापारातील सर्व क्रियांची व संवेदनांची केंद्रेच आहेत. आज्ञा व संज्ञा यांच्या मार्फतच जातात म्हणून आज्ञाचक्रावर नियंत्रण ठेवता आल्यास सर्व शरीरावरच आपल्याला ताबा ठेवता येतो व सर्व क्रियांकडून लक्ष काढून ते एकाग्र होते व मनोलय होतो. त्याचबरोबर प्राणाचाही लय होतो व स्वस्वरूपाचे ज्ञान होते.

*‘योगः चित्तवृत्तिनिरोधः ।’*

*(पातंजल योगसूत्र)*

मनाच्या सर्व व्यापारांचा लय होतो. व मन एकाग्र होणे म्हणजेच योग होय.

*‘भ्रूमध्ये द्विदलं तथा ।’*

*(योगचूडामण्युपनिषत्)*

याच्या दोन दलांत ‘हं’ व ‘क्षं’ हे वर्ण (बीजे) आहेत.

प्राण या ठिकाणी नित्य दोन घटका सत्तेचाळीस पळेपर्यंत वास्तव्य करतो. यात महाकाली व महालक्ष्मी या शक्ती असतात. त्यामुळे सहजानंद व नित्यानंद प्राप्त होतो.



आत्मा हे या चक्राचे दैवत आहे. येथे रविवार या वाराची कल्पना केली आहे. हे तुर्या नावाच्या चौथ्या अवस्थेचे स्थान आहे.

ही चक्रे शव विच्छेदनामध्ये प्रत्यक्ष व स्पष्ट दिसत नाहीत. पण साधकाच्या साधनेमुळे जागृत होऊन उत्तेजित होतात व कार्यप्रवण होतात हे निश्चित होय आणि हाच सर्व योग्यांचा व संतांचा अनुभव आहे.

| क्रम | चक्रांचे नाव | स्थान | अवयव | दले | शक्ती | मुख्य वायू | उपवायू | अधिष्ठान | वार | रंग | वाणीचे स्थान |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | मूलाधार | गुद व शिस्न यामध्ये | गुद, बस्ती, योनी गर्भाशय | व, श, ष, स | गुप्ता, प्रासका, कराळा, विकराळा | अपान | नाग | गजानन | मंगळवार | आरक्त | – |
| २ | स्वाधिष्ठान | उपस्थ इंद्रियाच्या पातळीत | आंभ मलाशय वृषण | ब, भ, म, य, र, ल | अव्यंगता, शारदा, वाणी, पूर्णा, अमृता, रोहिणी | व्यान | धनंजय | ब्रह्मा | बुधवार | पिवळा | – |
| ३ | मणिपूर | नाभीच्या मुळाशी | प्लीहा, यकृत, आमाशय, पक्वाशय वृक्क | ड, ढ, ण, त, थ, द, ध, न, प, फ | सर्वगा, सोमा, यामा, भद्रा, तक्षिर्णी, सौंदर्या, शांतमुद्रा, विशाखा, दर्पिणी, रुचिरा | समान | कृकल | विष्णु | गुरुवार | निळा | परा वाणी |
| ४ | अनाहत | हृदयाच्या ठिकाणी | हृदय, फुफ्फुस | क, ख, ग, घ, ङ, च, छ, ज, झ, ञ, ढ, ठ | पद्मिर्णी, संदर्भा, रतिप्रिया, वैजयंती, सौभद्रा, अत्रीमाया, कुहवासिनी, धोर्किनी, रेखा, श्रिया, तारा, तरंगिणी | प्राण | देवदत्त | महेश | शुक्रवार | शुक्ल | पश्यंती वाणी |
| ५ | विशुद्ध | कंठ प्रदेश | कंठातील रक्तवाहिन्या, अन्ननलिका, मुख, दात, जिव्हा, डोळे, अवयव ग्रंथी, ग्रसनिका | अ, आ, इ, ई, उ, ऊ, ऋ, ॠ, लृ, ॡ, ए, ऐ, ओ, औ, अं, अः | सर्वतोभद्रा, प्राणधारिणी, सप्तद्योतिणी, ब्रह्मायणी, शर्वीर, लोहिता, यक्षिणी, सौभाग्यदायिका, भानुमती, मदालसा, शिखरिणी, छाया, विष्णुप्रिया, विश्वोदरा, माया, चित्रघंटा | उदान | कूर्म | जीवात्मा | शनिवार | धूसर | मध्यमा वाणी |
| ६ | आज्ञा | दोनभुवयांमध्ये | नेत्र, मस्तक | ह, क्ष | महाकाली, महालक्ष्मी | प्राण | – | आत्मा | रविवार | पांढरा | – |

## कुंडलिनी

शरीरातील मेरुदंडाच्या मधून इडा, पिंगला व सुषुम्ना नाड्या गेल्या आहेत. त्या नाड्यांच्या भोवती गुदापासून ते मस्तकार्यंत एकूण सहा चक्रे आहेत. त्यांना खालपासून वरपर्यंत मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, विशुद्ध, अनाहत व आज्ञा अशी नावे आहेत. ही चक्रे म्हणजे या तीन नाड्यांच्या केंद्रापासून शरीरातील वेगवेगळ्या अवयवांना गेलेल्या छोट्या नाड्या म्हणजेच रक्तवाहिन्या आहेत. त्यांचे जे केंद्रीकरण जाळे वा वीण तयार होते ती या सहा ठिकाणी होते. व तेथे ती चक्राच्या स्वरूपात तयार झालेली असते. या छोट्या नाड्यांमधूनच त्या त्या अवयवांना रक्तपुरवठा होतो. त्यांना उत्तेजित करणारे स्राव मिळतात व शांत करणारे स्रावही मिळतात. इडा ही सूर्यनाडी असून उजव्या नाकपुडीद्वारे कार्य करते. तर पिंगला ही चंद्रनाडी असून डाव्या नाकपुडीद्वारे कार्य करते. सुषुम्ना ही नाडी दोन्ही म्हणेज इडा व पिंगला यांच्या मधोमध असते. इडा व पिंगला यांच्यामधून वायूचे वहन होत असते. इडा नाडीची प्रवृत्तीपर धारणा आहे, तर पिंगला नाडीची निवृत्तीपर धारणा आहे. सुषुम्ना नाडी ही प्रवृत्ती, निवृत्ती या दोन्हींचा समतोल राखणारी आहे. प्रवृत्ती व निवृत्ती या धारणा विकारवशता दर्शवणाऱ्या आहेत. कुंडलिनी जेव्हा जागृत होऊन सुषुम्नेमधून प्रवास करू लागते तेव्हा प्रवृत्ती व निवृत्ती या धारणांचा समतोल राखला जातो. म्हणजे ती अविकारी अशी अवस्था येते. वायूतत्त्वापासून मनाची निर्मिती असल्याने मनाचाही समतोल निर्माण होतो.

सर्वात खालच्या म्हणजे मूलाधार चक्रामध्ये कुंडलिनी नावाची एक विशेष शक्ती असते. ती प्रत्येक प्राणिमात्रात असते. प्राण्यांमध्ये म्हणजे मनुष्यतेवर प्राण्यांमध्ये शरीरातील मेरूदंड हा जमिनीला समांतर असतो. शिवाय त्या प्राण्यांना साधना करून कुंडलिनी जागृत होण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही. मनुष्यप्राण्याचा मेरूदंड हा जमिनीला काटकोनात असतो. व मनुष्यप्राणीच फक्त साधना करून कुंडलिनी जागृत करू शकतो. म्हणून येथे फक्त मनुष्यप्राण्यांचाच विचार केला आहे. असो. ही कुंडलिनी अधोमुख असून तिचे वर्णन ज्ञानेश्वरीमध्ये असे आले आहे. 'नागिणीचे पिले। कुंकुमे नाहले। वळण घेऊन आले। सेजे जैसे ॥ तैसी ते कुंडलिनी। मोटकी औट वळणी। अधोमुख सर्पिणी। निदेली असे॥ विद्युलतेची विडी। वन्हीज्वाळांची घडी। पंधरेयाची चोखडी। घोटीव जैशी ॥ तेथ नक्षत्र जैसे उलंडले। की सूर्याचे आसन मोडले। तेजाचे बीज विरूढले। अंकुरेशी ॥' (६. २२२ ते २२६ ज्ञानेश्वरी).

ही कुंडलिनी सुषुम्नेच्या तोंडाशी बसलेली असते. तिने सुषुम्नेचे तोंड बंद केलेले असते. सुषुन्मेचे पूर्वमार्ग म्हणजे छातीकडील व पश्चिममार्ग म्हणजे पाठीकडील बाजूकडून असे दोन मार्ग गेलेले असतात. त्यांतील मागील मार्ग म्हणजे पश्चिम मार्ग कुंडलिनीने रोखून धरलेला असतो. पूर्वेकडील मार्ग मोकळा असून सर्वसामान्यपणे प्राणवायूचा संचार त्यातून होत असतो. त्याद्वारे सर्वसामान्य जीवनाला लागणारी शक्ती मिळून प्राण्यांचे जीवनकार्य चालू असते. कुंडलिनी शक्ती जेव्हा जागृत होते व सुषुम्ना नाडीच्या अधोमुखातून प्रवास करीत करीत या षड्चक्रांमधून प्रवास करू लागते. ती पूर्वभागातून वा पश्चिम मार्गातूनही प्रवास करू लागते. सर्वसाधारणपणे विशुद्ध चक्रापर्यंतचा दोन्ही मार्गांचा प्रवास सारखाच असतो. विशुद्ध चक्रापासून हे दोन्ही मार्ग भिन्न होतात. पूर्वमार्ग सरळ आज्ञाचक्रापासून सहस्त्रदल चक्राकडे जातो तर नाथ संप्रदायाप्रमाणे पश्चिममार्ग श्रीहरचक्र (ओठावर), गोल्हाटचक्र (कानाजवळ) त्रिकूटचक्र (दोन भुवयांच्या मध्ये मागील बाजूस) औटपीठचक्र (सहस्त्रदलाच्या आधी) आज्ञा चक्र व शेवटी सहस्त्रदल चक्र अशा मार्गाने कुंडलिनी प्रवास करते. अशा या चक्रांमधून प्रवास करीत असताना त्या चक्रामधील सर्व नाड्यांमधून विशेष शक्ती जागृत होते. या विशेष शक्तीच्या साह्याने शरीरांतर्गत विशेष कार्य होत असते. ही कुंडलिनी शक्ती दोन प्रकारांनी जागृत होते. एक स्वाभाविकपणे व दुसरा प्रकार म्हणजे शक्तिपात पद्धतीने मुद्दाम जागृत केली जाते. कुंडलिनी जागृत होण्याच्या वा करण्याच्या प्रकारालाच योग असे म्हणतात. या योगाभ्यासाचा सविस्तर खुलासा पतंजल योगसूत्रात विशेष करून दिला आहे.

योगाभ्यासाचा क्रम म्हणजे यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी असा अष्टांग पद्धतीचा आहे. या योगाभ्यासाने शरीरशुद्धी, कर्मशुद्धी, मनशुद्धी, विचारशुद्धी, बुद्धिशुद्धी, चित्तशुद्धी अशा चढत्या क्रमाने ज्या वेळी पूर्ण शुद्धी होईल. त्याच वेळी कुंडलिनी जागृतीची शक्यता असते. आणि म्हणून या शुद्धीसाठी ही साधना सांगितली आहे. यम पाच प्रकारचे आहेत. १) अहिंसा, २) सत्य, ३) अस्तेय (चोरी न करणे), ४) ब्रह्मचर्य, ५) अपरिग्रह (कोणत्याही गोष्टीचा संग्रह न करणे). तसेच नियमही पाच आहेत. १) शौच (शुद्धता), २) संतोष, ३) तपस, ४) स्वाध्याय (वेदाध्ययन), ५) ईश्वरप्रणिधान (ईश्वरशरणता). या यम-नियमांचे पालन केल्याशिवाय पुढील साधना फळ देत नाही. आसन म्हणजे एका ठिकाणी सहजासन, वज्रासन, पद्मासन, सिद्धासन यांपैकी कोणतेही एक आसन घालून कमीतकमी तीस मिनिटे बिलकुल हालचाल न करता स्वस्थ बसणे. याला आसनसिद्धी

म्हणतात. अशी आसनसिद्धी झाली म्हणजे रोज ही बैठक करावी. शिवाय बैठकीचा काळही हळूहळू वाढवावा. त्यानंतर प्राणायाम. प्राणायाम म्हणजे श्वासोच्छ्वासावर नियंत्रण. प्राणायामामध्ये श्वास आत घेणे-'पूरक'. श्वास काही काळ आत दाबून ठेवणे- 'कुंभक'. नंतर हळूहळू बाहेर सोडणे- 'रेचक', व पुन्हा थोडा वेळ श्वास न घेता थांबणे- 'कुंभक'. पहिला अंतर्कुंभक व दुसरा बहिर्कुंभक होय. अशा क्रमाने श्वासोच्छ्वास करीत गेल्यास प्राणावर जय प्राप्त होतो. नामजप, मंत्रजप हेही या श्वासोच्छ्वासावर बसवतात. म्हणजे नामाला, मंत्राला एक लयबद्धता येते व ते नाम, मंत्र, लवकर सिद्ध होतात. म्हणून सर्व साधनेमध्ये आसन व प्राणायाम यांना फार महत्त्व आहे. प्रत्याहार म्हणजे इंद्रियांना व मनाला विषयांपासून दूर ठेवणे. यापुढील साधना म्हणजे ध्यान. मन हे अतिशय चंचल आहे. तेव्हा मनाला गुंतवून ठेवणे महत्त्वाचे आहे. यामध्ये मनाला जर काही आलंबन दिले नाही, तर मन स्थिर होणार नाही. म्हणून नाम-जप, मंत्र-जप, देवाच्या मूर्तीकडे पाहणे, त्राटक, दिव्याच्या ज्योतीकडे पाहणे, भजन, कीर्तन, चिंतन, मनन वगैरे काही उपाय आहेत. की जेणे करून मन गुंतून राहील. अशा प्रकारची कोणती तरी साधना पक्की करणे म्हणजे हळूहळू धारणा पक्की होत जाते आणि अशी धारणा पक्की झाली व ध्यानाचा कालावधी वाढत गेला की कालांतराने समाधीचा अनुभव येऊ लागतो. आपण करीत असलेल्या साधनेमध्ये मनाचा लय होतो व सर्व प्रक्रिया काही काळ स्तब्ध होतात. समाधी म्हणजे समतोलपणा. मन कोणत्याही विषयात दोलायमान होत नाही, अशी अवस्था. मनामध्ये विकार उत्पन्न होत नाही अशी शांत अवस्था. मनाचे अवधान कोणत्याही एका गोष्टीकडे झुकलेले नसते. मनाचे अवधान समतोल असणे यालाच समाधी म्हणतात. हीच मनाची उन्मनी अवस्था होय, समाधी होय.

समाधीची ही प्राथमिक अवस्था होय. जसा जसा समाधीचा काल वाढत जाईल तसे तसे बैठकीच्या उबेने कुंडलिनी शक्ती आपोआप जागृत होईल व ती ऊर्ध्व गतीने प्रवास सुरू करेल. या कुंडलिनीच्या ऊर्ध्व गतीच्या प्रवासाने शरीरांतर्गत काही गोष्टी घडत असतात. त्या इतक्या स्वाभाविकपणे घडत असतात की त्याची साधकाला कल्पनाच येत नाही. षड्चक्रभेदन, पंचकोशशुद्धी या गोष्टी पुढे काही पानांत वर्णन केल्या असल्या व समाधीचे वर्णन जरी अगदी संक्षिप्त स्वरूपात आहे असे वाटत असले तरी त्या गोष्टी घडण्याला, साधकाच्या निष्ठेने व सातत्याने साधना करणाऱ्यावर अवलंबून आहे. याला एक किंवा अनेक जन्म लागतात. तेव्हा समाधीचे वर्णन, पंशकोशशुद्धी ही माहिती पुढे क्रमानेच देत आहे. षड्चक्रभेदन ही माहिती आधीच

आली आहे. या पद्धतीची प्रक्रिया अर्थात क्रमाने न होता एकाच वेळी हळूहळू होत जाते, हे लक्षात ठेवले पाहिजे. त्यापासून प्राप्त होणारे व येणारे अनुभवही हळूहळू होत जातात.

षड्‌चक्रांचे वर्णन वर आलेलेच आहे. आता समाधीचे वर्णन पाहू.

### समाधी

परमेश्वरप्राप्तीच्या साधनेच्या चढत्या पायऱ्यांमध्ये ध्यान, धारणा, समाधी, असा क्रम आहे. ध्यानधारणेचा पूर्ण अभ्यास झाला की समाधीची अवस्था येऊ लागते. संत ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीतील सहाव्या अध्यायात समाधीला बसण्याविषयीचे अगदी बारकाईने वर्णन केले आहे. अर्थात बारकावा जेव्हा सांभाळला जाईल तेव्हा समाधीची बैठक बरोबर होईल व खऱ्या समाधिसुखाचा आनंद घेता येईल. संत ज्ञानदेवांनी जरी अतिबारकाव्याने वर्णन केले असले तरी ते सर्व अगदी आवश्यकच आहे. त्यामुळे त्याचा विचार करता करता त्यामध्ये शारीरिक प्रक्रियेचे वर्णन आहे ते; विज्ञानाच्या दृष्टीनेसुद्धा किती बरोबर आहे याचा विचार येथे केला आहे. यातील ओव्या वाचल्या म्हणजे आध्यात्मिक ज्ञानामध्ये शरीर विज्ञानाचाही किती असखोल अभ्यास केला गेला होता ते कळते.

*शुचौ देशे प्रतिष्ठाप्य स्थिरमासनमात्मन: ।*
*नात्युच्छ्रितं नातिनीचं चैलाजिनकुशोत्तरम्॥*

*(६.११ भ. गी.)*

प्रथमत: स्थलाविषयी वर्णन करताना समाधिस्थान हे शुद्ध प्रदेशात म्हणजे अरण्यात, एकांत स्थळी, ज्या ठिकाणी मनुष्यांची, प्राण्यांची ये-जा नाही अशा ठिकाणी असावे. साधकाला पाणी व फळे याचा आहार बारमाही तेथेच उपलब्ध असावा. म्हणजे त्यासाठी बाहेरील संसारी जगात त्याला ये-जा करावी लागणार नाही. जनसंपर्क टाळण्यामागचा एकच उद्देश असतो. मनाला विषयांपासून, वैचारिक प्रदूषणापासून, प्रक्षोभक वातावरणापासून व मोहाच्या प्रसंगापासून दूर राखणे, मनाला शांत करणे व ईश्वरी चिंतनाकडे वळवणे हा खरा समाधीचा मुख्य उद्देश असतो. त्याच उद्देशाला संसारातील संपर्कामुळे धक्का बसतो. म्हणून एकांतवासात साधना करणे व मनाचा समतोल राखणे करावे लागते. संत ज्ञानदेव वर्णन करताना म्हणतात की, अशा एकांतस्थळी आसन घालावे. आसन कसे असावे? तर अतिशय कोमल

अशा कुशांकुरांचे. भूमीचा उंचसखलपणा घालवण्यासाठी कोमल कुशांकुर पसरावेत. त्यावर धूतवस्त्राची घडी घालावी व वर हरीणाजिन किंवा मृगचर्म. कुंशाकुरांचा थर केवळ भूमीचा उंचसखलपणा नाहीसा व्हावा एवढाच जाड असावा. थर पातळ झाला तर भूमीचा उंचसखलपणा मांडीला जाणवेल. पायाला एकाच ठिकाणी जादा दाब पडून रग लागेल किंवा थर जादा जाड झाला तर शरीराच्या दाबाने कुशांकुर पूर्ण दबले न जाता त्यांच्यामध्ये पोकळपणा राहील व शरीर हलत राहील व समाधी नीट लागणार नाही. अशा आसनावर सद्गुरूच्या मार्गदर्शनाखाली त्यांना वंदन करून त्यांचे स्मरण करत बसावे. नंतर त्यांनी दिलेल्या मंत्राचा जप करावा.

हा अभ्यास किती काळ, दिवस, महिने, वर्षं चालू ठेवावा, तर जोपर्यंत मनाची धारणा सबाह्य सात्त्विक वृत्तीची होत नाही, अहंभावाचे कठीणपण विरत नाही, मनाला विषयांचा विसर पडत नाही, इंद्रियांची विषयोपभोगाची खुमखुमी, आसक्ती, नाहीशी होत नाही आणि मग मन आतल्या बाजूलाच मुरडून हृदयात शांत होत नाही तोपर्यंत हा अभ्यास चालू ठेवावा, ठेवणे भाग आहे. प्रथमत: मन शांत होण्यास काही घटकांचा अवधी लागत असेल, तर हा अभ्यास जसा जसा होत जाईल तसे तसे हा वेळ कमी कमी होत जाईल व अशी एक वेळ येईल की बसताक्षणीच मन शांत होईल आणि गाढ समाधीचा अनुभव येऊ लागेल. अशा वेळी सद्गुरूच्या मार्गदर्शनाखाली योगमुद्रेचा अभ्यास करावा. एका विशिष्ट पद्धतीचे आसन घालून बसावे. उजव्या पायाच्या टाचेने मूळबंधापाशी दाब देऊन बसल्याने शरीराचा भाग त्या केंद्रावर तोलला जाईल. यामुळे अपान वायूचा अधोमार्ग बंद होऊन तो परत माघारा वळू लागेल. हात द्रोणाकार होऊन डाव्या पावलावर टेकतात. मान ताठ, डोळ्याची पाती आपोआप मिटली जातात. आणि खालची विकास पावतात. म्हणजे डोळे थोडे उघडे राहतात आणि त्यातून जी दृष्टी बाहेर पडते ती नेमकी नाकाच्या शेंड्यावरच स्थिर होते. याच अवस्थेत जालंदर व नंतर वोढीयाणा बंध होतो. अशा समाधी अवस्थेत मनाचा लय होतो. कल्पना लुळी पडते, प्रवृत्ती शांत होते आणि मन, शरीर, भावना, प्रक्रिया जाणत नाहीसे होते. जेथे मन नाही तेथे शरीरव्यापाराची दखल तरी कोण घेणार? भूक, तहान, झोप यांची शुद्ध नाहीशी होते.

'मूळबंध', 'वज्रासन'बंध यांनी अपान वायूचा कोंडमारा होतो व त्याचा आवाज होऊ लागतो. त्यामुळे नाभिस्थानातील मणिपूरचक्राला धक्के बसू लागतात. अशा प्रकारे अपान वायूचा जोर वाढला की त्याला तेथल्या तिथे कोंडून राहणे शक्य होत नाही. तेव्हा तो कोठ्यामध्ये शिरून कफपित्ताचे रस सुकवून टाकतो. 'मग थावलिये

वाहुटळी। सैंघ घेऊनि घर डुहळी। बाळपणाची कुहीटुळी। बाहेर घाली॥' (६.२१६ ज्ञानेश्वरी) अपान वायूच्या जोराने शरीरात वादळ होते. ग्रीष्माचा वारा सुटून वावटळ उठावी व त्याने रानोमाळी असलेला पालापाचोळा उडवून सर्व रान स्वच्छ करावे तसे या अपान वायूच्या वादळाने बाळपणापासून म्हणजे जन्मोजन्मीच्या असलेल्या वासना, विकार, इच्छा, आकांक्षा, संकल्प वगैरेचा पालापाचोळा उडवून दिला जातो म्हणजे शरीराच्या बाहेर घालवला जातो व शरीर शुद्ध, स्वच्छ व पवित्र केले जाते. त्यानंतर शरीरातील सप्तधातूंचा ठणठणाट होतो. शरीरातील हाडांमधील मज्जाही ओरबडून काढल्या जातात. या सर्व वावटळीचा साधकाच्या शरीरावर तसेच मनावर परिणाम होतो. कोणत्यातरी व्याधी उत्पन्न झाल्यासारख्या वाटतात आणि तसे वाटता वाटताच त्यांचे शमनही झाल्यासारखे वाटते. साधकाच्या मनात भीती उत्पन्न होते व पुढच्याच क्षणी ती भीती नाहीशी होते. या काळात साधकाच्या शरीरातील पंचभूतांपैकी पृथ्वी व आप तत्त्वांची हळूहळू आटणी होऊ लागते. पृथ्वीतत्त्व आपात व आपतत्त्व तेजात विरून जाण्याची प्रक्रिया सुरू होते. इकडे समाधीच्या बैठकीचा कालावधी वाढत जातो. त्यामुळे मूळबंधाला उबारा लागतो आणि त्या उबेनेच कुंडलिनी शक्ती जागृत होते. संत ज्ञानदेवांनी त्या कुंडलिनी शक्तीचे केलेले वर्णन मुळातून वाचण्यासारखे आहे. ते म्हणतात 'नागिणीचे पिले। कुंकूमे नाहले। वळण घेऊन आले। सेजे जैसे॥ तैसी ते कुंडलिनी। मोटकी औट वळणी। अधोमुख सर्पिणी। निदेली असे॥ विद्युल्लतेची विडी। वन्हिज्वाळांची घडी। पंधरेयाची चोखडी। घोटीव जैसी॥' (६.२२२ ते २२४ ज्ञानेश्वरी).

नागिणीचे पिलू. कुंकवामध्ये न्हाऊन निघाल्याप्रमाणे लालबुंद, साडेतीन पेऱ्याच्या लांबीचे, वेटोळे घालून व खाली तोंड घालून झोपण्याच्या अवस्थेत असावे असे. तिचे रूप कसे? तर ती विद्युल्लतेची जणू सुरळीच, किंवा वन्हीची ज्वाळा जशी गोलाकार होऊन आकाशात विरून जाते तशी, किंवा सोनाराने शुद्ध सोन्याची लगड गोलाकार करून त्याची घोटीव सळई बनवून तिला बोटात घालण्यासाठी साडेतीन वेढ्याचे वेटोळे बनवलेले असावे तशी. अशी सुटसुटीत आकाराची, सुडौल, सुरेख, चमकदार, चकचकीत कुंडलिनी आसनाच्या उबाऱ्याने सावध होते आणि मग ती आळोखेपिळोखे देत कशी उठते? तर जणू एखादे तेजाचे बीजच रुजून त्यातून कोंब बाहेर पडावा, एखादा तारा तुटून पडावा, किंवा सूर्यामधून एखादी शलाका बाहेर पडावी असे भासे. लहान मूल झोपेतून उठल्यावर भूक लागली म्हणून दुधासाठी धडपड करते. तशी दीर्घ कालाच्या साधनेमुळे सावध झालेली कुंडलिनी शक्ती अशीच

भूक लागली म्हणून शरीरात आहाराचा शोध घेऊ लागते. ती तोंड पसरून शरीरातील मांसल भाग (चरबी) खाऊन टाकते. अपानवायू जो इकडे तिकडे संचार करीत असतो, त्याचा पूर्णपणे एकच घोट करून टाकते. हातांपायांतील मांसल भागाचेही ती सेवन करून टाकते. रक्ताभिसरणाचा वेगही खूप मंदावतो आणि शरीराची कातडी सुकून जातात. रोम करपून जातात. नखांतील सत्त्व निघून जाते व ती सुकतात. हाडांच्या नळ्याही ओरपून कोरड्या केल्या जातात. शरीरातील मेद सुकून जातो. उन्हाळ्यात जशी माळराने भकास, रखरखीत दिसतात तशी शरीराची अवस्था होते. एवढेच काय पण श्वासोच्छ्वासही मंद होतो. तो किती मंद होतो याचे वर्णन संत ज्ञानदेवांनी केले आहे. 'नासा पुटौनि वारा। जो जातसे अंगुळे बारा। तो गच्च धरून माघारा। आतु घाली॥' (६.२३६ ज्ञानेश्वरी).

देवगड आंब्याचे एक वैशिष्ट्य आहे. असे म्हणतात की तो आंबा कधी नासत नाही. त्याचा रस आळत जाऊन सुकतो. नासण्याची प्रक्रिया ही तेव्हाच घडते, जेव्हा पदार्थात जलांश असतो. नासणे, बुरा येणे, कुजणे, विटणे या सर्व प्रक्रिया पदार्थातील जलांशामुळे घडतात. जेव्हा जलांश काढून टाकला जातो तेव्हा पदार्थ वरील प्रकाराने खराब होत नाही. जर उष्णतेने, बाष्पीभवनाने पाण्याचा अंश पूर्णपणे निघून जाईल तर पदार्थ कधीही खराब होत नाही. सुकी फळे, हे त्याचे एक उदाहरण आहे. तसा देवगड आंबा हा सुकत सुकत जातो. तसे साधकाने केलेल्या तपाने, साधनेने जी उष्णता निर्माण होते, त्यामुळे साधकाचे शरीर सुकत सुकत जाते, कारण कुंडलिनीच्या जागृतीमुळे शरीरातील पृथ्वी, आप या दोन्ही भुतांना तिने संपवलेले असते. दूध जरा जास्त झाले म्हणजे लहान मूल जसे थोड्या वेळाने उटकुळी टाकते, म्हणजे थोडेसे ओकते, त्याचप्रमाणे ही कुंडलिनी जागृत झाल्यावर शरीरातील दोन्ही भुतांना भक्षण करते व त्यामुळे तीही थोडे गरळ ओकते पण ते गरळ जणू अमृतच असते व त्यामुळे अशक्त, कमजोर झालेला प्राण पुन्हा सशक्त होतो. त्यात नवचैतन्य निर्माण होते. सर्व शरीरात थंडाई उत्पन्न होते. दशवायूंपैकी फक्त प्राण हा एकच वायू शिल्लक राहतो. (१) 'पंचप्राण' नाभीपासून हृदयापर्यंत शरीरात संचार करणारा, ॐकाराची वृद्धी करणारा, हृदयस्थ = प्राण. २) गुदद्वाराने जाणारा- गुदस्थ = अपान. ३) सर्व शरीरास व्यापून असणारा - शरीरस्थ =व्यान. ४) श्वासोच्छ्वास करतो. कंठस्थ = उदान. ५) खाल्लेल्या अन्नाचा रस सर्व शरीरात पसरवून संधीच्या ठिकाणी राहणारा - नाभिस्थ = समान. पाच उपप्राण- १) ढेकर = नाग. २) नेत्रस्फुरण = कूर्म. ३) शिंक = कृकर. ४) जांभई, उचकी = देवदत्त. ५) सर्व शरीरात व्यापून राहणारा = धनंजय.)

या वेळपर्यंत कुंडलिनी विशुद्ध चक्रामध्ये आलेली असते. हृदयाकाशात घुमणाऱ्या वायूमुळे वेगवेगळे नाद ऐकू येतात. ते नाद असे- चिंचणी, किंकणी, टाळ, मृदंग, भेरी, घंटा, शंख, वेणू, मेघ, मुरली, ॐ. हे नाद कोणत्याही आघाताशिवाय ऐकू येतात म्हणून त्यांना अनाहत नाद म्हणतात आणि याच काळात साधकाला सिद्धी प्राप्त होतात. संत ज्ञानदेव या सिद्धीचे वर्णन करतात. 'मग समुद्रापैलीकडील देखे। स्वर्गींचा आलोचु आइके। मनोगत ओळखे। मुंगियेचे ।। पवनाचा वारिका वळघे। चाले तरी उदकी पाऊल न लागे। येणे येणे प्रसंगे। येती बहुता सिद्धि ।। (६.२६९, २७० ज्ञानेश्वरी). ऐके शक्तिचे तेज जेंव्हा लोपे। तेथे देहाचे रूप हारपे। मग तो डोळ्यांमाजी लपे। जगाचिया ।। एऱ्हवी आदिलाचि ऐसे। सावयव तरी दिसे। परी वायूचे कां जैसे। वळिले होय ।। ना तरी कर्दळीचा गाभा। बुंथी सांडोनि उभा। कां अवयवचि नभा। उदयला तो ।। तैसे होय शरीर। ते ते म्हणिजे खेचर। हे पद होतां चमत्कार। पिंडजनी ।। देखे साधकु निघोनि जाये। मागां पाऊलांची वोळ राहे। तेच ठायी ठायी होये। अणिमादिका ।।' (६.२९३ ते २९७ ज्ञानेश्वरी).

सिद्धी म्हणजे ज्या ज्या चक्रातून कुंडलिनी जाते. त्या त्या शरीरातील अवयवांवर नियंत्रण येते. त्या ठिकाणी निर्माण होणारे रोग बरे करता येणे. काम, क्रोधादि विकारावर नियंत्रण येणे, तसेच पंचमहाभुतांवर नियंत्रण येणे, अशा सिद्धी प्राप्त होतात. 'पिंडी तेच ब्रह्मांडी' या नावाने पिंडा पिंडावर नियंत्रण येते तसेच ब्रह्मांडातील त्या त्या भुतांवर नियंत्रण येते. यावरून संतांनी केलेल्या चमत्काराचे रहस्य लक्षात येते. त्यांनी केलेल्या चमत्काराचे चमकारकत्व हे आपण त्या अवस्थेपर्यंत न गेल्यामुळे आपल्याला अद्‌भुत वाटते. खरे तर ते विज्ञानाधिष्ठित झालेले प्रयोगच असतात. असो.

शरीरातील दहा वायूंपैकी प्राणवायूच शिल्लक राहिलेला असतो. त्यामुळे शरीराची कार्यव्यवस्थाच पुष्कळशी मंदावलेली असते. फक्त मंद मंद असा श्वासोच्छ्वास चालू असतो. त्यामुळे इतर नऊ वायूंचा व त्यांच्या कार्याचा लोप झालेला असतो. प्राणवायू किती मंद चालू असतो, याचे संत ज्ञानदेवांनी वर्णन केले आहे. 'मग शशी आणि भानु। ऐसा कल्पिजे जो अनुमानु। तो वातीवरी पवनु। गिंवसिता न दिसे ।।' (६.२४५ ज्ञानेश्वरी). गाढ समाधीत असतानाचा प्राणवायू इतका मंद असतो की नाकाजवळ तेवती ज्योत धरली तरी ती हलत नाही. वरच्या बाजूला असलेले चंद्राच्या सतराव्या कलेचे अमृताचे तळे हळूहळू कलंडून वाकडे होते आणि ते कुंडलिनीच्या तोंडाला लागते. मग कुंडलिनीच्या नळीत तो अमृताचा रस भरला जातो. व सर्व शरीरात त्याचा संचार होतो आणि तेथल्या तेथे मुरून जातो. त्याने त्या सुकलेल्या शरीरात पुन्हा

नवचैतन्य निर्माण होते, नवे तेज भरू लागते. आणि रत्नबीजाला कोंब फुटावा तसे त्याचे शरीर तेजस्वी, प्रकाशमान होते. संत ज्ञानदेवांनी या तेजाचे सुरेख वर्णन केले आहे. ते त्यांच्याच शब्दांत पाहू. 'मग काश्मिरीचे स्वयंभ। कां रत्नबीजा निघाले कोंभ। अवयव कांतीची भांब। तैसी दिसे।। ना तरी संध्यारागींचे रंग। काढूनि वळिले ते आंग। कां अंतर्जोतीचे लिंग। निर्वाळिले।। कुंकूमाचे भरीव। सिद्धरसाचे वोतीव। मज पाहतां सावेव। शांतिचि ते।। ते आनंदचित्रीचे लेप। ना तरी महासुखाचे रूप। किं संतोष तरुचे रोप। थांवले जैसे।। तो कनक चंपकाचा कळा। की अमृताचा पुतळा। ना ना सासिंनला मळा। कोवळिकेचा।। हो कां जे शारदियेचेनि वोले। चंद्रबिंब पाल्हेले। कां तेजचि मूर्त बैसले। आसनावरी।।' (६.२५३ ते २५८ ज्ञानेश्वरी).

चंद्रामृताचे पान करून तेजस्वी झालेल्या शरीराला मग कृतांताचेही भय नसते. अशा शरीराला वयाची मर्यादा नसते. ते शरीर कायमच तरुण, तेजस्वी व सामर्थ्यवान असते. शरीराला तेजस्विता जशी येते, तसे शरीराचे रूपही बदलते. तारुण्याची सर्व लक्षणे शरीरावर दिसू लागतात. शरीर सोन्याप्रमाणे कांतिमान होते. तसेच वायूप्रमाणे हलकेही असते. ह्या अवस्थेपर्यंत कुंडलिनीने आज्ञाचक्रापर्यंत प्रवास केलेला असतो. आज्ञाचक्रापासून पूर्व मार्ग व पश्चिम मार्ग असे दोन मार्ग निघतात. सर्वसामान्य म्हणजेच राजयोगी पूर्व मार्गाने सहस्त्रदल चक्रामध्ये कुंडलिनीचा प्रवेश करवतात. तर हटयोगी, नाथपंथीय, हे पश्चिम मार्गाने कुंडलिनीला वळवून सहस्त्रदल चक्रामध्ये प्रवेश करवतात. तेव्हा तो साधकाचा सिद्ध होतो. त्याचा सहस्त्रदल चक्रापर्यंतचा प्रवास पूर्ण होतो. त्या वेळी तेथे फक्त प्राणवायूचेच अस्तित्व शिल्लक असते. आणि त्या सहस्त्रदल चक्रामध्ये जेव्हा कुंडलिनी प्रवेश करते. त्या वेळी तेथील चैतन्याला तेजाचे भोजन घालते. म्हणजे या अवस्थेत तेजतत्त्वाचाही लोप होतो व केवळ वायूचेच अस्तित्व त्या महदाकाशात असते. कालांतराने कुंडलिनीही वायूतत्त्वात विलीन होते. तेव्हा तेथे केवळ वायूतत्त्वच शिल्लक राहते. ते वायूतत्त्वही शेवटी अवकाशात विलिन होते. येथे ध्यानाची प्रक्रिया संपते. साधकाचा सिद्ध होतो. परमेश्वराचा अपरोक्ष साक्षात्कार होतो. जे जे प्राप्त करून घ्यावयाचे असते ते ते मिळवलेले नव्हे मिळालेले असते. या अवस्थेत मन, बुद्धी, अहंकार यांचा लय झालेला असतो. हीच निर्विकल्प समाधी होय. आता तो सिद्धपुरुष पूर्णकाम झालेला असतो. जीवन्मुक्त, विदेही होतो, ब्रह्मस्वरूप होतो. म्हणजेच त्याचे जीवनचक्र पूर्ण होते.

संत ज्ञानदेवांनी या शेवटच्या अवस्थेचे वर्णन केले आहे ते असे-

*'परब्रह्माचेनि रसे । देहाकृतिचियेनि मुसे ।*
*वोतीव जाहले तैसे । दिसती आंगे' ॥*

*(६.३२७ ज्ञानेश्वरी).*

## शरीरातील पंचकोश

शरीर हे पंचकोशांचे बनलेले असते. आणि त्याच्याही पलीकडे आत्मा असतो. म्हणजे आत्मा हा मुक्त होणे असेल तर त्याला हे पाच कोश पार करून येणे आवश्यक आहे. या पाचही कोशांतून जेव्हा आत्मा मोकळा होईल तेव्हाच तो ब्रह्मस्वरूप होईल. हे पाच कोश कोणते आहेत व ते पार करण्यासाठी साधकाने कशा प्रकारे प्रयत्न करावयास पाहिजेत याबद्दल अगदी संक्षिप्त स्वरूपात येथे लिहिले आहे. प्रथम पंचकोशांची माहिती–

'अन्न, प्राण, मन, विज्ञान व आनंद असे पाच कोश आहेत' (तैत्ति. उप. ब्रह्मवल्ली) . त्यांनी आच्छादित केलेला आत्मा स्वस्वरूपाला विसरून जन्ममृत्यूरूपी संसारात गुरफुटून पडतो. कोळी आपल्या अंगातून तंतू काढून त्याच्या जाळ्यात स्वत:लाच बांधून घेऊन जसा क्लेश भोगतो, त्याप्रमाणे अन्नादिक कोशांनी आच्छादित झालेला आत्मा सुखदु:खानुभवरूप संसाराचा अनुभव घेतो. म्हणून त्यांना कोश ही संज्ञा दिली आहे. आत्मस्वरूपाशी तादात्म्य पावण्यासाठी जीवात्म्याला पंचकोशापलीकडे जावे लागते.

*गुहाहितं ब्रह्म यत्तत् पञ्चकोशविवेकत: ।*
*बोद्धुं शक्यं तत: कोशपञ्चकं प्रविविच्यते ॥*

*(३.१ पंचदशी).*

'जे गुहेत ठेवलेले ब्रह्म ते पाच कोशांच्या विवेकाने जाणणे शक्य आहे.'

१) स्थूल शरीर हा 'अन्नमय कोश.' (अन्नरसेनैव भूत्वा अन्नरसेनैव वृद्धि प्राण्य। अन्नरूप पृथिव्यां यद्विलीयते तदन्नमय: कोश: स्थूलशरीरम् ॥)

२) इंद्रिये व प्राण हा 'प्राणमय कोश'. (प्राणादिपंचवायव: वागादि इंद्रियपंचक् प्राणमय: ॥)

३) मन व ज्ञानेंद्रिये हे 'मनोमय कोश'. (मनश्च ज्ञानेंद्रियपंचकं मिलित्वा यो भवति स मनोमय कोशः ।।)

४) ज्ञानेंद्रिये व बुद्धी हा 'विज्ञानमय कोश' (बुद्धिज्ञानेंद्रियपंचकं मिलित्वा यो भवति स विज्ञानमय कोशः ।।)

५) आनंदाची जाणीव हा 'आनंदमय कोश'. (एकमेव कारण शरीर भूताविद्यास्थ मलिनसत्त्वं प्रियादिवृत्ति सहितं सत् आनंदमय कोशः ।।) (श्रीमत् शंकराचार्यकृत तत्त्वबोध)

असे आहेत पंचकोश. या सर्वांच्या पलीकडे आत्मरूप आहे. आत्मा सुखाच्या जाणिवेपलीकडे असल्यामुळे तो परमसुख आहे. या परमसुखासाठीच पंचकोशांचा विवेकाने परित्याग करावा लागतो.

*पञ्चकोशपरित्यागे साक्षिबोधावशेषतः ।*
*स्वस्वरूपं स एव स्याच्छून्यत्वं तस्य दुर्घटम् ।।*

*(पंचदशी)*

पाचही कोशांचा परित्याग केला असता म्हणजे विवेकबुद्धीने त्यांच्या अनात्मत्वाविषयी निश्चय केला असता साक्षीरूप बोध अविशिष्ट राहतो. त्यामुळे तोच स्वस्वरूप आहे. तेच ब्रह्म आहे.

आता या कोशांचा त्याग कसा करावा?' म्हणजे पूर्वीच्या साधकांनी, साधू, संत महात्म्यांनी कसा त्याग केला ते कळले म्हणजे आपणांस मार्गदर्शन होईल.

*१) पितृभुक्तान्न जाद्वीर्याज्जातोऽन्नेनेव वर्धते ।*
*देहः सोऽन्नमयो नात्मा प्राक्चोर्ध्व तद्भावतः ।।*

*(पंचदशी)*

प्राणी जे अन्न खातो त्यापासून रक्त, मांस, अस्थी, मज्जा, स्नायू व शुक्र शोणित हे सात धातू उत्पन्न होतात. शुक्र-शोणिताच्या संयोगाने, ईश्वराच्या अगम्य लीलेने हे शरीर तयार होते. मातेच्या गर्भाशयात पूर्ण वाढ झाल्यावर ते मातेच्या उदरातून बाहेर येऊन दुग्धादी अन्नाच्या योगाने वृद्धी पावते, वाढते. अर्थात देह हा केवळ अन्नाचाच परिणाम आहे. त्यामुळे तो आत्मा नव्हे. शिवाय तो उत्पत्तीपूर्वी व मृत्यूनंतर नसतो. तो जड व अनित्य आहे. 'हा देह नाशिवंत मलमूत्रांचा बांधा। वरि चर्म घातले रे

कर्मकीटकांचा सांदा। खख दुर्गंधी रे अमंगळ चिता बांधा। स्मरे त्या हरिहरा शरण जाई गोविंदा ॥' (८४५. मदालसा. ज्ञा. म.)

*यज्जायतेऽस्ति: विपरिणमते वर्धतेऽपिच ।*
*क्षीयते नश्यतीत्येत षड्भावा वपुण: स्मृता: ॥*

*(शिवगीता १४-८)*

जायते म्हणजे उत्पन्न होणे. अस्ति म्हणजे अस्तित्व पावणे, वर्धते म्हणजे वाढणे. विपरिणमते म्हणजे विशेषत्वाने परिणाम पावणे. क्षीयते म्हणजे क्षीण होणे आणि नश्यति म्हणजे नाश पावणे. अशा या अवस्था अन्नमय कोशाला (देहाला) असतात.

मन अन्नमय, प्राण आपोमय व वाक् तेजोमय आहे. भक्षण केलेल्या अन्नाचा जो अतिसूक्ष्म अंश तो मनात शक्तीचे आधान करतो. त्यामुळे मन सशक्त होते. अन्नाने वृद्धी पावलेल्या त्या मन:शक्तीचे सोळा विभाग करून ते पुरुषाच्या कलारूपाने येथे विवक्षित आहेत. महामुनी अरुणी आपल्या पुत्राला– श्वेतकेतूला म्हणाला, 'हे पुत्रा! पुरुष षोडषकला आहे. तू पंधरा दिवस अन्न खाऊ नकोस. फक्त पाणी पी. प्राण आपोमय आहे. त्यामुळे तुझा प्राण विच्छिन्न होणार नाही.'

स्थूल शरीर अन्नमय असल्यामुळे शरीर-निर्वाहापुरतेच अन्न साधकाने घ्यावे व वस्त्र वापरावे. साधनेकरिता निवारा म्हणून पर्वताची गुहा किंवा निवांतस्थळी पर्णकुटी या स्थळाचा वापर करावा. चित्ताला कोठेही व कोणतेही प्रलोभन नसावे. विषयासक्ती तर मुळीच नसावी आणि हृदयात नारायण अखंड साठवावा. वाचेला नामाचा छंद लावावा. विषयलंपट जनांपासून दूर असावे. इंद्रियांचे दमन करून बुद्धीला नित्य सावध ठेवावे. त्रिगुणांचे बंधन तोडावे आणि प्रत्येक घडी हरिनामाने साधावी. 'रिकामा अर्ध घडी राहू नको।' (ज्ञा. म. अभंग) 'अखंड चिंतन करावे असाध्य ते साध्य करितां सायास। कारण अभ्यास तुका म्हणे ॥'

तसा साधकांत दृढ निर्धार, तीव्र वैराग्य, एकांतातील कठोर साधना, ध्यानधारणा व अहोरात्र अखंड नामस्मरण या साधन चतुष्टयात ईश्वरप्राणिधानाने सर्व वृत्तींचा लय करून साधना करावी. अशा प्रकारे अन्नविरहित साधनेची परिपूर्ती होते. सर्वत्र आनंदस्वरूप प्रकाशाचा अनुभव येतो. ही अपरोक्ष अनुभूती होय.

*२) 'पूर्णो देहे बलं यच्छन्नक्षाणां यः प्रवर्तकः ।*
*वायुः प्राणमयो नासावात्मा चैतन्यवर्जनात् ॥'*

*(पंचदशी ३।५)*

हे प्राणमय कोशाचे वर्णन आहे. जो वायू शरीरात नखशिखांत व्यापून राहिलेला असतो. सर्व शरीराला व्यान रूपाने सामर्थ्य देतो आणि चक्षुरादी इंद्रियांना प्रेरणा करतो त्याला प्राणमय कोश असे म्हणतात. 'नैवात्मपि प्राणमयो वायुविकारो॥' (विवेकचूडामणि). हा प्राणमय कोश आत्मा नाही. कारण हा वायूचा विकार आहे.

प्राणायामाने प्राणावर नियंत्रण ठेवता येते. श्वासाचे नियमन केल्याने नाड्यांची शुद्धता होते. इंद्रियांचे दमन होते. श्वासोच्छ्वासाच्या नियमनाने, प्राणायामाने शरीरशुद्धी होते. ध्यानधारणेमध्ये मुख्यत्वे प्राणायामावरच नियंत्रण करणे हा अभ्यास असतो. शरीरधारणेपुरते अन्नाचे सेवन करून जसे अन्नमय कोशाची शुद्धता होते, त्याचप्रमाणे प्राणायामाने श्वासोच्छ्वासाच्या नियमनाने प्राणमय कोशाची शुद्धता होते. हीसुद्धा साधना आहे.

*३) 'अहंता ममतां देहे गेहादौ च करोति यः ।*
*कामाद्यवस्थया भ्रान्तो नासावात्मा मनोमयः ॥'*

*(पंचदशी)*

अर्थ – जो देहावर अहंता व गृहादिकांचे ठिकाणी ममता ठेवतो तो कामादी अवस्थांनी भ्रांत झालेला मनोमय कोश होय. आत्मा नव्हे.

साधकाने साधना तशीच निष्ठेने चालू ठेवावयाची असते. कारण ही साधना एका जन्माची नव्हे, तर जन्मोजन्मींची आहे. तेव्हा पुढे प्राणायामावर नियंत्रण आले व श्वासोच्छ्वासाची लय साधली की, इंद्रियांच्या द्वारे दमन झाल्यामुळे इंद्रियांचे विषयांशी संबंध तुटले की, ज्या इंद्रियांद्वारे मनाला विषयांचे सेवन करण्याची सवय झालेली असते, ते मनच रिकामे होऊन जाते. म्हणजे मनाचा लय होतो. मनामध्येच वासना असतात, इच्छा असतात. पण मनाचा लय झाला म्हणजे वासना, इच्छाही क्षीण होऊन लय पावतात. आणि मन निर्विषय होते आणि या क्षणापासून समाधिअवस्था प्राप्त होऊ लागते. ही समाधिअवस्था काही क्षणांपुरती असते. मनाचे पुन्हा उन्मन होते. असे असले तरी साधक हा प्रगतिपथावरच असतो. या अभ्यासाने मनोमय कोशाची शुद्धता होते व त्यातून साधक बाहेर पडतो.

*४) लीना सुप्तौ वपुर्बोधे व्याप्तुयादानरवाग्रगा ।*
*चिच्छायोपेतधीर्नात्मा विज्ञानमयशब्दभाक् ॥*

*(पंचदशी ३/७)*

बुद्धी चिदाभासाने युक्त असते. तिलाच विज्ञानमय असे म्हणतात. गाढ निद्रासमयी बुद्धी आपल्या कारणात म्हणजे अज्ञानात लीन होते व जागृत समयी सर्व शरीराला नखशिखांत व्यापून राहते. लीन होणे व व्यक्त होणे हे अनात्म्याचे धर्म आहेत. याच विज्ञानमय कोशाच्या अधिपत्याने जीव जन्म-मरणरूप संसार चक्रात पडतो. 'मज समग्राते जाणसी ऐसे। आपुलिया तळहातीचे रत्न जैसे। तुज ज्ञान सांगेन तैसे। विज्ञानेशी ॥ एथ विज्ञाने काय करावे। ऐसे घेसी जरी मनोभावे। तरी पै आधी जाणावे। तेचि लागे ॥ मग ज्ञानाचिये वेळे। झांकती जाणिवेचे डोळे। जैसी तीरी नाव न डळे। टेकली सांती ॥ तैसी जाणीव जेथ न रिघे। विचार मागुता पाऊली निघे। तर्क आयणी नेघे। आंगी जयाच्या ॥ अर्जुना तया नांव ज्ञान। येर प्रपंचु हे विज्ञान। तेथे सत्य बुद्धी ते अज्ञान। हेही जाणा ॥'(ज्ञानेश्वरी ७-२ ते ६).

संत ज्ञानेश्वर महाराजांनी वरील ओव्यांतून विज्ञानाचे महत्त्व सांगितले आहे. प्रपंच हे विज्ञान आहे. पण आधी त्या प्रपंचाचीच माहिती करून घेणे आवश्यक आहे. प्रपंचातून काय शिकण्यासारखे आहे? तर दिसणारा प्रपंच हा मिथ्या आहे. हा नित्य बदलत असतो. त्याला क्षणभरही स्थिरता नाही. शिवाय या प्रपंचातून कोणतेही सुख मिळण्याची शक्यता नाही. प्रपंच हा जरी सातत्याने बदलत असला तरी त्यामध्येही त्याचे जे अधिष्ठान आहे, ते एकमात्र सत्य आहे. ते कधीही बदलणारे नाही. तेच अव्यय, अविनाशी, अविकारी असे आहे व त्याचा शोध घेणे हाच साधकाचा अभ्यास आहे. कारण ज्या वेळी ज्ञानाचा उदय होऊ लागतो, त्या वेळी विवेकाने क्षीर-नीर, सार-असार, नित्य-अनित्य, आत्म-अनात्म यांचे विभाजन करण्याची पात्रता येते. अशा प्रकारचा अभ्यास पूर्ण झाला म्हणजे मगच विज्ञानमय कोशातून साधक बाहेर पडतो व आनंदमय कोशात त्याचा प्रवेश होतो.

*५) काचिदन्तर्मुखा वृत्तिरानन्दप्रतिबिम्बभाक् ।*
*पुण्यभोगे भोगशान्तौ निद्रारूपेण लीयते ॥*

*(पंचदशी ३/९)*

अर्थ – पुण्यकर्माच्या फलाचा अनुभव घेण्याच्या वेळी अंत:करणाची वृत्ती अंतर्मुख होते व आत्मस्वरूपभूत आनंदाच्या प्रतिबिंबाला पात्र होते. म्हणजे अंतर्मुख

झाल्यामुळे वृत्तीमध्ये आत्म्याच्या आनंदाचे प्रतिबिंब पडते. तीच वृत्ती पुण्यकर्माच्या फलाचा उपभोग घेऊन झाला असता निद्रारूपाने लीन होते. ती वृत्तीच आनंदमय कोश होय. (पण हा आनंदमय कोशही आत्मा नाही).

आपणास जीवनात जे जे सुखाचे, समाधानाचे क्षण मिळतात, हा सर्व आपल्या पुण्याचा भाग असतो. त्या वेळी आपण हर्षाने, आनंदाने, सुखाने, समाधानाने, भरून जातो. तो जरी वैषयिक आनंद असला तरी त्या क्षणी आपल्या वृत्ती अंतर्मुख झालेल्या असतात व आपण केवळ आनंदाचाच उपभोग घेत असतो. पण तो उमाळा ओसरला की आपणास पुन्हा विषयाचे स्मरण होते व आपण वास्तवात येतो. हा क्षणिक आनंद झाला. आता यापुढचा आनंद म्हणजे चौथ्या श्लोकात वर्णन केल्याप्रमाणे साधकाचा अभ्यास सार-असार, नित्य-अनित्य, आत्म-अनात्म हे ओळखण्याइतपत झालेला असतो. त्या वेळी त्याचा आनंदमय कोशात प्रवेश होतो. त्याला समाधीमध्ये सुखाचा अनुभव येऊ लागतो, आनंदाचा अनुभव येऊ लागतो. हा आनंद मात्र निर्विषयक असतो. कारण त्याचे सर्व विषय लय पावलेले असतात, पण साधक समाधिअवस्थेत असेपर्यंतच त्याला हा आनंद मिळतो पण जेव्हा त्याचे समाधीतून उत्थान होते, त्या वेळी त्याचा आनंद लय पावतो. यामध्ये समाधीचा काल वाढवणे व आनंदाचा उपभोग घेणे हा अभ्यास साधकाला करावयाचा असतो. या अभ्यासाने पुढे पुढे साधक समाधीतून उत्थान पावतच नाही. तो समाधीतून जागृतावस्थेत आला तरी त्याची समाधी उतरलेली नसते. साधक हिंडत असतो. सर्व व्यापार करत असतो पण स्वस्वरूपाचे अनुसंधान सुटलेले नसते. संत ज्ञानदेवांनी या अवस्थेचे वर्णन केले आहे–

*'देह तरि वरीचिलीकडे । आपुलियापरी हिंडे ।*
*परि बैसका न मोडे । मानसीची ॥'*

*(१३-४८६ ज्ञानेश्वरी)*

ही अवस्था खरी शेवटाची अवस्था होय. या अवस्थेत होत असलेला आनंद हा वृत्तीचा आनंद नसतो. येथे वृत्तीचाही लय झालेला असतो आणि उरतो तो निखळ आनंद. हा आनंद विकार नसून स्वभाव असतो. साधक हा सिद्ध झालेला असतो. तो आनंदी नसून आनंदरूप झालेला असतो आणि आनंदमय कोशातूनही तो बाहेर पडून आत्मरूपात, स्वस्वरूपात आलेला असतो. हीच ती पूर्णावस्था, जीवन्मुक्त, विदेही अवस्था होय.

अशा प्रकारे या साधनेत कुंडलिनी जागृत होऊन, पंचकोश शुद्ध होत जातात, षड्चक्राचे भेदन होत जाते व क्रमक्रमाने गाढ समाधीचा अनुभव येऊ लागतो. या समाधीत प्रथम सविकल्प समाधी व नंतर निर्विकल्प समाधीचा अनुभव येतो. सविकल्प समाधी काळात साधकाला काही सिद्धी प्राप्त होतात. त्याचा येथे थोडा खुलासा देत आहोत. षड्चक्राच्या तक्त्यात वर्णन केलेले रंग ध्यानामध्ये त्या त्या चक्रभेदनाच्या वेळी दिसू लागतात. त्यांचा अनुभव त्या त्या क्रमाने येतो. मूलाधार चक्रामध्ये आरक्त रंग, स्वाधिष्ठान चक्रामध्ये पिवळा रंग, मणिपूर चक्रामध्ये निळा रंग, अनाहत चक्रामध्ये शुक्ल रंग, विशुद्ध चक्रामध्ये धूसर रंग व आज्ञा चक्रामध्ये पांढरा रंग साधकाला दिसतात. अनाहत चक्रामध्ये म्हणजेच हृदयात कुंडलिनी येताच अनाहत नाद ऐकू येतात. ज्या ज्या चक्रामधून कुंडलिनी वर वर जात राहते, त्या त्या चक्रातून गेलेल्या नाड्यांवर ताबा येतो. त्या ठिकाणी उत्पन्न झालेले रोग बरे करता येतात. कारण सर्व शरीरांची रचना तशीच असते. त्यामुळे सिद्धाला त्याच्या स्वत:च्या शरीरावर जसा ताबा येतो तसा त्याचा इतरांच्या शरीरावरही त्या त्या भागावर, त्या त्या तत्त्वावर ताबा येतो. त्यामुळे सिद्धांची सर्वांच्या शरीरावर हुकमत चालते. वायुतत्त्वावर जेव्हा ताबा येतो त्या वेळी मनावर ताबा येतो व प्राणिमात्रांचे मनोगत समजू शकते आणि शिवाय मृत मनुष्य जिवंत करण्याचेही सामर्थ्य येते आणि आज्ञा चक्रात कुंडलिनी येताच सर्व जगावर हुकमत चालवण्याचे सामर्थ्य येते. शेवटी सहस्रदल चक्रात कुंडलिनी जाऊन पोहचल्यावर साधक सिद्ध होतो व प्रतिपरमेश्वरच होतो. अर्थात या वेळेपर्यंत साधकाच्या ठिकाणी संसाराविषयी एवढी विरक्ती आलेली असते की तो या सिद्धींचा उपयोग करण्याच्या मन:स्थितीत नसतोच. अर्थात या सिद्धी क्रमाक्रमानेच मिळत जातात व त्यांचा अनुभव येऊन जर साधक त्या सिद्धींच्या प्रयोगात रमू लागला तर त्याला वैभव, प्रसिद्धी, लोकप्रियता वगैरे सर्व काही मिळेल पण त्याची प्रगती थांबेल व पुढे त्याची अधोगतीही होण्याची शक्यता असते. म्हणून साधकाने, सिद्धाने स्वत:साठी सिद्धी वापरावयाच्या नसतात. समाजाच्या कल्याणासाठी त्या सिद्धींचा वापर करावयास हरकत नसते व ते अगदी थोड्या प्रमाणात.

## परमेश्वराचा या सृष्टीला आधार

परमेश्वराचे स्वरूप व्यापक आहे. तसेच ते अनंत रूपांनी नटलेले आहे. या सृष्टीची निर्मिती करूनच परमेश्वर स्वस्थ बसला नाही तर निर्माण झालेल्या सृष्टीची गती सतत चालू असावी अशी सोयही त्याने करून ठेवली आहे. अर्थात, त्याने सोय

केली आहे म्हणजे काय? तर तो स्वत:च अनंत रूपांनी अवतरून त्याने या सृष्टीच्या चक्राला गती दिली आहे आणि जसे कार्य तसे नाव धारण केले आहे. 'तेज' हे त्याचे रूप आहे तर 'अग्नी'ही त्याचेच रूप आहे, पण 'तेज' कोणाला म्हणावयाचे व 'अग्नी' कोणाला म्हणावयाचे हे त्याच्या कार्यावरून ठरते. तसे अग्नी हासुद्धा केवळ एक प्रकारचा नाही तर त्याच्या कार्याप्रमाणे त्यातही भेद आहेत व तशी त्यांची नावेही आहेत. वडवानल = समुद्रातील, भूवानल = पृथ्वीच्या गर्भातील, विषानल = शेषाच्या मुखातील, सहस्रानल = सूर्यातील, हारानल = शिवाच्या तृतीय नेत्रातील, क्रण्यानल = दशादशातील, कालानल = प्रलयाच्या वेळचा, वैश्वानल = प्राणिमात्रांच्या पोटातील (अन्नाचे पचन करण्यासाठी). अग्नी म्हणजेच शक्ती. हीच शक्ती कधी धारणपोषणासाठी उपयोगी असते. तर कधी सर्व संहार करण्यासाठीही कारण असते.

*यदादित्यगतं तेजो जगत्भासयतेऽखिलम् ।*
*यच्चन्द्रमसि यच्चाग्नौ तत्तेजो विद्धि मामकम् ॥*

*गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।*
*पुष्णामि चौषधी: सर्वा: सोमो भूत्वा रसात्मक: ॥*

*अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रित: ।*
*प्राणापानसमायुक्त: पचाम्यन्नं चतुर्विधम् ॥*

*सर्वस्य चाहं हृदि सन्निविष्टो मत्त: स्मृतिर्ज्ञानमपोहनं च ।*
*वेदैश्च सर्वैरहमेव वेद्यो वेदान्तकृद्वेदविदेव चाहम् ॥*

*उत्तम: पुरुषस्त्वन्य: परमात्मेत्युदाहृत: ।*
*यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वर: ॥*

*यस्मात्क्षरमतीतोहम् अक्षरादपि चोत्तम: ।*
*अतोऽस्मि लोके वेदे च प्रथित: पुरुषोत्तम: ॥*

*(१५.१२ ते १५, १७, १८, भ. गी.).*

अर्थ – जे सूर्यातील तेज सर्व जगाला प्रकाशित करते, ते तेज चंद्रात व अग्नीत आहे. ते माझेच तेज आहे असे समज. मी (परमात्मा) पृथ्वीमध्यें (शक्तीरूपाने) प्रवेश करून (आपल्या) बलाने (सर्व) प्राणिमात्रांस (पृथ्वीवर) धारण करतो. आणि रसरूप सोम (चंद्र) होऊन (सर्व) वनस्पतींचे मी पोषण करतो. मी (परमात्मा) जठराग्नी होऊन

प्राण्यांच्या देहाचा आश्रय करून प्राण, अपान इत्यादी वायूंनी युक्त होत्साता चतुर्विध (खाद्य, पेय, लेह्य, चोष्य) अन्न पचवतो, मी (परमात्मा) सर्वांच्या बुद्धीत प्रविष्ट करून असतो आणि माझ्यामुळेच स्मृती (संस्कारजन्य ज्ञान), ज्ञान (स्वरूपज्ञान) व अपोहन (व्यावृत्तिरूपज्ञान म्हणजे सदसद्विवेक शक्ती) ही बुद्धीमध्ये उत्पन्न होतात. मीच सर्व वेदांनी वेद्य (ज्ञेय) आहे. त्याचप्रमाणे ब्रह्मज्ञानाचे उगमस्थान व वेदांचे तत्त्व जाणणारा मीच आहे. (क्षर व अक्षर) या दोहोंहून वेगळा तो उत्तम पुरुष होय. (त्याला) परमात्मा असे म्हणतात. तो निर्विकार परमेश्वर (सर्व सत्ताधीश) त्रैलोक्यामध्ये प्रवेश करून त्याचे धारण पोषण करतो. ज्या अर्थी मी (परमात्मा) क्षराच्या (नाशवंत सृष्टीच्या) पलीकडचा व अक्षराहून (मूलभूत अव्यक्त तत्त्वाहून) उत्तम (शुद्ध) आहे, त्या अर्थी लोकांत (इतिहासात-पुराणात) व वेदांत मी पुरुषोत्तम या संज्ञेने प्रसिद्ध आहे.

परमेश्वराचे स्वरूप सगळीकडे आहे असे म्हणून तो सगळीकडे आहे याची प्रचीती येत नाही. कारण सगळ्यांकडे परमेश्वराला कसे पाहावयाचे याचे ज्ञान आपणास नाही. तेव्हा ते ज्ञान होणे आवश्यक असेल तर ते ज्ञान करून घेणे जरूर आहे. आता परमेश्वराचे ज्ञान आपणास कसे होणार? एक तर ज्यांना याचे ज्ञान आहे त्या ज्ञात्यांपासून ते समजावून घेतले पाहिजे. म्हणजे संत वाङ्मयातून, सद्गुरूकडून नाही तर परमेश्वराने ज्या ज्या ठिकाणी स्वत:च्या स्वरूपाचा खुलासा केला आहे ते वाचून.

दोन व्यक्ती एकमेकांच्या चांगल्या परिचयाच्या आहेत. तिसरी व्यक्ती तेथे आली तर पहिल्या दोघांपैकी एक जण स्वत:ची व आपल्या मित्राचीही ओळख करून देतो. खूप माहिती सांगितली तरी तो म्हणतो 'मला यांची एवढीच माहिती आहे. यापेक्षा जर काही जास्त माहिती हवी असेल तर तुम्ही त्यांच्याकडूनच ऐका?' असे का म्हणावे लागते? कारण प्रत्येक व्यक्ती ही स्वत:ला जितकी चांगली ओळखते (प्रामाणिकपणे स्वत:चे परीक्षण केले तर) तितकी दुसरी व्यक्ती त्याला ओळखू शकत नाही. 'ॐ नमो जी आद्या। वेद प्रतिपाद्या। जय जय स्वसंवेद्या। आत्मरूपा ॥ (१.१ ज्ञानेश्वरी). संत ज्ञानदेवांनी परमेश्वराला 'स्वसंवेद्या' या विशेषणाने संबोधले आहे. 'स्वसंवेद्या' म्हणजे जो स्वत:च स्वत:ला खऱ्या अर्थाने जाणू शकतो तो. हे विशेषण फक्त परमेश्वरालाच लावता येते. वर जरी म्हटले असले की आपण कोण आहोत हे फक्त आपल्यालाच माहीत असते. तरी काही लोकांना स्वत:चे दोष गुण वाटतात व इतरांचे गुण दोष वाटतात. तसा परमेश्वर 'स्वसंवेद्या' नाही आणि म्हणून गीतेमध्ये परमेश्वराने स्वत:चे स्वरूप स्वत:च कथन केले आहे व स्वत:च्या व्यापकतेची कल्पना दिली आहे. स्वत:चे सामर्थ्य प्रगट केले आहे. स्वत:चे 'कर्तुं

अकर्तुं अन्यथा कर्तुम्।' असे अकर्तृत्व दाखवून दिले आहे. परमेश्वरच सर्वांचा धारणपोषण करणारा आहे म्हणून विचार करता असे दिसते की परमेश्वरी सूक्ष्म तत्त्व विज्ञानात सर्वांठायी पूर्ण भरून राहले असून त्यानेच या फिरणाऱ्या ग्रह, तारे, नक्षत्र, आकाशगंगा व अनेक दीर्घिका (Galaxies) यांना आधार दिला आहे. तेच चैतन्यरूपाने या सर्वांमध्ये आहे. म्हणून त्याला 'गती' आहे. तो (परमेश्वर) तेजोरूपाने आहे, म्हणून त्यात प्रकाश आहे. तो अग्नीरूपाने आहे म्हणून त्यात उष्णता आहे. परमेश्वराचा आधार आहे तोपर्यंतच हे सर्व फिरत राहणार आहे. ज्या वेळी परमेश्वर याचा संहार करण्याचे ठरवेल त्या वेळी पुन्हा उलट गतीने, क्रमाने हे सर्व परमेश्वरामध्ये लीन होणार आहे. उलट गतीने म्हणजे ज्या क्रमाने या सृष्टीची निर्मिती झाली त्याच्या उलट क्रमाने. वारा जसा समुद्रामध्ये लाटा उत्पन्न करतो तसाच तो त्यांचा लयही करतो. हा त्याचा खेळ आहे. सृष्टीच्या प्रलयाचे वर्णन एकनाथी भागवतात असे आले आहे–

प्रलयकाळी सृष्टीवरील सर्व बीजे ही सूक्ष्म रूपाने अव्यक्तात जातात व सृष्टीच्या उत्पत्तीच्या वेळी पुन्हा ती सर्व बीजे व्यक्तात येतात. त्याचे वर्णन संत एकनाथ यांनी केले आहे. 'जगाची उत्पत्ति स्थिती। तुजचिपासोनि श्रीपती। सकळ संहारिता अंती। तूचि निश्चिती महाकाळू।। क्षोभलिया तामसी शक्ति। सृष्टीचा प्रलय करी अंती। तेथे बीजरूपी अव्यक्ति। जीव राहती सूक्ष्मत्वे।। मग उत्पत्तीचे काळवेळे। तीच बीजे विरुढती सकळे। पाल्हेजती स्थितीकाळे। पुष्प फळे सफळित।।' (अध्याय ६, ओवी १७८ ते १८० ए. भा.).

परमेश्वराने हे सर्व निर्माण केले असे म्हटले तरी व या सृष्टीला परमेश्वराचाच आधार आहे असे म्हटले तरी भगवंत स्वत: या सृष्टीच्या निर्मितीवषयी सांगताना म्हणतात की, परमेश्वराने सृष्टी उत्पन्न केली असे म्हटले तरी 'सृष्टी उत्पन्न झाली' असे त्या वाक्याचे रूपांतर करणे योग्य आहे, कारण पुन्हा 'परमेश्वर कोणी एक व्यक्ती आहे व तो करतो' हा त्याचा अहंकार होईल. म्हणून 'सृष्टी निर्माण झाली' याने ते 'कर्तृत्व' कोणाकडेही येत नाही कारण परमेश्वर निर्गुण निराकार आहे. यावर संत एकनाथांनी भागवतातील एका श्लोकावर केलेले निरूपण–

भगवान म्हणाले, 'सर्वसमर्थ असा आत्माच हे सर्व विश्व निर्माण करतो आणि ते उत्पन्न केले जाते. हा विश्वात्मा त्या विश्वाचे पालन करतो आणि ते पालन केले जाते. ईश्वर त्याचे हरण करतो आणि ते हरण केले जाते.' 'प्रपंच प्रत्यक्ष विद्यमान। तेणे भेद युक्त झाले मन। तेथ बोधी माझे वेदवचन। प्रपंच अभिन्न निजात्मता।।

मूळी ऊसचि बीजी विरूढे। तो ऊंस ऊंसपणे कांडा चढे। तेवी प्रपंच वस्तुयोगे वाढे। वाडेकोडे तद्रुप॥ जैसे सोनियाचे झाले लेणे। ते वर्ततां वर्ते सोनेपणे। लेणे मोडलियाही सोने। सोनेपणे स्वत: सिद्ध॥ तेवि उत्पत्ति स्थिती निदान। प्रपंचासी होता जाण। तेथ आदिमध्य अवसान। वस्तू परिपूर्ण संचली॥ जे एथ भासले चराचर। ते मी आत्माचि साचार। मज वेगळा जगासी थार। अणूमात्र असेना॥ एवं सृज्य आणि सृजिता। पाल्य आणि प्रतिपाळिता। संहार आणि संहार्ता। मी एकात्मता भगवंता॥ एथ उत्पत्ति स्थितीं निधान। त्रिविधरूपे प्रपंच भिन्न। या सर्वांसी मी अधिष्ठान। मज वेगळे जाण असेना॥ प्रपंच मजवरी आभासे। परी मी प्रपंचामाजी नसे। जेवी मृगजळाचेनी रसे। सूर्य काळवशे भिजेना॥ त्रिविध प्रपंचाचे जाळ। मजवरी दिसे हे निर्मुळ। जेवी गगन भासे सुनील। परी तेथ अनुभान निलीमा नाही॥' (अध्याय २८ ओवी ९३ ते १०२ ए. भा.).

जेव्हा एखाद्या गोष्टीला दुसराही मनुष्य अनुमोदन देतो तेव्हा ती गोष्ट खरी आहे. असे मानले जाते आणि याबाबत श्वेताश्वेतरोपनिषदही तेच म्हणते 'ब्रह्म विश्वाचे कारण' आहे. सर्वांना जीवन देणारे सर्वांचे अंतिम विश्रांतीस्थान हे परमेश्वराचे स्वरूप आहे. परस्परांत मिसळलेल्या क्षर आणि अक्षर, व्यक्त आणि अव्यक्त विश्वाला परमात्मा धारण करतो. दोन अज आहेत. 'ज्ञ' आणि 'अज्ञ', समर्थ आणि असमर्थ. एक अजा आहे भोक्तांच्या भोगासाठी प्रयुक्त झालेली. आत्मा अनंत विश्वरूप आणि अकर्ता आहे. जेव्हा (साधक) हे तिन्ही जाणतो, तेव्हा तेच ब्रह्म आहे हे तो अनुभवतो. तीळामध्ये तेल, ह्यामध्ये लोणी, (भूमिगत) झऱ्यामध्ये पाणी, अरणीमध्ये अग्नी तसा आत्मा आत्म्यात त्यांना ग्रहण होतो. 'दुधात जसे लोणी, तसा सर्वव्याप्ती आत्मा देहात आहे. तो आत्मविद्येने आणि तपाने प्रगट होतो. ते सर्वश्रेष्ठ, ब्रह्मोपनिषद आहे.'

एकूण परमेश्वर, परमात्मा याने हे सर्व विश्व निर्माण केले, धारण केले, व तो त्या विश्वाला पूर्णपणे व्यापून आहे. त्याच्याशिवाय अन्य काही नाही. जो प्रपंच दिसतो तो जरी भासला, तरी तो त्याच्यामुळेच भासत असतो. कारण स्वत:चे अस्तित्व प्रगट करणे हे त्या जड वस्तूंच्या ठिकाणी सामर्थ्य नसते. ते सर्व सामर्थ्य परमेश्वराचेच आहे. अन्य कोणाचेही नाही. कारण परमेश्वर एकच केवळ चैतन्यरूप, तेजोरूप, शक्तिरूप असा आहे.

## परमेश्वराचा अवतार

अवतरण म्हणजे खाली येणे. परमेश्वराचे स्वरूप तर सगळीकडेच पसरलेले आहे. ते खाली, वर, आजूबाजूला असे काहीच नाही. ते पूर्णत्वानेच जर सगळीकडे भरून आहे तर त्याला खाली, वर असे कसे असेल? तर तसे काहीच नाही. कारण खाली, वर, हे सापेक्ष शब्द आहेत. तरीही आपण परमेश्वराचे 'अवतरण' म्हणतो. 'अवतरण' याचा अर्थ 'खाली' घ्यावयास हरकत नाही, कारण परमेश्वर खरोखरीच 'खाली' येत असतो. सोन्याचा कस 'खाली' आला. उत्पन्न 'खाली' आले आणि वैचारिक पातळी 'खाली' आली. तसेच परमेश्वर 'खाली' आला, त्याचे 'अवतरण' झाले. निर्गुण, निराकार, निर्विकार, 'कर्तुम्, अकर्तुम् अन्यथा कर्तुम्' असा असलेला परमेश्वर सर्वच प्रकारे खाली आलेला असतो. तो प्रथमतः सगुण, साकार होतो. तो कोणत्या तरी कार्यासाठी आलेला असतो. म्हणजे प्रथम साधूंचे संरक्षण, दुष्टांचे निर्दालन व धर्माची स्थापना करणे. म्हणजे त्याला प्रसंगापुरते तरी विकारी व्हावे लागते. म्हणजे परमेश्वराचा जो 'दर्जा' आहे, त्यापेक्षा त्याला 'खाली' यावे लागते. लौकिकातसुद्धा राजाचे सिंहासन दरबारातील सर्व मानकऱ्यांपेक्षा वर असते तर परमेश्वराचे स्थान त्या अर्थाने सर्वात वर असते, पण जेव्हा ते स्थान सोडून 'खाली' येतो तेव्हा त्याने 'अवतार' घेतला असे म्हणतात.

परमेश्वराने या सृष्टीच्या रूपाने खरोखरीच अवतरण केले आहे. सर्वभूती परमेश्वर, चराचर हे परमेश्वराचेच स्वरूप आहे. 'जे जे भेटे भूत। ते ते मानिजे भगवंत॥' असे जरी असले तरी ज्याप्रमाणे शंभर टक्के शुद्ध सोन्यामध्ये ऐंशी-नव्वद टक्के भेसळ केली असता ते शुद्ध सोने न राहता किंवा त्याला सोनेही न म्हणता अन्य धातूच म्हणावे लागेल. तसे ही सर्व सृष्टी परमेश्वराचे 'अवतरण' असली तरी तिला परमेश्वराचे 'अवतरण' म्हणता येणार नाही. कारण कोणत्याही प्रकारचे परमेश्वराचे दिव्यत्व या सृष्टीतील प्राणिमात्रांत नाही, पण जे कोणी परमेश्वराचे अवतार असतात त्यांच्या ठिकाणी परमेश्वराचे दिव्यत्व असते. जसे शंभर टक्के शुद्ध सोन्यात पाच टक्के भेसळ केली तरी ते सोनेच असते पण त्याचा कस पंच्याण्णव टक्के असतो. सर्वसामान्य प्राणिमात्रांपेक्षा त्याच्याकडे काहीतरी अलौकिकत्व असते आणि म्हणून त्यांना परमेश्वराचे अवतार म्हटले जाते. ते सर्व प्राणिमात्रांपेक्षा विशेष सामर्थ्यवान असतात. जे सर्वसामान्य प्राणिमात्रांना जमत नाही ते कार्य करण्यासाठी ते अवतरलेले असतात म्हणून ते परमेश्वराचे 'अवतार' म्हटले जातात.

परमेश्वराला खाली येऊन असे काय कार्य करावयाचे असते, असा प्रश्न येतो. अर्थात परमेश्वराचे अवतार म्हणून ज्या ज्या देवता सगुण साकार रूप घेऊन अवतरल्या आहेत, त्यांच्याकडून झालेल्या कार्याचा विचार करता ती कार्ये केवळ परमेश्वरच करू शकला असता असे दिसते आणि अशा प्रकारे अनेक देवतारूपाने परमेश्वराने अवतार घेतले आहेत आणि त्या सर्व कार्यदेवता आहेत. त्या कार्यासाठी त्या देवता प्रसन्न होतात आणि उपासकांच्या त्या त्या प्रकारच्या अडचणी सोडवतात. कोणी बुद्धी, कोणी पैसा देतात, कोणी संसारातील अनेक प्रश्न मार्गी लावण्याचे कार्य करतात. अर्थात मनुष्याचे प्रारब्धही त्यांच्याबरोबर असतेच. अशा प्रकारे त्या त्या कार्यदेवतांची देवळे उभी राहतात, त्यांच्या पूजा-अर्चा चालतात, भजने, आरत्या केल्या जातात व त्यांची स्तुतिस्तोत्रे रचली जातात, त्यांच्या उपासनापद्धती ठरवल्या जातात आणि अशा प्रकारे अनेक माणसे अनेक देवतांच्या भजनी लागतात. जसा एखादा संचालक, मालक आपल्या उद्योगासाठी अनेक अधिकारी नेमतो. ते अधिकारी त्यांच्या कामाची विभागणी करून आणखी माणसे नेमतात व अशा प्रकारे सगळ्यात खाली कामगारांपर्यंत ही उतरण येते. या उतरणीतील अधिकाऱ्यांना अगदी मर्यादित व ठराविक अधिकार असतात. त्यापेक्षा जास्त मागणी असेल तर त्याच्यापेक्षा वरच्या अधिकाऱ्याकडे जावे लागते व शेवटी उद्योगाचे मालकी हक्कच पाहिजे असल्यास प्रत्यक्ष मालकालाच भेटावे लागते. खालचे सर्व अधिकारी आपली अधिकार क्षमता कमी असल्याचे सांगतात. त्याप्रमाणे परमेश्वराने अनेक कार्यदेवता निर्माण करून आपल्या कामाची वाटणी केली व त्याप्रमाणे समाजाचे, उपासकांचे प्रश्न सोडवण्याचे अधिकार दिले, त्यांच्या मागण्या पुऱ्या करण्याचे सामर्थ्य दिले, पण कोणाला प्रत्यक्ष परमेश्वराचे पद 'ब्रह्मपद'च पाहिजे असेल तर प्रत्यक्ष परमेश्वराशीच अनुसंधान बांधावयास पाहिजे. उद्योगाचे मालकी हक्क मिळाले तर जशा बाकीच्या मागण्या या शुल्लक ठरतात. त्याप्रमाणे संसारातील अडचणी या प्रत्यक्ष परमेश्वर प्राप्त झाल्यावर अगदीच क:पदार्थ ठरतात. एवढेच काय पण त्यांची जरुरीसुद्धा भासत नाही.

परमेश्वराने अवतार धारण करणे हे आणखी एका गोष्टीने आवश्यक आहे. परमेश्वर निर्गुण, निराकार, निर्विकार व सर्वांभूती भरून राहिलेला आहे. तेव्हा सगुण, साकार व सविकार असलेले जे दानव आहेत, दुष्ट पुरुष आहेत, त्यांना शिक्षा देण्यासाठी परमेश्वरालासुद्धा सगुण, साकार होणे आवश्यक आहे. दोन योद्ध्यांमध्ये समान शस्त्र, अस्त्र असणे हा युद्धाचा नियम आहे. तेव्हा सगुण, साकाराशी युद्ध करण्यासाठी परमेश्वरालाही सगुण साकार होणे आवश्यक आहे. निर्गुण निराकार परमेश्वराजवळ

अमर्याद शक्ती आहे. पण तेच त्याने सगुण, साकार रूप घेतले की त्याला देहाची मर्यादा सांभाळावी लागते. त्यामुळे त्याच्या शक्तीलाही मर्यादा पडते आणि समान शस्त्र, अस्त्र असणे हा नियमही पाळल्यासारखे होते. तसेच परमेश्वराच्या अवतारात त्याला दान देण्याबाबतही मर्यादा पडते. जे जे सगुण साकार परमेश्वराची उपासना करतात त्यांना परमेश्वर सगुण साकारच वस्तू देतो. म्हणजे संसारातीलच गरजा भागवतो. पण जे निर्गुण निराकार परमेश्वराची उपासना करतात त्यांना भगवंत, पमरेश्वर फक्त निर्गुण निराकार असे आपले स्वरूपच बहाल करतो. पण निर्गुण निराकाराची उपासना देहधारी मनुष्यांना करणे त्रासदायक आहे.

*'क्लेशोऽधिकतरस्तेषाम् अव्यक्तासक्तचेतसाम् ।*
*अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥'*

*(१२.५ भ. गी.)*

अर्थ – अव्यक्त तत्त्वांमध्ये ज्यांचे चित्त निमग्न झाले आहे, त्यांना (व्यक्तोपसकांपेक्षा) अधिक कष्ट भोगावे लागतात. कारण देहधारी प्राण्यांना अव्यक्त तत्त्वांची प्राप्ती (मोठ्या) कष्टाने होते.

तरीही अनन्य भक्तीने परमेश्वरप्राप्ती होते आणि अशी संतांची उदाहरणे आहेत.

## परमेश्वराची भक्ती

'एकोऽहं बहुस्याम्।' या परमेश्वराच्या संकल्पाबरोबर जे स्फुरण उत्पन्न होते त्याला शक्ती म्हणतात. ही भगवंताची सृजनशक्ती होय. या शक्तीमधून तीन शक्ती उदय पावतात. त्यांत पहिली चित्‌शक्ती होय. ही सर्व शक्तींमध्ये सर्वश्रेष्ठ आहे. दुसरी शक्ती सत्‌शक्ती. ही शक्ती ज्ञानगर्भित असते. तर तिसरी शक्ती ही आनंदशक्ती होय. या शक्तीत क्रियाशक्ती गर्भित असते. ज्ञानशक्तीला शिवशक्ती असेही म्हणतात व क्रियाशक्तीला महामाया, वाग्देवी किंवा शारदा म्हणतात. शिव सर्वज्ञ व मंगलकारी असतो, तर शारदा विश्वाचा पसारा वाढवण्याचे कार्य करते. सतत बदलत राहणे हा तिचा स्वभाव आहे. ही शक्ती पुढे प्रत्येक वस्तुमात्रात अवतरते. उदा. पृथ्वीमध्ये धारणाशक्ती, पाण्यामध्ये विलयनशक्ती, अग्नीमध्ये दाहकशक्ती, वायूमध्ये चलनशक्ती, आकाशामध्ये व्यापकशक्ती, मनामध्ये संकल्पशक्ती, बुद्धीमध्ये विचारशक्ती, श्रद्धेमध्ये आत्मशक्ती प्रत्ययास येते. हे विश्व परमेश्वराने निर्माण केले आहे म्हणून त्यात या तीनही शक्ती अवस्थित असतात म्हणून ईश्वर हा निर्माता, भर्ता,

पालनकर्ता, अधिष्ठाता व संहार्ता या सर्व प्रकारच्या शक्तींनी संपन्न आहे. या शक्ती परमेश्वराच्या ठिकाणी स्वभावसिद्ध, अनादिसिद्ध आणि सहजसिद्ध आहेत, हे महत्त्वाचे आहे. या शक्ती परमेश्वराचे अंगच आहेत. विश्व निर्माण करण्याचा मूळ संकल्प हा ॐकारस्वरूप असतो. त्यालाच शब्दब्रह्म म्हणतात. या शब्दब्रह्माचे सूक्ष्मस्वरूप चार वाणींच्या स्वरूपाने मनुष्याच्या ठिकाणी विलसत असते. त्यांपैकी परावाणी ही वाग्देवी होय. ईश्वराची ज्ञानशक्ती जी संविद् स्वरूपाने वावरते, तीच सूक्ष्मरूपाने माणसाच्या ठिकाणी स्वतःच्या, परमेश्वराच्या स्वरूपाविषयी अज्ञान असते आणि त्यामुळेच तो स्वतःला शरीरभावाने असलेल्या उपाधीच्या रूपाने ओळखत असतो. 'मी कोण' असा प्रश्न त्याच्या ठिकाणी उत्पन्न झाला असता तो स्वतःला अमुक नावाचा, अमुक पित्याचा मुलगा, अमुक कुळाचा, गोत्राचा, अमुक शिकलेला, हुद्यावर असणारा, घरदार, बायको, मुले, जमीनजुमला असलेला, रंगारूपाने ओळखणारा असतो आणि याच उपाधीचा अभिमान बाळगणारा, या उपाधी जपणारा आणि उपाधींच्या उत्कर्षाने आनंदी होणारा व नाशाने दुःख भोगणारा होतो आणि ज्यावेळी माणसाला या उपाधींविषयी पूर्ण वैराग्य निर्माण होते, उपासनेने तो तपाचरण करू लागतो, त्या वेळी त्याच्या ठिकाणी कुंडलिनी जागृत होते. कालांतराने समाधीचा अनुभव येतो व तपस्या पूर्ण होताच त्याला त्याचे स्वस्वरूप, ईश्वरी स्वरूप प्रत्ययाला येते. त्याच्या ठिकाणी स्वयंभू असलेले ज्ञान उदय पावते, त्याची प्रज्ञा पालवते, त्याला ऋतंभरा प्रज्ञा प्राप्त होते व ईश्वरी शक्तीही प्राप्त होते.

### ज्ञान-विज्ञान

ज्ञान आणि विज्ञान या शब्दांविषयी नेहमीच जरा गोंधळ होतो. सध्या लौकिकात ज्ञान या शब्दाचा जेथे जेथे म्हणून वापर होतो तो तो माहिती असणे, समजणे, आकलन होणे, कळणे वगैरे अर्थाने वापरला जातो. म्हणजे ते सर्व वस्तुनिष्ठ पदार्थांविषयीचे बोलणे, सांगणे असते. म्हणजे ते सर्व विज्ञानाविषयीच असते आणि विज्ञान म्हणजे 'विशेष ज्ञान'. 'विषयांचे ज्ञान' म्हणजे विज्ञान. एकूण आपणास फक्त विज्ञानच माहीत असते. आपण फक्त विज्ञानीच आहोत. ज्ञान म्हणजे काय? ज्ञान कशाने प्राप्त होते? भ्रांती कशाने जाते? ज्ञानाविषयी वेदान्तमते काय आहेत व ब्रह्मज्ञान कशास म्हणतात? या सर्व प्रश्नांची उत्तरे रामदासस्वामींनी दासबोधामध्ये केवळ एका-एका ओवीनेच दिली आहेत. याला 'सूत्ररूपाने कथन' असे म्हणतात. 'जेथून हे सर्व प्रगटे। आणि सकळ ही जेथे आटे। ते ज्ञान जालिया फिटे। भ्रांती

बंधनाची ।। मते आणि मतांतरे। जेथ होती निर्विकारे। अति सूक्ष्म विचारे। पाहता ऐक्य ।। जे या चराचराचे मूळ। शुद्ध स्वरूप निर्मळ। या नाव ज्ञान केवळ। वेदांतमते ।। शोधितां आपुले मूळ स्थान। सहजचि उडे अज्ञान। या नाव म्हणिजे ब्रह्मज्ञान। मोक्षदायिक ।। आपणासि वोळखो जातां। आंगी बाणे सर्वज्ञता। तेणे येकदेसी वार्ता। विशेष उडे ।।' (दशक ५, समास ६ ओवी २६ ते २० दासबोध) असे ज्ञानी कदाचित असतील पण ते फार थोडेच असतील तर ते ज्ञानी कसे असतील तर भगवंतांनीच त्याची लक्षणे सांगितली आहेत.

*'अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।*
*एतज्ज्ञानमिति प्रोक्तम् अज्ञानं यदतोऽन्यथा ।।'*

*(१३.११ भ. गी.).*

अर्थ – ज्ञान-विज्ञानाची नेहमी चर्चा करणे, ब्रह्मज्ञानाचे तत्त्व नेहमी लक्षात ठेवणे या सर्वांना ज्ञान (ज्ञानप्राप्तीची साधने किंवा ज्ञानाची लक्षणे) असे म्हणतात आणि ते ज्याच्या विरुद्ध ते अज्ञान होय.

तेव्हा ज्ञान म्हणजे केवळ परमेश्वराविषयी, परमेश्वराचे स्वरूप जाणण्याविषयीचे जे काही असेल तेच फक्त ज्ञान होय. बाकीचे सर्व विज्ञान होय. मग विज्ञानाविषयी अध्यात्म ज्ञानोपासक उदासिन असतात. का? किंवा त्यांना विज्ञानाविषयी तिरस्कार वाटतो का? किंवा विज्ञान हे निरूपयोगी आहे असे वाटते का? तर तसे नाही कारण विज्ञानाचे तत्त्व भगवंतांनीच स्पष्ट केले आहे.

*ज्ञानं तेऽहं सविज्ञानम् इदं वक्ष्याम्यशेषतः ।*
*यज्ज्ञात्वा नेह भूयोऽन्यद् ज्ञातव्यमवशिष्यते ।।*

*(७. २ भ. गी.).*

अर्थ – मी तुला हे विज्ञानासह (विविध सृष्टिज्ञानासह) म्हणजे व्यक्त सृष्टीच्या (स्वरूपासह) ज्ञान (आत्मज्ञान म्हणजे अव्यक्त स्वरूपाचे ज्ञान) पूर्णपणे सांगतो, ते जाणल्यावर या लोकी आणखी दुसरे जाणावयाचे (काही) शिल्लक उरत नाही.

याविषयी स्पष्टीकरण करताना संत ज्ञानदेवांनी असे विवेचन केले, 'एथ विज्ञाने काय करावे। ऐसे घेसी जरी मनोभावे। तरी पै आधी जाणावे। तेचि लागे ।। मग ज्ञानाचिये वेळे। झाकती जाणिवेचे डोळे। जैसी तीरी नाव न डळे। टेकली सांती ।। तैसी जाणीव येथ न रिघे। विचार मागुता पाउली निघे। तर्क आयणी नेघे। आंगी

जयाच्या ।। अर्जुना तया नांव ज्ञान। येर प्रपंचू हे विज्ञान। तेथ सत्यबुद्धि ते अज्ञान। हेही जाण ।।' (७. ३ ते ६ ज्ञानेश्वरी).

आत्माज्ञानाविषयी उत्सुक असलेल्या साधकाला विज्ञान काय करावयाचे असा सहज प्रश्न येतो तरीही विज्ञानाविषयीच प्रथम माहिती करून घेणे आवश्यक आहे. याला उदाहरण म्हणजे लहान मुलांनी आंबा खाल्ला तर चवीमुळे त्याला तो आवडेल पण आपण काय खातो याची त्याला कल्पना येणार नाही. मूल आईला 'आई' म्हणते, पण आईचे वात्सल्य त्याला कळत नाही. पण जेव्हा आंबा या फळाविषयी, त्याच्या उत्पत्तीविषयी, त्याच्या विशिष्ट ऋतूत तयार होण्याविषयी, इतर फळांच्या तुलनेत त्याची किंमत समजल्यावर, त्याच्या उत्पादनातील प्रमाण समजल्यावर जेव्हा तो जाणीवपूर्वक फळाचा आस्वाद घेईल तेव्हा त्याला विशेष आनंद होईल. तसेच 'आई' हे नेमके कोणते नाते आहे. इतर नात्यांच्या मानाने 'आई' हे नाते किती जवळिकीचे आहे, आईने आपले पालन पोषण कसे अगदी गर्भात असल्यापासून केले आहे, आणि आपली ती किती काळजी करते व आपल्या सुखासाठी आईचा जीव किती तळमळत असतो, हे सर्व कळल्यावर त्या मुलाला आपल्या आईच्या वात्सल्याची जी जाणीव होईल, तेव्हा त्याला खरे 'आई' म्हणून हाक मारण्यात सुख वाटेल, आनंद होईल. 'आंबा' व 'आई' हे जर ज्ञान असेल तर बाकीचे सर्व विज्ञान आहे. पूर्ण ज्ञान तेव्हाच होते जेव्हा त्यामागचे विज्ञान समजते. या बाबतीत आणखी एक उदाहरण घेता येईल. समजा आपण विमानाने प्रवासाला निघालो आहोत. शेजारच्या व्यक्तीशी आपले बोलणे, गप्पा होतात. चहा-कॉफीची देवघेव होते. आणि शेवटी विमानतळावर त्या व्यक्तीला घेण्यासाठी मोटारींचा ताफा आलेला असतो, तेव्हा कळते की ती व्यक्ती पंतप्रधान होती. आणि मग त्या व्यक्तीच्या सहवासात आपण कसे वागलो, त्या व्यक्तीला योग्य मान न देता वागल्याची खंत मनात येते. आपण एका पंतप्रधानाशी बोलत होतो याचा आनंदही घेता आलेला नव्हता. याचीही खंत मनाला सलत असते. कारण त्या व्यक्तीविषयीचे विज्ञान आपणास माहीत नसते. म्हणजे खऱ्या ज्ञानाचा आनंद घ्यावयास पाहिजे असेल तर त्याचे विज्ञानही माहीत पाहिजे. समजा देव आपणासमोर येऊन उभा राहिला आणि म्हणाला 'तुला काय पाहिजे ते माग?' आपणास तो देव आहे याची कल्पना नसेल, देव काय देऊ शकतो याची कल्पना नसेल तर आपण काय मागणार? काहीतरी फुटकळ मागून बसू. कल्पतरूखाली बसावे आणि त्याला भाजी-भाकरी मागावे तशातला प्रकार होईल. म्हणून ज्ञानाबरोबर विज्ञानही माहीत असल्यास आपणास त्या ज्ञानाचा आनंद घेता येईल.

आतापर्यंत ज्या ज्ञानाविषयी आपण विचार केला त्या लौकिकातील 'ज्ञेय' वस्तू होत्या. आंबा, आई, पंतप्रधान, कल्पवृक्ष, वगैरे. पण भगवंतांनी जे ज्ञान म्हटले आहे ते परमेश्वराविषयीचे. तो परमेश्वरच खरा 'ज्ञेय' आहे. परमेश्वरप्राप्तीविषयीची जी उपासना, त्यापासून ज्या गुणांची प्राप्ती होते, जी लक्षणे साधकाच्या ठिकाणी प्रगट होऊ लागतात ती ज्ञानाची लक्षणे होत. ज्ञान ही वस्तू अशी नाही की जी कोठेही मिळते. ज्ञान हा एक भाव आहे. तो देहाद्वारेच प्रगट होतो. ते ज्ञान हृदयी स्वयंभूच असते. ते गुरुमुखातून कानावर पडले की हृदयातून प्रगट होते, म्हणून अध्यात्मज्ञानालाच ज्ञान म्हटले आहे. बाकीचे सर्व विज्ञान होय. विचार, तर्क या बुद्धीच्या कक्षेत येणाऱ्या गोष्टी आहेत. परमेश्वर हा सर्वसमावेशक असला, सर्व वस्तुमात्रांना अंतर्बाह्य व्यापून टाकले असले तरी, त्यामुळे परमेश्वर हा कोणाच्या तर्काने, विचाराने समजण्यासारखा नाही. पण ज्या ठिकाणी विचाराची, तर्काची, सीमारेषा संपते तेथूनच परमेश्वराचे अस्तित्व सुरू होते. कारण विचार, तर्क हे अहंकाराने उत्पन्न होतात. ज्या ठिकाणी अहंकार आहे, 'मी' चे अस्तित्व आहे, देहभावाची जाणीव आहे, उपाधींची ओझी आहेत, तेथे परमेश्वराचे अस्तित्व नसते. या घरात एक भाडेकरू राहात आहे, तेथे मग मालक असला तरी त्याला कसे राहता ईल. आपण आपल्या देहात काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर, द्वेष, अनेक वस्तूंविषयीची ममता, घरदार, बायको, मुले, मान-सन्मान, वगैरे उपाधींना जागा दिली आहे. तेथे परमेश्वराला राहण्यास जागा तरी कोठे आहे? तेव्हा या सर्व उपाधी जेव्हा बाजूस सारल्या जातील, हे सर्व भाडेकरू घर सोडून निघून जातील, मन, बुद्धी, अहंकाराचाही जेव्हा लय होईल, तेव्हा परमेश्वराला तेथे वास्तव्य करता येईल. अशा स्थितीत जे प्राप्त होईल, नव्हे हे सर्व ज्या कारणाने प्राप्त होईल त्यालाच ज्ञान म्हणतात. ही समज, ही जाणीव यालाच ज्ञान म्हणतात.

सद्‌गुरूंकडून ज्याप्रमाणे काही गोष्टी कराव्या म्हणून उपदेश केला जातो, तसे काही गोष्टी करू नये म्हणूनही ते सांगत असतात. प्रवासाला कोणत्या रस्त्याने जावे म्हणून जसे सांगितले जाते तसे कोणत्या रस्त्याने जाऊ नये हेही सांगावे लागते. वैद्य जसा आजाऱ्याला काय खावे हे सांगतो, तसे काय खाऊ नये हेही सांगतो. कारण चांगल्या गोष्टीचे जसे चांगले परिणाम होतात तसे वाईट गोष्टीचे वाईट परिणाम होतात. म्हणून काय करू नये, काय खाऊ नये हेही सांगणे आवश्यकच आहे.

ज्ञान-विज्ञान हे सांगितले तर, आता अज्ञान हे काय आहे हेही सांगणे आलेच. भगवंतांनी ज्ञानाची लक्षणे सांगितली व शेवटी या ज्ञानलक्षणाच्या जे विरुद्ध ते सर्व 'अज्ञान' अशा थोडक्या शब्दांत अज्ञानाचे लक्षण सांगितले.

संत ज्ञानदेवांनी अज्ञानाच्या लक्षणांचा खूप विस्तार केला. कारण भगवंतांनी जे एका शब्दात सांगितले, ते सामान्य जनांना पुरे समजणार नाही. अज्ञानाच्या लक्षणांचा नेमका उलगडा होणार नाही. म्हणून संत ज्ञानदेवांनी त्याची सर्व लक्षणे वेगवेगळी करून सांगितली, तरीही संत ज्ञानदेवांनीसुद्धा एका ओवीच्या एका चरणात अज्ञानाचे लक्षण सांगून ठेवले आहे. ती ओवी अशी, 'अर्जुना तया नांव ज्ञान। येर प्रपंचु हे विज्ञान। तेथ सत्य बुद्धि ते अज्ञान। हेही जाण॥' (७. ६ ज्ञानेश्वरी) 'प्रपंच हे विज्ञान' आहे आणि त्याविषयी असलेली 'सत्य बुद्धी'- त्यालाच अज्ञान म्हणतात. प्रपंच खरा आहे, जे दिसते तेच खरे आहे, परमेश्वर, देव, दिसत नाही म्हणून ते नाहीच असे म्हणणे, मानणे, व त्याप्रमाणे वागणे याला अज्ञान म्हणतात. आजचा दिवस खरा, खा, प्या, मजा करा. उद्याचे कोणी पाहिले आहे. पाप, पुण्य या कल्पना आहेत. पुनर्जन्म नसतोच असे ज्यांचे विचार आहेत, ते अज्ञानी आहेत.

## ब्रह्मापासून अलग - अज्ञान हे मूळ

परब्रह्मापासून सृष्टीची उत्पत्ती झालेली आहे आणि सगळीकडे परब्रह्मच पसरलेले आहे. परब्रह्मावाचून अन्य काहीच नाही, असे विधान अद्वैत तत्त्वज्ञानी करत असतात आणि ते खरेही आहे. जर सगळीकडेच परब्रह्म आहे तर या सगळ्यात असलेले आपणही ब्रह्मस्वरूपच आहोत हे सहजच आले. पण सभोवताली असलेली विविधता - विचारात, आचारात दिसते ती कशामुळे? हे राग-द्वेष, स्पर्धा-ईर्ष्या, वगैरे कशामुळे? तर त्याचे उत्तर संत ज्ञानदेवांनीच दिले आहे- 'आपला आपणपेयां। विसरू जो धनंजया। तेचि रूप यया। अज्ञानासी॥ (१४.७१ ज्ञानेश्वरी). आपणच आपले खरे स्वरूप विसरून गेलो आहोत. आपण कोण? कोठून आलो? कशासाठी आलो? आपली कर्तव्यकर्मे काय आहेत? आपण कशासाठी जगत आहोत? आपणाला येथे येऊन काय साधावयाचे आहे? ते साध्य साधण्याची काय साधने आहेत? आणि आपणाला कोठे जावयाचे आहे? कशासाठी जावयाचे आहे? तेथे जाऊन काय करावयाचे आहे? अंतिम ध्येय तेच आहे का? अंतिम सुख तेच आहे काय? सभोवतालच्या सृष्टीचा आपला काय संबंध आहे? सभोवतालच्या प्राणिमात्रांचे व मनुष्याचे आपले काय नाते आहे, या व अशा अनेक प्रश्नांची उत्तरे आपणाला

माहीत नाहीत, हेच मुख्य अज्ञान आहे. या प्रश्नांची उत्तरे आपणाला माहीत नाहीत. का? अर्धवट माहीत आहेत. का? जे काही पाहिले, ऐकले, वाचले त्यामध्ये जो फरक आहे त्याबाबत आपणास काहीच निर्णय करता येत नाही. हे सर्व अज्ञान आहे. संत ज्ञानदेव या अवस्थेचे वर्णन करताना म्हणतात, 'पैल खांब कां पुरुखु। ऐसा निश्चयो नाही एकु। परि काय नेणे आलोकु। दिसत असे ॥ तेवि वस्तू जैसी असे। तैसी कीर न दिसे। परि काही अनारिसे। देखिजेना ॥' (१४.७६, ७७ ज्ञानेश्वरी) अर्धवट उजेडात खांब आहे पण दुरून पाहणाऱ्याला तो पुरुष आहे का खांब आहे याचा निर्णय घेता येत नाही. त्याप्रमाणे भोवताली सर्व परब्रह्म पसरलेले आहे. अशी वचने, ऐकली, वाचली पण बुद्धीवरील अज्ञानाच्या आवरणाने ते नक्की सांगता येत नाही, ओळखता येत नाही, त्याची प्रचीती येत नाही, त्याचा प्रत्यय येत नाही, त्याची अनुभूती येत नाही. हेच ते अज्ञान आहे. बुद्धीवर अज्ञानाचे आवरण आले आहे. म्हणजे नेमके काय झाले आहे? 'आपला आपणपेयां। विसरू जो धनंजया।' आपल्याला आपलाच विसर पडला आहे. आपण आपणाला नाम-रूपाने ओळखतो, मी अमक्याचा मुलगा, मी अमुक शिकलेलो, मी अमुक हुद्यावर, अमुक एका कार्यालयात काम करतो. माझे हे घर, ही माझी बायको, ही माझी मुले वगैरे. हे जे मी, माझे, माझी सर्वनामे आहेत, ही कोणाची निर्देश करतात? 'माझे' म्हणताना आपला हात छातीवर ठेवला जातो. तेव्हा आपणाला कोणाचा निर्देश करावयाचा असतो? आत्म्याचा की देहाचा? माझा जीव कासावीस होतो. माझा देह सुंदर, सुडौल आहे. माझा आत्मा तुम्हाला दुवा देईल म्हणजे छातीवर हात ठेवूनही आपण देह, जीव, आत्मा यांपैकी कोणाचाही निर्देश करीत नाही, असा त्याचा अर्थ होतो. कारण देह, जीव , आत्मा हीसुद्धा 'माझीच' आहेत, असे आपण म्हणतो. मग हा 'मी' 'माझा' 'माझी' म्हणजे नेमके कोण आहे? देह, जीव, आत्मा यांपेक्षाही वेगळा कोणीतरी 'माझा' 'मी' म्हणून उल्लेख करतो, असा त्याचा अर्थ होतो. मला वाटते परमेश्वर, परब्रह्म हेच त्याचे उत्तर आहे. कारण आपण 'माझा परमेश्वर', 'परब्रह्म' माझे, असा कधीही वाक्प्रचार करीत नाही. परब्रह्म हेच 'माझे' खरे स्वरूप आहे. जीव, आत्मा, या प्रतिबिंब रूपाने आपल्या देहात परब्रह्मच अवतरले आहे. आरशात पाहताना आपण असे म्हणतो की, 'हे माझे प्रतिबिंब आहे' पण आपण स्वत:ला 'हे माझे बिंब आहे' असे कधीही म्हणत नाही. कारण आरशामुळे बिंबाला प्रतिबिंबत्व आलेले असते. जेव्हा आरसा बाजूला सरकवला जातो तेव्हा प्रतिबिंब नाहीसे होते. तेव्हा बिंबाच्या ठिकाणी असलेले बिंबत्व नामाभिधानही आपोआप नाहीसे होते.

तसे सृष्ट पदार्थाच्या रूपाने परब्रह्मच प्रतिबिंबित झालेले आहे. ज्या वेळी या विविधतेचा भेद बाजूला सारला जाईल, तेव्हा प्रतिबिंबाचे प्रतिबिंबत्व नाहीसे होईल व केवळ बिंबच उरेल. पण त्या वेळी बिंबाचे बिंबत्वही नाहीसे होईल व केवळ परब्रह्मच उरेल. हा चिंतनाचा, अभ्यासाचा विषय आहे. कारण जसे कोणताही विषय एकदा वाचून समजत नाही, त्याची वारंवार उजळणी करावी लागते, प्रयोग करून त्याची प्रचीती घ्यावी लागते, त्यावर विचार, चिंतन करावे लागते, म्हणजे चित्तावर त्याचे संस्कार होतात व मग ते पक्के होतात व कालांतराने त्याची प्रचीती, अनुभूती येते. ज्या वेळी त्याची अनुभूती येते त्या वेळी हा विविधतेचा जो पसारा आहे, जो भेद आहे, तो मावळून जातो. परब्रह्मच सगळीकडे आहे असे जाणवते. संत ज्ञानदेव याचे वर्णन करताना म्हणतात– 'आणिकही एक असे। जे विचारावेळे न दिसे। वाती पाहता दिसे। आंधारे का ।।' (१४.७२ ज्ञानेश्वरी). ज्याप्रमाणे दिवा हातात घेऊन अंधार पाहू गेल्यास अंधारच नाहीसा होऊन केवळ सर्व प्रकाशमय होते. तसे, जसे जसे याचे चिंतन करावे तसे तसे अज्ञानाचा अंधार नाहीसा होतो व ज्ञानाचा, अनुभूतीचा स्वच्छ प्रकाश सगळीकडे पसरतो, अर्थात ह़ा अभ्यास काही एका जन्मात होणार नाही, तर अनेक जन्मांचा आहे, असेच आत्तापर्यंतच्या संत वाङ्मयावरून वाटते. प्रवास खूप लांबचा व अनेक मुक्कामांचा असला तरी जसा प्रवास करणारा करतच असतो, तसे हा अभ्यास अनेक जन्मांचा असला तरी हा प्रवास पुरा करून त्याची अनुभूती सांगणारे संत आहेत.

वटवृक्षाचे बीज किती लहान असते, पण त्या लहान बीजामध्ये केवढा मोठा वृक्ष उत्पन्न करण्याचे सामर्थ्य असते! त्या वृक्षाचा विस्तार वाटेल तेवढा होऊ शकतो. त्याचा पसारा वाटेल तेवढा वाढू शकतो व त्याचे आयुष्यही खूप वर्षे असू शकते. हा वृक्ष तसा सहजासहजी मरतही नाही. त्याप्रमाणे संसारवृक्षाचा पसाराही खूप मोठा आहे. अनादी कालापासून हा चालत आलेला आहे, पुढे कितीतरी वर्षे हा असाच चालत राहणार आहे. त्याला कधी शेवट आहे असे वाटतच नाही. याचे बीज हे 'अज्ञान' आहे. या अज्ञानामध्येच या संसारवृक्षाचे अस्तित्व आहे, त्याचा उगम आहे, त्याचा विस्तार आहे आणि अज्ञानामुळेच त्याला आयुष्य आहे. हे अज्ञान आहे स्वस्वरूपाचे. 'वस्तुसी आपला जो अबोधु। तो ऊर्ध्वी आठुळैजे कंदु। वेदांत हाचि प्रसिद्धु। बीजभावो ।। घन अज्ञान सुषुप्ति। तो बीजांकुरभावो म्हणती। येर स्वप्न हन जागृती। हा फळ भावो तियेचा ।। ऐसी यया वेदांती। निरूपण भाषा प्रतीति। परी ते असो प्रस्तुति। अज्ञान मूळ ।।' (१५.८८ ते ९० ज्ञानेश्वरी). एक गोष्ट इथे महत्त्वाची आहे की हा

संसारवृक्ष फक्त अज्ञानांनाच भासत असतो. नदीचा प्रवाह जोराने वाहात असतो. त्यात अनेक वस्तू वाहात जात असतात. पण जे सचेतन आहेत व या प्रवासातून बाहेर येण्याचा प्रयत्न करतात तेच फक्त या प्रवाहातून बाहेर येतात. व त्यांच्या दृष्टीने ते त्या प्रवाहातून मुक्त झालेले असतात. जे प्रयत्न करीत नाहीत, प्रवाहपतित आहेत ते प्रवाहातच राहतात व प्रवाहातच बुडतात. प्रवाह हा त्यांना कोठे व कसे घेऊन जावयाचे ते ठरवत असतो.

यावरून रामदासस्वामी दासबोधात म्हणतात–

*'ब्रह्मा विष्णू आणि हर । त्यांसी निर्मिता तोचि थोर ।*
*तो वोळखावा परमेश्वर । नाना यत्ने ।।'*

*(दशक ६, समास १२, ओवी १२ दासबोध).*

परमेश्वरालाच का शोधावा, ओळखावा? परमेश्वरालाच का एवढे महत्त्व आहे? याविषयी रामदासस्वामी पुढे म्हणतात–

जीवनामध्ये येऊन काय करावयाचे याचे उत्तर स्वामी या समासामध्ये देतात व त्या कार्याचा शेवट कोठपर्यंत न्यावा याचीही मर्यादा या ओवीतून सांगतात. आपण कोणाच्याही घरी गेलो आणि आपले स्वागत कोणी नोकर, घरातील वयाने लहान असलेला त्या यजमानाचा मुलगा, मुलगी, भाऊ किंवा यजमानाच्या पत्नीने जरी केले तरी या सर्वांच्या केलेल्या स्वागताचा स्वीकार करून, त्यांना योग्य तो मान देऊन आपण पुन्हा प्रत्येकाजवळ यजमानांचीच चौकशी करतो. कारण घरच्या यजमानालाच सर्व अधिकार असतात. तोच आपले काम करण्याची शक्यता असते. बाकीचे सर्व हे त्याच्या अधिकाराच्या खाली असतात. आपण जरी एखाद्या गोष्टीची मागणी केली वा एखादे काम सांगितले तरी सर्व जण हेच उत्तर देतील की 'यजमानांना विचारून देऊ, करू', पण यजमानांनाच विचारल्यावर त्यांना कोणालाही विचारण्याची आवश्यकता नसते. ते आपल्या स्वतःच्या अधिकारात निर्णय घेऊ शकतात. अगदी याच पद्धतीने एखाद्या गावात गेल्यावर ग्रामाधिपती मोठा राज्यात गेल्यावर राजा श्रेष्ठ, राजापेक्षा चक्रवर्ती राजा श्रेष्ठ व त्यांनाही निर्माण करणारा जो देव तो त्यांच्यापेक्षाही श्रेष्ठ असला पाहिजे. या देवांनाही निर्माण करणारा जो परमेश्वर तो सर्वश्रेष्ठ आहे, म्हणून परमेश्वराचा शोध घेणे, त्याची भेट घेणे, त्याचे दर्शन घेणे हेच जीवनाचे खरे ध्येय असावे. बाकीचे देव जे देतील ते मुलाला नोकरी, मुलीचे लग्न, संपत्ती, संतती, आरोग्य, वगैरे संसारातील शेकडो, हजारो अडचणी दूर करतील. त्या सर्व गोष्टी कदाचित इतर

देवदेवतांची सेवा, उपासना करून मिळू शकेल. पण ह्या संसारसागरातून पार करण्याचे सामर्थ्य केवळ परमेश्वराकडेच आहे. म्हणून परमेश्वरप्राप्ती करून घेणे हेच महत्त्वाचे आहे.

*दृष्टीस लागली सवे । जे दिसेल तेचि पहावे ।*
*परंतु गुज ते जाणावे । गौप्य आहे ॥*

*प्रगट ते जाणावे असार । आणि गुप्त ते जाणावे सार ।*
*गुरुमुखे हा विचार । उमजो लागे ॥*

*जे उमजेना ते उमजावे । जे दिसेना ते पाहावे ।*
*जे कळेना ते जाणावे । विवेकबळे ॥*

*गुप्त तेचि प्रगटवावे । असाध्य तेचि साधावे ।*
*कानडेचि अभ्यासावे । सावकाश ॥*

*वेद विरंची आणि शेष । जेथ शिणले निशेष ।*
*तेचि साधावे विशेष । परब्रह्म ते ॥*

*तरी ते कोणेपरी साधावे । तेचि बोलिले स्वभावे ।*
*अध्यात्म श्रवणे पावावे । परब्रह्म ते ॥*

*पृथ्वी नव्हे आप नव्हे । तेज नव्हे वायू नव्हे ।*
*वर्णविक्त ऐसे नव्हे । अव्यक्त ते ॥*

*(दशक ६, समास २, ओवी २० ते २६ निवडक, दासबोध).*

वस्तू म्हणजे परब्रह्म स्वत:चे स्वरूप हे परब्रह्मस्वरूपच आहे. याची जाणीव जो विसरतो, अबोध म्हणजे अज्ञान, हेच या संसारवृक्षाचे मूळ आहे. या अज्ञानानेच संसारवृक्षामध्ये विविधता भासते, भेद उत्पन्न होतो. यालाच माया हेसुद्धा नाव आहे. विकार हे आश्रित आहेत. देहाच्या आश्रयाने ते प्रगट होतात. सर्व प्राणिमात्र हे अज्ञानीच आहेत. फक्त मनुष्यप्राणी, याला ज्ञानप्राप्तीचे मार्ग मोकळे आहेत, पण तरीही ज्ञानप्राप्तीसाठी फारच कमी प्रमाणात (ज्ञान म्हणजे विज्ञान नव्हे आध्यात्मिक ज्ञान) मनुष्य प्रयत्न करतात व त्यातही निष्ठेने फारच कमी प्रमाणात टिकून राहतात. 'यत् दृष्टि तत् सृष्टी' या सूत्राप्रमाणे विचार करता प्रत्येक मनुष्यमात्राच्या दृष्टीने त्याची त्याची सृष्टी वेगवेगळी असते. ज्या प्रचंड सृष्टीचा विस्तार दाखवला जातो तो सर्व

प्रत्येकाच्या सृष्टीत असतोच असे नाही. तर मनुष्य त्याच्या रोजच्या जीवनात तो ज्या ज्या वर्तुळातून, जनसंपर्कातून फिरत असतो. तीच त्याची सृष्टी आहे. इतर सृष्टी त्याच्या लेखी नसते. आता त्याच्या सभोवताली असणारी सृष्टी त्याला का भासते, तर तोही त्याच्या अज्ञानाचाच भाग आहे.

पूर्वीच्या ऋषी-मुनींनी अनेक प्रकारे या जगताचा विचार केला आहे व त्यावरून निरनिराळी, तत्त्वे, सिद्धांत, सूत्रे मांडली आहेत. त्यांपैकी 'यत् दृष्टि तत् सृष्टी?' असेही एक सूत्र मांडले आहे. जशी दृष्टी असेल तशी सृष्टी दिसेल, असेल. याला व्यवहारातील एक उदाहरण म्हणजे 'कावीळ झालेल्याला सर्व पिवळेच दिसते' किंवा 'जसा चष्मा तसा पदार्थांचा रंग?' असे म्हटले जाते. स्थूल रूपाने विचार करता वरील उदाहरणे बरोबर आहेत. पण तात्त्विक दृष्ट्या जशी दृष्टी असेल तशीच सृष्टी असते का? तर खरोखरीच खोल विचार करता वरील विधान शंभर टक्के बरोबर आहे असे वाटते. आपण मानतो म्हणून जग आहे. ही बायको, मुले, घरदार, पैसा, धनदौलत आपली आहेत असे आपण मानतो, पण जर आपण मानलेच नाही तर ती खरोखरीच आपली असतात का? तर नसतात. ज्याच्या ठिकाणी पूर्ण वैराग्य उत्पन्न झाले आहे आणि जो संन्यास घेऊ इच्छितो, त्याच्या दृष्टीने त्याला त्याचे सर्व नातेवाईक, घरदार, बायको, मुले, परके होत नाहीत काय? तर होतात. त्याचे काहीच नसते. असेच त्याने मनाने घेतलेले असते. आणि म्हणूनच तो ते सर्व इतक्या सहजासहजी सोडण्यास, त्यांचा त्याग करण्यास सिद्ध झालेला असतो. अशाच सर्व गोष्टींचा आपलेपणा, ममत्व आपण मानलेले असते म्हणून त्या आपल्या असतात. पण त्या खऱ्या अर्थाने आपल्या नसतात. त्याचा दृष्टांत खालील कथेवरून स्पष्ट होईल.

एक व्यापारी असतो. त्याच्या पत्नीला दिवस जातात. तेव्हा तो विचार करतो की आता काही दिवस परगावी जाऊन व्यापार करून यावे आणि त्याप्रमाणे तो सर्वांचा निरोप घेऊन व्यापाराला जातो. एका मोठ्या शहरात येतो. तेथे त्याचा व्यापारात जम बसतो व खूप पैसा मिळतो. तेथील व्यापाऱ्यांकडून त्याला व्यापाराच्या नवीन नवीन कल्पना मिळतात व त्याप्रमाणे तो आणखी दूरदेशी जाऊन नवीन नवीन वस्तूंचा व्यापार करतो व पुन्हा खूप पैसा मिळवतो. पण त्या पैसा मिळवण्याच्या नादात त्याचे घराकडे, बायकोकडे पूर्ण दुर्लक्ष होते. इतके की इकडे त्याची बायको बाळंत होते. तिला मुलगा होतो. मुलगा मोठा होतो व त्याचे लग्नही होते. पण त्या मुलाला एका असाध्य रोगाने पछाडलेले असते. तो मुलगा व त्याची आई या व्यापाऱ्याची बरीच वाट पाहतात. नोकर चौकशीला पाठवतात व पूर्ण पत्ता न मिळाल्याने त्यांना व्यापाऱ्याशी

कोणताच संपर्क साधता येत नाही. त्या आजारी मुलाला एकच खंत असते की आपण वडिलांना पाहिलेले नाही. तेव्हा तो आईला विचारून वडिलांच्या शोधार्थ बाहेर पडतो. बरोबर नोकर-चाकर तशीच बायकोही असते. गावोगावी चौकशी करत व मुक्काम करत हा मुलगा वडिलांचा शोध घेत प्रवास करीत असतो. इकडे त्या व्यापाऱ्यालाही वाटते की आता आपण खूप पैसा मिळवला आहे घरी जावे, म्हणून तोही सर्व धनदौलत घेऊन नोकरांसह प्रवास करत घराकडे निघालेला असतो. प्रवासाने मुलाची तब्येत फारच खालावते. एकदा एका धर्मशाळेत उतरले असता मुलाचा मृत्यू होतो. त्याच धर्मशाळेत तो व्यापारी उतरलेला असतो. नोकरांकरवी व्यापाऱ्याला कळते की धर्मशाळेत एका तरुणाचा मृत्यू झालेला आहे. त्याची तरुण पत्नीही त्याच्याबरोबर आहे. तेव्हा तो व्यापारी नोकराला जवळ बोलावतो व म्हणतो की 'बाबा रे, जे झाले ते फारच वाईट झाले. ईश्वरी इच्छेपुढे कोण काय करणार? असो. त्यांना काही मदत पाहिजे काय ते विचारून ये, म्हणजे आपल्याकडून काही करता येते का ते पाहता येईल?' याप्रमाणे व्यापाऱ्याची आज्ञा घेऊन नोकर चौकशी करण्यास त्या मुलाच्या नोकराकडे येतो व चौकशी करतो. तेव्हा त्याला कळते की ही सर्व मंडळी व्यापाऱ्याच्याच गावची असून ती व्यापाऱ्याच्याच शोधार्थ निघाली आहेत. तरुण हा व्यापाऱ्याचाच मुलगा असून ती तरुणी व्यापाऱ्याचीच सून आहे. हे सर्व कळताच तो नोकर पळत येऊन व्यापाऱ्याला ही सर्व हकीकत सांगतो. तेव्हा तो व्यापारी तरुणाच्या प्रेताजवळ जाऊन 'माझा पुत्र' म्हणून खूप शोक करतो आणि 'परमेश्वराने त्याचा असा तरुणपणीच कसा घात केला, त्याला नेण्याऐवजी परमेश्वराने मलाच नेले असते तरी चालले असते?' अशा प्रकारे खूप काही बोलू लागतो व शोक करू लागतो?

या प्रसंगात जोपर्यंत त्या व्यापाऱ्याला तो स्वतःचाच मुलगा आहे हे माहीत नव्हते तोपर्यंत मुलाच्या मृत्यूने त्याला विशेष दुःखही झाले नव्हते, पण तो तरुण त्याचाच मुलगा आहे याची कल्पना येताच व त्याच्या मनाने त्याचे पितृत्व स्वीकारताच त्याला दुःखाचा उमाळा आला. आतापर्यंत तो परका वाटणारा त्याला लगेच आपला वाटू लागला. हे ममत्व त्याने स्वीकारलेले, मानलेले असते म्हणून त्याला चिकटलेले असते. अन्यथा चिकटले नसते. तो मुलगा जन्माला आला, वाढला, त्याचा विवाह झाला तोपर्यंत त्याच्या मनी तो मुलगा नव्हता. त्याच्या मनाच्या व्याप्तीत तो मुलगा नव्हता. त्याच्या ठिकाणी स्वतःचा मुलगा असा संस्कार झालेला नव्हता, त्याच्या दृष्टीत तो मुलगा नव्हता तोपर्यंत तो त्याचा मुलगा नव्हता, पण ज्या वेळी हे सर्व झाले त्या

वेळी तो त्याचा मुलगा झाला. म्हणजे त्या मुलाचे अस्तित्व असूनही त्याच्या दृष्टीने तो मुलगा अस्तित्वात नव्हता. असो.

कोणतेही तत्त्व मनावर पूर्ण बिंबवण्यासाठी दृष्टांताचा आधार घ्यावा लागतो. म्हणून पुन्हा एका गोष्टीचा आधार घेऊया. ती गोष्ट थोडक्यात अशी आहे- एका खेड्यात एक गरीब ब्राह्मण होता. त्याला तीन मुले होती. अठरा विश्वे दारिद्र्य. गावात कोणतेही काम मिळत नव्हते वा भिक्षुकीही मिळत नव्हती. त्यामुळे विद्वता असून वाया जात होती. एके दिवशी बायकोला सांगून तो ब्राह्मण दूरदेशी राजाश्रयाला जाण्यासाठी निघून गेला. बाईची गरिबी पाहून कोणी परगावच्या धनिकाने त्यांतील मोठ्या मुलाला घरकामाला नेले. मुलगा प्रामाणिक व निष्ठेने काम करणारा होता. थोड्याच वेळात यजमानांची मुलावर मर्जी बसली. इकडे ब्राह्मणाला राजाश्रय मिळाला. काही वर्षे गेली. भरपूर पैसा मिळाला. ब्राह्मणाला पालखीचा मान मिळाला. अंगा-खांद्यावर दागिने, मोत्याचे कंठे रुळू लागले. डोक्यावर रेशमी पगडी आली. जरीकाठी धोतर व उपरणे आले. ब्राह्मणाला वाटले आता बायको, मुलाला घेऊन यावे. सगळेच आनंदात राहतील. ब्राह्मण मुक्काम करत गावाकडे निघाला. दरबारी प्रस्थ आले म्हणून धनिकाने मोठ्या आग्रहाने ब्राह्मणाला मुक्कामाला घरी बोलावले व त्याच्याच मुलाला त्याच्या सेवेला दिले. बापाने मोठा झाल्याने मुलाला ओळखले नाही व श्रीमंतीमुळे मुलाने बापाला ओळखले नाही. ब्राह्मणाला अचानक ज्वर आला. मुलाने चार दिवस ब्राह्मणाची उत्तम सेवा केली. ब्राह्मण बरा झाला. मुलाची सेवावृत्ती पाहून ब्राह्मणाने मनात ठरवले की मुलाला चांगली बक्षिसी द्यावी म्हणून जाण्यापूर्वी ब्राह्मणाने मुलाला जवळ बोलावले. त्याची चौकशी केली. नाव, गाव, विचारले आणि वडिलांचा विषय निघताच ब्राह्मणाला कळून आले की हा आपलाच मुलगा आहे. म्हणून ब्राह्मणाने मुलाला छातीशी कवटाळले. मुलालाही कळले की हा ब्राह्मण आपलेच वडील आहेत. आणि मग बक्षिसी देण्या-घेण्याचा विचार मनातच विरून गेला. कारण ते सर्व आता मुलाचेच होते. असो.

म्हणजेच याचा अर्थ असा आहे की, जगात ज्या ज्या वस्तू आहेत त्या त्या आपण आपल्या म्हणून मनात घेतलेल्या असतात, त्यांचे अस्तित्व मानलेले असते म्हणून त्या असतात. अन्यथा नसतातच. म्हणजे असूनही नसतातच. म्हणून हे विधान यथार्थाने खरे आहे की 'यत् दृष्टि तत् सृष्टि ।'

याच विधानाचा एका वेगळ्या दृष्टीने विचार केला आहे. तोही अर्थ अगदी यथार्थाने बरोबर आहे. कोणतीही संकल्पना मनात प्रथम उभी राहते. जे मनात उभे

राहते त्याचेच चित्रण दृष्टीसमोर साकार होते म्हणून 'संकल्पात् सृष्टि' असेही म्हणतात. आणि भक्ताचेही तसेच होते. भक्ताने नामजपाने, ध्यानाने ज्या रूपाचे अखंड चिंतन केलेले असते, तेच रूप परमेश्वराला भक्तासमोर उभे करावे लागते. कारण त्याच रूपावर त्या भक्ताचे प्रेम असते. सर्वाभूती परमेश्वर आहे, हे भक्तांना तत्त्वत: मान्य असते; पण नामजपासाठी त्यांना तेच रूप हवे असते. आणि आपल्या भक्तांचा हट्ट पुरवण्यासाठी देवांना त्या त्या रूपाने भक्ताला दर्शन द्यावे लागते. श्रीकृष्णजन्मात मारुतीला रामरूपाने दर्शन द्यावे लागले. तसेच जांबुवंताला श्रीकृष्णाने मल्लयुद्धात हरवल्यावर रामरूप धारण करून दाखवल्यावरच जांबुवंताचे समाधान झाले. विठ्ठल व राम हे दोन्ही एक परब्रह्मच आहेत, असे मानणारे रामदासस्वामी पंढरपूरला गेले तेव्हा त्यांना विठ्ठलाने रामरूपातच दर्शन दिले. तसेच दशरथ-कौसल्या यांच्या मागील जन्मीच्या उत्कट भक्तीसाठीच भगवंतांनी रामरूपाने त्यांच्या पोटी जन्म घेतला. परमेश्वराचे खरे रूप निर्गुण निराकार आहे, हे त्या भक्तांना जरी माहीत होते, तरी भक्तिसोहळा पुरा करण्यासाठी त्यांना सगुण रूपाचीच आवश्यकता होती. द्वैत भक्तीतच त्यांना खरा आनंद मिळत होता. म्हणून भक्तांच्या आनंदासाठीच देव-भक्त, सेव्य-सेवक, गुरू-शिष्य अशा अनेक द्वैतांचा सांभाळ करून ते केवळ त्या निर्गुण निराकार परमेश्वरालाच भजत होते हे निश्चितच. जसा ज्याचा भाव होता, ज्या रूपात त्यांनी परमेश्वराला पाहिलेले होते, तेच रूप त्यांना भावत होते. इतर रूपे जरी देवाचीच असली तरी ती त्यांच्या दृष्टीत नव्हती हेच खरे.

एकूण विचार करता आपण मानतो, अज्ञानाने मानतो म्हणून ही विविधता, ही विविध सृष्टी आपणाला भासते, दिसते. अन्यथा दिसली, भासली नसती. 'घन अज्ञान सुषुप्ति' आत्मा देहात प्रतिबिंबित झालेला आहे. तो साक्षीभावाने देह, देहाकडून होणारे कार्य पाहात असतो. जागृती, स्वप्न व सुषुप्ती या देहाच्या तिन्ही अवस्थांमध्ये त्याचे कार्य अविरत चालू असते. जागृती अवस्थेतील आत्म्याला 'विश्व' म्हणतात. स्वप्नावस्थेतील साक्षी आत्मरूपाला 'तेजस' असे म्हणतात. त्या आत्मतेजानेच स्वप्नसृष्टी प्रकाशित होत असते. तसेच सुषुप्तीकाळी 'प्राज्ञ' या नावाने आत्मरूप साक्षी असते. म्हणून ज्या वेळी मनाचेही कार्य थांबलेले असते व एका गाढ झोपेचा अनुभव पुरुष घेत असतो, त्या वेळी तो पूर्ण अज्ञानावस्थेत असतो. म्हणून त्या अवस्थेच्या साक्षी आत्म्याचा 'प्राज्ञ' म्हणजे प्रकाशाने अज्ञ असा निर्देश केला जातो. त्यातूनच ज्ञानाचे लक्षण म्हणजे 'स्वप्न' उदयाला येते, जे केवळ मिथ्या असते. कारण ज्या वेळी 'जागृती' येते त्या वेळी स्वप्नाचे मिथ्यात्व लक्षात येते. त्याचप्रमाणे 'जागृती' ही पुढची

अवस्था होय. या अवस्थेत भासणारे विश्व जरी विविधतेने नटलेले दिसत असले, भासत असले, तरी त्या वेळी आत्मसाक्षात्कार होतो. सर्वारूपी परमेश्वराचा, परब्रह्माचा प्रत्यय येतो. त्या वेळी ही विविधता लय पावते. म्हणजे जी विविधता दिसत, भासत होती ती मिथ्या आहे असे जाणवते. म्हणून संत ज्ञानदेवांनी म्हटले आहे की 'घन अज्ञान सुषुप्ति। तो बीजाकुंर भावो म्हणती। येर स्वप्न हन जागृती। हा फळभावो तियेचा॥' (१५-८९) याच सुषुप्ती मधून जेव्हा पुढील 'तुरीया' ही चौथी अवस्था प्राप्त होते, त्या वेळी मनाचे उत्थान होत नाही व त्या अवस्थेत अज्ञानही राहात नाही.

सुषुप्तिकाली ब्रह्मानुभव नाही असे म्हणतात. तर कारण काय? त्याला संत एकनाथ महाराज देतात–

*'सुषुप्ति ब्रह्मानुभावो आहे। तरी कां पुढती संसारू पाहे।*
*तेथ अविद्येसी अहं लीन राहे। यालागी होय भवभ्रमु॥'*

*(अध्याय ३, ओवी ७३३ ए. भा.).*

## अज्ञान वृक्षाचे छेदन

एकदा जनकराजाला दुपारच्या भोजनानंतर वामकुक्षीच्या वेळी स्वप्न पडले. त्या स्वप्नात राज्यावर परचक्र आले. त्या शत्रू राजाने जनकाचा पराभव केला. त्याला राज्यातून हाकलून दिले. त्या वेळी दुपारच्या वेळी जनक राजा उपाशी पोटी रस्त्यातून जात होता. त्याला खूप भूक लागली होती. रस्त्यावर एक दानशूर खिचडीचे वाटप करत होता, त्याच्या भोवती खूप गर्दी होती. सगळे जण हात वर करून खिचडी मिळवण्याचा प्रयत्न करीत होते. जनकानेही त्या गर्दीत घुसून खिचडी मिळवण्याचा प्रयत्न केला. त्याच्या हातात खिचडीचा द्रोण आला. तो द्रोण घेऊन जरा बाजूस जाण्याचा विचार करीत असतानाच कोणाचा तरी धक्का लागून त्यातील खिचडी खाली मातीत पडली. जनकाला भुकेची कळ आली आणि जनकाने डोळे उघडले. त्याने आपल्या अवस्थेचे निरीक्षण केले. त्याच्या लक्षात आले की पोट भरले असून भुकेची कळ आली होती. राजा असूनही भिकारी असल्याचे दिसले होते. अंगावर उत्तम कपडे असूनही भिकाऱ्याचा वेश दिसला होता. उत्तम गार सावलीत असूनही रणरणते ऊन भासत होते. तेव्हा 'ते खरे का हे खरे?' हा प्रश्न जनकाला पडला. आणि जनकाने विद्वानांच्या सभेत हा प्रश्न मांडला. 'ते खरे का हे खरे?' अर्थात विद्वानांना राजाचे स्वप्न माहीत नसल्याने त्यांना प्रश्नाचा रोख समजत नव्हता व त्यामुळे ते उत्तर देऊ

शकत नव्हते. तेव्हा राजाने सर्व विद्वानांना प्रश्नाचे उत्तर मिळेपर्यंत बंदीत ठेवले. सर्व विद्वान याच प्रश्नावर विचार करीत होते. त्या विद्वानांत अष्टावक्राचे वडीलही होते.

स्वत:च्या वडिलांच्या शोधात अष्टावक्र जनकाच्या राज्यात आल्यावर त्याला राजाचा प्रश्न समजतो. अष्टावक्र हा प्रज्ञावान असल्याने त्याला राजाच्या प्रश्नाचे रहस्य समजते. तो जनकाच्या दरबारात जातो. राजा अष्टावक्रालाही तोच प्रश्न विचारतो. 'ते खरे का हे खरे?' अष्टावक्र सांगतो, 'राजा, तेही खरे आणि हेही खरे. स्वप्नावस्थेत जे दिसते, ते स्वप्नावस्थेपुरते खरे असते पण जागृतावस्थेत आल्यावर ते मिथ्या ठरते. पण जागृतावस्थेत जे दिसते ते खरे भासते, पण राजा, ज्या वेळी परमेश्वराचा अपरोक्ष साक्षात्कार होतो त्या वेळी हे बाह्य जग, त्यातील विविधता सर्व मावळून जाते व सर्वाभूती भरलेला परमेश्वरच फक्त अनुभूतीला येतो. त्या वेळी हे बाह्य जग, ही विविधता, हे सर्व विषय मिथ्या ठरतात. म्हणून तेही खरे आहे व हेही खरे आहे; तसेच तेही खोटे आहे आणि हेही खोटे आहे.' अद्वैताचे निरूपण अशा प्रकारे केले जाते.

श्रीभगवंतांनी गीतेच्या सातव्या अध्यायाच्या चौदाव्या श्लोकात

*'दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया।'*

असे दैवी मायेचे वर्णन केले आहे व त्याचा संत ज्ञानदेवांनी अतिशय सुरेख विस्तार केला आहे. ते म्हणतात, 'या गुणमयी मायेला तरून जाण्याचा जो जो प्रयत्न करावा तो तो त्यात जास्तच अडकावयास होते, वा ते सर्व प्रयत्न विफल होऊन जातात. कारण ते प्रयत्न करणारे स्वत:च्या अहंकाराच्या रूपाने प्रयत्नशील असतात. ते कधीही यशस्वी होण्याची शक्यता नसते. माया नदी तरून जाऊन जर परमेश्वराकडे जावयाचे असेल तर त्या प्रयत्नात परमेश्वराचे अधिष्ठान पाहिजे. पण त्या अधिष्ठानाशिवाय प्रयत्न करणे म्हणजे गळ्यात अहंकाराचा धोंडा बांधून पोहण्याचा प्रयत्न करण्यासारखे आहे.' म्हणून शेवटी संत ज्ञानदेव म्हणतात, 'म्हणऊनि गा पांडुसुता। जैसी सकामा न जिणवेची वनिता। तेवी मायामय हे सरिता। न तरवे जीवा।।' (७.९६ ज्ञानेश्वरी). अर्थ– ज्याप्रमाणे बाईलवेड्या मनुष्याला आपली बायको ताब्यात ठेवता येत नाही, त्याप्रमाणे (सामान्य) जिवाला ही मायानदी तरणे शक्य नाही. मग कोण ही माया नदी तरून जाऊ शकतो, तर त्याच्या पुढील ओवीतच संत ज्ञानदेव उत्तर देतात, 'येथ एकचि लीला तरले। जे सर्वभावे मज भजले। तया ऐलीच थडी सरले। मायाजल।।' (७.९७ ज्ञानेश्वरी). जे भक्त सर्वार्थाने परमेश्वराला शरण गेले, तेच सहज मायानदी तरून जाऊ शकतात, पण पुढच्या दीड चरणात संत

ज्ञानदेव म्हणतात की, त्यांना ती मायानदीच नसते. त्यांच्या ऐलथडीवरच मायानदीचे पाणी आटलेले असते. कारण ते तेथे नसतेच.

याबाबत प्रश्नोपनिषद म्हणते–

*सदा सर्वे प्रमुच्यते कामा येऽस्य हृदि श्रिताः ।*
*अथ मर्त्योऽमृतो भवति अत्र ब्रह्म समश्नुते ॥*

अर्थ- मनुष्याच्या हृदयात चिकटून राहिलेल्या वासना जेव्हा सुटतात तेव्हा मनुष्य अमृत होतो. तो इथेच ब्रह्म प्राप्त करतो. (अमृत = अ-मृत).

भगवान श्रीकृष्णांनी संसारवृक्षाचे वर्णन गीतेच्या पंधराव्या अध्यायात केले आहे. संत ज्ञानदेवांनी त्या वृक्षाच्या विस्ताराचे एवढे वर्णन केले आहे की आपल्या नजरेत तो वृक्ष मावतच नाही. अशा या संसारवृक्षाचे छेदन कसे करावे, हाही एक मोठा प्रश्न अर्जुनाने कृष्णापुढे उभा केला. संत ज्ञानदेव म्हणतात, 'परि तुझ्या न पोटी। ऐसे गमेल किरीटी। जे येवढे झाड उत्पाटी। ऐसे कायी असे ॥' (१५.२१० ज्ञानेश्वरी). अर्जुनाच्या चिंतेचे निराकरण करताना संत ज्ञानदेव पुढे म्हणतात– 'गंधर्व दुर्ग पाडण्यासाठी काय कष्ट पडतात!' किंवा 'बाळाला भीती दाखवण्यासाठी निर्माण केलेल्या बागुलबुवाला काय हाकलून देण्याची गरज आहे!' किंवा 'आकाशपुष्पाला तोडण्यासाठी काय मेहनत घ्यावी लागते!', तर या दृष्टांतात ज्या वस्तूंच्या कल्पना केलेल्या आहेत त्या मुळातच अस्तित्वात नाहीत. मग त्या बाबतीतचे कार्य करणे हेही आवश्यक नाही. तसे मुळात वर्णन केलेला संसारवृक्षच जर नाही, तर त्याला तोडण्यासाठी कोणते साधन हवे आहे? त्याला तोडण्यासाठी कष्ट घेण्याची तरी काय जरुरी आहे? मग हा संसारवृक्ष तरी आहे कसा? त्याचे स्वरूप कोणत्या पद्धतीचे आहे? आणि त्याचे छेदन तरी कशा पद्धतीने करता येते? तर संत ज्ञानदेव म्हणतात, 'मुळात संसारवृक्षच नाही. पण तो भासतो तरी कसा? ज्याप्रमाणे आकाशात पाहिले तर ते निळ्या रंगाचे दिसते. पण निळा रंग हा भास आहे. तेथे कोणताच रंग नाही. तसेच एक वेगळा दृष्टांत देताना संत ज्ञानदेव म्हणतात– 'ब्रह्मगिरीहून न निगे। आणि समुद्रीही कीर न रिगे। माजी दिसे वाऊगे। मृगांबु जैसे ॥' (१५.२३५ ज्ञानेश्वरी). रखरखीत उन्हात, माळरानावर, डांबरी रस्त्यावर, किंवा मुरमाड जमिनीवर लांबून मृगजळाचा भास होतो. आणि तो असा दिसतो की जणू काही पाणी वाहात आहे, पण प्रत्यक्षात तेथे काहीच नसते. त्याचप्रमाणे इंद्रधनुष्य हाही एक भास आहे. वरील सर्व दृष्टांतांतील त्या त्या वस्तू भासत असल्या तरी त्या प्रत्यक्षात नसतात, हेच खरे आहे.

त्याचप्रमाणे संसारवृक्षसुद्धा एक भास आहे. तो प्रत्यक्ष तसा नाही. त्या संसारवृक्षाच्या छेदनासाठी कुऱ्हाड घेऊन धावणे म्हणजे दोरीवर सापाचा भास झाला असता काठी घेऊन धावण्यासारखे आहे किंवा लांबून मृगजळाची नदी दिसली असता ती तरून जाण्यासाठी नावेसाठी धावाधाव करण्यासारखे आहे. भास, भ्रम हे अज्ञानाचे लक्षण आहे. संत ज्ञानदेव या भ्रमाचे वर्णन करताना म्हणतात– 'ऐसेनि स्थितीचिये वेळे। भुलवी अज्ञानाचे डोळे। लाघवी हरी मेखळे। लोकु जैसा॥' (१५.२४१ ज्ञानेश्वरी) ज्याप्रमाणे चतुर नट आपल्या वेषाने लोकांना भूल पाडतो, त्याप्रमाणे हा संसारवृक्ष (अज्ञानांना) भूल पाडतो. तेव्हा भ्रम, भास नाहीसा कसा होतो? त्यालाही संत ज्ञानदेवच उपाय सांगतात. ते म्हणतात, 'म्हणोनि स्वप्नीचेया घाया। ओखद चेवोचि धनंजया। तेवि अज्ञान मूळा यया। ज्ञानचि खड्‌ग॥ परि तेचि लीला परजवे। तैसे वैराग्याचे नवे। अभंगबळ होआवे। बुद्धिसी गा॥ उठिलेनि वैराग्ये जेणे। हा त्रिवर्गु ऐसा सांडणे। जैसे वमुनिया सुणे। आतांचि गेले॥' (१५.२५४ ते २५६ ज्ञानेश्वरी) ज्याप्रमाणे स्वप्नात झालेल्या जखमेवर औषध म्हणजे जागृती, त्याप्रमाणे या अज्ञानावर उपाय म्हणजे ज्ञानच होय. हे ज्ञान कसे प्राप्त होऊ शकते, तर ते केवळ वैराग्यानेच. उपभोगाने, उपभोगाच्या वासनेने, इच्छेने जीव त्यात फसत जातो, अडकत जातो, आकंठ बुडत जातो. पण ज्या वेळी या उपभोगाचा वीट येऊन किंवा शाश्वत सुखाचे खरे स्वरूप समजल्यावर विषयांविषयी वैराग्य निर्माण होते व परमेश्वराविषयी जिज्ञासा निर्माण होते, विषयातून मन हळूहळू बाहेर पडू लागते, तितकाच काळ परमेश्वराचे चिंतन वाढते. अशा प्रकारे वैराग्य अंगी बाणत जाते तेव्हा ज्ञान उदयाला येते आणि ज्ञान जसे उदयाला येत जाते, तसे वैराग्य अंगी दृढ होत जाते आणि ज्या वेळी परमेश्वराचा अपरोक्ष साक्षात्कार होतो त्या वेळी या संसारवृक्षाचे पूर्ण छेदन होते. नव्हे, हा संसारवृक्षच मुळात नाही तर त्याचे छेदन होणार हा प्रकार तरी कसा संभव आहे? म्हणजे या संसारवृक्षाचा केवळ एक भास आहे. वांझेच्या मुलाची पत्रिका तयार करावी, कासवीच्या दुधापासून तूप बनवून त्याने जेवणावळी घालाव्यात हे जितके खरे आहे, शक्य आहे तितकाच हा संसारवृक्ष खरा आहे.

## परमेश्वर अतर्क्य आहे

*अन्यदेवाहुर्विद्यया अन्यदाहुरविद्यया ।*
*इति शुश्रुम धीराणां ये नस्तद् विचचक्षिरे ।।*

*(मंत्र - १० इशोप.)*

अर्थ – आत्मतत्त्व जाणिवेहून वेगळेच म्हटले आहे आणि नेणिवेहून वेगळे म्हटले आहे. ज्यांनी आम्हांला त्यांचे दर्शन करवले त्या धीर पुरुषांकडून आम्ही असे ऐकले आहे.

*अन्यदेवाहुः संभवात् अन्यदाहुरसंभवात् ।*
*इति शुश्रुम धीराणां ये नस्तद् विचचक्षिरे ।।*

*(मंत्र - १३ इशोप.)*

अर्थ – आत्मतत्त्व विकासाहून वेगळेच म्हटले आहे आणि निरोधाहून वेगळे म्हटले आहे. ज्यांनी आम्हांला त्याचे दर्शन करवले, त्या धीर पुरुषांकडून आम्ही असे ऐकले आहे.

*न संदृशे तिष्ठति रूपमस्य न चक्षुषा पश्यति कश्चनैनम् ।*
*हृदा मनीषा मनसाभिक्लृप्तः य एतद् विदुरमृतास्ते भवन्ति ।।*

*(मंत्र १२ - कठोप.)*

अर्थ – याचे रूप डोळ्यासमोर उभे राहात नाही. याला कोणीही डोळ्याने पाहू शकत नाही. हृदयाने, बुद्धीने आणि मनाने हा कल्पिला जातो. जे याला (आत्म्याला) जाणतात ते अ-मृत होतात.

ज्ञान मिळवण्याच्या प्रक्रिया आहेत. त्यात तर्क करणे हीसुद्धा एक प्रक्रिया आहे. ज्या वेळी एखादी वस्तू निर्माण करावयाची असते वा मिळवावयाची असते, त्या वेळी प्रथमतः तर्काने त्याची निर्मिती करावयाची असते वा मिळवावयाची असते. कोणत्या वस्तूविषयी मनुष्य तर्क करतो? जी त्याला सुख, समाधान, आनंद देते त्या वस्तूविषयी तर्क करतो. मानवाने निर्माण केलेल्या सर्व वस्तू या कोणाच्या तरी तर्काचे, संकल्पाचेच, परिणित रूप आहे. मन संकल्प करते तर बुद्धी कल्पना लढवते, योजना करते व कार्यसिद्धीसाठी प्रयत्न करते, पण बुद्धी ही प्रत्यक्षानुसारी आहे. त्यामुळे जी वस्तू प्रत्यक्ष इंद्रियगोचर नाही. त्याविषयी बुद्धी तर्क करू शकत नाही. येथे बुद्धीची

गती कुंठित होते. परमेश्वर हा सूक्ष्म, इंद्रिय अगोचर आहे. पंच ज्ञानेंद्रियांच्या क्षमतेमध्ये असणारे कोणतेही गुण परमेश्वराच्या ठिकाणी प्रगटपणे नाहीत. पण परमेश्वर हा परिणामरूपाने, शक्तिरूपाने, प्रत्ययाला येणारा असल्याने बुद्धीला परमेश्वराचे अस्तित्व मान्य होते व बुद्धी जिज्ञासू वृत्तीने परमेश्वराचा शोध घेऊ लागते. तेव्हा सर्वाभूती, चराचरामध्ये परमेश्वर आहे. हे विश्वच परमेश्वराचे सगुण, साकार स्वरूप आहे, याचे ज्ञान माणसाला होते व जेव्हा सद्‌गुरूची भेट होते तेव्हा सद्‌गुरूकडून मिळालेल्या उपासनेने त्याचे ज्ञान प्रत्ययाच्या प्रांगणात हळूहळू प्रवेश करू लागते व कालांतराने त्याला आत्मसाक्षात्काराचा अपरोक्ष अनुभव येतो. तेव्हा त्याच्या लक्षात येते की परमेश्वर तर्काच्या कितीतरी पलीकडे आहे.

तर्क हा वस्तुनिष्ठ पदार्थाविषयी करता येतो. हे जग केव्हा झाले? कसे झाले? कोठून आले? कशाचे केले? असेच का झाले? इत्यादी प्रश्न हे विज्ञानाच्या कक्षेत येणारे आहेत. त्या प्रश्नांची सोडवणूक हीसुद्धा वस्तुनिष्ठ पदार्थाच्या साह्यानेच परीक्षण करून करता येण्यासारखी आहे व तसे प्रयत्नही चालू आहेत. तरीही, कोणीही अजून खात्रीपूर्वक छातीवर हात ठेवून हे सांगू शकत नाही की पृथ्वीचा जन्म होऊन इतकी वर्षे झाली आहेत, सूर्याची उष्णता केवळ इतकीच वर्षे टिकणार आहे, या विश्वाची गती काय आहे? या विश्वात पृथ्वीचे स्थान काय आहे वगैरे वगैरे. पण जे वस्तुनिष्ठ नाही, त्याचे मोजमाप करण्याचे कोणतेही साधन नाही. ज्याला आदी माहीत नाही, अंत कळत नाही अशा परमेश्वराविषयीचे ज्ञान असणे अवघड आहे. परमेश्वराचे स्वरूप असलेल्या जिवाला मात्र मी कोठून आलो? मी कोण? कसा झालो? कोठे जाणार? या आत्मज्ञानाच्या समस्यांचे उत्तर माहीत आहे. आमच्या संतमंडळींनी त्याची उत्तरे देऊन ठेवली आहेत. त्यांची अनुभूती घेतली आहे व त्याविषयी सर्व लिहून ठेवले आहे. दोन संतांच्या अनुभूती-कालामध्ये जरी शेकडो वर्षांचे अंतर असले तरी त्यांची अनुभूती मात्र अगदी तंतोतंत बरोबर आहे. हे त्यातले एक आश्चर्य आहे. म्हणून परमेश्वर कोणत्याही तर्काने, बुद्धीने, विचाराने, विवेकाने ग्राह्य होणार नाही, तर केवळ या सर्वांची ज्या ठिकाणी गती कुंठित होते त्याच ठिकाणापासून परमेश्वराच्या स्वरूपाच्या अनुभूतीला सुरुवात होते. याचे एकच आणि महत्त्वाचे कारण म्हणजे हे सर्व प्रयत्न अहंकाराने व्याप्त असतात. ज्या क्षणी अहंकार पूर्णतया मावळून जातो त्या क्षणापासून परमेश्वराची अनुभूती येते.

### कर्मयोगी साधक –

साधकाचा अभ्यास कर्म करण्यापासून सुरू होतो. कर्म करणे हा जीवनाचा स्थायी भाव आहे. कर्म हा जीवनाचा अपरिहार्य भाग आहे. तेव्हा प्रत्येकाला कर्मावाचून जीवन जगणे केवळ अशक्यच असते. म्हणून कर्म हा साधनेचा पाया आहे. कर्म करण्याकडेच सर्वांची प्रवृत्ती असते. मन विषयाकडे आकर्षित होते. मनामध्ये संकल्प निर्माण होतो. विषयाच्या प्राप्तीविषयी योजना तयार होते आणि मग सर्व इंद्रिये कार्याला प्रवृत्त होतात. विषयाची प्राप्ती होते. विषय सहज प्राप्त असेल तर इंद्रियांना कोणताही त्रास न होता विषय हस्तगत होतात, पण जर विषय प्राप्त होण्यास कठीण असेल तर इंद्रियांना त्याच्या प्राप्तीसाठी झगडावे. लागते आणि या झगडण्यात व विषयाची प्राप्ती करण्यात मन विधि-निषेध, साधक-बाधक, योग्य-अयोग्य, नियत-अनियत अशा कोणत्याच स्वरूपाच्या मार्गाचा विचार करीत नाही व विषय हस्तगत करून घेते आणि जर विषय प्राप्तच झाला नाही तर जीव दु:खी होतो. त्याच्या ठिकाणी द्वेष, मत्सर, काम, क्रोध, दंभ, मद, लोभ वगैरे विकार उत्पन्न होतात व जिवाची अधोगती होते आणि कधी तरी, कोणत्या तरी जन्मात जिवाला या गोष्टीची जाणीव होते की, विषयांविषयी असलेल्या वासनांमुळेच ही अवस्था प्राप्त झालेली आहे. तेव्हा त्याला उपरती होते व हळूहळू वासनांचा त्याग करून प्राप्त विषयांपासून जे सुख मिळेल त्यावर समाधान मानणे हेच श्रेयस्कर आहे, याची खात्री होते.

यापुढील पायरी म्हणजे विषयापासून सुख मिळते पण त्यापासून पुन्हा दु:खच भोगावे लागते व या विषयापासून पुन्हा वासनांच्या जिव्हा लांबत जातात व जन्म-मृत्यूची साखळी लांबत जाते, याची जाणीव त्याला होते आणि मग वासनांचा त्याग केल्याशिवाय यातून आपली सुटका होणार नाही याची खात्री पटल्यावर साधक आता अभ्यासाला लागतो व कालांतराने जन्मोजन्मींच्या अभ्यासाने त्याला साम्यावस्था प्राप्त होते. संन्यस्त वृत्तीचे बीज त्याच्या ठिकाणी पक्के रुजू लागते. अशा प्रकारे जेव्हा वासनारहित, संकल्परहित, इच्छारहित, फलापेक्षारहित अशी त्याच्याकडून कर्मे होत जातात, तेव्हा त्याने केलेल्या कर्मापासून त्याला बंधन पडेनासे होते. हा वासनाक्षयच मुख्य उक्रांतीचा मार्ग आहे. येथून साधकाची उत्क्रांती होत जाते. वासनाविना कर्म करणे हेच कर्म करण्याचे कौशल्य त्याला साधायला लागते आणि याचा अभ्यास पूर्ण होताच तो कर्मयोगी अवस्थेला पोहचतो.

कर्माचे सहज आचरण केले असता कर्माचे बंधन पडत नाही. याविषयी तुकाराममहाराजांनी म्हटले आहे–

कर्माचे आचरण करताना भाव कसा पाहिजे याचे हे वर्णन आहे. त्या भावाला 'सहज' भाव म्हणतात. कारण 'सहज' भाव असणे ही फार अवघड गोष्ट आहे. त्या कर्माचे आचरण करताना कर्माकर्माचा, पापपुण्याचा, शौचाशौचतेचा कसलाच विचार करावयाचा नाही, तर सहज भावाने ते कर्म करावे म्हणजे कर्म करताना अहंकाराचा स्पर्श त्याला लागत नाही. आणि त्यामुळे कर्माचे बंधन पडत नाही. कर्म करूनही कर्ता मोकळा असतो. जेव्हा संकल्पविरहित सहज कर्माचे आचरण घडते, त्या वेळी ती कर्मेही ईश्वरी योजनेनेच साधकाच्या समोर आलेली असतात. हा विश्वमनाचा संकल्प असतो व त्या विश्वमनाशी साधकाचे मन समरस झालेले असते. व्यष्टी-समाष्टी एकरूप झालेल्या असतात. स्थूलसूक्ष्मातील भेद राहिलेला नसतो. आणि अशा अवस्थेत साधकाचा सिद्ध झालेला तो पुरुष तुकाराममहाराजांप्रमाणेच आपल्या अवस्थेचे वर्णन करू शकतो. कारण त्याचे स्वत:चे अस्तित्वच देशकालस्थितीनिर्देश्य अशा नाम-रूप असलेल्या शरीराच्या उपाधीत अडकून राहिलेले नसते आणि मग सहजगत्या त्याच्या परावाणीतून उमटलेले शब्द वैखरीतून बाहेर पडतात. 'अणुरणीया थोकडा। तुका आकाशाएवढा॥' (१९९ अभंग तु. म.). तुकाराममहाराज तसे देवाचेही वर्णन करतात 'देव तर काई देव तर काई। तुका म्हणजे राई तरी मोठी॥' (१८६३ अभंग तु. म.). 'देव होया देव होया। जैसा म्हणे तैसा तया॥ देव लहान लहान। तुका म्हणे अणुरेणू॥' (१८६७ अभंग तु. म.). 'देव आहे देव आहे। जवळी आम्हां अंतरबाहे॥' (१८७० अभंग तु. म.).

साधकाने जो अभ्यास केलेला असतो त्या अभ्यासाची पद्धत भगवंत गीतेत सांगतात,

*'कर्मणो ह्यपि बोद्धव्यं बोद्धव्यं च विकर्मण: ।*
*अकर्मणश्च बोद्धव्यं गहना कर्मणो गति: ॥*

*(४.१७ भ. गी.).*

अर्थ – कर्माचा विचार करणे अवश्य आहे. तसेच विकर्माचा (विपरीत कर्माचा) विचार करणे अवश्य आहे. आणि अकर्माचा देखील विचार करणे अवश्य आहे. कारण कर्माची गती (तात्त्विक स्वरूप) गहन (गूढ) आहे.

कर्माच्या योग्यायोग्यतेविषयी आपण निर्णय करणे अयोग्य आहे. कारण प्रत्येक जणाने स्वत:च्या स्वार्थासाठी जरी अर्थ लावला तरी त्याचे जे परिणाम व्हावयाचे असतात ते कधीच चुकत नाहीत. कारण धर्मशास्त्र त्याचे निर्णय घेत असते. म्हणून भगवंतांनी म्हटले आहे-

*तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्यव्यवस्थितौ ।*
*ज्ञात्वा शास्त्रविधानोक्तं कर्म कर्तुमिहार्हसि ॥*

*(१६.२४ भ. गी.).*

अर्थ – अर्जुना! तुला कर्तव्याकर्तव्य निश्चित करण्याच्या बाबतीत शास्त्र हेच प्रमाण आहे. म्हणून शास्त्राने विहित ठरविलेल्या कर्माचे यथार्थ ज्ञान संपादन करून (या कर्माचे) इहलोकी आचरण करणे, हेच तुला योग्य आहे.

म्हणून धर्मशास्त्राला विहित असलेल्या कर्माचे निष्ठेने, निष्काम भावनेने आचरण करणे व वासनांचा, कर्मफलाचा त्याग करणे हेच जास्त श्रेयस्कर आहे. हा खरा संन्यास होय व हाच खरा कर्मयोग होय. भगवंत म्हणतात–

*आरुरुक्षोर्मुनेर्योगं कर्म कारणमुच्यते ।*
*योगारूढस्य तस्यैव शम: कारणमुच्यते ॥*

*(६.३ भ. गी.)*

अर्थ – योगाचे आरोहण (योगसिद्धी संपादन) करू इच्छिणाऱ्यास (साधकास) कर्म हे योगसंपादनास कारण म्हणजे साधन होते, (उपयोगी पडते) असे म्हटले आहे आणि योगारूढास शम म्हणजे समत्वच (योगारूढत्व स्थिर राहण्यास) कारण म्हणजे साधन होते (उपयोगी पडते) असे म्हटले आहे.

कर्म करताना अनेक व्यक्तींशी संबंध येतो. कर्माची पूर्ती होण्यास अनेक लोकांचे साह्य लागते. अनेक साधनांचा उपयोग करावा लागतो. व्यक्ती तितक्या प्रकृती. या विधानाप्रमाणे अनेक स्वभावाचे लोक भेटतात आणि त्यामुळे कर्माच्या पूर्तीसाठी अनेक लोकांशी जुळून घ्यावे लागते. त्यांच्या कलाने, विचाराने, सल्ल्याने, लहरीने घ्यावे लागते. तेव्हा काही वेळा आपल्या सहनशक्तीची परीक्षा घेतली जाते, असे वाटते. आपल्या मनाचा समतोल बिघडण्याची शक्यता असते. आपण दाबून ठेवलेल्या काम-क्रोधादी विकारांना उफाळून वर येण्याला कारण होण्याची शक्यता असते. पण ज्या ठिकाणी आपली सहनशक्ती संपते, मनाचा समतोल बिघडतो व आपले विकार

उफाळून येतात त्याच वेळी आपण परीक्षेत नापास झालो असे सिद्ध होते. म्हणून कोणत्याही प्रसंगी अगदी आपल्या अपेक्षेप्रमाणे काम न होण्याची वेळ आली तरीही आपण आपल्या सहनशक्तीला आवर घातला पाहिजे, मनाचा समतोल बिघडू दिला न पाहिजे. मन शांत ठेवून, विचाराने कार्य कसे सफल होईल अगर सफल होण्याची शक्यता नसली तरी दुसऱ्याशी समजुतीने, गोडीने घेतले गेले तरच आपण या कर्मयोगाच्या अभ्यासात पास होऊ शकू. कारण कोणत्याही लौकिक गोष्टीची प्राप्ती वा कार्याची सिद्धता ही महत्त्वाची नाही. कारण या सर्व गोष्टी येथेच राहणार असतात. यांपैकी कोणतीच गोष्ट आपल्याबरोबर अखेरीस येणार नसते. पण विकाराच्या आहारी जाऊन दुराग्रहाने एखादी गोष्ट पुरी करण्याने आपण आपल्या वासना, इच्छा, संकल्प तीव्र करतो व त्यांत अडकत जाऊन जीवन-मरणाच्या साखळीची एक-एक कडी वाढवून घेतो. यासाठी मनावर, अंतःकरणावर ताबा पाहिजे आणि विषयांपासून मन आवरून घेतले पाहिजे. त्यासाठी साधना करावयास पाहिजे.

## परमेश्वरप्राप्तीचे साधन - ज्ञान

यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी असा हा अष्टांग योग आहे. या साधनेने परमेश्वरप्राप्ती होते. नामजपानेही परमेश्वरप्राप्ती होते. भक्तीने, भजन, कीर्तन, पूजा वगैरेनेही परमेश्वर प्राप्ती होते. तसेच जिज्ञासू वृत्तीने परमेश्वराचे तात्त्विक स्वरूप जाणून घेणे हासुद्धा ज्ञानमार्ग परमेश्वरप्राप्तीपर्यंत जातो. कर्मयोग, सांख्ययोग, ज्ञानयोग, भक्तियोग अशा विविध उपासनांनी परमेश्वरप्राप्ती होते यात शंका नाही. एवढेच काय, पण या सर्व मार्गांचा समन्वय होऊनच परमेश्वरप्राप्तीचा मार्ग चालला जातो. पुढच्या एका प्रकरणात श्रीमत् भगवद्गीतेच्या आधारे तयार केलेल्या एका तक्त्यामध्ये या सर्व उपासनामार्गांचा समन्वय दाखवला आहे व त्याप्रमाणे जिवाची कशी उत्क्रांती होत जाते याचेही दिग्दर्शन त्यात केले आहे. या पुस्तकात जरी याचा वेगवेगळा विचार केला असला तरी तसे ते मार्ग भिन्न नाहीत. अनेक जन्मांतून ही उपासना चालू असते. प्रत्येक जन्मात ज्या प्रगतीपर्यंत जीवात्मा गेला असेल त्याच्या पुढचा मार्ग कोणत्या उपासनेने चालू होणार आहे हे ज्याचे त्याला कळणार नाही, पण परमेश्वर बरोबर त्याला त्या मार्गावरून पुढे चालण्याची बुद्धी देतो हे निश्चित. निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, सोपानदेव, मुक्ताबाई, चांगदेव वगैरे योगमार्गाने परमेश्वरस्वरूप झाले. मीरा, नामदेव, जनाबाई, चोखामेळा, तुकाराम, सावतामाळी, नरसी मेहता वगैरे संत भक्तिमार्गाने गेले. एकनाथमहाराज, रामदासस्वामी वगैरे

तपानुष्ठानाने ब्रह्मरूप झाले. तर श्री अक्कलकोटस्वामी, गजाननमहाराज हे प्रकट झाले तेच मुक्तावस्थेत होते. पण आपल्यासमोर जे ज्या पद्धतीने परमेश्वरस्वरूप झाले तीच उपासना योग्य असे म्हणून चालणार नाही. संत नामदेव, तुकाराम यांनी केवळ विठ्ठलनामावर विठ्ठल आत्मसात केला, हे जरी दिसत असले तरी त्यांचे मागील किती जन्म झाले व त्यांनी कोणत्या प्रकारच्या उपासना, साधना, तप केले हे आपणांस माहीत नाही. ते त्यांचे त्यांनाच माहीत. म्हणून आपण जर केवळ विठ्ठलनाम घेत राहिलो तर आपणही तेच स्वरूप होऊ याची खात्री देता येत नाही. आपणांस त्यांच्याएवढे विठ्ठलनामात एकाग्र होता येणार नाही. त्यांनी जसा संसार सोडला तसे आपणाकडून होणार नाही. कारण त्यासाठी जी आवश्यक उपासना, साधना होणे आवश्यक आहे तेवढी आपण केलेली नसते. त्यामुळे केवळ विठ्ठलनामाची बाह्यतः भक्ती करून आपणांस काहीच साध्य होणार नाही. म्हणून आपल्या प्रकृतीला काय भावणारे आहे याचा विचार करावा व ती उपासना, साधना करावी. अर्थात या जन्मी जी साधना होईल त्याप्रमाणे पुढील जन्म मिळेल व आधीच्या जन्मात अर्धवट राहिलेली उपासना पुढे या जन्मात चालू होईल यात शंका नाही. प्रत्येक उपासनेचे महत्त्व तितकेच आहे, यातही शंका नाही.

परमेश्वरप्राप्तीच्या सर्व उपासना या अवघड आहेत. सभोवतालच्या सर्व विषयसुखाला बाजूला सारून जे सुख जन्मजन्मांतरानंतर मिळणार आहे. त्यासाठी प्रयत्न करणे हा प्रकार म्हणजे 'मांडीवरचीला दूर सारावयाचे व दूरचीला खुणवायचे' असा आहे. यात ज्ञानोपासना हीसुद्धा तशीच अवघड उपासना आहे. भगवंतच तिच्या अवघडपणाविषयी म्हणतात–

*'मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।*
*यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥'*

*(७.३ भ. गी.).*

अर्थ – (ज्ञानविज्ञानाच्या) सिद्धीकरिता हजारो माणसांपैकी एखादाच प्रयत्न करतो (आणि अशा) प्रयत्न करणाऱ्या सिद्धांपैकी (परोक्षज्ञान्यांपैकी) एखाद्यालाच माझे (परमेश्वराचे) यथार्थ ज्ञान (अपरोक्ष-साक्षात्कार) होतो.

तसेच–

*'बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते।*
*वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥'*

*(७.१९ भ. गी.).*

अर्थ – सर्व वासुदेवमय (आहे असे जाणणारा) आत्मज्ञानवान (पुरुष) अनेक जन्मांच्या शेवटी मला (परमात्मस्वरूपाला) प्राप्त होतो. असा महात्मा दुर्लभ होय.

नित्यानित्य विवेक हे ज्ञानाचे स्वरूप होय. वेदाध्ययन, तपश्चर्या, स्वतःचा अनुभव, ऐतिह्य (गुरुपरंपरेने सिद्ध करणे) आणि तर्क ही ज्ञानाची साधने होत. या जगताच्या उत्पत्तीच्या आधी व जगताचा नाश झाल्यानंतर जे असते ते एकच कालरूपाने आणि कारणरूपाने जगाच्या व्यवहारकाली चिद्रुपाने असते. (तोच सर्वप्रकाशक व सर्वकारण असणारा केवळ आत्माराम होय) ज्याप्रमाणे कुंडलादिक सुंदर आकाराच्या भूषणांच्या रूपाने असलेले सोने-अलंकार करण्यापूर्वी व अलंकार मोडल्यानंतर सोने म्हणूनच संबोधले जाते आणि निरनिराळ्या नावांनी त्याचा वापर करतानाही ते सोनेच राहते. त्याचप्रमाणे विश्वाच्या पूर्वी, विश्वाचा अंत झाल्यावर व विश्वाच्या व्यवहारकाली अनेक नामांनी वावरणारे हे सर्व जगत् म्हणजे केवळ परब्रह्मस्वरूपच आहे. अन्य कोणी नाही. जागृती, स्वप्न व सुषुप्ती या तीन अवस्थांचे अनुभव किंवा ज्ञान देणारे मन त्याचप्रमाणे या तीन अवस्थांना कारण होणारे सत्त्वादी तीन गुण आणि कारण, कार्य आणि कर्ता या रूपांनी असलेले आध्यात्मिक, आधिभौतिक आणि आधिदैविक असे त्रिविध जग या सर्वांना जे तुरीय शब्दब्रह्म प्रकाशित करते तेच सत्य ब्रह्म होय. अन्वय व्यतिरेकाने म्हणजे सृष्टी उत्पन्न करतेवेळी, ती उत्पन्न झाल्यावर आणि तिचा नाश झाल्यावरही ब्रह्म मात्र एका प्रकाराने स्थिर असते (समाधीच्या वेळी सर्व इंद्रिये आणि मन लीन होतात. परंतु आत्मा असतोच) ओवी– 'सत्त्वगुणे जागरण। रजोगुणे दिसे स्वप्न। तमोगुणे सुषुप्ती जाण। लागे संपूर्ण गाढमूढ ॥ ऐसे तिही अवस्थायुक्त मन। कार्य कर्तृत्व कारण। त्रिविध जग भासे संपूर्ण। ब्रह्म समन्वये जाण सदोदित ॥ मृत्तिका वेगळा घट न दिसे। तंतू वेगळा पट न प्रकाशे। तेवी मजवेगळे जग नसे। जे जे भासे ते मद्रूप ॥ जो मी तिनी गुणाते नातळता। अवस्थात्रयाते नाकळता। तिही अवस्थांते प्रकाशिता। तो मी चवथा जाण 'तुरीय' ॥ तिन्ही अवस्था तिन्ही गुण। दृश्य, द्रष्टा आणि दर्शन। त्रिपुटी प्रकाशिता पूर्ण। तो मी चवथा जाण 'तुरीय' ॥ देहादि प्रपंचव्यतिरेकता। भूती भूतांच्या लयो

पाहतां। लीन झालिया गुणावस्था। उरे मी चवथा 'तुरीय' ॥ ते एवंविध बोलो जाता। वेदी मूग आरोगिला सर्वथा। हे अनुभवैक्य वेद्य तत्त्वता। शब्द प्रगल्भता सरेना ॥ एथ न चले युक्ति प्रयुक्ति। न चले जाणिवेची व्युत्पत्ति। न चले लक्ष्यलक्षणस्थिती। गुरुकृपा प्राप्ती 'तुरीय' ॥ जागृत्यादि सर्वही सत्ता। सुषुप्ति सर्वही असता। याचा 'तुरीय' मी प्रकाशिता। मजवीण सर्वथा त्या भासती केवी ॥' (अध्याय २८, श्लोक २०, ओवी २६७ ते २७८ निवडक, ए. भा.).

अष्टांग योगसाधनेमध्ये शरीरशुद्धी, मन:शुद्धीची उपासना असून मनाला विषयापासून दूर करणे आणि ईशचिंतनात त्याचा लय करणे हा भाग प्रामुख्याने असतो. अशा साधनेमध्ये मनाचा लय साधून समाधीचा अनुभव येतो व हा काल वाढत गेला की सविकल्प व नंतर निर्विकल्प समाधी लागून परमेश्वर साक्षात्कार होतो. हा योग म्हणजे थोडा हठयोगच होय. भक्तियोगात परमेश्वरी नामस्मरणात, भजनात, कीर्तनात मनाचा लय करून मनाला विषयापासून दूर ठेवणे साधायचे असते. या साधनेतही मनाची शुद्धता होत जाते व मनाचा लय परमेश्वरी नामात होत जातो. भक्तियोगात मनाला परमेश्वरी भजनात, कीर्तनात गोडी लावून विषयापासून पराङ्मुख करण्याचा प्रयत्न असतो. वरील दोन्ही उपासनांमधे परमेश्वराच्या तात्त्विक स्वरूपाविषयी विचारही केलेला नसतो. परमेश्वराचे तात्त्विक स्वरूप या सृष्टीत कसे पसरलेले आहे याचा विचारही केलेला नसतो. त्यामुळे या दोन्ही साधनांमधून ज्याला पूर्णत्व म्हणतात ते प्राप्त होत नाही. याला उदाहरण म्हणजे योगी चांगदेव व भक्त नामदेव. सर्वाभूती परमेश्वर आहे याचा साक्षात्कार त्यांना झाला नव्हता आणि म्हणून परमेश्वराचे तात्त्विक स्वरूप सर्वाभूती आहे याचा साक्षात्कार त्यांना केवळ ज्ञानानेच होऊ शकला. तेव्हाच त्याला पूर्णत्व आले. म्हणजे संत ज्ञानदेवादी भावंडांनी योगी चांगदेवांप्रमाणे समाधीसाधना केली होती. नामदेवांप्रमाणे भक्तिमार्गानेही ते गेले होते. त्याचबरोबर त्यांना परमेश्वराच्या तात्त्विक स्वरूपाचाही साक्षात्कार झालेला होता हे सरळच स्पष्ट होते आणि म्हणून संत ज्ञानदेवांनी भगवद्गीतेवर टीकात्मक ज्ञानेश्वरी ग्रंथ लिहून तसेच अमृतानुभव हा ग्रंथ लिहून ज्ञानप्रकाशाने दीपवून टाकले. भगवंत म्हणतात–

*'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।*
*तत्स्वयं योगसंसिद्ध: कालेनात्मनि विन्दति ॥*

*(४.३८ भ. गी.).*

अर्थ – कारण या जगात परमात्मज्ञानासारखे पवित्र दुसरे काही नाही. ते (ज्ञान) स्थितप्रज्ञ कर्मयोगी कालाने स्वतःच्या ठिकाणी स्वतःच मिळवतो (त्याला ब्रह्मसाक्षात्कार होतो).

ज्ञान हे निरपेक्ष, निरागस, शुद्ध असते. मनुष्यप्राणी हा सर्व प्रकारच्या म्हणजे ब्रह्मस्वरूपाच्या ज्ञानाने संपृक्त असतो. पण जसे चंद्र, सूर्य यांच्या प्रकाशकिरणांनी कमलाचा विकास होतो. त्याप्रमाणे निरपेक्ष, निष्काम, शुद्ध कर्माचरणाने मनुष्याच्या ठिकणी स्वभावतःच असलेले ज्ञान विकसित होते. अर्थात ज्याप्रमाणे झाडावरील सर्वच फुले पूर्णपणे विकसित होत नाहीत, तर काही कळ्या व फुले लहान असतानाच काही रोगामुळे खुरटली जातात. त्यांची वाढच होत नाही, वा ते अकाली सुकून जातात. तर काही मध्यम स्वरूपाची विकसतात, तर काही जे पूर्ण निरोगी असतात ते पूर्ण विकास पावतात. तसेच मनुष्यामध्ये ज्याने अभ्यास केला, शुद्ध निरपेक्ष, निष्काम, अशी वृत्ती ठेवून कर्माचरण केले तर त्याच्या बुद्धीचा विकास होऊन त्याला ज्ञान प्राप्त होईल. पण ज्याच्या बुद्धीला अनेक विकारांनी घेरले असेल, त्याच्या बुद्धीचा विकासच पूर्ण होऊ शकत नाही. त्यामुळे त्यांना परमेश्वरी स्वरूपाचे ज्ञान होऊ शकत नाही. वा झाले तर अगदी थोडे होते. वा जे होते ते विपरीत, विकृत असे होते. अर्थात अशा प्रकारे झालेल्या ज्ञानाला ज्ञान म्हणताच येत नाही. तर तो विकृत समज वा विपरीत माहिती असते. किंवा जे शुद्ध व पवित्र असते तेच खरे ज्ञान आहे. कारण परमेश्वर हेसुद्धा शुद्ध व पवित्र ज्ञानच आहे, तो ज्ञानरूपच आहे.

ते ज्ञान कसे व कोणाला प्राप्त होते, याविषयी भगवंत पुढच्याच श्लोकात सांगतात–

*श्रद्धावाल्लाँभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।*
*ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिम् अचिरेणाधिगच्छति ॥*

*(४. ३९ भ. गी.).*

अर्थ– श्रद्धावान, जितेंद्रिय व ज्ञानाची उत्कंठा असलेल्या पुरुषाला हे ज्ञान प्राप्त होते. (ते) ज्ञान प्राप्त झाल्यावर लवकरच (त्या पुरुषाला) पूर्ण शांती (समाधान) प्राप्त होते.

परमेश्वर परब्रह्म हे ज्ञानरूप, चैतन्यरूप, तेजोरूप आहे. ही सर्व विशेषणे परब्रह्माचाच निर्देश करतात. तेज किंवा प्रकाश हा कसा आहे की ज्या ठिकाणी प्रकाश असतो तेथे सर्व पदार्थ मात्र स्वच्छ दिसतात. दिवा लावल्यावर प्रकाशाला खोलीत

पसरायला वेळ लागत नाही. ते क्षणात खोली उजळवून टाकते. वीज ही प्रकाशस्वरूपही आहे व चैतन्यस्वरूपही आहे. लांब कोठे शंभर मैलांवरून जर एखाद्याने दिवा लावण्यासाठी विजेची कळ दाबली तर दिवा लागण्यासाठी अजिबात वेळ लागणार नाही. कळ दाबता क्षणीच दिवा लागला जातो. म्हणजे चैतन्य हेसुद्धा अतिशय वेगवान सर्वव्यापी आहे. तसेच कोणत्याही वस्तुमात्राचे ज्ञान होता क्षणीच त्या वस्तुमात्राचे पूर्ण आकलन होते आणि एकदा ज्ञान झाल्यावर व त्याचा अभ्यास झाल्यावर ते ज्ञान कायम स्वरूपाचे राहते. त्यात कधीही कमीपणा, उणेपणा येत नाही. म्हणून परमेश्वरी साक्षात्कार झालेले पुरुष कधी काळी अज्ञानी होतील असे कधीच होत नाही. म्हणून भगवंत म्हणतात–

*'ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिम् अचिरेणाधिगच्छति।।'*

'परां शान्तिम्' म्हणजे पूर्ण शांती, समाधान, जे कधीही कमी होत नाही. तसेच कधी संपत नाही. शांती, समाधान हे गुणसुद्धा निराकारीत्व सुचवतात. परमेश्वराविषयीची जी विशेषणे आहेत, जी लक्षणे आहेत, ती सर्व परमेश्वराचेच वर्णन करतात. परमेश्वराचे स्वरूप वर्णन करतात.

'श्रद्धावान', 'संयतेंद्रिय:', 'तत्पर:' ज्ञानं लभते।' वरील श्लोकाच्या पहिल्या दोन चरणांचा अन्वय असा आहे- 'श्रद्धावान', संयतेन्द्रिय:' व तत्पर: हे तीनही गुण ज्या साधकाच्या ठिकाणी असतील त्यालाच 'ज्ञानं लभते।' ज्ञान प्राप्त होईल, होते. 'श्रद्धावान' ज्याची 'श्रद्धा' आहे-, कोणती 'श्रद्धा'? परमेश्वर आहे; तो मला प्राप्त करून घ्यावयाचा आहे. 'दिल्ली कोठे आहे?' कोणीतरी पाहिलेली असते व तो ज्या मार्गावरून गेलेला असतो, तो सांगतो 'या मार्गाने जा?' तो पुढे म्हणतो खूप लांब आहे. खूप दिवस लागतील. बस्स. सारखे चालत राहा. एक दिवस दिल्लीला पोहचाल आणि जो श्रद्धावान असतो, तो बाकी काहीही मनात न आणता मुक्कामाने सतत चालत राहतो. त्याच्या मनात कधीही विकल्प येत नाही. शंका येत नाही. त्याला चालणे हेच माहीत असते आणि त्यामुळे तो लवकर दिल्लीला पोहचतो. ज्याची श्रद्धा पक्की नसते जे साशंक, संशयी असतात त्यांच्या मनात येते की आपण खरोखरीच 'दिल्लीला' जाऊन पोहचू का? आता किती दिवस झाले? आणि अजून किती दिवस चालावयाचे आहे? रस्त्यात दिसणारी, लागणारी ही छान छान गांवे सोडावयाची, उत्तम विश्रांतिगृहे सोडायची, आकर्षक करमणुकीचे कार्यक्रम सोडायचे, बहरलेली वनश्री, बागबगीचे सोडायचे आणि अजून कधीही न पाहिलेल्या 'दिल्ली'साठी उगाच पायपीट करावयाची. 'जाऊ द्या? काय घाई आहे', असे म्हणून ज्यांची श्रद्धा

डळमळीत होते, ते एक तर अनेक दिवस (जन्म) वाया घालवून खूप उशिरा पोचतात किंवा कधीही पोचत नाहीत, ते (मायेच्या) झगमगाटातच रमून जातात आणि म्हणून 'संयतेन्द्रिय:' हा गुण तेथे आवश्यक असतो. मनाला मोहून टाकणारी मोहक दृश्ये, आकर्षक प्रसंग या साऱ्यांना बाजूस सारून निष्ठेने, सातत्याने वाटचाल करत राहण्याला महत्त्व आहे. अहोरात्र परमेश्वराच्या नामस्मरणात, चिंतनात राहणे व मुक्कामाचे ठिकाण येईपर्यंत न थांबणे याला पक्की श्रद्धा म्हणतात. हीच 'तत्परता' होय. म्हणून भगवंत म्हणतात–

*'जितात्मन: प्रशान्तस्य परमात्मा समाहित: ।*
*शीतोष्णसुखदु:खेषु तथा मानापमानयो: ॥*

*(६.७ भ. गी.).*

अर्थ – ज्याने अंत:करण जिंकले आहे (ताब्यात ठेवले आहे) अशा अत्यंत शांत झालेल्या (पुरुषाचा) आत्मा (बुद्धी) शीत-उष्ण, सुख-दु:ख त्याचप्रमाणे मानापमान (इत्यादी द्वंद्वे) यांविषयी अत्यंत सम झालेला असतो.

अशा प्रकारे सर्वांविषयी समभाव ठेवणारी शांत व्यक्ती सर्वांनाच प्रिय होते. सर्वांनाच तिच्याविषयी आत्मीयता, प्रेम वाटते. तसेच त्या व्यक्तीलाही सर्वांविषयी प्रेम, आपुलकी असते. हाही एक अभ्यास आहे. अवघड असला तरी श्रेष्ठ अभ्यास आहे व हा अभ्यासच एके दिवशी सर्वभूती असलेल्या परमेश्वराची प्रचीती देण्यास कारण होतो. त्याला हितकर्ता, मित्र, वैरी, तटस्थ, मध्यस्थ, द्वेष्य, बांधव, सज्जन आणि दुर्जन यांच्याविषयी समबुद्धी असते आणि म्हणूनच तो श्रेष्ठ पदाला जाऊन पोहचतो. अशा या सम आणि शांत बुद्धीला भगवंतांनी एक अतिशय उत्तम दृष्टांत दिला आहे. भगवंत म्हणतात–

*'यथा दीपो निवातस्थो नेङ्गते सोपमा स्मृता ।*
*योगिनो यतचित्तस्य युञ्जतो योगमात्मन: ॥'*

*(६.१९ भ. गी.).*

अर्थ – निवांत स्थळी ठेवलेला दिवा (दीपज्योत) जसा (अगदी) निष्कंप असतो, तीच उपमा मनाच्या एकाग्रतेचा अभ्यास करणाऱ्या योग्याच्या नियत चित्ताला (ते तसेच निष्कंप असते म्हणून) दिली जाते.

कोणत्याही विकाराचा वारा त्यांच्या (योग्याच्या) चित्तापर्यंत पोहचू शकत नाही. आणि बाहेरचे विकारी विषय पाहून त्याच्या चित्ताचा समतोल ढळलेला नसतो, इतके ते पक्के झालेले असते. अशा प्रकारे मनाच्या अढळ अवस्थेत हा योगी इंद्रियांच्या पलीकडील व बुद्धीनेच ग्रहण करण्यास योग्य असे निरतिशय सुख अनुभवतो आणि मन त्या स्थितीतून कधीच ढळत नाही. हीच स्थिती सर्वात श्रेष्ठ होय. यालाच आत्मसाक्षात्कार म्हणतात. यालाच ब्रह्मसाक्षात्कार म्हणतात. ही स्थिती प्राप्त झाल्यावर (योगी) इतर लाभाला याहून श्रेष्ठ मानत नाही व या स्थितीत असताना इतर कोणत्याही मोठ्या (समजल्या जाणाऱ्या) दु:खाने तो विचलितही होत नाही. अशा या योग्याला सर्वाभूती एक आत्मतत्त्वच प्रत्ययाला येत असते. व स्वत:च्या ठिकाणी त्याला तेच आत्मतत्त्व प्रत्ययाला येत असते आणि अशा स्थितीत त्याची परमेश्वराशी कधीच ताटातूट होत नाही. तो कधीच विभक्त होत नाही. या आत्मानंदात, आत्मसाक्षात्कारातच तो सदा रममाण असतो. भगवंत या स्थितीचे अगदी सोप्या शब्दांत वर्णन करतात–

*'यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।*
*तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ।।*

*(६.३० भ. गी.).*

अर्थ – जो मला (सर्व भूतमात्रांचे ठिकाणी) पाहतो व माझ्यामध्ये सर्व चराचर जगत् पाहतो, त्याला मी (परमेश्वर) मुळीच अंतरत नाही व मला तो कधीही अंतरत नाही.

## कर्म-ज्ञान-भक्ती

भगवंतांनी गीतेमध्ये सर्व प्रकारे अर्जुनाला समजावून सांगितले होते, पण पुन्हा 'त्याग व संन्यास' यांतील फरक समजावून सांगा अशी अर्जुनाने विनंती केल्याने भगवंतांनी या दोन्हीतील फरक सांगून पुन्हा एकदा सर्व गीतेचा मथितार्थ सांगितला. या सर्वातून त्यांना सांगावयाचे होते ते हे की, प्रत्येक जिवाने मोक्षप्राप्ती हेच लक्ष ठेवून जीवन जगावयास पाहिजे. कारण प्रत्येक जीव हा परमेश्वराचाच अंश आहे. त्याने पुन्हा परमेश्वरालाच जाऊन मिळावयास पाहिजे. ज्याप्रमाणे सागरातून निघालेले पाणी हे पुन्हा सागरालाच जाऊन मिळाले म्हणजे ते मुक्त होते, तसे. पण जीवनात अनेक मोहमायेचे प्रसंग जिवाच्या हेतूला, उद्देशाला निराळेच वळण देतात. त्यामुळे जीव भरकटत जातो व आपल्या मुक्तीच्या ध्येयापासून दूर दूर जात राहतो. म्हणून भगवंतांनी अर्जुनाला

निमित्त करून सर्वच मनुष्यांना गीतेमधून मार्गदर्शन केले आहे की, जिवाने निष्ठेने, स्थिर बुद्धीने या मायेचे स्वरूप ओळखून कर्तव्यकर्माचरण करावे. निष्काम भावनेने कर्माचरण करावे.' अशी सुरुवात करून सांख्ययोग, ध्यानयोग, ज्ञानयोग, भक्तियोग अशा प्रगतीने मनुष्य मुक्तीच्या स्थितीपर्यंत पोचतो त्यासाठी त्याने काय काय पथ्ये पाळली पाहिजेत, याही गोष्टीचे आधीच्या अध्यायांतून स्पष्टीकरण आले आहे आणि आता सारांशरूपाने सांगताना, भगवंत पुन्हा हाच क्रम सांगून गीतेचा समारोप करतात. तेव्हा ब्रह्मस्वरूप होण्यासाठी जिवाच्या ठिकाणी कोणती लक्षणे असावीत, कोणते गुण असावेत यांविषयी भगवंत पुन्हा सांगत आहेत. या खालील लक्षणांचा, गुणांचा विचार केला तरी लक्षात येते की गीतेमध्ये ज्या क्रमाने अध्याय आले आहेत त्या क्रमानेच मनुष्याने उपासना करावी. म्हणजे शेवटी परमेश्वराविषयी भक्ती प्राप्त होऊन जीव ब्रह्मस्वरूप होतो. यामध्ये एक गोष्ट लक्षात येते की जरी कर्मयोगापासून जीवन्मुक्तीचा प्रवास सुरू होत असला तरी पुढील सर्व प्रगतीच्या टप्प्यांवर कर्मयोगाचे आचरण आवश्यक असते. जसे आपण पुढील इयत्तेत गेलो तरी मागील कोणताही अभ्यास विसरून चालत नाही किंवा दुसरा दृष्टांत असा की ज्याप्रमाणे पहिलीत पाठ केलेले पाढे आयुष्याच्या पुढील कोणत्याही मोठ्या शिक्षणातसुद्धा उपयोगी येतात किंवा बालपणी ज्या शास्त्राचा अभ्यास केलेला असतो तो सर्व आयुष्यभर उपयोगी असतो. तो कधीच विसरून चालत नाही. तसे कर्मयोगाच्या आचरणाचे महत्त्व जीवन्मुक्त अवस्था प्राप्त होईपर्यंत आवश्यक आहे. भगवंत गीतेत अर्जुनाला तेच सांगत आहेत,

*यज्ञदानतपःकर्म न त्याज्यं कार्यमेव तत् ।*
*यज्ञो दानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ॥*

*एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।*
*कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥*

*(१८.५ व ६ भ. गी.).*

अर्थ – भगवदुपासना, दानधर्म व तपाचरण या स्वरूपाचे जे कर्म असते ते केलेच पाहिजे. त्याचा त्याग करणे योग्य नाही. (कारण) विचारवंत पुरुषाची यज्ञ, दान, तप इत्यादी कर्मे त्याचे मन पवित्र करणारी असतात. अर्जुना, म्हणून ही कर्मे (साधी वाटत असली) तरीदेखील कर्तृत्वाभिमान व फलेच्छा सोडून केली पाहिजेत, असे माझे निःसंशय व निर्दोष मत आहे.

कर्माचे आचरण हे स्वत:चे जीवन चालवण्यासाठी करावयाचे असते, तरीही ते काम एक समाजाचे अंग असते हे विसरून चालत नाही. पूर्वी ब्राह्मण क्षत्रिय, वैश्य व शुद्र असे चार वर्ण होते व ते समाजाच्या गरजा विचारात घेऊन निर्माण झाले होते. त्यामुळे प्रत्येक वर्णाने आपले काम चोख बजावले म्हणजे समाजाचा गाडा सुरळीत चालू राहू शकतो. सध्या अशी जरी वर्णाश्रमाची चौकट त्या पद्धतीने राहिली नसली, कामाचे स्वरूप, प्रकार जरी खूप प्रमाणात वाढले असले तरी ढोबळ मानाने तीच चौकट कायम आहे.

आता आपण विचार केला की सध्याच्या परिस्थितीत असलेली कामे हीसुद्धा समाजाची अंगेच आहेत. कोणत्याही एका प्रकारच्या कर्मचाऱ्यांनी त्यांच्या कामाचा संप केला की काय होते? समाजाचा गाडा अडखळतो ना? भांडीवालींनी संप केला, भाजीवाल्यांनी संप केला, पोस्टाचा संप, कारखान्यातील कामगारांचा संप, स्वच्छता कामगारांचा संप, रेल्वे संप, शिक्षकांचा संप अशा अनेक प्रकारच्या लोकांचा, कामगारांचा संप झाला तरी समाजव्यवस्था विस्कळीत होते. तेव्हा प्रत्येकाने आपापले काम वेळेवर व योग्य प्रकारे पूर्ण करणे हे त्यांचे कर्तव्य ठरते. ते समाजाच्या व त्यांच्या स्वत:च्या हितासाठीही आवश्यक आहे. अशा भावनेने कर्माच्या आचरणाने मनाची शुद्धी होते. मन पवित्र होते. मग पुढील प्रक्रिया स्वाभाविकपणे होत जाते. ती वाटचाल मोक्षापर्यंत जाऊन पोचते. भगवंत गीतेत पुढे सांगतात–

*स्वे स्वे कर्मण्यभिरत: संसिद्धिं लभते नर: ।*
*स्वकर्मनिरत: सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ।।*

*(१८.४५ भ. गी.).*

अर्थ – स्वत:च्या स्वाभाविक कर्मात म्हणजे वर्णधर्मात तत्पर असलेल्या पुरुषास पूर्ण सिद्धी प्राप्त होते. (त्याला मोक्षाकरिता स्वकर्माचा म्हणजे वर्णधर्माचा त्याग करावा लागत नाही.) अशा स्वकर्मनिष्ठ पुरुषास मोक्ष कसा मिळतो, ते ऐक.

स्ववर्णधर्मकर्मात सिद्धी प्राप्त होते. म्हणजे ही सिद्धी कोणती? सिद्धी म्हणजे हुकमत. ही हुकमत एकनिष्ठेने कार्य करण्यामुळेच मिळते. आपण पुष्कळ वेळा असे ऐकतो की, नव्हे प्रत्यक्ष व्यवहारात घडते की एखादी व्यक्ती सुरुवातीला एका उद्योगात अगदी खालच्या दर्जाच्या कामावर रूजू झाली असेल तर पुढे तीच व्यक्ती २५-३० वर्षांनी त्याच उद्योगात एका वरिष्ठ अधिकाऱ्याच्या जागेवर काम करत असते. काही ठिकाणी नोकराचा मालक झालेला असतो. काही ठिकाणी कंडक्टरचा

राष्ट्राध्यक्ष झालेला असतो तर एक शिक्षक पुढे राष्ट्रपती होतो. हे कसे होते? तर केवळ स्वकर्माचे निष्ठेने पालन केल्यामुळेच होते. हीच ती सिद्धी होय. हा भाग व्यवहारातील झाला, लौकिकातील झाला. या संत मालिकेतील कोणतेही एक उदाहरण घेतले तरी ते कोणत्याही प्रकारे वेगळे ठरणार नाही. संत सावता माळी, संत गोरा कुंभार, संत सेना 'न्हावी', संत कबीर, संत जनाबाई, संत चोखामेळा, संत नामदेव शिंपी, संत नरहरी सोनार हे सर्व आपापल्या वर्णाप्रमाणे निष्ठेने काम करणारे होतेच, शिवाय त्यांनी परमेश्वराची भक्तीही केली. म्हणून आपल्या कर्माचा दर्जा काय आहे याला महत्त्व नाही तर निष्ठेने कर्म करणे हे महत्त्वाचे आहे, कारण आपले काम ही समाजाची गरज आहे व आपल्या कामाने समाजव्यवस्था सुरळीत चालण्यास मदत होण्यासारखे आहे, हे आपण लक्षात ठेवणे जरूर आहे. प्रत्येकालाच आपल्या कर्मापेक्षा दुसऱ्याचे कर्म चांगले वाटते व स्वत:चे कर्म हलके वाटते पण कोणतेही कर्म हे हलके वा चांगले नसते.

*सहजं कर्म कौन्तेय सदोषमपि न त्यजेत् ।*
*सर्वारम्भा हि दोषेण धूमेनाग्निरिवावृता: ।।*

*(१८.४८ भ. गी.).*

अर्थ – अर्जुना! स्वाभाविक प्राप्त कर्म सदोष असले तरी त्याचा त्याग करू नये कारण ज्याप्रमाणे अग्नी धुराने युक्त असतो त्याप्रमाणे सर्वच कर्मे दोषांनी युक्त असतात.

भगवंतांनी 'स्वाभाविक प्राप्त कर्म' असे म्हटले आहे. हे 'स्वाभाविक प्राप्त कर्म' कोणते? तर जे वाडवडिलांपासून चालत आलेले असेल ते 'स्वाभाविक प्राप्त कर्म' होय. पूर्वी (आता या काळातसुद्धा) वडिलांचे व्यवसाय मुले करत असत. कारण तेच कर्म त्यांच्या लहानपणापासून त्या मुलांच्या डोळ्यासमोर असे व त्याच कर्माची गोडी त्या मुलांना लहानपणापासून उत्पन्न होते आणि लहानपणापासूनच त्या कर्माचा सराव असल्याने पुढे मुलांना त्यात प्रावीण्य मिळवता येत असे. त्यामुळे तेच कर्म पुढे मुले करू लागत. कोणतेही कर्म ही समाजाची गरज असते. अमुक एक कर्म हलके, वाईट म्हणून कोणी ते सोडून देऊ लागला तर ते कर्म कोणीतरी केलेच पाहिजे. तेव्हा वाट्याला आलेले कोणतेही कर्म हे स्वीकारलेच पाहिजे- ते स्वत:ची बुद्धी, कुवत पाहून. मग त्यात उच्च-नीच-श्रेष्ठ-कनिष्ठ हा भेद येतच नाही. पण जे स्वीकारले असेल ते निष्ठापूर्वक करणे यालाच जास्त महत्त्व आहे व त्या निष्ठेने आचरण्यानेच

सिद्धी प्राप्त होते, हे निश्चित. या निष्ठेचे फळ पुढे म्हणजे या जन्मी वा पुढील जन्मी कसे मिळते? तो साधक, कर्ता, कोणत्या स्थितीपर्यंत पोचतो? याचे वर्णन भगवंत करतात. ते म्हणतात–

*बुद्ध्या विशुद्धया युक्तो धृत्यात्मानं नियम्य च ।*
*शब्दादीन्विषयांस्त्यक्त्वा रागद्वेषौ व्युदस्य च ॥*

*विविक्तसेवी, लघ्वाशी यतवाक्कायमानसः ।*
*ध्यानयोगपरो नित्यं वैराग्यं समुपाश्रितः ॥*

*अहंकारं बलं दर्पं कामं क्रोधं परिग्रहम् ।*
*विमुच्य निर्ममः शान्तो ब्रह्मभूयाय कल्पते ॥*

*ब्रह्मभूतः प्रसन्नात्मा न शोचति न काङ्क्षति ।*
*समः सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम् ॥*

*भक्त्या मामभिजानाति यावान्यश्चास्मि तत्त्वतः ।*
*ततो मां तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरम् ॥*

*सर्व कर्माण्यापि सदा कुर्वाणो मद्व्यपाश्रयः ।*
*मत्प्रसादादवाप्नोति शाश्वतं पदमव्ययम् ॥*

*चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।*
*बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चितः सततं भव ॥*

*मच्चितः सर्व दुर्गाणि मत्प्रसादात्तरिष्यसि ।*
*अथ चेत्त्वमहंकारात् न श्रोष्यसि विनङ्क्ष्यसि ॥*

*(१८.५१ ते ५८ भ. गी.).*

अर्थ – धारणेने युक्त (निश्चयी) असून, शुद्ध बुद्धीने मनाचे नियमन करून (तद्द्वारा) इंद्रियांचे विषयांविषयीचे रागद्वेष (आवडनावड) काढून टाकून शब्दादी विषयोपभोगाचा (विषयवासनांचा) त्याग करून जो पवित्र व शुद्ध स्थानी राहतो, जो मिताहारी असतो, जो शरीर, वाणी व मन यांचे संयमन करतो, (कायिक, वाचिक, व मानसिक तपाचरण करतो,) जो भगवच्चिंतन करतो, नेहमी वैराग्यसंपन्न असतो, (उपभोगाची तळमळ बाळगत नाही) अभिमान, दुराग्रह, गर्व, हाव, संताप व

उपभोगसामग्री यांचा त्याग करून, ममत्वशून्य आणि शांत वृत्तीचा असा जो पुरुष असतो, तो ब्रह्मस्वरूप होण्यास पात्र होतो. ब्रह्मसाक्षात्कारी झाला म्हणजे (येणेप्रमाणे ब्रह्मप्राप्तीला पात्र झालेला पुरुष) त्या पुरुषाचे अंत:करण प्रसन्न असते आणि तो (कोणत्याही गोष्टीबद्दल) शंका करत नाही व अपेक्षाही धरत नाही. त्याची बुद्धी सर्व प्राणिमात्रांचे ठिकाणी सारखीच (हितकारक) झालेली असते, (त्यामुळे) त्याला श्रेष्ठ (ज्ञानविज्ञानयुक्त) अशी माझी (परमात्म्याची) भक्ती प्राप्त होते. त्यानंतर मी (परमात्मा) केवढा व कोण आहे हे (तो ज्ञानविज्ञानयुक्त भक्त) भक्तीच्या योगाने तत्त्वत: ओळखतो व मला जाणल्यानंतर (तो) मला (परमात्मरूपाला) येऊन मिळतो (म्हणजे ब्रह्मस्वरूप होतो). माझा (परमात्म्याचा) अनन्याश्रय करणारा सर्वही कर्मे नेहमी करत असतानाही (ती कर्मे परमेश्वरार्पण बुद्धीने करीत असल्यामुळे) माझ्या (परमेश्वराच्या) कृपेने अक्षय शाश्वत पद (अमृतत्व) प्राप्त करून घेतो (म्हणून) मत्पर (म्हणजे परमात्मस्वरूप हेच ज्याचे परम साध्य आहे असा) होऊन, हे अर्जुना! सर्व कर्मे अंत:करणाने माझ्या ठिकाणी समर्पण करून व बुद्धियोगाचा आश्रय करून, नेहमी माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणी चित्त ठेवणारा असा तू हो. आपल्या चित्ताचा (परमेश्वराचे) ठिकाणी लय करून राहिलास म्हणजे माझ्या (परमेश्वराच्या) प्रसादाने (कर्माचरणातील) सर्व दुष्परिणामांतून तू पार पडशील. (आणि असे न करता) जर तू (हा उपदेश) दुरभिमानाने न ऐकशील तर नाश पावशील. (आणि हा उपदेश अर्जुनासाठी असला तरी अहंकाराने परमेश्वरी आदेशाला झुगारून देणाऱ्या सर्वांसाठीच आहे) असो.

भगवंतांनी शेवटी काय म्हटले आहे? 'मत्प्रसादात्तरिष्यसि।' 'माझ्या (परमेश्वराच्या) प्रसादाने तरून जाशील.' जन्मोजन्मी उपासना करून, तप करून, भक्ती करून, भगवंतांनी ज्या गुणांची यादी दिली आहे- त्याप्रमाणे सर्व गुण आत्मसात करून व जीवन्मुक्तीसाठी असणाऱ्या सर्व अटी पूर्ण केल्यावरही पुन्हा भगवंतांचा प्रसाद, कृपा आवश्यक आहे काय? एखाद्या प्रश्नाचे उत्तर लिहिल्यावर त्या उत्तराला किती गुण मिळावेत हे आपण ठरवू शकत नाही. त्या प्रश्नाला ४, ५, ६ किंवा ९ गुणसुद्धा मिळू शकतील. कारण ते सर्व गुण देणाऱ्या परीक्षकावर अवलंबून आहे. एखाद्या कामगाराने खूप काम केले तरी त्याला उन्नती द्यावयाची की नाही, त्याचा पगार किती वाढवावयाचा हे त्याच्या वरिष्ठावर अवलंबून आहे. कोणत्याही अगदी परिचयाच्यासुद्धा घरी आपण गेलो तर दारात उभे असताना त्याने 'या' म्हणून 'घरात' घेणे हे त्या व्यक्तीवरच अवलंबून असते. त्याने तुमचे स्वागत उत्साहाने, आनंदाने

केले नाही, त्याने 'या' म्हटले नाही तर आपल्याला त्या व्यक्तीच्या घरातही जाता येणार नाही. म्हणजे हे जे 'अवलंबून असणे' आहे यालाच भगवंतानी 'कृपाप्रसाद' म्हटले आहे. कारण कोणालाही आपली हक्काची वस्तू देताना त्याची परवानगी म्हणजे कृपा असणे हे महत्त्वाचे आहे. म्हणून भगवंत 'मत्प्रसादात्' असे म्हणतात. आणि अशी कृपा हवी असेल तर?

*तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत।*
*तत्प्रसादात्परां शान्तिं स्थानं प्राप्स्यसि शाश्वतम् ॥*

*(१८.६२ भ. गी.).*

अर्थ – अर्जुना! त्यालाच (परमेश्वरालाच) संपूर्णत्वाने म्हणजे कायावाचामने शरण जा. त्याच्या प्रसादाने तुला परमश्रेष्ठ शांती व शाश्वत पद (मोक्ष) प्राप्त होईल.

'शरण' म्हणजे नेमके काय व कसे याबाबत संत ज्ञानेश्वर म्हणतात–

*'सुवर्णमणि सोनया। ये कल्लोळु जैसा पाणिया।*
*तैसा मज धनंजया। शरण ये तूं ॥'*

*(१८.१४०० ज्ञानेश्वरी).*

सुवर्णमणी केवळ सोन्याचाच असतो, सोने हे त्याचे अंग असते. सुवर्णमण्यामधून सोने काढून टाकल्यास तो सुवर्णमणी उरणारच नाही. यापेक्षा जरा वेगळ्या शब्दांत म्हणजे सुवर्ण जर त्या मण्यावर रागावले व ते जर म्हणाले की 'मी तुझ्यामधून निघून जाईन' तेव्हा तो मणी म्हणेल की 'बाबा रे! मी तुला पूर्णपणे शरण आलो आहे कारण तू जर रागावून निघून गेलास तर माझे अस्तित्वच उरणार नाही. तेव्हा तू जाऊ नकोस?' याच पद्धतीने लौकिकातील उदाहरण द्यावयाचे झाले तर एखादा मुलगा वडिलांच्या अधिकाराचा उपयोग करून अयोग्य व्यवसाय करत असेल तर त्याच्या वडिलांना ही गोष्ट कळल्यावर ते रागवतील व मुलाला सांगतील की 'तुझा माझा संबंध नाही व तू केलेल्या व्यवहाराचा व माझा काहीही संबंध नाही, असे मी जाहीर करून टाकतो' असे म्हणताच, मुलगा वडिलांचे पाय धरून विनवणी करेल की 'यापुढे तुम्ही सांगाल तसेच वागेन, कारण तुम्ही असे जाहीर केले तर माझा व्यवसायच संपून जाईल.' वगैरे. म्हणजे मुलाचे, मुलाच्या व्यवसायाचे अस्तित्व वडिलांमुळेच असते. तो आधार जाताच त्याचे सर्वस्वच संपुष्टात येण्यासारखी परिस्थिती असते. संत ज्ञानदेवांनी दुसरा दृष्टांतही तसाच दिला आहे. 'कल्लोळु जैसा पाणिया'। लाट ही पाण्यापासूनच तयार झालेली असते. पाणी हे लाटांचे अंग आहे, पाणी हेच लाटांचे रूप आहे आणि

पाणी हेच लाटांचे अस्तित्व असते. लाट पाण्यातून वर येते व पुन्हा पाण्यातच विलीन होते. जर पाणी नसेल तर लाटही नसणार. तसे परमेश्वरस्वरूप होऊन परमेश्वराची भक्ती करावयाची आहे. स्वत:चे अस्तित्व हे अहंकारामुळे येते. तो अहंकार गळून पडल्याशिवाय परमेश्वर कृपा करीत नाही. अहंकार गळून पडला की भक्ताचे स्वत:चे अस्तित्वच संपते व भक्त 'भक्त' न राहता परमेश्वरस्वरूपच होतो. हीच परमश्रेष्ठ अवस्था होय. हीच जीवन्मुक्ती, विदेही अवस्था होय. पण हा अहंकार कसा सुटावा? कसा गळून पडावा? कशी या अहंकारापासून सुटका व्हावी, हा मोठा प्रश्न आहे. पण त्यालाही भगवंतांजवळ उत्तर आहे.

*मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।*
*मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ।।*

(१८.६५ भ. गी.).

अर्थ – तू माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणीच मन ठेवणारा म्हणजे परमेश्वरप्राप्तीचा हेतू धरणारा, माझीच भक्ती करणारा व माझीच उपासना करणारा हो आणि मलाच नमस्कार कर. (म्हणजे) तू मलाच (परमेश्वरालाच) प्राप्त होशील. हे तुला प्रतिज्ञेने खरे सांगतो (कारण) तू मला प्रिय आहेस (माझे तुझ्यावर प्रेम आहे). अशा प्रकारे सतत परमेश्वराच्या नामस्मरणात, चिंतनात जर साधक राहिला, त्याच्या जीवनाच्या सर्व व्यवहारांत त्याने जर परमेश्वराला सहभागी करून घेतले, तर त्याचे जीवनच परमेश्वरमय होईल आणि मग प्रत्यक्ष साक्षात्काराची वेळ लांब नसते. ही भक्ती किती परमोच्च स्थितीला जावयास पाहिजे, त्याचे एका दृष्टांतानेच जर स्पष्टीकरण केले तर उत्तम प्रकारे लक्षात येईल.

एक शेतकरी होता. त्याचे शेत गावापासून दूर असते. सकाळी जेव्हा तो शेतावर जात असे तेव्हा वाटेत एक बालाजीचे मंदिर लागत असे. शेतकरी मंदिरात जाई. बालाजीसमोर हात जोडून उभा राही व आदल्या दिवशी संध्याकाळपासून दुसऱ्या दिवशी मंदिरात येईपर्यंत जे जे घडले असेल ते ते बालाजीला सांगत असे व नमस्कार करून पुढे जाई. दिवसभर शेतात काम करी व संध्याकाळी परत येताना पुन्हा बालाजीच्या मंदिरात जाई. दिवसभर शेतात केलेले काम बालाजीला सांगत असे. अशी त्याची पद्धत होती.

शेतकरी म्हटला की तो गरीब असणारच. तसा हा शेतकरीसुद्धा गरीब होता. पेरणी आली की बियाणांसाठी सावकाराकडून कर्ज घेत असे. तसा या शेतकऱ्याचा

सावकार ठरलेला होता. सावकाराची शेतकऱ्याच्या प्रामाणिकपणाबद्दल खात्री होती. म्हणून कित्येक वर्षे लिखापढीशिवाय त्यांचा व्यवहार चाललेला होता. पुढे सावकार वारला. त्याच्या जागी सावकाराचा तरुण मुलगा व्यवहार पाहू लागला. दर वर्षीप्रमाणे शेतकरी बियाणांसाठी कर्ज घेण्यासाठी सावकाराकडे गेला. मुलाने कर्जाचे रु. ५००/- दिले, पण मुलाने शेतकऱ्याकडून कर्जाची पावती लिहून घेतली. शेतकरी म्हणाला, 'सावकारदादा, तुमचे वडील कधी पावती लिहून घेत नव्हते?' सावकार म्हणाला, 'वडिलांच्या वेळचे व्यवहार त्यांच्याबरोबर संपले. आता माझा व्यवहार हा असा आहे. पटलं तर पाहा?'

शेतकऱ्याने पावती लिहून दिली व पैसे घेतले. शेतावर जाताना शेतकऱ्याने बालाजीच्या कानावर ही गोष्ट घातली. ती अशी– 'बालाजी, म्हातारा सावकार मेला. त्याचा मुलगा आता सर्व व्यवहार पाहू लागला आहे. त्याच्याकडून बियाणांसाठी रुपये पाचशे घेऊन आलो. त्याने पावती लिहून घेतली.' आणि बाकीच्या गोष्टी सांगून शेतकरी पुढे गेला. दिवस जात होते. धान्य तयार होऊन शेतातून घरी आले. दर वर्षीप्रमाणे शेतकऱ्याने धान्य विकून आलेल्या पैशात सावकाराचे रुपये पाचशे व्याजासहित दिले आणि नेहमीच्या पद्धतीने शेतावर जाताना बालाजीला सांगितले. दोन महिन्यांनी सावकाराकडून शेतकऱ्याला बोलावणे आले. शेतकरी सावकाराकडे गेला. सावकार म्हणाला, 'शेतकरीबाबा तुम्ही पैसे नेले ते दिले नाही अजून?' शेतकरी म्हणाला, 'दादा! पैसे तर मी दोन महिन्यांपूर्वीच दिले.' सावकार म्हणाला, 'पण तुमची पावती तर अजून येथेच आहे. तुम्ही पैसे दिले असते तर पावती मागून का घेतली नाही?' शेतकरी म्हणाला, 'दादा, आम्हाला कोठे हा व्यवहार लक्षात राहतो. पैसे दिल्यावर तुम्हीच पावती द्यावयाची असती.' सावकार म्हणाला, 'पावती मागून घेणे तुमचे काम आहे. तुम्ही पैसेच दिले नाहीत म्हणून पावती अजून माझ्याजवळ आहे. तेव्हा पैसे आणू द्या.' शेतकरी म्हणाला, 'आता कुठले पैसे? आता पैसे फक्त सुगीलाच.' सावकार म्हणाला, 'मग मी तुमच्यावर कोर्टात फिर्याद करतो'. शेतकरी न बोलता निघून आला. शेतावर जाताना शेतकऱ्याने ही सर्व घटना बालाजीला सांगितली व पुढे शेतावर निघून गेला.

दोन महिन्यांनी शेतकऱ्याला कोर्टाचे समन्स आले. शेतकरी कोर्टात हजर झाला. त्याने न्यायाधीशाला झालेली सर्व हकीकत सांगितली. हे सर्व ऐकल्यावर न्यायाधीशाला मनातून खात्री झाली की शेतकरी खरे बोलतो आहे. कोर्टाच्या पद्धतीने साक्षी-पुरावा महत्त्वाचा असतो. तेव्हा न्यायाधीश म्हणाले, 'शेतकरीबाबा, तुम्ही पैसे

दिले याला पुरावा काय? तुम्ही पैसे दिले याला कोणी साक्षीदार आहे काय? तुम्ही पैसे दिले ह्याला काही पुरावा आहे काय? तुम्ही पैसे दिले त्या वेळी तेथे कोण होते? कारण जोपर्यंत तुम्ही लिहून दिलेली पावती सावकाराजवळ आहे, तोपर्यंत तुम्ही सावकाराचे पैसे देणे लागता असे ठरते.' सावकाराच्या भोवती असलेल्या सर्व माणसांनी जरी पाहिले असले तरी तशी साक्ष देण्यास कोण पुढे येणार? शेतकरी म्हणाला, 'साहेब, मी पैसे दिले तेव्हा तेथे कोण होते हे मला आठवत नाही, पण मला नक्की आठवते की बालाजीला मी हे सर्व सांगितले आहे.' न्यायाधीशाला वाटले बालाजी हा शेतकऱ्याचा मित्र असावा म्हणून कोर्टाने बालाजीला समन्स काढावयास सांगून तारीख दिली.

शेतकरी त्या तारखेला हजर झाला. 'बालाजी'च्या नावाने पुकारा केला आणि आश्चर्य म्हणजे साक्षीच्या पिंजऱ्यात एक प्रकाशाचा झोत पडला. त्यातून आवाज आला की 'शेतकऱ्याने पैसे दिले याला मी साक्षीदार आहे.' न्यायाधीश या साक्षीने अवाक् झाले. अर्थात शेतकरी निर्दोष सुटला हे सांगण्याचे कारण नाही. आत्मनिवेदन भक्तीची ही परमोच्च अवस्था नव्हे काय?

म्हणून कोणतेही संकल्प, विकल्प न बाळगता, वेगवेगळ्या उपासनापद्धतींचा अवलंब करण्याच्या द्विधा मनःस्थितीत न अडकता, वेगवेगळ्या देवतांची उपासना न करता कोणतीही एक उपासना, एकनिष्ठेने, सातत्याने, अखंडपणे करण्याने त्याचे फळ चांगले मिळते हेच यातून सिद्ध होते. आणि भगवंतही गीतेत हेच सांगतात-

*सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज ।*
*अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥*

*(१८.६६ भ. गी.).*

अर्थ – (इतर) सर्व धर्म (म्हणजे पापापासून मुक्त होण्यासाठी करावी लागणारी प्रायश्चित्ते घेण्याचा खटाटोप) सोडून तू मला एकट्यालाच (परमेश्वरालाच) शरण जा (म्हणजे) मी (परमेश्वर) तुला सर्व पातकांपासून मुक्त करीन. व्यर्थ शोक करू नकोस.

परमेश्वरालाच पूर्ण शरण जाणे हेच यातून स्पष्ट होते. अर्थात स्वार्थ सोडून केलेली, म्हणजे अहंकार सोडून केलेली कोणतीही कर्मे बंधनकारक होत नाहीत, कारण ती जीवन्मुक्तावस्था असते आणि त्यापासून निर्माण होणाऱ्या कर्मफलाचे म्हणजेच पापपुण्याचेही बंधन पडत नाही. तो त्यातूनही मुक्त असतो. ज्या परमेश्वराला शरण जावयाचे त्या परमेश्वराचे स्वरूप तरी कसे आहे? त्याचे संत-महंतांनी-

सत्पुरुषांनी वर्णन तरी काय करून ठेवले आहे? त्याला ओळखावयाच्या त्यांनी कोणत्या खुणा सांगून ठेवल्या आहेत? त्यांना जो परमेश्वर भेटला आहे, त्याची त्या संतांना जी अनुभूती आलेली आहे, त्यांना परमेश्वराचा जो साक्षात्कार झालेला आहे, त्याचे त्यांनी वर्णन काय करून ठेवले आहे? हे पाहणे, वाचणे, त्याचे चिंतन, मनन, करणे आणि एखाद्या वेळेस जर आपणाला तसा साक्षात्कार झाला तर नेमके काय घडले, त्यामुळे आपले मन गोंधळून जाण्याची शक्यता आहे. प्रथम परमेश्वराचा साक्षात्कार अनेक प्रकारे होत असतो. साक्षात्काराची जाणीव होत गेली तर साधनेमध्ये उत्साह येतो व सर्वात शेवटी अपरोक्ष अनुभूती येते. त्यासाठी त्या साक्षात्काराची थोडी तरी कल्पना आपणास असावी म्हणून तर आपण हे पाहणे जरूर आहे. आतापर्यंत परमेश्वराची सिद्धी झाली. परमेश्वराचे सृष्टीतील स्वरूप झाले. सर्वाभूती परमेश्वराचे अस्तित्व कशा प्रकारे असते (ज्ञान-विज्ञानसहित) तेही समजून आले. आपला जन्म, जन्माचे इतिकर्तव्य व आपले ध्येय काय असावे याचा विचार झाला. आता ते ध्येय गाठावयाचे असेल तर काय करावे याचेही मार्गदर्शन झाले. आता ते परब्रह्म जर प्रत्यक्ष उभे राहिले तर त्याला कसे ओळखावे याचा विचार होणे गरजेचे आहे व त्या ठिकाणी संत-महात्मे पोचलेलेही आहेत. त्याची लक्षणे काय काय आहेत याचेही ज्ञान होणे आवश्यक आहे. त्याआधी परमेश्वरालाच का शोधावे? त्याचे एवढे काय महत्त्व आहे? परमेश्वरालाच शोधल्याने काय मिळते? व परमेश्वराशिवाय इतरांना भेटल्यावर काय मिळते? याविषयीचा सुरेख दृष्टांत रामदासस्वामींनी दासबोधामध्ये वर्णन केला आहे.

*'उगाच घर पाहोन गेला। घरधनी नाही वोळखिला।*
*राज्यामधूनचि आला। परी राजा नेणे॥*

*देहसंगे विषये भोगिले। देहसंगे प्राणी मिरविले।*
*देहधर्त्यास चुकले। नवल मोठे॥*

*ऐसे लोक अविवेकी। आणि म्हणती आम्ही विवेकी।*
*बरे ज्याची जैसी टाकी। तैसे करावे॥'*

*(दशक ११, समास ८, ओवी १४ ते १६ दासबोध).*

विवेकी म्हणवून घेणारे लोक एवढा साधा विचार करत नाहीत, की ज्या देहामुळे आपण हे सारे विषय उपभोगतो आहोत, हे विषयोपभोग जातात कोठे? कोण याचा भोग घेतो? या उपभोगामुळे कोणाला, सुख, आनंद मिळतो? देह तर जड आहे, विषयही जड आहेत, मग विषयांवरील आनंद शोधणारा कोण? व तो आनंद घेणारा

तरी कोण? याचा कधीही विचार करत नाहीत व स्वतःला विवेकी समजतात. लांब लांब गप्पा मारतात. जगाला शहाणपण शिकवतात व अज्ञानी लोकांमध्ये गोंधळ मात्र निर्माण करून ठेवतात व मरून जातात.' असो-

## धर्माची रचना - युझर फ्रेंडली (User Friendly)

धृ. धारयति, धारयते म्हणजे आधार देणे. यावरूनच सर्व समाजाला आधार देणारा तो धर्म. म्हणून पूर्वीच्या ऋषी-मुनींनी धर्माची स्थापना करून समाजाला एकत्र ठेवण्याचा प्रयत्न केला. धर्म म्हणजे चार आश्रम व चार वर्ण. चार आश्रमांनी व्यक्तीच्या जीवनाची चौकट निर्माण झाली व चार वर्णांनी समाजाची चौकट निर्माण झाली. या चौकटीच्या ना कोणी बाहेर जाऊ शकला, ना कोणी जात आहे, ना कोणी जाऊ शकेल- इतकी ती विचारपूर्वक तयार केली आहे. आज कदाचित या चार आश्रमांच्या आणि चार वर्णांच्या अंतर्गत सीमारेषा कोणी तोडल्या मोडल्या असतील. या सीमांची सरमिसळ केली असेल, पण बाहेरच्या भिंती मात्र अगदी पक्क्या आहेत. त्या अगदी तशाच राहणार. शब्द बदलले, नावे बदलली, साधने बदलली तरी व्यवसाय तेच राहिले. शेतकरी शेतकरीच राहणार. नांगराच्या ऐवजी ट्रॅक्टर आला, हाताची कामे मशीनने केली म्हणून शेतकऱ्याचा राजा होणार नाही. त्याचप्रमाणे बारा बलुतेदार समजावे. नोकर हा नोकरच राहणार. त्याची मजुरी ५ रुपयांवरून ५ लाख रुपयांपर्यंत गेली असली तरी मालकाच्या नजरेतून तो नोकरच. पायी जाणारा नोकर तसा मोटारीतून जाणाराही नोकरच. त्याची किंमत तेवढीच असते. नोकर कधी मालक म्हटला जात नाही. मालकाच्या मनात आले की एका मिनिटात नोकराला नोकरीतून काढून टाकले जाते. या पद्धतीने विचार केला तर आताच्या विसाव्या शतकातही हेच दिसते व पुढे तिसाव्या शतकातही हेच दिसणार. यात काहीच फरक पडणार नाही.

या चौकटीत जो लवचिकपणा आहे, ठेवला गेला आहे, त्याचा जो फायदा घेतला जात आहे, त्यातच सर्व घोळ आहे. त्यातल्या त्यात शरीरधर्माचा विचार करता आश्रमधर्म तर फारच पक्का आहे. कारण कोणत्याही मुलां-मुलींची लग्ने ही वयात आल्याशिवाय होऊच शकत नाही. त्यामुळे वय वर्षे २५ पर्यंत तरी शिक्षण चालतेच. पुढे विवाह करून संसार चालवणे म्हणजे त्यांची मुले आलीच. त्यांचे २५ वर्षांपर्यंत शिक्षण चालणार व त्यांची जबाबदारी माता-पित्यांवर असणार. पुढे त्यांचे विवाह झाले की माता-पित्यांचे वानप्रस्थाश्रम म्हणजे मुलांपासून वेगळे राहणे चालू होते. पुढे हात-पाय थकल्यावर व जीवन पूर्ण परावलंबी झाल्यावर ते केवळ घरात असून संन्यास

घेतल्याप्रमाणे संसारात असतात. ना त्यांना कोणी विचारत, ना कोणी त्यांचा विचार घेत, ना कोणी त्यांना काही नावीन्याने घडलेल्या गोष्टी सांगत. त्यांची असून अडचण मात्र होते, कारण त्यांच्यावाचून खोळंबा होण्याची शक्यताच नसते. त्यामुळे कर्तव्यकर्माची जाण शिल्लक राहिली नाही. समानतेच्या, सुधारणांच्या नावाखाली थोरामोठ्यांच्या मानमर्यादा संपल्या. नैतिकतेची बंधने प्रमाणाबाहेर सैल पडली. कोणी कोणाची पर्वा करेनासे झाले, आणि याच ठिकाणी धर्माचा उच्छेद झाला व स्वैराचाराला रान मोकळे झाले. धर्म, अर्थ, काम व मोक्ष यांमध्ये धर्म व मोक्ष यांच्या कोंदणात अर्थ व काम बसवलेले आहेत. त्यामुळे त्यांची शोभा जास्त होती. आता ते कोंदणच गेले. धर्म गेला तसे मोक्षही निखळून पडला. त्यामुळे अर्थ व काम मोकळे पडले. म्हणजे अर्थ व काम यांचा स्वैराचार सुरू झाला आणि समाज विस्कळीत झाला. ती चौकट मोडण्याइतका तो विस्कळीत झाला नाही असे दिसते. कारण असे झाले म्हणजे परमेश्वर अवतार घेतो, असे भगवंतांनीच गीतेत सांगितले आहे.

*'यदा यदा हि धर्मस्य ग्लानिर्भवति भारत ।'*

ही ग्लानी का आली? याचा विचार करता एक गोष्ट लक्षात येते की पूर्वीच्या ऋषी-मुनींनी धर्माची रचना करताना अशी सोय करून ठेवली की लोकांना विचार करावयास काहीही सोय ठेवली नाही. लोकांच्या मेंदूला काहीच खाद्य ठेवले नाही. त्यामुळे त्यांची बुद्धी अशा भलत्याच बाबतीत चालू लागली की जेणे करून धर्माचा उच्छेद व्हावा. याला सध्याच्या विज्ञान युगातील कॉम्प्यूटरच्या नित्य वापरातील शब्दांचे एक उदाहरण देता येईल की जे या ठिकाणी तंतोतंत लागू पडेल आणि ते म्हणजे 'युझर फ्रेंडली' (User Friendly).

कॉम्प्यूटरच्या रचनेमध्ये व त्याच्याकडून काम करून घेण्याच्या विविध सोयींची उपलब्धता करून देण्यामध्ये दिवसेंदिवस खूपच सुधारणा होत आहेत. आपण एक उदाहरण घेऊ म्हणजे ते समजण्यास सोपे जाईल. पूर्वी कार्यालयात (Office) अनेक माणसे काम करत. त्यात त्यांच्याकडे अनेकविध कामे दिली जात. त्यातील हिशोबी (Accounts) खात्यात खूप माणसे लागत. पगाराचा हिशोब करणे, भविष्य निर्वाह निधी, कारखान्यासाठी लागणारा कच्चा / पक्का माल, त्यांच्यावर होणाऱ्या प्रक्रियांचा खर्च, मालाची किंमत ठरवणे, त्यावर नफ्याचा विचार, विक्री करून मिळणारे पैसे, लोकांकडून आलेल्या चलनांची यादी तयार करणे, लोकांना पाठवलेली बिले, मिळालेल्या पैशांची खर्चाशी टक्केवारी या सर्व गोष्टी व्यक्ती करत असत. आता ही कामे कॉम्प्यूटर करू लागला. प्रथम काही कामे कॉम्प्यूटर करीत असे. पुढे लोकांच्या

अडचणींचा विचार करून सुधारणा होत गेल्या. कॉम्प्यूटरला द्यावयाच्या हुकमांची बरीच मोठी यादी लक्षात ठेवावी लागत असे. एखादी माहिती कोठे ठेवली आहे याचा शोध घेण्यातही खूप वेळ जाई. एकाच बिलाची दोन वेळा नोंद झालेली कळत नसे. सगळ्या बिलांची बेरीज करण्यासाठी पुन्हा काही प्रक्रिया करावी लागत असे. शेवटी जमा-खर्चाचा ताळा तयार करणे हीसुद्धा फार मोठी कामाची जबाबदारी होती. लोकांच्या या सर्व अडचणी लक्षात घेऊन संशोधकांनी वेगवेगळ्या सुधारणा केल्या, वेगवेगळ्या भाषा निर्माण केल्या. तुम्ही एखाद्या कामास सुरुवात केली की ज्याप्रमाणे रस्त्यावर, चौकाचौकात वेगवेगळ्या पाट्या लावून प्रवाशांना मार्गदर्शन केले जाते, तसे तुम्हाला वेगवेगळ्या माहितीचे, सूचनांचे, कोष्टकांचे, मार्गदर्शन करणारे तक्ते समोर येत जातात. 'तुम्हाला काय पाहिजे?' असाच जणू त्या माहितीच्या तक्त्याचा उद्देश असतो. तुम्ही फक्त तुम्हाला काय पाहिजे तेथे 'बाण' ठेवा व बटण दाबा. लगेच ती माहिती तुमच्या समोर हजर होईल. त्यातून आणखी काही पाहिजे असल्यास पुन्हा नवीन तक्ते समोर येत जातात व तुम्हाला मुक्कामावर नेऊन पोचवतात. यातील महत्त्वाची गोष्ट म्हणजे तुम्हाला काही लक्षात ठेवून त्या सूचना वा हुकूम द्यावयास पाहिजे असे नाही. अशा सर्व प्रकारच्या सोयी संशोधकांनी या कॉम्प्यूटर यंत्रावर करून ठेवल्या आहेत. त्यामुळे कामे लवकर होऊ लागली, बिनचूक होऊ लागली, कमी कष्टात होऊ लागली व कमी माणसात होऊ लागली. अनेक माणसांची कामे एक कॉम्प्यूटर करू लागला. याशिवाय रेकॉर्ड साठवण्याची समस्या कमी झाली, फाईल्स हरवण्याची, खराब होण्याची शक्यता कमी झाली. वगैरे वगैरे. यातून काही नुकसानही झाले असेल, पण सर्वात महत्त्वाचे नुकसान म्हणजे मानवाचा, सर्वसामान्यांचा मेंदू निकामी होत चालला आहे. त्याला काही खाद्य राहिले नाही. मेंदूला पडणारा ताण, त्याची क्षमता जोखण्याची संधी आता संपली आहे. हे फक्त कॉम्प्यूटरमुळेच झाले आहे असे नाही, तर मानवाच्या जीवनातील सर्वच क्षेत्रांत ही समस्या निर्माण झाली आहे. कारण संशोधकांनी तयार केलेल्या यंत्रांची उपयुक्तता 'युझर फ्रेंडली' (User Friendly) बनवली आहे. काही थोड्या बोटांवर मोजण्याइतक्या लोकांनाच त्यातील 'गमक' माहीत असते. बाकीच्यांनी ती वस्तू केवळ वापरावी इतकी सोपी करून ठेवली आहे. उदाहरणार्थ– वाहने. म्हणजे स्कूटर, मोटार. यात दिलेल्या तरफा (levers) जागोजागी हलवल्या की वाहन चालू होते. मुले, मुली, बायका, पुरुष ही सर्व वाहने चालवू शकतात. पण वाहन चालताना आत काय काय घडते, याची मात्र कोणालाच कल्पना नसते व कल्पना असण्याचे कारण नाही. वाहन बंद पडले की ते ढकलत नेऊन गॅरेजमध्ये टाकणे एवढेच सर्वांना जमते. याच पद्धतीने टी. व्ही. व त्यासमान

असणारी यंत्रे, फोन, कॅल्क्युलेटर, घरातील अनेकविध यंत्रे आणि आता कॉम्प्यूटर्स. वापरणाऱ्याने फक्त बटणे दाबावीत व भरपूर काम हातावेगळे करावे. कॉम्प्यूटर हे यंत्र कोणत्या क्षेत्रात शिरले नाही असे क्षेत्र नाही, पण त्या ठिकाणी कॉम्प्यूटर काय काम करतो यापेक्षा तो ते कसे करतो याची मात्र कोणालाच कल्पना नसते. ते फक्त ज्यांनी तयार केले त्यांनाच ते माहीत असते. त्यांनीच फक्त डोके चालवलेले असते. बाकीच्यांच्या बुद्धीला अजिबात शिणवटा येत नाही. यालाच 'युझर फ्रेंडली' (User Friendly) म्हणतात.

अगदी हाच प्रकार आमच्या पूर्वजांनी धर्माच्या बाबतीत करून ठेवला आहे. धर्म, अर्थ, काम व मोक्ष या जीवनाच्या चार पायऱ्या आहेत.

*'जोडोनिया धन उत्तम व्यवहारे । उदास विचारे वेच करी ॥'*

*(तु. म.).*

धर्माने वागून अर्थ प्राप्त करून घ्यावयाचा, संयमाने जीवनाचा उपभोग घ्यावयाचा व जीवनाचे उद्दिष्ट जो मोक्ष तो प्राप्त करून घ्यावयाचा, पण धर्माची रचना करताना, चारी वर्णांच्या लोकांना धर्माचे आचरण घडून मोक्ष प्राप्त व्हावा हा विचार मनात ठेवल्यामुळे धर्माचे आचरणाचे प्रकार, साधना, उपासना, व्रते, वैकल्ये, आचारसंहिता, नैतिक मूल्ये यांची मांडणी त्यांनी 'युझर फ्रेंडली' अशी केली. लोकांना जास्त खोलात न जाता, त्यांच्या बुद्धीला जास्त ताण द्यावा लागू नये. शास्त्र, विज्ञान व तत्त्वे यांची जाण करून घेण्यासाठी त्यांचा काळ जाऊ नये तरीही ज्याचे आचरण केले असता सहजपणे त्यांच्या ध्येयाकडे म्हणजे मोक्षप्राप्तीकडे त्यांची वाटचाल होईल, या पद्धतीचे मार्गदर्शन केले आहे. त्याप्रमाणे आचरण करावे. बाकी पुढील सर्व आपोआप होऊन मोक्ष प्राप्त होईल याची सोय केली. श्रीगीतेतही भगवंत म्हणतात–

'स्वे स्वे कर्मण्यभिरत: संसिद्धिं लभते नर: । स्वकर्मनिरत: सिद्धिं यथा विन्दति तच्छृणु ॥' (१८-४५) भगवंतांनी जे सांगितले तेच श्रीसंत ज्ञानदेवांनी अगदी सोप्या भाषेत सांगितले आहे- 'आतां इयेचि विचक्षणा । वेगळालिया वर्णां । उचित जैसे कारणां । शब्दादिक ॥ ना तरि जळदच्युता । पाणिया उचित सरिता । सरितेसि पांडुसुता । सिंधु उचितु ॥ तैसे वर्णाश्रमवशें । जे करणीय आले असे । गोरेया अंगा जैसे । गोरेपण ॥ तया स्वभावविहिता कर्मा । शास्त्राचेनि मुखे वीरोत्तमा । प्रवर्तावयालागी प्रमा । अढळ कीजे ॥ पै आपुलेचि रत्न थिते । घेपे पारखियाचेनि हाते । तैसे स्वकर्म आपैते । शास्त्रे करावे ॥' (ज्ञानेश्वरी १८.८८५ ते ८८९).

अर्थ – आता अर्जुना! श्रवणादी निरनिराळ्या इंद्रियांना जसे शब्दादी निरनिराळे गुण साजतात, किंवा मेघातून पडणाऱ्या पावसाच्या पाण्याला जशी नदी योग्य व नदीला जसा समुद्र योग्य, तशी चार वर्णांना शोभणारी भिन्न भिन्न कर्मे आहेत. म्हणून वर्ण व आश्रम यांच्या धर्मानुसार जे जे कर्म प्राप्त होते ते ते गोऱ्या माणसाच्या गोरेपणासारखे शोभादायक होते. या कारणास्तव अर्जुना, ते स्वाभाविक विहित कर्म शास्त्राज्ञेप्रमाणे करण्याला प्रवृत्त होण्याविषयी बुद्धी अचळ राखावी. जसे मूळचे आपल्याच मालकीचे रत्न रत्नपारख्याकडून पारखून घ्यावे त्याप्रमाणे आपलीच कर्मे शास्त्राकडून निश्चित करून घ्यावी.

तसेच श्रीसंत ज्ञानेश्वर पुढे म्हणतात, 'तैसे स्वभावे भागा आले। वरी शास्त्रे खरे केले। ते विहित जो आपुले। आचरे गा।। परी आळसु सांडुनि। फळकाम दवडुनी। आंगेजीवे मांडुनी। तेथेचि भरु।।' (१८-८९३, ८९४). अर्जुना जो यापरी। ते विहित कर्म स्वये करी। तो मोक्षाच्या ऐल द्वारी। पैठा होय।। (८९६). येर नित्य कर्म तंव। फलत्यागे वेचिले सर्व। म्हणौनि मोक्षाची शिंव। ठाकू लाहे।। (८९९). जे सकळ भाग्याची सीमा। मोक्षलाभाची जे प्रमा। नाना कर्ममार्गश्रमा। शेवटु जेथ।। मोक्षफळे दिधली वोल। जे सुकृततरुचे फुल। तये वैराग्यी ठेवी पाऊल। भवरुं जैसा।। (९०१, ९०२). ऐसी मोक्षाची योग्यता। सिद्धि जाय तया पांडुसुता। अनुसरोनि विहिता। कर्मा यया।। हे विहित कर्म पांडवा। आपुला अनन्य वोलावा। आणि हेचि परमसेवा। मज सर्वात्मकाची।। (९०५, ९०६) तया सर्वात्मका ईश्वरा। स्वकर्मकुसुमांची वीरा। पूजा केली होय अपारा। तोषालागी।। (९१७). म्हणौनि मोक्षलाभालागी। जो व्रते वाहतसे आंगी। तेणे स्वधर्मु आस्था चांगी। अनुष्ठावा।।' (९२२ ज्ञानेश्वरी).

अर्थ – त्याचप्रमाणे जे स्वाभाविकपणे आपल्या वाट्याला आले आहे आणि तशात शास्त्रानेही ज्याला पाठिंबा दिला आहे ते आपुले विहित कर्म जो आचरतो, पण आळस सोडून आणि फळेच्छेला दूर सोडून जो तनुमनाने त्याच कर्माचरणात दंग होतो; अर्जुना! याप्रमाणे जो विहित कर्म आचरतो तो मोक्षाच्या अलीकडील तीरावर येऊन थाटतो. ज्या अर्थी करण्यास अयोग्य व निषिद्ध अशा कर्माशी त्याचा संबंधच येत नाही, त्या अर्थी संसाराचा अपाय त्याला कधीच झपाटत नाही. इतर नित्यकर्म तो फलेच्छा सोडून, ईश्वरार्पण करीत असल्यामुळे तो मोक्षाच्या शिवेला गाठू शकतो. ज्यात सर्व भाग्याची परिपूर्णता आहे, ज्यात मोक्षलाभ निश्चित आहे, अथवा कर्मकांडाचा ज्यात कडेलोट होतो, जे मोक्षफलाची हमी देते, जे पुण्यकर्मरूपी वृक्षाचे फळ आहे, त्या वैराग्यावर एखाद्या भ्रमराप्रमाणे साधक पुरुष अलगद पाऊल ठेवतो.

अशा प्रकारे पार्था, या विहित कर्माच्या आचरणाने साधकाला मोक्षप्राप्तीची पात्रता येते. अर्जुना, ते हे विहित कर्मच जिवाला खरा आसरा आहे आणि हे कर्म आचरणे हीच माझ्या परमात्मस्वरूपाची खरोखरी सेवा होय. त्या सर्वांतर्यामी ईश्वराला विहित कर्माचरणांच्या फुलांची पूजा वाहिली असता त्याला अपरंपार संतोष होतो. म्हणून मोक्षलाभासाठी जो नवससायास करत असेल त्याने स्वधर्माचे आचरण उत्कृष्टपणे करावे.'

वरील ओव्या व त्यांचे अर्थ अगदी स्पष्ट आहेत. त्यांचा सारांश म्हणजे 'जी कर्मे स्वभावत: वाट्याला आली असतील ती फलाशा सोडून करावी म्हणजे तो मोक्षाचा अधिकारी होतो. कृती आपल्या हातात आहे. त्याची प्रक्रिया आपोआप होते. आपण केवळ योग्य मार्गाची निवड करायची असते आणि फक्त निष्ठेने, सातत्याने, चालणे एवढेच आपले काम आहे. त्याचे फलित शेवटी निश्चित मिळणारच यात शंका नाही. कारण पुढील प्रक्रिया काय होतात हे जाणण्याची आपल्याला आवश्यकता नसते. कळ दाबली की यंत्र चालू झाले व आपले काम झाले हे महत्त्वाचे आहे. यंत्रातील रचना कशी आहे, यंत्र कसे चालते या गोष्टीशी सामान्य माणसाला काहीही कर्तव्य नसते आणि जरुरीही नसते. हीच गोष्ट भगवान श्रीकृष्णांनी गीतेत सांगितली आहे. ते म्हणतात–

*'यद्यदाचरति श्रेष्ठस्तत्तदेवेतरो जन: ।*
*स यत्प्रमाणं कुरुते लोकस्तदनुवर्तते ॥'*

*(भ. गी. ३.२१)*

अर्थ – श्रेष्ठ पुरुष जे जे करतो तेच इतर सामान्य करत असतात. तो (श्रेष्ठ) जे कर्म करतो त्याला (कर्माला) प्रमाण समजून इतर लोक अनुसरतात.

या ठिकाणी 'श्रेष्ठ' म्हणजे जाणकार, शहाणे, विद्वान, धर्मज्ञ, शास्त्रज्ञ. हे लोक जसे वागतात, आचरण करतात त्याचे अनुकरण करून सामान्य सकल जनांनी केले असता त्या श्रेष्ठांना त्या कर्माचे जे फळ मिळते, तेच फळ सामान्य जनांना मिळते व तेही मोक्षाप्रद जातात. असे हे User friendly करून ठेवले आहे. आता ते कसे केले आहे याचे थोडे नमुने पाहू. यासाठी श्रावणातील कहाण्या घेतल्या आहेत. त्या पुढे पाहू. एक गोष्ट अती महत्त्वाची आहे की कोणताही एक माणूस, कोणतीही एक संस्था, समाजाच्या सर्व गरजा भागवू शकत नाही. तेव्हा सर्व गरजांच्या भागवणुकीसाठी पुष्कळ माणसांची, उद्योगांची, संस्थांची, कारखान्यांची, कार्यालयांची (Offices)

उभारणी करण्याची आवश्यकता असते, कामाची विभागणी आवश्यक असते. प्रत्येकाने आपले काम निष्ठेने, प्रामाणिकपणाने, तत्परतेने, योग्य वेळात, योग्य प्रकारे करणे आवश्यक असते आणि असे झाले म्हणजेच सर्वांच्या गरजा व्यवस्थित भागून कोणालाही त्रास, दु:ख होणार नाही म्हणजेच सर्व सुखी, समाधानी, आनंदित राहू शकतील. एवढीच साधी अपेक्षा समाजाची म्हणजे आपली आपल्याकडून असते.

कुटुंब संस्थेमध्ये जसे लहान मूल ते वयोवृद्ध अशी सर्व वयोगटांची माणसे असतात. त्यांत काही कार्यक्षम तर काही अक्षम असतात, पण घरातील सर्व जण सर्वांच्या गरजा भागवण्यासाठी श्रमून सर्व जण सुखाने, आनंदाने जीवन जगत असतात. (सर्वसाधारण एका आदर्श कुटुंबातील परिस्थिती) अगदी तसेच समाजातील सर्व प्रकारच्या लोकांची गरज सर्व प्रकारच्या लोकांनी आपल्या आपल्या क्षमतेप्रमाणे भागवल्यास सर्व समाजच सुखी-आनंदी होईल. आणि हीच शिकवण आपल्या धर्माने प्रत्येक व्यक्तीच्या जीवनक्रमाची रचना करताना दिली आहे. फक्त त्याचे आचरण त्या पद्धतीने केले जावे अशी अपेक्षा आहे. योग्य बटणे दाबत गेले तर योग्य प्रक्रिया होत राहील. त्यात चूक केली तर यंत्र योग्य प्रकारे चालणार नाही. एक तर अपघात होईल नाही तर त्या यंत्रातून निघणारे उत्पादन खराब होईल. शेवटी सर्वच नुकसान. म्हणजे सर्वच समाज विस्कळीत होईल. यालाच अधर्म म्हणतात. आता सर्वच धर्माने कसे वागतील व अंती मोक्षाचे अधिकारी कसे होतील, यासाठी दैनंदिन जीवनात धर्म कसा बसवला आहे हे पाहणे आले. पूर्वीच्या पद्धतीने जरी याची योजना असली तरी हल्लीच्या विज्ञानयुगात, सुधारलेल्या, पुढारलेल्या युगातही त्यात विशेष फरक करावा लागणार नाही. तरीही त्याचे रूपांतर कसे करावे तसे ज्याचे त्याने ठरवले तरी त्यातून जे साध्य व्हावयास पाहिजे ते साध्य होणार हे महत्त्वाचे आहे.

*'मातृ देवो भव। पितृ देवो भव। आचार्य देवो भव।'*

ही शिकवण घरातील आणि समाजातील सर्व थोरामोठ्यांविषयी आदर दाखवणारी आहे. ही शिकवण या सुधारलेल्या विज्ञानयुगात काय आवश्यक नाही? तर आहे. त्यानंतर नम्रता, विनय हे गुणही या पद्धतीच्या संस्काराने येतात. माता ही बाळाची प्रथम गुरू असते. त्यामुळे माता ही उत्तम संस्कारित असणे महत्त्वाचे आहे. मदालसा हे सर्वात उत्तम उदाहरण आहे. यासाठी तिला व्रत, वैकल्ये, उपासना दिल्या आहेत. कुळधर्म, कुळाचार, श्राद्ध-पक्ष, पूजाअर्चा दिल्या आहेत. घरातील सर्वांविषयी सेवाभाव दिला आहे. मनाची शुद्ध बैठक तयार होण्यासाठी व्रतवैकल्यांबरोबर सणवार व त्यांत विविध कहाण्यांच्या रूपाने खूप शिकवण दिली आहे. ही शिकवण मनावर योग्य

संस्कार करते. मनाला योग्य वळण लावते, आचारधर्म शिकवते, त्यामुळे कौटुंबिक व सामाजिक स्वास्थ्यासाठी कर्मे करून घेतली जातात. यासाठी काही उदाहरणे पाहिल्यास अवाजवी होणार नाही.

पहिल्या गणपतीच्या कहाणीतच १८ लाडू करून १२ इतरांना वाटावे व ६ लाडूंचे सहकुटुंब भोजन करावे असे म्हटले आहे. म्हणजे करणारीच्या वाट्याला फक्त एक लाडू येत असेल. यात समाजाविषयी व स्वत:च्या कुटुंबाविषयी आत्मीयता शिकवते. पुष्कळ वेळा आपल्यावर दु:खाचे प्रसंग येतात. अर्थात त्याला कोणीतरी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष कारण असतो, पण आपण नेहमी दुसऱ्याला दोष देऊन जीवनभर दु:खी होतो व इतरांनाही दु:खी करतो. स्वत:चे तसे इतरांचे जीवन, त्यांचे स्वास्थ्य बिघडवून टाकतो. तेव्हा ते प्रसंग कसे पचवावे व थोरांचा नेहमी आदर कसा करावा हे आदित्य राणूबाईची कहाणी शिकवते. कहाणीतील मुख्य तत्त्व म्हणजे 'दैव देते पण कर्म नेते' हे आजही आपल्या जीवनात घडत असते. हे तत्त्व लक्षात ठेवले की कोणाविषयीही द्वेष, मत्सर वाटणार नाही. आमचे एक मित्र आहेत. त्यांचे मेहुणे चतुर्थीचा उपवास करतात. उपवासाच्या पदार्थाने त्रास होतो म्हणून ते फक्त फळे खातात. ते देवापुढे बसून अथर्वशीर्ष म्हणतात. फळांचा आस्वाद घेतात. त्या वेळी त्यांची मुले त्यांच्या भोवतीच असतात. तेव्हा ते म्हणतात, 'बाळांनो! माझा उपवास आहे ना? म्हणून मी हे खातो. तुमचे जेवण झाले ना?' असे म्हणून मुलांना एकही फोड न देता सर्व फळे खाऊन टाकतात. याने उपवासाचे त्यांना काय फळ मिळणार? बाळगोपाळांच्या भावनांची काय कदर केली गेली? या साध्या गोष्टी लक्षात येत नाहीत. त्यासाठी त्यांनी जर सोमवारची खुलभर दुधाची कहाणी वाचली असती तर असे वागले गेले नसते. सोमवतीच्या कहाणीमध्ये तर झाडावरील पक्ष्याची पिलेसुद्धा झाडाखाली वाटसरू उपाशी झोपलेला पाहून चारा खाईनात. त्यांच्या आई-वडिलांनी (पक्ष्यांनी) त्या वाटसरूला फळे आणून दिली त्या वेळी त्या पिलांनी चारा खाल्ला. हा 'अतिथि देवो भव।' आचार. बुधबृहस्पतीच्या कहाणीचा मथितार्थ एकदम वेगळाच आहे. ही कहाणी शिकवते, 'खोटे कधी बोलू नये' कारण जसे विचार असतात तसेच आचार घडतात व आपल्या संकल्पाप्रमाणेच आपले भोग आपल्यासमोर उभे राहतात. म्हणून म्हण आहे की, 'शुभ बोल नाऱ्या'. शुक्रवारच्या कहाणीत पैशाला, वैभवाला महत्त्व देणाऱ्या भावाची वृत्ती दाखवली आहे. 'पैसा' ही अशी गोष्ट आहे की ती केव्हाही कमी-जास्त होऊ शकते. कायम तीच परिस्थिती राहिली असे कधीच होऊ शकत नाही, पण पैशाच्या धुंदीत आंधळे झालेले लोक हे साधे तत्त्वज्ञान कधीही

लक्षात ठेवत नाहीत, पण त्यांना कधीतरी आयुष्यात त्याचा फटका बसल्याशिवाय राहात नाही. काही वेळेला यातून शिकायला व सुधारायला पुढे आयुष्य असते पण काही वेळा तशी संधीही राहात नाही. इतक्या उशिरा ही गोष्ट लक्षात येते. संपत शनिवारच्या कहाणीत गोरगरिबांना मदत करावी. त्याने सर्वांचा अंतरात्मा संतुष्ट राहतो व आनंदीआनंद होतो. अशी अनेक तत्त्वे आहेत की रोजच्या जीवनाला उपयोगी पडणारी आहेत व जीवनात आनंद, समाधान देणारी आहेत.

काही लोकांना वाटते की आम्ही आजपर्यंत वाईट वागलो, आता शेवटी शेवटी चांगले वागून काय उपयोग होणार? आता आम्ही कसचे सुधारणार? पण तसा विचार करू नये. कारण गोपद्मांची कहाणी यावर उत्तर देते की केव्हाही, ज्या वेळी चूक लक्षात येईल त्या वेळेपासून सुधारणा करण्यास हरकत नाही. अगदी त्या क्षणापासून आपल्या आचरणात बदल करावा. म्हणजे त्याचे फळ निश्चित मिळेल. समजा आपण बाहेर गेलो आणि घरी येण्याला खूप उशीर झाला, रात्र झाली, आपले घर अंधारात बराच वेळ होते, पण आपण आल्याबरोबर दिव्याचे बटण दाबले की क्षणात घर उजळून निघेल. हे आपण नेहमी अनुभवतो, पण त्यातील हे तत्त्व लक्षात घेतले तर जीवनसुद्धा क्षणात उजळून निघेल.

कॉम्प्यूटरमध्ये 'व्हायरस' म्हणून एक कीड आहे. ती त्यातील सर्व माहिती खाऊन टाकते व केलेले सर्व कष्ट, वेळ वाया घालवते. त्याचप्रमाणे धर्मालाही कीड लावणारे व्हायरस आहेत. त्यांची नावे– काम, क्रोध, लोभ, मोह, मद व़ मत्सर अशी फक्त सहाच आहेत. त्यांचा प्रवेश कोठे होत नाही? तर अगदी सर्व ठिकाणी होतो. त्यांनी व्यापले नाही असे एकही क्षेत्र नाही. एवढेच काय पण या धर्माच्या मूळ तत्त्वांचे विपरीत अर्थ काढण्याची बुद्धिवादी लोकांना बुद्धी या व्हायरसनेच दिली. त्यामुळे सरळ, सज्जन, श्रद्धावान, निष्ठावान, आस्तिक लोकांचीही बुद्धी त्यांनी कुरतडून टाकायला सुरुवात केली आहे. त्यामुळे तेही त्यांचा मार्ग बदलू लागले आहेत. या व्हायरसची सर्व संतमहात्म्यांना कल्पना असल्याने त्यांनी यासाठी सूचना देऊन ठेवली आहेच. त्याप्रमाणे आचरण करणे म्हणजे या 'किडीचा' त्रास होणार नाही. आणि संत ज्ञानदेवांच्या वर उद्‌धृत केलेल्या ओव्यांतील काही ओव्या पुन्हा पाहूया. म्हणजे या ओव्या का दिल्या होत्या याची कल्पना येईल.

'आपुलेचि रत्न थिते। घेपे पारखियाचेनि हाते। तैसे स्वकर्म आपैते। शास्त्रे करावे ॥'

आपण विकत घेतलेले रत्न असते, पण रत्नातील आपल्याला काहीच कळत नाही म्हणून रत्नपारखी जो असतो त्याच्याकडून त्या रत्नाची पारख करून घ्यावी व योग्य किंमत काय आहे याची खात्री करून घ्यावी. तसे प्रत्येक व्यक्तीची बुद्धी ही वेगवेगळ्या संस्काराने घडलेली असते. म्हणून शास्त्राच्या आधाराने निर्णय घेणे योग्य होईल. असे सुचवले आहे आणि हीच सूचना संत ज्ञानदेव करीत आहेत.

*'तैसे स्वभावा भागा आले। वरी शास्त्रे खरे केले।*
*ते विहित जो आपुले। आचरे गा ॥'*

आणि हे शास्त्र म्हणजेच धर्म होय. म्हणून धर्माला महत्त्व आहे. असा हा धर्म आपल्या जीवनात आपल्या पूर्वजांनी अगदी सकाळी उठल्यापासून रात्री निजेपर्यंत अनेकविध उपासनांच्या योगाने बसवला आहे.

अशा प्रकारे आपला धर्म, नीतिमूल्ये आपल्या जीवनात वेगवेगळ्या स्वरूपाने कहाण्यांनी, व्रत-वैकल्यांनी, उपासनांनी, साधनांनी, आचरणांनी, विचारांनी, यम-नियमांनी, अष्टांगयोगाने, पूजा, अर्चा, कुळधर्म, कुलाचार यांनी, वाचन, चिंतन, मनन यांनी, ध्यान, धारणा, समाधीने आणि शेवटी नवविधा भक्तीने योजून ठेवला आहे. ही सर्व बटणे, तरफा (Levers) आहेत. यांचा योग्य वेळी उपयोग करणे हे आपले काम आहे. तेव्हा जीवनाच्या पडद्यावर (screen) योग्य चित्रे येत राहतील. तुम्ही जसे जसे पुढे जाल तसे तसे नव्या नव्या सूचना पुढे येतील. तुम्ही फक्त त्याप्रमाणे आचरण करणे एवढेच आपले काम आहे.

अशा रीतीने आपला धर्म हा युझर फ्रेंडली (Users Friendly) पद्धतीने आपल्या पूर्वजांनी आखून ठेवला आहे. त्याचे आचरण आपण करणे हेच आपले काम आहे. पुढची फलश्रुती आपोआप निसर्गतः प्राप्त होणारी आहे. व शेवटी मोक्ष व मुक्ती ठेवलीच आहे. याची महत्त्वाची गुरुकिल्ली संत ज्ञानेश्वरांनी आपल्या हाती दिली आहे. ते म्हणतात,

*'देवाचिये द्वारी। उभा क्षणभरी।*
*तेणे मुक्ती चारी। साधियेल्या ॥'*

## ‘गुळ नेणता तोंडी’

*‘गुळ नेणता तोंडी। घातला देचि गोडी॥’*

*(ज्ञानेश्वरी १८.१०५).*

वरील ओवी अनेक वेळा वाचली होती. तिचा अर्थ एकदम सोपा आहे. आणि तो म्हणजे ‘गूळ जरी न जाणता तोंडात घातला तरी तो गोडीच देणार.’ इतका सोपा अर्थ असता तर संत ज्ञानदेवांनी ही ओवी दिलीच नसती. तेव्हा त्यात काहीतरी वैशिष्ट्य आहे म्हणूनच या ओवीची रचना झाली असली पाहिजे. नंतर यावर चिंतन करीत असताना, त्यातील प्रत्येक शब्दाच्या धाटणीकडे लक्ष द्यावयास सुरुवात केली तेव्हा काही वेगळेच जाणवू लागले.

‘गुळ नेणता तोंडी। घातला देचि गोडी॥’ या दोन चरणांतील काही शब्दांचा खास विचार करावयास पाहिजे. ‘नेणता’ म्हणजे न जाणता, न समजता, कल्पना नसताना, वगैरे या अर्थांचा विचार करता असे म्हणता येईल की आपण काय खातो याची कल्पना नसताना कोणता तरी एक खडा तोंडात टाकला जातो आणि नंतर आपणास कळते की तो ‘गूळ’ आहे. म्हणजे दुसऱ्या चरणाप्रमाणे तो ‘गोडी देतो’. आता दुसऱ्या चरणाचा विचार करता, ‘घातला देचि गोडी।’ या ठिकाणी ‘देचि’ म्हणजे ‘चि’वर जोर दिला आहे. नुसते ‘घातला दे गोडी।’ असे म्हटले नाही. तर ‘देचि’ म्हणजे ‘गोडी देणारच’. म्हणजे ‘गोडीशिवाय अन्य काहीच देणार नाही’ असे त्या ओवीला सुचवावयाचे आहे. कारण ‘गुळाचा’ तो गुणधर्मच आहे. या ठिकाणी संत ज्ञानदेवांनी विशेष काही सांगितले आहे काय? गुळाला गोडी असते हे आपणा सर्वांना माहीत आहेच. मग या ओवीने संत ज्ञानदेवांना विशेषत्वाने काय सुचवायचे आहे, की जे आपल्या लक्षात येत नाही? यात जीवनाचे काही तत्त्वज्ञान सांगावयाचे आहे काय? यशस्वी, सुखी, आनंदी, समाधानी जीवनाचे काही गमक यात दडले आहे काय? तसेच काहीतरी असले पाहिजे.

या दोन चरणांची ‘गुळ नेणता तोंडी घातला’ व ‘देचि गोडी’ अशी फोड वा अन्वय केला असता पहिल्यात क्रिया सांगितली असून दुसऱ्यात त्याची प्रतिक्रिया प्रक्रिया सांगितली आहे. ‘गुळ नेणता तोंडी घातला’ हे आपल्या हातात आहे, पण ‘देचि गोडी’ हे आपल्या हातात नाही. म्हणजे जीवनातील क्रिया आपल्या हातात आहेत पण प्रक्रिया आपल्या हातात नाही. त्या सर्व स्वाभाविक, नैसर्गिक आहेत. त्या प्रक्रिया घडण्यासाठी आपण काहीच करू शकत नाही. वा त्या प्रक्रिया चालू असता

थांबवणे, बदलणे आपल्या हातात नाही. तसे पुष्कळ गोष्टी आपल्या हातून 'नेणता' होत असल्या तरी त्यांचे परिणाम होत राहतातच. अर्थात ते भोगणे, सहन करणे आलेच, पण इतर गोष्टी आपल्या जाणिवेने, अहंकाराने मुद्दाम करत असतो. त्यांच्या प्रक्रियाही आपल्याला भोगाव्याच लागतात. याचा अर्थ आपली प्रत्येक कृती ही जाणिवेने वा नेणिवेने होत असते व त्याची प्रतिक्रिया आपणासमोर उभी राहतेच.

जीवनातील आपले सगळ्यात मुख्य ध्येय काय असते तर ते म्हणजे 'सुखप्राप्ती' होय. आणि त्याच दृष्टीने आपली क्रियाकर्में चालू असतात, पण या क्रियाकर्मामध्ये आपण फक्त पहिल्याच चरणाचा विचार करतो. त्यापुढील चरणाचा विचार करीत नाही. कारण ती प्रक्रिया स्वाभाविक, नैसर्गिकच असते. आपण फक्त दुसऱ्या चरणाचा अंदाज करीत असतो. 'की असे घडेल, असे होईल' वगैरे, पण पुष्कळ वेळा घडते वेगळेच. याचा अर्थ आपण 'गूळ' तोंडात घातलेला नसतो, तर 'विष' तोंडात घातलेले असते. याच ओवीची नक्कल करून 'विष' विषयाकडे ही ओवी वळवली तर ती अशी होईल. 'विष नेणता तोंडी। घातले मारी तेचि घडी ॥' आणि हा अनुभव जीवनात अनेक वेळा येतो. एकूण आपण काय करतो? तर क्रियेची योजना करतो आणि प्रक्रिया स्वाभाविक, नैसर्गिक घडत असते.

एकूण आयुष्यात सर्वच घटनांबाबत बारकाईने विचार करता असे दिसते की आपण प्रक्रियेची सुरुवात करून देतो. कारण त्या प्रक्रियेची फळे आपणास भोगावयाची असतात. आपण झाड लावतो, पाणी घालतो. पाणी घालण्याशिवाय आपण काहीच करू शकत नाही. कारण ठराविक काळ संपल्याशिवाय त्या झाडाला, पाने, फुले, फळे येणारच नाहीत. त्यामुळे पाने, फुले व फळे येणे ही स्वाभाविक, नैसर्गिक घडणारी प्रक्रिया आहे. तसेच आलेले फळ मोठे होणे व परिपक्व होऊन खाण्याला योग्य होणे याहीबाबत आपण योग्य समयाची वाट पाहणे आवश्यक असते. मग आलेल्या फळांचा आस्वाद घेणे, तरी आपल्या हातात असते काय? आपण कोणती झाडे लावणे, वाढवणे, जोपासणे हे आपल्या हातात असते. नको असणारी झाडे, गवत, तृण, आपण काढून टाकणे हेही आपल्या हातात असते. एवढेच नव्हे तर या सर्व गोष्टी वेळेवर करणे, न कंटाळता, न थकता आणि सातत्याने दीर्घ काळ करणे हे महत्त्वाचे आहे. दीर्घ काळ म्हणजे त्याच्याकडून ज्या फळाची अपेक्षा आहे ती फळे मिळेपर्यंत ते करत राहणे हेही महत्त्वाचे आहे. म्हणून मुळात 'गूळ' कोणता हे शोधणे महत्त्वाचे आहे. आणि त्याची उपलब्धता सदासर्वकाळ असणे हेही महत्त्वाचे आहे आणि मग तो नेणता जरी तोंडी घातला तरी गोडीच देणार हे निश्चित.

आता 'गूळ' कोणता हे ठरवणे ज्याच्या त्याच्या हातात आहे. हे ठरवणे त्याच्यावर झालेल्या संस्कारावर आहे. आपल्याला येथे फक्त चांगल्याचाच विचार करावयाचा आहे. जे चांगले नाही ते वाईटच असणार. श्री भगवान श्रीकृष्णांनी गीतेतील तेराव्या अध्यायाच्या ७ ते ११ या पाच श्लोकांत सर्व ज्ञानाची लक्षणे दिली आहेत. ११व्या श्लोकाच्या शेवटच्या चरणात अज्ञानाचे लक्षण सांगितले आहे. ते कसे तर 'अज्ञानं यदतोऽन्यथा' म्हणजे याशिवाय, या व्यतिरिक्त, हे सोडून जे आहे त्याला अज्ञान म्हणतात. संत ज्ञानदेवांनी या 'अज्ञानं यदतोऽन्यथा' चरणाचे विवेचन करण्यासाठी २०८ ओव्या लिहिल्या, तर संत रामदासस्वामींनी मूर्खाची, पढतमूर्खाची, अज्ञानाची अनेक लक्षणे सांगितली आहेत आणि ही लक्षणे वाचली असता जगातील एकही मनुष्य त्यातून सुटणार नाही. म्हणजे याचा अर्थ असा की आपल्याला नेमका 'गूळ' कोणता हे समजले नाही.

'गुळ नेणता तोंडी। घातला देचि गोडी।।' यावरून एक गोष्ट लक्षात येते की प्रक्रियेची फक्त सुरुवात आपण करावयाची आहे. बाकी सर्व स्वाभाविक, नैसर्गिक प्रक्रियेने होणार आहे. दुधात दही घालून विरजण लावले की, पुढील प्रक्रिया आपोआप होते. कोंबडी अंडी उबवायला बसली की पुढील प्रक्रिया आपोआप होते. फळे पिकावयास अढीत घातली की पुढील प्रक्रिया आपोआप होते. 'बी' वा रोप लावून त्याला पाणी घातले की पुढील प्रक्रिया आपोआप होते. अशा आपल्या क्रियेच्या प्रत्येक गोष्टीची यादी देता येईल म्हणजे प्रक्रिया सुरू करून देणे आपल्या हातात आहे. पुढील प्रक्रिया आपोआप होत राहतात.

मानवी जीवनाचे उद्दिष्ट परमसुखप्राप्ती हे आहे, पण ते सुख विषयांत नसून परमेश्वरप्राप्तीत आहे. म्हणून परमेश्वरप्राप्ती हे उद्दिष्ट असावे. आता हेच उद्दिष्ट का असावे याचा विचार आतापर्यंत झाला व ते कसे साध्य करावे याही विषयावर पुष्कळ विचार करून झाला तरीही या ओवीच्या निमित्ताने एका वेगळ्या दृष्टिकोनाचा विचार करण्यात आला आहे. वरील ओवीच्या विवेचनावरून एक गोष्ट लक्षात येते की आपण योग्य प्रकारच्या प्रक्रियेला सुरुवात करणे महत्त्वाचे आहे. याची सुरुवात योग्य संस्काराने होणे महत्त्वाचे आहे. यासाठी सत्संग, सद्ग्रंथ वाचन, चिंतन, मनन करणे आवश्यक आहे. योग्य आहार, विहार, आचार महत्त्वाचा आहे. त्याने 'मन' तयार होते. 'मन' हेच सर्व विषयांचे प्रवेशद्वार आहे. मनच विषयांची निवड करणारे मुख्य साधन आहे. 'मन'च प्रक्रियेची सुरुवात करणारे रसायन आहे. मन ज्यात पडेल, जाईल, तेथूनच प्रक्रियेला सुरुवात होते. म्हणूनच भगवंतांनी दुसऱ्या अध्यायात

'ध्यायतो विषयान् पुंस: ।' असे सांगून शेवटी 'बुद्धिनाशात् प्रणश्यति ।' असे सांगितले आहे. एकूण विषयांच्या ध्यानाने, चिंतनाने प्राणाचा नाश होतो म्हणून हे विषय दु:खदायक आहेत, नाशास कारण आहेत असे भगवंतांनी सांगितले आहे आणि यातून वाचायचे असेल तर भगवंतच मार्ग सुचवतात, 'मत् प्रसादात् तरिष्यसि ।' माझ्या प्रसादानेच तरून जाशील. भगवंताचा प्रसाद प्राप्त करून घ्यावयाचा म्हणजे 'मच्चित्त: सर्व दुर्गाणि' माझ्या ठिकाणी चित्त गुंतवलेस म्हणजे माझ्या प्रसादाने तू सर्व संकटांतून तरून जाशील. परमेश्वराच्या ठिकाणी मन कसे गुंतवावे हेही भगवंतच सांगत आहेत,

*'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।*
*मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥'*

*(भ. गी. १८.६५).*

अर्थ – माझ्या ठिकाणी मन लाव. माझा भक्त व माझे यजन करणारा हो व मलाच नमस्कार कर. मग तू मलाच येऊन मिळशील हे मी तुला प्रतिज्ञेने सांगतो.

स्वामी विवेकानंदांच्या एका पुस्तकात वाचले होते की, 'मंत्रांना अर्थ नसतो, पण मंत्रांच्या योग्य उच्चाराने मनावर, शरीरावर परिणाम होत असतात. कारण मंत्रांच्या उच्चारातून उमटणारी स्पंदनेच महत्त्वाची असतात. तसे वाचन, चिंतन, मनन, नामजप, यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी, योग्य आहार, विहार, आचार, तसेच-

*'श्रवणं कीर्तनं विष्णोस्मरणं पादसेवनम् ।*
*अर्चनं वंदनं, दास्य, सेव्य, आत्मनिवेदनम् ॥'*

अशा या उपासनेने व शेवटी नवविधा भक्तीने परमेश्वराची सेवा भक्ती करावी. यांतील 'वाचन, चिंतनापासून ते आत्मनिवेदनम्' या सर्व आपणाकडून घडणाऱ्या क्रिया आहेत. याच्यामुळे होणाऱ्या प्रक्रिया अर्थातच आपोआप, स्वाभाविक, नैसर्गिकच होतात. या क्रिया निष्ठेने, सातत्याने, श्रद्धेने करावयास पाहिजे म्हणजे योग्य संस्काराने मन तयार होते. या क्रिया एका जन्मात संपणाऱ्या नाहीत. त्या पुढील जन्मीही कराव्या लागतात. मागील जन्माच्या संस्काराने पुढील जन्मी योग्य वेळेला मागील जन्माच्या उपासनेची आठवण येते व तो तोच योग पुन्हा चालू होतो. असे जन्मोजन्मी घडत राहते. या त्याच्या प्रवासाचा क्रम कसा असतो तर तो 'संसारी'चा साधक बनतो, साधकाचा जिज्ञासू बनतो, जिज्ञासूचा ज्ञानी बनतो, ज्ञानीचा भक्त बनतो. त्याला परमेश्वराचा अपरोक्ष साक्षात्कार होतो. भक्ताचा जीवन्मुक्त, विदेही बनतो व

जीवन्मुक्ताचा खुद्द परमेश्वर बनतो, परमेश्वरस्वरूपात विलीन होऊन जातो की जेथून परत येणे नाही. दुधात दही घालावयाचे असते म्हणजे अगदी सुंदर, घट्ट दही तयार होते. त्याला विरजण लावणे म्हणतात, पण दुधात जर मिठाचा खडा टाकला तर दूधच नासून जाते. म्हणून प्रक्रियेसाठी योग्य सुरुवात करावी म्हणजे पुढील प्रक्रिया आपोआप, स्वाभाविक, नैसर्गिक होतात आणि हेच संत ज्ञानदेवांना 'गुळ नेणता तोंडी। घातला देचि गोडी ।।' या ओवीने सुचवायचे आहे असे दिसते.



# विभाग २ – परब्रह्म

## निर्गुण निराकार परब्रह्म

परब्रह्म हे निर्गुण निराकार आहे आणि असे असूनही त्यापासून सगुण साकार विश्व निर्माण झाले आहे. सूक्ष्म, अतिसूक्ष्म असे परब्रह्म असूनही, सर्वव्यापक अशा परब्रह्मापासून ही स्थूल, विकारी, साकार व सगुण अशी सृष्टी कशी निर्माण झाली, हा प्रश्न खूप वेळा मनात येतो. दूध, साय, दही, ताक, लोणी, तूप या दुधाच्या रूपांतराच्या अवस्था पाहिल्यानंतर एका अवस्थेपासून दुसऱ्या अवस्थेत गेल्यावर नवीनच गुणधर्म उत्पन्न होतात असे दिसते. त्या दुसऱ्या अवस्थेत पहिल्या अवस्थेचा काही अंश असतो. यात काही शंकाच नाही. आपण असे म्हणू शकतो की दुधातच तुपाचा अंश होता. तूपच सूक्ष्मरूपाने दुधात पसरलेले होते. ते फक्त एका विशिष्ट प्रक्रियेने वेगळे काढत काढत शेवटी शुद्ध स्वरूपात वेगळे निघाले आहे, एवढेच. आपण ही बाह्य, ज्ञात असलेली प्रक्रिया जाणतो, पण नेमके काय घडते याचा अंदाज आपणास लागत नाही. आजपर्यंत या पद्धतीने दुधापासून तूप निघते एवढेच आपण जाणत असतो. कदाचित कोणी याची रासायनिक क्रियासुद्धा सांगेल. पण गाई, म्हशी वा मातेच्या ठिकाणी स्तनात जे रक्त असते त्यापासून बाळाचा, वासराचा स्पर्श होताच त्या रक्ताचे एकदम दूध कसे तयार होते? स्तन कापले असता त्यातून रक्ताचा प्रवाह बाहेर येईल का दुधाचा? तर रक्तच येणार. दूध येणार नाही, पण या अपत्यांच्या स्पर्शाने अशी कोणती प्रक्रिया होते की जेणे करून रक्ताचे एकदम दूध तयार होते. ही प्रक्रिया विज्ञानाला समजण्याच्या पलीकडील आहे.

ज्याप्रमाणे दुधापासून तूप होण्याच्या प्रक्रियेसाठी पाच पायऱ्या आहेत तसेच परब्रह्मापासून या स्थूल सृष्टीच्या रूपात येण्यासही काही पायऱ्या आहेत. त्या अशा- परब्रह्म - शबल-ब्रह्म - पुरुष - प्रकृती - त्रिगुण (सत्त्व-रज-तम) पंचमहाभूते - (आकाश - वायू - तेज - आप - पृथ्वी) या प्रक्रियेच्या पायऱ्या अनेक धर्मग्रंथांतून दिल्या आहेत. त्याचीच पुन्हा एकदा उजळणी केली आहे. परब्रह्म ते पृथ्वी हा प्रवास शब्दांत जरी कळला असला तरी नेमके काय व कसे घडते? एकदम सूक्ष्म परब्रह्मापासून एकदम स्थूल अशी सृष्टी, पृथ्वी कशी काय निर्माण झाली? ज्याप्रमाणे दुधापासून तूप होत असताना प्रत्येक अवस्थेमध्ये दुधाचे आधीचे गुण जाऊन नवीनच गुणधर्म येत जातात. ते इतके बदलतात की पहिली वस्तू हीच दुसरी वस्तू बनली कशी, अशी शंका येत राहावी. असो. विश्वनिर्मितीची प्रक्रिया पहिल्या भागात आली आहेच.

आता परब्रह्मात व या रूपांतरित वस्तूत कोणते साम्य आहे व कोणता फरक आहे याचे प्रामुख्याने दोन भाग पाडता येतील ते म्हणजे स्थूल व सूक्ष्म. प्रत्येक स्थूल वस्तूला नाम व रूप असते व प्रत्येक स्थूल रूपाला अस्ति भाति प्रियत्व असते. यात नाम-रूप हे बदलणारे आहे. त्यामुळे त्याला प्रकृती म्हणतात, जड म्हणतात. पण अस्ति भाति प्रियत्व हे सूक्ष्मरूपाने असते व ते कधीही बदलत नाही. तेच परब्रह्मरूप असते. एक उदाहरण असे घेता येईल की, एक काचेचा पेला आहे. काचेच्या पेल्याला एक विशिष्ट रूप आहे व त्याचे नाव पेला आहे. त्याचे अस्तित्व असते. ते आपल्याला भासते व तो पेला आपल्याला प्रिय असतो. समजा तो पेला हातातून निसटला, पडला व फुटला, तर नाम व रूप गेले. 'पेला' म्हणून ती वस्तू उरली नाही व पेल्याचा आकारही गेला. खाली केवळ काचेचे तुकडे उरले. पण अस्ति भाति प्रियत्व आहेच. काचेच्या तुकड्याच्या रूपाने त्याचे अस्तित्व असते. ते तुकडे आपल्याला भासतात तसे त्याच्या त्यागाविषयी आपले प्रियत्व असते. काच कोणाला लागू नये म्हणून आपण तत्परतेने त्या काचा गोळा करून कचऱ्यात टाकतो. म्हणून प्रियत्व हे त्याग वा स्वीकारण्याविषयीचे असते. अस्ति, भाति, प्रियत्व रूपाने पुरुष व नाम-रूपाने प्रकृतीचे अस्तित्व असते.

परब्रह्माला दुसरे नाव सत्-चित्-आनंद असेही आहे. (त्याचा थोडासा विचार ईश्वरसिद्धीमध्ये झाला आहे.) सत् म्हणजे सत्यत्वाने सदासर्वकाळ राहणे. ज्याचे अस्तित्व कधीही, कोणत्याही प्रकारे लोप पावत नाही, त्याला आदी, मध्य, अंत नाही. त्याला भूत, भविष्य, वर्तमान नाही. ते सर्वाठायी, समभावाने परिपूर्ण भरून आहे. ते

सदासर्वकाळ समरूपाने असते. ज्याला विकार नाही ते सत् होय. आणखी खूप प्रकारे सत्चे स्वरूप स्पष्ट करता येईल. पण पुढे संतांच्या वचनांतून त्याचे स्वरूप जास्त जास्त स्पष्ट होत जाईलच. आता अमृतानुभवामध्ये संत ज्ञानेश्वर महाराजांनी काय म्हटले आहे ते पाहू.

परब्रह्माची स्वयंसिद्धता कशी याचा खुलासा- 'प्रमेय परिच्छेदे। प्रमाणत्व नांदे। ती काई स्वत:सिद्धे। वस्तूच्या ठाई ।।' (५.१७ अमृतानुभव). परब्रह्म कोणालाही विषय होणार नाही. कारण ते घटादी प्रमेयवत् (विषयवत्) जड नाही. तर ते ज्ञानमात्र, स्वयंप्रकाश, नित्य अपरोक्ष असल्यामुळे तेथे प्रमाण आहे का? ज्या प्रभावाने परिच्छिन्न (एकदेशी) व जड अशा घटादी प्रमेयांचे (विषयांचे) प्रकाशन होते, त्या प्रभावाचा नित्य परिपूर्ण ज्ञानमात्र, स्वयंप्रकाश अनादी, स्वत:सिद्ध ब्रह्मवस्तूच्या ठिकाणी काय उपयोग होणार? कोणतेही अज्ञात पदार्थ चार प्रमाणांपैकी एका प्रमाणाने ज्ञात होतात ती चार प्रमाणे म्हणजे प्रत्यक्ष प्रमाण, शब्द प्रमाण, उपमान प्रमाण, अनुमान प्रमाण ही आहेत. त्यांपैकी पहिल्या प्रत्यक्ष प्रमाणाला ब्रह्म विषय होत नाही. कारण ब्रह्म हे शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध या विषयांपैकी नाही. आणखी श्रोत्रादि पंचज्ञानेंद्रियांना तर वर सांगितलेले पाच विषय प्रत्यक्ष भासतात. दुसऱ्या शब्द प्रमाणाचाही येथे उपयोग नाही. कारण शब्द नेहमी अर्थाचे प्रकाशन करतो आणि ब्रह्म हे ज्या ठिकाणी अर्थाची निवृत्ती होते, असे परमार्थ आहे. म्हणून त्याचे प्रकाशन शब्दाने होत नाही. कोणी असे म्हणेल की ते परमार्थ आहे हे तरी तुम्ही शब्दानेच सांगितले की नाही? ज्या अर्थी शब्दाने सांगितले त्या अर्थी त्याचे प्रकाशन शब्द करू शकतो, तर त्याचे उत्तर असे आहे की यावत् पदार्थ कल्पित आहेत. अशा या कल्पित अर्थदृष्टीने ब्रह्मावर परमार्थ या संज्ञेचा आरोप आहे. वस्तुत: ब्रह्म ना अर्थ ना परमार्थ, तर ते कसे ते शब्दाने मुळीच सांगता येत नाही. 'यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह।' (तैत्तिरीयोपनिषद) 'तुका म्हणे तूं ऐसा एक साचा। ऐसी तंव वाचा झाली नाही ।।' (तु. म.) उपमान प्रमाणाचाही या ठिकाणी उपयोग नाही. कारण उपमा ही काही अंशाने उपमेयासादृश असते. म्हणून ती उपमेयाचे प्रकाशन करू शकते. तसे काही अंशाने का होईना, परंतु ब्रह्माच्या सदृश अंशत: दुसरी उपमाच नाही. उलट ज्या ज्या म्हणून उपमा द्यावयाच्या त्या त्या सर्व वस्तू असत्, जड, दु:खरूप व मायाकार्य जगतातल्या आहेत आणि ब्रह्म तर त्रिकालाबाध्य व ज्ञानमात्र असे आहे. म्हणूनच तुकाराम महाराजांनी एके ठिकाणी असे म्हटले आहे की 'देऊ कशाची उपमा। दुजी तुज पुरुषोत्तमा ।।' चौथ्या अनुमान प्रमाणाचाही ब्रह्मी काही उपयोग नाही. कारण अनुमानाला तरी कार्याच्या प्रत्यक्ष ज्ञानाची

जरुरी आहे. जसे एखाद्या घराच्या कौलांतून धूर निघत असेल तर बाहेरून पाहणाराच्या अनुमान प्रमाणास घरातील अग्नी विषय होतो. येथे अग्नी जरी प्रत्यक्ष नाही तरी घराच्या कौलांतून निघणारा धूर प्रत्यक्ष आहे. असे अनुमान प्रमाणाला ब्रह्म विषय होण्यासारखे ब्रह्मी प्रत्यक्ष असे काहीच कार्य नाही. अशा तऱ्हेने सर्व प्रमाणाचा जेथे निषेध आहे असे ते परब्रह्म आपल्या ठिकाणी आपण ज्ञानमात्रपणाने स्वयंसिद्ध आहे. म्हणून सच्चिदानंद हे शब्द वस्तुवाचक म्हणजे वस्तूला प्रकाशित करणारे नव्हते. विचाराने हा सारांश निघाला.

ज्या वृत्तीने जीव सर्व विषय जाणतो ती वृत्ती विचाराने आत्मस्वरूपास जाणण्याकरिता अंतर्मुख झाली की प्रत्यक्ष आत्माश्रित अज्ञानकृत आवरणाचा भंग करतो. व वृत्तीगत चिदाभास स्वयंप्रकाश आत्मस्वरूपात नाहीसा होतो. अशा तऱ्हेने ज्ञानवृत्ती आत्मस्वरूपाकार झाल्यामुळे जाणते. (ज्ञेय) जाणता व (ज्ञाता) जाणणारा या दोघांची निवृत्ती होते. कारण मध्ये असणाऱ्या ज्ञानवृत्तीने ज्ञेय व ज्ञाता यांची सिद्धी केली आहे. ज्ञानवृत्ती जेथे थांबते त्याला ज्ञेय म्हणावे व जेथून उदयाला पावून पुढे ज्ञेयाकडे जाऊ लागते अशा तिच्या उगमस्थानास ज्ञाता असे म्हणतात. अशा ज्ञात्यापासून ज्ञेयापर्यंतच्या दरम्यान जी वृत्ती लाटांप्रमाणे सारखी प्रवाहित असते तिलाच ज्ञान म्हणतात. ही ज्ञानवृत्ती आपण मध्ये राहून पुढे ज्ञेयाची व मागे ज्ञात्याची सिद्धी करते. अशा स्थितीला मधली ज्ञानवृत्ती म्हणजे ज्ञान जेव्हा आत्माकार होते तेव्हा साहजिकच ज्ञेयज्ञात्याची निवृत्ती होते.

वरील प्रक्रिया कशी होते? याचा दृष्टांत देताना संत ज्ञानदेव म्हणतात, मेघ जसा पाऊस पाडून ओसरतो. नदीच्या पाण्याचा प्रवाह जसा समुद्रात मिसळून नाहीसा होतो, प्राप्य वस्तूस दाखवल्यावर मागाचा मागपणा थांबतो, फूल फळाला विऊन सुकून जाते, रस होऊन फळ नाहीसे होते व तोही रस तृप्ती देऊन नाहीसा होतो, अग्नीहोत्राचा हात अग्नीत आहुती देऊन माघारा जातो, किंवा ऐकणाऱ्याच्या चित्तात सुखाला जागे करून गाणे शमून जाते, मुखाला मुख दाखवून आरसा जातो किंवा निजलेल्यास जागे करून जागे करणारा जातो; तसे सच्चिदानंद ही तिन्ही पदे द्रष्टा जो शुद्ध आत्मा (ब्रह्म) त्याचा द्रष्टुत्वभाव प्रकाशित करून मौन धारण करतात. म्हणजे शब्दातीत जो निर्विकल्प ब्रह्मभाव, त्या ठिकाणी ही तिन्ही पदे नाहीशी होऊन त्याच्या स्वरूपाचा अनुभव प्रकट करतात. उदाहरणार्थ- दोघी मुली एके ठिकाणी बसल्या होत्या. त्यांच्यापैकी एकीचा पती आपल्या चार-पाच मित्रांमध्ये पलीकडे जवळच बोलत बसला होता. पहिल्या मुलीचा पती या तरुणांत अमुक आहे असे दुसऱ्या मुलीस

माहीत नव्हते. म्हणून तिने पहिल्या मुलीला दुसऱ्या एकाकडे बोट दाखवून 'हा तुझा पती आहे काय?' असे विचारले त्यावर तिने 'नाही' असे स्पष्ट उत्तर दिले. याप्रमाणे तेथे बसलेल्या इतरांकडे बोट दाखवून 'हा तुझा पती आहे काय?' असे विचारल्यावर प्रत्येक खेपेला 'नाही' असे स्पष्ट उत्तर दिले. शेवटी तिने तिच्या पलीकडे बोट दाखवून विचारल्यावर 'नाही' अथवा 'आहे' असे कोणतेही उत्तर न देता लज्जित होऊन ती मुकाट्याने बसून राहिली, पण तिच्या त्या न बोलण्यानेच विचारणाऱ्या मुलीला खात्री झाली की हाच तिचा पती आहे. यावरून न बोलून आपल्या पतीचे ज्ञान जसे त्या मुलीने आपल्या मैत्रिणीस करून दिले, त्याप्रमाणे सच्चिदानंद हा शब्द नाहीसा होऊन त्याने शुद्ध, बुद्ध, असंग, साक्षी, आत्मस्वरूपाचा प्रत्यय करून दिला. 'जैसे न सांगणेवरी। बाला पतिस रूप करी। बोल निमालेपणे विवरी। अचर्चिते॥' (१५.४६८ ज्ञानेश्वरी).

ब्रह्म सच्चिदानंद आहे, ब्रह्म निर्गुण आहे. ब्रह्म निराकार आहे. असे जे जे बोलावे ते ते ब्रह्म नाही. जसे कोणी एक आपल्या उंचीचे प्रमाण काढण्यासाठी आपल्या सावलीची लांबी हात टाकून मोजावयास गेला, पण जो जो सावली मोजावयास हात टाकी तो तो ती सावली पुढे पुढे जाऊ लागली, अशा तऱ्हेने सावली मोजणारा जेव्हा हात टाकता टाकता दमला व देहस्मृतीवर आला तेव्हा मोजण्याची क्रिया लज्जित होऊन आखडली (संपली). म्हणजे सावलीची उंची मोजून आपल्या उंचीचे माप करणे हे निरर्थक आहे, असे त्याला समजले. कारण एक तर सावली मोजता येत नाही व दुसरे सावलीच्या उंचीचा व आपल्या उंचीचा काही मेळ नसून सावली खोटी आहे व आपण खरे आहोत. अर्थात खोट्या सावलीची उंची मोजण्याने खऱ्या उंचीचे माप कसे होईल? असे समजून सावली मोजण्याचा व्यवहार बंद ठेवतो. तसे जे ब्रह्म आहे ते शब्दाने व्यक्त करता येत नाही. कारण शब्दाच्या मापाने जे जे मोजले जाते ते ते मायिक (मिथ्या) होय व ज्या ठिकाणी शब्द नाहीसा होतो ते ब्रह्म सत्य आहे म्हणून जे सत्य आहे ते मायिक (खोट्या) शब्दाने कसे व्यक्त होईल?

अशा प्रकारे प्रत्यक्ष, उपमा, अनुमान व शब्द या प्रमाणाने ब्रह्मसिद्ध करण्याचा प्रयत्न केला गेला. पण सिद्धीस जात नाही हे सिद्ध झाले.

## सच्चिदानंदपदत्रय विवरण

'सत्ता प्रकाश सुख। या तिही तिहीउणे लेख। जैसे विषपणेचि विख। विखा नाही ॥' (५.१ अमृतानुभव) विष हे अमृत नाही, तर ते आपल्या ठिकाणी विषपणाने आहे कारण त्याचे कोणी सेवन केल्यास ते मारते, पण हा विषाचा मारकपणाचा स्वभाव दुसऱ्या प्राण्यांच्या ठिकाणी व्यक्त होतो. विषास विष मारू शकणार नाही. म्हणजे, विषाच्या मारक स्वभावाची व्यक्तता त्याच्या स्वरूपात नाही. म्हणून विषाच्या स्वरूपाच्या दृष्टीनेच विषपणाचा आम्ही निषेध करतो. ब्रह्माच्या ठिकाणी तिही तिही म्हणजे तीन व तीन मिळून सहा, प्रथम तीन सत्, चित्, व आनंद व दुसरे त्याच्या उलट तीन म्हणजे असत्, जड व दुःखरूप. पण असत्, जड व दुःखरूप या गुणांचा ब्रह्मी अत्यंत अभाव असल्याने सत्, चित्, व आनंद या कल्पना असत्, जड व दुःखरूप यांच्या सापेक्ष आहेत. प्रथम असत्च्या स्वरूपाची कल्पना मनामध्ये येते. नंतर ते असत् स्वरूप जेथे नाही ते सत् असे म्हणतात. त्याचप्रमाणे जडाची कल्पना येऊन मग जे जड नाही ते चित् असे म्हणतात. त्याचप्रमाणे आनंद पाहिल्याने दुःखस्वरूप लक्षात आणून मग दुःखस्वरूप जेथे नाही तो आनंद असे म्हणतात. अशा प्रकारे प्रथम असत्, जड, दुःखस्वरूपाच्या कल्पना घेऊन त्या कल्पनांवर सत्, चित्, आनंद या शब्दांनी त्याचे (ब्रह्माचे) वर्णन करतात. कारण शब्द हा नेहमी सापेक्ष असतो. प्रत्येक शब्द अभावावर (त्या शब्दाचा जो अर्थ, त्याच्या रहितपणावर) उठतो. म्हणून शब्द नेहमी तुलनादर्शक असतो. परब्रह्माचा सत्पणा दुसऱ्या कोणत्याही असत्पणाशी तुलना करून मग ठरवलेला नाही तर तो सत्पणा त्याचे स्वभावसिद्ध स्वरूपच आहे. त्याचप्रमाणे चित् व आनंद समजावे. विषपणाचा निषेध विष स्वरूपाच्या दृष्टीने आम्ही केला हे वर सांगितलेच आहे. त्याचप्रमाणे सच्चिदानंद या संज्ञेचा निषेध केवळ एकरस परब्रह्मतत्त्व दृष्टीने केला. याला दृष्टांत देताना पुढे म्हटले आहे- तेज, कठीणपणा, सोनेरी रंग, ही तिन्ही मिळून सोने. पातळपणा, पांढरेपणा व गोडी मिळून एक दूध. स्वच्छपणा, सुवास व मऊपणा हे तिन्ही मिळून एक कापूर.

वरीलप्रमाणे सच्चिदानंदस्वरूप हे एकरसच आहे. या विषयी वेगळ्या दृष्टांतावरून सांगताना संत ज्ञानदेव अमृतानुभवामध्ये म्हणतात,

'पाण्याचे थेंब पडत असताना ते थेंब मोजता येतात. परंतु ते थेंब जेथे पडतात तेथे पाण्याशिवाय काही आहे का? तेथे पाणीच आहे व थेंबरूपाने तरी पाणीच आहे. पाणी हे थेंबाच्या रूपात असताना मोजण्याच्या तडाख्यात सापडले. पण मोजण्याच्या

तडाख्यात सापडले म्हणून म्हणावयाचे मात्र, कारण थेंब हा स्वरूपाने पाणीच आहे व त्या थेंबाच्या आकृतीचा निरास केला की पाणीच.

*तैसे असताचिया व्यावृत्ती । सत म्हणू आले श्रुती ।*
*जडाचिया समाप्ती । चिद्रूप ऐसे ॥*
*दुःखाचेनि सर्वनाशे । उरले ते सुख ऐसे ।*
*निगदिले निश्वासे । प्रभुचेनि ॥'*

(५.१० व ११ अमृतानुभव).

पाण्यावर थेंबाची कल्पना केल्यामुळे ते मोजता येते, तसे ब्रह्माच्या ठिकाणी असणाऱ्या कल्पित असत्‌चा निरास (बाधा) झाल्यावर राहिलेले सत् असे श्रुतीस म्हणता आले. जडाच्या कल्पनेचा निरास झाल्यावर राहिलेले चित् असे श्रुतीस म्हणता आले. दुःख कल्पनेचा निरास झाल्यावर राहिलेला आनंद असे हरीच्या निःश्वासाने निगदिले. (हरीच्या निद्रेच्या घोरापासून झालेल्या वेदाने प्रतिपादन केले). असत्, जड, दुःखरूप जो प्रपंच त्याला श्रुती जागते म्हणून असत्, जड, दुःखरूप अशा प्रपंचाच्या निरासांनी राहिले ते सच्चिदानंद असे श्रुतीने तर्काने ठरवले. जसे प्रथम समुद्रावरील लाटा पाहावयाच्या मग त्या क्षणात उत्पन्न होतात व क्षणात नष्ट होतात असे दिसल्यावर या लाटा उत्पन्न होऊन लीन तरी कोठे होतात, असा विचार मनात आल्यावर लाटेला आधार जे पाणी, तद्रूपच त्या आहेत असे ज्ञान होते. लाटा निराळ्या दिसतात ही मिथ्या कल्पना आहे. असे कळून आल्यावर समुद्र हा गंभीर, अफाट व गहन आहे असे म्हणतात. त्याप्रमाणे ब्रह्माच्या ठिकाणी असत्, जड, दुःखरूप प्रपंच, वर सांगितलेल्या लाटेसमान कल्पित आहे. त्याचा निरास होणे म्हणजे तो जसा दिसत आहे तसा खरा नाही. तर सर्वत्र सच्चिदानंद एक ब्रह्म सत्य आहे. असे निश्चयाने समजणे यासच असत्, जड, दुःखरूप प्रपंचाचा निरास अथवा बाधा होणे असे समजावे. अशा तऱ्हेने असत्, जड, दुःखरूप प्रपंचाचा निरास करून श्रुतीने परब्रह्मास सच्चिदानंद ही संज्ञा दिली.

सच्चिदानंद रूप आत्मा व जगत् रूप हे एकच आहेत. हे सांगताना संत ज्ञानदेव अमृतानुभवामध्ये पुन्हा एका वेगळ्या प्रकारे खुलासा करतात. 'एक म्हणता भेदे । ते की नानात्वे नांदे । विरुद्धे आपणया विरुद्धे । होतील कायी ॥' (२.६० अमृतानुभव). सर्व श्रुतिशास्त्रांनी सच्चिदानंद आत्मस्वरूप द्वितीयरहित एक आहे, असा सिद्धांत केला आहे. म्हणून ते एक आहे असे म्हणावयास जावे. तो शिवापासून तृणापर्यंत

अनेकत्वाने असणाऱ्या जगद्रूपाने तेच नांदत आहे. म्हणजे त्याच्याच आधारावर जगत् भासत आहे. जशी मृत्तिका ही एक आहे असे म्हणावयास जो जावे तो अनेक घटरूपाने तीच बनली आहे असे दिसते. असो.

माती ही मृत्तिकारूपाने राहो अथवा अनेक घटरूपाने राहो, एकाहून अनेक ही जरी विरुद्ध आहेत तरी मातीचा एकपणा हा उभय स्थितीत कायमच आहे. त्याप्रमाणे परब्रह्म हे सच्चिदानंद, निर्गुण, निराकार, भेदशून्य स्थितीने असो. अनेक नामरूपात्मक जगत् स्थितीने असो. वरीलप्रमाणे एकाहून अनेक जरी विरुद्ध आहे तरी एक व अनेक अशा विरुद्ध स्थितीने आत्म्याचे एकत्वच कायम असते. म्हणजे सच्चिदानंदरूप निर्गुण, निराकार, भेदशून्य भावाने असणारा जो एकपणा, त्या एकपणाने तरी आत्माच आहे व शिवापासून तृणापर्यंत असणाऱ्या अनेक नामरूपात्मक जगताचे तात्त्विक स्वरूप तरी आत्माच आहे. यावरून एक-अनेक याविरुद्ध धर्माचे स्वरूप, एक आत्माच असल्यामुळे त्या विरुद्धपणाची बाधा विरुद्ध स्वरूपाला कशी होईल? जसे अग्नीच्या दाहक धर्माची बाधा दुसऱ्या पदार्थाला होईल म्हणजे अग्नीच्या योगाने दुसऱ्या पदार्थाचे दहन होईल, पण अग्नीच्या योगाने अग्नीचे दहन कधीही होणार नाही.

साखर ही गोड नसून गोडरूप आहे. गोड आणि गोडरूप या दोन्ही शब्दांमध्ये मोठा फरक आहे. 'गोड असणे' हा गुण झाला पण 'गोडरूप असणे' हा धर्म झाला. कारण साखरेचा प्रत्येक कण हा गोडच आहे. गोडपणा हा साखरेचा स्वभाव आहे. म्हणजे श्रीखंड गोड झाले, भाजी गोड झाली, चहा गोड झाला, लाडू गोड झाला असे म्हणावयाची पद्धत आहे. पण साखर गोड आहे असे म्हणावयाची पद्धत नाही. कारण साखर गोड नसून गोडरूप आहे. तसेच कापूर हा परिमळरूप आहे. नदी पाणीरूप आहे. लाट ही पाणीरूप आहे. कारण गोडपणा, परिमळ, पाणी ही त्यांची अंगे आहेत. ते त्या अंगाने आहेत म्हणून ते नामाभिधान त्यांना प्राप्त झाले आहे. ते त्यांचे अंग काढून घेतले तर ते त्या नावाने शिल्लकच राहणार नाही. तसेच त्याच्या विरुद्धच्या अंगानेही त्याचे अस्तित्व असणार नाही. साखर कधीच खारट, तिखट, आंबट, तुरट असणार नाही. नदी, लाट कधीच पाण्याशिवाय अन्य वस्तूपासून निर्माण होणार नाही. तसेच परब्रह्म हे सत्-चित्-आनंद असे आहे. म्हणजे ते सत्‌रूप, चित्‌रूप व आनंदरूप आहे. कारण ते त्याचे अंग आहे. धर्म आहे, असाच त्याचा अर्थ होतो.

जी व्यक्ती सर्वांगाने सुंदर असते, त्याचे प्रत्येक अवयव हे वर्णन करण्यासारखे असतात. याचे उत्तम उदाहरण म्हणजे व्यंकटेश स्तोत्र. व्यंकटेशाचे म्हणजेच श्रीविष्णूचे त्यात वर्णन आहे. पायाच्या नखापासून ते केसांपर्यंत प्रत्येक अवयवाचे वर्णन अतिशय सुरेख केले आहे. तसेच परब्रह्माचे स्वरूप आहे. ते जरी निर्गुण, निराकार असले तरी या विश्वरूपाने ते नटून उभे आहे. त्यामुळे त्याची अनंत विशेषणे आहेत, पण त्यांतील काही विशेषणांचा शेवटच्या भागात (चौथ्या) विचार करून परब्रह्माचे स्वरूप काही अंशाने तरी बुद्धीला कळण्यासारखे आहे का याचा विचार येथे केला आहे. वर वर्णन करताना परब्रह्म हे 'सहज स्थितीत' असणारे असे म्हटले आहे. परब्रह्म तर निर्गुण निराकार आहे. मग त्याची सहजस्थिती कशी कळणार? संत ज्ञानदेवांनी अमृतानुभवामध्ये परमेश्वराच्या सहज स्थितीचे वर्णन करून ठेवले आहे. ते असे–

द्रष्टा व दृश्याच्या ग्रासामधील स्थिती म्हणजे संधिप्रकाश. तेच चैतन्याचे खरे अंग आहे. ते अदृश्य व निधर्म आहे. भावार्थ असा की एक वृत्ती जाऊन दुसरी वृत्ती उत्पन्न होण्याच्या पूर्वी मध्य संधीत वृत्तिशून्य चित्प्रकाश प्रकट असतो. जसे माळेचा एक मणी ओढला व दुसरा ओढावयाचा आहे, म्हणजे उभय मण्यांच्या मध्य संधीत सर्व मण्यांना आधारभूत जी दोरी, ती प्रकट असते. तसे दृष्य व द्रष्टा या विशेष भावाच्या दरम्यान जो संधी आहे तेच ब्रह्मचैतन्याचे निर्विषेश ज्ञान. अज्ञान वृत्तिशून्य ज्ञानरूप आहे किंवा दुसरा दृष्टांत असा की उठलेली लाट नाहीशी झाली आहे व पुढे दुसरी लाट उठली नाही अशा वेळी जसे पाणी आपल्या मूळ स्वरूपात असते तसे सामान्यविशेष धर्मरहित चैतन्य असते किंवा निद्रा सरून गेली आहे व जागृती पुरती आलेली नाही, तेव्हा आपली सहज स्थिती असते. एका पदार्थाहून दृष्टी उठली व दुसऱ्या पदार्थावर बसली नाही अशा दृष्टीने पाहिले तर ब्रह्माची सहज स्थिती कळेल अथवा दिवस मावळला व रात्र पडली नाही अशा वेळी आकाश जसे सहज स्थितीत असते त्यावरून ब्रह्माची सहज स्थिती कळेल. घेतलेला श्वास नाहीसा झाला व टाकावयाच्या श्वासाचा उठाव झाला नाही अशा मधल्या स्थितीप्रमाणे जो अर्थ म्हणजे जे ब्रह्म ते सामान्यविशेष या धर्माला न शिवता ज्ञानमात्र आहे.

तसे आपल्या सभोवताली असणाऱ्या वस्तूमध्ये अशी सहज स्थिती दिसते का? तर पाणी हे परातीत ओतले आणि थोड्या वेळाने पाहिले तर ते पाणी स्थिर झालेले दिसेल. जर परातीला धक्का दिला तर पाण्यावर तरंग उठतील, पाणी हलेल, पण थोड्याच वेळाने पाणी पुन्हा स्थिर झालेले दिसेल. म्हणजे स्थिर राहणे ही पाण्याची सहज स्थिती आहे. अशा प्रकारे प्रत्येक वस्तूकडे पाहिले तर झाडाची पाने वाऱ्याने

हलतात. वारा थांबला की पाने स्थिर होतात. वारा नसेल तर कपडे स्थिर होतात. लंबक स्वाभाविकपणे हलत असला तर स्थिर होतो. वस्तू या स्वाभाविकपणे स्थिर राहतात. म्हणजे हलणे हा विकार झाला व स्थिर राहणे हा स्वभाव झाला, सहज स्थिती झाली. नदीचे पाणी वाहते. कारण पाणी उताराकडे वाहात असते. त्यामुळे नदी समुद्राला जाऊन मिळेपर्यंत वाहात राहते, पण समुद्राला प्रवाह नाही. कारण समुद्र हा समपातळीत असतो. याचा अर्थ असाच की परब्रह्म हे समपातळीतही आहे व स्थिर आहे आणि त्यामुळेच ते व्यापक आहे. ते नाही असे ठिकाण नाही. म्हणजे ते सर्वकाळी सर्व ठिकाणी भरून आहे. ते व्यापक असून व्याप्य नाही. ते जर व्याप्य असते तर त्याला व्यापणारी वस्तू त्याहून मोठी होते. तेव्हा तशी कोणतीही वस्तू परब्रह्माहून मोठी नाही. म्हणून ते व्याप्य नाही. ते स्थिर असूनही चैतन्यरूप आहे. चैतन्य म्हणजे गतिमानता, सजीवपणा. गतिमानता असूनही त्याला इकडेतिकडे जाणे नाही. कारण 'इकडे तिकडे' असे परब्रह्माविषयी काहीच नाही. ते चैतन्यरूप आहे. म्हणजे प्रकाशमानही आहे. पण तो प्रकाश अग्नीप्रमाणे दाहक नाही तर शीतल, शांत, सुखदायक आहे. कारण ते विकारी नाही तर ते विकार उत्पन्नही करत नाही. आनंदरूप ही एक अवस्था आहे. प्रत्येक प्राणिमात्र त्याच्या सहज स्थितीत आनंदरूपच असतो. आध्यात्मिक भाषेत समाधी ही परमोच्च आनंदरूप स्थिती असते. कारण त्या वेळी मनुष्य कोणत्याही विकारी अवस्थेत नसतो. समाधी ही स्वाभाविक सहज स्थिती आहे. याला साधर्म्य अवस्था म्हणजे 'झोप'. झोपेत प्राणी हा सहज स्वाभाविक असतो, पण त्या स्थितीत तो अज्ञानी असतो. त्याचे सर्व विकार लय पावलेले असतात, पण झोप संपली की प्राणी पुन्हा विकारवश होतो. म्हणून झोपेतून जर कोणी जागे केले की म्हटले जाते, 'अरे, कशाला मला उठवलेस? किती शांत झोप लागली होती! किती आनंदात होतो मी!' आपला हा आनंद काही काळ टिकणारा आहे. आपला आनंद हा विषयातून मिळालेला असतो. तसा ब्रह्मरूपाचा आनंद नाही. ब्रह्म हे आनंदी नसून आनंदरूप आहे. आपला आनंद हासुद्धा एक विकारच आहे. आपले सुख हासुद्धा विकारच आहे. विषयातून मिळालेल्या आनंदाचा वीट येतो. आनंदाचा वीट येतो हे वाचून आश्चर्य वाटेल, पण ते खरे आहे. समजा आपणास एका मोठ्या हुद्द्याच्या जागेवर बढती मिळाली, किंवा पुष्कळ वर्षांनी मुलगा झाला, किंवा फार मोठा आर्थिक लाभ झाला, पुष्कळ लोकांनी तुमचे खूप अभिनंदन केले, त्यांतील एकाने तुमचे दुसऱ्यांदा अभिनंदन केले, तुम्हाला आनंद होईल; तिसऱ्यांदा भेटल्यावर पुन्हा अभिनंदन केले, तुम्ही ते मान्य कराल; पण जेव्हा चौथ्यांदा, पाचव्यांदा, सहाव्यांदा तीच व्यक्ती तुमचे अभिनंदन करेल, तेव्हा तुम्ही म्हणाल, 'अहो, आता किती वेळा

अभिनंदन करणार? पुरे झाले.' आणि तरीही त्या व्यक्तीने तुमचे पुन्हा अभिनंदन करण्याचा सपाटाच लावला तर तुम्ही त्या व्यक्तीला टाळून पुढे निघून जाल किंवा तुमची सहनशक्ती संपून तुम्ही त्या व्यक्तीवर रागवाल. म्हणजे पहिल्या अभिनंदनाच्या वेळीचा आनंद कमी कमी होत शेवटी त्या अभिनंदनाचा राग, चीडच येत जाईल. कारण कोणताही वैषयिक आनंद हा खरा आनंद नसतो. आनंदाचा तो विकार असतो. ब्रह्मानंद हा खरा आनंद असतो. तो कधीही कमी-जास्त होणारा नसतो. कारण तो सापेक्षही नसतो. कोणताही वैषयिक आनंद ही आनंदाची ऊर्मी असते. तो तासा-दोन तासांनी, दिवसा दोन दिवसांनी कमी कमी होत नाहीसा होणारा आनंद असतो. तसा ब्रह्मानंद हा विकार नसून हीच खरी सहजावस्था आहे. म्हणून ते 'आनंदरूप' आहे. 'आनंदी' नाही.

परब्रह्म हे सर्वव्यापक आहे असे म्हटले म्हणजे या स्थूल व सूक्ष्म रूपातसुद्धा त्याचे अस्तित्व आहे. स्थूलामध्ये सजीव व निर्जीव असे दोन भाग पडतात. मागे उल्लेख केल्याप्रमाणे नाम व रूप याने प्रकृती व अस्ति, भाति, प्रियत्व रूपाने पुरुष असतो, पण सजीवामध्ये परमेश्वराचे अस्तित्व खास प्रकारे जाणवते ते म्हणजे आत्मरूपाने. म्हणून भगवंतांनीही या आत्मरूपाच्या व्यक्तीचा उल्लेख केला आहे.

*'अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थित: ।*

*(१०.२० भ. गी.).*

अर्थ – अर्जुना, आत्मरूपाने मी सर्व भूतांच्या ठिकाणी स्थित आहे.

ज्याप्रमाणे शुद्ध सोन्यात हिणकस मिसळत गेले की त्याचा कस उतरत जातो. तसे शुद्ध परब्रह्माच्या ठिकाणी 'एकोऽहं बहुस्याम्।' असा संकल्प उठताच त्याच्या निर्गुण निराकार स्वरूपापासून एक-एक पायरी उतरत येते. ते असे–

परब्रह्म – शबल ब्रह्म - पुरुष – प्रकृती – त्रिगुण (सत्त्व, रज, तम) – पंचमहाभूते (आकाश, वायू, तेज, आप, पृथ्वी) – चौऱ्यांशी लक्ष योनी. या पद्धतीने परब्रह्म हे स्थूलापर्यंत अवतरले. या सर्वांमध्ये दोन भाग प्रामुख्याने पडतात. एक सूक्ष्म व दुसरे स्थूल.

| | |
|---|---|
| शुद्ध ब्रह्म – शबल ब्रह्म | पुरुष – प्रकृती |
| सत् – असत् | शिव – शक्ती |
| चित् – जड | आत्मा – जीव |
| आनंद – दुःख | क्षेत्रज्ञ – क्षेत्र |
| अस्ति, भाति, प्रियत्व – नाम, रूप | अक्षर – क्षर |

सत्त्व - बुद्धी, रज - मन, तम - अहंकार

परब्रह्मापासून उत्पन्न झालेली मूलतत्त्वे दोनच मानतात- पुरुष व प्रकृती. कोणी पाच तत्त्वे मानतात. त्यांत प्रकृतीपासून उत्पन्न झालेली सत्त्व, रज व तम हीसुद्धा मूलतत्त्वात मानली जातात. कोणी दहा तत्त्वे मानतात. त्यांत त्रिगुणापासून उत्पन्न झालेली पंचमहाभूतेही समाविष्ट करतात, तर कोणी पंचवीस मूलतत्त्वे मानतात. पंचमहाभूतांपासून, पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये व पंचविषय हेही मूलतत्त्वांत मानतात. त्यापुढे मन, बुद्धी, अहंकार व चित्त असे अंतःकरण चतुष्टय हीसुद्धा मूलतत्त्वांमध्ये गणली जातात. भगवंत म्हणतात,

*भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च।*
*अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥*

*(७.४ भ. गी.).*

अर्थ – पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि त्याचप्रमाणे अहंकार अशी ही आठ प्रकारांनी भिन्न दिसणारी माझी प्रकृती होय.

अशा या अष्टधा प्रकृतीची जेव्हा साम्यावस्था येते, तेव्हा त्यात 'जीव' प्रवेश करतो. ज्याप्रमाणे पावसाळ्यात पाऊस पडून गेल्यावर जागोजागी खळग्यांत पाणी साचते व त्या साचलेल्या पाण्यात सूर्य प्रतिबिंबित होतो. मग त्या साचलेल्या पाण्यावर असलेली घाण, त्याला येणारा दुर्गंध, पाणी हलण्यामुळे होणारे कंपन ही प्रतिबिंबाचीच अवस्था आहे असे मानले जाते. वास्तविक पाहता प्रतिबिंब हे त्या सर्व विकारांपासून अलिप्त असते. ज्या वेळी पाणी आटून जाते तेव्हा ते प्रतिबिंब मूळ बिंबाशी एकरूप होते. म्हणजे मुक्त होते. तसे देहभावाने उत्पन्न होणारे सुखदुःख हे स्वतःचेच सुख, दुःख मानून जीव त्याचा उपभोग घेतो. पण जेव्हा तो स्वतःला या देहभावापासून स्वतंत्र समजून वागतो तेव्हा तोही मुक्त होतो व पुन्हा परब्रह्मस्वरूप होतो.

अभिनंदन करणार? पुरे झाले.' आणि तरीही त्या व्यक्तीने तुमचे पुन्हा अभिनंदन करण्याचा सपाटाच लावला तर तुम्ही त्या व्यक्तीला टाळून पुढे निघून जाल किंवा तुमची सहनशक्ती संपून तुम्ही त्या व्यक्तीवर रागवाल. म्हणजे पहिल्या अभिनंदनाच्या वेळीचा आनंद कमी कमी होत शेवटी त्या अभिनंदनाचा राग, चीडच येत जाईल. कारण कोणताही वैषयिक आनंद हा खरा आनंद नसतो. आनंदाचा तो विकार असतो. ब्रह्मानंद हा खरा आनंद असतो. तो कधीही कमी-जास्त होणारा नसतो. कारण तो सापेक्षही नसतो. कोणताही वैषयिक आनंद ही आनंदाची ऊर्मी असते. तो तासा-दोन तासांनी, दिवसा दोन दिवसांनी कमी कमी होत नाहीसा होणारा आनंद असतो. तसा ब्रह्मानंद हा विकार नसून हीच खरी सहजावस्था आहे. म्हणून ते 'आनंदरूप' आहे. 'आनंदी' नाही.

परब्रह्म हे सर्वव्यापक आहे असे म्हटले म्हणजे या स्थूल व सूक्ष्म रूपातसुद्धा त्याचे अस्तित्व आहे. स्थूलामध्ये सजीव व निर्जीव असे दोन भाग पडतात. मागे उल्लेख केल्याप्रमाणे नाम व रूप याने प्रकृती व अस्ति, भाति, प्रियत्व रूपाने पुरुष असतो, पण सजीवामध्ये परमेश्वराचे अस्तित्व खास प्रकारे जाणवते ते म्हणजे आत्मरूपाने. म्हणून भगवंतांनीही या आत्मरूपाच्या व्यक्तीचा उल्लेख केला आहे.

*'अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थित: ।*

*(१०.२० भ. गी.).*

अर्थ – अर्जुना, आत्मरूपाने मी सर्व भूतांच्या ठिकाणी स्थित आहे.

ज्याप्रमाणे शुद्ध सोन्यात हिणकस मिसळत गेले की त्याचा कस उतरत जातो. तसे शुद्ध परब्रह्माच्या ठिकाणी 'एकोऽहं बहुस्याम् ।' असा संकल्प उठताच त्याच्या निर्गुण निराकार स्वरूपापासून एक-एक पायरी उतरत येते. ते असे–

परब्रह्म - शबल ब्रह्म - पुरुष – प्रकृती – त्रिगुण (सत्त्व, रज, तम) - पंचमहाभूते (आकाश, वायू, तेज, आप, पृथ्वी) – चौऱ्यांशी लक्ष योनी. या पद्धतीने परब्रह्म हे स्थूलापर्यंत अवतरले. या सर्वांमध्ये दोन भाग प्रामुख्याने पडतात. एक सूक्ष्म व दुसरे स्थूल.

| | |
|---|---|
| शुद्ध ब्रह्म – शबल ब्रह्म | पुरुष – प्रकृती |
| सत् – असत् | शिव – शक्ती |
| चित् – जड | आत्मा – जीव |
| आनंद – दुःख | क्षेत्रज्ञ – क्षेत्र |
| अस्ति, भाति, प्रियत्व – नाम, रूप | अक्षर – क्षर |

सत्त्व - बुद्धी, रज - मन, तम - अहंकार

परब्रह्मापासून उत्पन्न झालेली मूलतत्त्वे दोनच मानतात- पुरुष व प्रकृती. कोणी पाच तत्त्वे मानतात. त्यांत प्रकृतीपासून उत्पन्न झालेली सत्त्व, रज व तम हीसुद्धा मूलतत्त्वात मानली जातात. कोणी दहा तत्त्वे मानतात. त्यांत त्रिगुणापासून उत्पन्न झालेली पंचमहाभूतेही समाविष्ट करतात, तर कोणी पंचवीस मूलतत्त्वे मानतात. पंचमहाभूतांपासून, पंचज्ञानेंद्रिये, पंचकर्मेंद्रिये व पंचविषय हेही मूलतत्त्वांत मानतात. त्यापुढे मन, बुद्धी, अहंकार व चित्त असे अंतःकरण चतुष्टय हीसुद्धा मूलतत्त्वांमध्ये गणली जातात. भगवंत म्हणतात,

*भूमिरापोऽनलो वायुः खं मनो बुद्धिरेव च।*
*अहंकार इतीयं मे भिन्ना प्रकृतिरष्टधा ॥*

*(७.४ भ. गी.).*

अर्थ – पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश, मन, बुद्धी आणि त्याचप्रमाणे अहंकार अशी ही आठ प्रकारांनी भिन्न दिसणारी माझी प्रकृती होय.

अशा या अष्टधा प्रकृतीची जेव्हा साम्यावस्था येते, तेव्हा त्यात 'जीव' प्रवेश करतो. ज्याप्रमाणे पावसाळ्यात पाऊस पडून गेल्यावर जागोजागी खळग्यांत पाणी साचते व त्या साचलेल्या पाण्यात सूर्य प्रतिबिंबित होतो. मग त्या साचलेल्या पाण्यावर असलेली घाण, त्याला येणारा दुर्गंध, पाणी हलण्यामुळे होणारे कंपन ही प्रतिबिंबाचीच अवस्था आहे असे मानले जाते. वास्तविक पाहता प्रतिबिंब हे त्या सर्व विकारांपासून अलिप्त असते. ज्या वेळी पाणी आटून जाते तेव्हा ते प्रतिबिंब मूळ बिंबाशी एकरूप होते. म्हणजे मुक्त होते. तसे देहभावाने उत्पन्न होणारे सुखदुःख हे स्वतःचेच सुख, दुःख मानून जीव त्याचा उपभोग घेतो. पण जेव्हा तो स्वतःला या देहभावापासून स्वतंत्र समजून वागतो तेव्हा तोही मुक्त होतो व पुन्हा परब्रह्मस्वरूप होतो.

जीव व ईश्वर यांतील फरक संत तुलसीदासांनी वर्णन केला आहे. ते म्हणतात,

दोहा –

*'माया ईस न आपु कहँ जान कहिय सो जीव।*
*बंध मोच्छप्रद सर्व पर माया प्रेरक सीव ॥'*

*(सोपान ३, १४ तुलसी रामायण).*

अर्थ – ज्याला आपण स्वत: मायेचे प्रभू आहे असे कळत नाही तो जीव म्हणावा. जो बंधमोक्ष यांचा दाता असून सर्वाहून पर आणि मायेचा चालक तो ईश्वर होय.

परमेश्वराचे स्वरूप कसे आहे याचे संत रामदासांनी केलेले वर्णन–

*गगनासारिखे परब्रह्म पोकळ। उदंड उंच अंतराळ।*
*निर्गुण, निर्मळ, निश्चळ। सदोदित ॥*

*त्यास परमात्मा म्हणती। आणि नामे नेणो किती।*
*परी ते जाणिजे आदिअंती। जैसे तैसे ॥*

*विस्तीर्ण पसरला पैस। भोवतां दाटला अवकाश।*
*भासचि नाही निराभास। जैसे तैसे ॥*

*चहुकडे पाताळ तळी। अंतचि नाही अंतराळी।*
*कल्पांत काळी सर्वकाळी। संचलेचि असे ॥*

*ऐसे काही येक अचंचळ। ते अचंचळी भासे चंचळ।*
*त्यास नामेहि पुष्कळ। त्रिविधा प्रकारे ॥*

*(दशक १०, समास १०, ओवी १ ते ५ दासबोध)*

या अवकाशात सगळीकडेच समभावाने काहीतरी भरून आहे. त्याला अनेक जण अनेक नावे देतात. वातावरणाच्या वर ईथर म्हणून द्रव्य आहे. कोणी म्हणतात ईथरच्या वर ईश्वर म्हणून द्रव्य आहे. त्याच्यावर काय आहे, असा प्रश्न निघाला की पोकळी आहे असे सांगतात. पोकळी असणे शास्त्राच्या दृष्टीने शक्यच नाही. कारण निर्वात पोकळी शास्त्राला मान्य नाही. मग काय आहे? काहीतरी असेल. त्याला कोणी नावे दिली असतील, कोणी नसतील पण सर्व धर्मग्रंथांनी व संत रामदासस्वामींनी त्याला 'परब्रह्म' हे नाव दिले आहे. 'त्यास परब्रह्म म्हणती ॥'. तेव्हा त्या पोकळीऐवजी

काहीतरी असणे आवश्यक आहे. त्याला काय म्हणावे हा ज्याचा त्याचा प्रश्न आहे. त्याला शास्त्रांनी 'परब्रह्म' म्हटले आहे. आणि त्याला परब्रह्म हे नाव देऊनच पुढील सर्व सृष्टीच्या उत्पत्तीपासूनची उपपत्ती लागते. गणितामध्येही ज्या वेळी मूळ उत्तर अज्ञात असते, तेव्हा त्याच्या जागी काहीतरी अक्षर मानणे आवश्यक असते. ते मानून जेव्हा गणित सोडवले जाते, तेव्हा त्या मानलेल्या अक्षराची किंमत कळते. त्याप्रमाणे अवकाशाच्या पोकळीत परमेश्वर, परब्रह्म हे द्रव्य आहे असे मानले तर विश्वाचे कोडे उलगडणे सोपे होईल. कारण वेद, वेदान्तानेही तेच मानलेले आहे.

संत एकनाथ महाराज यांच्या शब्दांत परब्रह्माचे वर्णन पाहू. कारण प्रत्येकाची वर्णन शैली, शब्दरचना वेगळी वेगळी असते. म्हणून वेगवेगळ्या शब्दांतून ते वाचले असता आपल्या समजण्यात निश्चितच भर पडत जाते. म्हणून भागवतातील ते शब्द येथे पुन्हा दिले आहेत.

*'ते काळीचे उर्वरित । केवळ जे गुणातीत ।*
*ते पूर्ण ब्रह्म सदोदित । जाण निश्चित उद्धवा ॥*

*जेथे काळ ना कर्म । जेथ गुण ना धर्म ।*
*जेथ माया पावे उपरम । ते परब्रह्म उद्धवा ॥*

*माझे स्थान वैकुंठ जाण । तेथील प्राप्ति 'सायुज्य' सगुण ।*
*'पूर्ण सायुज्यता' संपूर्ण । ब्रह्म परिपूर्ण सदोदित ॥'*

*(अध्याय २०, ओवी ४४० ते ४४२ ए. भा.).*

*'जेथ नाही भयभ्रांती । जेथ नाही दिवसराती । जेथ नाही जीवशिव स्थिती । ते ब्रह्म पावती मद्‌भक्त ॥ जेथ नाही रूपनाम । जेथ नाही काळकर्म । जेथ नाही मरणजन्म । ते परब्रह्म पावती ॥ जेथ नाही ध्येयध्यान । जेथ नाही ज्ञेयज्ञान । जेथ नाही मीतूपण । ते ब्रह्म परिपूर्ण पावती ॥ ज्यासी नाही मातापिता । जे नव्हे देवोदेवता । जे बहू ना एकुलता । ते ब्रह्म तत्त्वतां पावती ॥ जेथ नाही वर्णाश्रम । जेथ नाही क्रियाकर्म । जेथ नाही मायाब्रह्म । ते परब्रह्म पावती ॥ जे गुणागुणी अतीत । जे लक्ष्य लक्षणारहित । जे स्वानंदे सदोदित । ते ब्रह्म प्राप्त मद्‌भक्ता ॥*

*(अध्याय २०, ओवी ४४७ ते ४५२ ए. भा.)*

*'मंत्र मूर्ति आणि मंत्रार्थ । तेहि मीचि गा निश्चित । पूज्य पूजक पूजा समस्त ।*

मज व्यतिरिक्त आन नाही ॥ 'शिवो भूत्वा शिवं यजेत् ।' (श्रुति.) देवे देवचि पूजिजे । देव होऊनि देवा भजिजे । हे वेदीचे निजबीज माझे । हेचि आगमी बोलिजे मुख्यत्वे ॥ मी देवो मीचि भक्त । पूजोपचार मी समस्त । मीचि माते पूजित । हे इत्थंभूत 'उपासना' ॥ हे उपासनाकांडीचे निजसार । आगम शास्त्रीचे गुह्य भांडार । माझ्या निजभक्तांचे वस्तीचे घर । ते हे साचार उपासना ॥ 'ज्ञानकांड ते अलौकिक । वेद आपण आपला द्योतक । अवघा संसारचि काल्पनिक । तेच वेद नियामक कोणे अर्थे ॥ वोस घरास वस्तीस पहा हो । निर्जीव पाहुणा आला राहो । त्याचा कोण करील वोठवो । जैसा भावो वेदाज्ञे ॥ ''एकमेवा द्वितीयं ब्रह्म, नेह नानाऽस्ति किंचन ॥' (श्रुति.) मूळ संसारचि मायिक । तेच वेद तोहि तद्रूप देख । मृगजळी नाही उदक । परी वोलावाही देख असे ना ॥ जेथ मुळी मुख्य अद्वैतता । तेथ कैचा कैचा श्रोता । कैचे कर्म कैचा कर्ता । वेदवार्ता ते कैची ॥ नाही दृश्य-द्रष्टा-दर्शन । नाही ध्येय-ध्याता-ध्यान । नाही ज्ञेय-ज्ञाता-ज्ञान । वेदवचन तेथे कैचे ॥ जंव भेदाची सबल स्थिती । तंव वेदाची थोर ख्याती । भेदु आलिया अद्वैती । वेद विराला 'नेति' म्हणोनी ॥ जेथ उपजला स्वये अग्नी । त्या अरणी जाळून शमे वन्ही । तेवी ज्ञानकांड निरुपणी । वेदु निज निर्दळणी प्रवर्तला ॥ एक ब्रह्म जे अद्वैत । येणे श्रुतिवाक्ये मिथ्या द्वैत । हे बोलोनि वेद हारपे तेथ । ब्रह्म सदोदित संपूर्ण ॥ 'मी ब्रह्म' हे शुद्धी स्फुरे स्फूर्ति । तेथेचि ॐकाराची उत्पत्ति । तोहि ब्रह्मरूप निश्चिती । त्यास 'ब्रह्म' म्हणती एकाक्षर ॥ त्या ओंकारापासोनि गहन । श्रुतिशाखा स्वर वर्ण । झाले ते ब्रह्मरूप जाण । एवं वेद पूर्ण परब्रह्म ॥ जेवी सोन्याचे अलंकार । पाहता सोनेचि साचार । तेवी श्रुति शाखा वेद विस्तार । तो आघवा ॐकार मद्रूपे ॥

(अध्याय २१ ओवी ४९४ ते ५११ निवडक ए. भा.).

'ते घटचि होती जाती । परी आकाश सहजस्थिती । तेवी उत्पत्ति स्थिति अंती । अलिप्त श्रीपती चिदात्मा ॥ तो आदीचि अनादि आदि । तो बुद्धिचि अनादि बुद्धि । तो सिद्धीचि अनादि सिद्धी । जाण त्रिशुद्धी परमात्मा ॥ हा प्रकाशा प्रकाशक । आर्काचाही आदि अर्क । स्वये त्रिपुटीचा द्योतक । अलिप्त एक परमात्मा ॥ हा विवेकाचाही विवेक । हा सुखाचा सुखदायक । बुद्धीचा जो बोधक । प्रकाशा प्रकाशक परमात्मा ।

(अध्याय २२ ओवी ३३७ ते ३४० ए. भा.).

'ते बृहत् जे ब्रह्म । जेथ न रिगे रूपनाम । जे मनुबुद्धीसी अगम्य । जे दुर्गम इंद्रियां ॥ जे निर्गुण निराकार । जे सत्यस्वरूपसाचार । जे परेहून परात्पर । निर्विकार निजवस्तु ॥

(अध्याय २४ ओवी ८५, ८६ ए. भा.).

जो वस्तुत: नसताही नुसता प्रतीत मात्र होतो. तो हा सर्व कार्यसमूह रजोगुणापासून उत्पन्न झालेला आहे. ब्रह्म हे स्वयंसिद्ध आणि प्रकाशक आहे म्हणून जिवांची विषयग्रहण करणारी नेत्रहस्तादी इंद्रिये, तन्मात्रा, मन आणि त्याचे सर्व विकार किंवा कार्ये या चित्रविचित्र रूपांनी ब्रह्मच प्रकाशन आहे. (अध्याय २८ श्लोक २२ ए. भा.).

आत्मा, परब्रह्म हा स्वयंप्रकाश आहे. हा उत्पत्तिशून्य आहे. कोणत्याही प्रमाणाचा विषय होत नाही. देश, काल व वस्तू यांनी अपरिच्छेद्य आहे. याच्यामुळे सर्व विषयांचा अनुभव घेता येतो. वाणीचा विराम झाला असता ज्याचा प्रत्यय येतो. ('यतो वाचो'- श्रुति) ज्याच्या प्रेरणेने वाणी आणि प्राण यांचे व्यापार चालतात, असा तो एकच एक, अद्वितीय आहे. अभिन्न अशा आत्म्यामध्ये भेदस्वरूपाची कल्पना करणे हा सर्व मनाचा भ्रम आहे. कारण भेदरूप विकल्पालासुद्धा आत्म्याशिवाय दुसऱ्या कोणाचा आश्रय नाही. (रजतभ्रमाला शुक्तिवाचून आश्रय नाही तसे) (अध्याय २८, श्लोक ३५ व ३६ ए. भा.).

एकनाथी भागवतात संत एकनाथांनी केलेल्या वर्णनाने परब्रह्म काही वेगळ्या शब्दांतून जाणवले तर उपनिषदामध्ये केलेले वर्णनही वाचून काही वेगळ्या प्रकारे जाणवणे शक्य आहे.

*अन्यत्र धर्मात् अन्यत्राधर्मात् अन्यत्र अस्मात् कृताकृतात् ।*
*अन्यत्र भूताच्च भव्याच्च यत् तत् पश्यसि तद् वद ॥*

अर्थ – (नचिकेत यमाला म्हणतो) जे धर्माहून वेगळे, अधर्माहून वेगळे, जे केलेले आणि न केलेले या दोहोंहून वेगळे, जे भूत आणि भविष्याच्याही पलीकडचे तत्त्व तू पाहतोस, ते मला सांग.

*सर्वे वेदा यत् पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद् वदन्ति ।*
*यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत् ते पदं संग्रहेण ब्रवीमि ओम् इत्येतत् ॥*

अर्थ – सर्व वेद ज्या पदाचे आमनन (म्हणजे साकल्याने मनन) करतात, सर्व तपे ज्याच्या प्राप्तीसाठी होत असतात, ज्याची इच्छा करणारे ब्रह्मचर्य आचरतात, ते पद मी तुला थोडक्यात सांगतो. ते पद ॐ हे आहे. (कठोपनिषद)

*'ॐ इत्येतदक्षरं इदं सर्वम् । तस्योपव्याख्यानम् ।*
*भूतं भवद् भविष्यदिति सर्वमोंकार एव ।*
*यच्चान्यत् त्रिकालातीतं, तदपि ओंकार एव ॥*

अर्थ – ॐ हे अक्षरच हे सर्व (जगत्) आहे. त्याविषयी आणखी सांगणे हे आहे की भूत, भविष्य, वर्तमान हे सर्व ओंकारच आहे. जे दुसरे त्रिकालातीत तेही ओंकारच आहे.

*सर्वं हि एतद्ब्रह्म । अयमात्मा ब्रह्म । सोऽयमात्मा चतुष्पात् ॥*

अर्थ – हे सर्व ब्रह्म आहे. हा आत्मा ब्रह्म आहे. तोही आत्मा चतुष्पाद आहे. (मांडूक्योपनिषद).

*अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थित: ।*
*अहमादिश्च मध्यं च भूतानामंत एव च ॥*

*(१०.२० भ. गी).*

विश्वातील सर्व प्राणिमात्रांच्या आत-बाहेर जो आत्मा व्यापून आहे, तोच सर्व भूतांचा आदी, मध्य व अंतही आहे. ज्याप्रमाणे मेघांना खाली वर आत बाहेर सर्वत्र एक आकाशच आहे आणि ते मेघ आकाशातच उत्पन्न होतात, राहतातही आकाशातच व त्यांचा लय होतो त्या वेळी ते आकाशरूपच होऊन राहतात; त्याप्रमाणे विश्वाच्या उत्पत्ती, स्थितीला आणि प्रलयाला तेच आत्मतत्त्व आश्रय आहे. सर्व विश्वात अनुस्यूत जे एक आत्मतत्त्व व्यापून आहे, तेच परब्रह्म विटेवर उभे आहे.

*जयापासोनि सकळ । महीमंडळ झाले ॥१॥*
*तो एक पंढरीचा राणा । न ये अनुमाना श्रुतीसी ॥२॥*
*तुका म्हणे तो आकळ । आहे सकळ व्यापक ॥४॥*

*(तु. म.).*

संपूर्ण विश्वात ओतप्रोत एक विश्वंभरच व्यापून आहे आणि तोच विश्वाचे धारणपोषण करतो असा सारभूत सिद्धांत उपनिषदे सांगतात.

'एको वशी सर्वभूतान्तरात्मा । एकं रूपं बहुधा य: करोति ॥' (कठो. २-२, १२). तो अविनाशी ईश्वर या जगत्रयात प्रवेश करून जगाचे रूप धारण करतो. असे गीताशास्त्रही सांगते. 'यो लोकत्रयमाविश्य बिभर्त्यव्यय ईश्वर: ॥' (१५-१७. भ. गी.).

आत्मतत्त्व किंवा ब्रह्मतत्त्व एकच आहे. हेच तत्त्व सत्य आहे. इतर सर्व क्षणभंगुर, नाशवंत तथा मिथ्या आहे. हे परब्रह्म तत्त्व विश्वाच्या उत्पत्तीपूर्वी, विश्वाच्या स्थिती-काली आणि विश्वाच्या अंतीदेखील अखंड अनुस्यूत व्यापून आहे. जीव याच तत्त्वाचा

एक अविभाज्य घटक आहे. मायोपाधिक जिवाच्या द्वैत बुद्धीचा, कर्माचा, तथा पापपुण्याचा त्याला स्पर्शही होत नाही. हे नि:संग अलिप्त आहे. 'ब्रह्म न लिंपे त्या मेळे। कर्मा अकर्मा वेगळे ॥' त्याप्रमाणे सर्वव्यापी असणारे परब्रह्म तत्त्व हे एकच ज्ञाते आहे. इतर सर्व ज्ञेय आहे. ''विज्ञातारं अरेकेन विजानीयात्।'' या श्रुतिवचनाप्रमाणे या एकाच ज्ञात्याला अन्य कोण ज्ञेय जाणणार? म्हणूनच आत्मतत्त्व मनाला, बुद्धीला, आणि इंद्रियांनासुद्धा आकलन होत नाही. ते यांच्या अतीत असून यांना अगम्य आहे. हे 'स्वसंवेद्य' आहे. ब्रह्मस्वरूपाचे वर्णन करताना श्रुतींनी 'नेति नेति' असे संबोधले आहे. मन, बुद्धी, इंद्रिये यांना आकलन होणारे ब्रह्म नव्हे. हे अज्ञेय, तर्कातीत आहे. म्हणून श्रुतीने 'नेति नेति' म्हटले आहे. किंवा नाही म्हणावयालादेखील दुसरे कोणी नाही.

एक ब्रह्म सत्य आहे, इतर सर्व आभास. असे द्वैत पाहणाऱ्या जिवाचे स्वरूप काय? वेदांतात या शंकेचे सुंदर निरसन केले आहे. पंचमहाभूते साकार केल्यावर त्या साकार शरीरात प्रवेश करून ईश्वरच प्रकृतीच्या योगाने जिवाच्या रूपाने त्या देहाचा चालक झाला. जीव व शिव दोन्ही तोच झाला. ब्रह्मांडात प्रवेश करून त्याचा चालक झाला. त्याला पुरुष किंवा शिव म्हणतात. देहाचा चालक तो जीव होय. जिवाची योगमाया, तशीच जिवाची अविद्या ब्रह्माचे सगुण स्वरूप (मायोपाधिक चैतन्य) म्हणजे ईश्वर. ईश्वराचे निर्गुण स्वरूप म्हणजे ब्रह्म. याप्रमाणे जीव व ब्रह्म एकस्वरूपच आहे. तात्पर्य - 'जीवो ब्रह्मैक ना पर: ।'

*'माया तेचि ब्रह्म ब्रह्म तेचि माया। अंग आणि छाया तयापरी ॥१॥*
*तोडिता न तुटे सरितां निराळी। लोटांगण तळी हारपते ॥२॥*

*दुजे नाही तेथे बळ कोणासाठी। आणीक ते आटी विचाराची ॥३॥*
*तुका म्हणे उंच वाढे उंचपणे। ठेंगणी लवणे जैसी तैसी ॥४॥*

ब्रह्माचे ठिकाणी माया अध्यस्त असल्यामुळे मायेला ब्रह्मापेक्षा वेगळी सत्ता नाही म्हणून ती ब्रह्मरूप आहे. तसेच मायेला अधिष्ठान ब्रह्म आहे आणि अधिष्ठानच अध्यस्ताच्या रूपाने भासत असते. म्हणून ब्रह्मच माया आहे. किंवा जगाला उपादानकारक असलेली माया ब्रह्माशी अभिन्न आहे. आणि निमित्त कारण असलेले ब्रह्म मायेशी अभिन्न आहे. जसे रूप आणि त्याची छाया यांच्यात अभेद आहे. त्याप्रमाणे माया आणि ब्रह्म यांच्यात अभेद आहे. छाया शस्त्राने तुटत नाही. दूर सारण्याचा प्रयत्न केला तरी ती देहाहून वेगळी होत नाही. लोटांगण घातले असता

देहाखाली नाहीशी होते. त्याप्रमाणे माया ब्रह्मापेक्षा जर भिन्न नाही तर मग बळाचा वापर कोणासाठी करावयाचा? एका परब्रह्म वस्तूचीच पुरुष व प्रकृती ही दोन नावे आहेत. केवळ सत्तात्मक परब्रह्माला पुरुष आणि चैतन्यस्वरूप परब्रह्माला प्रकृती म्हटले आहे. स्फुरणामुळे चैतन्याला आकार येतो. लहर स्फुरली की पाण्याला आकार आलाच. हा आकार म्हणजेच नामरूप होय. नामरूपे वस्तुत: चैतन्याचीच आहेत. नामरूपातही चैतन्य भरले आहे. किंबहुना नामरूपासह चिदानंदच आहे. या चिदानंदाला स्त्रीचा आकार आला म्हणजे त्याला प्रकृती म्हणतात व पुरुष आकार आला म्हणजे पुरुष म्हणतात. (अर्धनारी नटेश्वर) चिदानंदाला पुरुष आकार येऊन सामर्थ्य संपन्न झाले तोच जगाचा पिता होय व पालनकर्ता आधार ही माता होय.

*'पिताऽहमस्य जगतो माता धाता पितामह: ।'*

*(९.१७ भ. गी.).*

याचा भावार्थ स्पष्ट करताना संत ज्ञानेश्वर म्हणतात–

*'पै जयाचेनि अंगसंगे । इये प्रकृतिस्तव अष्टांगे ।*
*जन्म पाविजत असे जगे । तो पिता मी गा ॥*

*अर्धनारी नटेश्वरी । जो पुरुष तोचि नारी ।*
*तेवि मी चराचरी । माताही होय ॥*

*आणि जाहले जग जेथ राहे । जेणे जीवित वाढत आहे ।*
*ते मी वाचूनि नोहे । आन निरुते ॥*

*इये प्रकृति पुरुष दोन्ही । उपजली जयाचिया अमनमनी ।*
*तो पितामह त्रिभुवनी । विश्वाचा मी ॥'*

*(९.२६१ ते २७२ ज्ञानेश्वरी).*

माया या कल्पनेस एक ब्रह्मरूपच आधार आहे. शक्ती, प्रकृती, अज्ञान, अविद्या, माया ही सर्व एक अर्थाची सूचक आहेत. पुरुषाहून भिन्न नसते म्हणून तिला शक्ती म्हणतात. तीच तम:प्रधान होत्साती भूतभौतिक प्रपंचास निर्माण करते म्हणून तिला प्रकृती म्हणतात. निर्विकल्प ब्रह्माच्या ठिकाणी तीच दुर्घट इच्छादी उत्पन्न करते म्हणून तिला अज्ञान म्हणतात आणि ब्रह्मविद्येने हिची निवृत्ती होते म्हणून अविद्या म्हणतात. 'ऐश्वर्येशी ईश्वरा। जियेचे अंग संसारा। आपण होऊनि उभारा। आपणचि जे॥' (१.२९ अमृतानुभव) व्यष्टिसमष्ट्यात्मक भौतिक सृष्टी यावत् संसाररूपाने माया

आपणच उभारली जाऊन आपणच नांदत आहे. 'पतिचेनि अरूपपणे। लाजोनि अंगाचे मिरविणे। केले जगायेवढे लेणे। नामरूपाचे ॥' (१.३० अमृतानुभव). पुरुष हा अरूप (रूपरहित) आहे. अशा या अरूप पतीच्या योगाने मूळ माया हीच कोणी स्त्री फार लज्जित झाली. कारण ही मोठी दैवी आणि गुणमयी आहे. 'दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ॥' (७.१४ भ. गी.). श्री भगवान म्हणतात, 'अर्जुना! ही अती दिव्य आणि त्रिगुणात्मक अशी माझी माया दुस्तर आहे. माझ्या सत्तेच्या साह्याने या मायेपासून हे नामरूपात्मक विश्व उत्पन्न झाले. 'आतां असो हे बहु बोली। ऐसे विश्व माया व्याली। तेथ साह्य झाली। माझी सत्ता ॥' (१४.११५ ज्ञानेश्वरी). 'जी ज्ञानाच्या योगाने भासत नाही व अज्ञानाच्या योगाने भासते, जी आहे म्हणता येत नाही व नाही असेही म्हणता येत नाही व जी ज्ञानापुढे टिकत नाही, तिला अनादी असे म्हणतात. ती माया ब्रह्माचे ठिकाणी आश्रय करून असते.' (१५.८० ते ८४ ज्ञानेश्वरी). 'हे आदिपुरुषाची माया। ब्रह्मेयाही न येचि आया।' ही माया महत्तत्त्वादिकांचे मूळ स्थान असल्याने हिला महद्ब्रह्म असे नामाभिधान आहे. (१४-६७, ७० ज्ञानेश्वरी) अशी ही माया आहे.

अशा प्रकारे सर्व प्रकाराने विचार करता ब्रह्मरूपच अनेक नामरूपाने नटले आहे. मायासुद्धा महत्ब्रह्मनामाभिधानाने विख्यात झाली आहे. हे जगत् दिसत असूनही ते नाही असेच म्हटले जाते. कारण ही सर्व माया आहे. 'माया' शब्दाचा अर्थ मुळी 'या मा सा माया' म्हणजे नाही तीच 'माया' होय. आणि याच विचाराच्या पुढे जाऊन 'अजातवादाचा' विचार प्रगट झाला.

*'न निरोधो न चोत्पत्तिर्न बद्धो नच साधकः ।*
*न मुमुक्षुर्न वै मुक्त इत्येषा परमार्थता ॥'*

*(गौ. का. मांडुक्य २/३).*

'ना प्रलय-ना उत्पत्ती, कोणी बद्ध नाही तर कोणी साधक, मुमुक्षु अथवा मुक्तही नाही. एकमात्र आत्माच परमार्थतः म्हणजे सत्य आहे.' गौडपादाचार्यांच्या संपूर्ण कारिकेतील ही कारिका म्हणजे अजातवादाचा प्राण आहे. ज्ञानेश्वरीत अजातवादाचे विवेचन करताना संत ज्ञानेश्वर म्हणतात परब्रह्म सर्व सृष्टीच्या रूपाने प्रगट झालेले आहे. त्या 'एकमेवाद्वितीयम्।' (छांदोग्य- ६/२/१). परब्रह्माशिवाय दुसरी वस्तूच नाही. 'हे आत बाहेर मिया कोंदले। जग निखिल माझेचि वोतिले ॥' (९-३०२ ज्ञानेश्वरी). लाटा सागराहून भिन्न नसतातच. पाणी लाटांच्या रूपाने प्रत्ययाला येते.

त्याप्रमाणे हे नामरूपात्मक विश्व भिन्न नाहीच. परमात्म्याचाच हा स्वरूप विस्तार आहे (९-६४,५६ ज्ञानेश्वरी).

*देश काळवस्तु भेद मावळला । आत्मा निर्वाळला विश्वाकार ।।*

*न झाला प्रपंच आहे परब्रह्म । अहं सोऽहं ब्रह्म आकळले ।।*

अभेद दृष्टीने सर्व वस्तू सारख्याच दिसत आहेत. याचे कारण एक अद्वितीय आत्माच विश्वाकार रूपाने प्रकाशित झाला आहे. हा दृष्ट श्रुत प्रपंच परमार्थतः झालाच नाही. अज्ञानामुळे जो सत्यत्वाने भासत होता. तो प्रपंच ज्ञान झाल्याबरोबर परब्रह्म झाला आहे. विश्वाकार, आत्मस्वरूपाच्या ठिकाणी प्रपंच संभवत नाही. हे एकमेव दृष्टांताने संत तुकाराम त्यांच्या अभंगातून सांगत आहेत.

*लटिका प्रपंच वांझेची संतति । तत्त्वज्ञा हे भ्रांती बांधू नेणे ।।१।।*

*भोगभोग्य भोक्ता नाढळेचि कांही । चैतन्यविग्रही पूर्ण काम ।।४।।*

*तुका ब्रह्मानंदी आहे तुकब्रह्म । प्रपंचाचे बंड न देखे डोळा ।।५।।*

*(४३४५ तु. म.).*

वांझेच्या संततीला अस्तित्वच नसते. तद्वतच एकमेव ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणी भासणारा विश्वपसारा (प्रपंच) हा लटका (मिथ्या) आहे. तत्त्वज्ञाला या भ्रमाची बाधा होत नाही. अद्वैतात भोग, भोक्ता, भोग्य या त्रिपुटीचा लय होऊन सर्व चैतन्यमय दिसू लागते. ब्रह्मानंदात ब्रह्मरूप झालेल्या तुकोबांना न झालेल्या प्रपंचाचे बंड दृष्टीला दिसतच नाही. बद्ध, मुक्त या दोन्ही अवस्था काल्पनिक आहेत. सूर्याला जसा अंधार माहीत नाही, तसा प्रकाशही माहीत नाही. त्याप्रमाणे बद्ध वा मुक्त अवस्था आत्मरूपाच्या ठिकाणी संभवत नाही. जिवाशिवाची एकरूपता पूर्णपणे लक्षात आल्यावर मुळात नसलेल्या बद्धावस्थेचा विलय होतो. काल्पनिक बद्धावस्था उमगली की मग तत्सापेक्ष मुक्तावस्थाही संपते. सर्वाधिष्ठान परमात्मा जो मुख्य देव, त्याची जी छाया तो शिव. आणि अंतःकरणात त्या शिवाचे जे प्रतिबिंब तो जीव.

*'ईश्वर तो देव छाया तो शिव । प्रती छाया जीव दोन्ही भेद ।।*

*एक तेचि सूत्र तिन्हीशी मिळूनी । जाणती ते ज्ञानी आत्मविद ।।'*

*(५२७ अभंग ज्ञानेश्वर).*

'जे आत्मसाक्षात्कारी पुरुष आहेत, ते या तिन्ही वस्तू ब्रह्मरूपच मानतात.' असे संत ज्ञानेश्वरांनी स्पष्ट केले आहे.

## ब्रह्मबीज हेच मूळबीज-मूलद्रव्य होय

'आपली वसुंधराच काय पण सारे विश्वच मूलत: मूलद्रव्यामुळे घडलेय.' (सकाळ २०.३.९९ सिबोर्ग्रियमच्या नावात काय आहे- डॉ. अनिल लचके) हे वाक्य इथे मुद्दाम नमूद करण्याचे कारण विज्ञान हे मूलद्रव्यापाशीच थांबते. वास्तविक पाहता त्याचे मूळ अजूनही मागे जाणे शक्य आहे हे विचार करता स्पष्ट दिसते. दोन अणू असलेला हेलियम आणि एक अणू असलला हायड्रोजन हेसुद्धा कोठून तरी निर्माण झालेलेच असतील. तर ते कोठून निर्माण झाले? मूलद्रव्य म्हणजे काय? मूलद्रव्य म्हणजे असे अणू आहेत की त्याचे विघटन सहसा होत नाही, करता येत नाही. सृष्टीतील प्रत्येक वस्तू या अणूंचे संयुग, मिश्रण आहे. या मूलद्रव्याशिवाय या विश्वातील एकही पदार्थ तयार होऊ शकत नाही. नैसर्गिक मूलद्रव्ये ९६ आहेत व काही कृत्रिम रीत्या तयार केलेली आहेत व त्यांची संख्या ११ आहे. अशी एकूण १०७ मूलद्रव्ये आहेत. ही मूलद्रव्ये म्हणजे बीजच म्हणता येईल का? की ज्यांच्या एका विशिष्ट पद्धतीने, क्रमाने, संयोग होण्याने, मिश्रण होण्याने, एखादी विशिष्ट वस्तू तयार होते. ह्या मूलद्रव्यांचा क्रम वा पद्धत बदलली तर दुसरी एखादी विशिष्ट वस्तू तयार होते व त्या पद्धतीने त्या बीजांचा उपयोग पुन्हा पुन्हा त्याच त्याच वस्तू, पदार्थ बनवण्यासाठी केला जातो. याला उदाहरण द्यावयाचे झाले तर सोने, चांदी, लोखंड वगैरे धातू हेसुद्धा अणूंचेच संयोग आहेत. अर्थात ही संयुगे पृथ्वीच्या गर्भातच स्वाभाविकपणे तयार होतात. पण गहू, भात, डाळी हीसुद्धा या अणूचीच संयुगे आहेत. हीसुद्धा नैसर्गिक पद्धतीने तयार झालेली आहेत व या बीजांचा उपयोग करून पुन्हा त्याच पद्धतीने उत्पादन करण्यासाठी होतो व त्यातून तशीच बीजे निर्माण होतात व तीही नैसर्गिक पद्धतीनेच. यात मानवी कर्तृत्वाचा काहीच भाग येत नाही. विशाल वटवृक्षाचे अस्तित्व एका सूक्ष्म बीजामध्ये सामावलेले असते. त्या बीजाला योग्य अशी परिस्थिती प्राप्त झाली की त्या बीजाचा विकास सुरू होतो. ते बीज अंकुरते. त्यातून पाने निघतात, त्याला असलेला छोटा दांडाच पुढे काही वर्षांनी खोडात रूपांतरित होतो. त्या खोडाला अनेक फांद्या निर्माण होतात व त्यांना पाने, फुले व फळे निर्माण होऊन पुन्हा त्यांना बीजधारणा होते. म्हणजे याचा अर्थ जे बीजात आहे तेच बाहेर प्रगट होते. जे सूक्ष्म रूपात आहेत तेच स्थूल रूपात प्रगट होते. जे सूक्ष्म असते त्याचाच विस्तार होतो. असाच अर्थ होतो.

मग ही बीजेही मूलद्रव्येच आहेत असे का म्हणू नये. कारण गहू, भात या बीजांमध्येही काहीच बदल करता येत नाही. म्हणजे विज्ञानाला कोणत्याही बीजामध्ये बदल घडवून आणणे शक्य नाही, असाच त्याचा अर्थ होतो. मग ज्याच्यात काहीच बदल घडवता येत नाहीत ती मूलद्रव्ये, मूलद्रव्यांचे संयोग, संमीलन का म्हणू नये? असा विचार करता चौऱ्याऐंशी लक्ष योनींची जी संख्या दिली आहे ती सर्व बीजेच आहेत, असेच म्हणावे लागेल व ती मूलद्रव्ये आहेत असेही म्हणता येईल. आज कोट्यवधी वर्षांचा विचार करता बीजामध्ये कोणताच फरक पडला नाही व पुढे पडेल असे वाटत नाही. वटवृक्षाच्या सूक्ष्म बीजामध्ये जर विशाल वटवृक्षाचे सूक्ष्म रूपाने आरेखन असते व तेच पुढे विस्तारते असे आपण मानतो. तर मग या हायड्रोजनपासून व पुढे-पुढे निर्माण झालेल्या १०७ मूलद्रव्यांचे सूक्ष्म अस्तित्व ज्यापासून निर्माण झाले ते ब्रह्मबीजात का नसावे? त्या ब्रह्ममूलद्रव्याचेच विघटन होऊन ही १०७ मूलद्रव्ये व त्यापासून या सर्व सृष्टीची, विश्वाची निर्मिती झाली असे का मानू नये? कारण कोणतीही गोष्ट ही अभावातून निर्माण होऊच शकत नाही. असे जर आहे तर या मूलद्रव्यासहित या सर्व सृष्टीचा सूक्ष्म आराखडा त्या ब्रह्मबीजात होता यात शंका घेण्याला काहीच कारण वाटत नाही.

आपल्या पंचांगात नमूद केल्याप्रमाणे ब्रह्मदेवाच्या १०० वर्षांच्या आयुष्यापैकी पन्नास वर्षे आयुष्य संपले असून एक्कावन्न वर्षांच्या पहिल्या दिवसाच्या पहिल्या चार युगांपैकी पहिली तीन युगे म्हणजे सत्ययुग, त्रेतायुग, द्वापारयुग संपली असून चौथे कलियुग चालू आहे व कलियुगाचीही एकूण ५१०० वर्षे संपली असून बावन्नाव्या शतकातील पहिल्या वर्षाचा पहिला दिवस सुरू झाला आहे. एकाच प्रकारची बीजे असली तरी प्रत्येक झाडाची रचना वेगवेगळी असते. आंब्याची झाडे असली तरी ती खोडाच्या, फांद्यांच्या आकारमानाने वेगवेगळी असतात. तसे असले तरी ते आंब्याचे झाड म्हणूनच ओळखले जाते. तसे ब्रह्मबीजापासून या विश्वाचा जो विस्तार झाला तो कदाचित् प्रत्येक खेपेला वेगवेगळा असेल कारण ब्रह्मदेवाच्या गेल्या पन्नास वर्षांत अनेक प्रलय झाले असतील. या सर्व विश्वाचा पसारा कित्येक वेळा पुन्हा ब्रह्मबीजात समाविष्ट झाला असेल. पण ज्या ज्या वेळी 'एकोऽहं बहुस्याम्।' हा संकल्प होताच पुन्हा त्या बीजातून पानाची डिरी निघत होती व विश्ववृक्षाची वाढ होत होती त्या वेळी प्रत्येक खेपेला असेच विश्व निर्माण झाले असेल. त्या वेळी ही जीवसृष्टी दुसऱ्याच कोणत्या तरी ग्रहावर निर्माण झाली असेल, पण तिलाही पृथ्वीच म्हणून संबोधण्यात आले असेल व त्यालाही विश्वच म्हणण्यात आले असेल. कारण वेदांमधून

विश्वनिर्मितीची व तिच्या प्रलयाची जी हकीकत दिली आहे ती एकच आहे. म्हणून या सृष्टीचा या रूपातील सर्व आराखडा या ब्रह्मबीजात समाविष्ट असणारच यात शंका नाही. ज्याप्रमाणे बीजाचा गुणधर्म त्याच्या त्याच्या पानां-फुलांतून, फळांतून असतो, त्याचप्रमाणे ब्रह्मबीजापासून निर्माण झालेल्या सृष्टीतसुद्धा ब्रह्मबीजाचा अंश असलाच पाहिजे म्हणून ब्रह्म सर्वत्र आहे, असे म्हटले जाते. ज्याप्रमाणे भाताच्या बीजापासून भात, गव्हाच्या बीजापासून गहू उत्पन्न होणे जसे अपरिहार्य आहे, तसेच ब्रह्मबीजापासून अशीच सृष्टी वारंवार निर्माण होणे अपरिहार्य आहे व त्याचप्रमाणे गती-प्रगतीही होणे अपरिहार्य आहे. कारण लहानपणी आपल्याला एक धडा होता. त्यात- मनूला सकाळी तोंड धुताना एक मासा त्याच्या भांड्यात येतो व मनूला प्रलयाची माहिती सांगतो आणि एक होडी बांधण्यास सांगतो व त्यात सर्व प्रकारची बीजे साठवून ठेवण्याची व्यवस्था करावयास सांगतो. पुढे प्रलयानंतर पुन्हा जेव्हा सृष्टीची उभारणी होऊ लागते त्या वेळी हीच बीजे वापरली गेली. यातील मूळ तत्त्वाचा विचार केला तर असे लक्षात येईल की प्रलय झाला तरी बीजांचा नाश होत नाही व त्याच मूळ बीजापासून पुन्हा सृष्टीची उभारणी होते. म्हणून वेदज्ञान हेही कधीही नष्ट होत नाही. कारण त्याचा प्रगटकर्ता हा परमेश्वरच असतो. जसे स्थूल सृष्टीचे मूळ बीज ब्रह्म आहे तसेच तत्त्वज्ञान, विचार, विज्ञान, ज्ञान यांचेही मूळ बीज परब्रह्मच आहे. ते ज्ञान कधीही नाश पावणारे नसते. तसेच ते सर्व काळी सर्व ठिकाणी असतेच असते असे म्हणता येईल.

## ब्रह्माचे तटस्थ लक्षण

श्रीबादरायणाचार्यांनी 'जन्माद्यस्य यतः।' (१.१.२-२) या सूत्रात ब्रह्माचे तटस्थ लक्षण वर्णन केले आहे. त्याला 'यतो वा इमानी भूतानि जायन्ते, येन जातानि जीवन्ति, यत्प्रयन्त्यभिसंविशन्ति, तद्विजिज्ञासस्यतद्ब्रह्मः।' (३१ तैत्तिरीय). असा श्रुतीचा आधार आहे. 'ब्रह्मणः जगज्जन्मस्थितिलयकारणत्वं लक्षणम्।' असे लक्षण अनेकांनी केले आहे. जगाची उत्पत्ती, स्थिती, लय याचे कारणत्व हे ब्रह्माचे 'तटस्थ लक्षण' झाले. म्हणजे ब्रह्म हे जगाच्या उत्पत्तीचे कारण आहे, स्थितीचे कारण आहे व लयाचेही कारण आहे. 'लयकारणत्व।' एवढेच जर ब्रह्माचे लक्षण केले तर ब्रह्म हे जगाचे उपादानकारण आहे असे सिद्ध होणार. कारण कार्याचा ज्याच्यामध्ये नाश होतो ते त्याचे उपादानकारण असते असा नियम आहे. उदा. सोन्याची बांगडी जर हातोडा मारून तोडली तर तिचा नाश होईल, पण सोने तसेच शिल्लक राहील. सोन्याच्या बांगडीचे सोने हे उपादानकारण आहे. परंतु अद्वैतमतामध्ये ब्रह्म हे नुसतेच

उपादानकारण नसून निमित्तकारणही आहे. त्यामुळे 'लयकारणत्व।' या केवळ लक्षणामुळे जगाचे निमित्तकारण ब्रह्माहून भिन्न आहे, असे म्हटल्यासारखे होणार आणि हे अद्वैत सिद्धांताच्या विरुद्ध असल्यामुळे ते लक्षण त्याज्य आहे. 'तज्जलानिति शान्त उपासित।' (छांदोग्य ३.१४.२) यात 'तस्माज्जायते।', 'तस्मिन् लीयते।' आणि 'तस्मिन् ब्रह्माणि अनिति-प्राणिति-चेष्टते।' ब्रह्मापासून हे सर्व जगत् उत्पन्न होते. ब्रह्मामध्येच लीन होते आणि ब्रह्मामध्येच श्वासोच्छ्वास प्राणधारणा करते. असे श्रुतीने केलेले लक्षण आणि 'जगज्जन्मस्थितीलय कारणत्व' हे ब्रह्माचे लक्षण तंतोतंत जुळत असल्यामुळे लक्षण प्रमाणांनी वर केलेले तटस्थ लक्षण सिद्ध होते. भाष्यकार 'जन्माद्यस्य यत:' या सूत्रावरील भाष्यात लिहितात, 'नामरूपांनी व्यक्त झालेले पुष्कळ कर्ते आणि पुष्कळ भोक्ते यांनी युक्त असलेल्या, त्याचप्रमाणे अमुक एक कर्माचे फळ अमक्याला, अमक्याच देशात, अमक्याच काळी, अमक्याच निमित्ताने मिळावे अशा विशिष्ट क्रिया व फळ यांचा आधार असलेल्या, मनानेही ज्याच्या रचनेचे चिंतन करता येत नाही अशा त्या अचिंत्य स्वरूप, जगाचे जन्म-स्थिती-लय ज्या सर्वज्ञ, सर्वशक्ती कारणापासून होतात ते ब्रह्म. वरुणाचा मुलगा भृगु आपल्या पित्याजवळ येऊन 'मला ब्रह्माचा उपदेश करा' असे म्हणाला असता वरुणाने 'ज्यापासून भुते उत्पन्न होतात, ज्याच्या योगाने ती जिवंत राहतात आणि विनाशसमयी ज्याच्यामध्ये लीन होतात, ते ब्रह्म.' असे उत्तर दिले. बादारायणचार्यांनी 'जगद्वचित्त्वात्' (वे. सु. १.४.५.१५) जो या पुरुषाचा कर्ता व ज्याचे हे सर्व जगत् कर्म आहे तो परमात्मा-ब्रह्म होय असे या सूत्रात सिद्ध केले.

## ब्रह्माचे स्वरूप लक्षण

सत्य, ज्ञान, आनंद हे तीनही ब्रह्माचे स्वरूप लक्षण होय. येथे सत्य, ज्ञान व आनंद हे तीन शब्द योजावयाचे कारण जर 'सत्यं ब्रह्म' असे ब्रह्माचे लक्षण केले तर नैय्यायिकांनी मानलेल्या सत्तारूप जातीमध्ये त्याची अतिव्याप्ती होईल आणि त्यामुळे ब्रह्म जड ठरू शकेल. जडाची व्यावृत्ती करण्यासाठी 'ज्ञान' या शब्दाची योजना केली आहे. समजा 'ज्ञानं ब्रह्म' असे ब्रह्माचे लक्षण केले तर नैय्यायिकांनी आत्म्याच्या ठिकाणी मानलेल्या ज्ञानगुणामध्ये अतिव्याप्ती होईल. कारण ते 'ज्ञानाधिकरणं आत्मा' असे मानतात. तेव्हा त्याची निवृत्ती करण्यासाठी 'आनंद' हे पद योजले आहे. आत्म्याच्या गुणरूप ज्ञानामध्ये 'आनंद' आहे असे कोणीही मानत नाही. बरे 'आनंद ब्रह्म' एवढेच ब्रह्माचे लक्षण स्वीकारले तर शब्द-स्पर्शादी विषयांपासून मिळणाऱ्या

सुखामध्ये अतिव्याप्ती जाते आणि ब्रह्म जड आहे असे ठरते. हा दोष जाण्यासाठी लक्षणांत 'ज्ञान' शब्द योजला आहे. विषयसुखात ज्ञानाचा लवलेशही नाही हे सर्वसंमत आहे. त्यामुळे प्रस्तुत लक्षणाची अतिव्याप्ती होणे शक्य नाही. म्हणून सत्य, ज्ञान व आनंद हे ब्रह्माचे पूर्ण लक्षण आहे, हे निर्विवाद सिद्ध होते. सत्य, ज्ञान, आनंद ही तीन विशेषणे विशेष्याला आपला अर्थ समर्पण करतात व विरुद्ध अर्थाचे निराकरण करतात.

## ब्रह्माचे विवर्त

विवर्त म्हणजे उपादान कारणाच्या सत्तेहून विषम, असम सत्तेने युक्त अशा कार्याची उत्पत्ती होणे. रज्जू किंवा शुक्ती-शिंप हे पदार्थ व्यावहारिक आहेत, पण त्यावर भासणारे सर्प किंवा रजत-चांदी इत्यादी पदार्थ हे प्रतिभासिक आहेत. रज्जू-सर्प, शुक्ती-रजत या दृष्टान्तात कार्य करणाऱ्या सत्तेत विषमपणा आहे. तसेच ब्रह्माची सत्ता पारमार्थिक आहे व जगाची सत्ता व्यावहारिक आहे. तेव्हा ब्रह्म व जगत् यांची सत्ता विषम असल्यामुळे जगत् हे ब्रह्माचे विवर्त होय.

## तर्कत: विवर्तवादाची सिद्धी

श्रुतीत प्रतिपादन केलेले ब्रह्म निर्गुण, निर्विशेष, सर्वविकल्पशून्य व अव्यय आहे व त्यापासून जगत् आणि जीव यांची उत्पत्ती कशी झाली हे सांगत असताना ब्रह्माचें अव्ययत्व जेणे करून बाधित होणार नाही. तो वाद जास्त योग्य होय. परिणामवाद स्वीकारल्यास (दुधाचे दही होताना दूध हे संपूर्णपणे विकार पावून दुधाचे दूधत्व हे स्वरूप नष्ट करते). ब्रह्म जगाप्रमाणे जड व सुखदु:खमोहात्मक होऊ लागेल व त्याचे सच्चिदानंदरूप नष्ट होईल. विवर्तवादाने मात्र (रज्जूला मुळीच स्पर्श न होता ते अव्यय राहून सर्पाची उत्पत्ती-भास होतो.) ब्रह्माचे अव्ययत्व कायम राहून जगताची उत्पत्ती, स्थिती, लय दाखवता येते. ब्रह्मापासून जिवाची उत्पत्ती अध्यास मानल्याने होऊ शकते व अकर्तृ, अभोक्तृ असलेले ब्रह्मच, आत्माच कर्ता-भोक्ता होऊन व्यवहार करू लागते. हे सर्व तादात्म्याध्यासाने होऊ शकते. तसेच जगतावर पदार्थावर ममत्व-बुद्धी ठेवून संसर्गाध्यासाने जगत् हे भोग्य म्हणून जिवाला उपयोगी पडते. ब्रह्म व जगत्, ब्रह्म व जीव, जीव व जगत् या सर्व ठिकाणी अध्यास स्वीकारून व्यवहार होऊ शकतो. हे चांगल्या प्रकारे दाखवता येते. कार्यकारणाचे अनन्यत्व स्वीकारूनही पुन: विवर्तवादालाच पुष्टी मिळते. अध्यासाला कारण अज्ञान व या अज्ञानाचा नाश ज्ञानाने होऊन (भ्रामक पदार्थाचा-सर्पाचा निरास विवर्तोपादानाच्या ज्ञानाने-रज्जूच्या ज्ञानाने

होतो.) आत्मयाथात्म्य प्राप्त होते व तीच जीवन्मुक्ती होय. मोक्ष हा दुसरीकडे कोठे जाऊन हस्तगत होण्यासारखा नाही.

## अध्यास म्हणजे काय?

एक अधिष्ठान ज्याच्यावर आरोप होतो तो पदार्थ व दुसरा आरोपित ज्याचा आरोप होतो तो पदार्थ. आरोपित पदार्थ मिथ्या असून अधिष्ठान सत्य असते, हा अद्वैत वेदान्ताचा ठाम सिद्धांत आहे. जोवर अधिष्ठानाचे ज्ञान झालेले नसते. तोवर आरोपित पदार्थ भासत असतो, पण एकदा अधिष्ठानाचे ज्ञान झाले म्हणजे आरोपित पदार्थ हा मिथ्या आहे असा निश्चय होतो. याला वेदान्तशास्त्रात नेहमी दिली जाणारी उदाहरणे म्हणजे रज्जू-सर्प, शूक्ती-रजत ही होत. या दोन्ही उदाहरणांमध्ये रज्जू-शूक्ती यांची या अधिष्ठानाची सत्ता मान्य केलेली आहे. अधिष्ठानाची बैठक मान्य करूनच 'अध्यास' या शब्दाची प्रवृत्ती झालेली आहे.

## अध्यासाचे स्वरूप लक्षण

आचार्यांनी अध्यासाचे असे लक्षण केले आहे- 'स्मृतिरूप: परम पूर्वदृष्टावभास: ।' पूर्वदृष्ट म्हणजे पूर्वी पाहिलेला. 'अवभास' म्हणजे अवसन्न अवमत- मान्य नसलेला, असंमत-तिरस्कृत-त्याज्य असा भास. पूर्वदृष्टाचा जो अवभास तो पूर्वदृष्टावभास. स्मृती म्हणजे स्मरण, स्मृतीमध्ये येणाऱ्या पदार्थाप्रमाणे ज्याचे रूप आहे तो स्मृतिरूप. 'परम' म्हणजे अधिष्ठानात खऱ्या वस्तूच्या ठिकाणीं रज्जू सर्प भासणे किंवा शूक्तीमध्ये रजत भासणे. या दोन उदाहरणांत रज्जू-शूक्ती ही सत्य असून सर्प-रजत मिथ्या-अनृत आहेत. खरे व खोटे यांची सांगड झाल्यामुळे सर्पाचा व रजताचा अध्यास होतो. झाडाचे खोड उभे असल्यास अर्धवट प्रकाशामध्ये 'हा कोणीतरी माणूस आहे' असा भ्रम होतो. खरा मनुष्य भास व्हावयाच्या वेळेस नसतो. केवळ पूर्वी पाहिलेल्या मनुष्याचे स्मरणात्मक ज्ञान होते व ते खोडच 'मनुष्य' म्हणून भासू लागते. म्हणून अध्यास हा स्मृतिरूप व पूर्वदृष्ट असावा लागतो. खोडाच्या जवळ गेल्यावर किंवा प्रकाश पडल्यावर 'हा मनुष्य नाही, हे झाडाचे खोड आहे' असे निश्चयात्मक ज्ञान होऊन पूर्वीचे ज्ञान बाधित होते. म्हणून तो अवभास, असत्भास, त्याज्यभास होय हे निश्चित होते.

### अध्यासाचे तटस्थ लक्षण

अध्यासाच्या तटस्थ लक्षणांत 'दोषादित्रयजन्यत्वं अध्यासस्य तटस्थलक्षणम्।' असे म्हटले आहे. दोष, संप्रयोग-संनिष्कर्ष आणि संस्कार यांची अध्यासाला फार जरुरी आहे. (अ) दोष तीन प्रकारचा असतो– १) प्रमाण दोष – उदा. काचकामलादी इंद्रियामध्ये असणारे दोष, २) प्रमेय दोष – उदा. विषय पदार्थ अतिशय दूर असणे. ३) प्रमातृ दोष – उदा. लोभ, भय, मोह इत्यादी जिवाच्या ठिकाणी असणारे दोष, (ब) संप्रयोग – संप्रयोगामध्ये अधिष्ठानाचे सामान्य ज्ञान असावे लागते. (क) पूर्वी पाहिलेल्या पदार्थाच्या ज्ञानाचा संस्कार हे अध्यासाचे तिसरे कारण होय. सादृश्य ज्ञानामुळे संस्कार उद्‌बुद्ध होतो व शूक्तीवर स्मृतीत विषय असलेले रजत भासू लागते. आचार्यांना मान्य असलेले अध्यासाचे स्वरूप लक्षण म्हणजे 'स्मृतिरूपः परम पूर्वदृष्टावभासः हे होय. आचार्य अनिर्वचनीय ख्याती मानतात.

अद्वैत मतात निर्गुण ब्रह्म हे जगताचे कारण नसून ते केवळ सर्वाधिष्ठान आहे. मायोपाधिक ब्रह्माला ईश्वर असे म्हणतात. सगुण ब्रह्म हे जगाचे स्वप्राधान्याने (चैतन्य स्वरूपाने) निमित्त कारण आणि मायाप्राधान्याने (उपाधिद्वारा) परिणामी उपादान कारण होते. केवळ ब्रह्म हे विवर्तोपादन कारण आहे म्हणजेच ते अधिष्ठान आहे. जिवांना त्यांच्या त्यांच्या कर्माप्रमाणे फलभोग देणारा ईश्वर आहे, हे वरील वर्णनातून स्पष्ट झाले आहे.

### ब्रह्मनिरूपण

भागवतामध्ये निमी राजाने चालवलेल्या यज्ञसत्रामध्ये ऋषभपुत्र नऊ नारायण अंतरिक्षांमधून अवतरले असता, निमीराजाने प्रश्न विचारल्यावरून नऊ नारायणांपैकी पिप्पलयान मुनींनी ब्रह्मस्वरूप, निरूपण केले ते असे– त्याचे विवरण संत एकनाथांनी ओवीबद्ध केले ते अतिरसाळ आहे. पिप्पलायन मुनी म्हणाले, 'हे राजा, जे जगाच्या उत्पत्ती, स्थिती, संहाराला कारण असते परंतु स्वतः ज्याला कोणीच कारण नाही, जे स्वप्न, जागृती व सुषुप्तीमध्ये, त्याचप्रमाणे बहिः म्हणजे प्रलय आणि मुक्त स्थितीमध्येही सतत असते. जिवांचे पांचभौतिक शरीर, ज्ञानकर्मेंद्रिये, पंचप्राण, अंतःकरण, व मन ज्याच्या सत्तेने चेतनायुक्त होऊन कार्यप्रवण होतात, तेच श्रेष्ठ असे परमात्मतत्त्व समज. या श्लोकावरील संत एकनाथांचे ओवीबद्ध निरूपण–

*'अगा ज्याचेनि उपजे उत्पत्ति। ज्याचेनि अंगे स्थितीसी स्थिती।*
*ज्याचेनि प्रळय प्रलय शक्ति। ऐसा जो त्रिजगती मुख्य हेतु॥*
*यापरी जो जगाचा हेतु। स्वये स्वसत्ता हेतुरहितु।*
*सच्चिदानंदे सदोदितु। जो जाण निश्चितु नारायणु॥*
*जेवी सायंप्रातर्मध्यान्ह। तिही काळी अलिप्त गगन।*
*तेवी उत्पत्तिस्थिती प्रलयी जाण। अलिप्त नारायण परमात्मा॥*
*जागृति स्वप्न आणि सुषुप्ति। तिन्ही व्यापूनि समाधीही परती।*
*ज्याची साक्षीत्वस्फुरे स्फुर्ति। तो जाण निश्चित नारायण॥*
*जागृतिचे जाणपण। स्वप्नाचे मिथ्याभान।*
*सुषुप्तीचा साक्षी पूर्ण। तो नारायण निश्चित॥*
*एवं परमात्मा परंज्योती। आत्मा हृदयस्थ त्रिजगती।*
*त्याते नारायण म्हणती। जाण निश्चित नृपनाथा॥*
*तरी परमात्मा ब्रह्मपूर्ण। तुझे हृदयी नांदे आपण।*
*ज्याचेनि मन, बुद्धी, प्राण। इंद्रिये जाण वर्तती॥*
*एवं चाळकु जो त्रिजगती। जो स्वानंदे नांदे हृदयस्थिती।*
*त्याते 'नारायण' म्हणती। तोचि निश्चित परमात्मा॥*
*जे मन बुद्धि अगोचर। ते वाचेसी अति दुसूतर।*
*वस्तु नव्हे शब्द गोचर। परात्पर परब्रह्म॥*
*जेवी थिल्लाराआंतौता। बिंबौनि वोला नव्हे सविता।*
*तेवी मनबुद्धि इंद्रिया परता। जाण तत्त्वता परमात्मा॥'*

*(अध्याय ३ ओवी ६३० ते ६५६ निवडक)*

परमेश्वर सगळीकडेच भरून राहिला आहे असे नेहमी म्हटले जाते. पण तो भासत, जाणवत कसा नाही? याचे स्पष्टीकरण देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'प्रकृतीचे भासणे हे सच्चिदानंदरूप जो पुरुष त्याचेच भासणे होय. प्रकृतीचे अस्तित्व हे पुरुषाचे अस्तित्व होय. तर कसे? जसे अलंकाररूपाने सोनेच भासते. अथवा अलंकाराच्या अस्तित्वाने सोन्याचेच अस्तित्व प्रत्ययाला येते. म्हणून प्रकृतीच्या रूपाने सच्चिदानंद पुरुषच भासतो. अशा प्रकारे दोघांची एकच सत्ता असल्याने त्याची पृथक् निवड करता येत नाही. गुळापासून गोडी, कापरापासून परिमळ, दीपापासून प्रकाश हे

वेगळे काढताच येणार नाही. तसे प्रकृती ही सच्चिदानंदरूपच आहे. तसेच वायू आणि त्याची गती, कस्तुरी आणि तिचा सुगंध, अग्नी आणि त्याची उष्णता त्याचप्रमाणे शिव-शक्ती, पुरुष-प्रकृती ही एक रूपच आहेत. असो–

प्रकृती ही सच्चिदानंदरूप असूनही ती स्थूल जगताच्या निर्मितीला कारण कशी झाली याचे विवेचन करताना संत ज्ञानेश्वर म्हणतात– 'परब्रह्म हे सर्व शून्याचा शेवट आहे. म्हणजे शून्यरूप असणाऱ्या आकाशाचाही जेथे अंत आहे त्या परब्रह्मस्वरूपी शून्याची कल्पना नाही. शून्य कल्पना ही 'काही आहे'च्या सापेक्ष असते. काही आहेच्या उलट काही नाही. त्या काही नाहीसच शून्य म्हणतात. आकाशाच्या शून्यरूपाची कल्पना होण्याला कारण हेच आहे की, वायूपासून पृथ्वीपर्यंत सर्व तत्त्वे इंद्रियांना भासणारी आहेत. तसे आकाश हे कोणत्याही इंद्रियांना विषय होणारे नाही. आकाशाचा निळा रंग हा केवळ आपली दृष्टी जेथपर्यंत जाते तेथील पोकळीचा भास आहे व वातावरणाचा परिणाम आहे. यावरून आकाश हा पदार्थ नाही असे सिद्ध होते. म्हणून त्याला शून्य म्हणतात. 'नभाचे शून्यत्व गिळून। गुणत्रयाते नुरवून। ते शून्य ते महाशून्य। श्रुतिवचन संमत॥' (१३.९२६ ज्ञानेश्वरी) अशा या महाशून्यास परब्रह्मास प्रकृतीने पुरुषनामधारी केले. म्हणजे स्त्रीलिंगी प्रकृती हीच कोणी एक स्त्री आहे. तिच्या दृष्टीने केवळ सत्तारूप भावावर पुरुष संज्ञेचा व्यवहार झाला असे जरी आहे तरी पुरुषाच्या अस्तित्वावर शक्ती विशेषत्वास आली. जसे पाण्याच्या आधारावर लाट विशेषत्वास येते आणि म्हणून पुरुषसत्तेच्या आधारावर विशेष प्रकृतीभावाची कल्पना उत्पन्न झाली व त्यापासूनच सर्व सृष्टी उत्पन्न झाली (अमृतानुभव).

## परब्रह्माचे वर्णन

परब्रह्म हे निर्गुण, निराकार, अनिर्वचनीय, निर्विशेष वगैरे असे खूप काही आहे. ते शब्दाच्याही पलीकडे आहे. केनोपनिषदही आपली असमर्थता प्रकट करते.

*न तत्र चक्षुर्गच्छति न वाक् गच्छति नो मनः ।*
*न विद्यो न विजानीमः यथौतद् अनुशिष्यात् ॥*

अर्थ – जेथे चक्षू जाऊ शकत नाही, वाणी आणि मनही जाऊ शकत नाही; आम्ही स्वतः जाणत नाही; आम्हांला कळत नाही की कसे हे शिकवावे.

असे असूनही संत ज्ञानेश्वर हे साक्षात्कारी अनुभव अमृताचे पान केलेले सांगत आहेत की 'तेणे कारणे मी बोलेन। बोली-अरूपाचे रूप दावीन। अतींद्रिय परि

भोगवीन। इंद्रियांकरवी॥' (६.३६ ज्ञानेश्वरी). 'श्रीगुरुकृपेने मी बोलतो आहे. माझ्या शब्दातून त्या निर्गुण निराकार परमेश्वराचे सगुण साकार रूप मी प्रत्यक्ष उभे करीन व जे अतींद्रिय म्हणून सांगितले जाते-डोळ्यांना दिसत नाही, कानांना ऐकू येत नाही, स्पर्शाला कळत नाही, असे ते रूप मी प्रत्यक्ष या इंद्रियांनी उपभोग्य अशा रूपात उभे करीन' असे म्हणून संत ज्ञानेश्वरांनी परब्रह्माचे स्वरूप ज्ञानेश्वरीमध्ये ठिकठिकाणी साकार केले आहे. ज्या अर्थी निर्गुण निराकार परमेश्वर या सृष्टीच्या रूपाने सगुण साकार झाला आहे, त्या अर्थी त्या परमेश्वराच्या ठिकाणी ही सर्व सृष्टी अतिसूक्ष्म रूपाने अस्तित्वात होतीच. असे सिद्ध होते. कारण 'अभावातून कोणताही भाव निर्माण होत नाही.' असे श्रुतिवचन आहे. गुळाच्या गोडीचे कितीही वर्णन केले तरी ते पुरे पडणार नाही, तर त्याला फक्त एक गुळाचा खडा जिभेवर ठेवून चव पाहण्याने सर्व काही कळण्यासारखे आहे. म्हणजे अनुभूती ही सर्वश्रेष्ठ होय. पण जोपर्यंत अनुभूती येत नाही तोपर्यंत शब्दाने वर्णन करणे आवश्यकच आहे. नव्हे प्रथम शब्दाने केलेले वर्णन वाचून, चिंतन, मनन करून जेव्हा ते मनावर पूर्ण ठसते, त्यानंतर जर अनुभूती आली तर अपरोक्ष साक्षात्काराचा आनंद जास्त असतो. उलट जर प्रथम अनुभूती आली तर आनंद होईल. पण आपणास कशाची अनुभूती आली याची कल्पना नसल्याने तो खरा आनंद मिळणार नाही. म्हणून विज्ञान प्रथम माहीत पाहिजे, मग ज्ञान झाले तरी चालेल. त्यासाठी प्रथम प्रत्यक्ष ब्रह्मानुभूती होण्याआधी ते परब्रह्म शब्दाशब्दातून कसे साकार झाले हे पाहणेही महत्त्वाचे आहे.

परमेश्वरी तत्त्वाचा शोध घेताना संतांनी ज्या खुणा सांगितल्या आहेत त्यांचा विचार करणे आवश्यक आहे. ज्ञानेश्वरीतील ओव्यांतून वर्णन करताना, परमेश्वराचे स्वरूप स्पष्ट करताना, संत ज्ञानेश्वर अनेक विशेषणांचा उपयोग करतात. तेव्हा ती अनेक विशेषणे कशासाठी याचा विचार करता त्या विशेषणांमध्ये अतिव्याप्ती हा दोष येऊ नये हा हेतू असतो. समजा आपण एखाद्या व्यक्तीचे वर्णन करताना फक्त तो गोरा आहे हे एकच विशेषण सांगितले तर गोरी माणसे खूप असतात. त्यामुळे तो माणूस नेमकेपणाने शोधणे अवघड जाते. म्हणून अतिव्याप्तीची सर्व उदाहरणे जर एकत्र आणली तर म्हणजे तो गोरा आहे, त्याची उंची सहा फूट आहे, तो शरीराने सडपातळ आहे, त्याचे केस कुरळे आहेत, तो नेहमी हसत बोलणारा आहे, त्याला बोलताना विशिष्ट हातवारे करण्याची सवय आहे, तो नेहमी पायात कोल्हापुरी चपलाच घालतो वगैरे. अशा अनेक विशेषणांनी वर्णन केले तर मात्र या सर्व विशेषणांचे एकत्रीकरणांची अतिव्याप्ती होणे म्हणजे अशा वर्णनाची एकाहून जास्त माणसे मिळणे अवघड आहे. म्हणून आपणास नेमकी व्यक्ती सापडू शकेल आणि त्यामुळेच परमेश्वराचे वर्णन

करताना या अतिव्याप्तीचा दोष टाळण्यासाठी खूपच विशेषणांचा आधार घेणे आवश्यक आहे. आता प्रत्येक विशेषणाचा विचार करताना ते अतिव्याप्तीमध्ये कोठे येते हेही सांगणे जागेच्या अभावी अवघड आहे. तेव्हा ते वाचकांवरच सोपवतो.

भगवद्गीतेच्या विवेचनामध्ये संत ज्ञानेश्वरांनी परब्रह्माचे केलेले वर्णन–

*जयाचे आकारावीण असणे । जया जन्म ना निमणे ।*

*जे आघवेचि आघवेपणे । देखत असे ।। जे गगनाहून जुने ।*

*जे परमाणुहूनि साने । जयाचेनि सन्निधाने । विश्व चळे ।।*

*जे सर्वाते तया विये । विश्व सर्व जेणे जिये । हेतु तया बिहे । अचिंत्य जे ।।*

*(८-८६ ते ८८ ज्ञानेश्वरी)*

भावार्थ – जे आकाराविना आहे, आकाराविना असणाऱ्या कितीतरी गोष्टी आहेत, तसे ते आहे. त्याला जन्म नाही, म्हणजे उत्पत्ति नाही म्हणून मरणही नाही. शिवाय जे सर्व काही आहे, सर्वपणाने आहे असे दिसते, म्हणजे जाणवते, कळते, त्या आकाशाची निर्मिती केव्हा झाली ती माहीत नाही. पण हे निश्चितच, की त्यानेच सर्व निर्माण केले आहे. तर वर आकाशही त्यानेच निर्माण केले. म्हणजे साहजिकच आकाशाहून ते जुने म्हणजे आधीचे आहे. शिवाय त्याला आकार नाही, ते सूक्ष्म आहे, सूक्ष्माहून सूक्ष्म आहे. तरीही ते एवढे लहान असूनही त्याच्या ठिकाणी विश्वामध्ये हालचाल निर्माण करण्याचे, विश्वाला हलवण्याचेही सामर्थ्य आहे. त्यातून विशेष गोष्ट म्हणजे तो विश्वाला हलवण्यासाठी काही विशेष जोर लावतो किंवा त्याला काही कष्ट पडतात असेही नाही तर केवळ त्याच्या अस्तित्वाने या विश्वामध्ये चलनवलन होते. ज्याच्यामुळे हे विश्व निर्माण झाले आणि या विश्वाला अस्तित्व आहे असा तो परमेश्वर आहे. परमेश्वराचे सर्वच कार्य निर्हेतुक असते. हेतू, उद्देश परमेश्वरापासून दोन हात लांबच असतात. असे ते परमेश्वराचे स्वरूप कोणाच्याही चिंतनात सहजासहजी साकार होणे अवघड आहे. देहभावाच्या जाणिवेत परमेश्वराचे स्वरूप साकार होणे शक्य नाही.

*'सकळां जाणणेया जे लाणी । तिये जाणिवेची जे खाणी ।*
*तया ज्ञानियांचिये आयणी । जयाते अक्षर म्हणिपे ।।*

*चंडवातेही न मोडे । ते गगनचि कीं फुडे ।*
*वाचुनि जरी होईल मेहुडे । तरी उरेल कैचे ।।*

*तेवि जाणणेया जे आकळिले । ते जाणिवलेपणेचि उमाणले ।।*
*मग नेणवेचि तया म्हणितले । अक्षर सहजे ।।*

*म्हणोनि वेदविद नर । म्हणती जयाते अक्षर ।*
*जे प्रकृतीसी पर । परमात्मरूप ।।*

*(८.१०० ते १०३ ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – आपण अनेक वस्तूंचे ज्ञान घेत असतो. तरी आपला ज्ञानसंपादनाचा हव्यास संपलेला नसतो. कारण वस्तूंची व्याप्तीच संपत नाही. या सृष्टीचा विस्तार पाहता व त्याच्या ज्ञानाच्या अनेक शाखा पाहता हे ज्ञान कधी काळी, जन्मी संपेल असे वाटतच नाही. पण संत ज्ञानदेव ज्ञानप्राप्तीचे शेवटचे गमक सांगतात. ते म्हणतात– 'सकळा जाणणेयां जे लाणी।' जे ज्ञानाचा शेवट आहे, जे जाणले असता आणखी काही जाणावयाचे शिल्लकच राहात नाही, जे जाणले असता सर्व काही आपोआप जाणले जाते, म्हणजे जे ज्ञानाची खाण आहे, निधान आहे, ते ज्ञान कसे? इतर ज्ञानाप्रमाणे कधी काळी जुने होऊन टाकाऊ होणारे नाही. पूर्वीच्या वैज्ञानिक संशोधनामध्ये व आताच्या विज्ञान संशोधनामध्ये जमीन-अस्मानाचा फरक पडला आहे. पूर्वीचे पुष्कळसे विज्ञान सध्याच्या प्रगत विज्ञानामध्ये निरुपयोगी, टाकाऊ झालेले आहे. तसे परमेश्वराविषयीचे ज्ञान हे कधीही जुने व टाकाऊ होण्यासारखे नाही. ते तसेच ताजे, म्हणजे विज्ञानाने कितीही प्रगती केली तरी ज्याला पूर्ण ज्ञान म्हणतात. ते प्राप्त करावयाचे असेल तर परमेश्वरी साक्षात्काराचे प्रशस्तिपत्र आवश्यकच आहे, असा त्याचा अर्थ होतो. म्हणून त्याला अक्षर असे वेदविद्वान मंडळी म्हणतात.

या सृष्टीमध्ये कशा स्वरूपात भरून राहिला आहे, याचे वर्णन.

*म्हणोनि उदकी रसु । का पवनी जो स्पर्शु । शशीसूर्यी जो प्रकाशु । तो मीचि जाण ।।*
*तैसाचि नैसर्गिकु । मी पृथ्वीच्या ठायी गंधु । गगनी मी शब्दु । वेदी प्रणवु ।।*
*नराच्या ठायी नरत्व । जे अहंभाविये सत्त्व । ते पौरुष मी हे तत्त्व । बोलिजत असे ।।*
*अग्नि ऐसे आहाच । तेजी नामाचे आहे कवच । ते परते केलिया साच । निजतेज ते मी ।।*
*आणि नानाविध योनी । जन्मोनि भूते त्रिभुवनी । वर्तत आहाति जीवनी । आपुल्याला ।।*
*एके पवनेचि पिती । एके तृणास्तव जिती । एके अन्नाधारे राहती । जळे एके ।।*
*ऐसे भूतप्रति अनान । जे प्रकृती वशे दिसे जीवन ।*
*ते आघवां ठायी अभिन्न । मीचि एक ।।*
*पै आदिचेनी अवसरे । विरुढे गगनाचेनि अंकुरे । जे अंती गिळी अक्षरे । प्रणवपीठीची ।।*

*जवं हा विश्वाकार असे । तंव जे विश्वाचिसारिखे दिसे ।*
*मग महाप्रलयदशे । कैसेंहि नव्हे ।।*
*ऐसे अनादि जे सहज । ते मी गा विश्वबीज । हे हातातळी तुज । देईजत असे ।।*
*जाण तपियांच्या ठायी तप । ते रूप माझे ।।*
*बळियांमाजी बळ । ते मी जाणे अढळ । बुद्धिमंती केवळ । बुद्धि ते मी ।।*
*भूतांच्या ठायी कामु । तो मी म्हणे आत्मारामु । जेणे अर्थास्तव धर्मु । थोरु होय ।।*
*एऱ्हवी विकाराचेनि पैसे । करी कीर इंद्रियांचि ऐसे । परी धर्मासि वेखासे । जावो नेदी ।।*
*ऐसा नियतु कां कंदर्पु । जो भूतां या बीजरूपु । तो मी म्हणे बापु । योगियांचा ।।*
*हे एकेक किती सांगावे । आतां वस्तुजातची आघवे ।*
*मजपासुनि जाणावे । विकारले असे ।।*
*जे सात्त्विक हन भाव । का रजतमादि सर्व । ते ममस्वरूप संभव । वोळखे तूं ।।*

*(७.३३ ते ५३ निवडक ज्ञानेश्वरी)*

परमेश्वराच्या आणखीन काही खुणा सांगताना संत ज्ञानदेव म्हणतात–

भावार्थ – परमेश्वर जसा चैतन्यरूपाने सर्व पदार्थांमध्ये असतो. तसाच गुणरूपानेही सर्व पदार्थांत असतो. कारण गुणही निराकारच असतात. वस्तू या जड आहेत. त्यांच्या ठिकाणी स्वत:चे गुण, रूप, प्रकट करण्याचे सामर्थ्य नाही. त्यांच्या ठिकाणी असलेले चैतन्यच ते प्रकट करते म्हणून पाण्यामध्ये 'रस' तत्त्व परमेश्वराचे स्वरूप आहे. पदार्थांना जी चव असते, फळांना जी चव असते, तो रस पाण्याच्या पुरवठ्यानेच रसाला येतो. पवनाच्या ठिकाणी स्पर्श हा गुण आहे. वारा पूर्ण थांबला, त्याचे वाहणे बंद झाले तर आपणास तो जाणवत नाही, पण विशेषत्वाने जेव्हा तो वाहतो, तेव्हा त्याची जाणीव आपणाला होते. ती जाणीव आपल्यालाही का होते? तर आपणामध्येही तेच चैतन्य असते. म्हणून पदार्थाचा स्पर्श आपणास कळतो. तो स्पर्श मृताला समजत नाही. कारण त्याच्या ठिकाणी ते चैतन्य राहिलेले नसते. त्याचप्रमाणे शशिसूर्याच्या ठिकाणी असलेला प्रकाश हे परमेश्वरी तत्त्व आहे. कारण सूर्य, चंद्र यांच्यासारखा प्रकाश कोणत्याही भौतिक वस्तूने निर्माण करणे शक्य नाही. ते सामर्थ्य, गुण फक्त परमेश्वराचेच आहे. त्याचप्रमाणे पृथ्वीच्या ठायी गंध, गगनाचा शब्द, वेदातील प्रणव, नराच्या ठिकाणचे पौरुष, ही परमेश्वरी तत्त्वे आहेत. अग्नीला 'अग्नी' हे नाव वरवरचे आहे. त्याच्यावर तेजाचे कवच आहे. ते बाजूला सारल्यावर जे तेज उरेल ते परमेश्वरी रूप आहे. या ठिकाणी भगवंतांना नेमके काय म्हणावयाचे आहे? अग्नीची दाहकता परमेश्वरी रूप नव्हे. तसेच प्रकाशाची, तेजाची प्रखरता हाही परमेश्वरी गुण नव्हे. कारण दाहकता व प्रखरता ही विकारी रूपे

आहेत. हे विकारी का आहेत? तर ती दाहकता व प्रखरता कमी जास्त होऊ शकतात. जे कमी जास्त होऊ शकते ते कधीही नष्ट होऊ शकते, म्हणून भगवंत म्हणतात, 'ते परते केलीया साच । निज तेज ते मी ।।' विकार जेव्हा बाजूला काढले जातील, तेव्हाचे तेजस्वी असूनही शांत, शीतल व सहजभावात असलेले तेज हे परमेश्वरी तत्त्व आहे. अशा प्रकारे वेगवेगळ्या खुणा सांगत भगवंत म्हणतात, 'हे असे एकेक तुला किती सांगू?' या सर्व सृष्टीतील पदार्थ हेही माझेच, माझ्या बीजाचेच विकारित स्वरूप आहे. तेव्हा त्यातील विकार काढून टाकला की तात्त्विक स्वरूप राहते. ते माझेच रूप आहे.

*'तोचि जाणिवेचा जरी उदयो होये । तरी मुद्दल वेदु मीचि आहे । आणि तो विधानाते जया विये । तो क्रतुही मीचि ।। मग तया कर्मापासून बरवा । जो सांगोपांगु आघवा । यज्ञु प्रगटे पांडवा । तोही मी गा ।। स्वाहा मी स्वधा । सोमादि औषधी विविधा । आज्य मी समिधा । मंत्रु मी हवी ।। होता मी हवन कीजे । तेथ अग्नि तो स्वरूप माझे । आणि हुतक वस्तु जे जे । तेही मीचि ।। पै जयाचेनि अंगसंगे । इये प्रकृतीस्तव आष्टांगे । जन्म पाविजत असे जगे । तो पिता मी गा ।। अर्धनारी नटेश्वरी । जो पुरुष तोचि नारी । तेवी मी चराचरी । माताही होय ।। आणि जाहले जग जेथ राहे । जेणे जीवित वाढत आहे । ते मी वाचूनि नोहे । आन निरुते ।। इये प्रकृती पुरुषे दोन्ही । उपजली जयाचिया अमनमनी । तो पितामह त्रिभुवनी । विश्वाचा मी ।। पै ब्रह्मबीजा जाहला अंकुरू । घोषध्वनी नादाकारू । तयाचे गा भवन जो ॐ कारु । तोही मी गा ।। जया ॐ काराचिये कुशी । अक्षरे होती अउमकारेसी । जिये उपजत वेदेसी । उठिली तीन्ही ।। म्हणौनि ऋग्जयुःसामु । हे तीन्ही म्हणे मी आत्मारामु । एवं मीचि कुलक्रमु । शब्दब्रह्माचा ।। हे चराचर आघवे । जिये प्रकृती आंत साठवे । ते शिणली जेथ विसंवे । ते परमगति मी ।। आणि जयाचेनि प्रकृती जिये । जेणे अधिष्ठिली विश्व विये । जो येऊनि प्रकृति इये । गुणाते भोगी ।। तो विश्व श्रियेचा भर्ता । मीचि गा एथ पांडुसुता । मी गोसावी समस्ता । त्रैलोक्याचा ।। आकाशे सर्वत्र वसावे । वायुने नांवभरी उगे नसावे । पावके दाहावे । वर्षावे जळे ।। पर्वती बैसका न सांडावी । समुद्री रेखा नोलांडावी । पृथ्वीया भूते वाहावी । हे आज्ञा माझी ।। म्यां बोलिविल्या वेदु बोले । म्यां चालविल्या सुर्यू चाले । म्यां हालविल्या प्राणु हाले । जो जगाते चाळीता ।। मियांची नियमिला सांता । काळु ग्रासितसे भुतां । इये म्हणियागते पांडुसूता । सकळे जयाची ।। जो ऐसा समर्थु । तो मी जगाचा नाथु । आणि गगना ऐसा साक्षीभूतु । तोही मीचि ।। इही नामरुपी आघवा । जो भरला असे पांडवा । आणि नामरूपाचाही वोल्हावा । आपणचि जो ।। जैसे जळाचे कल्लोळ ।*

*आणि कल्लोळी आथी जळ । ऐसेनि वसवितसे सकळ । तो निवासु मी ।। जो मज होय अनन्य शरण । त्याचे निवारी मी जन्ममरण । यालागी शरणागता शरण्य । मीचि एकु ।। मीचि एक अनेकपणे । वेगळालेनि प्रकृतिगुणे । जीत जगाचेनि प्राणे । वर्तत असे ।। जैसा समुद्र थिल्लर न म्हणता । भलतेथ बिंबे सविता । तैसा ब्रह्मादि सर्वा भूतां । सुहृद तो मी ।। मीचि गा पांडवा । या त्रिभुवनासी वोलावा । सृष्टिक्षय प्रभवा । मूळ ते मी ।। बीज शाखाते प्रसवे । मग ते रुखपण बीजी सामावे । तैसे संकल्पे होय आघवे । पाठी संकल्पी मिळे ।। ऐसे जगाचे बीज जो संकल्पु । अव्यक्त वासनारुपु । तया कल्पांती जेथ निक्षेपु । होय ते स्थान मी ।। इये नामरुपे लोटती । वर्ण व्यक्ती आटती । जातीचे भेद फिटती । जै आकारु नाही ।। तै संकल्प वासना संस्कार । माघौते रचावया चराचर । जेथ राहोनि असती अमर । ते निधान मी ।। मी सूर्याचेनि वेषे । तपे तै हे शोषे । पाठी इंद्र होऊन वर्षे । तै पुढती भरे ।। अग्नि काष्ठ खाये । ते काष्ठची अग्नि होये । तैसे मरते मारिते पाहे । स्वरूप माझे ।। यालागी मृत्यूच्या भागी जे जे । तेही पै रुप माझे । आणि न मरते तवं सहजे । मीचि आहे ।। आतां बहु बोलोनि सांगावे । ते एकीहेळां घे पां आघवे । तेही सतासतही जाणावे । मीचि पै गा ।। म्हणोनि अर्जुना मी नसे । ऐसा कवणु ठाव असे । परि प्राणियांचे दैव कैसे । जे न देखती माते ।।'*

*(९.२६५ ते ३०० ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – सर्व सृष्ट पदार्थ हेही परमेश्वराचे स्वरूप आहे. सगळीकडेच परमेश्वर भरून राहिला आहे. हे कोणी इतरांनी सांगितले आहे असे नव्हे तर ते खुद्द भगवंतांनीच सांगितले आहे. एखादया माणसाला अदृश्य होण्याची सिद्धी प्राप्त झाली असेल तर त्याला ओळखणे म्हणजे त्याच्याकडून होणाऱ्या स्थूल रूपातील प्रक्रिया, घटना होय. जेव्हा अशा व्यक्ती अक्रिय असतात, तेव्हा त्यांचे अस्तित्व सिद्धच होऊ शकत नाही, पण जेव्हा त्या सक्रिय होतात, तेव्हा त्यांच्या अस्तित्वाची जाणीव होऊ लागते. लौकिक उदाहरण द्यावयाचे झाले तर मराठी चित्रपट 'एक डाव भुताचा', व हिंदी चित्रपट 'मिस्टर इंडिया'. असो. म्हणून भगवंतांनी आपले अस्तित्व प्रकट होण्याच्या खुणा सांगून ठेवल्या आहेत. 'कोणत्याही ठिकाणी शुद्ध ज्ञानाचा उदय होणे ही माझ्या अस्तित्वाची खूण आहे. वेदामधील प्रणव, ॐकार मीच आहे. वेदाने प्रतिपादिलेला क्रतू म्हणजे यज्ञ मी आहे. या यज्ञातील सर्व हवनद्रव्ये मी आहे. हवनमंत्र मी आहे. हवन करणारे मीच आहेत व ज्या अग्नीत आहुती दिल्या जातात तो अग्नी हे रूप माझेच आहे आणि आहुती पदार्थही मीच आहे. बीजरूप असणारा पिता व धारणाशक्ती असलेली माता ही दोन्ही रूपे माझीच

आहेत. म्हणून अर्धनारीनटेश्वर हे रूप माझेच आहे आणि शिवाय या माता-पित्यांना जन्म देणारा, निर्माण करणारा, त्यांचा पितामहही मीच आहे. 'एकोऽहं बहुस्याम्।' या संकल्पाने ब्रह्मबीजामध्ये जो अंकुर फुटला तोच ॐकार. तेच परमेश्वराचे स्वरूप आहे. त्यातून तीनही वेद व ही सर्व सृष्टी उत्पन्न झाली व ज्या वेळी प्रलय होतो त्या वेळी ज्याप्रमाणे वटवृक्षाचा आकार पुन्हा बीजात सामावला जातो, तशी ती पुन्हा परमगती पावून माझ्याच ठिकाणी साठवली जाते. या सृष्टीचा जसा मी कर्ता आहे तसे त्याचे नियमनही मीच करतो. आकाशाची व्यापकता, वायूचे सर्वत्र विचरणे, अग्नीची दाहक शक्ती, पावसाच्या रूपाने सर्वत्र वर्षाव करणे, पृथ्वीने सर्व भूतमात्रांचा भार सहन करून त्यांचे पोषण करणे, समुद्राने मर्यादा सोडू नये, वेदाने ज्ञानाचा प्रसार करावा, प्राणाने सर्वांना चालना, चैतन्य द्यावे अशा आमच्या आज्ञा आहेत. जन्माला आला तो प्राणी मरणारच. म्हणून मृत्यूचे कालस्वरूपही माझेच आहे. नामरूपाने हे सर्व जगत् भरून राहिले आहे व अस्ति, भाति, प्रियत्व रूपाने मी सर्व ठिकाणी भरून राहिलो आहे. ज्याप्रमाणे जळावरून कल्लोळ उठून पुन्हा जळातच विरून जातात व पुन्हा जळातूनच उत्पन्न होतात, तसे हे जग माझ्यातून उत्पन्न होते व माझ्यातच लय पावते. ज्याप्रमाणे बीजापासून वृक्ष उत्पन्न होतो. फांद्या, पाने, फुले, फळे उत्पन्न करून पुन्हा बीजामध्येच स्वस्वरूपाचे अधिष्ठान ठेवतो, तसे माझ्या संकल्पातून ही सृष्टी उत्पन्न होते व शेवटी माझ्यामध्येच संकल्पाच्या बीजरूपाने लय पावते. परमेश्वराच्या व्यापकपणाविषयीचे वर्णन करताना भगवंत अर्जुनाला सांगताहेत, 'म्हणौनि अर्जुना मी नसे। ऐसा कवणु ठाव असे। परि प्राणियांचे दैव कैसे। जे न देखती माते॥' नचिकेताच्या ब्रह्म जाणण्यासाठी यमराजाला केलेल्या प्रश्नाचा खुलासा यमराज देत आहे. त्याचे वर्णन कठोपनिषदात आलेले आहे. ते असे–

*य इमं मध्वदं वेद आत्मानं जीवमंतिकात्।*
*ईशानं भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते। एतद् वै तत्॥*

अर्थ – जिवाच्या जवळ असलेला आत्मा, तो मध खात आहे. (म्हणजे आनंदाचा उपभोग घेत आहे.) तो भूत आणि भविष्य यांचा स्वामी आहे. त्याला जो जाणतो तो मग कुणालाही कंटाळत नाही. हेच ते...

*यतश्चोदेति सूर्यः अस्तं यत्र च गच्छति।*
*तं देवाः सर्वे अर्पिताः तदु नात्येति कश्चन। एतद् वै तत्॥*

अर्थ – ज्याच्यापासून सूर्य उगवतो, ज्यामध्ये अस्त पावतो, सगळे देव ज्याला अर्पण आहेत, त्याचे अतिक्रमण कोणी करू शकत नाही. हेच ते..

*अंगुष्ठमात्रः पुरुषः मध्ये आत्मनि तिष्ठति ।*

*ईशानं भूतभव्यस्य न ततो विजुगुप्सते । एतद् वै तत् ॥*

अर्थ – अंगुष्ठप्रमाण पुरुष शरीरामध्ये राहतो. त्या भूत आणि भविष्य यांच्या स्वामीला जो जाणतो तो मग कोणालाही कंटाळत नाही. हेच ते.

*अंगुष्ठमात्र पुरुषः ज्योतिरिव अधुमकः ।*

*ईशानो भूतभव्यस्य स एवाद्य स उ. श्वः । एतद् तै तत् ॥*

अर्थ – अंगुष्ठप्रमाण पुरुष धूर नसलेल्या ज्योतीसारखा आहे. भूत व भविष्याचा स्वामी आहे. तोच आज आहे आणि तोच उद्या आहे. (म्हणजे तो सनातन आहे.) हेच ते.

विभूतियोगामध्ये म्हणजे गीतेच्या दहाव्या अध्यायात भगवंतांनी परमेश्वराचे स्वरूप कोठे आहे याचे वर्णन केले आहे. त्या विभूती–

१) भूतमात्रांच्या ठिकाणी असलेला आत्मा. २) आदीं, मध्य व अंती. ३) आदित्यांतील विष्णू. ४) ज्योतींमध्ये म्हणजे प्रकाशमानांमध्ये रवि-सूर्य. ५) मरुद्गणांमध्ये मरीची. ६) नक्षत्रांमध्ये चंद्र. ७) वेदांमध्ये सामवेद. ८) देवांमध्ये इंद्र. ९) इंद्रियांमध्ये मन. १०) भूतांमध्ये असणारी चेतना. ११) रुद्रांमध्ये शंकर. १२) यक्ष राक्षसांत कुबेर. १३) वसूंमध्ये अग्नी. १४) पर्वतांमध्ये मेरू पर्वत. १५) पुरोहितांमध्ये बृहस्पती. १६) सेनापतींमध्ये स्कंद. १७) जलाशयांमध्ये सागर. १८) महर्षींमध्ये भृगु. १९) वर्णांमध्ये ॐ २०) यज्ञांमध्ये जपयज्ञ. २१) स्थावरांमध्ये हिमालय. २२) सर्व वृक्षांमध्ये अश्वत्थ. २३) देवर्षींमध्ये नारद. २४) गंधर्वांमध्ये चित्ररथ. २५) सिद्धांमध्ये कपिल मुनी. २६) अश्वांमध्ये उच्चैःश्रवा. २७) हत्तींमध्ये ऐरावत. २८) मनुष्यांमध्ये राजा. २९) आयुधांमध्ये वज्र. ३०) गायींमध्ये कामधेनू. ३१) उत्पादकांमध्ये मदन. ३२) सर्पांमध्ये वासुकी. ३३) नागांमध्ये अनंतनाग. ३४) जलदेवतांमध्ये वरुण. ३५) पितृगणांमध्ये अर्यमा देवता. ३६) नियमाधिकारी-जगाचा नियंता-यम. ३७) दैत्यांमध्ये प्रल्हाद. ३८) नाश करणारा काळ. ३९) पशूंमध्ये सिंह. ४०) पक्ष्यांमध्ये गरुड. ४१) वेगाने धावणाऱ्यांत पवन. ४२) शस्त्रधाऱ्यांमध्ये राम. ४३) जलचर प्राण्यांमध्ये मगर. ४४) जान्हवी नदी. ४५) विद्यांमध्ये अध्यात्मविद्या. ४६) प्रतिपादनांमध्ये वाद. ४७) अक्षरांमध्ये 'अ'कार. ४८) समासांमध्ये द्वंद्व. ४९) अक्षय प्रवाहित असणारा काल. ५०) सृष्टीला उत्पन्न

करणारा मीच आहे. ५१) सर्व संहारकर्ता मृत्यू. ५२) सर्व भूतांचे पालन करणारा पालक मीच. ५३) कीर्ती. ५४) श्री. ५५) वाक्. ५६) स्मृती. ५७) मेधा. ५८) धृती. ५९) क्षमा. ६०) सामसूक्तात बृहत्साम सूक्त. ६१) छंदांमध्ये गायत्री छंद. ६२) मासांमध्ये मार्गशीर्ष. ६३) ऋतूंमध्ये वसंत. ६४) छळ करणाऱ्यांमध्ये द्यूत. ६५) तेजस्वी लोकांतील तेज. ६६) कार्य करणाऱ्यांमध्ये विजय. ६७) सत्त्ववतांतील सत्त्व. ६८) वृष्णिकुलातील वासुदेव. ६९) पांडवांमधील अर्जुन. ७०) मुनींमध्ये व्यास. ७१) कवींमध्ये शुक्राचार्य. ७२) सर्वांचे नियंत्रण करणारा दंड. ७३) शास्त्रांमध्ये नीतिशास्त्र. ७४) गुह्यांमध्ये मौन. ७५) ज्ञानियांच्या ठिकाणी असणारे ज्ञान. एकूण सर्व भूतमात्रांचे मूळ बीज सर्व विश्व हे केवळ परमेश्वराच्या एका अंशापासून बनलेले आहे. (अध्याय १० श्लोक २० ते ४२ भ. गी.).

भावार्थ – वेगवेगळ्या शब्दांतून, वेगवेगळ्या प्रमाणांतून गीतेत पुनःपुन्हा परमेश्वराचे वर्णन आले आहे. परमेश्वराचे वर्णन एका एका विशेषणाच्या दृष्टीने अतिव्याप्ती होणारे आहे. पण या सर्व विशेषणांचे ज्याच्या एकाच्या ठिकाणी वर्णन लागू पडणारे आहे, तेच परमेश्वराचे खरे स्वरूप आहे, असे म्हणता येईल. दहाव्या अध्यायात भगवंतांनी आपल्या विभूतियोगाचे वर्णन केले आहे ते अर्थरूपाने सरळच आहे. त्यामुळे गीतेतील श्लोक देण्याचे टाळले आहे. असो.

परमेश्वराचे व्यक्तिविशेष रूपाने वर्णन झाले. आता रूपविशेषाने वर्णन विश्वरूपामध्ये केले आहे. तेही अर्थरूपाने सरळच आहे. पण संत ज्ञानदेवांनी त्याचे सविस्तर वर्णन केले आहे. ते जास्त मोकळेपणाने केले आहे. ते त्यांच्याच शब्दांत.

*‘अर्जुना तुवा एक दावा म्हणितले । आणि तेचि दावूं तरि काय दाविले । आतां देख आघवे भरिले । माझ्याचि रुपि ॥ एक कृशे एके स्थूळे । एके-ऱ्हस्वे एके विशाळे । पृथुतरे सरळे । अप्रांते एके ॥ एके अनावरे प्रांजळे । सव्यापारे एके निश्चळे । उदासीने स्नेहाळे । तीव्रे एके ॥ एके घ्रूणिते सावधे । असलगे एके अगाधे । एके उदारे अतिबद्धे । क्रुद्धे एके ॥ एके शान्ते सन्मदे । स्तब्धे एके सानन्दे । गर्जिते निःशब्दे । सौम्ये एके ॥ एके साभिलाषे विरक्ते । उन्निद्रिते एके निद्रिते । परितुष्टे एके आर्ते । प्रसन्ने एके ॥ एके अशस्त्रे सशस्त्रे । एके रौद्रे अतिमित्रे । भयानके एके विचित्रे । लयस्थे एके ॥ एके जनलीला विलासे । एके पालनशीले लालसे । एके संहारके सावेशे । साक्षिभूते एके ॥ एवं नानाविधे परि बहुवसे । आणि दिव्य तेज प्रकाशे । तेवीचि एकएका ऐसे । वर्णही नव्हे ॥ एके तातले साडेपंधरे । तैसी कपिलवर्णे*

*अपारे । एके सर्वांगी जैसे सेंदुरे । डवरले नभ ।। एके सावियाचि चुळुकी । जैसे ब्रह्मकटाह खचिले माणिकी । एके अरुणोदयासारखी । कुंकुमवर्णे ।। एके शुद्ध स्फटिके सोज्वळे । एके इंद्रनीळ सुनिळे । एके अंजनवर्णे सकाळे । रक्तवर्णे एके ।। एके लसत्कांचन सम पिवळी । एके नवजलदश्यामळी । एके चांपेगौरी केवळी । हरिते एके ।।*

*एके तप्तताम्रतांबडी । एके श्वेतचंद्र चोखडी । ऐसी नानावर्णे रूपडी । देखे माझी ।। हे जैसे का आनान वर्ण । तैसे आकृतीही अनारिसेपण । लाजा कंदर्प रिघाला शरण । तैसी सुंदरे एके ।। एके अतिलावण्य साकारे । एके स्निग्धवपु मनोहरे । शृंगार श्रियेची भांडारे । उघडिली जैसी ।। एके पीनावयव मांसाळे । एके शुष्के अतिविक्राळे । एके दीर्घकंठे विताळे । विकटे एके ।। एवं नानाविधाकृति । इया पाहतां पारु नाही सुभद्रापति । ययांच्या एकेकी आंगप्रांती । देख पां जग ।।*

*(११.१२३ ते १४० ज्ञानेश्वरी)*

अकराव्या अध्यायात पुन्हा संत ज्ञानदेव वर्णन करतात–

*तू प्रकृति पुरुषाची आदि । जी महत्त्वता तूचि अवधि । स्वये तूं अनादि । पुरातनु ।। तूं सकळ विश्व जीवन । जीवांसि तूंचि निधान । भूतभविष्याचे ज्ञान । तुझ्याचि हाती ।। जी श्रुतिचिया लोचना । स्वरूपसुख तूचि अभिन्ना । त्रिभुवनाचिया आयतना । आयतन तूं ।। म्हणोनि जी परम । तूते म्हणिजे महाधाम । कल्पांति महद्ब्रह्म । तुजमाजी रिगे ।। किंबहुना तुवां देवे । विश्व विस्तारले आहे आघवे । तरि अनंतरूपा वानावे । कवणे तूते ।। जी काय एक तूं नव्हसी । कवणे ठायी नससी । हे असो जैसा आहासी ।। तैसिया नमो ।। वायु तूं अनंता । यम तूं नियमता । प्राणिगणी वसता । अग्नि तो तूं ।। वरुण तो सोम । स्रष्टा तू ब्रह्म । पितामहाचाही परम । आदिजनक तू ।। आणीकही जे जे कांही । रुप आथी अथवा नाही । तया नमो तुज तैसयाही । जगन्नाथा ।। इये चराचरी जी भूते । सर्वत्र देखे तयाते । आणि पुढती म्हणे नमस्ते । नमस्ते प्रभो ।। जी अनंतबळ संभ्रमा । तुज नमो अमित विक्रमा । सकळकाळी समा । सर्वरूपा ।। आघविया आकाशी जैसे । अवकाशाचि होऊनी आकाश असे । तूं सर्वपणे तैसे । पातलासि सर्व ।। किंबहुना केवळ । सर्व हे तूचि निखिळ । परि क्षीरार्णवी कल्लोळ । पयाचे जैसे ।। म्हणोनिया देवा । तूं वेगळा नव्हेसी सर्वा । हे आले मज सद्भावा । आतां तूचि सर्व ।।*

*(११.५१४ ते ५३६.).*

भावार्थ – अर्जुनाने विश्वरूप पाहिले. विभूतींच्या लक्षणार्थ दिलेल्या यादीने त्याचे समाधान झाले नाही. तेव्हा या सर्व रूपांचे एकत्रित दर्शन व्हावे अशी इच्छा अर्जुनाला झाली. झाडावरून उतरवून बाजारात टोपलीत मांडलेली फळे पाहण्यापेक्षा झाडावरच लटकलेली फळे पाहण्यात खूप आनंद मिळतो. म्हणून अर्जुनाने त्या सर्व विभूती त्या विश्वरूपाच्या ठिकाणी पाहण्यासाठी विश्वरूप दर्शनाची इच्छा केली व भगवंतांनी आपल्या लाडक्या भक्ताची तीही इच्छा पूर्ण केली. ते विश्वरूप पाहून अर्जुनाने त्याचे वर्णन केले आहे. तीही परमेश्वराची विशेषणेच आहेत आणि पुढे अर्जुनाने विश्वरूपाला नमस्कार केला आहे. ते प्रचंड विश्वरूप सर्व विश्वात कोंदटून गेलेले पाहून अर्जुनाला कोठे कोठे व कोणाकोणाला तसेच मागून का पुढून आणि खाली-वर व बाजूला नमस्कार करावा हे सुचेना. तो सगळीकडेच नमस्कार करत सुटला. तो एकदाच 'नमस्ते' म्हणून थांबत नाही तर 'नमस्ते नमस्ते' असे दोनदोनदा म्हणत आहे. त्याला वाटते, चुकून एखाद्या रूपाला नमस्कार राहिला असे व्हावयास नको आणि त्याची ती नमस्काराची त्रेधातिरपिट उडालेली दिसत आहे.

अर्जुनाने विश्वरूपाची अनुभूती जी वर्णन केलेली आहे, अगदी त्याच शब्दांत मंडुकोपनिषदात वर्णन आलेले आहे.

*ब्रह्मैवेदममृतं पुरस्तात् ब्रह्म पश्चात् ब्रह्म दक्षिणतश्चोत्तरेण ।*
*अधश्चोर्ध्वं च प्रसृतम् ब्रह्मैवेदं विश्वमिदं वरिष्ठम् ॥*

अर्थ – ब्रह्मच हे अमृत आहे. ब्रह्म हे पुढे आहे, ब्रह्म मागे आहे, ब्रह्मच उजवीकडे, डावीकडे, खाली, वर पसरलेले आहे. ब्रह्मच हे विश्व आहे. हे ब्रह्म वरिष्ठ आहे.

*बृहत् च तत् दिव्यमचिंत्यरूपं सूक्ष्मात् च तत् सूक्ष्मतरं विभाति ।*
*दूरात् सुदूरे तदिहांतिके च पश्यत्सु इहैव निहितं गुहायाम् ॥*

अर्थ – ते तत्त्व विशाल, दिव्य, अचिंत्यरूप, सूक्ष्माहून अत्यंत सूक्ष्म आणि विविध रूपांनी प्रकाशमान आहे. ते दूराहून अतिदूर आणि इथे अगदी समीपही आहे. पाहू इच्छिणारांसाठी ते इथेच हृदयरूपी गुहेत लपलेले सापडेल.

*न चक्षुषा गृह्यते नापि वाचा नान्यैर् देवैस् तपसा कर्मणा वा ।*
*ज्ञान प्रसादेन विशुद्धसत्त्वः ततस्तु तं पश्यते निष्कलं ध्यायमानः ॥*

अर्थ – (हा आत्मा) चक्षूने आणि वाणीनेसुद्धा ग्रहण केला जात नाही. इतर इंद्रियांनीही तो ग्रहण करता येत नाही. अथवा तपाने किंवा कर्मानेही त्याचे ग्रहण करता येत नाही. ज्ञानप्रसादाने चित्त शुद्ध झालेला पुरुष, ध्यानाने त्या निष्कल ब्रह्माचे दर्शन करतो.

परब्रह्माच्या वर्णनात संत ज्ञानदेव भगवान श्रीकृष्णाच्या वक्तव्याचा खुलासा करताना तेराव्या अध्यायात म्हणतात की–

*'तरि ज्ञेय ऐसे म्हणणे । वस्तू ते येणेचि कारणे । जे ज्ञानावाचुनि कवणे । उपाये न ये ।। आणि जाणितलेयावरौते । काहीच करणे नाही जेथे । जाणणेची तन्मयाते । आणी जयाचे ।। जे जाणितलेयासाठी । संसारा काढुनिया काठी । जिरोनी जाईजे पोटी । नित्यानंदाच्या ।। ते ज्ञेय गा ऐसे । आदि जया नसे । परब्रह्म आपैसे । नाम जया ।। जे नाही म्हणो जाईजे । तवं विश्वाकारे देखिजे । आणि विश्वचि ऐसे म्हणिजे । तरि ते माया ।। रूप वर्ण व्यक्ति । नाही दृश्य द्रष्टा स्थिती । तरि कोणे कैसे आथी । म्हणावे पां ।। आणि साचची जरी नाही । तरि महदादि कोणे ठाई । स्फुरत कैचे काई । तेणेवीण असे ।। म्हणोनि आथी नाथी हे बोली । जे देखोनि मुकी जाहली । विचारांची मोडली । वाट जेथे ।। जैसी भांड घट शरावी । तदाकार असे पृथ्वी । तैसे सर्व होऊनिया सर्वी । असे जे वस्तू ।। आघवांचि देशी काळी । नव्हतां देशकाळा वेगळी । जे क्रिया स्थूळा स्थूळी । तेचि हात जयाचे ।। तयाते याकारणे । विश्वबाहु ऐसे म्हणणे । जे सर्वचि सर्वपणे । सर्वदा करी ।। आणि समस्ताही ठाया । एके, काळी धनंजया । आले असे म्हणोनि जया । विश्वांघ्रि नाम ।। पै सवितया आंग डोळे । नाहीत वेगळेवेगळे । तैसे सर्व द्रष्ट सकळे । स्वरूपे जे ।। म्हणोनि विश्वतश्चक्षु । हा अचक्षूच्या ठायी पक्षु । बोलावया दक्षु । जाहला वेदु ।। सर्वांचे शिरावरी । नित्य नांदे सर्वांपरी । ऐसिये स्थितीवरी । विश्वमूर्धा म्हणिपे ।। पै गा मूर्ति तेचि मुख । हुताशना जैसे देख । तैसे सर्वपणे अशेख । भोक्ता जे ।। यालागी तया पार्था । विश्वतोमुख हे व्यवस्था । आली वाक्पथा । श्रुतीचिया ।। आणि वस्तुमात्री गगन । जैसे संलग्न । तैसे शब्दजाती कान । सर्वत्र जया ।। म्हणोनि आम्ही तयाते । म्हणो सर्वत्र आइकते । एवं जे सर्वाते । आवरुनि असे ।। एऱ्हवी तरी महामती । विश्वतश्चक्षु इया श्रुती । तयाचिये व्याप्ती । रूप केले ।। वाचून हस्त नेत्र पाये । हे भाष तेथ के आहे । सर्व शून्याचा न साहे । निष्कर्षु जे ।। पै कल्लोळात कल्लोळे । ग्रासिजत असे ऐसे केळे । परि ग्रासिते ग्रासा वेगळे । असे काई ।। तैसे साचचि जे एक । तेथ के व्याप्यव्यापक । परि बोलावया नावके ।*

करावे लागे ।। पै शुन्य जै दावावे जाहले । ते बिंदुले एक केले । तैसे अद्वैत सांगावे बोले । ते द्वैत कीजे ।। एऱ्हवी तरी पार्था । गुरुशिष्या सत्पथा । आडळू पडे सर्वथा । बोलु खुंटे ।। म्हणोनि गा श्रुती । द्वैत भावे अद्वैती । निरुपणाची वाहती । वाट केली ।। तेचि आतां अवधारी । इये नेत्रगोचरे आकारी । ते इये गा जयापरी । व्यापक असे ।। तरी ते गा किरीटी ऐसे । अवकाशी आकाश जैसे । परी पटु होऊनी असे । तंतु जेवी ।। उदक होऊनि उदकी । रसु जैसा अवलोकी । दीपपणे दीपकी । तेज जैसे ।। कर्पुरत्वे कापुरी । सौरभ्य असे जयापरी । शरीर होऊनि शरीरी । कर्म जेवी ।। किंबहुना पांडवा । सोनेचि सोनयाचा रवा । तैसे जे या सर्वा । सर्वांगी असे ।। परी रवेपणामाजिवडे । तंव रवा ऐसे आवडे । वांचुनि सोने सांगडे । सोनया जेवी ।। पै गा वोघुचि वाकुडा । परि पाणी उजु सुहाडा । वन्हि आला लोखंडा । लोह नव्हे की ।। घटाकारे वेटाळे । तेथ नभ गमे वाटोळे । मठी तरी चौफाळे । आय दिसे ।। परि ते आकार जैसे । नोहिजतीचि कां आकाशे । जे विकार होऊनि तैसे । विकारी नोहे ।। मन मुख्य इंद्रिया । सत्त्वादि गुणां ययां । सारिखे ऐसे धनंजया । आवडे कीर ।। पै गुळाची गोडी । नोहे बांधया सांगडी । तैसी गुण इंद्रिये फुडी । नाही तेथे ।। अगा क्षीराचिये दशे । घृत क्षीराकारे असे । परि क्षीरचि नव्हे जैसे । कपिध्वजा ।। तैसे जे इये विकारी । विकारु नव्हे अवधारी । पै आकारा नाम भोवरी । येर सोने ते सोने ।। इया उघड मऱ्हाटिया । ते वेगळेपणे धनंजया । जाण गुण इंद्रिया । -पासोनिया ।। नामरूप संबंधु । जातिक्रिया भेदु । हा आकारासी प्रवादु । वस्तुसी नाही ।। ते गुण नव्हे कही । गुण तया संबंधु नाही । परि तयाच्याचि ठाई । आभासती ।। येतुल्यासाठी । संभ्राताच्या पोटी । ऐसे जाय किरीटी । जे हेचि धरी ।। तरि ते गा धरणे ऐसे । अभ्राते जेवि आकाशे । का प्रतिवदन जैसे । आरसेनि ।। ना तरि सूर्य प्रति मंडळ । जैसेनि धरी सलिल । कां रश्मिकरी मृगजळ । धरिजे जेवी ।। तैसे गा संबंधेवीण । यया सर्वांते धरी निर्गुण । परि ते वाया जाण । मिथ्या दृष्टि ।। आणि यापरी निर्गुणे । गुणाते भोगणे । रंका राज्य करणे । स्वप्नी जैसे ।। म्हणोनि गुणाचा संगु । अथवा गुण भोगु । हा निर्गुणी लागु । बोलो नये ।। जे चराचर भूता– । माजी असे पांडुसुता । नाना वन्ही उष्णाता । अभेदे जैसी ।। तैसेनि अविनाश भावे । जे सूक्ष्मदशे आघवे । व्यापुनि असे ते जाणावे । ज्ञेय येथ ।। जे एक आंतु बाहेरी । जे एक जवळ दुरी । जे एक वाचुनि परी । दुजी नाही ।। क्षीरसागराची गोडी । माजी बहु थडिये थोडी । हे नाही तया परवडी । पूर्ण जे गा ।। स्वेदजादि प्रभुति । वेगळाल्या भूती । जयाचिये अनुस्युति । खोमणे नाही ।। पै श्रुतिमुख

*टिळका । घट सहस्रा अनेका । माजी बिंबोनी चंद्रिका । न भेदे जेवी ।। नाना लवण कणाचिये राशी । क्षारता एकचि जैसी । का कोडी एकी उसी । एकचि गोडी ।। तैसे अनेक भूतजाती । जे आहे एकी व्याप्ति । विश्वकार्यासुमति । कारण जे गा ।। म्हणोनि हा भूताकारु । जेथोनि तेचि या आधारु । कल्लोळा सागरु । जियापरी ।। बाल्यादि तीन्ही वयसी । काया एकचि जैसी । तैसे आदिस्थिती ग्रासी । अखंड जे ।। अगा सृष्टी वेळे प्रियोत्तमा । जया नांव म्हणती ब्रह्मा । व्याप्ती जे विष्णुनामा । पात्र जाहले ।। मग आकारु हा हारपे । तेव्हा रुद्र जे म्हणिपे । तेही गुणत्रय जेव्हा लोपे । तै जे शून्य ।। नभाचे शून्यत्व गिळूनी । गुणत्रयाते नुरऊन । ते शून्य ते महाशून्य । श्रुतिवचन संमत ।। जे अग्निचे दीपन । जे चंद्राचे जीवन । सूर्याचे नयन । देखती जेणे ।। जयाचे उजियेडे । तारांगण उभडे । महातेज सुरवाडे । राहाटे जेणे ।। जे आदीची आदि । जे वृद्धिची वृद्धि । बुद्धीची बुद्धि । जीवाचा जीवू ।। जे मनाचे मन । जे नेत्राचे नयन । कानाचे कान । वाचेची वाचा ।। जे प्राणाचा प्राण । जे गतीचे चरण । क्रियेचे कर्तेपण । जयाचेनि ।। आकारु जेणे आकारे । विस्तारु जैणे विस्तारे । संहारू जेणे संहारे । पांडुकुमरा ।। जे मेदिनीची मेदिनी । जे पाणी पिऊनि असे पाणी । तेजा दिवे लावणी । जेणे तेजे ।। जे वायुचा श्वासोश्वासु । जे गगनाचा अवकाशु । हे असो आघवाचि आभासु । आभासे जेणे ।। किंबहुना पांडवा । जे आघवेची असे आघवा । जेथ नाही रिगावा । द्वैतभावासी ।। जे देखिलियाचि सवे । दृश्य द्रष्टा हे आघवे । एकवाट कालवे । सामरस्ये ।। मग तेचि होय ज्ञान । ज्ञाता ज्ञेय हन । ज्ञाने गमिजे स्थान । तेहि तेचि ।। जैसे सरलिया लेख । आंख होती एक । तैसे साध्यसाधनादिक । ऐक्यासि ये ।। अर्जुना जिये ठायी । न सरे द्वैताची लिही । हे असो जे हृदयी । सर्वांच्या असे ।।*

*(१३.८६५ ते ९३९ ज्ञानेश्वरी).*

आपण अनेक विषयांचे ज्ञान घेत असतो. हे जे विविध विषय आहेत हे काही संपत नाहीत आणि ज्ञान घेणेही संपत नाही. कारण पदार्थांची स्थूल रूपाने विविधता एवढी आहे की, ती कधीच संपणार नाही. कारण आपण पदार्थांच्या स्थूल कणांचे निरीक्षण, पृथक्करण करत असतो. त्यांतील मूलतत्त्वाकडे आपले कधीच लक्ष गेलेले नसते आणि म्हणून ते पदार्थ, त्यांतील विविधता संपत नाही. शितावरून भाताची परीक्षा होते म्हणतात. त्यातील 'शीत'च आपण चाचपून पाहात नाही. ते 'शीत' हेच 'ज्ञेय' होय आणि ते 'ज्ञेय' म्हणजे परमेश्वर, परब्रह्म होय. ते ज्ञानाच्या सूक्ष्म प्रक्रियेने समजण्यासारखे आहे. चिंतन, मनन, निदिध्यास, ध्यान, धारणा, समाधी या सूक्ष्म,

सूक्ष्मतर, सूक्ष्मतम प्रक्रियेनेच त्या 'ज्ञेया'पर्यंत जाणे शक्य आहे. म्हणून संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'जे ज्ञानावाचून कवणे। उपाये न ये।।' आणि मग जर ते 'ज्ञेय' एकदा समजले, जाणले, तर मग कोणत्याही पदार्थाचे पृथक्करण करण्याची गरज भासणार नाही. पदार्थ पाहिला की लगेच त्याच्याविषयी पूर्ण ज्ञान होऊ शकेल. असे जे 'ज्ञेय' आहे तेच परब्रह्म आहे. सूक्ष्म रूपाने ते सर्व विश्वात भरून आहे असे जाणवते, पण स्थूल रूपाने तर काहीच दिसत नाही. त्यामुळे हे जे दिसते ती सर्व माया आहे. त्यामुळे विचारांना, तर्काला कितीही ताण दिला तरी काहीच हाती लागत नाही. विश्वाचा पसारा वाढत जात आहे. रोज नावीन्याने कितीतरी पदार्थ उत्पन्न होत असतात व जुने विनाश पावत असतात. यामागे कोण आहे हे कळत नाही, दिसत नाही. पण त्याचे हात कार्य करत असतील आणि म्हणून पुरुषसूक्तामध्ये परमेश्वराचे वर्णन करताना त्याला सहस्र डोके, डोळे, नाक, कान, हात, पाय असे अवयव आहेत असे सांगितले आहे. कारण सर्वत्र तोच व्यापून राहिला आहे. प्रत्येक प्राणिमात्राच्या माध्यमातून तोच कार्य करतो, वास घेतो, ऐकतो, पाहतो, उपभोग घेतो असे सर्व काही करतो. तर आपल्याला वाटते आपणच हे सर्व करत आहोत. पण 'आपण' तरी नेमके कोण आहोत हे तरी कळले का? तर नाही. पण तो सर्व काही करतो हे सर्वसामान्यांना दिसत नाही, कळत नाही. म्हणून हे कळून घेण्यासाठी सद्गुरूंची आवश्यकता आहे. कारण सद्गुरूंनी ते अनुभवलेले असते. ते सद्गुरू आपल्या अनुभवाला आणून देतात. म्हणून गुरु-शिष्य अशी रूढी चालत आलेली आहे. या विश्वाच्या स्थूल स्वरूपाच्या साह्यानेच यातील सूक्ष्म तत्त्व समजून घ्यावयाचे आहे आणि मग त्याला दृष्टान्त देताना सद्गुरू सांगतात की, 'ज्याप्रमाणे वस्त्रामध्ये तंतू असतो, अवकाशानेच आकाश भरून गेलेले असते. म्हणजे अवकाश म्हणजेच आकाश होय. दिव्याची ज्योत म्हणजेच तेज होय. कापरामध्ये केवळ परिमळच भरून असतो, सोन्याच्या दागिन्यांत सोन्याशिवाय अन्य काहीच नसते. तापवून लाल झालेल्या लोखंडी गोळ्यात अग्नी, उष्णता ही सर्वांगाने भरून गेलेली असते. गुळाचे सर्व अंगच गोड असते. त्याच्या आकाराशी त्या गोडीचा काहीच संबंध नसतो. म्हणून रूप, नाम आणि गुण यांचा काही संबंध नाही. नाम-रूपापासून गुण हे स्वतंत्र आहे. त्या ठिकाणी कदाचित शंका येण्याची शक्यता आहे की नाम-रूपाचा संबंध कसा नाही? 'गूळ' हे नामाभिधान मराठी भाषेत असेल, पण इतर भाषांत 'गुळाला' अन्य कितीतरी नावे असतील म्हणजे नावे अनेक आहेत. तसेच त्याची रूपेही अनेक आहेत. गुळाच्या मोठ्या, लहान ढेपी असतात, मोठे, लहान खडे असतात, चुरा असतो. पण गुळाची गोडी या दोन्हीशिवाय म्हणजे नामारूपाशिवाय सारखीच असते, एकच असते. त्यात फरक पडत नाही. आता याही पुढे जाऊन

विचार करावयाचा म्हणजे गुळाच्या गोडीमध्ये रसतत्त्व आहे. या रसतत्त्वाला कोणतीही चव नाही. ते ज्या रसाबीजाला पोसेल त्या रसतत्त्वाचे ते होईल. म्हणून गुळाची गोडी हा रसतत्त्वाचा विकार झाला आणि ही स्थूल सृष्टीसुद्धा मूलतत्त्वाचे विकारित स्वरूप आहे. म्हणून विकारित स्वरूप हे परमेश्वराचे स्वरूप नव्हे, तर परमेश्वराचे स्वरूप हे निर्गुण, निराकार तसेच निर्विकारी आहे. म्हणजे परमेश्वरी तत्त्वाचा सर्वांना आधार आहे. परमेश्वरी सूक्ष्म अधिष्ठानावरच या स्थूल सृष्टीची उभारणी आहे. या परमेश्वरी अधिष्ठानाचे नाव परब्रह्म असे आहे. याला दृष्टान्त देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'ज्याप्रमाणे सकाळ, दुपार, संध्याकाळ या समयाला केवळ एक सूर्यच कारण आहे किंवा बाळ, तरुण, वृद्ध या अवस्था एका देहाच्या अधिष्ठानावरच प्रकट होतात किंवा ब्रह्मदेव, विष्णू, महेश्वर याच देवता उत्पत्ती, स्थिती व लय यांच्या कार्यदेवता आहेत, पण त्यांचे शक्तिरूप अधिष्ठान परमेश्वराचे आहे. एकूण परमेश्वराच्या अधिष्ठानाशिवाय अन्य काहीच नाही म्हणून एकमेवाद्वितीय केवळ परमेश्वरच आहे.

परमेश्वराचे स्वरूप शब्दांत वर्णन करू गेले म्हणजे कळते, की परमेश्वरस्वरूप केवळ असे नसून आणखी पुष्कळ काही आहे. तेव्हा 'असे नव्हे', 'असे नव्हे', 'न इति', 'नेति' असे म्हणण्याची पद्धत निघाली आहे. वेदांमधून, उपनिषदांमधून या 'नेति', 'नेति'चा उपयोग केला गेला आहे. शिवाय संत महात्म्यांनीही जेव्हा परमेश्वराचे वर्णन करण्याचा प्रयत्न केला, तेव्हाही त्यांनी शब्दाच्या असामर्थ्याची जाणीव बोलून दाखवली आहे. एकनाथी भागवत, तुलसी रामायण, उपनिषदे यांच्यातील काही ओव्या, श्लोक खाली दिले आहेत.

*'श्रुति नेति नेति येणे शब्दे । अतद्यावृत्तिनिषेध बोधे ।*
*परी साक्षात् वेदानुवादे । निज वस्तु शब्दे न बोलवे ॥*

*शब्दासी जे वाच्य नोहे । तेचि परब्रह्म जाणावे ।*
*तेथील जो खुणे पावे । तो ब्रह्म सद्भावे स्वये होय ॥*

*श्रुति 'नेति नेति' येणे वचने । शब्द निषेधूनि वस्तु दावणे ।*
*शब्दी निःशब्द जो लक्षु जाणे । तेणे पावणे परब्रह्म ॥*

*वाचा निःशेष निवर्ते । मन बुद्धि न पवे जेथे ।*
*तेचि अवधि निषेधाते । 'परब्रह्म' त्याते बोलिजे ॥*

*वाचेचे वदविते । परी वाचा वदो न शके ज्याते ।*
*जे मन बुद्ध्यादिकां जाणते । परी मन बुद्धि ज्याते नेणती ।।*

*जे नयनाते दाखविते । परी नयन न देखती ज्याते ।*
*जे श्रवण घ्राणाते चेतविते । परी श्रवण घ्राण ज्याते नेणती ।।*

*एवं सर्वांचे जाणते । परी सर्व सर्वथा नेणे ज्याते ।*
*ज्यासी जाणावयालागी येथे । आणिक जाणते असेना ।।*

*ऐसे स्वसंवेद्य निजज्ञाते । ज्यासी दुजे नाही जाणते ।*
*शब्द रिघावया तेथे । रिगमु त्याते असेना ।।*

*(अध्याय ३, ओवी ६६७ ते ६७६ निवडक ए. भा.).*

*बिनु पद चलइ सुनई बिनु काना । कर बिनु करम करइ बिधी नाना ।*
*आननरहित सकल रस भोगी । बिनु बानी बकता बड जोगी ।*

*तन बिनु परस नयन बिनु देखा । ग्रहइ घ्रान बिनु बास असेखा ।*
*असि सब भाँति अलौकिक करनी । महिमा जासु जाइ नहीँ बरनी ।।*

*(प्रथम सोपान - १२५ तुलसी रामायण).*

जो पायांवाचून चालतो, कानांवाचून ऐकतो, हातांवाचून अनेकविध कर्मे करतो, मुखावाचून सर्व रसांचा आस्वाद घेतो, वाणीवाचून वक्तृत्व करतो आणि महान योगी बनतो, देहावाचून स्पर्श करतो, नेत्रावाचून पाहतो आणि नासिकेवाचून सर्व गंध ग्रहण करतो. अशी त्याची सर्वच करणी अलौकिक असून त्याचा महिमा अवर्णनीय आहे. निर्माण केलेल्या सर्व सृष्टीचा सर्व प्रकारे उपभोग घ्यावा अशी परमेश्वराच्या ठिकाणी प्रेरणा झाली आणि परमेश्वर अनेकविध रूपे धारण करून या सृष्टीचा उपभोग घेऊन आनंदून गेला. परमेश्वराचे स्वरूप तर निर्गुण, निराकार, निरावयव, तसेच स्वगतभेद शून्य असे आहे. त्यामुळे त्याला जसे शरीर नाही, तसे त्याला कोणतेच अवयवही नाहीत. तरी त्याने उपभोग घेतला, तो कसा? त्यानेच अनेक रूपे धारण करून त्यांच्या नेत्रांतून सृष्टिसौंदर्याचा आनंद घेतला, त्यांच्या पायांनी चालून घेतले, त्यांच्या हातांनी अनेकविध कर्मे केली व सृष्टीचा गाडा चालू ठेवला. त्यांच्या कानांनी या सृष्टीतील विविध नादांचे ग्रहण करून तो तल्लीन झाला. त्यांच्याच तोंडाने त्याने अनेकविध स्वर काढून ही सृष्टी निनादून सोडली व त्याचप्रमाणे अनेकविध रसांचे पान

करून त्यांचा आस्वादही घेतला आणि एवढे करून तो अकर्ताच आहे, एवढे भोगून तो अभोक्ताच आहे. कारण त्याला देह नाही आणि अवयवही नाहीत.

*यद् वाचा अनभ्युदितं येन वाक् अभ्युद्यते ।*
*तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥*

अर्थ – जे वाणीने बोलले जात नाही, ज्याने वाणी बोलली जाते, तेच ब्रह्म तू जाण. हे नव्हे, ज्याची (लोक) उपासना करतात.

*यन् मनसा न मनुते येनाहुर् मनो मतम् ।*
*तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥*

अर्थ – जे मनाने चिंतिले जात नाही, ज्याने मन चिंतिले जाते (म्हणजे ज्याच्यामुळे मन चिंतन करते) असे अनुभवी पुरुष म्हणतात. तेच ब्रह्म तू जाण. हे नव्हे, ज्याची (लोक) उपासना करतात.

*यत् चक्षुसा न पश्यति येन चक्षूंषि पश्यति ।*
*तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥*

अर्थ – जे चक्षूने पाहिले जात नाही, ज्याने चक्षू पाहिला जातो (म्हणजे ज्याच्यामुळे डोळा पाहतो) ते ब्रह्म तू जाण. हे नव्हे, ज्याची (लोक) उपासना करतात.

*यत् प्राणेन प्राणिति येन प्राणः प्रणीयते ।*
*तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥*

*(केनोपनिषद).*

अर्थ – जे प्राणाने खेचले जात नाही, ज्याने प्राण खेचला जातो, तेच ब्रह्म तू जाण. हे नव्हे, ज्याची (लोक) उपासना करतात.

*अनंगु तो पेंधा । निकवडा नुसधा । जीर्णु अतिवृद्धा- । पासोनि वृद्धु ॥*
*तया आडनांव पुरुखु । एऱ्हवी स्त्री ना नपुंसकु । किंबहुना एकु । निश्चयो नाही ॥*
*तो अचक्षु अश्रवणु । अहस्तु अचरणु । रूप ना वर्णु । नाम आथी ॥*
*अर्जुना कांहीची जेथ नाही । तो प्रकृतिचा भर्ता पाही ।*
*की भोगणे ऐसयाही । सुखदुःखाचे ॥*
*तो तरी अकर्ता । उदासु अभोक्ता । परि इया पतिव्रता । भोगविजे ॥*

*(१३.९८१ ते ९८५ ज्ञानेश्वरी).*

*या देहाची हे दशा। आणि आत्मा तो एथ ऐसा।*
*पै नित्य सिद्ध आपैसा। अनादिपणे॥*
*सकळु ना निष्कळु। अक्रिया ना क्रियाशिळु। कृश ना स्थुळु। निर्गुणपणे॥*
*आभासु ना निराभासु। प्रकाशु ना अप्रकाशु। अल्प ना बहुवसु। अरूपपणे॥*
*रिता ना भरितु। रहितु ना सहितु। मूर्तु ना अमूर्तु। शुन्यपणे॥*
*आनंदु ना निरानंदु। एकु ना विविधु। मुक्त ना बद्धु। आत्मपणे॥*
*येतुला ना तेतुला। आइता ना रचिला। बोलता ना उगला। अलक्षपणे॥*
*सृष्टीचा होणा न रचे। सर्व संहारे न वेचे। आथी नाथी यां दोहीचे। पंचत्व तो॥*
*मवे ना चर्चे। वाढे ना खाचे। विटे ना वेचे। अव्ययपणे॥*
*एवं रूप पै आत्मा। देही जे म्हणती प्रियोत्तमा। ते मठाकारे व्योमा। नाम जैसे॥*
*तैसे तयाचिये अनुस्युती। होती जाती देहाकृति। तो घे ना सांडी सुमति। जैसा तैसा॥*
*अहोरात्री जैसी। येती जाती आकाशी। आत्मसत्ते तैसी। देहे जाण॥*
*म्हणोनि इये शरीरी। कांही करवी ना करी। आयताही व्यापारी। सज्जु नव्हे॥*
*यालागी स्वरूपे। उणापुरा न घेपे। हे असो तो न लिंपे। देही देहा॥*
*अगा आकाश के नाही। हे न रिघेचि कवणे ठायी। परि कायिसेनि कही। गादिजेना॥*
*तैसा सर्वत्र सर्व देही। आत्मा असतुचि असे पाही। परी संगदोषे एकेही। लिप्त नोहे॥*
*पुढत पुढती येथे। हेचि लक्षण निरुते। जे जाणावे क्षेत्रज्ञाते। क्षेत्रविहिना॥*
*संसर्गे चेष्टिजे लोहे। परि लोह भ्रामकु नोहे। क्षेत्रक्षेत्रज्ञा आहे। तेतुला पाडु॥*
*दीपकाच्या अर्ची। राहाटी वाहे घरीची। परि वेगळीक कोडीची। दीपा आणि घरा॥*
*पै काष्ठाच्या पोटी। वन्हि असे किरीटी। परि काष्ठ नोहे या दृष्टी। पाहिजे हा॥*
*अपाडु नभा आभाळा। रवि आणि मृगजळा। तैसाचि हाही डोळा। देखसी जरी॥*
*हे आघवेचि असो एकू। गगनौनि जैसा अर्कु। प्रगटवी लोकु। नावे नांवे॥*
*एथ क्षेत्रज्ञु तो ऐसा। प्रकाशकु क्षेत्राभासा। यावरुते हे न पुंसा। शंका नेघा॥*

*(१३.११०७ ते ११२८ ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – परमेश्वर निर्गुण, निराकार असला, तरी त्याच्या कार्यावरूनसुद्धा त्याचे वर्णन करणे शक्य होते. जसा एखादा मनुष्य किती ताकदवान आहे हे कळून घ्यावयाचे असेल तर तो किती वजन उचलतो यावरून त्याची शक्ती कळते किंवा एखाद्याचा पळण्याचा वेग किती आहे हे जाणून घ्यावयाचे असेल तर अंतर आणि वेळ यांचे प्रमाण लक्षात घेतले की खात्री करता येते, कारण शक्ती आणि वेग ही निर्गुण,

निराकार आहेत. त्याप्रमाणे परमेश्वर हा निर्गुण असला, तरी त्याच्या कार्यावरून त्याचे स्वरूप स्पष्ट करता येण्यासारखे आहे. तेव्हा त्याचा आधार घेऊन संत ज्ञानेश्वर वर्णन करतात. 'ज्याला अंग नाही, जो पांगळा आहे आणि जो सर्वांत वृद्ध असा आहे, त्याचे आडनाव पुरुष आहे. आडनाव म्हणजे ज्या नावाच्या आडून डोकावले असता एक तर त्याचा व्यवसाय कळावा किंवा गावाचे, प्रांताचे नाव समजावे. तसे पुरुष हे आडनाव म्हणजे हा सत्ताधारी आहे, हुकमत गाजवणारा आहे. प्रकृतीच्या ठिकाणी बीजारोपण करून विश्वाचा पसारा वाढवणारा म्हणूनही हा पुरुष आहे. पण काही वेळा त्या आडनावाचा आणि व्यक्तीच्या कर्तेपणाचा काहीच संबंध नसतो. आडनाव सहस्त्रबुद्धे आणि प्रत्यक्षात बुद्धीचा पत्ताच नाही. आडनाव काळे आणि रंग गोरा किंवा उलट अशी कितीतरी उदाहरणे देण्यात येतील. या उदाहरणातसुद्धा हा 'पुरुष' बसतो. कारण त्याला जर खरेच रंग, रूप, आकार नाही तर तो हे सर्व काही करतो असेसुद्धा कसे म्हणता येईल? म्हणून पुढे म्हटले आहे की, हा स्त्री वा नपुंसक काय आहे हेही ठरवता येत नाही. त्याला कोणतेच अवयव नाहीत. तो स्वत: अभोक्ता, उदास असूनही सर्वांना सुखदु:ख भोगावयास लावतो व या सृष्टीची गती कायम ठेवण्यास भाग पाडतो. असा परमेश्वर आत्मरूपाने सर्वांच्या ठिकाणी असल्यामुळे परमेश्वराविषयी काहीच निर्णय पक्का होऊ शकत नाही. असे याचे वर्णन करताना परस्परविरोधी विशेषणे देऊनही कोणताही एक निर्णय होऊ शकत नाही. कारण सर्व काही तोच आहे. पण प्रकृतीमध्ये जे गुणदोष आहेत, त्यांच्या कोणामध्येही तो अडकत नाही. त्यांचा मेळ त्याला लागत नाही. हे परमेश्वराचे वैशिष्ट्य आहे. चुंबक आणि लोखंड, घर आणि दिवा, सूर्य आणि मृगजळ यांचा ज्या पद्धतीने संबंध आहे तसा साक्षीरूपाने परमेश्वराचा संबंध या सृष्टीशी आहे, पुरुषाचा प्रकृतीशी आहे. क्षेत्रज्ञाचा क्षेत्राशी आहे. कारण शब्द जरी वेगळे असले तरी अर्थ एकच आहे.

*जो नाइकिजता नादु । जो असौरभ्य मकरंदु । जो आंगाथिला आनंदु । सुरतेविण ॥*
*जया जे आन्हा परौते । जया जे पुढे मागौते । दिसतेनविण दिसते । अदृश्य जे ॥*
*उपाधीचा दुसरा । घालितां वोपांसिरा । नामरूपाचा संसारा । होय जयाते ॥*
*ज्ञातृज्ञेयाविहीन । नुसधेचि जे ज्ञान । सुखा भरले गगन । गाळीव जे ॥*
*जे कार्य ना कारण । जया दुजे ना एकपण । आपणया जे जाण । आपणचि ॥*
*ऐसे वस्तु जे साचे । ते ऊर्ध्व गा यया तरूचे । तेथ आर घेणे मुळाचे । ते ऐसे असे ॥*

*(१५.७४ ते ७९ ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – परमेश्वर हे एक कोडे आहे. त्यामुळे त्याचे वर्णनही कोड्यातच केले जाते. आकारावाचून असणे हे जसे अवघड, तसे न ऐकू येणारा नाद हासुद्धा अवघडच प्रकार आहे. पण ऐकून येणाऱ्या नादाला 'अनाहत नाद' म्हणतात आणि तो नाद गाढ समाधीत साधकाला ऐकू येतो. म्हणजे या अशा जरी काही विचित्र गोष्टी असल्या, तरी त्याचा अनुभव घेणारी कोणीतरी म्हणजेच संत मंडळी तरी आहेत आणि म्हणूनच त्यांनी हे वर्णन करून ठेवले आहे. त्याचप्रमाणे नाकाला न येणारा मकरंदाचा वास, डोळ्यांना न दिसणारे रूप, ज्ञाता, ज्ञेय यांवाचून ज्ञान, जे आहेही व नाहीही. जे द्वैत नाही आणि अद्वैतही नाही. ते मागे आहे तसे पुढेही आहे. तसे सर्व दिशांना आहे. अशा वर्णनातून एकच गोष्ट सिद्ध होते की, कोणत्याही शब्दार्थामध्ये, शब्दाच्या सापेक्षतेमध्ये ते सापडत नाही आणि ते स्वरूप पुढचे, त्याही पलीकडचे आहे.

*मग इदंतेसि वाळले । जे मीपणेवीण डाहारले । ते रूप पाहिजे आपुले । आपणचि ॥ परि दर्पणाचेनि आधारे । एकचि करून दुसरे । मुख पाहाती गव्हारे । तैसे नको हो ॥ हे पाहाणे ऐसे असे वीरा । जैसा न बोडलिया विहिरा । मग आपुलिया उगमी झरा । भरोनि ठाके ॥ ना तरि आटलिया अंभ । निजबिंबी प्रतिबिंब । निहटे कां नभी नभ । घटाभावी ॥ ना ना इंधनांशु सरलेया । वन्हि परते जेवि आपणपयां । तैसे आपेआप धनंजया । न्याहळणे जे गा ॥ जिव्हे आपुली चवी चाखणे । चक्षू निज बुबुळ देखणे । आहे तया ऐसे निरिक्षणे । आपुले पै ॥ कां प्रभेसि प्रभा मिळे । गगन गगनावरी लोळे । नाना पाणी भरले खोळे । पाणियाचिये ॥ आपणेचि आपणयाते । पाहिजे जे अद्वैते । ते ऐसे होय निरुते । बोलिजतु असे ॥ जे पाहिजतेनवीण पाहिजे । काही नेणणाचि जाणिजे । आद्यपुरुष का म्हणिजे । जया ठायाते ॥*

*(१५.२६७ ते २७५ ज्ञानेश्वरी).*

परमेश्वराचा 'हा', 'असा' वगैरे कोणत्याही प्रकारे निर्देश करून सिद्ध करणे, त्याचे वर्णन करणे अवघड आहे, नव्हे शक्यच नाही. आपण आपली ओळख करून देताना केवळ नाव सांगत नाही तर आपले शिक्षण, व्यवसाय, घरदार, बायको, मुले, व्यवसायातील हुद्दा, समाजातील प्रतिष्ठा वगैरे अशा अनेक 'मी पणा'च्या उपाध्या लांबवून ओळख करून देतो. या उपाध्यांनी आपला 'मीपणाच' जाहीर करत असतो, पण परमेश्वराने हा सर्व विश्वाचा पसारा उभा करूनही त्याच्या 'मीपणाचे' कोठेच नाव येत नाही. परमेश्वराचे अरूपातून रूप, अनामातून नामाचा जो पसारा उभा आहे तेच त्याचे रूप आणि नाम होय. याला सहज स्थिती म्हणतात. जसे विहीर तर खणली

नाही पण त्या जमिनीखालील पाण्याचा झरा तर वाहातच असतो किंवा पावसाळ्यात साचलेल्या डबक्यातील पाणी आटून गेले आहे त्यामुळे पाण्याच्या कारणाने निर्माण झालेले प्रतिबिंब पुन्हा बिंबामध्ये मिळून गेले आहे. या ठिकाणी प्रतिबिंब पडल्यामुळे बिंबात काहीच कमी झाले नव्हते आणि नंतर प्रतिबिंब बिंबात मिळून गेल्याने त्या बिंबात काही वाढ झाली असेही झाले नाही. ही जशी बिंबाची सहज स्थिती तशी इंधनाच्या आधारे पेटलेल्या अग्नीच्या ज्वाला इंधन संपल्यावर आपोआप विरून जाणे ही अग्नीची सहजावस्था होय. डोळ्यानेच डोळा पाहावा, जिभेनेच स्वत:ची चव पाहावी, पाण्याच्या पिशवीतच पाणी भरावे. एकूण ज्या ठिकाणी अशी सहजावस्था असते, द्वैताला सारून जे अद्वैत असते ते परमेश्वराचे रूप असते.

*पै दीपाचिया बंबाळी । कां चंद्र हन जे उजळी । हे काय बोलो अंशुमाळी । प्रकाशी जे ॥*
*ते अवघेचि दिसणे । जयाचे का न देखणे । विश्व भासतसे जेणे । लपालेनि ॥*
*जैसे शिंपीपण हारपे । तंव तंव खरे होय रूपे । कां दोरी लोपतां सापे । फार होईजे ॥*
*तैसी चंद्रसूर्यादि थोरे । इये तेजे जिये फारे । तिये जयाचेनि आधारे । प्रकाशती ॥*
*ते वस्तु की तेजोराशी । सर्व भूतात्मक सरिसी । चंद्रसूर्याच्या मानसी । प्रकाशी जे ॥*
*म्हणौनि चंद्रसूर्य कडवसा । पडती वस्तुच्या प्रकाशा । यालागी तेज जे तेजसा ।*
*ते वस्तुंचे आंग ॥ आणि जया प्रकाशी । जग हारपे चंद्रार्केसी । सचंद्र नक्षत्रे जैसी ।*
*दिनोदयी ॥ ना तरी प्रबोधलिये वेळे । ते स्वप्नीची डिडिंमा मावळे । कां नुरेचि सांजवेळे ।*
*मृगतृष्णिका ॥ तैसा जिये वस्तुच्या ठायी । कोण्हीच कां आभासु नाही ।*
*ते माझे निजधाम पाही । पाटाचे गा ॥ पुढती जे तेथ गेले । ते न घेतीचि माघौती पाऊले ।*
*महोदधी कां मिनले । स्रोत जैसे ॥ कां लवणाची कुंजरी । सुदलिया लवण सागरी ।*
*होयचि ना माघारी । परती जैसी ॥ नाना गेलिया अंतराळा । न येतिचि वह्निज्वाळा ।*
*नाही तप्त लोहौनि जळा । निघणे जेवी ॥ तेवि मजसी एकवाट । जे जाले ज्ञाने चोखट ।*
*तया पुनरावृत्तीची वाट । मोडली गा ॥*

*(१५.३०८ ते ३२० ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – परमेश्वराची अनुभूती घेण्यासाठी आणखी काही खुणा संत ज्ञानदेवांनी वर्णन केल्या आहेत. या खुणा खास आहेत, की ज्या जाणवल्यावर खात्रीच पटून जाईल, की हे परमेश्वराचेच रूप आहे म्हणून. सर्वच वस्तू या सूर्यप्रकाशात वा चंद्रप्रकाशात वा दिव्याच्या प्रकाशात दिसतात. ज्या स्थूल वस्तू आहेत त्या दिसतात. पण ज्या स्थूल नाहीत त्या भासतात. 'भासणे' ही प्रक्रिया मनाच्या, बुद्धीच्या स्तरावर

होते. या विश्वाचा भास होतो, पण परमेश्वर स्वत: लपून हा भास करवून देतो. दिव्याचे दिवेपण व चंद्रसूर्याच्या प्रकाशाचे सामर्थ्यही त्याचेच आहे. (परमेश्वराच्या तेजाविषयी पुढील 'जीवन्मुक्त' प्रकरणात 'तेजोवलय' या शीर्षकाखाली येईल.) ज्याप्रमाणे संध्याकाळ होताच मृगजळाचा लोप होतो किंवा जागृती आली की स्वप्नातील सर्व प्रसंग लोप पावतात. त्याप्रमाणे परमेश्वराच्या स्वरूपाचे ज्ञान होताच प्रकृतीचा हा पसारा आटू लागतो. केवळ सौम्य तेजाचे परमेश्वरी स्वरूप प्रकट होते. तेच परमेश्वराचे खरे स्थान आहे, खरे घर आहे. त्या ठिकाणी जे साक्षात्कारी संत जातात त्यांना पुन्हा जन्म-मरण नाही. ते माघारी येतच नाहीत. हा दृष्टान्त देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'ज्याप्रमाणे मिठाची बाहुली सागराची खोली मोजण्यास गेली असता ती त्यातच विरघळून जाते, ती परत येतच नाही किंवा अग्नीच्या ज्वाळा या जशा अंतराळात विरून जातात, त्या परत येत नाहीत; तसे ज्यांना परमेश्वररूप प्राप्त झाले ते परत जन्म-मरण फेऱ्यात सापडत नाहीत.

क्षराक्षराहून वेगळा असलेल्या उत्तम पुरुषाचे वर्णन संत ज्ञानदेवांनी केले आहे.

*'आता अन्यथा ज्ञानी । या दोनी अवस्था जया जनी । तया हरपती घनी । अज्ञानत्वी ॥ ते अज्ञान ज्ञानी बुडालिया । ज्ञाने कीर्तिमुखत्व केलिया । जैसा वन्हि काष्ठ जाळूनिया । स्वये जळे ॥ तैसे अज्ञान ज्ञाने नेले । आपण वस्तु देऊनि गेले । ऐसे जाणणेनिविण उरले । जाणते जे ॥ ते तो गा उत्तम पुरुषु । जो तृतीय कां निष्कर्षु । दोहीहून आणिकु । मागिला जो ॥ सुषुप्ति आणि स्वप्ना । पासुनि बहुवे अर्जुना । जागणे जैसे आना । बोधाचेचि ॥ का रश्मी हन मृगजळा । पासूनि अर्कमंडळा । अफाटु तेवि वेगळा । उत्तमु गा ॥ हे ना काष्ठाचा काष्ठाहुनी । अनारिसा जैसा वन्हि । तैसा क्षराक्षरापासुनी । आनचि तो ॥ पै ग्रासुनी आपुली मर्यादा । एक करीत नदीनदां । उठी कल्पांती उदावादा । एकार्णवाचा ॥ तैसे स्वप्न ना सुषुप्ति । ना जागराची गोठी आथी । जैसी गिळिली दिवोराती । प्रलयतेजे ॥ मग एकपण ना दुजे । असे नाही हे जेणिजे । अनुभवु निर्बुजे । बुडाला जेथ ॥ ऐसे आथि जे कांही । ते तो उत्तम पुरुष पाही । जे परमात्मा इही । बोलिजे नामी ॥ तेही एथ न मिसळतां । बोलणे जीवत्वें पांडुसुतां । जैसी बुडणेयाची वार्ता । थडियेचा कीजे ॥ तैसे विवेकाचिया कांठी । उभे ठाकलिया किरीटी । परावराचिया गोठी । करणे वेदां ॥ म्हणोनि पुरुष क्षराक्षरु । दोन्ही देखोनि अवरु । याते म्हणती परुं । आत्मरूप ॥ अर्जुना ऐसिया परी । परमात्मा शब्दवरी ।*

सूचिगे गा अवधारी । पुरुषोत्तमु ।। एऱ्हवी न बोलोनि बोलणे । जेथिचे सर्व नेणिवा जाणणे । कांहीच न होनि होणे । जे वस्तु गा ।। सोहं तेही अस्तावले । जेथ सांगतेचि सांगणे जाले । द्रष्ट्रत्वेसी गेले । दृश्य जेथ ।। आतां बिंबा आणि प्रतिबिंबा । माजी कैची हे म्हणोनये प्रभा । जऱ्ही कैसेनि हे लाभा । जायेचि ना ।। का घ्राणा फुला दोही । द्रुति असे जे माझारिला ठायी । ते न दिसे तरी नाही । ऐसे बोले नये ।। तैसे द्रष्टा दृश्य हे जाये । मग कोण म्हणे काय आहे । हेचि अनुभवे तेचि पाहे । रूप तया ।। जो प्रकाश्येवीण प्रकाशु । जो ईशितव्येवीण ईशु । आपणेनीचि अवकाशु । वसवीत असे जो ।। जो नादे ऐकिजता नादु । स्वादे चाखिजता स्वादु । जो भोगिजतसे आनंदु । आनंदेचि ।। जो पूर्णतेचा परिणामु । पुरुष गा पुरुषोत्तमु । विश्रांतीचाही विश्रामु । विराला जेथे ।। सुखासि सुख जोडले । जे तेज तेजासि सांपडले । शून्यहि बुडाले । महाशून्यी जिये ।। जो विकासाही वरी उरता । ग्रासातेही ग्रासुनि पुरता । जो बहुते पाडे बहुतां- । पासुनी बहु ।। पै नेणतया प्रती । रुपेपणाची प्रतीती । रूपे न होनि शुक्ति । दावी जेवी ।। का नाना अलंकारदशे । सोने न लपत लपाले असे । विश्व न होनियां तैसे । विश्व जो धरी ।। हे असो जलतरंगा । नाही सिनानेपण जेवि गा । तेवि दिसता प्रकाशु जगा । आपणचि जो ।। आपुलिया संकोचविकासा । आपणचि रूप वीरेशा । हा जळी चंद्रु हन जैसा । समग्रु गा ।। तैसा विश्वपणे कांही होये । विश्व लोपी कही न जाये । जैसा रात्री दिवसे नोहे । द्विधा रवि । तैसा कांहीचि कोणीकडे । कायिसेनिही वेची न पडे । जयाचे सांगडे । जयासिचि ।। जो आपणपेचि आपणया । प्रकाशितसे धनंजया । काय बहु बोलो जया । नाही दुजे ।। तो गा मी निरुपाधिकु । क्षराक्षरोत्तमु एकु । म्हणोनि म्हणे वेदेलोकु । पुरुषोत्तमु ।। परि हे असो ऐसिया । मज पुरुषोत्तमाते धनंजय ।। जाणे जो पाहलेया । ज्ञानमित्रे ।। चेइलिया आपुले ज्ञान । जैसे नाहीचि होय स्वप्न । तैसे स्फुरते त्रिभुवन । वावो जाले ।। कां हाती घेतलिया माळा । फिटे सर्पाभासाचा कांटाळा । तैसा माझेनि बोधे टवाळा । नागवे तो ।। लेणे सोनेचि जो जाणे । तो लेणेपण ते वावो म्हणे । तेवि मी जाणोनि जेणे । वाळिला भेदु ।। मग म्हणे सर्वत्र सच्चिदानंदु । मीचि एकु स्वत:सिद्धु । जो आपणेनसी भेदु । नेणोनियां जाणे ।। नेणेचि सर्व जाणितले । हेही म्हणणे थेकुले । जे तया सर्व उरले । द्वैत नाही ।। म्हणोनि माझिया भजना । उचितु तोचि अर्जुना । गगन जैसे अलिंगना । गगनाचिया ।। क्षीरसागरा परगुणे । कीजे क्षीरसागरपणे । अमृतचि होऊनि मिळणे । अमृती जेवि ।। साडेपंधरा मिसळावे । तै साडेपंधरेचि होआवे । तेवि मी जालिया संभवे । माझी भक्ती ।। हा गा सिंधुसि आनी होती । तरि गंगा कैसेनि मिळती । म्हणोनि मी न होता भक्ति । अन्वयो आहे ।।

*ऐसियालागी सर्व प्रकारी । जैसा कल्लोळु अनन्युसागरी । तैसा माते अवधारी । भजिन्नला जो ।। सूर्या आणि प्रभे । एकवंकी जेणे लोभे । तो पाडु मानू लाभे । भजना तया ।।*

*(१५.५२६ ते ५७० ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – सर्वसाधारणपणे सर्व वस्तू या तीन अवस्थांमधून जात असतात. बी-रोप-झाड, पान-फूल-फळ, बाळ-तरुण-वृद्ध, सकाळ-मध्यान्ह-सायंकाळ, ज्ञेय-ज्ञाता-ज्ञान अशा अनेक त्रिपुट्या आहेत. तसा परमेश्वरसुद्धा तीन रूपांत आहे. क्षर-अक्षर-पुरुषोत्तम, जीव-शिव-परमात्मा या परमेश्वराच्या तीन अवस्थांचे वर्णन संत ज्ञानेश्वरांनी केले आहे. क्षर-अक्षर किंवा जीव-शिव या दोन अवस्था केवळ अज्ञानाने जाणवतात. जेव्हा हे अज्ञान ज्ञानामध्ये बुडून जाईल, तेव्हा अंधार कापत जसा सूर्य उगवतो तसा परमेश्वराचा साक्षात्कार होतो. हाच पुरुषोत्तम होय. स्वप्न आणि सुषुप्ती मावळून ज्ञानपूर्ण जाग यावी, सूर्यकिरण आणि मृगजळ यांचा लोप होऊन केवळ संध्याकाळचे सूर्यमंडळ दिसावे. काष्ठ आणि अग्नी याहून अग्नीचे अग्नीपण असावे. नदी आणि समुद्र हा भेद जेव्हा कल्पांतीचा महार्णव बुझवून टाकतो व सगळे एकच करून टाकतो, तसा क्षराक्षराहून वेगळा असा पुरुषोत्तम, परमात्मा आहे. भगवंत अर्जुनाला जे सांगत होते तेच संत ज्ञानेश्वर स्पष्ट करून सांगत आहेत. परमेश्वराचे वर्णन कसे आहे, तर नदीच्या काठी उभे राहून बुडण्याविषयीच्या गप्पा मारणे, तसे वेद विवेकाच्या काठावर उभे राहूनच परमेश्वराविषयीच्या गप्पा मारत असतात. कारण विवेकाने, तर्काने परमेश्वराचे स्वरूप कधीच कळून यावयाचे नाही. म्हणून क्षराक्षराच्या पलीकडे जे आहे तेच पुरुषोत्तमाचे स्वरूप आहे. जेव्हा असा साक्षात्कार होतो, त्या वेळी सर्व त्रिपुटी मावळून जातात. तेथे ज्ञाता व ज्ञेय एकरूप असल्याने ज्ञानाची प्रक्रिया घडत नाही. बिंब-प्रतिबिंब एकरूप झाल्याने त्यात कोणत्या प्रभेचा दुवा असणार आहे? नाक आणि फूल यांच्यामधील सुवास दिसत नसला तरी तो नाही असा अर्थ होत नाही कारण तेथे त्याचा अनुभव घेणारा असतो; पण जेव्हा नाकच फूल होईल तेव्हा वास घेण्याची क्रिया होणारच नाही. अशा अनेक दृष्टान्तांनी परमेश्वराची सिद्धी केली आहे. शेवटी संत ज्ञानेश्वर म्हणतात, ज्याप्रमाणे दिवस व रात्र या कारणाने सूर्यामध्ये काहीच फरक पडत नाही किंवा विश्वाच्या अस्तित्वात आणि विश्वप्रलयात परमेश्वरी तत्त्वात काहीच फरक पडत नाही असा हा निरुपाधिक क्षर, अक्षर व उत्तम हे सर्व पुरुष एकरूपच आहेत. या उत्तम पुरुषालाच वेद पुरुषोत्तम म्हणतात.

अशा पुरुषोत्तमाचा अपरोक्ष साक्षात्कार झाल्यावर त्या ज्ञानी पुरुषाला हा सर्व विश्वपसारा खोटा, नगण्य वाटतो. असा शुद्ध निरुपाधिक झालेला पुरुषच परमेश्वराशी, परब्रह्माशी ऐक्य पावतो. जेथे गेले असता परत येणे नाही, त्या परम धामाला जातो.

कठोपनिषदामध्ये यमराज नचिकेताला परमेश्वराचे वर्णन करून सांगत आहेत-

*एको वशी सर्वभूतांतरात्मा एकं रूपं बहुधा यः करोति ।*
*तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीराः तेषां सुखं शाश्वतं नेतरेषाम् ॥*

अर्थ – जो एक सर्वांना वश करणारा सर्व भूतांतरात्मा, एका रूपाला बहुविध करतो, त्या हृदयस्थ आत्म्याला जे धीर पुरुष (सतत) पाहतात, त्यांना शाश्वत सुख मिळते; इतरांना नाही.

*नित्यो नित्यानां चेतनःश् चेतनानां एको बहूनां यो विदधाति कामान् ।*
*तमात्मस्थं येऽनुपश्यन्ति धीराः तेषां शांतिः शाश्वती नेतरेषाम् ॥*

अर्थ – जो नित्यातील परमनित्य आहे, चेतनातील परमचेतन आहे, जो एक अनेकांच्या कामना पूर्ण करतो, त्या हृदयस्थ आत्म्याला जे धीर पुरुष सतत पाहतात, त्यांना शाश्वत शांती प्राप्त होत; इतरांना नाही.

समर्थ रामदासांनीही दासबोधात पुरुषोत्तमाचे वर्णन केले आहे. ते म्हणतात,

*'तो कळतो परी दिसेना । प्रचित येतो परी भासेना । शरीर असे परी वसेना । येके ठाई ॥ कित्येक दृष्टीने देखे । किती येक रसनेने चाखे । किती येक ते वोळखे । मने करुनी ॥ श्रोती बैसोन शब्द ऐकतो । घ्राणेंद्रिये वास घेतो । त्वचे इंद्रिये जाणतो । सीतोष्णादिक ॥ ऐशा जाणे अंतर्कळा । सकळामध्ये परी निराळा । पाहता त्याची अगाध लीला । तोचि जाणे ॥ तो पुरुष ना सुंदरी । बाळ तरुण ना कुमारी । नपुंसकाचा देहधारी । परी नपुंसक नव्हे ॥ तो चाळवी सकळ देहासी । करुनी अकर्ता म्हणती त्यासी । तो क्षेत्रज्ञक्षेत्रवासी । देही कूटस्थ बोलीजे ॥ दोनी पुरुष लोकी असती । क्षराक्षर बोलिजती । सर्व भूते क्षर म्हणती । अक्षर कूटस्थ बोलीजे ॥ उत्तम पुरुष तो आणीक । निःप्रपंच निःकलंक । निरंजन परमात्मा येक । निर्विकारी ॥*

*(दशक १०, समास १०, दासबोध).*

*येकला चि नाना देहेधारी । येकलाचि नटे परोपरी । नटनाट्यकळा कुसरी । त्याविण नाही ॥ येकलाचि जाला बहुरूपी । बहुरूपी बहुसाक्षेपी । बहुरूपे बहुप्रतापी ।*

*आणि लंडी ।। येकलाचि विस्तारला कैसा । पाहे बहुविध तमासा । दंपत्येविण कैसा । विस्तारला ।।*

*(दशक १६, समास ७, दासबोध).*

## दशांगुलम्

*सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात् ।*
*स भूमिं विश्वतो वृत्वा ऽ त्यतिष्ठद्दशाङ्गुलम् ।।४।।*

*(पुरुषसूक्त).*

अनंत (हजार म्हणजे हजारो-अनंत) मस्तके, अनंत नेत्रे, अनंत पाद (वगैरे) यांनी युक्त असलेला परमेश्वर या विश्वाला व्यापून (पुन्हा) दहा अंगुळे उरून राहिला आहे. (दहा = जास्त)

ऋग्वेदामध्ये परमेश्वराच्या विराट स्वरूपाचे वर्णन आले आहे. परमेश्वराच्या भव्यतेची, व्यापकतेची जेवढी आपण कल्पना करू त्यापेक्षा ते स्वरूप आणखीनच जास्त आहे असे 'दशाङ्गुलम्' या प्रमाणावरून वाटते. पूर्वीच्या ऋषी नारायण यांनी या पुरुषसूक्ताची रचना केली. त्यांनाही त्या विराट पुरुषाचे आकलन पूर्णपणे होऊ शकले नसेल म्हणूनच त्यांनीही 'दशाङ्गुलम्' हा शब्द घालून या वर्णनाला पूर्णविराम दिला असेल. सागरातील पाण्याचा थेंब कधीही सागराची व्याप्ती जाणू शकणार नाही. ज्याप्रमाणे शितावरून भाताची परीक्षा होते, त्याप्रमाणे सागराच्या ठिकाणी असलेले गुणधर्म सागराच्या पाण्याच्या थेंबात असतील पण थेंब काही सागर होऊ शकत नाही. त्याप्रमाणे मनुष्याच्या ठिकाणी जरी देवत्वाचा अंश असला, तरी मानव काही परमेश्वराची व्याप्ती कधीही पूर्णपणे जाणून घेऊ शकणार नाही, असेच 'दशाङ्गुलम्' या वर्णनावरून दिसते. भगवंतांनी भगवद्गीतेत परब्रह्म स्वरूपाचे, विश्वरूपाचे स्वतःच वर्णन केले आहे.

परब्रह्माच्या ठिकाणी 'एकोऽहम् बहुस्याम् ।' हा संकल्प झाला. आणि सर्व सृष्टी त्याने उत्पन्न केली. या उत्पन्न केलेल्या सृष्टीचा उपभोग घेणार तरी कोण? म्हणून भगवंतच भोक्ता रूपाने अवतीर्ण झाले. सृष्टीचा विस्तारही प्रचंड झाला. एका मुखाने भगवंत खाऊन किती खाणार, उपभोगणार, दोन नेत्रांनी किती पाहून पाहणार व त्याचा आनंद घेणार, दोन पायांनी चालून किती चालणार व सृष्टीचे निरीक्षण करणार? म्हणून अनंत रूपांनी परमेश्वर अवतरला व या सृष्टीचा उपभोग घेऊ लागला. म्हणून

'सहस्रशीर्षा, सहस्राक्षः, सहस्रपाद,' परमेश्वर झाला. गीतेत भगवंत त्याचेच वर्णन करताना म्हणतात–

*पश्य मे पार्थ रूपाणि शतशोऽथ सहस्रशः ।*
*नानाविधानि दिव्यानि नानावर्णाकृतीनि च ॥*

*पश्यादित्यान्वसून्रूद्रान् अश्विनौ मरुतस्तथा ।*
*बहून्यदृष्टपूर्वाणि पश्याश्चर्याणि भारत ॥*

*इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम् ।*
*मम देहे गुडाकेश यच्चान्यद् द्रष्टुमिच्छसि ॥*

*(११.५ ते ७ भ. गी.).*

अर्थ – भगवान म्हणाले, अर्जुना! माझी अनेक प्रकारची, अनेक रंगांची व अनेक आकारांची शेकडो किंवा हजारो (असंख्य) दिव्य रूपे पाहा. अदितीपुत्र (इंद्रादी देव), (आठ) वसु, (अकरा) रुद्र, (दोन) अश्विनीकुमार, (एकूणपन्नास) मरुत्संज्ञक देव पाहा. अर्जुना! आजपर्यंत न दिसलेली आश्चर्यकारक अशी आणखी पुष्कळ (रूपे) पाहा. अर्जुना! येथे या माझ्या (विश्वरूप) देहामध्ये स्थावर जंगमासह संपूर्ण जग आज (आता) एकत्र झालेले पाहा आणि दुसरे जे काही तुला पाहावयाची इच्छा असेल (तेही पाहा.)

भगवंतांनी विश्वरूपात काय काय दिसेल याचे वर्णन केले आहे, पण शेवटच्या वाक्याला विशेष महत्त्व आहे. ते वाक्य म्हणजे 'यत् अन्यत् द्रष्टुम् इच्छसि ।' आणि जे काही दुसरे तुला पाहण्याची इच्छा असेल, छांदोग्य उपनिषदात म्हटले आहे की 'संकल्पादेव तु!'- 'संकल्प करताक्षणीच'. संकल्पात सृष्टी असते. म्हणून भगवंत म्हणतात– 'आणि तुझ्या मनात जे पाहण्याचा संकल्प असेल तेही पाहा'.

या सृष्टीमध्ये जी जी रूपे दिसतात, ती सर्व परमेश्वराचीच रूपे आहेत आणि अर्जुनापुढे भगवंतांनी जे विश्वरूप उभे केले, तेही संजयाने वर्णन केले आहे. संजय म्हणतो–

*अनेकवक्त्रनयनम् अनेकाद्भुतदर्शनम् ।*
*अनेकदिव्याभरणं दिव्यानेकोद्यतायुधम् ॥*

*दिव्यमाल्याम्बरधरं दिव्यगन्धानुलेपनम् ।*
*सर्वाश्चर्यमयं देवम् अनन्तं विश्वतोमुखम् ।।*

*दिवि सूर्यसहस्रस्य भवेद्युगपदुत्थित ।*
*यदि भाः सदृशी सा स्याद् भासस्तस्य महात्मनः ।।*

*तत्रैकस्थं जगत्कृत्स्नं प्रविभक्तमनेकधा ।*
*अपश्यद्देवदेवस्य शरीरे पाण्डवस्तदा ।।*

*(११. श्लोक १० ते १३ भ. गी.).*

अर्थ – ज्याला असंख्य मुखे व डोळे आहेत, ज्यामध्ये अनेक आश्चर्योपादक गोष्टी दिसत आहेत, ज्यावर असंख्य दिव्य अलंकार आहेत, (ज्याच्या हातात) अनेक दिव्य शस्त्रास्त्रे सज्ज आहेत, ज्याने दिव्य पुष्पहार व दिव्य वस्त्रे धारण केली आहेत, ज्याने दिव्य सुवासिक उटी लावली आहे, अशा सर्व आश्चर्याने भरलेल्या अनंत, सर्व व्यापक परमेश्वराला (अर्जुन) पाहता झाला. आकाशात हजारो सूर्यांची प्रभा जर एकदम प्रगट झाली, तरी ती त्या परमेश्वराच्या प्रभेसारखी (थोडी थोडी) होईल. तेव्हा देवाधिदेवाच्या त्या (विश्वरूप) शरीरामध्ये हे अनेक भागांत विभागलेले संपूर्ण जग एकत्र झालेले अर्जुन पाहता झाला.

संजय विश्वरूप वर्णन करताना एक खास विशेषण वापरतो. ते म्हणजे ' दिव्य.' भगवंतांनी जे जे धारण केले होते ते उत्तमच नव्हे तर ' दिव्य' होते. अशी दिव्यता कोणत्याही इतर ठिकाणी प्रत्यायाला येणारी नव्हती. दिव्यत्व हाच परमेश्वराचा महत्त्वाचा श्रेष्ठ गुण आहे.

*'जन्म कर्म च मे दिव्यमेवं यो वेत्ति तत्त्वतः ।*

*(४.९ भ. गी.).*

परमेश्वराचा जन्म दिव्य व त्यातील कर्मेही दिव्य असतात. हे दिव्यत्व तत्त्वतः जाणणे हीच प्रत्येकाच्या जीवनाची इतिकर्तव्यता आहे, असे भगवंतांना वाटते. हीच दिव्यता जाणली असता जन्म-मरणाचा फेरा चुकला जातो. इतके ते महत्त्वाचे व श्रेष्ठ आहे. परमेश्वराचे स्वरूप चराचर सृष्टीमध्ये नेमके दिव्यत्वाने कोठे प्रत्ययाला येईल याविषयी भगवंतांनी गीतेच्या दहाव्या अध्यायात आपल्या दिव्य विभूती सांगताना वर्णन केले आहे. विश्वरूपाचे वर्णन करताना अर्जुन म्हणतो –

*'पश्यामि देवांस्तव देव देहे सर्वांस्तथा भूतविशेषसंघान्।*
*ब्रह्माणमीशं कमलासनस्थं ऋषींश्च सर्वानुरगांश्च दिव्यान्॥*

*अनेक बाहूदरवक्त्रनेत्रं पश्यामि त्वां सर्वतोऽनन्तरूपम्।*
*नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं पश्यामि विश्वेश्वर विश्वरूप॥*

*किरीटिनं गदिनं चक्रिणं च तेजोराशिं सर्वतो दीप्तिमन्तम्।*
*पश्यामि त्वां दुर्निरीक्ष्यं समन्तात् दीप्तानलार्कद्युतिमप्रमेयम्॥*

*त्वमक्षरं परमं वेदितव्यं त्वमस्य विश्वस्य परं निधानम्।*
*त्वमव्ययः शाश्वतधर्मगोप्ता सनातनस्त्वं पुरुषो मतो मे॥*

*अनादिमध्यान्तमनन्तवीर्यम् अनन्तबाहुं शशिसूर्यनेत्रम्।*
*पश्यामि त्वां दीप्तहुताशवक्त्रं स्वतेजसा विश्वमिदं तपन्तम्॥*

*द्यावापृथिव्योरिदमन्तरं हि व्याप्तं त्वयैकेन दिशश्च सर्वाः।*
*दृष्ट्वाऽद्भुतं रूपमुग्रं तवेदं लोकत्रयं प्रव्यथितं महात्मन्॥*

*(११.१५ ते २० भ. गी).*

अर्थ – अर्जुन म्हणाला, 'हे परमेश्वरा, तुझ्या (विराट) देहामध्ये सर्व देव, त्याचप्रमाणे निरनिराळ्या भूतमात्रांचे (प्राणिमात्रांचे) समुदाय, कमलासनावर बसलेला (सर्व सृष्टीचा) प्रभू हिरण्यगर्भ, सर्व ऋषी व देवलोकातील सर्प हे मी पाहात आहे आणि ज्याची चोहोकडे अनंत रूपे आहेत, असा तू मला दिसत आहेस. तुझा शेवटही दिसेना, मध्यही दिसेना व आरंभही दिसेना. तू किरीट, गदा, व (सुदर्शन) चक्र धारण करणारा, सर्व बाजूंनी प्रकाशमान, तेजाचा निधी, चोहोकडे प्रज्वलित असलेला अग्नी व सूर्य यांच्यासारखी कांती असलेला (व म्हणून) ज्याच्याकडे पाहवत नाही, असा अमर्याद दिसत आहेस. ज्ञेय असे श्रेष्ठ अविनाशी ब्रह्मतत्त्व तू आहेस, तूच या विश्वाचे मूळ आश्रयस्थान आहेस. तू अविनाशी असून सनातन धर्माचा संरक्षक आहेस आणि अनादी पुराणपुरुष तूच आहेस, अशी माझी खात्री झाली आहे. आदिमध्यावसानरहित, अनंतशक्ती, असंख्य बाहू असलेल्या, ज्याच्या नेत्रस्थानी चंद्रसूर्य आहेत, प्रज्वलित अग्नी ज्याच्या मुखाच्या स्थानी आहे व आपल्या तेजाने जो हे विश्व तप्त करीत आहे, असा तू मला दिसत आहेस. हे परमेश्वरा, पृथ्वी व आकाश यांच्यामधील हा सर्व अवकाश व सर्व दिशा तू एकट्यानेच व्यापून टाकल्या आहेस. म्हणून तुझे हे आश्चर्यकारक व उग्र रूप पाहून त्रैलोक्य भयभीत झाले आहे.

अर्जुनाने विश्वरूपाचे वर्णन केले आहे. त्यात एक विशिष्ट गोष्ट उल्लेखलेली आहे आणि ती म्हणजे 'नान्तं न मध्यं न पुनस्तवादिं न पश्यामि।' परमेश्वराचे स्वरूप इतके अमर्याद आहे, की त्याची सुरुवात, मध्य व अंत दिसत नाही. कारण ते कोणालाही ओळखता येणार नाही. संत ज्ञानदेव याचे वर्णन तसेच करतात. ते असे–

'परि तुझिया रूपाआंतु। जी उणीव एक असे देखतु। जे आदि मध्य अंतु। तीन्ही नाही॥' आणि खरोखरीच वर्तुळामध्ये सुरुवात, मध्य व अंत कसे दिसणार! कारण वर्तुळाच्या परिघावरील प्रत्येक बिंदू हा सुरुवात व शेवट होऊ शकतो. त्यामुळे वर्तुळाचा शेवट व सुरुवात कोणती हे खात्रीपूर्वक सांगता येत नाही. तसे या विश्वाचे स्वरूप आहे. मनुष्याचे आयुष्य इतके अल्प आहे की जेणे करून त्याला या विश्वाच्या उत्पत्ती, स्थिती, लय यांचा पत्ताही लागणार नाही. म्हणून परमेश्वराच्या आदी-अंताचा पत्ता कोणालाही लागणे शक्य नाही.

उत्पत्ती, स्थिती व लय या तीन अवस्था आहेत. एखाद्या उद्योगाचा संचालक ज्याप्रमाणे आपल्या कामाची विभागणी करून त्यावर अधिकारी नेमतो, त्याप्रमाणे या सृष्टीची रचना करताना परमेश्वराने उत्पत्तीचे कार्य ब्रह्मदेवाला दिले; तो रजोगुणी. स्थितीचे कार्य म्हणजे संगोपन, संरक्षण, शासन व्यवस्था ही विष्णूकडे दिली; तो सत्त्वगुणी. प्रलय, नाश, संहार हे कार्य महादेव, शंकर यांच्याकडे दिले; ते तमोगुणी. ही तिन्ही रूपे अर्थातच परमेश्वराचीच आहेत. त्यातील युद्धभूमीवर संहाराचे कार्य करणाऱ्या देवाला उद्देशून अर्जुनाने विचारणा केली आहे, की भगवंत! हे रूप कोणते? त्यावर परमेश्वर आपल्या 'काल' रूपाचे वर्णन करून सांगत आहेत-

*कालोऽस्मि लोकक्षयकृत्प्रवृद्धो लोकान्समाहर्तुमिह प्रवृत्तः।*
*ऋतेऽपि त्वां न भविष्यन्ति सर्वे येऽवस्थिताः प्रत्यनीकेषु योधाः॥*

*(११.३२ भ. गी.).*

अर्थ – मी लोकांचा क्षय करणारा जुनापुराणा असा काल आहे व लोकांचा संहार करण्याकरिता येथे प्रकट झालो आहे. येथे आज शत्रुसैन्यामध्ये जे योद्धे उभे आहेत, ते सर्व तुझ्यावाचूनदेखील नाहीसे होणार आहेत. (तू जरी त्यांना मारले नाहीस तरी ते मरणारच आहेत.)

मृत्यू हा अटळ आहे. मृत्यूला कोणीच जिंकू शकेल असे नाही. आत्तापर्यंत अनेक बलाढ्य राजे, वीर, पुरुष, साधू, संत वगैरे होऊन गेले. पण सगळेच काळाच्या

पडद्याआड गेले आहेत आणि खरोखरीच मृत्यू हा शाप म्हणण्यापेक्षा वरदानच आहे. असे एकूण परिस्थिती पाहता वाटते. कारण हेही परमेश्वराचे स्वरूप आहे. 'काल' म्हणजे केवळ मृत्यूच नव्हे तर 'काल' ही एक गती सुद्धा आहे. काल म्हणजे समय, वेळ. प्रत्येक वस्तूचा एक कालावधी ठरलेला असतो. कारण कोणतीही वस्तू जी उत्पन्न झाली, निर्माण झाली, जन्मास आली, तिला ठराविक कालावधी असतो नंतर तिचा नाश होतो, तिला मृत्यू आहे. आपणास वाटते की वस्तू वापरून खराब होते, म्हणून नाश पावते. तर तसे नव्हे, अगदी कापडाची नवी कोरी घडी तशीच ठेवली तर तीही ठराविक काळाने नाश पावतेच. वापरल्याने कदाचित लवकर खराब होईल, नाश होईल. पण कोणत्याही प्रकारचा वापर न केला तरी वस्तू नाश पावतातच. कारण हा कालाचाच महिमा आहे. म्हणजे कोणतीही वस्तू निर्माण झाली, जन्मास आली की तिची मृत्यूकडे, विनाशाकडे वाटचाल चालू होते. कोणी एक क्षण तर कोणी शेकडो वर्षे जगत असेल, कालावधी कितीही असो पण मृत्यू, विनाश टळत नाही, टाळता येत नाही हे निश्चित होय. म्हणून भगवंत म्हणतात, 'अर्जुना! यांना तू मारले नाहीस तरी ते मरणारच आहेत. हे निश्चित.'

सर्व सृष्टी हेच परमेश्वराचे रूप आहे. अनंत रूपांनी परमेश्वर अवतीर्ण झाला आहे. आणि विश्वरूप हेही त्या परमेश्वराचेच रूप आहे, की जे अर्जुनासाठी भगवंतांनी उभे केले व त्याला दिव्य दृष्टी देऊन पाहण्याचे सामर्थ्य दिले आहे. विश्वरूपात दिसणाऱ्या अनंत रूपांचे वर्णन अर्जुन करीत आहे.

*कस्माच्च ते न नमेरन्महात्मन् गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।*
*अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत्तत्परं यत् ॥*

*त्वमादिदेवः पुरुषः पुराणः त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।*
*वेत्ताऽसि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनन्तरूप ॥*

*वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।*
*नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥*

*नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।*
*अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥*

*(११.३७ ते ४० भ. गी.).*

अर्थ – हे महात्म्या! अत्यंत श्रेष्ठ व हिरण्यगर्भाचादेखील आदी कर्ता (जो तू) अशा तुला का बरे नमस्कार करणार नाहीत? (कारण) हे अनंता! देवाधिदेवा, जगन्निवासा, व्यक्त अव्यक्त व त्याहून पलीकडचे जे अविनाशी तत्त्व तेही तूच आहेस. तू आदिदेव, पुराणपुरुष आहेस. तूच या विश्वाचे श्रेष्ठ आश्रयस्थान आहेस. तूच ज्ञाता, ज्ञेय व परमपद (मोक्षपद) आहेस. हे अनंतरूपा, हे विश्व हा तुझाच विस्तार आहे. तूच वायू, यम, अग्नी, वरुण, चंद्र, हिरण्यगर्भ (आजा) व (त्यालाही उत्पन्न करणारा) पणजा आहेस. तुला हजारो वेळा नमस्कार असो आणि पुन:पुन्हा नमस्कार आसो. हे सर्वव्यापका, तुला पुढून नमस्कार असो, मागून नमस्कार असो, तुला सर्व बाजूंनी नमस्कार असो. तुझी शक्ती अपार आहे व तुझा पराक्रम अमर्याद आहे. सर्वांचे पर्यवसान तुझ्या ठिकाणीच होते म्हणून तूच सर्व काही आहेस.

संत ज्ञानदेवही परमेश्वराच्या व्यापकतेचे वर्णन करताना म्हणतात, 'जी काय एक तूं नव्हसी । कवणे ठायी नससी । हे असो जैसा आहासी । तैसिया नमो ।।' (११.५१९ ज्ञानेश्वरी). आणि म्हणून अर्जुनही परमेश्वराच्या विश्वरूपाला सतत नमस्कार करत आहे. तो पुढे, मागे, वर, खाली, दाही दिशांना नमस्कार करतो कारण परमेश्वर तर सगळीकडेच भरून राहिला आहे याची जाणीव अर्जुनाला विश्वरूप पाहून झाली होती. परमेश्वराच्या व्यापकतेचे वर्णन करताना अर्जुनाने एका गोष्टीचा आवर्जून उल्लेख केलेला दिसतो आणि तो म्हणजे या विश्वात जर काही जाणून घ्यावयाचे असेल, तर ते केवळ परमेश्वराचे तात्त्विक स्वरूपच होय. चराचराला परमेश्वराचे कोणत्या स्वरूपात अधिष्ठान आहे व ते या विनाशी सृष्टीत अविनाशी तत्त्व कोणते आहे ते जाणून घेणे महत्त्वाचे आहे, की जे जाणले असता सर्व काही जाणले जाते. हे जाणून घेणारा तरी कोण? कारण सगळीकडेच परमेश्वर भरून आहे. तोच जर अनंत रूपांनी अवतरला आहे, तर जाणून घेणारा म्हणून तरी वेगळा कोण असणार म्हणून अर्जुन म्हणतो– 'ज्ञाता'ही तूच आणि 'ज्ञेय'ही तूच आहेस. अशा या सर्वव्यापक परमेश्वराचे संत ज्ञानदेव एका समर्पक दृष्टान्ताने सुरेख वर्णन करतात. 'किंबहुना केवळ । सर्व हे तूचि निखिळ । परि क्षीरार्णवी कल्लोळ । पयाचे जैसे ।।' (११.५३५ ज्ञानेश्वरी).

ज्ञेय व ज्ञाता ही दोन्ही परमेश्वराचीच स्वरूपे आहेत. आपणही त्या परमेश्वराचीच रूपे आहोत. मग आपली अशी अवस्था का? कारण आपण आपल्या ईश्वरी स्वरूपाला विसरलो व देहभावाने स्वत:ची ओळख करू देऊ लागलो. उपाधीने, अहंकाराने स्वत:चे अस्तित्व इतरांपेक्षा वेगळे मानू लागलो आणि त्यामुळेच आपण सुखदु:खाच्या उपभोगाला कारण झालो आणि शेवटी या सुखदु:खाच्या, जन्ममरणाच्या फेऱ्यातून

सुटण्यासाठी आपणास पुन: आपले खरे स्वरूप काय आहे याची ओळख करून घेणे आवश्यक वाटू लागले आहे. परमेश्वराचे स्वरूप वारंवार का वर्णन करावे लागते कारण मोह-मायेचा पगडा एवढा जबरदस्त आहे की वाचून, ऐकून, पाहून, उपासना करून, अभ्यास करून, तप करूनही ती धारणा पूर्ण होऊ शकत नाही. मध्येच त्याला बाधा येते, अभ्यास राहून जातो. या मोह-मायेच्या पगड्याची एक कथा आठवते ती नमूद करावीशी वाटते.

एक मोठे ऋषी असतात. शेकडो वर्षे त्यांनी उग्र तपश्चर्या केलेली असते. त्यामुळे इंद्राचे आसन हलू लागते. ऋषीची तपश्चर्या भंग करण्यासाठी इंद्र एक अप्सरा पाठवतो. एका सायंकाळी नदीवरून येत असता ही अप्सरा ऋषीबरोबर आश्रमात येते. ऋषीला अप्सरेचा मोह पडतो. ऋषी तिच्या सहवासात, उपभोगात दिवस घालवत असतो. ऋषीचे तप:सामर्थ्य पूर्ण लयाला जाते. एका संध्याकाळी अप्सरेच्या सहवासात असताना त्या ऋषीला सायंसंध्येची आठवण होते. तो म्हणतो, 'हे प्रिये, माझ्या सायंसंध्येची वेळ झाली आहे. मला नदीवर जाऊन स्नान करून संध्या करावयास पाहिजे. माझ्या सायंसंध्येचा नियम कधी चुकला नाही.' असे म्हणून ऋषी नदीकडे निघाला असता ती अप्सरा म्हणते, 'मुने! आज तुम्हाला संध्येची आठवण झाली काय?' तो म्हणतो, 'अग, असे काय करतेस? मी रोजच नाही का संध्या करत. मग आजच आठवण झाली म्हणून काय म्हणतेस?' तेव्हा अप्सरा म्हणते, 'हे मुने! मला येथे येऊन शेकडो वर्षे होऊन गेली आहेत. आता माझे काम झाले आहे आणि मी आता परत जाते' असे म्हणून ती अप्सरा स्वर्गाच्या मार्गाने निघून गेली. ऋषी तोंडाचा 'आ' वासून तिच्याकडे पाहात कपाळावर हात मारून घेतो.

असा हा मोह, ही माया जबरदस्त असते. म्हणून सतत अभ्यास करणे महत्त्वाचे आहे. पारायण करण्याची जी पद्धत आहे तोही अभ्यासच आहे. म्हणून या अभ्यासात पुनरावृत्ती होते आणि पुनरावृत्ती होणे अटळ आहे. पण प्रत्येक खेपेला एका वेगळ्या अर्थाची उकल होते. मनावर, बुद्धीवर संस्कार घडत जातात. एक नवा दृष्टिकोन कळतो आणि ज्ञानपुष्पाच्या पाकळ्या उमलत जातात. हे महत्त्वाचे आहे.

*ज्ञेयं यत्तत्प्रवक्ष्यामि यज्ज्ञात्वाऽमृतमश्नुते ।*
*अनादिमत्परं ब्रह्म न सत्तान्नासदुच्चते ।।*

*सर्वत: पाणिपादं तत् सर्वतोऽक्षिशिरोमुखम् ।*
*सर्वत: श्रुतिमल्लोके सर्वमावृत्य तिष्ठति ।।*

*सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम् ।*
*असक्तं सर्वभृच्चैव निर्गुणं गुणभोक्तृ च ॥*

*बहिरन्तश्च भूतानाम् अचरं चरमेव च ।*
*सूक्ष्मत्वात्तदविज्ञेयं दूरस्थं चान्तिके च तत् ॥*

*अविभक्तं च भूतेषु विभक्तमिव च स्थितम् ।*
*भूतभर्तृ च तज्ज्ञेयं ग्रसिष्णु प्रभविष्णु च ॥*

*ज्योतिषामपि तज्ज्योतिः तमसः परमुच्यते ।*
*ज्ञानं ज्ञेयं ज्ञानगम्यं हृदि सर्वस्य धिष्ठितम् ॥*

*(१३.१२ ते १७ भ. गी.).*

अर्थ – जे जाणल्याने (मनुष्य) अमृतत्वाला पोहोचतो, असे जे ज्ञेय ते मी तुला (अर्जुनाला) खुलासेवार सांगतो. ब्रह्म हे आरंभयुक्त (ज्याची केव्हातरी उत्पत्ती झाली आहे असे) नसून (परा व अपरा या दोन्ही प्रकृतीच्या) पलीकडचे आहे. ते सत् (व्यक्त) म्हणता येत नाही किंवा असत् (अव्यक्त) ही म्हणता येत नाही. ते जे (ब्रह्मतत्त्व) त्याचे हातपाय विश्वामध्ये सर्वत्र (भरले) आहेत. त्याचे डोळे, मस्तके, मुखे सर्वत्र (भरली) आहेत. त्याचे कान सर्वत्र (भरले) आहेत. असे (ते ब्रह्मतत्त्व) सर्व (विश्व) व्यापून राहिले आहे. (जिकडे पाहावे तिकडे त्याचेच अवयव दिसतात) (ते) सर्व इंद्रियाच्या गुणांचे (म्हणजे शक्तीचे) आभासक (म्हणजे उद्‌बोधक किंवा प्रकाशक) असून, त्याला स्वतःला (ब्रह्मतत्त्वाला) प्रत्यक्ष कोणतेही इंद्रिये नसते, त्याचा कशाशीही संबंध नसतो. पण ते सर्व नामरूपात्मक सृष्टीला धारण करणारे असते आणि स्वतः गुणातीत असूनही गुणांचा उपभोग घेणारे असते (ब्रह्मतत्त्व) सृष्ट पदार्थांच्या बाहेर व आत (आहे) ते स्थिरही आहे व चर (संचारीही) आहे. ते अत्यंत विरल असल्यामुळे इंद्रियगोचर नाही. ते दूरही आहे व जवळही आहे. ते (ब्रह्मतत्त्व) विभागलेले नाही. तथापि सर्व सृष्ट पदार्थांत ते असल्याने विभागलेले आहेसे भासते. ते सृष्ट पदार्थांची उत्पत्ती करणारे, पोषण करणारे व लय करणारे आहे असे समजावे. ते (ब्रह्मतत्त्व) सर्व तेजोगोलाचे तेज व अंधःकाराच्या पलीकडचे आहे असे म्हणतात. ज्ञान (म्हणजे अमानित्वादी गुण) ज्ञेय (जाणण्यास पात्र) व ज्ञानगम्य (ज्ञानाने प्राप्त करून घ्यावयाचे ते, अशा तिन्ही स्वरूपांचे एकच ब्रह्मतत्त्व) सर्वांच्या बुद्धीमध्ये विशेषतः स्थित असते.

कोणत्याही व्यक्तीचे खूप वर्णन केले, तर त्या वर्णनावरून ती व्यक्ती ओळखण्याची शक्यता असते. एखादी विशेष खूण जर सांगितली असेल, तर ती व्यक्ती अगदी सहज ओळखता येते. तसे ब्रह्मस्वरूपाचे नाही. ते मुळातच निर्गुण, निराकार वगैरे खूप काही असल्याने त्याचे शब्दांत वर्णन करणे शक्य नाही. तरी खुणेसाठी म्हणून काही शब्द वापरले जातात त्याने थोडा थोडा अंदाज येतो. तशा काही खुणा आल्या आहेत. 'ते सत् म्हणता येत नाही किंवा असत्ही म्हणता येत नाही.' 'त्याला (ब्रह्माला) कोणतेही इंद्रिये नसते.' 'ते गुणातीत असूनही गुणांचा उपभोग घेणारे असते.' 'ते दूरही आहे व जवळही आहे.'

शब्द हे सापेक्ष वर्णन करतात. एखादा पुरुष उंच आहे म्हणजे तो बुटक्या लोकांत उंच आहे, पण उंच लोकांत मात्र तो बुटका ठरतो. तसेच तो गोरा आहे असे म्हटले तर काळ्या लोकांत गोरा ठरतो पण गोऱ्या लोकांत मात्र तो काळा ठरतो. म्हणजे वर्णन हे सापेक्ष असते. तसेच ब्रह्माच्याही बाबतीत समजले पाहिजे. 'ते सत् नाही तसे असत्ही नाही असे जरी म्हटले असले, तरी दुसरीकडे ते सत् आहे व असत्ही आहे' असेही म्हटले आहे. कारण परमेश्वराविषयी एखादे विशेषण वापरले तर त्याच्या विरुद्ध विशेषणाबाबत ते नकारात्मक आहे असे ठरते. पण तसे नाही, म्हणून ते सत् नाही म्हणजे असत् आहे का असा प्रश्न उभा राहतो. म्हणून ते असत्ही नाही असे म्हणावे लागते. तसेच सत् आहे असे म्हटले तर असत् नाही का असा प्रश्न उभा राहतो. म्हणून ते असत्ही आहे असेच म्हणावे लागते. म्हणून पुढील वर्णनात भगवंत सांगतात, की ते (ब्रह्म) जवळही आहे व दूरही आहे. जवळ, दूर ही अंतराची सापेक्षता आपल्या मानाने विचार करता आहे, पण ब्रह्माच्या मानाने ते जवळही व दूरही आहे. तसेच ते जवळही नाही व दूरही नाही असे म्हणावे लागते. याबाबतचा एक सुरेख दृष्टान्त ईशोपनिषद्मध्ये दिला आहे–

*अनेजदेकं मनसो जवीयः नैनद्देव आप्नुवन् पूर्वमर्षत्।*
*तद्धावतोऽन्यान् अत्येति तिष्ठत् तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति॥*

अर्थ – ते आत्मतत्त्व एकच एक, मुळी हालचाल न करणारे पण मनापेक्षाही वेगवान आहे. देव त्याला गाठू शकत नाहीत. त्याने मात्र देवांना केव्हाच गाठलेले आहे. धावणाऱ्या इतरांना ते उभे राहून मागे टाकते. प्रकृती मातेच्या अंकावर खेळणारा प्राण त्याच्याच सत्तेवर चळवळ करत असतो.

'पळता पळता भुई थोडी' अशी म्हण आहे. कारण कितीही पळाले तरी भूभाग काही संपावयाचाच नाही. तसेच 'पै जळावरील तरंगु। जरी धाविन्नला सवेगु। तरी नाही भूमिभागु। क्रमिला तेणे ॥' (१८.११६९ ज्ञानेश्वरी). म्हणजे जळावरील लाटा कितीही वेगाने धावून पुढे पुढे जातात असे वाटले, तरी त्यांनी भूभाग काही मागे टाकला असा अर्थ होत नाही. कारण लाटा व समुद्र हे दोन्ही पाणीरूपच असते. ब्रह्म हे अभेद व अद्वैत आहे. भेद तीन प्रकारचे असतात. एक सजातीय, दुसरा विजातीय व तिसरा स्वगत भेद. सजातीय म्हणजे वृक्ष ही एक जात आहे. वृक्षांत खूप प्रकार आहेत. आंबा, फणस, पिंपळ, वड वगैरे. दुसरा विजातीय भेद म्हणजे वृक्ष, प्राणी, वेली, मनुष्य या प्रकारचा भेद. स्वगत भेद म्हणजे वृक्षामध्ये खोड, फांद्या, पाने, फुले वगैरे किंवा प्राण्यात डोके, हात, पाय, पोट वगैरे. ब्रह्म हे एकच एकमेवाद्वितीय म्हणून त्याच्या ठिकाणी सजातीय, विजातीय भेद तर नाहीच पण स्वगत भेदही नाही. कारण ब्रह्मस्वरूपाला कोणतेही इंद्रिय नाही. तसेच ते सत्त्व, रज व तम यांपैकी कोणत्याही एका गुणाच्या आधिक्याने नाही तर ते गुणातीत आहे. गुण व इंद्रिये नसूनही ते गुणांचा उपभोग घेणारे आहे. 'एकोऽहं बहुस्याम्।' या संकल्पाने परमेश्वर अनंत रूपांनी अवतरला आहे. परमेश्वराने ही सृष्टी निर्माण केली. मग या सृष्टीचा उपभोग घेणार तरी कोण? कारण परमेश्वर स्वतः निर्गुण, निराकार आहे. म्हणून इंद्रियविरहित आहे. मग उपभोग कसा घेणार? म्हणून परमेश्वर सर्व प्राणिमात्रांच्या रूपाने अवतरून या सृष्टीचा उपभोग घेऊ लागला. पुरुषसूक्तात त्याचे वर्णन आहे.

*'सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपाद।'*

*(पुरुषसूक्त)*

याचप्रमाणे अर्जुनानेही गीतेमध्ये विश्वरूपाचे वर्णन केले आहे. परमेश्वर अशा अनंत रूपांनी अनंत इंद्रियांद्वारे या सृष्टीचा उपभोग घेत असतो. म्हणून ब्रह्मस्वरूपाला इंद्रिये नसली, तरी तो सृष्टीचा उपभोग घेत असतो असे म्हटले आहे. तो उपभोक्ता असूनही अभोक्ता आहे तो अशा प्रकारे आहे.

अगदी याच पद्धतीचे वर्णन यमराजाने नचिकेताला ब्रह्मज्ञान देताना केले आहे.

*अणोरणीयान् महतो महीयान् आत्मास्य जंतोर् निहितो गुहायाम् ।*
*तमक्रतुः पश्यति वीतशोकः धातुप्रसादात् महिमानमात्मनः ॥*

अर्थ – अणूहून अणू, मोठ्याहून मोठा असा हा आत्मा या जिवाच्या हृदयरूपी गुहेत लपलेला आहे. संकल्परहित मनुष्य शोकमुक्त होऊन शरीरातील घटकांच्या निर्मलतेने आत्म्याच्या त्या महिम्यास पाहतो.

*आसीनो दूरं व्रजति शयानो याति सर्वतः ।*
*कस्तं मदामदं देव मदन्यो ज्ञातुमर्हति ॥*

अर्थ – (एका जागी) बसल्या बसल्या हा दूर जातो. झोपला असतानाच सर्वत्र जातो. आनंदमय आणि आनंदातीत अशा त्या आत्म्याला माझ्या (यमराजा) वाचून इतर कोण जाणू शकतो?

*अशरीरं शरीरेषु अनवस्थेषु अवस्थितम् ।*
*महान्तं विभु आत्मानं मत्वा धीरो न शोचति ॥*

अर्थ – सर्व शरीरामध्ये राहून हा जो अशरीर (आत्मा) अशाश्वतात शाश्वत, महान आणि सर्वव्यापी 'तो मी आहे.' असे सांगून धीट पुरुष शोक करीत नाहीत. (कठोपनिषद).

## आत्म्याचे वर्णन

परब्रह्म व आत्मा हे बिंब व प्रतिबिंब यांप्रमाणे आहेत. ज्याप्रमाणे पावसाळ्यात जमिनीवर जेवढे खळगे, खड्डे असतील तेवढ्यांत पाणी साचून राहते. साचलेल्या पाण्यात सूर्य प्रतिबिंबरूपाने अवतरतो. उन्हाने सगळ्यातील पाणी वाफ होऊन जाते आणि त्यामुळे त्या पाण्यात पडलेले प्रतिबिंबही नाहीसे होऊन मूळ बिंबात मिळून जाते. खळग्यातील पाण्यात पडलेले प्रतिबिंब पाणी नाहीसे होताच नाहीसे होते. म्हणजे त्याचा नाश झाला असे होत नाही. कारण प्रतिबिंब हा एक भ्रम आहे. प्रतिबिंब अशी एक वस्तू स्थूल रूपाने, सूक्ष्म रूपानेही अस्तित्वात नसते. त्यामुळे जी वस्तू नसतेच तिचा नाश होणेही संभवत नाही. त्यामुळे प्रतिबिंबाचा नाश होत नाही. कारण ज्या वेळी पुन्हा पुढील पावसाळ्यात त्या खळग्यात पाणी साचेल त्या वेळी सूर्याचे प्रतिबिंब त्यात पुन्हा दिसू लागेल, हे निश्चित. म्हणजे प्रतिबिंब हा भ्रम असला तरी एक गोष्ट निश्चित जाणवते, की सूर्याच्या ठिकाणी असलेले प्रखर तेज त्या प्रतिबिंबातूनही बाहेर

पडत असते. ज्याप्रमाणे सूर्याकडे पाहणे शक्य नसते (मध्यान्हीच्या), त्याप्रमाणे प्रतिबिंबाकडेही पाहणे शक्य नसते. सूर्याच्या तेजाची प्रखरताच केवळ प्रतिबिंबात नसते तर ती उष्णताही त्या प्रतिबिंबातील सूर्यकिरणांमध्ये जाणवते. म्हणजे थोडक्यात ज्या स्थूल गोष्टीची जाणीव सूर्याच्या ठिकाणी होते, ती सर्व सूर्याच्या प्रतिबिंबातही असते. त्यामुळे प्रकाश आणि उष्णता या गुणधर्माने प्रतिबिंब बिंबासारखेच भासतात. दूरवर असलेला सूर्य आकारमानाने प्रचंड असला तरी खळग्याच्या आकारामध्येही मावत असतो असे त्याचे प्रतिबिंब असते. या सूर्य आणि प्रतिबिंबाच्या तुलनेत परब्रह्म व आत्मा जर मानले, तरी असे दिसेल. परब्रह्म हे जरी सूक्ष्म, व्यापक, निर्विकार, निराकार, निर्गुण असले तरी त्याचे मानवी देहात प्रतिबिंबित झाल्यावर सूक्ष्म, व्यापक, निर्विकार वगैरे वरील सर्व गुणांनी युक्त असूनही परब्रह्माचे चैतन्य हा गुणही त्या आत्म्यात अवतरलेला असतो. त्यामुळे देहात चलनवलन निर्माण होते. हा आत्मासुद्धा अविनाशी असतो. याबद्दल भगवंत गीतेमध्ये म्हणतात–

*न जायते म्रियते वा कदाचित् नायं भूत्वा भविता वा न भूयः ।*
*अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो न हन्यते हन्यमाने शरीरे ॥*

*(२.२० भ. गी.).*

अर्थ – हा (आत्मा) कधी जन्माला येत नाही किंवा मरणही पावत नाही. (म्हणजे) हा (आज) होऊन पुन्हा (उद्या) नाहीसा होणारा नाही. हा जन्मरहित, नित्य, अव्यय व अनादी आहे. देहाचा नाश केला तरी याचा नाश होत नाही.

आत्मा अविनाशी आहे म्हणजे नेमका कसा आहे, याविषयी भगवंत आणखी खुलासेवार सांगतात. भगवंत म्हणतात –

*नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।*
*न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥*

*(२.२३ भ. गी.).*

सर्वसाधारण नाश पावण्याच्या प्रक्रिया सांगितल्या आहेत. पण या सर्व प्रक्रिया करूनही आत्मा नाश पावत नाही. म्हणजे या सर्व प्रक्रिया आत्म्याच्या बाबतीत करणे शक्यच नसते. म्हणून म्हटले आहे की त्याला (आत्म्याला) शस्त्रे तोडत नाहीत, अग्नी जाळत नाही, पाणी कुजवू शकत नाही आणि वायू शुष्क करत नाही. तसेच पुढच्या श्लोकात भगवंत सांगतात. 'अर्जुना, हा आत्मा तोडण्यास अशक्य, भिजवून

कुजवण्यास अशक्य व सुकवण्यासही अशक्य आहे. तो नित्य, व्यापक, अविकार्य, स्थिर व अनादी आहे. म्हणजे परब्रह्माचे गुण त्याच्याही ठिकाणी आहेत.'

एकनाथी भागवतामध्येही संत एकनाथांनी भागवताचे निरूपण करताना तिसऱ्या अध्यायात असेच वर्णन केले आहे. ते म्हणतात–

आत्मा हा कधी जन्माला येत नाही, मरत नाही, वृद्धी पावत नाही व क्षीणही होत नाही. जन्ममरणादी विकार पावणाऱ्या सर्व दृश्यादृश्य पदार्थांचा तो द्रष्टा असून त्यांची कालमर्यादा तो जाणतो. तो ज्ञानरूप असून सर्वत्र आहे आणि नित्य अजरामर आहे. प्राण जसा देहभावाने भिन्न कल्पिला जातो, वस्तुतः तो एकच आहे; तसा परमात्मा अनेक रूपांत एकत्वाने व्यापलेला आहे. त्या ओव्या अशा –

*'आत्मा वेगळा काही। तिळभर ठावो रिता नाही। यापरी पूर्णत्व पाही।*
*'जन्म' ते ठायी स्पर्शेना ॥ आता आहे पूर्वी नाही। ऐसे 'आस्तिक्य' आत्म्याचे ठायी।*
*कदाकाळी न रिघे कांही। तो नित्य पाही निरंतर ॥ द्रष्टा साक्षी जो अवस्थातीत।*
*तो कदा नव्हे अवस्थाभूत। देही असोनि अवस्था रहित। जाण तो निश्चित परमात्मा ॥*
*जो अविकारी निरवरय पूर्ण। ज्यासी नाही जन्ममरण।*
*ऐसा तू आत्मा म्हणशील कोण। तरी जाण सर्वज्ञ ज्ञानरूप ॥*

*(अध्याय ३-७१०, १२, १६, १८, ए. भा.).*

अनुभूती सारखीच असल्याकारणाने सर्वांच्या वर्णनात साधारण तेच शब्द येतात. उपनिषदामध्येही अशाच प्रकारचे वर्णन आहे. ते असे–

*हन्ता चेन् मन्यते हन्तुं हतश्चेन् मन्यते हतम्।*
*उभौ तौ न विजानीतः नायं हन्ति न हन्यते ॥*

अर्थ – मारणारा समजतो हा (आत्मा) मारला जाऊ शकतो. मारला गेलेला 'मी मारला गेलो' असे समजतो. ते दोघेही जाणत नाहीत की, हा मारत नाही आणि मारला जात नाही.

*न जायते म्रियते वा विपश्चित् नायं कुतश्चित् न बभूव कश्चित्।*
*अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणः न हन्यते हन्यमाने शरीरे ॥*

*(कठोपनिषद्)*

अर्थ – हा ज्ञानवान आत्मा न जन्मतो, न मरतो. (तो) हा कशापासूनही झालेला नाही. त्याच्यापासूनही काही झालेले नाही. हा अजन्मा, नित्य, शाश्वत, पुराण म्हणजे सनातन आहे. हा मारला जात नाही, शरीर मारले असताही.

सूर्यबिंब व त्याचे पाण्यातील प्रतिबिंब या दृष्टान्तात थोडा फरक आहे. कारण ज्या वेळी आपण परब्रह्म व आत्मा यांच्याशी त्याची बरोबरी करू लागतो, त्या वेळी एक गोष्ट प्रामुख्याने विचारात टाकते आणि ती म्हणजे देहातील आत्मा हा स्वस्वरूप विसरलेला असल्यामुळे जीवदशेला आलेला असतो व सुखदुःखाचा भोग घेत असतो. अहंकारामुळे वासनांचे संचित तयार होते व तेच प्रारब्धरूपाने त्याला पुनःपुन्हा जन्माला कारण होते. त्याची ही दशा किती वर्षांपासून चालू असते, ते माहीत नसते. त्यामुळे जन्म-मृत्यू-जन्म या चक्रात तो बांधला जातो. त्यामुळे त्या विशिष्ट आत्म्याची-जिवाची स्थिती जन्मापूर्वी व मृत्यूनंतर अव्यक्त असते. जन्मामुळे तो व्यक्त दशेला येतो. हीच गोष्ट भगवंत अर्जुनाला सांगत आहेत.

*अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत।*
*अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥*

*(२.२८ भ. गी.).*

आत्मस्वरूपाला स्वस्वरूपाचे विस्मरण झालेले असल्यामुळे व देहभावाच्या अहंकाराने जीवदशेला आल्यामुळे आत्म्याला अव्यक्त-व्यक्त-अव्यक्त अशा अवस्था प्राप्त होतात. पण परमेश्वर जेव्हा अवतार घेतो, ज्या वेळी समाज संस्था, व्यवस्था बिघडतात, धर्माला ग्लानी येते, दुष्टांच्या अधिपत्याखाली अधर्माचा विस्तार होऊ लागतो, त्या वेळी भगवंताला, परमेश्वराला अवतार घ्यावा लागतो. (परमेश्वराच्या अवताराविषयीचा खुलासा विषयप्रवेश या विभागात आलाच आहे.) त्या वेळी परमेश्वर पृथ्वीवर जन्म घेतो. परमेश्वराने अवतार म्हणून जन्म घेणे व सर्वसामान्य जिवाने जन्म घेणे यांत फरक आहे. जीव हा स्वतःच्या देहभावाच्या ठिकाणी आसक्त असल्यामुळे अनेक इच्छा, वासना उत्पन्न करतो व त्या पूर्ण करण्यासाठी अनेक जन्म घेतो. त्या वासना स्वतःच्या स्वार्थाच्या, उपभोगाच्या असतात. त्यामुळे त्या उपभोगातून तो सुख-दुःखाचा अधिकारी होतो व जन्म घेतो. परमेश्वराचा जन्म घेणे अशा प्रकारचे नसते. तो पूर्णकाम असतो. त्याला, सर्व ठिकाणी त्याचीच व्याप्ती आहे हे जाणीवपूर्वक माहीत असते. त्याला स्वतःच्या अशा काही इच्छा, वासना नसतात. तरीही धर्माचा उच्छेद करणाऱ्या दुष्ट वृत्तीचा नायनाट करण्यासाठी व समाजव्यवस्था पुन्हा सुरळीत

करण्यासाठी त्याचा जन्म असतो. तो जन्माला येऊनही त्याच्या ठिकाणची स्वस्वरूपाविषयीची जाणीव गेलेली नसते, हे त्या अवताराचे वैशिष्ट्य आहे. म्हणून भगवंत गीतेत म्हणतात–

*न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।*
*नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥*

*(३.२२ भ. गी.).*

अर्थ – अर्जुना! या तिन्ही लोकांत मला (स्वत:करिता) काहीच कर्तव्य (करावयाचे) नाही. (कारण) मला अप्राप्त असे काही प्राप्त करून घ्यावयाचे नाही. तथापि मी कर्मामध्येच वर्तत आहे. (म्हणजे कर्मयोग आचरत आहे.)

म्हणून सर्वसामान्य जिवाप्रमाणे भगवंत अव्यक्तातून व्यक्त स्थितीला आलेले नसतात, पण बुद्धिहीन लोक मात्र सर्वसामान्य जिवाप्रमाणे भगवंतांनी जन्म घेतला आहे असे समजतात.

*अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धय: ।*
*परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥*

*नाहं प्रकाश: सर्वस्य योगमायासमावृत: ।*
*मूढोऽयं नाभिजानाति लोको मामजमव्ययम् ॥*

*(७.२४, २५ भ. गी).*

अर्थ – बुद्धिहीन लोक माझ्या (परमात्म्याच्या) अविकार्य व सर्वांत उत्तमोत्तम (व्यक्ताव्यक्ताहून पलीकडचे शुद्ध) स्वरूपाचे ज्ञान नसल्यामुळे, मी (इतर माणसांप्रमाणे) अव्यक्तातून व्यक्त रूपाला प्राप्त झालो असे समजतात. मी सर्वांना उघड (इंद्रियगोचर) नाही. कारण मी योगरूप मायेने आच्छादित आहे. अत एव, मोहित झालेले लोक मी (परमात्मा) जन्मरहित व अविकार्य (आहे) हे ओळखत नाहीत.

परब्रह्माविषयीचा आणखी खुलासा करताना भगवंत गीतेच्या आठव्या अध्यायात अर्जुनाला सांगत आहेत.

*'अक्षरं ब्रह्म परमं ।'*

*(८.३ भ. गी.).*

ब्रह्म हे अक्षर आहे. नाश न पावणारे, अविनाशी आहे. पण संत ज्ञानेश्वर परब्रह्माची व्याप्ती कशी आहे याचा खुलासा ज्ञानेश्वरीमध्ये करतात 'मग म्हणितले सर्वेश्वरे। जे आकारी इये खोकरे। कोंदले असत न खिरे। कवणे काळी॥ एऱ्हवी सपूरपण तयाचे पहावे। तरि शून्यचि नव्हे स्वभावे। वरि गगनाचेनि पालवे। गाळूनि घेतले॥ जे ऐसेहि परि विरुळे। इये विज्ञानाचिये खोळे। हालवलेही न गळे। ते परब्रह्म॥' (८.१५ ते १७ ज्ञानेश्वरी).

भगवंत परब्रह्माच्या सूक्ष्मपणे असलेल्या अस्तित्वाचे वर्णन करतात.

देहाला नवद्वारे आहेत, छिद्रे आहेत. ते परब्रह्म या शरीराला पूर्णपणे व्यापून आहे तरी ते गळत नाही. म्हणजे न गळण्याइतके ते स्थूल, मोठे, जाड आहे आणि पुढच्याच ओवीत ते परब्रह्माचे सूक्ष्मपण किती आहे तेही सांगितले आहे. गगनाच्या पदरातून आकाशाच्या पोकळीच्या सूक्ष्म स्तरातूनही ते गाळून घेतलेले आहे. असे असूनही विज्ञानाच्या खोळीतून कितीही हलवले तरी (प्रयत्न करूनही) ते गळत नाही (म्हणजे समजत नाही). विज्ञानाने कितीही शोध घेण्याचा प्रयत्न केला, तरी ते त्यांच्या हाती लागत नाही, लागणे शक्य नाही. त्याच्या तर्काच्या हद्दीत येत नाही. कोणत्याही प्रयोगाने सिद्ध होत नाही, अशा प्रकारचे परब्रह्म हे रसायन आहे. ते विज्ञानाच्या सर्व प्रकारच्या शाखांचा उपयोग करूनही त्याचे आकलन होऊ शकत नाही. जे आहे असे वाटते, पण नक्की काय आहे याचा अंदाज करता येत नाही असे ते परब्रह्म आहे. तसेच प्रपंचामध्ये असणारे परब्रह्माचे स्वरूपही संत ज्ञानदेव वर्णन करतात- 'आणि आकाराचेनि जालेपणे। जन्मधर्माते नेणे। आकारालोपी निमणे। नाही कही॥ ऐशिया आपुलियाची सहजस्थिती। जया ब्रह्माची नित्यता असती। तया नाम सुभद्रापति। अध्यात्म गा॥' (८.१८, १९ ज्ञानेश्वरी).

हा सर्व प्रपंच नामरूपाने भरून गेला आहे. प्रपंच हा गतिमान आहे. सतत बदलत राहणे हा प्रकृतीचा धर्म आहे. जन्म-मृत्यू-जन्म हे चक्र सतत फिरत असते. असे असूनही या गतिमानतेत जे स्थिर आहे, बदलत राहणाऱ्या प्रकृतीला अधिष्ठान असून जे कधीही बदलत नाही, जन्म-मृत्यू या चक्रात असूनही जे या धर्मापासून अलग आहे, जे आपल्या स्वाभाविक स्थितीत नित्य असते, ते परब्रह्म व तेच अध्यात्म होय.

संत रामदासस्वामीही दासबोधामध्ये अशाच प्रकारे वर्णन करताना म्हणतात-

*'ब्रह्म निर्गुण निराकार। ब्रह्म निःसंग निर्विकार। ब्रह्मासी नाही पारावार। बोलती साधु॥*
*ब्रह्म सर्वांस व्यापक। ब्रह्म अनेकी एक। ब्रह्म शाश्वत हा विवेक। बोलिला शास्त्री॥*

*ब्रह्म अच्युत अनंत । ब्रह्म सदोदित संत । ब्रह्म कल्पनेरहित । निर्विकल्प ॥ ब्रह्म या दृश्यावेगळे । ब्रह्म सून्यत्वास निराळे । ब्रह्म इंद्रियांच्या मेळे । चोजवेना ॥ ब्रह्म सकळांहूनि थोर । ब्रह्मा ऐसा नाही सार । ब्रह्म सूक्ष्म अगोचर । ब्रह्मादिकांसी ॥ ब्रह्म शब्दी ऐसे तैसे । बोलिजे त्याहुनि अनारिसे । परी ते श्रवण अभ्यासे । पाविजे ब्रह्म ॥ ब्रह्मास नामे अनंत । परी ते ब्रह्म नामातीत । ब्रह्मास हेत दृष्टांत । देता न शोभती ॥ ब्रह्मासारिखे दुसरे । पाहाता काय आहे खरे । ब्रह्म दृष्टांत उत्तरे । कदा न साहे ॥'*

*(दशक ७, समास २, ओवी १ ते ९ दासबोध).*

*'ते परेहूनि पर । मन बुद्धि अगोचर । संग सोडिता सत्वर । पाविजेते ॥ संग सोडावा आपुला । मग पाहावे तयाला । अनुभवी तो या बोला । सुखावेल गा ॥ उंच नीच नाही परी । रावा रंका येकिच सरी । जाला पुरुष अथवा नारी । येकचि पद ॥ ब्राह्मणाचे ब्रह्म ते सोवळे । शूद्राचें ब्रह्म ते वोवळे । ऐसे वेगळे आगळे । तेथे असेचिना ॥ उंच ब्रह्म ते रायासी । नीच ब्रह्म ते परिवारासी । ऐसा भेद तयापासी । मुळिच नाही ॥ सकळांसि मिळोन ब्रह्म येक । तेथे नाही हे अनेक । रंक अथवा ब्रह्मादिक । तेथेचि जाती ॥ स्वर्ग मृत्यू आणि पाताळ । तिही लोकीचे ज्ञाते सकळ । सकळांसि मिळोन येक चि स्थळ । विश्रांतीचे ॥ गुरुशिष्या येकचि पद । तेथ नाही भेदाभेद । परी या देहाचा संमंध । तोडिला पाहिजे ॥ देहबुद्धिचा अंती । सकळांसि येकचि प्राप्ति । येक ब्रह्म द्वितीयं नास्ती । हे श्रुतिवचन ॥ साधु दिसती वेगळाले । परी ते स्वरूपी मिळाले । अवघे मिळोन येक चि जाले । देहातीत वस्तु ॥ ब्रह्म नाही नवे जुने । ब्रह्म नाही आदिक उणे । उणे भाविले ते सुणे । देहबुद्धीचे ॥*

*(दशक ७, समास २, ओवी १८ ते ३२ निवडक दासबोध).*

शब्द वेगळे असले तरी भावार्थ तोच असतो. वेगवेगळ्या शब्दवर्णनाने वेगवेगळ्या अंगप्रत्यंगाचे पदर अलग विलग होतात एवढेच, म्हणून सविस्तर वर्णनाचा खटाटोप. पुढे विमल ब्रह्माचे वर्णन केले आहे.

*'ब्रह्म नभाहून निर्मळ । पाहाता तैसेचि पोकळ । अरूप आणि विशाळ । मर्यादेवेगळे ॥ अनंत ब्रह्मांडा खालते । अनंत ब्रह्मांडा वरुते । तेणे विण स्थळ रिते । अणू मात्र नाही ॥ जळचरांस जैसे जळ । बाह्याभ्यांतरी निखळ । तैसे ब्रह्म हे केवळ । जीवमात्रासी ॥ आकाशा बाहेरी पळो जाता । पुढे आकाशचि तत्त्वतां । तैसे तया अनंता । अंतचि नाही ॥ परी जे अखंड भेटले । सर्वाभास लिगटले । अति निकटे परी चोरले ।*

*सकळांसि जे ॥ तयामध्येचि असिजे । परी तयास नेणिजे । उमजे भास नुमजे । परब्रह्म ते ॥ जे जे रूप आणि नाम । तो तो नाथिला च भ्रम । नामारुपातीत वर्म । अनुभवी जाणे ॥ ऐसी माया अशाश्वत । ब्रह्म जाणावे शाश्वत । सर्वा ठाई सदोदित । भरले असे ॥ श्रवणे शब्द ऐकता । मने विचार पाहतां । मना सबाह्य तत्त्वता । परब्रह्म ते ॥ जे जवळिच असे । पाहो जाता न दिसे । न दिसोन वसे । कांही येक ॥ जे अनुभवेचि जाणावे । सृष्टिचेनि अभावे । आपुलेने स्वानुभवे । पाविजे ब्रह्म ॥ ज्ञानदृष्टीचे देखणे । चर्मदृष्टी पाहो नेणे । अंतरवृत्तीचिये खूणे । अंतरवृत्ति साक्ष ॥ जेथ अज्ञान सरे । ज्ञान तेहि नुरे । विज्ञान वृत्ति मुरे । परब्रह्मी ॥ ऐसे ब्रह्म शाश्वत । जेथे कल्पनेसी अंत । योगी जना येकांत । अनुभवे जाणावा ॥*

*(दशक ७, समास ४, निवडक ओव्या दासबोध).*

## परब्रह्माचे स्वरूप

परब्रह्माचे स्वरूप अव्यक्त आहे. अव्यक्त म्हणजे इंद्रियगोचर नाही. काय आणखी कोणत्या वस्तू अव्यक्त नाहीत काय? नाम हे अव्यक्त आहे पण रूप हे व्यक्त स्वरूप आहे. प्रेम हा भाव अव्यक्त पण तोच ज्या वेळी कृतीने प्रदर्शित केला जातो, त्या वेळी तो व्यक्त होतो. वात्सल्यभावही तसाच आहे. गोडपणा हा अव्यक्त आहे पण साखरेच्या रूपाने तो प्रकट झाला आहे. त्याचप्रमाणे सर्व भाव, काम, क्रोध, लोभ, मद, मत्सर हे अव्यक्त आहेत, पण ज्या वेळी ते एखाद्या शरीराचा आश्रय करतात, तेव्हाच कृतीने व्यक्त होतात. तशाच सर्व चवी– खारट, आंबट, तिखट, तुरट वगैरे या एखाद्या वस्तूचा आश्रय घेतात, त्या वेळी त्या प्रकट होतात. तसेच सौंदर्य हेही अव्यक्त आहे, पण जेव्हा ते एखाद्या शरीराचा आश्रय करते त्या वेळीच ते व्यक्त होते. तसेच कुरूपपणाबद्दलही म्हणता येईल. सुगंध, दुर्गंध याबद्दलही असेच म्हणता येईल की, जेव्हा एखाद्या फुलाचा वा वस्तूचा आश्रय घेतात तेव्हाच ते व्यक्त होतात. त्याचप्रमाणे स्वच्छपणा, घाणेरडेपणा, नम्रता, उद्धटपणा हे सर्व ज्या वेळी कोणत्या तरी वस्तूच्या आश्रयाला येतात, व्यक्तीच्या ठिकाणी प्रकट होतात, त्याच वेळी अनुभवाला येतात. म्हणजे जी गोष्ट शब्दाने स्पष्ट करता येत नाही, समजून येत नाही, पण ती अव्यक्त असली तरी इंद्रियगोचर आहे. त्यामुळे त्याचे अव्यक्त पण पराकोटीचे नाही. पण हे भाव, ज्या ज्या वस्तूच्या आश्रयाने राहतात, त्या त्या वस्तू नाश पावल्या असता नाश पावणारे आहेत. म्हणून परब्रह्म हे अव्यक्त आहे असे म्हणून केवळ भागत नाही, तर ते अविनाशीसुद्धा आहे.

परमेश्वर, परब्रह्म हे अविनाशी आहे म्हणजे काय? कोणतीही स्थूल वस्तू नाश पावत नाही. तीही वरील अनेक भावांपैकी एक भाव आहे. 'भू' भवति– असणे. या धातूपासून 'भाव' शब्द निर्माण झाला आहे. 'भाव' म्हणजे असणे, अस्तित्व. हे जे अस्तित्व आहे, हे कोणत्याही वस्तूच्या आश्रयाने नाही. स्वाभाविकपणे सत्यत्वाने त्याचे अस्तित्व आहे. हेच अस्तित्व, भाव हेच जगाचे अधिष्ठान आहे. या भावापासून, म्हणजे प्रथम स्फुरणापासून 'एकोऽहं बहुस्याम्।' पुरुष, प्रकृती निर्माण झाली. प्रकृतीपासून तीन गुण सत्त्व, रज, तम व या त्रिगुणांपासून आकाश, वायू, तेज, आप व पृथ्वी ही पंचमहाभूते निर्माण झाली. पुरुष प्रकृती व तीन गुण हेसुद्धा अव्यक्त स्वरूपातच आहेत. हीच मूळ प्रकृती होय. या मूळ प्रकृतीपासून पुढे व्यक्त सृष्टीची उत्पत्ती सुरू झाली. म्हणून भगवंत म्हणतात की माझा (परब्रह्मस्वरूप हा) भाव आहे. तो या मूळ प्रकृतीहून श्रेष्ठ आहे.

*परस्तस्मात्तु भावोऽन्योऽव्यक्तोऽव्यक्तात्सनातनः ।*
*यः स सर्वेषु भूतेषु नश्यत्सु न विनश्यति ॥*

*(८.२० भ. गी.).*

अर्थ – त्या अव्यक्ताहून (मूल प्रकृतीहून) श्रेष्ठ, स्वतः अनादी, अव्यक्त पण (अव्यक्त प्रकृतीहून) वेगळा, असा जो दुसरा भाव म्हणजे- सत्यत्व) तो सर्व भूते नाश पावली, तरीदेखील नाश पावत नाही.

कोणतीही व्यक्ती निश्चित कोठे भेटते तर तिच्या घरी. आपणही दिवसभर उद्योग करून शेवटी कोठे विश्रांतीला जातो तर घरी. घर ही आपली शेवटची गती असते. घरी आले की विश्रांती. घरी आले की कोठे जाणे, येणे नाही (त्या दिवसापुरते). दुसरा दिवस उजाडला, की पुन्हा धावपळ सुरू होते. ज्या घराच्या ओढीने आपण संध्याकाळी घरी येतो, ते घर तरी आपले खरे घर असते का? तर नाही. कारण याच जन्मात आपण घरही बदलतो. त्यामुळे आपल्या घराची ओढही बदलते. हे तर एका जन्मीचे झाले. पण जन्मोजन्मीचा विचार केला, तर आपली कितीतरी घरे बदलत असतात. आपली धावपळ चालूच राहते व ज्याला खरी विश्रांती म्हणतात ती मिळतच नाही. कारण खरे घर आपल्याला सापडलेलेच नसते. ज्या घरात आपण राहतो ते घर आपले असे अगदी साधे समीकरण आपण मनात धरलेले असते. पण केवळ राहणे हाच काही घराचा उपयोग नाही, तर विश्रांती हा मुख्य उद्देश, साध्य घर असण्याचा आहे आणि म्हणून आपण जन्मोजन्मी त्या प्रकारच्या घराचा शोध घेत असतो, की ज्या घरी

पोहचले की पुन्हा कशासाठीही बाहेर जाणे असणार नाही. तेथेच सुख असेल, तेच घर आनंद देईल, तेथेच खरी विश्रांती मिळेल आणि ज्या वेळी अशा घराच्या शोधाचा विचार आपण पक्का करतो, त्याच वेळी आपण अध्यात्ममार्गाचा अवलंब करतो. वेगवेगळ्या उपासना करतो, नामजप करतो, ध्यानधारणा करतो, वाचन, चिंतन, मनन करतो. कथा, कीर्तने, प्रवचने ऐकतो आणि जन्मोजन्मी ही उपासना चालू ठेवून श्रद्धेने, निष्ठेने हा मार्ग सतत चालत राहतो की, कधीतरी कोणत्यातरी जन्मी आपणास परमेश्वराचे ते धाम, आपले कायमचे विश्रांतीचे स्थान प्राप्त होते की जेथून पुन्हा परत जन्म नाही. परत खाली येणे नाही.

*अव्यक्तोऽक्षर इत्युक्तस्तमाहुः परमां गतिम् ।*
*यं प्राप्य न निवर्तन्ते तद्धाम परमं मम ॥*

*(८.२१ भ. गी.).*

अर्थ – या (प्रकृतीहून वेगळा व श्रेष्ठ) अव्यक्त तत्त्वास अक्षर (अविनाशी) असे म्हणतात, व त्यालाच परम (श्रेष्ठ) गती म्हणतात. ज्याला प्राप्त झाल्यावर पुनरावृत्ती नाही असे माझे (परमेश्वराचे) श्रेष्ठ स्थान होय.

आपणही आपला पत्ता देताना गल्ली क्रमांक, घर क्रमांक, पेठ, जवळची खूण, गाव, तालुका, जिल्हा आणि आवश्यक असल्यास देशाचे नावही देत असतो की, जेणे करून शोधणाऱ्या व्यक्तीला घर बरोबर मिळेल. जितका पत्त्याचा बारकावा असेल, तितके घर अचूक मिळते. ढोबळ मानाने पत्ता देत नाही. घर चौकोनी आहे, घराला रंग पांढरा आहे. घर दोन मजली आहे. अमुक एका रस्त्यावर आहे. घर पूर्वेला आहे. त्यातून आडनाव कुलकर्णी, पाटील, जोशी, देशमुख, देशपांडे वगैरे असले म्हणजे घर आणि व्यक्ती मिळण्याची आशाच सोडावी. कारण ज्या खुणा सांगितल्या आहेत त्यांना अनेक पर्याय आहेत. त्याला अध्यात्मात अतिव्याप्ती असे म्हणतात. म्हणून पत्ता हा एकदम अचूक असावा, की जेणे करून घर सापडण्यास कोणतीही अडचण नसावी. म्हणून वरील श्लोकात भगवंतांनी आपल्या धामाचे जरी वर्णन केले असले, तरी त्यांना ते पुरे वाटले नाही म्हणून पुन्हा अचूक पत्ता सांगतात.

*न तत् भासयते सूर्यो न शशाङ्को न पावकः ।*
*यत् गत्वा न निवर्तन्ते तत् धाम परमं मम ॥*

*(१५.६ भ. गी.).*

अर्थ – सूर्य ज्याला (त्या ब्रह्मपदाला) प्रकाशित करू शकत नाही, (मग) चंद्रही नाही, अग्नीही नाही, (हे सांगावयासच नको). (ते स्वयंप्रकाशी असून सूर्यादिकांसही प्रकाशक आहे.) ज्या ब्रह्मपदाला पोचल्यावर (प्राणिमात्र) पुन्हा परत येत नाही, (पुनरावृत्ती होत नाही) ते माझे (परमात्म्याचे) श्रेष्ठ धाम आहे. (म्हणजे तेजोमय ब्रह्मपद होय).

*'पै दीपाचिया बंबाळी। का चंद्र हन जे उजळी।*
*हे काय बोलो अंशुमाळी। प्रकाशी जे॥*

*ते अवघेचि दिसणे। जयाचे कां न देखणे।*
*विश्व भासतसे जेणे। लपालेनि॥'*

*(१५.३०८, ३०९ ज्ञानेश्वरी).*

संत ज्ञानेश्वर भगवंताच्या धामाचे आणखी जास्त मोकळेपणाने वर्णन करतात. ते म्हणतात, 'भगवंताचे धाम हे दिव्याच्या तेजाने उजळून निघणारे किंवा चंद्रप्रकाशाने प्रकाशमान होणारे किंवा सूर्यप्रकाशाने स्पष्टपणे दिसणारे, प्रकाशित होणारे असे नाही. हा सर्व प्रकाश आहे. दिव्याचा, चंद्राचा, सूर्याचा प्रकाश याने स्थूल वस्तू प्रकाशित होतात. प्रपंचातील वस्तू दिसतात. ही पृथ्वी सूर्यप्रकाशाने उजळून निघते. पण भगवंताचे धाम, ब्रह्मपद ही स्थूल वस्तू नाही, की जेणे करून ती सूर्यादी प्रकाशाने उजळून येईल. ब्रह्माच्या तेजानेच सर्व वस्तू प्रकाशित होतात, ब्रह्माच्या तेजानेच सर्वांना तेज प्राप्त झालेले आहे. कारण ब्रह्म तेजस्वी नसून तेजोरूप आहे. अशी ही ब्रह्म वस्तू हेच परम धाम आहे, की जेथे गेले असता परत येणे नाही. ब्रह्मस्वरूपाच्या तेजाचे भगवंत वर्णन करीत आहेत.

*ज्योतिषामपि तज्ज्योतिः तमसः परमुच्यते।*

*(१३.१७ भ. गी.).*

अर्थ – ते (ब्रह्मतत्त्व) तेजोगोलाचे तेज अंधकाराच्या पलीकडचे आहे.

संत ज्ञानेश्वर ज्ञानेश्वरीत याचा विस्तार करून सांगत आहेत–

*'जे अग्नीचे दीपन। जे चंद्राचे जीवन। सूर्याचे नयन। देखती जेणे॥ जयाचे उजियेडे। तारांगण उभडे। महातेज सुरवाडे। राहटे जेणे॥ जे आदीची आदि। जे वृद्धीची वृद्धि। बुद्धीची जे बुद्धि। जीवाचा जीवू॥ जे मनाचे मन। जे नेत्राचे नयन। कानाचे कान।*

*वाचेची वाचा ।। जे प्राणाचा प्राण । जे गतीचे चरण । क्रियेचे कर्तेपण । जयाचेनि । आकारु जेणे आकारे । विस्तारू जेणे विस्तारे । संहारु जेणे संहारे । पांडुकुमरा ।। जे मेदिनीची मेदिनी । जे पाणी पिऊनि असे पाणी । तेजा दिवे लावणी । जेणे तेजे ।। जे वायुचा श्वासोश्वासु । जे गगनाचा अवकाशु । हे असो आघवाचि आभासु । आभासु जेणे ।। किंबहुना पांडवा । जे आघवेचि असे आघवा । जेथ नाही रिगावा । द्वैत भावासी ।।'*

(१३.१२७ ते १३५ ज्ञानेश्वरी).

तेजोगोलाचे तेज, अग्नीचा देदीप्यमानपणा, चंद्राचा प्रकाश, सूर्याचे तेज हे त्यांना लाभले. याचा जो आपणास प्रत्यय येतो तो कशामुळे? कोणत्याही वस्तूला प्रकट होण्याचे, अस्तित्व दाखवण्याचे, स्वत:ला सिद्ध करण्याचे सामर्थ्य नसते. कारण सर्व वस्तुमात्र जड आहेत, स्थूल आहेत, अचेतन आहेत. प्राण्यांच्या ठिकाणी जे चैतन्य आहे, जो आत्मप्रकाश आहे, त्या आत्मप्रकाशाने त्या वस्तू जेव्हा उजळून येतात, त्या वेळी ती वस्तू दिसते, चैतन्यानेच ती वस्तू जाणवते. तिचा प्रत्यय येतो. तिचे अस्तित्व लक्षात येते. तो आत्मप्रकाश म्हणजेच 'जोतिषामपि तज्ज्योतिः ।' ज्योतीतील ज्योत होय आणि त्याच पद्धतीने आदीची आदी, वृद्धीची वृद्धी, बुद्धीची बुद्धी, जिवाचा जीव, मनाचे मन, नेत्राचे नयन, कानाचे कान, वाचेची वाचा, प्राणाचा प्राण, गतीचे चरण, क्रियेचे कर्तेपण असे म्हटले आहे. वेदशास्त्रात विराट पुरुषाची कल्पना केली आहे. विराट पुरुषाच्या ठिकाणी आकाश, वायू, तेज, आप, पृथ्वी अशा पंचमहाभूतांच्या तन्मात्रांपासून देवता निर्माण होऊन कान, नाक, डोळे, जिव्हा व त्वचा ही पाच ज्ञानेंद्रिये तसेच हात, पाय, वाक्, उपस्थ व गुद ही पाच कर्मेंद्रिये उत्पन्न झाली. या देवताच प्राणिमात्रांच्या ठिकाणी त्याच्या कर्मानुसार त्या त्या इंद्रियांना शक्ती देतात व त्यांच्याकडून त्यांच्या प्रारब्धानुसार कर्मे करण्यासाठी शक्ती देतात व त्यांच्याकडून कार्य करून घेतात. त्यामुळे आपले मन हे विराट पुरुषाच्या मनापासून उत्पन्न झालेले आहे आणि म्हणून ते मनाचे मन आहे. गतीचे चरण आहेत वगैरे. खरे म्हणजे सर्व सामर्थ्य मूळचे परमेश्वराचेच आहे. त्यामुळे आपले चलनवलन होत असते. तसेच चंद्र-सूर्यादिकांचे जे सामर्थ्य आहे हे मूळचे परमेश्वराचेच आहे. नाही तर चित्रात काढलेल्या चंद्र, सूर्य, अग्नीप्रमाणे त्यांची स्थिती आहे. केनोपनिषदात आलेली कथा याचा अर्थ जास्त स्पष्ट करणारी आहे. ती थोडक्यात पुढीलप्रमाणे आहे.

एकदा देव-दानवांत युद्ध झाले असता देवांनी दानवांचा पराभव केला. युद्धाचा शीण झाल्याने देव विश्रांती घेत होते व प्रत्येक जण आपण कसा पराक्रम केला याचे

वर्णन करत होता. इंद्र, अग्नी व वायू आपले सामर्थ्य सांगत होते. तोच आकाशातून एक दिव्य पुरुष खाली येऊन थोड्या अंतरावर स्थिर झाला. इंद्र, अग्नी, वायू यांनी त्या दिव्य पुरुषाला पाहिले व त्यांना विचार पडला की हा दिव्य पुरुष कोण आहे? 'किम् इदम् यक्षम्।' हा कोणता यक्ष पुरुष आहे आणि असा विचार करून इंद्राने अग्नीला त्या दिव्य पुरुषाकडे पाठवले. तेव्हा अग्नी त्या दिव्य पुरुषाजवळ गेला असता त्या दिव्य पुरुषाने विचारले, 'तू कोण आहेस?'

अग्नी म्हणाला, 'मी अग्नी आहे. मी जातवेद आहे.'

यक्षाने विचारले, 'तुझ्यामध्ये काय सामर्थ्य आहे?'

अग्नी म्हणाला, 'हे सर्व, जे पृथ्वीमध्ये आहे ते जाळतो.'

यक्ष म्हणाला, 'हे जाळ' असे म्हणून यक्षाने एक गवताची काडी अग्नीपुढे टाकली. सर्व वेगाने, आवेशाने अग्नीने त्या काडीला झपाटले. पण अग्नी त्या काडीला जाळू शकला नाही. नंतर इंद्राने वायूला त्या दिव्य पुरुषाकडे पाठवले. वायू जवळ आल्यावर तो दिव्य पुरुष वायूला म्हणाला, 'तू कोण आहेस?'

वायू म्हणाला, 'मी वायू आहे. मी मातरिश्वा आहे.'

यक्ष म्हणाला, 'तुझ्यामध्ये काय सामर्थ्य आहे?'

वायू म्हणाला, 'पृथ्वीमध्ये जे काही आहे, ते सर्व मी घेऊन जातो.'

यक्ष म्हणाला, 'हे घेऊन जा.' असे म्हणून यक्षाने गवताची काडी वायूसमोर टाकली. सर्व वेगाने, आवेशाने वायू त्या काडीकडे धावत गेला, पण त्या काडीला घेऊन जाऊ शकला नाही. वायू परत इंद्राकडे गेला.

वायू इंद्राला म्हणाला, 'हा कोण आहे ते मला कळू शकले नाही.' तेव्हा देव इंद्राला म्हणाले, 'हे मधवन्! हा कोण आहे ते तू ओळख.'

इंद्र म्हणाला, 'ठीक आहे.'

असे म्हणून इंद्र तिकडे धावत गेला. पण तो यक्ष गुप्त झाला. त्याच आकाशात इंद्र एका स्त्रीकडे आला. ती होती अतिशय शोभणारी, हिमवत् कन्या (ब्रह्मविद्या रूपिणी) उमा. तिला इंद्र म्हणाला, 'हे, अद्भुत काय आहे?'

ती म्हणाली, 'हे ब्रह्म आहे. ब्रह्माच्याच विजयामुळे तुम्हाला हा महिमा मिळाला.'

यावरूनच इंद्राने जाणले, की हे ब्रह्म आहे.

यावरून परमेश्वराचेच सर्व सामर्थ्य असते. आपण केवळ कठपुतलीप्रमाणे हालचाल करत असतो. सूत्रधार तो आहे. तो जशी दोरी हलवेल तसे आपण नाचत असतो. तेव्हा कर्तृत्वाचा अभिमान बाळगणे हा वेडेपणा आहे, असेच यावरून दिसते. म्हणून परमेश्वराला जगत्चालक म्हणतात. परमेश्वर अनंत रूपांनी जगाचे नियमन करत असतो. सर्वांभूती परमेश्वर आहे असे जे म्हणतात ते कसे प्रत्ययाला येईल, तर त्याच्या, परमेश्वराच्या एकमेवाद्वितीय अशा कार्यावरूनच येईल. ते रूप, ते कार्य, ती स्थिती परमेश्वराशिवाय अन्य कोणाचीच असू शकणार नाही. म्हणून परमेश्वर अनंत रूपांनी नटला आहे. तेच प्रत्ययाला येते. तसे समर्थ रामदासस्वामी यांची अनुभूती आहे.

*ब्रह्माचे प्रकार– 'पहिले ते शब्द ब्रह्म । दुजे मीतिकाक्षर ब्रह्म । तिसरे खंब्रह्म ।*
*बोलिली श्रुति ।। चौथे जाण सर्व ब्रह्म । पांचवे चैतन्य ब्रह्म । साहावे सत्ताब्रह्म ।*
*साक्ष ब्रह्म सातवे ।। आठवे सगुण ब्रह्म । नववे निर्गुण ब्रह्म । दाहावे वाच्य ब्रह्म ।*
*जाणावे पै ।। अनुभव ते अक्रावे । आनंद ब्रह्म ते बारावे । तदाकार तेरावे ।*
*चौदावे अनुर्वाच्य ।। ऐसी ही चौदा ब्रह्मे । यांची निरोपिली नामे । आता स्वरूपाची वर्मे ।*
*संकेत दाऊं ।। अनुभवेविण भ्रम । या नाव शब्दब्रह्म । आतां मीतिकाक्षर ब्रह्म ।*
*ते येकाक्षर ।। खं शब्दे आकाश ब्रह्म । महादाकाश व्यापक धर्म । आतां बोलिले सूक्ष्म ।*
*सर्व ब्रह्म ।। पंचभूतांचे कुवाडे । जे ते तत्त्व दृष्टी पडे । ते ते ब्रह्मचि चोखडे ।*
*बोलिजेत आहे ।। या नाव सर्वब्रह्म । श्रुति आश्रयाचे वर्म । आतां चैतन्यब्रह्म बोलिजेल ।।*
*पंचभूतादि मायेते । चैतन्याचि चेतविते । म्हणौनि त्या चेतन्याते । चैतन्य ब्रह्म बोलिजे ।।*
*चैतन्यास ज्याची सत्ता । ते सत्ताब्रह्म तत्त्वता । तये सत्तेस जाणता । या नाव साक्षब्रह्म ।।*
*साक्षत्व जयापासुनी । ते हि आकळिले गुणी । सगुण ब्रह्म ते वाणी । तयासी वदे ।।*
*जेथ नाही गुणवार्ता । ते निर्गुण ब्रह्म तत्त्वता । वाच्य ब्रह्म ते हि आतां बोलिजेल ।।*
*जे वाचे बोलता आले । ते वाच्य ब्रह्म बोलिले । अनुभवासि कथिले । नवचे सर्वथा ।।*
*या नांव अनुभव ब्रह्म । आनंदवृत्तीचा धर्म । परंतु याचेहि वर्म । बोलिजेल ।।*
*ऐसे हे ब्रह्म आनंद । तदाकार ते अभेद । अनुर्वाची संवाद । तुटोन गेला ।।*
*ऐसी हे चौदा ब्रह्मे । निरोपिली अनुक्रमे । साधके पाहातां भ्रमे । बाधिजेना ।।'*

*(दशक ७, समास ३, ओवी ६ ते २२ दासबोध).*

ईशोपनिषदामध्ये या अर्थाचा एक मंत्र आहे. तो असा–

*पूषन् एकर्षे यम सूर्य प्राजापत्य व्यूह रश्मिन् समुह ।*
*तेजो यत् ते रूपं कल्याणतमं तत् ते पश्यामि ।*
*योऽसावसौ पुरुषः सोऽहमस्मि ॥*

अर्थ – तू या विश्वाचे पोषण करणारा आणि तू एक निरीक्षण करणारा आहेस. तू नियमन करणारा आणि तू उत्तम प्रवर्तन करणारा आहेस. तू सर्वांचे प्रजावत् पालन करणारा आहेस. तुझे हे पोषणादी रश्मी, उलगडून आणि एकवटून दाखव. तुझे जे तेजस्वी आणि परम कल्याणमय रूप, ते मी आता पाहात आहे. तो जो परात्पर पुरुष, तो मी आहे.

*अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशयस्थितः ।*
*अहमादिश्च मध्यं च भूतानामन्त एव च ॥*

*(१०.२० भ. गी.).*

अर्थ – अर्जुना, सर्व भूतमात्रांच्या अंतर्यामी असणारा आत्मा मी आहे. त्याचप्रमाणे सृष्ट पदार्थांचा आदी, मध्य व अंतही मीच आहे. (हा माझा दैवी योग होय.)

विश्व हे जड व चैतन्य या दोन भागांतच विभागलेले आहे. जड ही प्रकृती आहे व चैतन्य हे ईश्वर आहे. चौऱ्याऐंशी लक्ष योनी ही सजीव आहे. त्या सर्वांना भुते म्हणतात. या सर्वांमध्ये चैतन्य रूपाने आत्मा असतो. तेच परमेश्वराचे प्रतिबिंब होय. देहाकडून होणाऱ्या सर्व व्यापाराला शक्ती देणे हे चैतन्याचे कार्य आहे. मनुष्येतर प्राण्यांचे सर्व जीवन हे निसर्गनियमाने अंतर्मनाच्या अधिपत्याखाली चालते. त्यामुळे निसर्गाप्रमाणे त्यांचे आहार, निद्रा व मैथुन या त्याच्या स्वाभाविक गरजा आहेत व ते त्याप्रमाणे त्यांचा योगक्षेम चालवतात. कोणत्याही प्रकारचा संकल्प करून जीवन जगणे हे त्यांच्या अखत्यारीत नसते. त्यामुळे द्वेष, मत्सर, आपपर भाव, परिग्रह वगैरे प्रकार त्यांच्या ठिकाणी नसतात. वाघाने हरणाची हत्या केली, तर ते त्याचे अन्न असते. वाघ भूक लागल्याशिवाय प्राण्यांची हत्या करत नाही. शिवाय तो खाऊन उरलेल्या मांसाचा परिग्रह करून दुसऱ्या दिवसाची सोयही करत नाही. तसेच सर्व प्राण्यांचे असते. त्यामुळे कोणत्याही पूर्वयोजनेशिवाय त्यांची कर्मे होत असल्याने त्यां कर्माचे बंधन त्यांना पडत नाही. कारण श्रुती म्हणते, 'न कर्म लिप्यते नरे।' कर्म बंधनात घालत नसून कर्मामागचा उद्देशच बंधनात घालतो, पण मनुष्यप्राण्याचे तसे नाही. मनुष्याला अंतर्मन असतेच, शिवाय बहिर्मनही असते. त्याच्या ठिकाणी बहिर्मनाने संकल्प होतात. योजना होतात, केल्या जातात आणि त्याप्रमाणे कर्मे घडतात आणि पुढे

कर्माच्या साध्यतेसाठी प्रयत्नांची पराकाष्ठा केली जाते. त्यात अडथळा करणाऱ्याविषयी राग, द्वेष, मत्सर असे विकार उत्पन्न होतात व त्यामुळे परिग्रह वाढवण्याची इच्छा होते. अहंकाराने उपाधी वाढवल्या जातात. देहभावाने तीव्र अहंकार निर्माण होतो आणि त्यामुळेच कर्माचे बंधन पडते. शुद्ध स्वरूप असलेला आत्मा स्वस्वरूपाला विसरल्यामुळे व उपाधीमध्ये गुंतल्यामुळे तो जीवदशेला येतो. सुख-दुःखाचा भोक्ता होतो व जन्ममरणाच्या चक्रात सापडतो.

चैतन्य हे फक्त शक्ती देण्याचे कार्य करते. त्या शक्तीचा उपयोग मनुष्येतर प्राणी हे फक्त स्वाभाविक सहज जीवनासाठी करतात तर मनुष्यप्राणी हा स्वतःच्या संकल्पाने निर्माण केलेल्या योजनांनी उभ्या केलेल्या कर्मासाठी करतो. ज्याप्रमाणे दिवा हा उजेड देतो. त्या उजेडाचा कोणी कसा उपयोग करावा हा ज्याच्या-त्याच्या बुद्धीचा प्रभाव असतो. कोणी त्याचा उपयोग काम करण्यासाठी, कोणी अभ्यासासाठी, तर कोणी चोरी करताना सामान, वस्तू पारखण्यासाठी करेल. पण त्या उजेडात जे जे कर्म केले जाईल त्याला त्या कर्माचे फळ मात्र निश्चित मिळेल. हा साक्षीभूतपणा, उदासीनपणा आत्म्याच्या, चैतन्याच्या ठिकाणी असतो. प्राण्याला दिलेल्या शक्तीचा त्याने कसा उपयोग करावा हे त्याच्या बुद्धीवर, त्या बुद्धीवर झालेल्या संस्कारावर अवलंबून असते. त्याची फळे त्याला उपभोगावीच लागतात. या ठिकाणी प्राणी म्हणजे जीवदशेतील आत्माच. परब्रह्म–आत्मा–जीव अशा तीन पायऱ्या आहेत आणि या सर्व परब्रह्मस्वरूपच आहेत.

भगवंत म्हणतात,

*'उपद्रष्टाऽनुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः ।*
*परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन् पुरुषः परः ॥'*

*(१३.२२ भ. गी.).*

अर्थ – या देहामध्ये (क्षेत्रामध्ये) असलेला श्रेष्ठ आत्मा महेश्वर व परमात्मा (शुद्ध स्वरूप) असूनही (क्षेत्राचे) अंतर्बाह्य व्यापार प्रत्यक्ष पाहणारा (देहाच्या व्यापारांना) अध्यक्षत्वाने अनुमोदन देणारा, (क्षेत्राला) कार्यक्षम ठेवणारा (त्यापासून उत्पन्न होणाऱ्या सुखदुःखाचा) अनुभव घेणारा असा म्हटला जातो.

बृहदारण्य आणि मैत्रायणी या उपनिषदांतूनही याच अर्थाचे मंत्र आले आहेत.

*'द्वे वाव ब्रह्मणो रूपे । मूर्तं चैवा मूर्तं च । मर्त्यं चामृतं च ।*
*स्थितं च यच्च । सच्च त्यं च ॥'*

अर्थ – ब्रह्माची रूपे दोन आहेत. 'मूर्त' आणि 'अमूर्त'. 'मर्त्य' आणि 'अमृत', 'स्थित' आणि 'यत्' (म्हणजे अ-स्थित = गतिमान) 'सत्' (दिसणारे) आणि 'त्य' (म्हणजे असत् न दिसणारे) बृहदारण्यक.

*'द्वे वाव ब्रह्मणो रुपे। कालश्च अकालश्च।*
*अथ यः प्रागादित्यात, स अकालः अकलः।*
*अथ य आदित्याद्यः स कालः सकलः ॥'*

अर्थ – ब्रह्माची दोन रूपे आहेत. काल आणि अकाल. जो सूर्यापूर्वीचा तो अ-काल. आणि अ-कल (कलातीत) आहे. जो सूर्यापासूनचा तो काल आणि स-कल (कला-युक्त) आहे.

*'द्वे वाव खलु एते ब्रह्मज्योतिषो रूपके। शांतमेकं, समृद्धं चैकम् ॥*
*अथ यत् शांतम्। तस्य आधारं खम्। अथ यत् समृद्धम्। इदं तस्य अन्नम् ॥'*

अर्थ – ब्रह्म ज्योतीची दोन रूपे आहेत. एक शांत आणि एक समृद्ध, जे शांत (रूप) त्याचा आधार आकाश. जे समृद्ध त्याचा आधार अन्न (जीवनात दोन वस्तूंची गरज असते.) १) समृद्धीसाठी शरीरश्रम, अन्न २) शांतीसाठी ब्रह्मविद्या, आकाश.

*'द्वे वाव ब्रह्मणी अभिध्येये। शब्दाश्चाशब्दश्च।*
*अथ शब्द नैव अशब्दं आविष्क्रियते ॥ तत्र ओं इति शब्दः।*
*अनेन ऊर्ध्वं उत्क्रान्तः अशब्दे निधनमेति। स्वातंत्र्यं लभते ॥'*

अर्थ – ध्यान करणाऱ्याला योग्य अशी दोन ब्रह्म आहेत. एक शब्द (ब्रह्म), दुसरे अशब्द (ब्रह्म) शब्दानेच अशब्द प्रकट केले जाते. पैकी ॐ हे शब्द (ब्रह्म) आहे. याने वर जाणारा (मृत्यू पावणारा) अशब्दामध्ये लीन होतो, स्वातंत्र्य मिळवतो (मैत्रायणी).

## परब्रह्म व्यापक आहे

संत ज्ञानेश्वरांनी अमृतानुभवामध्ये सूर्याच्या दृष्टान्ताने परब्रह्माच्या व्यापकतेची थोडी तुलना केली आहे. सूर्याचा प्रकाश हा जसा सर्वत्र प्रकाशतो, पण– 'सूर्य कोणा न पाहे। परी आत्मा दाविला लाहे। गगने व्यापिता ठाये। ऐशी वस्तु ॥' (७.१०८ अमृतानुभव). सूर्य कोणत्या वस्तूचे प्रकाशन करत नाही? पण त्याने आत्मा दाखवला आहे काय? नाही. आकाश (पोकळी) एवढे मोठे, की सर्वांना त्याने व्यापले आहे पण ते आकाश वस्तूपुढे कुंठित झाले आहे. त्यास ती आत्मवस्तू व्यापता येईना. कारण

एक अपेक्षित व्यापकता व एक निरपेक्ष व्यापकता, अशा दोन प्रकारच्या व्यापकता आहेत. त्यांपैकी अपेक्षित व्यापकतेचे असे लक्षण आहे की, जी कोणत्या एका पदार्थाच्या अपेक्षेने (दृष्टीने) व्यापक असते. ती अपेक्षित व्यापकता होय. या अपेक्षित व्यापकतेचे लक्षण आकाशाच्या ठायी आहे. कारण पृथ्वी, आप, तेज, वायू या तत्त्वांच्या दृष्टीने आकाश हे व्यापक ठरते. पण आकाशाची मूळ जी माया तिच्या दृष्टीने आकाश हे व्यापक नाही. म्हणून आकाशाची अपेक्षित व्यापकता आहे. त्याचप्रमाणे मायेचीही अपेक्षित व्यापकता आहे. कारण पृथिव्यादी तत्त्वांच्या दृष्टीने माया व्यापक आहे, पण ती ब्रह्मचैतन्य दृष्टीने व्यापक नाही. म्हणून मायेची अपेक्षित व्यापकता आहे. आता निरपेक्ष व्यापकतेचे लक्षण इतके आहे, की जे सर्व तत्त्वांच्या दृष्टीने व्यापक आहे. ते निरपेक्ष व्यापक होय. असे तर एक ब्रह्मचैतन्य आहे. पृथ्वीपासून मायेपर्यंत उत्तरोत्तर एकापेक्षा एक श्रेष्ठ असणाऱ्या तत्त्वांच्या दृष्टीने ब्रह्मचैतन्य हे व्यापकच आहे. ते कधीही व्याप्त होत नाही. तसे आकाश व मायेचे नाही. आकाश हे व्यापक नसून व्याप्य आहे व माया व्यापक आहे, पण ब्रह्मचैतन्याच्या दृष्टीने पाहिले तर माया व्यापक नसून व्याप्य आहे. ब्रह्मचैतन्य व्यापक आहे. ही ब्रह्मचैतन्याची व्यापकता मात्र सतत असावयाची. हे कधीही व्याप्य होणारे नाही. म्हणूनच मायादी तत्त्व दृष्ट्या ब्रह्मचैतन्याची व्यापकता नसून ते अखंड, अनादी, सिद्ध, व्यापकच आहे. म्हणून ब्रह्मचैतन्याची निरपेक्ष व्यापकता आहे. अशा या निरपेक्ष व्यापक ब्रह्मचैतन्याला मायेच्या दृष्टीने असणारे व्याप्य आकाश कसे व्यापू शकेल? तसे वर सांगितल्याप्रमाणे सूर्याकडूनही आत्मवस्तूचे प्रकाशन होत नाही. उलट आत्म्याच्या अज्ञानामध्ये असणाऱ्या जगतास तो प्रकाशित करतो. सारांश असा, की भेदशून्य सच्चिदानंदरूप आत्मवस्तूच्या अज्ञानात सूर्याचा प्रकाश आहे. जसे सूर्याच्या अस्तानंतर असणाऱ्या रात्रीचे प्रकाशन चंद्रादी तारे करतात. पण सूर्योदय झाल्यावर चंद्रादी सर्व तारे निस्तेज होतात. तसे आत्मवस्तूच्या प्रकाशात सूर्यतेज नाहीसे होते म्हणून स्वयंप्रकाश ज्ञानरूप आत्म्याचे प्रकाशन सूर्याकडून होत नाही.

संत ज्ञानेश्वरांनी अमृतानुभवामध्ये केलेल्या विवेचनावरून असे स्पष्ट होते, की परब्रह्म व्यापक आहे, व्याप्य नाही. म्हणजे परब्रह्माला व्यापून टाकणारे असे काही नाही. उलट परब्रह्मानेच सर्व व्यापून टाकले आहे. परब्रह्म सगळीकडे व्यापून असले, तरी त्याची प्रचीती येत नाही. कारण आपली पाहण्याची दृष्टीच स्थूल रूपावर व स्थूलरूप वस्तूंच्या गुणधर्मावर खिळून असते. त्यामुळे परमेश्वरी स्वरूप आपल्या नजरेत येत नाही. परमेश्वर निर्गुण निराकार आहे. असे असूनही तो सगुण साकार

होऊन काही वैशिष्ट्याने आपले अस्तित्व त्यात सिद्ध करतो. त्या वस्तूतील ते परमेश्वरी तत्त्व जर काढून टाकले, तर त्या वस्तूचे वस्तुत्वच नाहीसे होते. सूर्यातील तेज हे परमेश्वराचे स्वरूप आहे. असे असता ते परमेश्वरी तत्त्व काढून टाकले, तर तो सूर्य या संज्ञेला पात्र राहणार नाही. चित्रात रंगवून एक गोल काढावा असा तो सूर्य दिसेल. त्याचप्रमाणे जलातील रस हा परमेश्वरी तत्त्वाचा भाग आहे. जलातील रसतत्त्व जर काढून टाकले, तर कोणत्याही पदार्थाला चवच राहणार नाही. कारण पाणीच सर्व वनस्पतींचे, त्यांतील रसांचे पोषण करते म्हणून मिरची-तिखट, चिंच-आंबट, हिरडा-तुरट वगैरे चवी विकास पावतात. पदार्थ शिजवताना पाणी घातले असता त्या त्या पदार्थांतील रस पुन्हा पातळ होतात व पदार्थ रसदार होतात. अशा प्रकारे परमेश्वराचे प्रत्येक वस्तुमात्रात वैशिष्ट्याने अस्तित्व असते हे जाणून, समजून घेणे महत्त्वाचे आहे.

*मया ततमिदं सर्वं जगदव्यक्तमूर्तिना ।*
*मत्स्थानि सर्वभूतानि न चाहं तेष्ववस्थितः ॥*

*(९.४ भ. गी.).*

अर्थ – मी (परमात्म्याने) अव्यक्त मूर्तीच्या (प्रकृतीच्या) योगाने हे सर्व जगत् व्यापले आहे. सर्व भूतमात्र माझ्यामध्ये आहेत आणि मी मात्र त्यांच्या ठिकाणी अवस्थित नाही. म्हणजे त्यांच्या आधारावर मी अधिष्ठित नाही. (मी अधिक व्यापक असल्याने त्यांच्यात समाविष्ट होऊ शकत नाही.)

*न च मत्स्थानि भूतानि पश्य मे योगमैश्वरम् ।*
*भूतभृन्न च भूतस्थो ममात्मा भूतभावनः ॥*

*(९.५ भ. गी.).*

अर्थ – (माझे स्वरूप पाहण्याकरिता) तू मजमधील भूतसृष्टीकडे (पृथक्त्वाने) पाहू नकोस तर माझ्या ईश्वरी व्यापक स्वरूपाकडे पाहा. माझे तत्त्व (परमात्मतत्त्व) सृष्टीला धारक व सृष्टीचे पोषक असूनही ते सृष्टीवर अधिष्ठित नाही. म्हणजे सृष्टी हा त्याचा आधार (अधिष्ठान) नाही.

*'सांगे पडिसादाची प्रत्युत्तरे । कां आरिसा जे आविष्कारे ।*
*ते आपुले की साचोकारे । तेथेचि होते ॥'*

*(९.७८ ज्ञानेश्वरी).*

संत ज्ञानेश्वरांनी अगदी साधे दृष्टान्त दिले आहेत. डोंगराच्या घळीत आरोळी दिली तर त्याचे पडसाद उठतात. अज्ञानी माणसाला वाटते डोंगरानेच प्रत्युत्तर दिले किंवा भुताटकी वाटते. पण ज्ञानी-विज्ञानी माणसाला त्याचे तत्त्व माहीत असते व त्यांच्या लक्षात येते की या प्रत्युत्तराला आपलाच आवाज कारण आहे.

तसेच आरशासमोर जाताच आपले प्रतिबिंब त्यात दिसते. तीसुद्धा अज्ञानींना नवलाईची गोष्ट वाटते. एकदा एका गोरिलाने आरशात आपले प्रतिबिंब पाहिले. तेव्हा त्याला वाटले की या वस्तूच्या मागे आपल्यासारखेच कोणीतरी आहे. म्हणून त्याने आरशामागे जाऊन पाहिले, पण तेथे कोणीच नव्हते. म्हणून त्याने पुन्हा आरशात पाहिले. त्याला पुन्हा त्याचेच प्रतिबिंब दिसले. त्याने पुन्हा आरशामागे पाहिले असा त्याचा खेळ चालू होता. पण प्रतिबिंबाचा आविष्कार केवळ आपल्या मुखामुळेच असतो हे त्या गोरिलाला समजत नव्हते व प्रतिबिंबाच्या आविष्काराला ते भुताटकी किंवा अद्‌भुतपणा असेच काहीतरी समजत असेल तसे परमेश्वराचा आविष्कार वेगवेगळ्या पद्धतीने वस्तुमात्रात होत असतो. पण ते तत्त्व समजण्याची योग्यता, प्रगल्भता, पात्रता जर आपणाजवळ नसेल, तर त्याचे आरोप आपण अन्य वस्तूंवरच करत राहणार.

काही लोक शंका घेतात की पूर्वी लोकसंख्या कमी होती व ती आता वाढली आहे. मग आत्म्यांची संख्या वाढली का? सगळीकडे एकच आत्मा आहे तर लोकांचे स्वभाव वेगवेगळे कसे असतात? परमेश्वर जर सर्वांना बुद्धी देतो असे म्हणतात तर मग काही लोकांना वाईट वागण्याची, खून करण्याची बुद्धीही तोच देतो का? आणि जर देत असेल तर त्यांना शिक्षा का भोगावी लागते? एकाच क्षणी जन्मणारी मुले एक गरीब व एक श्रीमंत, एक हुशार व एक मंदबुद्धी का असतात? अशा शंका घेणाऱ्या लोकांचा अभ्यास कमी असतो हेच त्याचे कारण होय. एका मोठ्या तळ्यात पाण्याने भरलेली अनेक मडकी पाण्यावर तरंगत असतात. मडक्यात पाणी असते व मडकीही पाण्यात असतात. मडक्यातील पाण्याला मडके आधारभूत असले तरी मडक्यालाही पाण्याचा आधार आहे. म्हणजे तलावातील पाण्याच्या अधिष्ठानावर मडके आहे, पण मडक्याच्या अधिष्ठानावर तलावातील पाणी नाही. हे भगवंतांना वरील चौथ्या श्लोकात सांगावयाचे आहे. आता मध्यान्हीच्या सुमारास सूर्य सर्व मडक्यांतील पाण्यात प्रतिबिंबित होतो, असे आपण पाहतो. पण १) मडक्याच्या संख्येइतके सूर्य नसतात. २) मडकी कमी झाली तर प्रतिबिंबे कमी होणार व मडकी वाढली तर प्रतिबिंबे वाढणार त्यामुळे सूर्यामध्ये कोणताच फरक पडत नाही. कारण सूर्य एक आहे. ३)

सूर्याचे प्रतिबिंब मडक्यात आहे. याला कारणही आपण आहोत. कारण आपण जेव्हा या मडक्यात एका विशिष्ट कोनातून पाहू तेव्हाच सूर्याचे प्रतिबिंब त्यात दिसणार आहे अन्यथा ते दिसणार नाही. म्हणजे सूर्याच्या प्रतिबिंबाचा आविष्कार हा आपल्यापुरताच असतो, अन्यथा नसतो. म्हणून आपल्या संकल्पातच या सृष्टीचे स्वरूप असते. आपण विपरीत भावना करून जर या सृष्टीकडे पाहू लागलो, तर सृष्टी विपरीत दिसणार. पण जर परमेश्वरी तत्त्वाचा विचार करून व स्थूल सृष्टी डोळ्याआड करून पाहू लागलो तर आपणास या सृष्टीतील स्थूल स्वरूपाच्या आत असलेले परमेश्वरी तत्त्व दिसू लागेल. म्हणून भगवंत म्हणतात, 'पश्य मे योगमैश्वरम् ।' हाच परमेश्वराचा ऐश्वर्ययोग.

परमेश्वरी तत्त्वाचा अभ्यास करणे हा एक अभ्यास आहे. हा अभ्यास म्हणजेच ज्ञानाची, परमेश्वरस्वरूप ज्ञानाची उपासना करणे होय. याला भगवंतांनी 'ज्ञानयज्ञ' असे म्हटले आहे.

*ज्ञानयज्ञेन चाप्यन्ये यजन्तो मामुपासते ।*
*एकत्वेन पृथक्त्वेन बहुधा विश्वतोमुखम् ॥*

*(९.१५ भ. गी.).*

अर्थ – तसेच दुसरे (उपासक), ज्ञानमय यज्ञाने (उपासनेने) परमात्मतत्त्व एकच आहे अशा भावनेने किंवा (परमात्म्याच्या) वेगवेगळ्या प्रतीकांच्या रूपाने, विश्वरूप असलेल्या माझी (परमात्म्याची) विविध प्रकारे उपासना करतात.

संत ज्ञानेश्वर अशा प्रकारे ज्ञानाची उपासना केल्यावर काय फळ मिळते ते वर्णन करताना म्हणतात,

*'तो प्रतीतीचेनि पात्रे । विवेकमहामंत्रे । ज्ञानाग्निहोत्रे । भेदु नाशी ॥ तेथ अज्ञान सरोनि जाये । आणि यजिता यजन हे ठाये । आत्मसमरसी न्हाये । अवभृथी जेंव्हा ॥ तेंव्हा भूते विषय करणे । हे वेगळाले कांही न म्हणे । आघवे एकचि ऐसे जाणे । आत्मबुद्धि ॥ जैसा चेइला तो अर्जुना । म्हणे स्वप्नीची हे विचित्र सेना । मीची जाहलो होतो ना । निद्रावशे ॥ आता सेना ते सेना नव्हे । हे मीच एक आघवे । ऐसे एकत्वे मानावे । विश्व तया ॥ मग तो जीवु हे भाष सरे । आब्रह्म परमात्मबोधे भरे । ऐसे भजती ज्ञानाध्वरे । एकत्वे येणे ॥ अथवा अनादि जे अनेक । जे आना सारिखे एका एक । आणि नामरूपादिक । तेही विषम । म्हणौनि विश्व भिन्न भिन्न । परि न भेदे तयाचे ज्ञान । जैसे अवयव तरी आन आन । परि एकचि देहीचे ॥ कां शाखा सानिया थोरा । परि आहति एकचि तरूवरा ।*

*बहुरश्मि परि दिनकरा। एकाचे जेवी ।। तेवि नानाविधा व्यक्ति। अनाने नामे अनानी वृत्ति। ऐसे जाणती भेदला भूती। अभेदा माते ।।'*

*(९.४३ ते ५२ ज्ञानेश्वरी) अर्थ - सरळ व सोपा आहे.*

एकूण परमेश्वराचे सृष्टीतील स्वरूप जाणण्यासाठी ज्ञानयज्ञाने, उपासना करणे हाच मार्ग आहे, हे निश्चित. अर्थात हीसुद्धा जन्मोजन्मीचीच उपासना आहे.

## उपाधिमाजी गुप्त –

परमेश्वराची विश्व ही उपाधीच आहे. या उपाधीमध्ये परमेश्वराचे स्वरूप कसे लपून आहे याचे वर्णन संत ज्ञानदेवांनी अमृतानुभवामध्ये केले आहे, ते असे.

परब्रह्म - पुरुष - प्रकृती यांपासून सृष्टीची उत्पत्ती झाली असली, प्रकृतीने विविधतेने या सृष्टीची उभारणी केली असली, तरी या विविधतेतसुद्धा केवळ पुरुष प्रकृतीचीच सत्ता आहे. याशिवाय दुसरे नव्हे तिसरे काहीच नाही. म्हणजेच परब्रह्मच सर्व रूपांनी भरून राहिले आहे.

*सार्ध केन च कस्यार्ध शिवयोः समरुपिणोः ।*
*ज्ञातुं न शक्यते लग्नमिति द्वैतच्छलान्मुहुः ।*

*(१.३ अमृतानुभव).*

समरूप अशा शिवाशिवासंज्ञित प्रकृतिपुरुषांपैकी कोणाचा अर्धा भाग कोणाशी संलग्न झाला आहे हे सर्वथा जाणता येणे शक्य नाही. कारण या दोघांमध्ये केवळ द्वैताचा भास आहे. वेदान्त शास्त्रकाराने प्रकृती ही पुरुषाची उपाधी आहे असे सांगितले आहे, तर प्रकृतिपुरुष निरुपाधिक होतील कशी? तर केवळ ज्ञानरूप परिपूर्ण परब्रह्म नित्य आहे व अशा नित्य स्थितीलाच सत् संज्ञा आहे. त्या सत्स्वरूपास पुरुष म्हणतात. आता या पुरुषभावामध्ये 'एकोऽहं बहुस्याम्।' असे स्फुरण होणे ही एक प्रकारची ज्ञानाची हालचालरूपी क्रियाच आहे, म्हणून या क्रियेस प्रकृती म्हणतात. आता तात्त्विक दृष्टीने पाहू गेले, तर स्फुरणरूपी प्रकृती ही पुरुषाहून वेगळी नाही. ज्याप्रमाणे पाण्यावर उठलेला तरंग पाणीरूप आहे, त्याप्रमाणे स्फुरणरूप प्रकृती पुरुषाहून भिन्न नसून तद्रूपच आहे. अर्थात त्याच्या स्वरूप ऐक्यभावाच्या ठिकाणी भिन्न अशी काहीच उपाधी नसल्याने ती निरुपाधिक आहे असे सिद्ध होते.

आता दुसरी शंका अशी येते की, जर प्रकृतिपुरुष ही निरुपाधिक आहेत, तर नामरूपात्मक जगत् उपाधीला ती कारणीभूत कशी होतील? जलाचा परिणाम गार वेगळी जरी दिसत असली तरी तात्त्विक दृष्ट्या ती जलरूपच आहे. तसेच तात्त्विक दृष्टीने पाहिले असता जगत् हे प्रकृतिपुरुषात्मक ब्रह्मवस्तूहून वेगळे नाही, स्वतंत्र नाही. त्या अर्थी त्या निरुपाधिक प्रकृति-पुरुषाला त्याच्या स्वरूपाहून वेगळी (वाटणारी) जगत् उपाधी आहे असे म्हणता येणार नाही. पुरुष-प्रकृती वेगळीच आहे सांगणारा आणखी एक मुद्दा पुन्हा पुढे येतो, तो असा– 'सद्सद्विलक्षणअनिर्वचनीयसत्' स्वभावाचा पुरुष आहे व 'सद्सद्विलक्षणअनिर्वचनीय असत्' स्वभावाची प्रकृती आहे. यावरून प्रकृति-पुरुष ही एक नाहीत म्हणजेच दोन आहेत असे म्हटले पाहिजे, पण हेही संभवत नाही. कारण पुरुष व प्रकृती ही कल्पनाच सापेक्ष असल्यामुळे त्यांपैकी एक कल्पना जर गेली, तर दुसरीही आपोआप जाते. भावार्थ असा की, सच्चिदानंदरूप परमात्म्याच्या विचाराने प्रकृती कल्पनेचा निरास झाला की प्रकृती संबंधाने परमात्म्यावर झालेली पुरुष कल्पनाही नाहीशी होते म्हणून प्रकृति-पुरुष हे पूर्णपणे स्वतंत्र नाहीत, तसेच ते वेगळे आहेत असेही नाही.

त्यांची एकरूपता अशा प्रकारे आहे. तर स्वमुख भोगण्याविषयीचा छंद असणारा पुरुष हा स्वमुख भोगण्याकरिता प्रकृतिरूपाने आपणच आपणापुढे आला. म्हणजे जसे आपल्या मुखसौंदर्याचा उपभोग घेणारा आरशाच्या योगाने आपण आपल्यापुढे विषयरूपाने होतो. तसे पुरुष आपणच आपल्याला दृश्य जगत्रूपाने विषय झाला. तथापि पाहणारा बिंब व आरशातील प्रतिबिंब ही वस्तुतः दोन नसून दोन्ही मिळून एक बिंब संज्ञिक पाहणाराच आहे. त्याप्रमाणे पुरुष व प्रकृती ही जरी एकाहून एक वेगळी भासली, तरी त्यांनी आपल्या तात्त्विक सच्चिदानंदस्वरूप भावात काही भेद होऊ दिला नाही. जगताच्या निर्मितीमुळे पुरुष-प्रकृतीमध्ये काही पुन्हा दुसरे, तिसरेपणा निर्माण झाला आहे की काय, असा प्रश्न उपस्थित करून संत ज्ञानेश्वर त्याचे उत्तर देतात.

'हा ठावोवरी वियोग भेडे । जे बाळ जगायेवढे। वियाली परी न मोडे। दोघुलेपण ॥' (१.६ अमृतानुभव). पुरुषसत्तेने प्रकृती ही जगत् परिणामाला पावली. तथापि तिसऱ्या जगताच्या योगाने उभयतांच्या 'दोघुलेपण' म्हणजे उभयपणात बिघाड झाला नाही. व्यवहारात अपत्य झाले की पती-पत्नींच्या प्रेमाला तिसरा वाटेकरी होतो व त्या मानाने नवरा-बायकोमधील प्रेम कमी होते, पण येथे तसा प्रकार होत नाही. प्रकृतीस नामरूपात्मक जगत्रूपी बालक जरी झाले तरी त्यांचे उभयतांतील प्रेम कमी

झाले नाही. म्हणजे या उभयतांमध्ये प्रकृति-पुरुषांच्या स्वरूपी जगताच्या योगाने तिसरेपणाचा संबंधच आला नाही.

संत एकनाथ यांचीही अनुभूती अशीच आहे असे दिसते. ते म्हणतात– 'प्रकृति-पुरुषापासून निर्माण झालेल्या जगतात तिसरा कोणीही असत नाही.'

*'ऐसे जग जाहले दोघापासूनी । परी तिसरे न देखो कोणी । अवघी सृष्टि दोघीजणी । दुमदुमनी भरलीसे ।। वाती लावून पाहता । तिसरे न लगेचि हाता । दुसरी प्रकृति निर्धारिता । तेही सर्वथा टवाळ ।। ऐसा दुजेनवीण एकला । एकलाचि विश्व जाहला । आकळित कौशल्य कळा । मल्लमर्दना श्रीकृष्ण ।।'*

*(अध्याय ६, ओवी १९४ ते १९६ ए. भा.).*

जेव्हा एखादी गोष्ट प्रत्यक्ष दाखवता येत नाही. ती केवळ अनुभवण्याजोगीच असते. तेव्हा अनुभवणारा दुसऱ्याला त्या गोष्टी सांगताना तत्सादृश अशा वेगवेगळ्या दृष्टान्तांनी ते समजावण्याचा प्रयत्न करतो. कारण कोणताही एक दृष्टान्त हा त्याचे स्वरूप स्पष्ट करण्यास पूर्णपणे समर्थ नसतो. तेव्हा संत ज्ञानेश्वर अर्धनारीनटेश्वराचा दृष्टान्त घेऊन पुन्हा समजवून सांगत आहेत.

'एका सच्चिदानंद परब्रह्माच्या अस्तित्वावर पुरुष व प्रकृती या कल्पना आहेत. म्हणजे उभयतांमध्ये एक ब्रह्मचैतन्याचीच सत्ता आहे. पुरुष व प्रकृती ही उभयतां एका ब्रह्माच्याच चित्प्रकाशाने प्रकाशली गेली आहेत. जसे अर्धनारीनटेश्वर या सोंगास अर्धनारीनटेश्वराचे सोंग आणणाऱ्या बहुरूपाच्या देहाचाच आश्रय आहे. म्हणजे एका बहुरूपाच्या देहावर अर्ध शिव व अर्ध पार्वती ही उभयता भासत आहेत. तसे एका अधिष्ठान ब्रह्मचैतन्यावर प्रकृती व पुरुष ही दोन्ही भासत आहेत. तत्त्वतः ते ब्रह्मचैतन्यरूपच आहेत. पाण्यावर तळपणारी लाट ही वरवर पाहता वेगळी भासते, पण तात्त्विक दृष्टीने पाहता लाट ही पाणीरूपच असते. तसे प्रकृति-पुरुष ही वरवर पाहता वेगळी कशी भासतात ते सांगताना संत ज्ञानदेव म्हणतात, 'आत्मा स्वात्मस्वरूपाविषयीच्या अज्ञानाला वश होऊन ज्या वेळेस जगत् पाहतो, त्या वेळेस जगत् हे प्रकृति-पुरुषाच्या अर्ध्या अर्ध्यापणाने बनलेले असते. म्हणजे जगत् हे अस्ति, भाति, प्रिय, नाम आणि रूप या पाच अंशांचे बनले आहे. त्यांपैकी नाम व रूप या अंशांनी प्रकृती आहे व अस्ति, भाति व प्रियत्व या अंशांनी पुरुष आहे, पण

प्रकृतिपुरुष आपले पारमार्थिक स्वरूप एक ब्रह्मचैतन्यच आहे असे विचाराने पाहणाऱ्यास दर्शवत आहेत. असो.

सर्व चराचरांत परमेश्वर भरला आहे असे जे म्हणतात, ते सत्य आहे असे वरील विवेचनावरून लक्षात येते, पण मग त्याचा प्रत्यय का येत नाही असा विचार येतो. दुधात पाणी असते ते आपल्याला माहीत आहे, पण ते दुधातील पाणी वेगळे का काढता येत नाही? तर त्याला राजहंसाची कला अवगत पाहिजे. राजहंस दुधात चोच घालून दूध फक्त पितो आणि भांड्यात पाणी शिल्लक राहते. म्हणजे दुधात पाणी गुप्त आहे. गुप्त म्हणजे स्पष्ट दिसत नाही. ते सहज इंद्रियगोचर नाही, पण परिणामरूपाने ते जाणवते. मग चराचरांतील परमेश्वर कसा जाणवतो तर संत ज्ञानदेव सांगतात,

'या उपाधिमाजी गुप्त। चैतन्य असे सर्वगत। ते तत्त्वज्ञ संत। स्वीकारिती॥' (२.१२६ ज्ञानेश्वरी). 'उपाधी' म्हणजे उपरी वस्तू. काही वस्तू अशा आहेत की, त्यांना स्वतःचे स्वतंत्र अस्तित्व असले, तरी प्रकट होण्यास दुसऱ्या वस्तूची, जड वस्तूची आवश्यकता आहे. अशी एक वस्तू म्हणजे वीज. विजेचे अस्तित्व आहे, पण तिचे अस्तित्व प्रकट होण्यास उपकरण लागते. तसे प्रेम, वात्सल्य, काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर वगैरे सर्व विकार आहेत, पण त्यांना प्रकट होण्यास शरीराची आवश्यकता असते. या सर्व वस्तू परिणामरूपाने जाणवतात. पण त्या वस्तुमात्राच्या निमित्ताने, त्याला उपाधी म्हणतात. परमेश्वराचे अस्तित्व सत्-चित्-आनंदरूपाने आहे. जे जे वस्तुमात्र दिसते, जाणवते, इंद्रियगोचर असते, त्या त्या वस्तुमात्रात परमेश्वर या सर्व रूपांनी आहे. चैतन्यरूपाने त्याचे अस्तित्व जाणवते आणि ते ओळखणारे संत कसे आहेत तर 'तत्त्वज्ञ' आहेत. म्हणजे परमेश्वराचे तात्त्विक स्वरूप ते जाणतात. ते तत्त्व चैतन्यरूपाने आहे आणि ते ओळखतात म्हणण्यापेक्षा 'स्वीकारतात' असा संत ज्ञानदेवांनी शब्द वापरला आहे. 'स्वीकारले' आहे म्हणजे मान्य झाले आहे. त्याला आदराने मान्यता दिली आहे. म्हणजे हृदयाशी धरून ठेवले आहे. म्हणजे ते प्रत्यक्ष दिसत नाही पण जाणवलेले आहे. परमेश्वराचे स्वरूप हे जाणवणारे, भासणारे, अनुभूतीला येणारे असे आहे आणि जोपर्यंत परमेश्वराला तात्त्विक रूपाने ओळखले, स्वीकारले जात नाही, तोपर्यंत ते जाणवणे, भासणे होत नाही. अनुभूतीला येत नाही. आहे हे सर्व म्हणजे स्वीकारले, अनुभूती आली, जाणवले वगैरे म्हणजेच त्याला साक्षात्कार म्हणतात.

'तत्त्वज्ञ संत।' 'तत्त्वज्ञ' आहेत पण संत नाहीत. मग? तर त्यांना त्या वस्तुमात्रात असणारे 'त्त्व' दिसणार नाही, जाणवणार नाही, कारण 'तत्त्वज्ञ' जे आहेत ते वस्तुमात्राची चिरफाड करून त्यातून ती ब्रह्मवस्तू शोधू जातील, तर तशी ती वस्तू दिसणार नाही, मिळणार नाही. मातेच्या हृदयातील वात्सल्य, प्रेमिकांचे प्रेम, ही त्याच्या हृदयाची चिरफाड करून मिळणारी वस्तू नाही. 'आनंद' ही वस्तू कोणाच्या शरीरात आढळणार नाही, पण आनंदाने शरीर पुलकित होते ते दिसते. मग संतांना ते कसे जाणवते, तर त्यांच्याकडे राजहंसाची कला असते. चांदण्यातील अमृतकण वेचण्याची सिद्धी फक्त चकोरांनाच असते. तसे कोणत्याही वस्तुमात्राची चिरफाड न करता ती वस्तू जाणून घेण्याची किमया फक्त संतांनाच असते. सम्यक् तत्त्व जाणणारे ते 'संत' म्हणून 'तत्त्वज्ञ संत' असा ज्ञानदेवांनी उल्लेख केला आहे. 'वेदाचा तो अर्थ आम्हांसीच ठावा' असे म्हणणारे संत तुकाराम- जेव्हा त्यांच्या जीवनाचा इतिहास वाचला जातो, त्या वेळी असे कोठेच दिसून येत नाही की त्यांनी वेदाचे ज्ञान घेण्यासाठी कोणाला गुरू केले होते म्हणून, पण त्यांनी त्यांच्या भक्तीने, तपाने, अभ्यासाने, चिंतनाने ते परमेश्वरी तत्त्व जाणून घेतले होते आणि 'प्रणवः सर्ववेदेषु।' असे भगवंतांनी गीतेत सांगितले आहे. तो प्रणव जर कळला, तर वेदाविषयी अज्ञान कसे असू शकेल?

'तैसे विचारता निरसले। ते प्रपंचु सहजे सांडवले। मग तत्त्वतां तत्त्व उरले। ज्ञानियांसी ॥' (२.१३१ ज्ञानेश्वरी). पूर्वीच्या ऋषीमुनींनी, साक्षात्कारी संतांनी, शाब्दिक चिकित्सा कधी केली नाही. त्यांनी चिंतन, मननाने, वस्तुमात्राचे कणन् कण समजून घेतले, त्याचे तत्त्व शोधून काढले. त्यातून काय शोधले तर सार-असार, अविनाशी-विनाशी, चित्-जड, आत्म-अनात्म, क्षीर-नीर किंवा साध्या शब्दात म्हणजे धान्य-फलकट, धान्याचा स्वीकार करून फलकटाचा त्याग केला. प्रपंच हा असार, जड, विनाशी, अनात्म असा आहे. सर्व प्रपंच हा फलकटासारखा आहे. तेच, 'विचारता निरसले।' होय. प्रपंच हा आज या क्षणी जसा दिसतो तसा पुढल्या क्षणी दिसणार नाही, म्हणून त्याज्य होय. म्हणून त्यातून जे उरले ते तत्त्व साधुसंतांनी ओळखले, कारण ते विज्ञानी जसे होते तसे ते ज्ञानीही होते आणि ज्ञानी होते तसे विज्ञानीही होते आणि ज्या वेळी अशी पात्रता येते, त्या वेळी या बाह्य विश्वाविषयी, विश्वातील विषयांविषयी त्यांना मोह पडला नाही. कमळाच्या पानावरील पाण्याच्या थेंबाप्रमाणे ते संसारात वावरत असून अलिप्त असतात. ग्रह नक्षत्र फिरत असले, तरी ध्रुव जसा आपली जागा सोडत नाही तसे ते निश्चळ असतात, अंतरी दृढ असतात. त्यामुळे ते

मुक्त असतात, जीवन्मुक्त असतात. संत ज्ञानदेव म्हणतात, 'हे विषय जयाते नाकळिती। तया सुखदु:खे दोनी न पवती। आणि गर्भवासुसंगती। नाही तया॥ तो नित्यरूप पार्था। वोळखावा सर्वथा। जो या इंद्रियार्था। नागवेची॥' (२.१२३ व १२४ ज्ञानेश्वरी).

'तत्त्वम्' या शब्दाचा अर्थ 'ब्रह्म' असा आहे. 'तत्त्वम्' म्हणजे खरी वस्तू असाही आहे. पण खरी वस्तू म्हणजे ब्रह्मच होय. कारण ते कधीही खोटे ठरत नाही. जगातील दृश्य वस्तू म्हणजे इंद्रियगोचर वस्तूही खोटीच असते. कारण ती नेहमी बदलत असते. ती जशी आहे तशी ती उद्या, थोड्या वेळानेही नसते म्हणून ती खोटी. पण ब्रह्मवस्तू मात्र अशी आहे की तिचा कधीच निरास होत नाही. त्यात कधीही बदल होत नाही. ती वस्तू सदासर्वकाळ समभावाने व्यापून आहे आणि हेच खरे तत्त्व आहे. 'तत् त्वम् असि।' असे हे पहिले महावाक्य आहे की, जे सद्‌गुरू साधकाला प्रथम उपदेश करतात व त्यावर उपासना करावयास सांगतात. 'तत्' म्हणजे 'ते'. 'ते' म्हणजे 'ब्रह्म'. 'त्वम्' म्हणजे 'तू'. 'तू' म्हणजे 'साधक' आणि 'असि' म्हणजे 'आहेस'. 'ते ब्रह्म तू आहेस' हीच मोठी साधना आहे आणि अशी साधना जेव्हा फळाला येते, तेव्हा ते 'तत्त्व' समजू लागते. ते किती अवघड आहे ते भगवंत सांगतात,

*'मनुष्याणां सहस्रेषु कश्चित् यतति सिद्धये।*
*यततामपि सिद्धानां कश्चित् मां वेत्ति तत्त्वतः॥'*

*(७.३ भ. गी.).*

अर्थ – सिद्धीकरिता हजारो माणसांपैकी एखादाच प्रयत्न करतो (आणि अशा) प्रयत्न करणाऱ्या सिद्धांपैकी एखाद्यालाच माझे (परमेश्वराचे) यथार्थ (तत्त्वत:) ज्ञान (साक्षात्कार) होते.

प्रथम 'तत्त्वत:' ज्ञान होणे म्हणजे काय याचा विचार करावयास पाहिजे. आपण आपल्या जीवनात जे जे कार्य करतो किंवा ज्या ज्या गोष्टी जाणतो, त्या त्या 'तत्त्वत:' जाणलेल्या असतात की नाही? जर त्या 'तत्त्वत:' जाणल्या असतील, तर 'तत्त्वत:' जाणणे म्हणजे काय ते आपणाला समजेल. कारण परमेश्वराला 'तत्त्वत:' जाणणे किती कठीण आहे याची भगवंतांनी वरील श्लोकात कल्पना दिली आहे.

'तत्त्वत:' जाणणे म्हणजे जे जाणल्यानंतर पुन: कधीही न विसरणे वा ती गोष्ट कोणत्याही स्वरूपात समोर उभी राहिली, तरी त्याविषयी मोह न पडणे, संभ्रम निर्माण न होणे. ती वस्तू नावीन्याने समोर आली आहे याची जाणीव नसणे. ती वस्तू एकदम

ओळखीची, सहवासाची, परिचयाची आहे असे वाटणे. ज्या वेळी या विषयाचा खोल विचार केला गेला, त्या वेळी बाळपणापासूनच्या सर्व गोष्टी आठवल्या गेल्या आणि लक्षात आले, की अगदी छोट्या छोट्या गोष्टीतील तत्त्वे आपण शिकलेली, जाणलेली असतात. पण ती तत्त्वे इतक्या परिचयाची आहेत की, त्यात काही तत्त्व असेल असे वाटतच नाही, पण त्याच्या विरुद्ध जर विचार केला गेला तर त्यात काही तत्त्व आहे हे लक्षात येते. नव्हे त्याची खात्री होते. उदाहरणार्थ लहान मूल चालावयास शिकते, तेव्हा ते नेमके काय शिकते? तर ते तोल सांभाळावयास शिकते. तेव्हा चालण्यात 'तोल सांभाळणे' हे मुख्य तत्त्व आहे. हे 'तत्त्व' आत्मसात झाले की मुले वेगाने चालू, पळू शकतात, उड्या मारू शकतात. लंगडी घालू शकतात, एवढेच काय पण चढावर चढताना शरीर कोणत्या बाजूला झुकवावे व उताराला कोणत्या बाजूला झुकवावे हेही स्वाभाविकपणे करते. कारण तोल सांभाळण्याचे तत्त्व त्याच्या अंगी मुरलेले असते. एखाद्या घसरड्या ठिकाणी पाय घसरल्याबरोबर जर कोणती गोष्ट केली जाते तर तोल सांभाळला जातो. पाय घसरणे ही तोल सांभाळण्याची परीक्षा आहे. म्हणून 'तोल सांभाळणे' हे एक तत्त्व आहे. त्यामुळे आपण चालणे विसरत नाही. तीच गोष्ट सायकल चालवण्याची आहे. सायकल चालवताना तोल सांभाळता आला की सायकल चालवता येते आणि ती पुन्हा कधीही विसरत नाही.

'बोलणे' बोलताना, तोंडावाटे हवा सोडताना, तोंडाचा एक विशिष्ट आकार करणे हे त्यातील तत्त्व आहे. आपण लहान मुलांना तेच शिकवतो. 'आई' असे शिकवताना तोंडाचा आकारच महत्त्वाचा असतो. शब्द बाहेर येताना तोंडावाटे हवा बाहेर येण्याची प्रक्रिया भगवंतांनी निसर्गत: करून ठेवली आहे. तोंडावाटे हवा सोडण्यासाठी आपणास खास प्रयत्नच करावे लागत नाहीत. ओष्ठ, कंठ, तालू यांच्या विशिष्ट हालचाली जमल्या की बोलता येऊ लागते. तेव्हा तोंडाची हालचाल करणे हे त्यातील तत्त्व आहे. म्हणून मराठी मुले मराठी, इंग्रजी मुले इंग्रजी, कानडी मुले कानडी, तेलगु, तमीळ वगैरे अनेक भाषिक मुले त्या त्या भाषा बोलू लागतात. त्या त्या भाषकांतील लहान मुले ती भाषा बोलू शकतात, समजू शकतात, पण अन्य भाषकांतील मोठी माणसेही ती भाषा बोलू शकत नाहीत, हे आपल्या अनुभवाचे आहे. कारण त्यातील तत्त्व आपणास समजलेले नसते.

त्याचप्रमाणे 'ऐकणे'. ऐकताना एका विशिष्ट प्रकारच्या ध्वनीतून एका विशिष्ट शब्दाचे उच्चारण झाले की, त्याचा अर्थ असा होतो हे लक्षात येण्यासाठी ध्वनी तत्त्वाचीही सवय व्हावी लागते. बोलणे, ऐकणे व अर्थ समजून घेणे या त्रयीचे एक सांघिक तत्त्व आहे. ते आत्मसात होणे आवश्यक आहे. वरील उदाहरणाप्रमाणे इतर भाषकांचा या ध्वनी तत्त्वाचा अभ्यास नसल्यामुळे ध्वनी कानावर येऊनही तो शब्द व त्याचा अर्थ समजण्याची जी प्रक्रिया व्हावयास पाहिजे ती होत नाही. कारण त्या प्रकारच्या ध्वनी तत्त्वाची ओळख आपल्याला झालेली नसते.

अशा प्रकारे आपल्या जीवनातील कितीतरी गोष्टी आहेत की त्या केल्या जातात, पाहिल्या जातात; एवढेच काय पण त्या तत्त्वाचाही उपयोग केला जातो. कारण त्या तत्त्वाविरुद्ध जाऊन चालणारच नाही. निसर्ग ते मान्य करणार नाही. सर्व प्रकारच्या बांधकामासाठी 'ओळंब्याचा' उपयोग केला जातो. तो ओळंबा काय दर्शवतो– 'गुरुत्वाकर्षण' हे तत्त्व तो दाखवतो. पृथ्वीच्या पाठीवर कोठेही गेले तरी ती सर्व बांधकामे या तत्त्वाच्या खालीच उभी आहेत असेच दिसते.

चालणे, बोलणे या सर्व गोष्टी आपल्याला कोणीतरी शिकवलेल्या असतात. शिकण्यासाठी प्रेरणा देणारे कोणीतरी असतात. म्हणजे थोडक्यात कोणीतरी 'गुरू' आवश्यक असतो. कारण त्यातील तत्त्व आपल्या गुरूंनी आत्मसात केलेले असते. म्हणून कोणतीही गोष्ट शिकताना गुरूची आवश्यकता असते. तसेच परमेश्वराची उपासना करतानासुद्धा गुरूची आवश्यकता असते. आपण कितीतरी प्रकारच्या उपासना करत असतो, पण त्या उपासना आपण कोणाकडून तरी घेतलेल्या असतात. शिकलेल्या असतात, अनुकरण केलेल्या असतात, ऐकलेल्या असतात. हे सर्व आपले गुरूच होत. कारण, त्या उपासनेने त्यांना काही प्राप्त झालेले असते आणि तसेच आपणासही हवे असते, ते आपणाला थोड्याफार प्रमाणात मिळते. कदाचित आपण या विधानाला सहमत नसाल. पण थोडा विचार केला म्हणजे ही गोष्ट लक्षात येते की, ज्या गोष्टीपासून काहीही फायदा होत नाही, जी गोष्ट कोणाच्याही उपयोगाची नाही, त्या वस्तू फार काळ टिकून राहात नाहीत. त्यांचे अस्तित्व संपून जाते. पण परमेश्वरांची उपासना ही आज कित्येक सहस्रावधी वर्षांपासून चालत आलेली आहे, कारण ती निश्चितच फलदायी आहे. त्या उपासनेपासून ज्या तत्त्वाचे पालन व्हावे असा संकेत असेल; ते तत्त्व पाळले जात असावे आणि म्हणूनच त्या उपासना फलदायी ठरतात.

लहानपणी सर्व जण पाढे पाठ करत असत. काय त्या वेळी पाढे पाठ करण्यात काही फायदा आहे हे आपणास माहीत होते? तर नाही. पण पुढे जसे जसे शिक्षण होत जाते, तसे तसे मागे केलेल्या अभ्यासाची उपयुक्तता पटू लागते. कारण या अभ्यासामागील जे तत्त्व आहे ते आपल्यातील मोठ्यांना समजलेले असते. तसेच परमेश्वराची उपासना करण्यामागे काय तत्त्व आहे याची कल्पना उपासना निर्माण करणाऱ्यांना माहीत होती व या पद्धतीने उपासना करून जिवाची आध्यात्मिक उन्नती कशी होऊ शकते यामागील तत्त्व त्यांनी लक्षात घेतले होते आणि म्हणूनच आज नव्हे तर या पद्धतीने, उपासनेने प्रगती होत होत अनेक जन्मांनंतर आपल्यालाही ते तत्त्व गवसेल. ज्याप्रमाणे सगुण उपासनेचे आहे तेच निर्गुण उपासनेचे आहे, निर्गुण उपासनेचा पाया सगुण उपासना आहे आणि म्हणूनच देवदेवतांची निर्मिती झाली. पतंग (किडा) भिंगुरटीला पकडून आणून त्याला एका कोशामध्ये अडकवून टाकतो. तेव्हा ती भिंगुरटी पतंगाच्या भीतीने त्याचेच ध्यान करत असता स्वत:च पतंगरूप होऊन त्या कोशातून बाहेर पडते. असा ध्यानाचा परिणाम आहे, तत्त्व आहे. त्याचप्रमाणे भ्रशुंडी ऋषी यांनी 'ॐ गं गणपतये नम: ।' या मंत्राचा जप करून श्री गजाननाचे ध्यान केले. तेव्हा त्यांच्या भ्रूमध्यातून सोंड उत्पन्न झाली म्हणून त्यांना 'भ्रशुंडी' ऋषी म्हणू लागले. रामाचे नामस्मरण करून वाल्या कोळ्याचा वाल्मीकी ऋषी झाला. याचा अर्थ असा की जे बीज मनामध्ये सातत्याने रुजवले जाते. त्याचेच ध्यान, चिंतन, मनन केले जाते. त्याचेच रूप प्राप्त होते.

पातंजल योगसूत्रांत ध्यानासाठी मनाला आलंबन घ्यावे असे म्हटले आहे. मनाला आलंबन असले, की मन स्थिर होण्याला एक स्थल मिळते. डोळ्याने रूप पाहणे, कानाने नाम ऐकणे, वाचेने नामाचा उच्चार करणे, अशा प्रकारे या ज्ञानेंद्रियांना एकच विषय घेऊन मनाची एकाग्रता या नामरूपावर केली जाते. विचार करता करता मधेच काही काळ विचाराचा लय होतो. थोड्या वेळाने विचार थांबला आहे याची जाणीव होताच पुन्हा विचार सुरू होतो. ही जी मधली लय अवस्था आहे हीच निर्गुण, निर्विकल्प, निर्विचारी अवस्था होय. या वेळी जसा विचाराचा लय होतो, तसाच मनाचाही लय होतो. मनाचा लय म्हणजे बुद्धीचा, चित्ताचा अहंकाराचाही लय होय. अर्थात या लय होण्यात प्रयत्न करणे असा काहीच भाग नसतो, तर ती आपोआप घडणारी गोष्ट आहे. तेव्हा प्रयत्नाने साधणे हा भाग नाहीच. अशा साधनेत मनाचा लय होणे म्हणजे मनाची इतर सर्व आलंबने नाहीशी होणे होय आणि या साधनेच्या सतत अभ्यासाने मनाचे विषयही कमी कमी होत संपत येतात. म्हणजेच मनाची आलंबने

संपत येतील आणि मनाचा लय होण्याची प्रक्रिया वारंवार होत जाते. एवढेच नव्हे तर लय अवस्थेचा कालही वाढत जातो, हीच समाधी होय. ही समाधी काही काळ सविकल्प असते कारण मनाचे समाधीतून उत्थान होऊन मन पुन्हा विषयांत शिरते. हाच अभ्यास सातत्याने चालू ठेवला गेला की, पुढे पुढे मनाचे उत्थान कमी होत जात शेवटी बंद होते आणि अखंड समाधीचा काळ चालू होतो. हीच निर्विकल्प समाधी होय. हेच त्याचे तत्त्व होय. हीच जीवन्मुक्त अवस्था होय. हिलाच विदेही अवस्था म्हणतात आणि याचेच वर्णन संत ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीमध्ये केले आहे. ते म्हणतात–

'देह तरी वरिचिलीकडे । आपुलियापरी हिंडे । परि बैसका न मोडे । मानसींची ॥' (१३.४८६ ज्ञानेश्वरी). या समाधीच्या कालात शारीरिक प्रक्रिया साथ देते. याचे वर्णन 'मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयो: ।' या मागील प्रकरणात सविस्तर दिलेले आहे. याचा अर्थ असा होतो, की 'पूर्वीच्या ऋषी-मुनींना शरीर विज्ञानाची व त्यातील तत्त्वांची चांगलीच माहिती होती असे दिसते. याशिवाय या प्रकारची उपासना सुरू झाली नसती व इतका काळ टिकलीच नसती.

## परब्रह्माची उपासना - सगुण निर्गुण

परमेश्वराची, परब्रह्माची उपासना दोन पद्धतींनी करता येते. एक सगुण उपासना व एक निर्गुण उपासना. आता प्रथम सगुण-निर्गुण या उपासना ज्या दोन आहेत असे म्हटले आहे, जी कल्पना केली आहे तशी ती थोडी चुकीची आहे. सगुण-निर्गुण या दोन पायऱ्या आहेत. परमेश्वर-परब्रह्म हा निर्गुण निराकार असाच आहे. तेव्हा त्याच्या ठिकाणी जर मिळून जावयाचे असेल, तर निर्गुणाचीच उपासना करावयास पाहिजे. मुंबईचे तिकीट काढून व मुंबईच्या गाडीत बसून दिल्लीला पोचता येणार नाही हे निश्चितच. मग ज्या ठिकाणी जावयाचे असेल त्या ठिकाणचे तिकीट काढणे व त्याच गावाला नेणाऱ्या गाडीत बसणे अगदी आवश्यक आहे. म्हणून निर्गुणाची उपासना करणे आवश्यक आहे, पण देहधारी मनुष्याला निर्गुणाची उपासना करणे जास्त अवघड आहे, म्हणून प्रथम सगुणाची उपासना करून व त्या उपासनेमध्ये सिद्धी मिळवून निर्गुणाची उपासना करणे तितके सोपे जाते. म्हणून प्रथम सगुणाची उपासना व नंतर निर्गुणाची उपासना अशा या दोन पायऱ्या आहेत. उपासनेचा मुख्य दुवा मन आहे. मन हे चंचल आहे. चंचल मनाला स्थिर होण्यासाठी कोणते तरी आलंबन लागते. मन हे स्थूल वस्तुमात्राचाच अनुभव घेऊ शकते. त्यामुळे मनाला एखादे स्थूल आलंबन देणे आवश्यक आहे. संत ज्ञानेश्वर म्हणतात–

*'का जे यया मनाचे एक निके । जे देखिले गोडीचिया ठाया सोके ।*
*म्हणूनि अनुभवसुखचि कवतिके । दावीत जाईजे ॥'*

*(६.४२० ज्ञानेश्वरी).*

मनाची धारणा अशी असते की, ज्या गोष्टीची, विषयाची त्याला गोडी लागते त्याच विषयात त्याला रमायला आवडते. याचा फायदा घेऊन सगुण परमेश्वराचे स्वरूप पाहणे, त्याचे भजन करणे, त्याचे कीर्तन, श्रवण करणे, त्याची पूजा-अर्चा करणे अशा अनेक प्रकारे परमेश्वराची सगुण उपासना करण्यात मन तल्लीन होत असेल तर त्याच पद्धतीची उपासना करणे क्रमप्राप्त आहे. ध्यानामध्ये परमेश्वराच्या मूर्तीची मानसपूजा करण्याकडे मनाची आवड वाढवावी. कारण मानसपूजेमध्ये कोणत्याही वस्तूची कमतरता नसते. आपल्या आवडीने देवाला आंघोळ घालण्यापासून ते देवाच्या नैवेद्याला योजलेल्या पदार्थांपर्यंत आपणास कसलीच आडकाठी नसते. त्यामुळे प्रत्यक्ष आपल्या परिस्थितीमुळे वा वस्तूची उपलब्धता नसल्यामुळे ज्या ज्या वस्तू आपण प्रत्यक्ष पूजेमध्ये आणू शकत नाही, त्या त्या वस्तू मानसपूजेमध्ये आणता येतात व मनाचे समाधान होते व मन आनंदित होते. मानसपूजेचे अतिशय चांगले वर्णन व्यंकटेशस्तोत्रात केले आहे. तसेच भागवतातील दशम स्कंदामध्ये भगवंतांनी मानसपूजेचे महत्त्व सांगितले असून मानसपूजेमध्ये परमेश्वराचे ध्यान कसे करावे हेही वर्णन केले आहे. भागवताच्या दशम स्कंदातील चौदाव्या अध्यायातील श्लोक ३६ ते ४६ मध्ये परमेश्वराचे सगुण ध्यानाचे वर्णन केले आहे. ज्या वेळी मानसपूजा करावयाची असेल त्या वेळी ध्यानामध्ये याप्रमाणे वर्णन करावे-

आपल्या देहात जे हृदयकमल आहे, त्याचा दांडा ऊर्ध्वगामी असून कमल अधोमुख आहे. अथवा नाळ अधोमुख असून कमल ऊर्ध्वमुख आहे आणि ते पूर्ण उमललेले आठ दलांचे आणि सकर्णिक आहे असे कल्पून त्या कमळाच्या कर्णिकेत सूर्य, सोम, अग्नी यांची क्रमशः स्थापना करावी. नंतर तेथे त्या अग्निमंडळात माझ्या मंगल स्वरूपाचे ध्यान करावे. ज्याचे अवयव अनुरूप आहेत, ज्याचे मुख अत्यंत शांत, सुंदर आहे, ज्याला दीर्घ सुंदर चार भुजा आहेत, ज्याची मान अतिशय रम्य व सुंदर आहे आणि गाल कोमल-असून, हास्य मनोहर आहे, ज्याच्या एकसारख्या असलेल्या दोन्ही कानांमध्ये मकराकार कुंडले चमकत आहेत, ज्याचे वस्त्र सोन्यासारखे पिवळे आहे, ज्याचा वर्ण मेघाप्रमाणे शामल असून वक्षस्थळावर उजवीकडे श्रीवत्स व डावीकडे श्रीचे स्थान आहे, शंख, चक्र, गदा, पद्म आणि वनमाला ही ज्याची भूषणे आहेत, ज्याची पदकमले नूपुरांनी शोभायमान आहेत, कौस्तुभाच्या कांतीने जे युक्त

आहे, जे अतिशय तेजस्वी किरीट, कडी, कटिसूत्र आणि पोची यांनी युक्त आहे. जे सर्वांगसुंदर असून अतिशय रमणीय आहे, ज्याचे मुख व नेत्र अतिशय प्रसन्न आहेत अशा अतिशय सुकुमार, अत्यंत कोमल स्वरूपाचे, सर्व अंगप्रत्यंगावर मन ठेवून ध्यान करावे आणि इंद्रियांच्या विषयापासून इंद्रियांना मनाने आकर्षित करून विचारी पुरुषाने ते मन बुद्धिरूप सारथ्याच्या साहाय्याने सर्व बाजूंनी माझ्या ठिकाणी स्थिर करावे. भगवंताच्या सर्व अंगप्रत्यंगावर व्यापकतेने असलेले मन ओढून घेऊन एकाच अंगावर स्थिर करावे. नंतर दुसऱ्या कशाचाही विचार मनात आणू नये. फक्त सुहास्यवदनच आपण पाहात आहोत अशी भावना करावी. याप्रमाणे भगवंताच्या मुखावर स्थिर झालेल्या चित्ताला तेथून आकर्षित करून सर्वांचे कारणरूप असलेल्या आकाश तत्त्वाकडे लावावे. नंतर त्याचाही त्याग करून मन शुद्ध ब्रह्मामध्ये आरूढ होऊन निर्विशेष माझ्या स्वरूपात स्थिर व्हावे आणि कशाचेही चिंतन करू नये. (ज्ञेय, ज्ञाता, ज्ञान हे भान हरपून जाते) याप्रमाणे स्वरूपात ज्याची बुद्धी स्थिर झाली असा माझा भक्त मला आत्म्यामध्ये आणि आपला आत्मा सर्वव्यापक अशा माझ्यामध्ये एकरूप झालेला पाहतो. दिव्याच्या ज्योतीमध्ये ज्योत मिळाली असता त्या दोन्ही एकरूप होतात. तद्वत आत्मा व परमात्मा हे एकच होतात. याप्रमाणे अशा तीव्र ध्यानाने ज्याचे माझ्या ठिकाणी चित्त जडले आहे, त्याचा पदार्थ, ज्ञान व कर्म यांसंबंधी असणारा भ्रम दूर होतो, संपूर्ण नाहीसा होतो.

वरील विवेचनात भगवंतांनी प्रथम सगुण ध्यानाची उपासना सांगून पुढे 'आकाश तत्त्वाचे ध्यान करावे' असे सांगितले आणि एकदा मनाचा निर्गुणाचे ध्यान करण्याचा अभ्यास होत गेला की, पुढील प्रक्रिया आपोआप घडत जातात. असेच भगवंत सांगत आहेत. म्हणून निर्गुण उपासनेचे प्रवेशद्वार हे सगुण उपासनेमध्येच आहे हे यावरून स्पष्ट होते. असो.

कोणतीही उपासना निष्ठेने व सातत्याने केली असता निश्चितपणे फलदायी होते. तशी मानसपूजा करणाऱ्या एका गार्डाची कथा येथे नमूद केली आहे.

एक गार्डबाबू असतात. एका मुख्य स्टेशनवरून दुसऱ्या एका मुख्य स्टेशनपर्यंत त्यांचा नित्य नियमितपणे प्रवास ठरलेला होता. साधारण चार तासांचा अवधी त्यांना मिळत असे. त्या काळात मानसपूजा करण्याचा त्यांचा परिपाठ होता. या उपासनेला त्यांना जवळजवळ पस्तीस वर्षे होत आली होती. एकदा असाच त्यांचा प्रवास चालू होता. मानसपूजेमध्ये गार्डबाबू दंग झाले होते. बाहेर पावसाची रिपरीप चालू होती. गार वारा झोंबत होता. मानसपूजा संपली. नैवेद्य दाखवण्याची वेळ आली. वेळेला व

परिस्थितीला अनुसरून गार्डबाबूंना वाटले आज परमेश्वराला गरम भज्यांचा नैवेद्य दाखवावा. मनाने कांदाभज्याची तयारी केली व तळूनही काढली. एका ताटलीमध्ये पहिला घाणा काढला व देवाला नैवेद्य दाखवला. कांदाभज्याचा वास गार्डबाबूंच्या नाकात शिरला. गाडीने धक्का दिला आणि गार्डबाबूच्या पायाला चटका बसला. चटकन पाय बाजूला घेऊन गार्डबाबूने डोळे उघडून पाहिले तर त्यांच्या पायाजवळ एक कांद्याचे गरम भजे पडलेले होते. ते गरम भजे पाहून त्यांना अत्यानंद झाला. त्याने डोळे मिटून परमेश्वराला वंदन केले. त्यांच्या डोळ्यांतून आनंदाश्रूंचा प्रवाह चालू झाला होता. हातातील गरम भजे त्यांनी प्रसाद म्हणून त्याचे सेवन केले. त्याची चव अप्रतिम होती. मुक्कामाला आल्यावर त्यांनी आपल्या नोकरीचा राजीनामा दिला. कारण उपासना फळाला आलेली होती.

तुलसी रामायणामध्ये तुलसीदासांनाही सगुण-निर्गुण यात भेद वाटत नाही.

*'चौ - सगुनहि अगुनहि नहिं कछु भेद। गावाहि मुनि पुरान बुध वेद॥*
*अगुन अरुप-अलख अज जोई। भगत-प्रेम-बस सगुन सो होई॥'*

अर्थ – सगुणात आणि निर्गुणात मुळीच भेद नाही असे मुनी, पुराणे, पंडित व वेद ध्वनित करतात. जो निर्गुण, अरूप अलक्ष्य व जन्मरहित असा आहे. तोच भक्तांच्या प्रेमाला भुलून सगुण रूप घेत असतो. असो.

अशा प्रकारे मनाला सगुण, आलंबन देऊन त्यात तल्लीन होण्याची सवय लागली की, ध्यानामध्ये मनाचा लय होऊन मन क्षणभर निर्गुणामध्ये प्रवेश करते व परत फिरून पुन्हा सगुणाचा आधार घेते. अशा प्रकारे ध्यानाचा अभ्यास सतत चालू ठेवल्याने मनाचा लयस्थितीत जाण्याचा व तेथे टिकून राहण्याचा काल वाढत जातो आणि मनाला हे लक्षात येते की निर्गुणावस्थेत जास्त आनंद आहे. कोणत्याही प्रकारच्या सगुण उपासनेमध्ये मन जागृत असल्याने मनाला शीण होत राहतो. ते थकते व त्याला ग्लानी येते. म्हणजे मनाचा लय होतो. मनाला विश्रांती मिळते. हीच मनाची स्वाभाविक सहजावस्था होय. मनाचा लय म्हणजे बुद्धीचाही लय होतो आणि अंत:करणाचाही लय होतो. हीच खरी समाधी अवस्था होय. समाधी अवस्था ही निर्विकारी अवस्था होय. 'स्वभावोऽध्यात्ममुच्यते॥' या भगवान श्रीकृष्णाच्या सांगण्यावर संत ज्ञानेश्वर म्हणतात–

*'ऐशिया आपुलियाची सहज स्थिती । जया ब्रह्माची नित्यता असती ।*
*तया नाम सुभद्रापति । अध्यात्म गा ।।'*

*(८.१९ ज्ञानेश्वरी).*

मनाची, बुद्धीची, अंत:करणाची, चित्ताची म्हणजे व्यक्तीची, पुरुषाची सहज स्थिती होय आणि या अवस्थेमधूनच अध्यात्म सुरू होते. ही सहज स्थितीच परमेश्वराचे स्वरूप होय, पण या परमेश्वराच्या स्वरूपाची क्षणभर ओळख पटलेली असते. त्याचा अपरोक्ष साक्षात्कार केवळ क्षणभरच झालेला असतो. या अवस्थेचा काळ वाढवणे हेच साधकाचे काम असते. अर्थात हा काल वाढवणे ही गोष्ट काही साधकाच्या हातात नसते, तर ती परमेश्वराची कृपा असते. परमेश्वरावरील श्रद्धा दृढ होण्यासाठी परमेश्वराने लावलेले ते मधाचे बोट असते. म्हणून साधना करणे एवढेच साधकाचे काम असते. तीसुद्धा दृढ श्रद्धेने, निष्ठेने व सातत्याने साधना करणे हे होय.

नारदांची कथा सर्वश्रुत आहेच. नारदांना एकदा त्यांच्या समाधी अवस्थेमध्ये परमेश्वराचे दिव्यदर्शन झाले. त्यामुळे ते खूप आनंदित झाले. त्यांना तो आनंद पुन:पुन्हा मिळावा असे वाटू लागले व परमेश्वराचे ध्यान करून ते दर्शन पुन्हा मिळावे अशी नारदांची इच्छा होती. त्यांनी देवांना अनेक वेळा विनवले. शेवटी परमेश्वराने आकाशवाणीने सांगितले की 'नारदा! तुला जे दर्शन झाले ते या जन्मीच्या तपाचे फळ होते. आता यापुढे तुला या जन्मी पुन्हा असे दर्शन होणार नाही, पण ही साधना तशीच चालू ठेव. पुढील जन्मी तुला माझे प्रत्यक्ष दर्शन घडेल' आणि नारदांनी तीच साधना पुढे जन्मभर चालू ठेवली व त्यानंतरच्या जन्मात त्यांना परमेश्वराचा अखंड सहवास मिळू लागला. म्हणून परमेश्वराने क्षणाचे दर्शन देऊन जरी मधाचे बोट लावले असले, तरी ते मोठे भाग्याचे असते. कारण पुढे कधीतरी वा पुढील जन्मी परमेश्वराचा अपरोक्ष साक्षात्कार होण्याची शक्यता असते.

एकूण सगुण उपासना ही निर्गुण उपासनेच्या आधीची पायरी आहे व त्या पायरीवर प्रत्येक देहधारी मनुष्याला काही काळ (काही जन्म) तरी विश्रांतीसाठी बसावे लागते हे निश्चित होय. या उपासनापद्धती जरी अनेक प्रकारच्या असल्या, तरी भगवंतांनी स्वमुखाने सांगितलेली उपासना हीच खरी खात्रीशीर फल देणारी आहे यात शंका नाही.

*'मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।*
*निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशय: ।।'*

*(१२.८ भ. गी.).*

अर्थ – माझ्याच ठिकाणी मन (व इंद्रिये) स्थापन कर. माझ्यामध्येच बुद्धी प्रवीष्ट कर. (म्हणजे) त्यानंतर माझ्याच ठिकाणी राहशील (मत्स्वरूप होशील) यात संशय नाही.

हा एक प्रकार सांगितला असला, तरी भगवंतांनी गीतेच्या बाराव्या अध्यायात आणखी काही उपासनांचे कथन केले आहे. त्या जरी वरवर पाहता वेगवेगळ्या भासत असल्या, तरी त्या मार्गावरून पुढे गेले असता काही अंतराने मुख्य मार्गाला जाऊन मिळणारे फाटे आहेत याची खात्री पटते. छत्रीला अनेक काड्या असतात. त्यांची बाहेरची टोके एका कापडाला शिवलेली असतात व आतील टोके छत्रीच्या मध्यभागी गुंतवलेली असतात. तशी वेगवेगळ्या उपासनांची अवस्था आहे असे म्हटले तरी चालेल. या उपासना व्यक्तिभेदाने वेगवेगळ्या सांगण्याचे वा करण्याचे कारण प्रत्येक व्यक्तीची क्षमता होय. प्रत्येक व्यक्तीची क्षमता वेगवेगळी असते कारण त्याची मागील जन्मी जी उपासना चालू असेल व अर्धवट राहिलेली असेल त्यापुढेच ती उपासना चालू करण्याविषयी प्रेरणा या जन्मी होते. मागच्या जन्मी किती अभ्यास झाला होता? किती प्रगती झाली होती? यावरच या जन्मी पुढील प्रगती सुरू होणार असते. त्यामुळे जो ज्या प्रगतीपर्यंत आला असेल त्याच्या पुढे जाण्यासाठी योग्य अशीच उपासना करण्याची इच्छा, प्रेरणा त्या साधकाला होते व त्याप्रमाणे तो ती उपासना करू लागतो. त्यामुळे कोणती उपासना चांगली व कोणती वाईट, कोणती श्रेष्ठ व कोणती कनिष्ठ असा भाग यात येत नाही. सर्व उपासना चांगल्याच असतात. गुळाचा खडा जरी कोठूनही खाल्ला तरी गोडच लागतो. तसे अनेक मार्ग असले तरी शेवटचे ध्येय एकच आहे. आणि ते म्हणजे परमेश्वरप्राप्ती, ब्रह्मप्राप्ती होय.

ब्रह्म हे निर्गुण निराकार असले तरी, नव्हे म्हणूनच ते सर्वगुणसंपन्न आहे. तेव्हा ब्रह्मस्वरूप व्हावयाचे म्हणजे सर्वगुणसंपन्न होणे ही आवश्यकता आहे. तेव्हा ते गुण कोणते तेही भगवंत सांगत आहेत.

*अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।*
*निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥*

*संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।*
*मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मत् भक्तः स मे प्रियः ॥*

*यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।*
*हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥*

*अनपेक्षः शुचिर्दक्षः उदासीनो गतव्यथः ।*
*सर्वारम्भपरित्यागी यो मत् भक्तः स मे प्रियः ॥*

*यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न काङ्क्षति ।*
*शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥*

*समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।*
*शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ॥*

*तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।*
*अनिकेतः स्थिरमतिः भक्तिमान्मे प्रियो नरः ॥*

*(१२.१३ ते १९ भ. गी.).*

अर्थ – कोणत्याही भूतांचा द्वेष न करणारा, मित्रत्वाने वागणारा, दयाळू, ममत्वबुद्धी व अहंकार हे सुटलेला, सुखदुःखाला सम मानणारा, क्षमाशील, सदा संतुष्ट योगी, संयमी, जो नेहमी कर्तव्यतत्पर, मनोनिग्रही, दृढनिश्चयी आणि माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणीच मन व बुद्धी अर्पण करणारा असतो, तो भक्त मला प्रिय होतो. ज्याच्यामुळे लोकांना त्रास वाटत नाही, जो लोकांमुळे त्रासत नाही आणि जो हर्ष, क्रोध, भय व त्रास यांपासून मुक्त असतो तो मला (परमेश्वराला) प्रिय होतो. जो माझा (परमेश्वराचा) भक्त निःस्पृह शुद्धाचरणी, कर्तव्यतत्पर, अनासक्त, निश्चिंत व सर्व उठाठेवी सोडून दिलेला असा असतो, तोच मला प्रिय होतो. जो (कशाचाही) हर्ष मानत नाही, द्वेष करीत नाही, शोक करीत नाही, अभिलाषा ठेवीत नाही, तसेच जो शुभ किंवा अशुभ कर्मफलाचा त्याग करणारा असून भक्तिमान असतो, तो मला (परमेश्वराला) प्रिय होतो. शत्रू आणि मित्र यांविषयी त्याचप्रमाणे मान किंवा अपमान यांविषयी ज्याची बुद्धी सारखी असते (शत्रू-मित्राविषयी सारखीच हितबुद्धी व मानपमानाविषयी चित्ताची सारखीच स्थिरता म्हणजे समबुद्धी), शीत, उष्ण, सुख, दुःख यांमध्ये सम म्हणजे शांत (तितिक्षावान), आसक्तीरहित, निंदा व स्तुती सारखीच (उपेक्ष्य) मानणारा विचारवान, ज्यावेळी जे असेल त्यात संतोष मानणारा (प्राप्त परिस्थितीविषयी कुरकुर न करणारा), कोणत्याही आश्रयावर अवलंबून न राहणारा, स्थितप्रज्ञ व भक्तिमान पुरुष मला (परमेश्वराला) प्रिय होतो.

जवळजवळ चाळीस गुणांची ही यादी भगवंतांनी दिली आहे. अर्थात हे सर्व गुण अंगी बाणवण्याचा खास प्रयत्न करण्यासाठी वेगळी उपासना करावयास पाहिजे असे नाही. कारण परमेश्वरप्राप्तीच्या ज्या उपासना सांगितल्या आहेत, त्या करताना हे सर्व गुण हळूहळू अंगी येतातच, अशा आहेत. ब्रह्मसाक्षात्कार होणे म्हणजे हे सर्व गुण अंगी आल्यासारखेच आहेत किंवा हे सर्व गुण अंगी आले की ब्रह्मसाक्षात्कार होणार हे निश्चित समजावे.

संत रामदासस्वामींनी दासबोधामध्येही सगुण-निर्गुणामध्ये अभेद सांगितला आहे.

*'आत्मा पूर्णत्वे परिपूर्ण। जेथ नाही गुणागुण। निखळ निर्गुणी आपण।*
*कोण कैचा ॥ त्वंपद, तत्पद, असिपद। निरसुनि सकळ भेदाभेद।*
*वस्तु ठाईची अभेद। आपण कैचा ॥'*

*(दशक ४, समास ९, ओवी १९, २० दासबोध).*

## गुण विशेषणात्मक ईश्वर - परमात्मा - परब्रह्म

गुण हे दोन प्रकारचे असतात- सद्‌गुण व दुर्गुण. सद्‌गुणाच्या विरुद्ध आहेत ते दुर्गुण. संत ज्ञानेश्वरांनी ज्ञानी व्यक्तीचे वर्णन करून ज्ञानीयांची लक्षणे सांगितली आहेत व त्याच्या विरुद्ध ते अज्ञान असे म्हणून अज्ञानांचीही लक्षणे सांगितली आहेत, पण या ठिकाणी फक्त सगुणांचाच विचार होणार आहे आणि त्यासाठी स्वतंत्र प्रकरण पुढे आले आहे. या ठिकाणी फक्त सद्‌गुण व परमेश्वर परमात्मा यांचा काही संबंध आहे का, याचा विचार केला आहे.

सद्‌गुण हे आदर्शरूपाने दाखवलेले असतात. 'प्रामाणिकपणा' एक सद्‌गुण आहे. प्रामाणिकपणा त्या व्यक्तीत प्रसंगानुरूप, व्यक्तिभेदाने थोडाफार प्रमाणात बदलत असतो. हा खरा प्रामाणिकपणा नव्हे. पराकोटीच्या प्रामाणिकपणाचे एक उदाहरण आहे ते म्हणजे दादोजी कोंडदेव, शिवाजी महाराजांचे गुरू. एकदा दादोजी महाराजांच्या आमराईतून हिंडत होते. दोन पाडाचे आंबे त्यांनी महाराजांना न विचारता तोडले. आपले कृत्य त्यांच्या लक्षात येताच ते आपला हात तोडून टाकण्यास निघाले, पण महाराजांनी त्यांना समजावले व त्यांचे मन वळवले. तरीही आपल्या अपराधाची आठवण म्हणून त्यांनी आपल्या अंगरख्याची ती बाही काढून टाकली व जन्मभर त्याच पद्धतीचा अंगरखा ते वापरत होते. असो. यापेक्षाही काही पराकोटीच्या प्रामाणिकपणाची उदाहरणे असतील. म्हणजे ज्याला पराकोटीचा प्रामाणिकपणा

म्हणतात, तो निश्चितच असला पाहिजे. एकूण एक आदर्श गुण ही केवळ कल्पना नसून ती वास्तवात कोठेतरी असण्याची शक्यता असते. त्याचप्रमाणे खरे बोलणे, दया, क्षमा, शांती अशा अनेक गुणांची यादी करता येईल. तसेच ऐश्वर्यवान, बलवान, सामर्थ्यवान, स्वरूपवान अशाही प्रकारच्या गुणांची यादी करता येईल, तसेच प्रेमस्वरूप, वात्सल्यमूर्ती, समभाव ठेवणारा, अशाही गुणांची यादी असेल तर कठोर न्यायी, भेदाभेद न मानणारा, आपपर भाव नसलेला, तर उदार, दानी अशा अनेक प्रकारच्या गुणांची यादी करता येईल. या गुणांमध्ये कोणी कोणी व्यक्ती अगदी नाव घेण्यासारख्या आहेत. पूजनीय, वंदनीय, आदर्श आहेत. पण त्या व्यक्तींमध्ये वरीलपैकी एखादाच गुण असतो. बाकीचे गुण त्यांच्या ठिकाणी नसतात. अर्थात बाकीचे गुण त्यांच्या ठिकाणी त्या पूर्ण प्रमाणात नसणे हा त्या व्यक्तीचा दोष होऊ शकत नाही. तशी अपेक्षाही कोणाची नसेल. तसे त्या व्यक्तीचे सामर्थ्यही नसेल. त्यामुळे ते सर्व गुण त्यांना आत्मसात करता आले नसतील.

मग असे शंभर टक्के गुण आत्मसात असलेली एखादी व्यक्ती, शक्ती असू शकेल काय? असू शकेल. पण कोणी म्हणेल ते शक्य नाही. पण या विषयाचा विचार करता एक उदाहरण आठवले. ते म्हणजे पृथ्वीचे. ज्या पृथ्वीवर आपण राहतो व या पृथ्वीतून आपण इतक्या वस्तू निर्माण केल्या आहेत की पृथ्वीच्या मातीत एवढे प्रकार असतील अशी आपल्याला सांगूनही कल्पना आली नसती. जी जी वस्तू आपण आठवाल, पाहाल, वापरत असाल ती वस्तू ही पृथ्वीच्या गर्भातूनच उत्पन्न झालेली आहे याची आपल्याला कल्पना असेल. अशी कोणतीही वस्तू नाही की जी तयार करण्यासाठी या पृथ्वीच्या बाहेरून एखादी वस्तू आणावी लागते व मगच ती वस्तू बनते. पण 'अतिपरिचयात् अवज्ञा' या न्यायाने संशोधनातून निर्माण झालेल्या या वस्तू त्या त्या संशोधकाच्या नावे जातात. पण पृथ्वीमातेला कोणीच श्रेय, थोडेही श्रेय देत नाही. एवढेच नव्हे तर आपण पूर्णपणे विसरून गेलो आहोत की हे जे दिसते, जे जे बनले जाते, बनवले जाते याला आधार एकच आणि तो म्हणजे ही पृथ्वी. म्हणजे याचा अर्थ पृथ्वी ही संपूर्ण प्रकारच्या धातूंनी संपन्न आहे. एवढेच नव्हे तर, या पृथ्वीपासून आज हजारो, लाखो वर्षे विविध धातूंचे उत्पादन काढत आहेत. तरी ही पृथ्वी आता कोणत्यातरी वस्तुमात्राला, उत्पन्न करण्यास अक्षम झाली आहे असे कोणीही म्हणत नाही आणि पुढेही हजारो, लाखो वर्षे असेच अनेक संशोधक, लोक, शेतकरी वगैरे या पृथ्वीपासून हीच व यापेक्षाही वेगवेगळी उत्पादने काढत राहतील, तरीही त्याला कच्चा माल पुरवणारी ही पृथ्वीच असेल. म्हणजे ही पृथ्वी सकल वस्तू

उत्पादन करण्याचे, उत्पादनास साह्य करण्याचे निधान आहे. अशा या पृथ्वीच्या तोडीची कोणतीही वस्तू नाही वा व्यक्तीही नाही.

पृथ्वी ही जड आहे. म्हणून पृथ्वीपासून सर्व जड वस्तूंचाच पुरवठा होत राहिला आहे. अर्थात त्या वस्तू जड असल्या तरी त्यात सूक्ष्म चैतन्याचा अंश आहेच. तीच गोष्ट पाण्याची. जगाच्या सुरुवातीपासून नव्हे विश्वाच्या उत्पत्तीपासून पाणी आहे. नदीच्या रूपाने पाण्याचा प्रवाह वाहात आहे. नद्या थांबल्या असा एकही क्षण नाही. पाण्यावाचून कोणाचेही जीवन चालू शकणार नाही. त्याही पाण्याची उपलब्धता सर्वांना, सर्वकाळी, सर्ववेळी आणि रावापासून रंकापर्यंत कोणालाही आहे. तीच गोष्ट वायूची, प्राणवायूची. सर्व प्राणिमात्रांच्या श्वासामधून प्राणवायूचे ज्वलन होत असून पुन्हा तितक्याच प्रमाणात तो उत्पन्न होण्याची स्वाभाविक रचना या सृष्टिचक्रामध्ये आहे. त्यामुळे कधी कोणाला प्राणवायू कमी पडला आहे असे कधीही घडणार नाही. हाही प्रकार पूर्वापार चालत आलेला आहे व पुढेही चालत राहणार आहे की, ज्याला अंत नाही. या सर्व प्राणिमात्रांच्या संचाराला, वास्तव्याला, उद्योगाला अवकाश हा तर फार मोठा आधार उपलब्ध आहे. तो कधी कमी होणार आहे वा कधी कमी होण्याची शक्यता नाही. पृथ्वी, पाणी, अग्नी, वायू व आकाश या जशा अद्‌भुत वस्तू आहेत की ज्यांना पर्यायच नाहीत. त्याच यादीत सूर्य हा तारासुद्धा येतो. आपले जीवन सूर्याशिवाय चालणे शक्य नाही. एवढेच नव्हे तर या सर्वांमध्ये जो नियमितपणा आहे, सातत्य आहे, पूरकपणा आहे, सामर्थ्य आहे, ते काय स्वयंभू आहे. तर नाही. शास्त्रज्ञांनी या सर्वांच्या निर्मितीचा काल काही कोटी वर्षे म्हणून जाहीर केला आहे. हा काल त्यांच्या संशोधनातून, काही विशिष्ट आडाखे बांधून, गणिती पद्धतीने वगैरे ठरवला, मोजला आहे व तो बरोबर की चूक हा प्रश्न येथे येत नाही. याचा अर्थ एवढाच की, या वस्तू काही काळापूर्वी सध्या असलेल्या अवस्थेत नव्हत्या. म्हणजे या वस्तूचा जन्म त्या वेळी झालेला नव्हता. तो त्या काळापासून झाला.

'अभावातून कोणतीही वस्तू उत्पन्न होत नाही' हे वेदांचे सूत्र आहे. तेच शब्द भगवान श्रीकृष्णाने गीतेत सांगितले आहेत.

*'नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सत: ।*

*(२.१६ भ. गी).*

अर्थ – जे नश्वर (असत्) आहे. त्याचे अस्तित्व (भाव) टिकत नाही आणि जे शाश्वत (सत्) आहे, त्याचा अभाव होत नाही. ते नाहीसे कधी होत नाही.

या सूत्रावरून ज्या काही वस्तू दिसतात, (ठळकपणे-पंचमहाभूते) त्या सध्या जरी स्थूल रूपाने असल्या, तरी पूर्वी त्या कधीतरी सूक्ष्म रूपाने होत्या हेच सिद्ध होते. वटबीजामध्ये संपूर्ण वटवृक्ष हा सूक्ष्म रूपाने अस्तित्वात होता म्हणून तो बाहेर प्रकट होऊन स्थूल रूपाने अवतीर्ण झाला. त्याच न्यायाने हे सर्व विश्व, विश्वातील वस्तू यासुद्धा सूक्ष्म रूपाने कोणत्यातरी बीजात-अस्तित्वात होत्या. त्याच आता स्थूल रूपाने अवतीर्ण झाल्या आहेत. स्थूल वस्तू या इंद्रियगम्य असतात. पण सूक्ष्म वस्तू या इंद्रियगम्य असतीलच असे नाही. तरीही त्या अस्तित्वात असतात, त्यांचा प्रत्यय येतो, अनुभूती येते, त्या जाणवतात आणि त्यामुळे त्या आहेत असे आपण मानतो. आणखी एक गोष्ट महत्त्वाची आहे. अनुभवणे, जाणवणे, ही प्रक्रिया सगळ्यांच्याच बाबतीत होते असे नाही. त्याची कारणे, ज्ञान, अभ्यास, क्षमता यांची पातळी तेवढी असावी लागते आणि ती पातळी, त्या उंचीवरची नसेल तर ते अनुभव, प्रत्यय, जाणीव येत नाही; अशांना, ज्यांना ही क्षमता आहे व ज्यांना ही अनुभूती, प्रत्यय, जाणीव आली आहे, त्यांच्या विधानावर विश्वासून राहिले पाहिजे व त्यांनी ज्या मार्गाने हे सामर्थ्य मिळवले असेल त्या मार्गाने जाऊन ते सामर्थ्य मिळवून त्यांनी या अनुभूतीचा, प्रत्ययाचा, जाणिवेचा लाभ घेतला पाहिजे. याला दृष्टान्त द्यावयाचा असेल तर - समजा एक तरुण एका मोठ्या टेकडीवर चढून गेला आहे. तेथून त्याला जे काही दिसले, अनुभवले, जाणवले ते खूप अप्रतिम, सुंदर, अलौकिक, अनुपमेय वगैरे काही आहे. म्हणून तो जर काही वर्णन करू लागला तर खाली उभ्या असलेल्यांनी ते ऐकून त्याच्यावर विश्वास ठेवावा व आनंद मानावा, नाही तर आपणही त्या उंचीवर जाऊन त्याचा प्रत्यक्ष अनुभव घ्यावा. याच पद्धतीने पूर्वीच्या ऋषीमुनींनी, तपस्वी लोकांनी या विश्वाचे असलेले मूळ सूक्ष्म स्वरूप अनुभवले असले पाहिजे, त्यांना त्याचा प्रत्यय आला असला पाहिजे, त्यांना त्याची जाणीव झाली असली पहिजे म्हणून त्यांनी त्याचे वर्णन करून ठेवले आहे. त्यावर आपण विश्वास ठेवला पाहिजे. ते स्वरूप म्हणजे ब्रह्म होय. ब्रह्म हे विश्वाचे बीज आहे. यातून सर्व विश्वाचा पसारा उत्पन्न झाला आहे, वाढला आहे, वाढत आहे. म्हणून ते बीज अनादी आहे व अनंतही आहे. हे ब्रह्म म्हणजे परमेश्वर आहे, ईश्वर आहे, नावे अनेक असतील तरी अर्थ एक आहे आणि ते जाणून घेण्याचे जे शास्त्र आहे ते अध्यात्मशास्त्र आहे व त्याच्या अभ्यासाचा जो मार्ग आहे त्याला अध्यात्ममार्ग म्हणतात. या अध्यात्मशास्त्राचा अभ्यास करण्यास कोणतीही जात, धर्म, वय, स्त्री-पुरुष, देश, काल, स्थिती यांचे बंधन नाही. कोणालाही हा मार्ग मोकळा आहे. ज्याप्रमाणे रस्त्यावरून कोणालाही प्रवास करण्यास मुभा असते अगदी तसेच. पूर्वीच्या ऋषीमुनींनी या शास्त्रांचा अभ्यास करून काही निष्कर्ष काढले

त्याचप्रमाणे देशोदेशीच्या संशोधकांनी, तत्त्वज्ञानांनीही काही निष्कर्ष काढले व विधाने केली आहेत आणि विशेष म्हणजे देशकाल स्थिती, जात, धर्म, स्त्री, पुरुष, भाषा यासर्वबाबतीत पूर्ण भिन्नता असूनही त्यांचे निष्कर्ष मात्र एकाच स्वरूपाचे आहेत. चालताना कोणी मागे पुढे असतात. पण सर्व जण एकाच मार्गाने जात असतात व दृष्टीच्या टप्प्यात असतात तशी ही विधाने आहेत, असे म्हणता येईल. याचे कारण प्रत्येकाची अनुभूती, प्रत्यय, जाणीव ही अगदी शंभर टक्के सारखी असतेच असे नाही. यात जेवढा फरक आहे, असेल, तेवढाच फरक त्यांच्या गणिताच्या उत्तरात असणार आहे एवढेच.

जगाचे व जीवनाचे कोडे कसे सोडवावयाचे? या अध्यात्मक्षेत्रीय मूलगामी प्रश्नाचे सर्वतोपरी समाधानकारक उत्तर आपणास इंद्रियगम्य दिक्कालस्थित जगाविषयी कितीही विचार केला तरी सापडत नाही. यास्तव या इंद्रियगम्य जगापलीकडे (म्हणजे इंद्रियगम्य जगास व्यापून, त्याहीपेक्षा विशालतर असे) काही अंतिम सत्य अथवा सद् वस्तू (Reality) असावी, असा कयास जगभरच्या अनेक तत्त्ववेत्त्यांनी केला आहे. या कयासाधारेच शंकराचार्यांनी मायेपलीकडच्या 'ब्रह्म' तत्त्वाचे प्रतिपादन केले आहे. ग्रीक तत्त्वज्ञ प्लेटो यांनी 'चंचल वस्तू जातीचे इंद्रियगम्य जग' (The sensible world of Transient objects) या पलीकडच्या 'अमृतत्वाची बुद्धिगम्य दुनिया' (The Intelligible world of immortal ideas) संबंधाने आपला जगप्रसिद्ध सिद्धान्त मांडला. जर्मन तत्त्वज्ञ कँट यांनीही 'इंद्रियगम्य वस्तूचे जग' (The world of sesible phenomena) या पलीकडच्या 'बुद्धिगम्य वस्तू तन्मात्राची दुनिया' (The world of Intelligible Noumena) संबंधाने आपला विश्वविख्यात प्रस्ताव मांडला. त्याचप्रमाणे ब्रिटिश तत्त्वज्ञानी ब्रॅंडली यांनीही 'आत्मव्याधात दूषित इंद्रियगम्य वस्तूचे जग' (The world of selfcontradictory Appearances) या पलीकडल्या 'परिपूर्णतया आत्मसुसंगत सद्वस्तू' (Perfectly harmonious Reality) संबंधाने लक्ष्यवेधी विचार मांडले. विट्गेस्टाईन यांनीही 'What is' (जे आहे ते अथवा प्रत्यक्षातला अनुभवगम्य पसारा) आणि 'What ought to be' (जे असावे ते. अथवा आदर्शाची दुनिया) या दोहोंमधला नीतिशास्त्रीय भेद मनात बाळगून नीतिमूल्ये ही प्रत्यक्षातल्या अनुभवगम्य वस्तूच्या पसाऱ्यात नांदत नाहीत. त्यांची काही एक विशालतर न-वक्तव्य दुनिया असली पाहिजे असे मत मांडले. त्यांचे मत नीतिशास्त्रज्ञ जी. ई. मूर यांच्या शिकवणीशी सुसंगत होते (परामर्श, मे १९९८ - लेखक - श्री. शं. हि. केळकर).

बीजामध्ये सर्व वटवृक्षाची प्रतिकृती समाविष्ट असते. हे अगदी ढोबळ विधान झाले. पण बीजामध्ये काय काय आरेखलेले असते, याचा विचार केला म्हणजे त्या आरेखनाचे सूक्ष्मपण लक्षात येते. पूर्ण विस्तार पावलेला वृक्ष हा त्या आकारमानाने त्या बीजात होताच, पण सूक्ष्मपणाने म्हणजे फांद्या, पारंब्या, पाने, पानांच्या शिरा, फुले, फुलांचे पराग, फळे, फळांचा गर, त्यांतील बिया व त्या बियांतील पुढील वृक्षाची प्रतिकृती, या तर स्थूल म्हणजे प्राकृतिक गोष्टी झाल्या, पण फुलांचा सुगंध व फळांची चवही त्यात समाविष्ट असते. त्यातल्या त्यात कच्च्या फळाची चव व पिकलेल्या फळाची चव जी सूक्ष्म रूपानेसुद्धा कोणत्याही दुर्बिणीतून दाखवता येणार नाही. ती पण त्या बीमध्ये असते. म्हणजे ज्या ज्या गोष्टी बाहेर प्रकट झाल्या, इंद्रियगोचर झाल्या त्या सर्व त्या बीजात, ज्या अगदी सूक्ष्म असून इंद्रियगोचर नव्हत्या त्या समाविष्ट होत्या. अगदी हेच उदाहरण या विश्वाच्या निर्मितीसाठी का घेऊ नये. या सृष्टीत, विश्वात जे जे काही इंद्रियगम्य आहे व जे काही इंद्रियगम्यही नाही पण जाणवते, अनुभवास येते, प्रतीत होते, ते ते सर्व ब्रह्मबीजात समाविष्ट असलेच पाहिजे. कारण भावापासूनच सर्व उत्पन्न होते. अभावापासून काहीच उत्पन्न होत नाही. म्हणून जे काही आहे ते जरी इंद्रियगम्य नसले तरी काहीतरी आहे व त्याचाच सर्वांनी वेगवेगळ्या नावांनी निर्देश केला आहे व त्यालाच ब्रह्महो म्हणतात.

ब्रह्म इंद्रियगम्य नसल्याने त्याविषयी अनेकांनी त्याला तर्काच्या व युक्तिवादाच्या विचारांचा आधार घेऊन सिद्ध करण्याचा प्रयत्न केला आहे. त्याच्याच युक्तिवादाचा व तर्काचा विचार 'परामर्श' मे १९९८ च्या तत्त्वज्ञान अधिवेशनाच्या अंकात तो विषय प्रथम प्रकरणात श्री. अ. ग. जावडेकर यांच्या लेखातून स्पष्ट झाला आहे.

## परब्रह्माची सृष्टीतील रूपे

श्रीमत् भगवत् गीतेत भगवान श्रीकृष्ण अर्जुनाला सृष्टीत परमेश्वर कोणकोणत्या रूपाने असतो हे सांगत आहेत. १) आत्मा, २) आदी, मध्य व अंत रूपाने, ३) आदित्यांमध्ये विष्णू, ४) सूर्य, ५) मरुतांमध्ये मरिची, ६) नक्षत्रांमध्ये चंद्र, ७) वेदांमध्ये सामवेद, ८) देवांमध्ये इंद्र, ९) इंद्रियांमध्ये मन, १०) रुद्रांमध्ये शंकर, ११) धनपतींमध्ये कुबेर, १२) वसूंमध्ये पावक, १३) पर्वतांमध्ये मेरू पर्वत), १४) पुरोहितांमध्ये बृहस्पती, १५) सेनानायकांमध्ये स्कंद, १६) जलाशयांमध्ये समुद्र, १७) महर्षींमध्ये भृगू, १८) देवर्षींमध्ये नारद, १९) गंधर्वांमध्ये चित्ररथ, २०) सिद्धांमध्ये कपिलमुनी, २१) अश्वांमध्ये उच्चैःश्रवा, २२) हत्तींमध्ये ऐरावत,

२९) नरांमध्ये राजा, २४) शस्त्रांमध्ये वज्र, २५) धनूंमध्ये कामधेनू, २६) प्रजोत्पत्तीसाठी मदन, २७) सर्पांमध्ये वासुकी, २८) नागांमध्ये शेष, २९) जलदेवतांमध्ये वरुण, ३०) पितृगणांमध्ये अर्यमा, ३१) निग्रह करणाऱ्यांमध्ये यम, ३२) दैत्यांमध्ये प्रल्हाद, ३३) गणना करणाऱ्यांमध्ये काल, ३४) पशूंमध्ये सिंह, ३५) पक्षांमध्ये गरुड, ३६) पावन करणाऱ्या वस्तूंमध्ये पवन, ३७) शस्त्रधारींमध्ये राम, ३८) मत्स्यांमध्ये मकर, ३९) प्रवाहांमध्ये गंगा, ४०) सृष्ट पदार्थांचा आदी - अंत - मध्य. ४१) विद्यांमध्ये अध्यात्मविद्या, ४२) वक्त्यांमधील वाद, ४३) वर्णमालेतील अक्षर 'अ', ४४) समासांमध्ये द्वंद्व समास, ४५) अक्षय काल, ४६) जगाचे धारण पोषण करणारा विश्वरूप परमेश्वर, ४७) लय करणाऱ्यांत मृत्यू, ४८) पुढे निर्माण होणाऱ्या पदार्थांचा उगम, ४९) स्त्रियांमध्ये कीर्ती, श्री, वाणी, स्मृती, मेधा, धृती व क्षमा, ५०) सामसूक्तांमध्ये बृहत्साम, ५१) वैदिक छंदांमध्ये गायत्री, ५२) मासांमध्ये (महिन्यांमध्ये) मार्गशीर्ष, ५३) ऋतूंमध्ये वसंत ऋतू, ५४) कपटाचरण करणाऱ्यांमध्ये जुगार, ५५) पाणीदार लोकांमधील पाणीदारपणा, ५६) तेजस्वी लोकांतील तेज, ५७) जय, ५८) निश्चय, ५९) सत्त्वगुण, ६०) वासुदेव, ६१) अर्जुन, ६२) व्यासमुनी, ६३) उशना कवी, ६४) दमन करणाऱ्यांचा दंड, ६५) विजयेच्छू लोकांची नीती, ६६) गुप्त गोष्टींचे गोपन, ६७) ज्ञानी पुरुषांचे ज्ञान, ६८) सर्व पदार्थांचे बीज, ६९) हे विश्वच भगवंतांनी एका अंशाने व्यापून टाकले आहे व परमेश्वर या विश्वाला धारण करून राहिला आहे.

ऐतरेय उपनिषदातसुद्धा परमेश्वराचे स्वरूप कशा कशामध्ये आहे. परमेश्वर कशा कशा रूपाने या विश्वात भरून राहिला आहे याचे वर्णन असे केले आहे-

*'येन वा पश्यति, येन वा श्रृणोति, येन वा गन्धान् आजिघ्रति, येन वा वाचं व्याकरोति, येन वा स्वादु च अस्वादु च विजानाति। येदतद् हृदयं मनश्च एतत्। सज्ञानं, अज्ञानं, विज्ञानं, प्रज्ञानं, मेधा, दृष्टिर, धृतिर्, मतिर्, मनिषा, जूतिः स्मृतिः, संकल्पः, ऋतुरसुः, कामो वश इति। सर्वाणि एव एतानि प्रज्ञानस्य नामधेयानि भवन्ति ॥'*

अर्थ – ज्याने (माणूस) पाहतो, ज्याने ऐकतो, ज्याने गंधाचा वास घेतो, ज्याने वाणी व्यक्त करतो, ज्याने स्वादू आणि अस्वादू जाणतो, जे हे हृदय आणि जे हे मन आहे. संकलन शक्ती, आकलन शक्ती, विश्लेषण शक्ती, प्रज्ञा, मेधा, दृष्टी, धृती, मनन शक्ती, विवेक, प्रेरणा, स्मृती, संकल्प, कर्म-निर्णय, प्राणवृत्ती, कामना, स्वाधीनता ही सर्व प्रज्ञानाची नावे आहेत.

*'एष ब्रह्मा । एष इंद्र । एष प्रजापतिः । एते सर्वे देवाः । इमानि च पंच महाभूतानि, पृथिवि, वायुराकाश आपो ज्योतीषि इत्येतानि । इमानि च क्षुद्रमिश्राणीव बीजानि । इतराणि चेतराणि च । अंडजानि च जारुजानि च । स्वेदजानि च उद्भिज्जानि च । अश्वा गावः पुरुषा हस्तिनः । यत्किंच इदं प्राणि जंगमं च पतत्रि च । यच्च स्थावरम् । सर्वं तत् प्रज्ञानेत्रम् । प्रज्ञाने प्रतिष्ठितम् । प्रज्ञानेत्रो लोकः । प्रज्ञा प्रतिष्ठा । प्रज्ञानं ब्रह्म ॥'*

अर्थ – हा ब्रह्मा आहे. हा इंद्र आहे. हा प्रजापती आहे. हे सर्व देव आहेत. ही पंचमहाभूते आहेत. पृथ्वी, वायू, आकाश, आप आणि तेज अशी ही आहेत. जणू ही क्षुद्र आणि मिश्र अशी बीजे आहेत तशीच इतर सटर-फटर, अंडज, जारज, स्वेदज, उद्भिज, घोडे, गायी, पुरुष, हत्ती तसेच हे सर्व प्राणी, जंगम, पक्षी आणि स्थावर हे सर्व प्रज्ञेमुळे डोळस आहेत, प्रज्ञानात स्थिर आहेत, हा लोक प्रज्ञेने डोळस आहे. प्रज्ञाच प्रतिष्ठा आहे. प्रज्ञाच ब्रह्म आहे.

*'स एतेन प्रज्ञेनात्मना अस्मात् लोकात् उत्क्रम्य, अमुष्मिन् ।*
*स्वर्गे लोके सर्वान् कामानाप्त्वा अमृतः समभवत् समभवत् ॥*

अर्थ – तो (म्हणजे हे जाणणारा ज्ञानी वामदेवासारखा) या प्रज्ञायुक्त आत्म्याने या लोकांतून वर जाऊन उत्क्रमण करून त्या स्वर्गलोकात सर्व वासनांना प्राप्त करून अमृत झाला (अमृत) आहे.

अशा प्रकारे परमेश्वराचे स्वरूप सर्व विश्वात भरून आहे. हेच वरील विभूती व ऐतरेय मंत्रावरून लक्षात येते. येथे पशू, पक्षी, नद्या, पर्वत, नाग, साप, वृक्ष, ग्रह, नक्षत्र, वायू, पितृगण, देव, मुनी, ऋषी, छंद, विद्या, अध्यात्मज्ञान, ब्रह्मा, विष्णू, रुद्र, आत्मा आणि सर्व पदार्थांचे बीज, एकूण सर्व दृश्य वस्तुमात्रांत परमेश्वराचे स्वरूप आहे असे भगवंतांनी सांगितले. मग तेच विश्वरूपात कसे सामावलेले आहे हेही दाखवले आणि मग भगवंत वृक्षरूपाने या विश्वाचा विस्तार कसा झाला याचे वर्णन करून सांगत आहेत–

*ऊर्ध्वमूलमधःशाखम् अश्वत्थं प्राहुरव्ययम् ।*
*छन्दांसि यस्य पर्णानि यस्तं वेद स वेदवित् ॥*

*अधश्चोर्ध्वं प्रसृतास्तस्य शाखा गुणप्रवृद्धा विषयप्रवालाः ।*
*अधश्च मूलान्यनुसन्ततानि कर्मानुबन्धीनि मनुष्यलोके ॥*

*न रूपमस्येह तथोपलभ्यते नान्तो न चादिर्न च संप्रतिष्ठा।*
*अश्वत्थमेनं सुविरूढमूलम् असंङ्गशस्त्रेण दृढेन छित्वा॥*

*(१५.१ ते ३ भ. गी.).*

अर्थ – भगवान म्हणाले, ज्याचे मूळ ऊर्ध्व (सर्वांत उंच अर्थात मूलप्रकृती) आहे, ज्याची शाखा म्हणजे अग्र खाली (नामरूपात्मक जड सृष्टी) आहे, (अशा या) अखंड सृष्टीला अश्वत्थ वृक्ष म्हणतात. वेद ही या वृक्षाची पाने आहेत. जो या वृक्षाला पूर्णपणे जाणतो, तो वेदवेत्ता (ज्ञानविज्ञानसंपन्न) होय. (सत्त्व, रज, तम या तीन) गुणांनी वाढलेल्या व (शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध) विषय ज्याच्यावर अंकुराप्रमाणे आहेत, अशा त्या वृक्षाच्या शाखा (फांद्या) खालीवर पातालादी लोकांपासून स्वर्गादी लोकांपर्यंत पसरलेल्या आहेत आणि कर्मबंधरूप मुळ्या खाली मानवजातीमध्ये लांबवर पसरल्या आहेत. येथे (अज्ञान दशेत) याचे (संसाररूप वृक्षाचे) रूप - आकार दिसत नाही. त्याचप्रमाणे त्याचा अंतही (दिसत नाही) व स्थितीही (मध्यही) दिसत नाही. ज्याच्या मुळ्या पुष्कळ खोल गेल्या आहेत, अशा या (संसाररूप) अश्वत्थवृक्षाला अनासक्तिरूप तीक्ष्ण शस्त्राने तोडावे.

कठोपनिषद्रामध्येही यमाने नचिकेताला या संसारवृक्षाचे वर्णन करून सांगितले आहे. शब्द पुष्कळ सारखे असले तरी त्यात वेगळेपणा आहे.

*ऊर्ध्वमूल: अवाक् शाखा: एषोऽश्वत्थ: सनातन: ।*
*तदेव शुक्रं तद् ब्रह्म तदेवामृतमुच्यते ।*
*तस्मिन् लोका: श्रिता: सर्वे तदु नात्येति कश्चन। एतद् वै तत्॥*

अर्थ – वर मूळ आणि खाली शाखा असणारा हा अश्वत्थ वृक्ष (ब्रह्ममय संसारवृक्ष) सनातन आहे. तो मूलत: तेच शुद्ध तत्त्व आहे आणि ते ब्रह्म आहे. त्यालाच अमृत म्हणतात. सर्व लोक त्याचाच आश्रय करतात. त्याचे कुणी अतिक्रमण करू शकत नाही. हेच ते.

उपनिषदाप्रमाणे तुलसीदासांनीही संसार वृक्षचे वर्णन केले आहे-

*छंद – 'अ-व्यक्त-मूल-मनादि तरु त्वच चारि निगमागम भने।*
*षट् कंध साखा पंचवीस अनेक पर्न सुमन धने॥*

*फल जुगल बिधि कटु मधूर बेली अकेलि जेहि आस्मित राहे।*
*पल्लवत फूलत नव ललित संसारबिटप नमाम हे॥*

*(सोपान ७-११ तु. रा.).*

अर्थ – हे प्रभो! मनोहर संसारवृक्षरूपी तुला मी वंदन करतो. या विश्ववृक्षाचे मूल अव्यक्त आहे. (त्यालाच सांख्यशास्त्रात पुरुष ही संज्ञा आहे.) या वृक्षाचा तरू म्हणजे देह अनादी आहे. (हिलाच प्रधान अगर प्रकृती म्हणतात). या वृक्षाच्या त्वचा (महतत्त्व व सात्त्विक, राजस, तामस असे तीन अहंकार मिळून) चार आहेत. त्यास (तीन गुण, काल, जीव आणि कर्म मिळून) सहा प्रधान शाखा आहेत. (मन, बुद्धी, चित्त, अहंकार. हे अंत:करण चतुष्टय, पृथ्वी, आप, तेज, वायू, आकाश ही पाच महाभूते, शब्द, रूप, रस, गंध, स्पर्श ही ज्ञानेंद्रिये, कर्ण, त्वचा, नेत्र, जिव्हा आणि घ्राण ही पाच कर्मेंद्रिये, हात, पाय, शिस्न, गुद आणि वाणी व एक पुरुष मिळून) पंचवीस शाखा आहेत. त्या वृक्षास (स्वेदज, अंडज, उद्भिज, जारज अशी अनेक जीवरूपी) पर्णे असून (वासनारूप) अनेक पुष्पेही आहेत. त्यास दोन प्रकारची (पापपुण्यानुसार) एक कटू व एक मधुर अशी फळे येतात. त्या वृक्षाच्या आश्रयाने (अहंममत्वात्मक अविद्यारूप) एक वेली राहते व त्यास नित्य नवीन पाने व फुले (जिवांचे पुनरुज्जीवन आणि वासना परंपरा यांची घडामोडरूपाने) येतच असतात.

या वरील वर्णनातून दोन गोष्टी मुख्यत्वाने आलेल्या आहेत. त्या म्हणजे १) याचे मूळ वर आहे, २) हा असंग शस्त्राने छेदला, तोडला जातो.

पृथ्वीच्या वातावरणाच्या वर पोकळी असून तेथे इथर नावाचा वायू आहे. त्याच्याही वर ईश्वर नावाचा वायू आहे. असे एका लेखात फार पूर्वी वाचल्याचे आठवते. त्यावर चिंतन करताना ईश्वर हेसुद्धा द्रव्य काही प्रमाणात स्थूल व जड असेल. तेव्हा त्याच्याही वर काय असेल? हे सर्व विश्व, चंद्र, सूर्य, ग्रह, तारे, नक्षत्र, विविध आकाशगंगा (गॅलेक्सीज) या ज्या फिरतात, त्या कोणाच्या आधारावर फिरत आहेत? त्या जरी एकमेकींच्या गुरुत्वाकर्षणाने ओढल्या गेल्या असल्या तरीही केवळ अधांतरी फिरत नसणारच. पाण्यात मासा खाली वर फिरत असतो. त्याला पाण्याचा आधार असतोच. पण समजा माशाला विचारले की, 'तू कोणाच्या आधारावर खाली वर होत असतोस?' तर तो म्हणेल, 'मला आधाराची काय गरज आहे?' कारण पाण्याचे अस्तित्व त्याच्या दृष्टीने नगण्यच आहे. तसे या सृष्टीच्या भ्रमंतीलासुद्धा कोणतातरी आधार असणार आणि तो इतका सूक्ष्म आणि व्यापक आहे की त्याचे अस्तित्वच जाणवत नसेल. एखाद्या वस्तूचे अस्तित्व जाणवत नसले म्हणजे ती नाहीच

असे म्हणणे जरा धाडसाचेच होईल. विज्ञानाची गती जोरात आहे. आज लागलेले शोध पन्नास वर्षांनी जुने होतात. त्यात इतक्या सुधारणा होतात की, काही वेळा सुरुवातीच्या शोधाच्या विरुद्ध विधाने सिद्ध होतात. तेव्हा कदाचित अजून शंभर, पाचशे वा हजार वर्षांनंतर तरी या गोष्टीची कल्पना येईल, शोध लागेल की या विश्वाला, त्यात फिरणाऱ्या ग्रह, गोल, ताऱ्यांना कोणाचा तरी आधार आहे आणि तो म्हणजे 'परब्रह्म' या द्रव्याचा, वस्तूचा होय.

आमच्या पूर्वजांनी जे शोध लावले, वेद-पुराणांसारखे वाङ्मय निर्माण केले त्यात तरी त्यांना विश्वाचे कोणतेही रहस्य अज्ञात होते असे दिसत नाही. कारण विश्वाच्या रहस्याविषयी वेदवेदान्तामध्ये खूप विचार आले आहेत, पण त्यात त्यांना काही अज्ञात राहिले आहे किंवा अजून काही शोधायला पाहिजे अशा प्रकारचे कोणतेही विधान त्या वाङ्मयातून सापडत नाही. पण एकंदरीत त्या वर्णनावरून वाटते की परब्रह्माचाच आधार या सर्व पृथ्वी, ग्रह, तारे, नक्षत्र वगैरे यांना आहे. ते परब्रह्म सर्व विश्वात आतबाहेर भरून आहे तर त्याचा अर्थ हाच होतो.

जितकी वस्तू हलकी व सूक्ष्म तितकी ती वर म्हणजे पृथ्वीच्या वातावरणाच्या बाहेर असते. त्यामुळे वातावरणाच्या बाहेर ईथर, त्याच्याही वर ईश्वर, परमेश्वर, परब्रह्म हे असले पाहिजे. म्हणून 'ऊर्ध्वमूल' असे म्हटले आहे. कारण या सूक्ष्म व व्यापक परमेश्वरापासूनच जर सर्व सृष्टी उत्पन्न झाली आहे असे भगवंत सांगत आहेत, तर त्याचे मूळही वरच आहे. हे स्पष्ट आहे आणि तेथून जसे जसे खाली येत जावे तसे सूक्ष्म स्वरूप स्थूल रूप होत गेले आहे. परमेश्वरापासून सर्व वायुमिश्रित वातावरण असे निर्माण होऊन पुढे ही जीवसृष्टी उत्पन्न झाली आहे. यालाच भगवंतांनी वृक्षाच्या रूपकाने सांगितले आहे. सर्वसाधारण वृक्षाचे मूळ जमिनीत म्हणजे खाली असते. पण त्याला संत ज्ञानेश्वरांनी सूर्याची उपमा दिली आहे. सूर्य खूपच वर आहे. पण त्याचे किरण खाली प्रवास करतात. अर्थात सूर्य केंद्र धरून ती चोहोंबाजूसच पसरतात, पण पृथ्वीच्या दृष्टीने ते वरून खाली येतात. तसा हा संसारवृक्ष वरून खाली वाढला आहे असे मानले आहे. 'जैसा भानु उंची नेणो के। रश्मिजाळ तळी फाकें। संसारु हे कावरुखे। झाडे तैसे ॥' (१५.५२ ज्ञानेश्वरी).

संत ज्ञानेश्वरांनी वरीलप्रमाणे मूळ परब्रह्माचे वर्णन केले आहे. या संसारवृक्षाच्या उत्पत्तीचे कारणच 'घन अज्ञान सुषुप्ति। तो बीजांकुरभावो म्हणती। येर स्वप्न हन जागृति। हा फळभावो तियेचा ॥ ऐसी माया वेदांती। निरुपणभाषाप्रतीति। परी ते असो प्रस्तुती। अज्ञान मूळ ॥' (१५.८९, ९० ज्ञानेश्वरी).

'मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयो: ।' मन हेच मुळात बंधाला व मोक्षाला कारण असते. मनच संकल्पाने या विश्वाची निर्मिती करते व मनच हे सर्व चराचरांत परमेश्वर भरून राहिला आहे असे पाहते. यामध्ये पहिल्या अवस्थेत मन बाह्य विषयांशी संलग्न असते, तर दुसऱ्या अवस्थेत मनाचा बुद्धीमध्ये, बुद्धीचा चित्तामध्ये व चित्ताचा परमेश्वराच्या ठायी लय झालेला असतो. पण मुळात मन हेच हा संसार उभा करण्यास कारण असते व मनाचे अज्ञान, स्वस्वरूपाचे विस्मरण हेच मनाचे मनपण जागे होण्यास कारण असते. आपली घन अज्ञान सुषुप्ती हे बीज आहे. ही ब्रह्माची म्हणजे शिवाची सहज स्थिती आहे. (परब्रह्म-शिव-जीव) कारण सुषुप्तीमध्ये आपल्या मनाचा लय झालेला असतो. सुषुप्ती ही खरी म्हणजे ब्राह्मी स्थितीच आहे. पण त्यात अज्ञान आहे व मनाचे पुन्हा उत्थान आहे म्हणून निर्विषयक जे सुख आहे, ते अगदी अल्पकाळ असते. आणि या सुषुप्तीतून स्वप्न व स्वप्नातून पुन्हा जागृती येते व मन उत्थान होऊन या संसारात रमून जाते, हा संसार उभा करते. पण परमेश्वर कसा आहे? हे मूळ आहे ते कसे आहे? 'ज्ञातृज्ञेयाविहीन। नुसधेचि जे ज्ञान। सुखा भरले गगन। गाळीव जे।। जे कार्य ना कारण। जया दुजे ना एकपण। आपणयां जे जाण। आपणचि।। ऐसे वस्तू जे साचे। ते ऊर्ध्व गा यया तरुचे। तेथ आर घेणे मुळाचे। ते ऐसे असे।।' (१५.७७ ते ७९ ज्ञानेश्वरी).

ज्ञातृ = ज्ञाता = जाणणारा. ज्ञेय = जाणण्यास योग्य वस्तू, ज्ञान वस्तू, वास्तविक पाहता हे दोन्हीही एक परब्रह्मच आहे. ज्या वेळी दृष्ट व द्रष्टा हे दोन्ही एक असतात तेव्हा पाहण्याचे कार्य होत नाही. भोग व भोक्ता हे दोन्ही एकच असतील तर भोगण्याची क्रिया होत नाही. तसे ज्ञाता व ज्ञेय जर एकच असेल तर 'ज्ञान घेणे' ही क्रिया होत नाही. ज्या ठिकाणी ज्ञान घेण्याची क्रिया नाही तेथे ज्ञाता व ज्ञेय भेदच उरत नाही. म्हणून 'ज्ञातृज्ञेयाविहीन' असे म्हटले आहे. पण परमेश्वराचे स्वरूप जे 'ज्ञान' म्हणून सांगितले आहे, ते केवळ 'ज्ञान' नसून 'ज्ञानरूप' आहे असे सांगितले आहे. साखर 'गोडरूप' आहे. कापूर 'परिमळरूप' आहे. कारण या वस्तूंचा प्रत्येक कणा हा त्या त्या गुणांनी युक्त असतो. तेच परब्रह्म हे ज्ञानरूप आहे. ते कार्यही नाही व कारणही नाही. ते एक नाही की दोनही नाही. जे केवळ आपले आपणच आत्मस्वरूप असते ते या संसारवृक्षाचे मूळ आहे.

संसारवृक्षाचे समग्र वर्णन ज्ञानेश्वरीमध्ये आले आहे. त्याची पुनरुक्ती येथे करत नाही. मनाच्या संकल्पात या सृष्टीचे अस्तित्व आहे. त्याच्या ममत्वामध्ये बंधन आहे. त्याविषयीच्या वासनेमध्ये त्याची वाढ आहे. त्याविषयीच्या आशेमुळे त्याच्या मागे

धावणे आहे आणि त्याच्या उपभोगाच्या अपूर्णतेमुळे पुन:पुन्हा जन्म आहे. म्हणून ज्या मार्गाने आल्याने पुन:पुन्हा जन्म आहे, त्याउलट गेल्यास काय होईल त्याचा विचार करूया. मनाला उपभोगामध्ये जी अपूर्णता वाटते त्याचे कारण उपभोगातून सुख मिळते अशी मनाची जी धारणा असते ती चूक असते. याची मनाला खात्री होणे आवश्यक आहे. हाडूक चघळताना आपल्याच दातातून रक्त येत आहे याची कुत्र्याला जेव्हा खात्री होते तेव्हा ते हाडूक टाकून देते. तसे विषयाच्या उपभोगात सुख नसून उपभोगात मन सुखाची कल्पना करते याची जाणीव जेव्हा मनाला होईल, तेव्हा ती सुखाची कल्पना किती फोल आहे हे मनाला समजेल. आणि मग उपभोगाच्या पूर्ण-अपूर्णतेविषयी मनाला उत्सुकता राहणार नाही. एकदा मनातील विषय उपभोगाची उत्सुकता नाहीशी झाली की, मनातील आशाच मावळून जातील. मनातील आशा मावळल्या की मनाचे विषयामागे धावणे थांबेल. मनाचे विषयामागे धावणे थांबेल याचा अर्थच मनातील वासनांचा क्षय झालेला असतो. वासना ही ममत्वामुळेच निर्माण झालेली असते. वासनांचा क्षय झालेला असतो याचा अर्थच विषयांविषयीचे ममत्व संपुष्टात आले आहे. एकदा मनाचे वस्तुमात्रांविषयीचे ममत्व संपले की, मनाला सर्व वस्तुमात्राविषयी समभाव उत्पन्न होईल. संकल्प हे काहीतरी कमी आहे व त्याची प्राप्ती करून घ्यावयाची आहे यासाठी केले जातात. पण सर्व वस्तुमात्रांविषयी समभाव उत्पन्न झाले की काही कमी आहे व काही जास्त आहे, असा भावच मनात उत्पन्न होत नाही. मन आत्मसंतुष्टच राहते. आत्मतृप्त राहते. म्हणजेच मनाचा लय होतो. मन बुद्धीमध्ये, बुद्धी अहंकारामध्ये, अहंकार ईश्वरामध्ये लय पावतो व सर्वांठायी परमेश्वराचेच स्वरूप समजून जाणवू लागते. भगवंत गीतेत त्याचा अभ्यास कसा करावा या विषयी म्हणतात–

*संकल्पप्रभवान्कामान् त्यक्त्वा सर्वानशेषत: ।*
*मनसैवेंद्रियग्रामं विनियम्य समन्तत: ॥*

*शनै: शनैरुपमेद् बुद्ध्या धृतिगृहीतया ।*
*आत्मसंस्थं मन: कृत्वा न किंचिदपि चिन्तयेत् ॥*

*यतो यतो निश्चरति मनश्चञ्चलमस्थिरम् ।*
*ततस्ततो नियम्यैतत् आत्मन्येव वशं नयेत् ॥*

*प्रशान्तमनसं ह्येन योगिनं सुखमुत्तमम् ।*
*उपैति शान्तरजसं ब्रह्मभूतमकल्मषम् ॥*

*युञ्जन्नेवं सदात्मानं योगी विगतकल्मषः ।*
*सुखेन ब्रह्मसंस्पर्शम् अत्यन्तं सुखमश्नुते ॥*

(६.२४ ते २८ भ. गी.).

अर्थ – विषयचिंतनापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व वासनांचा निःशेष त्याग करून इंद्रियसमूहाचे बाह्य विषयांपासून मनानेच (आसन प्राणायामादी बाह्य उपायांची अपेक्षा न ठेवता) नियमन करून हळूहळू (क्रमाक्रमाने) शांती संपादन करावी आणि धारणायुक्त बुद्धीने मन आत्मस्वरूपाचे ठिकाणी स्थिर करून (इतर) कशाचेही चिंतन करू नये. चंचल व अस्थिर मन जिकडे जिकडे धावते, तिकडून त्याचा निग्रह करून ते आत्मवशच करावे. कारण (चंचलत्व) दोष नाहीसा झाल्यामुळे ज्याचे मन शांत झाले आहे, अशा ब्रह्मनिष्ठ योग्याला निर्मळ अतएव सुख प्राप्त होते. याप्रमाणे नेहमी अंतःकरणात स्थिर ठेवणारा निष्पाप योगी (सहज समाधी साधणारा) अनायासाने ब्रह्मप्राप्तिस्वरूप निरतिशय सुखसेवन करतो.

याच पद्धतीने असा अभ्यास करून जेव्हा विषयांशी असलेला संग सुटतो, त्या वेळी तो संसारवृक्ष तोडून टाकल्यासारखाच होतो. संत ज्ञानेश्वर म्हणतात–
*तरि हा उन्मूळावयाउद्देशे । येथ सायासचि कायिसे । काय बाळा बागुल देशे । दवडावा आहे ॥ गंधर्वदुर्ग कायी पाडावे । काय शशविषाण मोडावे । होआवे मग तोडावे । खपुष्प की ॥ तैसा संसारु हा वीरा । रुख नाही साचोकारा । मा उन्मूळणी दरारा । कायिसा तरी ॥*

(१५.२१४ ते २१६ ज्ञानेश्वरी).

तेव्हा मुळात हा संसारवृक्ष नाही. मग त्याला उन्मळून पाडण्यासाठी कसले कष्ट करावे लागणार आहेत? हा संसारवृक्ष जो मानतो त्यालाच त्याचे बंधन आहे. अन्यथा न मानणाऱ्याला ते नाही. म्हणून भगवंतांनी म्हटले आहे की 'असंग शस्त्रेण' या उपायानेच हा वृक्ष छेदला जातो. या वृक्षाप्रमाणे गीतेत माया नदीचे वर्णन केले आहे.

*दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया ।*
*मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥*

(७.१४ भ. गी.).

या माया नदीला तरून जाण्यासाठी जो जो उपाय करावा, तो तो प्रयत्न करणारा अधिकाधिक बुडत जातो. कारण त्याचे ते सर्व प्रयत्न अहंकाराने केले जातात आणि जोपर्यंत अहंकार आहे, तोपर्यंत परमेश्वरप्राप्तीच्या कोणत्याही उपासनेत यश येत नाही. विश्वरूपदर्शनाच्या वेळीही भगवंतांनी अर्जुनाला हेच सांगितले होते की–

*न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रै: ।*
*एवंरूप: शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥*

*(११.४८ भ. गी.).*

अर्थ – हे कुरुश्रेष्ठा, (अर्जुना), वेद, यज्ञ, किंवा अध्ययन यांच्या योगाने किंवा दानाने किंवा (इष्टापूर्वादी) कर्मांनी किंवा घोर तपश्चर्यांनी देखील माझे हे (विश्व) रूप या मनुष्यलोकी तुझ्यावाचून इतरांच्या दृष्टीस पडणे शक्य नाही.

ज्या वेळी परमेश्वराला पूर्णतया शरण जाणे होते, त्या वेळीच परमेश्वरप्राप्ती शक्य होते. परमेश्वराला शरण जाणे म्हणजेच अहंकार सोडणे होय आणि हे सर्व भक्तीमध्येच शक्य होते. ही माया नदी कोण तरून जाऊ शकेल याविषयी संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'येथ एकचि लीला तरले। जे सर्व भावे मज भजले। तया ऐलीच थडी सरले। मायाजाळ ॥' (७.९७ ज्ञानेश्वरी). जे सर्व भावाने परमेश्वराला शरण गेले त्यांना ही मायानदीच अस्तित्वात नसते. 'तया एलीच थडी सरले। मायाजाळ ॥' मग मायानदी तरून जाण्याचा प्रश्नच नसतो. म्हणजे जोपर्यंत मनाने हा संसारवृक्ष खरा मानला, ही मायानदी खरी मानली तो वृक्ष खरा व ती मायानदीही खरी आहे, पण ज्यांनी आपले मनच ईश्वरार्पण केले त्यांना दोन्हीही नाही. म्हणून संकल्पात सर्व सृष्टी असते असे म्हणतात. ज्याचे संकल्प संपलेले असतात ते केवळ ब्रह्मस्वरूपच झालेले असतात. शरण कसे यावे याविषयी संत ज्ञानेश्वर सांगत आहेत.

'सुवर्णमणि सोनया। ये कल्लोळु जैसा पाणिया। तैसा मज धनंजया। शरण ये तू ॥ (१८.१४०० ज्ञानेश्वरी). स्वत:चे वेगळेपण टाकून शरण येणे, असेच तेथे संत ज्ञानेश्वरांना सुचवावयाचे आहे आणि अशा अवस्थेतच ना तो वृक्ष उन्माळावयाची आवश्यकता असते ना मायानदी तरून जाण्याची धडपड करावयाची असते.

## विज्ञानात असलेले परब्रह्म

गीतेमध्ये भगवंतांनी विज्ञानाला फारच महत्त्व दिले आहे. स्थूल देहधारी मानवांना स्थूल स्वरूपाचीच लवकर ओळख होते व पटते. सूक्ष्म, निर्गुण, निराकाराची जाणीव होणे अवघड आहे. म्हणून प्रथम स्थूलात असलेले सूक्ष्म स्वरूप समजून घेणे त्यांना महत्त्वाचे वाटते. एकदा स्थूलातील सूक्ष्म स्वरूपाचे तत्त्व समजले की सूक्ष्मात सूक्ष्म असलेल्या परमेश्वरी तत्त्वाची जाण येण्यास, अनुभूती येण्यास वेळ लागणार नाही, असे भगवंतांना वाटते. म्हणून त्यांनी स्थूलातील सूक्ष्म रूपाने असलेले परमेश्वरी तत्त्व

काय आहे हे सांगितले आहे. भगवंतांनी सूत्ररूपाने सांगितलेले समजण्यास अवघड आहे म्हणून संत ज्ञानेश्वरांनी त्याचा खुलासा ज्ञानेश्वरीत केला आहे. ते म्हणतात–

*'म्हणोनि उदकी रसु । का पवनी जो स्पर्शु । शशिसूर्यी जो प्रकाशु । तो मीचि जाण ॥ तैसाचि नैसर्गिकु । मी पृथ्वीच्या ठायी गंधु । गगनी मी शब्दु । वेदी प्रणवु ॥ नराच्या ठायी नरत्व । जे अहंभाविये सत्त्व । ते पौरुष मी हे तत्त्व । बोलिजत असे ॥ अग्नि ऐसे आहाच । तेजी नामाचे आहे कवच । ते परते केलिया साच । निजतेज ते मी ॥'*

*(७.३३ ते ३६ ज्ञानेश्वरी).*

वरील ओव्यांत स्थूल स्वरूपात असलेले सूक्ष्म परमेश्वरी तत्त्व कोणते ते स्पष्ट केले आहे. पाण्यामध्ये रस, वाऱ्यामध्ये स्पर्श, चंद्र-सूर्यामधील प्रकाश, आकाशाचा शब्द, पृथ्वीमधील गंध, वेदामधील प्रणव तसेच नराच्या ठिकाणचे नरत्व म्हणजे मनुष्यत्व, अहंभावाच्या ठिकाणचे पौरुष ही परमेश्वरी तत्त्वे आहेत. ही तत्त्वे त्या त्या स्थूल स्वरूपामधूनच प्रकट होतात. आता पुढील ओवीमध्ये संत ज्ञानेश्वर अग्नीतील परमेश्वरी तेजतत्त्वाचा खुलासा करताना त्यातील गमक शोधण्याची पद्धत सांगतात, 'अग्नि ऐसे आहाच।' अग्नी हे नाव केवळ वरवरचे आहे. अग्नीला अग्नीपण कशामुळे आले तर त्याच्या दाहक गुणामुळे. दाहकपणा हा विकार आहे. सत्त्व, रज, तम हे त्रिगुण हे विकार आहेत. तेव्हा विकार हे परमेश्वराचे स्वरूप होऊ शकत नाही. तेव्हा पुढील चरणात म्हणतात– 'तेजी नामाचे आहे कवच।' उष्णता, प्रखरपणा, तेजस्वीपणा हे कवच या अग्नीचे आहे. 'ते परते कलिया साच।' ते जर बाजूला सारले, दूर केले, त्याच्याकडे दुर्लक्ष केले तर जे उरते ते 'निजतेज ते मी ॥' तेज माझे खरे स्वरूप आहे. ते तेज आहे तर त्यात तेजस्वीपणा असून उष्णता नाही, दाहकपणा नाही, प्रखरपणा नाही, तर केवळ शांत शीतलता आहे. शुद्ध तेजस्वीपणा, विकाररहित तेजस्वीपणा आहे. ते परमेश्वराचे तेजतत्त्व अग्नीमध्ये आहे. भगवंत पुढे म्हणतात– सर्व भुतांचे बीज, बुद्धीतील आध्यात्मिक तेज (बुद्धी), तेजस्वी माणसातील आध्यात्मिक तेज, बळवंतातील शुद्ध बल व कामामधील उपभोगेच्छारहित शुद्ध काम हे परमेश्वरी तत्त्व आहे. जन्माला आल्यावर जी महत्त्वाची ऋणे फेडावयाची असतात, त्यात पितृऋण हेही फेडणे महत्त्वाचे आहे. म्हणून विवाह करून पुत्रोत्पत्ती करणे हा धर्म आहे, असे भगवंत सांगतात. हा काम हे परमेश्वरी तत्त्व आहे. विवाह झाल्यावरही ब्रह्मचर्य पाळण्याची जी पद्धत आहे त्यात असे सांगितले आहे की, स्त्रीच्या ऋतुकालानंतर सोळा दिवसांपर्यंत एकदाच स्त्री संग करावा. पुढचा ऋतुकाल आला नाही म्हणजे स्त्रीला गर्भधारणा झाली असे समजावे, पण जर पुन्हा ऋतुकाल आला

नाही, तर पुन्हा एकदाच संग करावा. गर्भधारणा झाल्यास पूर्ण ब्रह्मचर्याचे पालन करावे. अशा प्रकारे जितके पुत्र पाहिजे असतील, तितक्या वेळा या पद्धतीने संग करावा व पुढे आयुष्यभर ब्रह्मचर्य व्रताचे पालन करावे हा काम धर्माला मान्य आहे आणि हेच परमेश्वरी तत्त्व आहे. याविरुद्ध जे केले जाते ते उपभोगेच्छा किंवा वासनातृप्तीसाठी केले जाते व ते धर्माविरुद्ध आहे. कारण कोणत्याही विकारात भगवंताचे, परमेश्वराचे स्वरूप नसते. म्हणून परमेश्वरी तत्त्व जरी सर्व ठिकाणी असले, तरी त्याचे शुद्ध स्वरूप व विकारित स्वरूप यांतील फरक लक्षात घेणे आवश्यक आहे. म्हणून भगवंत म्हणतात–

*ये चैव सात्त्विका भावा राजसास्तामसाश्च ये ।*
*मत्त एवेति तान्विद्धि न त्वहं तेषु ते मयि ।।*

*(७.१२ भ. गी).*

सात्त्विक, राजस, तामस हे गुण जरी परमेश्वरापासून उत्पन्न झाले असले, तरी विकारित रूप हे परमेश्वराचे नाही. यासाठी संत ज्ञानेश्वरांनी खूप दृष्टान्त दिले आहेत. ते म्हणतात– 'पै गगन उपजे आभाळ। परी तेथ गगन नाही केवळ। अथवा आभाळी होय सलील। तेथ अभ्र नाही।। मग त्या उदकाचेनि आवेशे। प्रगटले तेज ते लखलखीत दिसे। तिये विजूमाजी असे। सलील कायी।। सांगे अग्निस्तव धूम होये। तिये धूमी काय अग्नि आहे। तैसा विकारु हा मी नोहे। जरी विकारला दिसे।।' (७.५७ ते ५९ ज्ञानेश्वरी).

तसे परमेश्वरापासूनच जरी ही विकारित रूपे निर्माण झाली असली, तरी त्यात परमेश्वराचे स्वरूप विकारित होत नाही. त्याचे शुद्ध स्वरूप तसेच कायम राहते. ज्या अधिष्ठानावर या सर्व प्रक्रिया घडतात त्याचे अधिष्ठान एकच आहे, अविकारी आहे, कायम आहे, शुद्ध आहे आणि तेच परमेश्वरी तत्त्व आहे. हे तत्त्व इतके सूक्ष्म, गूढ आहे, की ते जाणणे विचाराने, विवेकाने, तर्काने शक्य नाही. त्याची अनुभूती घेतलेला जर कोणी सद्गुरू भेटला, तर त्याच्याकडून ती अनुभूती प्राप्त होऊ शकते. म्हणून त्याचे अवघडपण सांगताना भगवंत म्हणतात–

*वेदाहं समतीतानि वर्तमानानि चार्जुन ।*
*भविष्याणि च भूतानि मां तु वेद न कश्चन ।।*

*(७.२६ भ. गी.).*

अर्थ – अर्जुना! मी भूतकाळी झालेले, वर्तमानकाळी असणारे व भविष्यकाळी होणारे सर्व प्राणी जाणतो पण मला कोणीही जाणू शकत नाही.

याचे कारण देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात,

*'कां जे योगमायापडळे । हे जाले आहाती आंधळे । म्हणोनि प्रकाशाचेनि दिहबळे ।*
*न देखती माते ।। एऱ्हवी मी नसे ऐसे । काय वस्तुजात असे । पाहे पां कवण जळ रसे ।*
*रहित असे ।। पवन कवणाते न शिवेचि । आकाश के न समायेचि ।*
*हे असो एक मीचि । विश्वी आहे ।।'*

*(७.१५८ ते १६० ज्ञानेश्वरी).*

अर्थ – कारण सर्व प्राणी योगमायेचा पडळ डोळ्यावर आल्याने आंधळे झाले आहेत. त्यांना केवळ बाह्य, स्थूल स्वरूपच दिसते. विकारित स्वरूपच दिसते. त्यांना त्यातील सूक्ष्म, अविकारी, परमेश्वरी तत्त्व दिसत नाही. नाही तर मी नाही असे एकही वस्तुजात नाही. हे सर्व विश्वच केवळ माझ्यामुळे अस्तित्वात आलेले आहे. या विश्वाचा आधार केरळ मीच आहे.

तहान लागलेले मृग व्याकुळतेने पाण्याच्या शोधात धावत असतात. माळरानावर त्यांना उन्हाच्या झळ्यांमुळे मृगजळ दिसते आणि तेच खरे पाणी आहे असे समजून ते धावत राहतात. पण ते जसे जसे पुढे पुढे जाते, तसे ते मृगजळही पुढे पुढे सरकत राहते. त्याची पाण्याची तहान वाढत राहते, कंठशोष वाढत राहतो पण पाणी काही मिळत नाही. आणि शेवटी ऊर फुटून मरणाची वेळ येते, पण पाण्याचा थेंब काही मिळत नाही. तशीच अवस्था मानवांची होते. सुखाच्या शोधासाठी ते अनेक विषयांच्या प्राप्तीसाठी प्रयत्न करतात, पण त्यांच्या प्रयत्नांचे हात जेव्हा कमी पडू लागतात, तेव्हा ते निरनिराळी दैवते पुजू लागतात. जी दैवते ही परमेश्वराची प्रतीकरूपे असून त्यांच्याकडून शाश्वत सुख प्राप्त करून घेण्यासाठी उपासना करावयाची असते. ते शाश्वत सुख सोडून ते विषयसुखाच्या प्राप्तीसाठी ही दैवते पूजतात. त्या दैवतांना निरनिराळे आकार देऊन निरनिराळ्या कार्यदेवता आहेत असे तेच ठरवतात. त्यांचे रंग, रूप, पोषाख हेही तेच ठरवतात व त्यांच्याकडून सुखाची अपेक्षा करतात. तेव्हा ते कसे विचार करतात, परमेश्वरावर कसे भाव ठेवतात, त्यांच्या उपचारपद्धती कशा असतात, याचे संत ज्ञानेश्वरांनी सुरेख वर्णन केले आहे. ते येथे मुद्दाम दिले आहे.

*तैसे विकारले हे स्थूळ। जाणितलेया मी जाणवतसे केवळ। काइ फेण पिता जळ। सेविले होय ॥ म्हणोनि मोहिलेनि मनोधर्में। हेचि मी मानूनि संभ्रमे। मग येथीची जिये जन्मकर्में। तिये मजची म्हणती ॥ येतुलेनि अनाम नाम। मज अक्रियासि कर्म। विदेहासि देहधर्म। आरोपिती ॥ मज आकारशून्या आकारु। निरुपाधिका उपचारु। मज विधिवर्जिता व्यवहारु। आचारादिक ॥ मज वर्णहीना वर्णु। गुणतीतासि गुणु। मज अचरणा चरणु। अपणिया पाणी ॥ मज अमेया मान। सर्वगतासी स्थान। जैसे सेजेमाजी वन। निदेला देखे ॥ तैसे अश्रवणा श्रोत्र। मज अचक्षुसि नेत्र। अगोत्रा गोत्र। अरुपा रूप ॥ मज अव्यक्तासि व्यक्ति। अनार्तासी आर्ति। स्वयंतृप्ता तृप्ति। भाविती गा ॥ मज अनावरणा प्रावरण। भूषणातीतासि भूषण। मज सकळकारणा कारण। देखती ते ॥ मज सहजाते करिती। स्वयंभाते प्रतिष्ठिती। निरंतराते आव्हानिती। विसर्जिती गा ॥ मी सर्वदा स्वत:सिद्धु। तो की बाळ तरुण वृद्धु। मज एकरूपा संबंधु। जाणती ऐसे ॥ मज अद्वैतासि दुजे। मज अकर्तेयासि काजे। मी अभोक्ता की भुंजे। ऐसे म्हणती ॥ मज अकुळाचे कुळ वानिती। मज नित्याचे निधने शिणती। मज सर्वांतराते कल्पिती। अरि मित्र गा ॥ मी स्वानंदाभिरामु। तया मज अनेक सुखाचा कामु। आघवाचि मी असे समु। की म्हणती एकदेशी ॥ मी आत्मा एक चराचरी। म्हणती एकाचा कैपक्ष करी। आणि कोपोन एकाते मारी। हेचि वाढविती ॥ किंबहुना ऐसे समस्त। जे हे मानुष धर्म प्राकृत। तयाचि नाव ऐसे मी विपरीत। ज्ञान तयांचे ॥ जव आकारु एक पुढा देखती। तव हा देव येणे भावे भजती। मग तोचि विघडलिया टाकिती। नाही म्हणोनी ॥ माते येणे येणे प्रकारे। जाणती मनुष्य ऐसेनि आकारे। म्हणऊनि ज्ञानचि ते आंधारे। ज्ञानासि करी ॥*

*(९.१५४ ते १७१. ज्ञानेश्वरी).*

विकार हे परमेश्वराचे रूप कधीही होऊ शकत नाही. पण मोहाने व्याप्त झालेल्यांना ते लक्षात येत नाही. फेस पिऊन तहान भागवावी तसे हे शुद्ध, निर्विकारी परमेश्वराची सेवा करून शाश्वत सुख मिळवावयाचे सोडून देवतांतरांना भजून सांसारिक सुखाची अपेक्षा करतात. जे मानुष धर्म असतील ते परमेश्वरावर आरोपित करतात. निर्गुण, निराकार परमेश्वराला आकार देतात. त्याला नाव नाही तरी विशिष्ट नावे देतात. अकर्ता, अभोक्ता असूनही कर्माचे वर्णन करतात. त्याला कोणताही उपचार करता येत नाही, तरी त्या देवतांची षोडशोपचाराने पूजा करतात. त्याला एक विशिष्ट गोत्राचा, वर्णाचा, गुणांचा म्हणून संबोधतात. त्याला चार, सहा, आठ हात आहेत असे मानतात. त्या

हातांतून विविध शस्त्रे, अस्त्रे देतात. सर्वांगावर वेगवेगळी आभूषणे घालतात. सुंदर, सुंदर कपडे नेसवतात आणि अनेक प्रकारच्या मिष्टान्नांचे नैवेद्य दाखवून काही पदार्थ आवडते व काही पदार्थ नावडते ठरवतात. शेजारती गाऊन झोपवतात तर भूपाळ्या गाऊन उठवतात. लाकूड, पाषाण, धातू, वाळू यांच्या मूर्ती तयार करतात. तो सर्वत्र सदासिद्ध असूनही त्याला आवाहन करून प्राणप्रतिष्ठा करतात. पूजा -अर्चा झाली, की त्याचे विसर्जनही करतात. तो अजन्मा असूनही त्याच्या जन्मतिथ्यांचे उत्सव साजरा करतात व तो सदासर्वकाळ असूनही त्याच्या अवताराच्या समाप्तीच्या तिथ्या ठरवून पुण्यतिथीचे उत्सव करतात. अशा प्रकारे सर्व मानुष धर्म ते त्याच्यावर आरोपित करून त्याप्रमाणे वागतात.

अशा प्रकारे उपासना करून कोणालाही शाश्वतसुखाची प्राप्ती झालेली नाही. शाश्वत परमेश्वराची उपासना करून शाश्वत सुखाची प्राप्ती होत असते. या गोष्टीची कल्पना मोहमायेने वेढलेल्या लोकांना येत नाही आणि अशा प्रकारे अनेक जन्म गेले तरी त्यांची आध्यात्मिक प्रगती होत नाही. पण जेव्हा अनेक जन्मांनंतर त्यांना ही गोष्ट लक्षात येते, तेव्हा ते सद्‍गुरूच्या मार्गदर्शनाखाली ज्ञानाची उपासना चालू करतात. सर्वांठायी परमेश्वराची व्याप्ती आहे. सगळीकडे दिसणारे विविधरूप हा केवळ भास आहे. या विविधतेचे एकच तत्त्व आहे. हे जे दिसते ते नाशवंत आहे व एकच परमेश्वरी तत्त्व अविनाशी आहे. याचा अभ्यास साधक सुरू करतात आणि जेव्हा ते एका विशिष्ट अवस्थेत येतात तेव्हा त्यांच्या मनी असलेला हा विविधतेचा स्वप्नभास मावळून जातो व सर्वांठायी परमेश्वराचीच प्रचीती येऊ लागते. संत ज्ञानेश्वर या अवस्थेचे वर्णन करतात.

*'तेथ अज्ञान सरोनि जाये। आणि यजिता यजन हे ठाये। आत्मसमरसी न्हाये। अवभृथी जेंव्हा ।। तेंव्हा भूते विषय करणे। हे वेगळाले कांही न म्हणे। आघवे एकचि ऐसे जाणे। आत्मबुद्धि ।। जैसा चेईला तो अर्जुना। म्हणे स्वप्नीची हे विचित्र सेना। मीचि जाहलो होतो ना। निद्रावशे ।। आता सेना ते सेना नव्हे। हे मीचि एक आघवे। ऐसे एकत्व मानावे। विश्व तया ।। मग तो जीवू हे भाष सरे। आब्रह्म परमात्मबोधे भरे। ऐसे भजती ज्ञानाध्वरे। एकत्वे येणे ।। अथवा अनादि हे अनेक। जे आनासारिखे एका एक। आणि नामरूपादिक। तेही विषम ।। म्हणोनि विश्व भिन्न भिन्न। परि न भेदे तयाचे ज्ञान। जैसे अवयव तरी आन आन। परि एकाचि देहीचे ।। का शाखा सानिया थोरा। परि आहाति एकचि तरुवरा। बहु रश्मि परि दिनकरा। एकाचे जेवी ।। तेवि नानाविधा व्यक्ति। अनाने नामे अनानी वृत्ति। ऐसे जाणती भेदला भूती। अभेदा माते ।।'*

*(९.२४४ ते २५२ ज्ञानेश्वरी).*

## परब्रह्म - ब्रह्मसूत्राने केलेले वर्णन

मागे लहानपणी कोठेतरी मला वाचल्याचे आठवते की, 'समुद्राची शाई, आकाशाचा कागद व माडाची लेखणी केली तरी आईच्या प्रेमाचे वर्णन करणे शक्य नाही' आणि पुढे असेही वाचल्याचे आठवते, की 'स्वामी तिन्ही जगाचा आईविना भिकारी' आणि आता जेव्हा 'परब्रह्म' हा विषय अंत:करणात स्फुरला व त्यावर काही लिहावे असे वाटू लागले म्हणून, जेव्हा वेगवेगळे ग्रंथ चाळू लागलो तो, अनेक दिवसांचा भुकेला जसे किती खाऊ आणि किती नको असे करतो त्याप्रमाणे या विषयावर किती लिहून घ्यावे, लिहावे याला काही सुमारच राहिला नाही असे वाटते व हे जे आहे ते तरी पुरेसे आहे की नाही याविषयी शंका येऊन आणखी पुन्हा काही गोळा करावे असे वाटू लागते. असे आठवता आठवता आठवले की, प्रत्यक्ष परब्रह्मावर लिहिलेले 'ब्रह्मसूत्र' आपण पाहिलेच नाही आणि मग ब्रह्मसूत्रही पाहिले. वर म्हटल्याप्रमाणे आईच्या वात्सल्याचे कितीही वर्णन केले तरी ते अपुरेच वाटते तेच 'परब्रह्म' होय. ही आपली माता आहे तो आपला पिताही आहे. त्याच्या-तिच्या वर्णनाची तहान कशी भागणार? कारण गीता म्हणते.

*'पिताहमस्य जगतो माता धाता पितामह: ।*

*(९.१७ भ. गी.).*

परमेश्वराने सर्व सृष्टीची उत्पत्ती केली आहे, याविषयी ब्रह्मसूत्र म्हणते–

*'प्रकृतिश्च प्रतिज्ञादृष्टान्तानुपरोधात् ।'*

*(अ. १ पा. ४ सू. २३).*

(ब्रह्म) उपादान कारणही आहे. कारण (असे मानले तरच) प्रतिज्ञा व दृष्टान्त हे विरुद्ध होत नाही.

'परमेश्वरानेच हे जग निर्माण केले आहे. कारण परमेश्वरानेच तसा संकल्प केला होता की 'एकोऽहं बहुस्याम् ।' मी एकटा आहे तर अनेक रूपांनी व्हावे.

*'अभिध्योपदेशाश्च ।'*

*(अ. १, पा. ४, सू. २४).*

आणि संकल्प केला असे सांगितल्यामुळे (आत्मा उपादान कारण आहे) अशा प्रकारे संकल्प करून परमेश्वराने आपली व्याप्ती एवढी वाढवली की, त्यापेक्षा कोणीही मोठा, व्यापक नाही आणि म्हणून त्याला ब्रह्मन् हे नाव मिळाले. 'ब्रह्मन्' शब्दाची

व्युत्पत्ती अशी आहे. 'बृहणाद् ब्रह्म' व याचा अर्थ, 'जे शक्य तेवढे वाढलेलेच आहे व ज्याची पुढे वाढ अशक्य आहे असे. अमर्याद पसरलेले 'चेतनतत्त्व' ब्रह्मालाच दुसरे नाव 'आत्मन्' असेही आहे, जे अंतर्गत म्हणजे सर्व सृष्टीच्या अंतर्गत भरून राहिलेले आहे असे 'चेतनतत्त्व' होय.

*'जन्माद्यस्य यतः ।'*

*(अ. १, पा. १, सूत्र २).*

या (जगा)चे जन्मादी ज्यापासून (होते) ते ब्रह्म होय.

हे जगत् परमेश्वरापासून निर्माण झालेले आहे, विकास पावलेले आहे. या विकासात ज्या ज्ञानाचा, विज्ञानाचा, शास्त्राचा उदय झाला, विकास झाला हेसुद्धा त्या परमेश्वरापासूनच उत्पन्न झाले आहे, निर्माण झाले आहे म्हणून परमेश्वर सर्वज्ञ आहे असेच म्हणतात,

*'शास्त्रयोनित्वात् ।'*

*(अ. १, पा. १, सू. ३).*

(ब्रह्म सर्वज्ञ आहे.) कारण ते शास्त्रमूळ आहे.

या वरील विधानाबाबत अंधश्रद्धावाद्यांचा विरोध असेल, पण तसे नाही कारण जो वटवृक्ष बाहेर दिसतो तोच सूक्ष्म रूपाने अगदी त्याच्या खोड, पाने, फांद्या, फुले, फळे या सहित त्या बीजात सूक्ष्म रूपाने अस्तित्वात होता म्हणूनच बाहेर त्याने तसा आकार घेतला. जर त्यात तसे नसते तर बाहेर तसा वृक्ष दिसला नसता. कारण, 'नासतो विद्यते भावो ना भावो विद्यते सतः ।' (२.१६ भ. गी.).

त्याचप्रमाणे ब्रह्मसूत्रही म्हणते,

*'नासतोऽदृष्टत्वात् ।'*

*(अ. १, पा. २, सूत्र २६).*

अभावापासून (भाव उत्पन्न होत) नाही (तसे) दृष्टीस पडत नाही आणि म्हणून परमेश्वराचे स्वरूप कधीही नाहीसे होत नाही, नाश पावत नाही, कधीही ते कमी-जास्त होत नाही. ते सूक्ष्मात सूक्ष्म जसे आहे तसे ते मोठ्यात मोठे आहे, म्हणून त्याला अक्षर म्हणतात.

*'अक्षरमम्बरान्तधृते ।'*

*(अ. १, पा. ३, सू. १०).*

अक्षर म्हणजे (परमात्मा होय) कारण ते आकाशापर्यंत (सर्व वस्तूं) चे धारण करते.

परमेश्वराचे स्वरूप 'सत् चित् आनंद'रूप आहे. परमेश्वर 'आनंदी' नव्हे कारण आनंदी होणे हा विकार होय. आनंदरूप असणे, आनंदमय होणे हे स्वाभाविक रूप होय. कापूर परिमळरूप आहे. साखर गोडरूप आहे तसा परमेश्वर हा आनंदरूप आहे.

*'आनंदमयोऽभ्यासत् ।'*

*(अ. १, पा. १, सू. १२).*

आनंदमय म्हणजे परमात्माच होय कारण (त्या अर्थी आनंद शब्दाचा) अनेक वेळा प्रयोग केला आहे.

परब्रह्म बीजापासून दोन डिऱ्या निघाल्या. एक आत्मा व दुसरा जीवात्मा. यालाच गीतेमध्ये अक्षर पुरुष व क्षर पुरुष म्हटले आहे. परब्रह्म व आत्मा हे एकच रूप आहेत. असे जरी असले, तरी जीवात्मा हा परमेश्वराचे प्रतिबिंब आहे असे म्हटले आहे. कारण तो आभासरूप असतो.

*'आभास एव च ।'*

*(अ. २, पा. ३, सूत्र ५०).*

शिवाय (जीवात्मा हा परमात्म्याचे) प्रतिबिंबच आहे.

हा जो जीवात्मा आहे त्यालाच उत्क्रांत होऊन, शुद्ध स्वरूप होऊन पुन्हा परमात्म्यामध्ये विलीन व्हावयाचे आहे. स्वतःला देहभावाने बंधनात घालून घेणारा जीवात्मा जो सुखदुःखाच्या गर्तेत जन्ममरणाच्या गटांगळ्या खात असतो, तेथून त्याला सुटका हवी असते. म्हणून तसा तो प्रयत्न करीत असतो.

*'उत्क्रांति गत्यागतीनाम् ।'*

*(अ. २, पा. ३, सू. १९).*

(जीवात्मा अणू आहे. कारण श्रुतीमध्ये त्याच्या) उत्क्रांती (शरीरातून निघून जाणे) गती (स्वर्गलोक किंवा नरकलोकामध्ये सुखदुःखाकरिता जाणे) आणि आगती (सुखदुःखाचा भोग घेऊन पुन्हा या लोकामध्ये परत येणे) (सांगितल्या आहेत).

जीवात्म्याला अणूपासून परमाणूपासून परब्रह्मापर्यंत उत्क्रांत व्हावयाचे असते व ही उत्क्रांती केवळ सातत्याने केलेल्या, निष्ठेने केलेल्या उपासनेनेच शक्य होते. या सततच्या उपासनेने प्रारब्धाचा नाश होत येतो. पुण्याचा संचय होत येतो. जिवाची उत्क्रांती होत राहते व एक जन्म असा येतो, की त्या जन्मात परमेश्वरी साक्षात्कार होतो. जीवन्मुक्त दशा, विदेही अवस्था प्राप्त होते आणि तो जन्म त्या साधकाचा- नव्हे, सिद्धाचा- शेवटचा जन्म असतो. त्या देहपातानंतर तो ब्रह्मरूप होऊन जातो, मुक्त होतो. मग राहिलेल्या संचिताचे काय होते. त्याला ब्रह्मसूत्र उत्तर देते की–

*'तदधिगमे पूर्वाघयोरश्लेषविनाशो तद्व्यपदेशात् ।'*

*(अ. ४, पा. १, सू. १३).*

ते (ब्रह्म) प्राप्त झाले असता पुढल्या मागल्या पातकांचे अश्लेष आणि (अनुत्पत्ती) नाश होतात. कारण (श्रुतीत) तसे सांगितले आहे.

*'इतरस्याप्येवमसंश्लेषः पाते तु ।'*

*(अ. ४, पा. १, सू. १४).*

इतरांचा (पापकर्माशिवाय इतरांचा म्हणजे पुण्यकर्माचा) देखील अशा रीतीने अश्लेष होतो (आणि शरीर) पडताच (मुक्ती मिळते.) म्हणजेच तो जीव ब्रह्मरूप होतो.

### ब्रह्म सत्य जगन्मिथ्या

मिथ्या म्हणजे खोटे, भ्रामक, क्षणिक टिकणारे-दिसणारे, अज्ञानामुळे जाणवणारे, विपरीत ज्ञान, प्रपंच (देखावा) फसवणारे, गोंधळून टाकणारे, भांबवणारे. हे सर्व अर्थ सर्वार्थाने लागू पडणारेच आहेत. म्हणून येथे दिले आहेत. कारण कोणताही एक अर्थ हा नेहमी दिशाभूल करणारा ठरतो व वाद करणारे हा अमुक एक चुकीचा असे पटवून देऊ लागतात. म्हणून ज्या वेळी 'जगन्मिथ्या' असे म्हटले जाते, त्या वेळी जगताचे मिथ्यात्व हे ज्या अर्थाने असते ते सर्व अर्थ येथे देण्याचा प्रयत्न केला आहे. कदाचित

याहीपेक्षा आणखीनही काही वेगळा अर्थ असण्याची शक्यता आहे, पण तो अर्थही या अर्थांना पुष्टी देणाराच असेल यात शंका नाही. असो.

मिथ्या म्हणजे काय?

'आचार्यांनी असत्त्व – खोटेपणा दाखवण्यासाठी दिलेल्या दृष्टान्ताचे तीन गट पडतात. १) पहिल्या गटात शशविषाण, वन्ध्यापुत्र किंवा आकाशपुष्प इत्यादी दृष्टान्त दिलेले आढळतात. या दृष्टान्तांनी आचार्य खरोखरचा अभाव किंवा असत्त्व व्यक्त करतात. अभाव दाखवणारे वरील दृष्टान्त व्यवहाराचे मिथ्यात्व दाखवण्यासाठी त्यांनी कोठेही दिलेले नाहीत, त्यामुळे सर्व व्यवहार सर्वथैव खोटा आहे, असे आचार्य मानत नाहीत असे सिद्ध होते. २) दुसऱ्या गटात रज्जू-सर्प, शुक्ति-रजत, मरु-मरीचिका, गगन-मालिन्य दृष्टान्त येतात. हे दृष्टान्त सद्रूप अधिष्ठान किंवा आस्पद मान्य करून दिलेले असल्यामुळे द्राष्टीन्तिकाली सर्वथैव खोटेपणा प्राप्त होत नाही. ३) तिसऱ्या गटात स्वप्न दृष्टान्त येतो. यात वाटल्यास नामरूपाच्या दृष्टान्ताचा अंतर्भाव करावा. किंवा त्याला वेगळा समजावे. या दृष्टान्ताने स्वप्नामधील पदार्थ जागृतावस्थेच्या दृष्टीने खोटे आहेत, हे दाखवले जाते. स्वप्नदशेतला व्यवहार स्वप्न पाहात असता खराच असतो. त्याचप्रमाणे जागृतावस्थेत व्यवहार पारमार्थिक दृष्ट्या खोटा आहे. परंतु व्यावहारिक दृष्ट्या खराच आहे. स्वप्नाला 'जाग्रदविषयांपेक्षा तदनृतत्त्वं व स्वतः' (छां. भा. ८.५.४) असे पुष्कळ ठिकाणी म्हटले आहे. यावरून व्यवहार हा सर्वथैव खोटा न ठरता तो सापेक्ष खरा म्हटला पाहिजे. आचार्य म्हणतात, 'सत्यं व्यवहार विषयं न परमार्थ सत्यं एकमेव हि परमार्थ सत्यं ब्रह्म।' (तै. भा.) याचा अर्थ 'सत्य म्हणजे व्यवहारसमयी बाधित न होणे.' परंतु हे पारमार्थिक सत्य नव्हे. कारण परमार्थ सत्य एकच ब्रह्म आहे. यास्तव येथे व्यवहारविषयक आपेक्षिक सत्य हाच सत्य शब्दाचा अर्थ आहे. 'जसे मृगजलादी असत्-मिथ्या पदार्थाच्या अपेक्षेने उदकादिक सत्य म्हटले जाते.' येथे भाष्यकारांचे मत स्पष्ट दिसून येते. सृष्टीतील पदार्थांना परमार्थ-दृष्टीने जरी कल्पित म्हटले, तरी त्या कल्पित वस्तूपासून घडणारा भोग खोटा असतो असे आचार्य मानीत नाहीत. 'स्वप्नस्त्रीसङ्ग सौख्यात्' (३६) या श्लोकात स्त्री खोटी, स्वप्न खोटे, स्त्रीसंग खोटा परंतु प्रातःकाळी प्रत्यक्ष दिसत असल्यामुळे तो खोटा मानता येत नाही. रज्जूवर कल्पिलेला स्पर्श भयकंपादी विकार उत्पन्न करतो. परंतु अधिष्ठानाचे-रज्जूचे ज्ञान झाल्यावर कोणतेच विकार उत्पन्न होत नाहीत. याच न्यायाने आत्मज्ञानापूर्वी मनुष्याकडून होणारा व्यवहार पारमार्थिक दृष्ट्या जरी असत्य असला, तरी त्याच्या हातून झालेल्या बऱ्यावाईट कर्माप्रमाणे त्याला सर्व नरकादी फळे भोगावी लागणारच.

परंतु तो अपरोक्षज्ञानी झाल्यावर त्याचे कोणतेही कर्म साहंकार होत नसल्यामुळे त्याला कसलेही फळ भोगावे लागत नाही. ४) नामरूपाच्या दृष्टान्ताचा विचार केल्यास असे दिसून येईल की नामरूपे ही नाश पावणारी आहेत. हे प्रत्येकाच्या अनुभवाला येत असल्यामुळे ही नश्वर आहेत हे मानणे भाग आहे. व्यवहारामध्ये ज्याला आपण 'नश्वर' म्हणतो, अशा नामरूपाला भाष्यकार पारमार्थिक दृष्ट्या 'मिथ्या' किंवा 'माया' असे म्हणतात. तेव्हा 'ज्या अर्थी नामरूप नश्वर नाही असे सिद्ध होत नाही व ते कोणालाही सिद्ध करता येणे शक्य नाही' त्या अर्थी ही माया तिचा द्वेष करणाऱ्यांना मानणे भाग आहे. त्यामुळे जगताला 'पारमार्थिक सत्यत्व' आहे हे सिद्ध होऊ शकत नाही.

*(भारतीय दर्शन संग्रह – लेखक – द. वा. जोग).*

मिथ्या म्हणजे खोटे. जगत् खोटे आहे म्हणजे काय आहे? 'जे दिसते ते खरे' असे म्हटले जाते. तसेच 'जसे दिसते तसे नसते म्हणून जग फसते' असेही म्हटले जाते. पहिले वाक्य लौकिकार्थाने बरोबर असले तरी दुसरे वाक्य तात्त्विक दृष्ट्या बरोबर आहे. मृगजळ दिसते पण प्रत्यक्षात नसते. एखादी वस्तू ही जवळ असली की मोठी दिसते पण तीच लांब असली की लहान दिसते. तसेच सूर्य क्षितिजावर असला की मोठा दिसतो. तोच आकाश मध्यात आला की लहान दिसतो. सूर्य जेवढा दिसतो तेवढा तो प्रत्यक्षात नाही तर त्यापेक्षा कितीतरी पटींनी मोठा आहे. म्हणजे जसे दिसते तसे प्रत्यक्षात असेल अशी खात्री नाही. म्हणून ते खोटे आहे. मग असे का दिसते? तर तो भ्रम आहे. म्हणजे जसे दिसते तसे प्रत्यक्षात नसणे तर वेगळेच असणे याला भ्रम म्हणतात. भ्रम हा मनाला गोंधळून टाकतो. कारण आपला सगळाच अंदाज चुकतो. शिंपीवर चांदीचा भास होणे, पण जरा जवळ जाऊन पाहिले असता ती चांदी नसून शिंपी आहे याचे ज्ञान होणे याला भ्रम म्हणतात, भास म्हणतात आणि यामुळेच 'फसवणूक' होते. शिंपीच्या ठिकाणी चांदीची अपेक्षा होते पण प्रत्यक्षात शिंपी आहे हे समजताच अपेक्षाभंग होतो, फसवणूक होते. मृगजळ हे लांबून पाण्याच्या लहरीप्रमाणे दिसते. एवढेच काय पण तेथून एखादे वाहन जात असेल तर त्याचे प्रतिबिंबही त्या मृगजळात दिसते, पण जवळ जाताच ना तेथे पाणी असते ना ओलावा असतो. हे अज्ञानामुळे भासत असते. यालाच विपरीत ज्ञानही म्हणतात आणि मग प्रथम पाहिले ते खरे का आत्ताचे दिसणे ते खरे? अशी शंका मनात उत्पन्न होते. अशाच प्रकारचा हा प्रपंच आहे. केवळ देखावा.

याहीपेक्षा आणखीनही काही वेगळा अर्थ असण्याची शक्यता आहे, पण तो अर्थही या अर्थांना पुष्टी देणाराच असेल यात शंका नाही. असो.

### मिथ्या म्हणजे काय?

'आचार्यांनी असत्त्व – खोटेपणा दाखवण्यासाठी दिलेल्या दृष्टान्ताचे तीन गट पडतात. १) पहिल्या गटात शशविषाण, वन्ध्यापुत्र किंवा आकाशपुष्प इत्यादी दृष्टान्त दिलेले आढळतात. या दृष्टान्तांनी आचार्य खरोखरचा अभाव किंवा असत्त्व व्यक्त करतात. अभाव दाखवणारे वरील दृष्टान्त व्यवहाराचे मिथ्यात्व दाखवण्यासाठी त्यांनी कोठेही दिलेले नाहीत, त्यामुळे सर्व व्यवहार सर्वथैव खोटा आहे, असे आचार्य मानत नाहीत असे सिद्ध होते. २) दुसऱ्या गटात रज्जू-सर्प, शुक्ति-रजत, मरु-मरीचिका, गगन-मालिन्य दृष्टान्त येतात. हे दृष्टान्त सद्रूप अधिष्ठान किंवा आस्पद मान्य करून दिलेले असल्यामुळे द्राष्टीन्तिकाली सर्वथैव खोटेपणा प्राप्त होत नाही. ३) तिसऱ्या ाटात स्वप्न दृष्टान्त येतो. यात वाटल्यास नामरूपाच्या दृष्टान्ताचा अंतर्भाव करावा. कंवा त्याला वेगळा समजावे. या दृष्टान्ताने स्वप्नामधील पदार्थ जागृतावस्थेच्या दृष्टीने खोटे आहेत, हे दाखवले जाते. स्वप्नदशेतला व्यवहार स्वप्न पाहात असता खराच असतो. त्याचप्रमाणे जागृतावस्थेत व्यवहार पारमार्थिक दृष्ट्या खोटा आहे. परंतु व्यावहारिक दृष्ट्या खराच आहे. स्वप्नाला 'जाग्रदविषयांपेक्षा तदनृतत्त्वं व स्वत:' (छां. भा. ८.५.४) असे पुष्कळ ठिकाणी म्हटले आहे. यावरून व्यवहार हा सर्वथैव खोटा न ठरता तो सापेक्ष खरा म्हटला पाहिजे. आचार्य म्हणतात, 'सत्यं व्यवहार विषयं न परमार्थ सत्यं एकमेव हि परमार्थ सत्यं ब्रह्म।' (तै. भा.) याचा अर्थ 'सत्य म्हणजे व्यवहारसमयी बाधित न होणे.' परंतु हे पारमार्थिक सत्य नव्हे. कारण परमार्थ सत्य एकच ब्रह्म आहे. यास्तव येथे व्यवहारविषयक आपेक्षिक सत्य हाच सत्य शब्दाचा अर्थ आहे. 'जसे मृगजलादी असत्-मिथ्या पदार्थाच्या अपेक्षेने उदकादिक सत्य म्हटले जाते.' येथे भाष्यकारांचे मत स्पष्ट दिसून येते. सृष्टीतील पदार्थांना परमार्थ-दृष्टीने जरी कल्पित म्हटले, तरी त्या कल्पित वस्तूपासून घडणारा भोग खोटा असतो असे आचार्य मानीत नाहीत. 'स्वप्नस्त्रीसङ्ग सौख्यात्' (३६) या श्लोकात स्त्री खोटी, स्वप्न खोटे, स्त्रीसंग खोटा परंतु प्रात:काळी प्रत्यक्ष दिसत असल्यामुळे तो खोटा मानता येत नाही. रज्जूवर कल्पिलेला स्पर्श भयकंपादी विकार उत्पन्न करतो. परंतु अधिष्ठानाचे-रज्जूचे ज्ञान झाल्यावर कोणतेच विकार उत्पन्न होत नाहीत. याच न्यायाने आत्मज्ञानापूर्वी मनुष्याकडून होणारा व्यवहार पारमार्थिक दृष्ट्या जरी असत्य असला, तरी त्याच्या हातून झालेल्या बऱ्यावाईट कर्माप्रमाणे त्याला सर्व नरकादी फळे भोगावी लागणारच.

परंतु तो अपरोक्षज्ञानी झाल्यावर त्याचे कोणतेही कर्म साहंकार होत नसल्यामुळे त्याला कसलेही फळ भोगावे लागत नाही. ४) नामरूपाच्या दृष्टान्ताचा विचार केल्यास असे दिसून येईल की नामरूपे ही नाश पावणारी आहेत. हे प्रत्येकाच्या अनुभवाला येत असल्यामुळे ही नश्वर आहेत हे मानणे भाग आहे. व्यवहारामध्ये ज्याला आपण 'नश्वर' म्हणतो, अशा नामरूपाला भाष्यकार पारमार्थिक दृष्ट्या 'मिथ्या' किंवा 'माया' असे म्हणतात. तेव्हा 'ज्या अर्थी नामरूप नश्वर नाही असे सिद्ध होत नाही व ते कोणालाही सिद्ध करता येणे शक्य नाही' त्या अर्थी ही माया तिचा द्वेष करणाऱ्यांना मानणे भाग आहे. त्यामुळे जगताला 'पारमार्थिक सत्यत्व' आहे हे सिद्ध होऊ शकत नाही.

*(भारतीय दर्शन संग्रह – लेखक – द. वा. जोग).*

मिथ्या म्हणजे खोटे. जगत् खोटे आहे म्हणजे काय आहे? 'जे दिसते ते खरे' असे म्हटले जाते. तसेच 'जसे दिसते तसे नसते म्हणून जग फसते' असेही म्हटले जाते. पहिले वाक्य लौकिकार्थाने बरोबर असले तरी दुसरे वाक्य तात्त्विक दृष्ट्या बरोबर आहे. मृगजळ दिसते पण प्रत्यक्षात नसते. एखादी वस्तू ही जवळ असली की मोठी दिसते पण तीच लांब असली की लहान दिसते. तसेच सूर्य क्षितिजावर असला की मोठा दिसतो. तोच आकाश मध्यात आला की लहान दिसतो. सूर्य जेवढा दिसतो तेवढा तो प्रत्यक्षात नाही तर त्यापेक्षा कितीतरी पटींनी मोठा आहे. म्हणजे जसे दिसते तसे प्रत्यक्षात असेल अशी खात्री नाही. म्हणून ते खोटे आहे. मग असे का दिसते? तर तो भ्रम आहे. म्हणजे जसे दिसते तसे प्रत्यक्षात नसणे तर वेगळेच असणे याला भ्रम म्हणतात. भ्रम हा मनाला गोंधळून टाकतो. कारण आपला सगळाच अंदाज चुकतो. शिंपीवर चांदीचा भास होणे, पण जरा जवळ जाऊन पाहिले असता ती चांदी नसून शिंपी आहे याचे ज्ञान होणे याला भ्रम म्हणतात, भास म्हणतात आणि यामुळेच 'फसवणूक' होते. शिंपीच्या ठिकाणी चांदीची अपेक्षा होते पण प्रत्यक्षात शिंपी आहे हे समजताच अपेक्षाभंग होतो, फसवणूक होते. मृगजळ हे लांबून पाण्याच्या लहरीप्रमाणे दिसते. एवढेच काय पण तेथून एखादे वाहन जात असेल तर त्याचे प्रतिबिंबही त्या मृगजळात दिसते, पण जवळ जाताच ना तेथे पाणी असते ना ओलावा असतो. हे अज्ञानामुळे भासत असते. यालाच विपरीत ज्ञानही म्हणतात आणि मग प्रथम पाहिले ते खरे का आत्ताचे दिसणे ते खरे? अशी शंका मनात उत्पन्न होते. अशाच प्रकारचा हा प्रपंच आहे. केवळ देखावा.

देखावे हे क्षणाक्षणाने बदलणारे असतात. सायंकाळची निसर्गशोभा हीसुद्धा अशीच मोहक असते. मनाला मोह पाडणारी असते. पण काही वेळातच ते सौंदर्य लयास जाते. संध्याकाळची वेळ असेल तर ते सौंदर्य थोड्याच वेळात अंधकार गिळून टाकतो. किंवा सकाळची वेळ असेल तर ते सौंदर्य उन्हात करपून जाते. असे हे क्षणाक्षणाने बदलणारे आहे. त्यामुळे ते मिथ्या आहे. नदीचे पाणी सतत वाहात असते. त्यामुळे जे पाणी एका क्षणापूर्वी आपल्या समोर असते ते दुसऱ्या क्षणी पुढे जाऊन त्याच्या जागी नवीन पाणी आलेले असते, पण सततच्या प्रवाहामुळे हे जाणवत नाही. तसेच उदबत्ती वा मशाल ही पेटवून गोलाकार फिरवली की तेजाचे एक चक्र असल्याचा भास होतो. तो सुद्धा एक भ्रम आहे. पण केवळ गतीने फिरवल्याने ते तेज गोल चक्राकार असल्याचा भास होतो. आपल्या शरीरातील पेशी या हजारोंच्या संख्येने मरत असतात व तितक्याच प्रमाणात त्या नवीन उत्पन्न होत असतात. त्यामुळे आपण बदलत असतो. लहानपणाचे आपले छायाचित्र व तरुणपणाचे आपले छायाचित्र यांत आपल्याला खूप बदल दिसेल. म्हणजे कालचे आपण आज नसतो व आजचे उद्या नसतो. कालच्या व आजच्या आपल्यात एवढा विषेश फरक दिसणार नाही. पण आपणास आपण तेच आहोत असे वाटते, कारण वेगातिशय होय. आपणाला नित्यनूतन पाहण्याची आवड असते. रोज सकाळी उठताना आपल्याला उत्साह असतो. कारण तोच तोच जरी दिवस आहे असे वाटत असले, तरी तो दिवस नूतन असतो. कारण आपण स्वत: नवीन असतो. तसे भोवतालचे जगही नवीन असते. मित्र, मैत्रिणी, नातेवाईक कालचीच आहेत असे वाटते पण तेही नवीन असतात. म्हणून आपणास त्यांना भेटल्यावर आनंद होतो. तसे सर्व जगच नवीन असते आणि म्हणून जगण्यात उत्साह असतो. नित्य बदलत राहणे हा प्रकृतीचा धर्म आहे आणि म्हणून तिला अनित्य म्हटले आहे. असत् म्हटले आहे. पण या असत्, अनित्य वस्तुमात्रातसुद्धा एक तत्त्व असे आहे की जे नित्य असते, सत् असते आणि ते म्हणजे ब्रह्म. ब्रह्माचे अधिष्ठान या प्रकृतीला पुरुषरूपाने आहे. अस्ति, भाति, प्रियत्व या रूपाने आहे आणि त्यामुळे प्रकृतीचे अस्तित्व आहे. प्रकृती नामरूपाने आहे. ब्रह्म सत्य आहे कारण ते कधीही बदलत नाही. ते इंद्रियगोचर नाही. ते सूक्ष्म रूपाने आहे. ते गुणातीत, कालातीत असून, निर्गुण, निराकार, निर्विकार असे आहे. ते देशकालस्थिती यांनी अनिर्देश्य आहे. ते अनादी आहे. ते चैतन्यरूपाने आहे. चैतन्य म्हणजे तेज, प्रकाश, उष्णता, चलनवलन, शक्ती, क्रियाशीलता वगैरे अनेक रूपांनी आहे. ते आनंदरूपाने म्हणजे सहजस्थितीत आहे. संत ज्ञानेश्वरांनी वर्णन करताना म्हटले आहे, 'ऐशिया आपुलियाची सहज स्थिती। जया ब्रह्माची नित्यता असती॥' (८.१९

ज्ञानेश्वरी). सहज स्थिती हा ब्रह्माचा स्वभाव आहे आणि म्हणून ते ब्रह्म नित्य आहे. सहज स्थिती ही आनंदाची स्थिती आहे. आपणास होणारा आनंद हा विकार आहे. कारण आपणास कोणत्यातरी विषयांमुळे हा विकार उत्पन्न होतो. आपण त्याला आनंद हे नाव देतो आणि हा विकार काही काळाने बदलतो व आपणास कदाचित पुढे दुःख होते पण ब्रह्माचा आनंद हा असा विषयातून प्राप्त झालेला आनंद नाही तर ती त्याची सहज स्थिती आहे. यापेक्षा असे म्हटले तर चालेल की ब्रह्म हे आनंदरूप आहे, चैतन्यरूप आहे व सत्स्वरूप आहे. साखर गोड आहे असे न म्हणता साखर ही गोडरूप आहे, असेच म्हणणे योग्य आहे. पण साखर ही शुद्ध गोडच असते म्हणून ती गोडरूप आहे. कापूर हा परिमळरूप आहे कारण कापराचा अंगभूत गुण तो आहे. त्याच्या कणाकणातून परिमळ भरून राहिला आहे. तसे ब्रह्म हे आनंदरूप आहे. चैतन्यरूप आहे. सत्स्वरूप आहे.

सत्, चित्, आनंद असे तिन्ही ब्रह्म कसे असेल? असा विचार मनात येण्याची शक्यता आहे. तर साखर ही पांढरी, स्फटिकरूप व गोडरूप आहे. कापूर हा पांढरा, मऊ, व परिमळरूप आहे. पांढरेपणा, स्फटिकरूपता व गोडरूपता ही तिन्ही मिळून साखरेचे रूप आहे. तसेच पांढरेपणा, मऊपणा व परिमळता हा तिन्ही मिळून कापराचे रूप आहे. तसेच सत्, चित्, आनंद हे ब्रह्मरूपाचे वर्णन आहे.

तैतिरीयोपनिषदात विषयी-आनंद व ब्रह्मानंद यांत तुलना केली आहे. ब्रह्मानंद किती मोठा आहे त्याचे प्रमाण दाखवण्याचा प्रयत्न आहे.

## ब्रह्मानंदाची इतर आनंदांशी तुलना

जगातील सर्वलोक सुखासाठी, आनंदासाठी धडपडत असतात. पण ते सर्व सुख तो आनंद विषयांपासून शोधत असतात. विषयांतील आनंद हा अगदी अल्पकाळ टिकणारा असतो. शिवाय त्या सुखाचा वीटही येतो आणि ते सुख, तो आनंद पुढे दुःखालाच कारण होतो. या गोष्टीची अनुभूती सर्व संतांनी अनेक जन्मांतून घेतलेली असते. म्हणून ते या अवस्थेप्रत आलेले असतात की आनंद हा विषयांत नसून विषयातीत आहे. निर्विषयक आनंद हाच खरा आनंद असून तेच ब्रह्मस्वरूप आहे. कारण आनंद हेच ब्रह्माचे अंग आहे आणि त्याचेच वर्णन तैत्तिरीयोपनिषदात केले आहे. ते वर्णन वल्ली २, अध्याय ८, श्लोक १ ते ४ मध्ये आले आहे. आनंदाच्या ब्रह्मानंदाबरोबर केलेल्या तुलनेचा भावार्थ खालीलप्रमाणे आहे.

'सात्त्विक, नवयुवक, वेदवित, अत्यंत आशावान, बलवान, तथा, धनधान्य समृद्ध,' याप्रमाणे आध्यात्मिक दृष्ट्या व अदृश्यार्थ कर्मसाधनांनी संपन्न असा राजा. त्याचा जो आनंद तो एक मानुष (मनुष्याचा सर्वोत्कृष्ट) आनंद आहे. असे शंभर मानुषआनंद तो एक मानुषगंधर्वाचा आनंद आहे. (मानुषानंदाहून मानुषगंधर्व आनंद शतपट उत्कृष्ट असतो) मनुष्यगंधर्वाचे जे शंभर आनंद तो देवगंधर्वाचा एक आनंद. देवगंधर्वाचे जे शंभर आनंद तो पितृगणाचा एक आनंद. पितरांचे शंभर आनंद तो कर्मदेवांचा एक आनंद. जे कर्मदेवांचे शंभर आनंद तो देवांचा एक आनंद. देवाच्या शतपट इंद्राचा एक आनंद. इंद्राच्या शतपट आनंद तो बृहस्पतीचा एक आनंद. बृहस्पतीचे शंभर आनंद तो प्रजापतीचा एक आनंद आणि प्रजापतीचे शंभर आनंद तो ब्रह्माचा एक आनंद होय.' ह्या प्रकारे ब्रह्मनंदाची योग्यता आहे.

त्याचप्रमाणे श्रुतीने, ब्रह्मानंदाचे केलेले वर्णन

ब्रह्म आनंदमय आहे. परमेश्वराचे, ब्रह्माचे स्वरूप हे आनंदमय आहे.

'आनंद अद्वय नित्य निरामय' हे श्रुतिप्रामाण्य आहे.

'आनन्दमयोऽभ्यासात् ।' (ब्रह्मसूत्र १/१/१२)

'आनन्दमय' हा शब्द परब्रह्म, परमात्मा गोविंदवाचक आहे.

'सौषा ऽ नन्दस्य मी मां सा भवति ।' (तैत्ति. उप. ब्रह्मवल्ली २/८)

'आनन्दं ब्रह्मणो विद्वान न बिभेति कुतश्चन ।।' (तैत्ति. उप. ब्रह्मवल्ली २/९)

'विज्ञानमानन्दं ब्रह्म ।' (बृह. उप. अ. ३/९/२८).

या आनंदाची प्रचीती तुकाराम महाराजांना आली म्हणून ते म्हणतात–

*'आनंदले मन । प्रेमे पाझरती लोचन ।।'*

वैषयिक आनंद हा अल्पकाळ टिकणारा नाशवंत असूनही त्याचा वीट येतो, म्हणून खऱ्या सुखाची, आनंदाची सर्वांनी प्रचीती घ्यावी, अनुभव घ्यावा. यासाठी प्रयत्नांची पराकाष्ठा करावी, असे श्रुती सांगते. जी मेहनत, पराकाष्ठा या अल्पकाळ टिकणाऱ्या नाशवंत सुखासाठी घेतली जाते पण शेवटी त्यातून खरे सुख-आनंद मिळतच नाही. उलट ती मेहनत, धडपड दुःखाला कारण होऊन अनेक जन्मांचे निमित्त होते. त्यापेक्षा निर्विषयक आनंदासाठी जर तेवढीच मेहनत, कष्ट घेतले गेले,

तर जो आनंद मिळेल तो अखंड असणारा असेल व जन्ममरणाचे चक्र बंद पाडणाराही असेल म्हणून त्यासाठीच पराकाष्ठा करावी असे श्रुती म्हणते.

*यो वै भूमा तत्सुखं नाल्पे सुखमस्ति*
*भूमैव सुखं भूमा त्वैव ।*
*विजिज्ञासितव्य इति ॥*

*(छान्दोग्य उप. अ. ७/२६).*

'भूमा' म्हणजे 'निरतिशय महत्तत्त्व'. तेच सुख, परमानंद होय.

## विश्वरूप - परब्रह्म - एक अनुभूती

सर्वत्र परमेश्वर भरला आहे. परमेश्वराचे स्वरूप सर्व अणूरेणूंमध्ये आहे. 'विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि। शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः ॥ (५.१८ भ. गी.) वगैरे ही सर्व विधाने वाचायला ठीक वाटतात. पण समजत नाहीत. समजत नाहीत म्हणजे समजून येत नाही. कारण आपणाला बाह्य स्वरूपच दिसत असते. ब्राह्मण, गाय, हत्ती, कुत्रा, चांडाल या प्राण्यांमधील बाह्य शरीरभेद व त्याचे गुणधर्मच प्रत्ययाला येत असतात. तेव्हा त्यातील 'समदर्शिनः' नेमके कोणचे आहे याचा प्रत्यय आलेला नसतो; नव्हे तसा प्रत्यय आणून देणाराही भेटलेला नसतो आणि त्यामुळेच खरी अडचण असते. देवावर विश्वास नसणारे, देवावर विश्वास असणाऱ्याला एक साधा प्रश्न विचारून त्यांचे तोंड बंद करतात. आणि तो प्रश्न म्हणजे 'देव दाखवा' 'तुम्ही तो स्वतः पाहिला आहे का? या दोन्ही प्रश्नांना उत्तर नाही आणि त्यामुळे नास्तिक लोकांचे फावते व आस्तिक लोकांची श्रद्धा डळमळीत होते. पण एक गोष्ट लोकांच्या लक्षात येत नाही की, कोणत्याही एका शाखेचा अभ्यासक्रम पुरा करावयास १२/१५ वर्षे लागतात. व त्यातील प्रावीण्य मिळण्यासाठी व पूर्वअनुभव येण्यासाठी पुढील आणखी १०/१५ वर्षे लागतात. आयुष्याचा जवळजवळ अर्धा भाग असा खर्च होतो. तेव्हा जो परमेश्वर कोणत्याही इंद्रियाद्वारे, शब्दाद्वारे प्रकट होणार नाही, तो 'दाखव' म्हणताच दाखवला कसा जाईल? अशा त्या परमेश्वराला पाहण्यासाठीही प्रथमतः आपली योग्यता निर्माण केली का? तेवढे धारिष्ट्य, सामर्थ्य, आपल्या ठिकाणी आले आहे का? आपला तेवढा अभ्यास आहे का? जर तसे असेल तर ती अपेक्षा करावी. एकदा श्रीरामकृष्णांना एकाने असाच प्रश्न विचारला होता. ते गृहस्थ म्हणाले 'मला देवीचे दर्शन घडवा'. त्या वेळी रामकृष्ण

परमहंस गंगेवर स्नान करत होते. तेव्हा त्यांनी त्या गृहस्थाला पाण्यात उतरण्यास सांगितले व त्याचे डोके पाण्यात दाबले, तेव्हा तो गृहस्थ घाबऱ्या घाबऱ्या स्वरात तोंड पाण्याच्या बाहेर काढून म्हणाला 'अहो, माझा जीव कासावीस झाला होता ना!' तेव्हा रामकृष्णांनी सांगितले की 'जेव्हा तुमचा जीव असाच देवीच्या दर्शनासाठी कासावीस होईल तेव्हा तुम्हाला देवीचे दर्शन आपोआप होईल. मी दर्शन घडवण्याची गरज भासणार नाही.' याचप्रमाणे दुसरा एक दृष्टान्त देता येईल. एकदा जनकराजाच्या दरबारात अष्टवक्र ऋषी बसले होते. सर्व ज्ञानी पंडित त्या दरबारात उपस्थित होते. असाच परमेश्वर दर्शनाचा विषय निघाला होता. आणि तोच प्रश्न अष्टवक्राला विचारण्यात आला होता. जनकाच्या गळ्यात एक रत्नजडित कंठा होता. अष्टवक्राने विचारले 'राजा तुझ्या गळ्यातील कंठ्यातील रत्नांची किंमत काय आहे?' राजा म्हणाला 'मला माहीत नाही. रत्नपारख्याला विचारावे लागेल. अष्टवक्राने राजाला रत्नपारख्याला बोलावण्यास सांगितले. एक वयोवृद्ध रत्नपारखी दरबारात आला. त्याला रत्न देण्यात आले. रत्नपारख्याने रत्नांची परीक्षा करून त्याची किंमत सांगितली. अष्टवक्राने विचारले 'आपण याची किंमत कशी काय ठरवली?' रत्नपारखी म्हणाला, 'माझ्या आजोबापासून, पणजोबापासून ही रत्न परीक्षा करण्याचे कसब आमच्यात चालत आलेले आहे. माझी किंमतही अचूक असते. माझा हा गेल्या पंन्नास वर्षांचा अभ्यास आहे' अष्टवक्र दरबारला उद्देशून म्हणाला, 'राजा व सर्व विद्वान पंडित हो! एका साध्या दगडाची- हो रत्न म्हणजे काय शेवटी दगड किंवा काचच नव्हे काय?- परीक्षा करण्यासाठी चाळीस, पन्नास वर्षे अभ्यास करावा लागतो. तर मग जो निर्गुण, निराकार असा परमेश्वर आहे तो तुम्हाला 'दाखवा' म्हणून कसा दाखवता येणार व तो तुम्हाला दिसणार तरी कसा? कारण 'दाखवणे' व 'पाहणे' यालाही फार मोठी योग्यता लागते. आता या रत्नाचेच पाहा. हा रत्नपारखी रत्नाची परीक्षा करू शकतो व राजा त्याचे मोल देऊन खरेदी करू शकतो. पण आपण केवळ पाहण्याचेच काम करतो. ना आपणाला रत्न पारखता येते, ना आपण ते खरेदी करू शकतो.'

आता याच प्रश्नाचा उलगडा दुसऱ्या पद्धतीने करता येईल. एक धनिक होता. त्याला मूलबाळ नव्हते. त्याने एका अनाथाश्रमातून एक मुलगा दत्तक घेतला. तेव्हा आता काय झाले? जो मुलगा अनाथ होता तो सनाथ झाला. जो गरीब होता तो धनिक झाला व ज्याला रोजच्याच अन्नाची पंचाईत होती त्याला सुग्रास अन्न मिळू लागले. ज्याच्याजवळ कोणत्याच सुविधा नव्हत्या, त्याला सर्व सुविधा प्राप्त झाल्या. ते का शक्य झाले? तर जो धनिक होता त्याच्या कृपेमुळे. म्हणजे धनिकाजवळ एका

गरिबाला एकदम श्रीमंत करण्याचे सामर्थ्य होते आणि त्यामुळेच हे शक्य झाले. हे जसे धनाच्या बाबतीत शक्य आहे. तसे विद्येच्या बाबतीतही शक्य आहे. जो गुरू शक्तिपात पद्धतीने स्वत:चे ज्ञान शिष्याच्या ठिकाणी प्रक्षेपित करण्याइतका समर्थ असतो. तो गुरू अगदी अज्ञानी असलेल्या माणसालाही असे ज्ञान देऊन एकदम ज्ञानी बनवू शकतो आणि कालिदास हे त्याचे सर्वोत्तम उदाहरण आहे. तसे आध्यात्मिक ज्ञानाचे शक्तिपात पद्धतीने दीक्षा दिलेले पुष्कळच गुरू-शिष्य आहेत. पण लौकिक दृष्ट्या कालिदासाचे नाव आठवले म्हणून उल्लेख केला, एवढेच. त्याच पद्धतीने आपणाजवळ असलेली शक्ती दुसऱ्याच्या ठिकाणी काही काळासाठी प्रक्षेपित करून परत घेतल्याचे उदाहरण म्हणजे संजय. व्यासांनी दूरदृष्टी व दूरश्रवणाची शक्ती संजयला दिली व त्याने राजा धृतराष्ट्राला कुरुक्षेत्रावरचा सर्व वृत्तान्त राजाच्या महालात बसून सांगितला. तशीच शक्ती भगवान श्रीकृष्णाने अर्जुनाला विश्वरूप पाहण्यासाठी दिली होती. 'दिव्यं ददामि ते चक्षु: पश्य मे योगमैश्वरम् ।'- 'अर्जुना, मी तुला दिव्य दृष्टी देतो. तू माझा ऐश्वर्य योग पाहा.' या वाक्यासरशी अर्जुनाला दिव्य दृष्टी प्राप्त झाली व त्याने गीतेमधील विभूतियोगामध्ये वर्णन केल्याप्रमाणे परमेश्वराच्या सृष्टीतील विविध रूपे परमेश्वराच्याच ठिकाणी कशी अवस्थित आहेत ते पाहिले. सर्वत्र परमेश्वर भरला आहे. सर्व चराचरांमध्ये परमेश्वराचे चैतन्यस्वरूप कसे भरून आहे, हे अर्जुनाला दिसत होते. परमेश्वराने अर्जुनाला जशी दिव्य दृष्टी दिली तसे दिव्य सामर्थ्यही दिले होते. कारण अशा प्रकारचे विश्वरूप पाहण्यासाठीसुद्धा दिव्य धारिष्ट्य, सामर्थ्य आवश्यक आहे. धनिकाने एका गरीब मुलाला दत्तक घेऊन धनिक केले असले, तरी पुढे त्याला शिक्षण देऊन व्यापारातील कसब शिकवून तयार केला तरच तो धन सांभाळू शकेल नाही तर त्या मुलाच्या हाती व्यवहार गेला तर तो थोड्याच दिवसांत कफल्लक होण्याची शक्यता असते. म्हणून कोणतीही शक्ती दिली तरी ते पेलण्याचे सामर्थ्यही द्यावे लागते.

एकदा वर्तमानपत्रात वाचले होते, की कोणा एकाला अश्वत्थामा दिसला. त्या गृहस्थाने त्याचा पाठलाग केला. जरा निर्जन भागात गेल्यावर अश्वत्थाम्याने विचारले, 'तुम्ही माझ्या मागे का येता?' तेव्हा त्या गृहस्थाने विचारले, 'तुम्हीच अश्वत्थामा का?' तेव्हा अश्वत्थामा म्हणाला, 'होय.' तेव्हा तो गृहस्थ म्हणाला, 'तुम्ही जर खरोखरच अश्वत्थामा असाल तर मला कुरुक्षेत्रावरच्या युद्धाचा प्रसंग पाहण्याची इच्छा आहे. ते तुम्ही दाखवा.' अश्वत्थामा म्हणाला, 'तुम्हाला मी ते दृश्य दाखवीन पण तुम्हाला ते पाहवणार नाही व ऐकवणारही नाही. कारण तुम्हाला मी तशी शक्ती देऊ

शकणार नाही.' तेव्हा तो गृहस्थ म्हणाला 'मला चालेल, पण तुम्ही मला ते युद्ध दाखवा.' तेव्हा अश्वत्थाम्याने त्याला ते दृश्य दाखवले, पण तेथील वाद्यांचा, रणभेदीचा आवाज ऐकूनच त्या गृहस्थाचे कान फुटून गेले व तो बेशुद्ध पडला. त्याला जेव्हा जाग आली, तेव्हा तो इस्पितळात होता. तसे भगवंतांनी अर्जुनाला दिव्यचक्षूही दिले व विश्वरूप पाहण्याचे सामर्थ्यही दिले. आता ते सामर्थ्य किती पराकोटीचे होते, त्या दिव्यचक्षूंचे स्वरूप कसे होते याचे वर्णन संत ज्ञानेश्वरांनी केले आहे. ते वाचणे, त्यावर चिंतन करणे महत्त्वाचे आहे. कारण दिव्यचक्षू म्हणजे काय असतात ते त्या शब्दांतून स्पष्ट केले आहे.

*'अहो पाहता कीर प्रतिभासे। एथ नवलावो काय असे।*
*परि न पाहतांही दिसे। चोज आईका॥*

*कैसे अनुग्रहाचे करणे। पार्थाचे पाहणे आणि न पाहणे।*
*तयाही सकट नारायणे। व्यापूनि घेतले॥'*

*(११.२२९ ते २३० ज्ञानेश्वरी).*

भगवंतांनी अर्जुनाला दिव्यचक्षू दिले होते. ते केवळ त्याच्या साध्या डोळ्यांना दिलेले सामर्थ्य नव्हते. त्या डोळ्यांचा व दिव्यचक्षूंचा काहीच संबंध नव्हता असे संत ज्ञानेश्वरांच्या वर्णनावरून वाटते. साधे डोळे मिटले तर दिसणे बंद होते. पण अर्जुनाच्या बाबतीत त्याने डोळे बंद करूनही त्याला विश्वरूपाचे दर्शन होत होते. एवढेच नव्हे तर त्याची पाहण्याची इच्छा असो वा नसो त्याला विश्वरूप दर्शन होतच राहणार असे सामर्थ्य त्या दिव्यचक्षूंत होते आणि तिसरा महत्त्वाचा भाग म्हणजे,

*इहैकस्थं जगत्कृत्स्नं पश्याद्य सचराचरम्।*
*मम देहे गुडाकेश यच्चान्यद् द्रष्टुमिच्छसि॥*

*(११.७ भ. गी.).*

अर्थ – अर्जुना! येथे या माझ्या (विश्वरूप) देहामध्ये स्थावर जंगमासह संपूर्ण जग आज (आता) एकत्र झालेले पाहा आणि दुसरे जे काही तुला पाहण्याची इच्छा असेल (तेही पाहा). या भगवंतांनी दिलेल्या सामर्थ्यामध्ये महत्त्वाचे म्हणजे 'मी दाखवीन ते तुला दिसेल' असेच नसून अर्जुनाला जे पाहण्याची इच्छा असेल तेही दिसेल असा वर दिला होता. असे सामर्थ्य प्रदान करणारे भगवंत श्रेष्ठ होते तर अर्जुनही त्याच तयारीचा होता असे म्हणावे लागेल.

तेव्हा परमेश्वराचे दर्शन कोणालाही होऊ शकेल व त्यासाठी आपलीही तयारी महत्त्वाची आहे. अहो! साधी गोष्ट लांबच्या प्रवासाला जावयाचे असेल, तर आपल्याला केवढी तयारी करावी लागते. मुख्य म्हणजे पैशाची व्यवस्था करावी लागते. पैसा हेच आजचे सामर्थ्य आहे. मग परमेश्वराजवळ जाण्यासाठी, त्याच्या दर्शनासाठी इच्छा असणाऱ्यांनी भक्तीचे सामर्थ्य वाढवणे हेच महत्त्वाचे आहे आणि जेव्हा हे सामर्थ्य हाती येईल तेव्हा सद्‌गुरूंची भेट आपोआप होईल व त्यांच्या कृपेने, त्यांनी दिलेल्या ज्ञानाने, सामर्थ्याने परमेश्वराचे दर्शन होईल, विश्वरूपाचे दर्शन होईल. मग संत ज्ञानेश्वरांनी वर्णन केलेल्या ओवीची अनुभूती येईल. 'हे विश्वचि माझे घर। ऐसी मति जयाचि स्थिर। किंबहुना चराचर। आपणचि जाहला॥' (१२.२१३ ज्ञानेश्वरी).

नामदेवांनी म्हटल्याप्रमाणे

*'एक तरी ओवी अनुभवावी।'*



# विभाग ३ – जीवन्मुक्त दशा

परिणाम क्रम –

वारसा हक्काने जशी संपत्ती येते तसे ज्ञान हेही वारसा हक्काने येते. सगळ्या गोष्टींची अनुभूती आपणास मिळत नाही, घेता येत नाही, घेण्याची पात्रता मिळवता येत नाही. अशी अनेक कारणे असतील पण जेव्हा स्वत: एखाद्या गोष्टीची अनुभूती घेऊ शकत नाही. ती अनुभूती ज्यांनी घेतली आहे व लिहून ठेवली आहे, निदान ती वाचून तरी आपणास त्या अनुभूतीची थोडीशी कल्पना करता येते. जी अनुभूती आपणाला मिळाली नाही, ती इतरांना मिळाली असल्यास ती खोटी आहे, काल्पनिक आहे वगैरे कारणे सांगून आपण त्याकडे जर दुर्लक्ष केले, तर आपण त्यांच्या आनंदात सहभागी होऊ शकत नाही व तो आनंद आपणास मिळत नाही. हे आपले एक प्रकारचे नुकसानच आहे.

'जीवन्मुक्त' ही अशी एक अवस्था असते व ती प्रयत्नाने प्राप्त करून घेता येते. आता ही अवस्था खरोखरीच प्राप्त करून घेता येते का? प्राप्त झाली असता त्यांचे लक्षण कोणते? जीवन्मुक्ताचे आचरण कसे असते? याविषयी ब्रह्मसूत्रात काही विचार केला आहे. त्यातील सूत्रे येथे दिली आहेत.

*'सदृश्य दिव्यस्वरूपसम्पन्न चिंतितन्मात्रेण तदात्मकत्वात् ।'*

*(४.४.६).*

अर्थ – केवळ चेतन मात्र जगदात्म्यात (स्वस्वरूपाचे ठायी) ब्रह्मस्वरूपात अभेदत्वाने स्थित होणे, कारण त्याचे वास्तविक स्वरूप तेच आहे. परमधामाला गेलेला

परममुक्तात्मा आपल्यामुळे परमचैतन्य स्वरूपात सबाह्य स्थित होतो. तसेच बृहदारण्यक उपनिषदात म्हटले आहे,

*'स यथा सैन्धवघनोऽनन्तरोऽबाह्यः कृत्स्नो रसघन*
*एवैवं वा अरेऽयमात्मानन्तरोऽबाह्यः कृत्स्नः प्रज्ञानघन एव।'*

*(बृह. उप. ४.५.१३).*

अर्थ – सर्व कर्मांचा प्रलय झाला असता ज्याप्रमाणे सैंधवाचा खडा अनन्तर, अबाह्य, (अंतर्बाह्यरहित) संपूर्ण, रसघनच होय. त्याप्रमाणे हा आत्मा (देह प्रविलय झाल्यानंतर) अनन्तर, अबाह्य, कृत्स्न, प्रज्ञानघन आहे. पाण्यावर उत्पन्न होणारे तरंग, बुडबुडे, भवरे, फेस इत्यादी सर्व काही स्वरूपतः केवळ पाणीच होय. त्याप्रमाणे 'चिदेवदेहाद्यहमन्तमेतत्सर्व चिदेवैकरसं विशुद्धम्॥' अर्थ – देहापासून शबल ब्रह्मापर्यंतचे सर्व पदार्थ विशुद्ध आणि एकरस चैतन्यमात्र आहेत' आणि म्हणूनच आत्मा परमात्म्यामध्ये लय पावण्यास, एकरूप होण्यास, मिळून जाण्यास कोणताच प्रत्यवाय येत नाही, अडचण येत नाही, हेच यावरून दिसून येते.

देहधारी जिवात्मा मृत्यूनंतर असा एकाएकी परमात्म्यामध्ये लीन होत नाही तर त्या योग्याच्या अनेक जन्मांची साधना ही त्याला कारण असते. जीवन्मुक्त ही अवस्था प्रत्येक जन्मामध्ये क्रमाक्रमाने प्राप्त होते. ती प्राप्त होण्यासाठी काही क्रम आहे. त्याचीही काही लक्षणे आहेत. त्याचेही वर्णन आपल्या पूर्वजांनी लिहून ठेवले आहे. तेही लक्षात घेण्यासारखे आहे.

*'ततः कृतार्थानां परिणाम क्रमसमाप्तिर्गुणानाम्।'*

*(सू. ४.३२ पातंजल योगसूत्र).*

'योग्याच्या, महात्म्याच्या चित्तातील ज्ञानाच्या ठिकाणी आनन्त्य आणि ज्ञेयाच्या ठिकाणी अल्पता आल्याने प्रकृतीचे घटक असलेले सत्त्व, रज, तम हे तिन्ही गुण कृतार्थ होतात आणि म्हणूनच त्या महात्म्याच्या चित्तातील सूक्ष्म अस्मितेपासून स्थूल देहापर्यंतचा जो त्रिगुणांचा परिणामक्रम तो समाप्त होतो.'

'प्रकाश क्रियास्थितीशीलं भूतेंद्रियात्मकं भोगापवर्गार्थं दृश्यम्।' (२.१८ पा. यो.) मध्ये प्रकाशशील सत्त्वगुण, क्रियाशील रजोगुण आणि स्थितीशील तमोगुण यांपासून निर्माण झालेले दृश्यजात पुरुषाला सुखदुःखांचे भोग घडवून आणून, अंती त्याच्या चित्तातील अविद्येचा नाश होऊन त्याला मोक्ष प्राप्त व्हावा म्हणूनच आहे असे

# विभाग ३ – जीवन्मुक्त दशा

## परिणाम क्रम –

वारसा हक्काने जशी संपत्ती येते तसे ज्ञान हेही वारसा हक्काने येते. सगळ्या गोष्टींची अनुभूती आपणास मिळत नाही, घेता येत नाही, घेण्याची पात्रता मिळवता येत नाही. अशी अनेक कारणे असतील पण जेव्हा स्वत: एखाद्या गोष्टीची अनुभूती घेऊ शकत नाही. ती अनुभूती ज्यांनी घेतली आहे व लिहून ठेवली आहे, निदान ती वाचून तरी आपणास त्या अनुभूतीची थोडीशी कल्पना करता येते. जी अनुभूती आपणाला मिळाली नाही, ती इतरांना मिळाली असल्यास ती खोटी आहे, काल्पनिक आहे वगैरे कारणे सांगून आपण त्याकडे जर दुर्लक्ष केले, तर आपण त्यांच्या आनंदात सहभागी होऊ शकत नाही व तो आनंद आपणास मिळत नाही. हे आपले एक प्रकारचे नुकसानच आहे.

'जीवन्मुक्त' ही अशी एक अवस्था असते व ती प्रयत्नाने प्राप्त करून घेता येते. आता ही अवस्था खरोखरीच प्राप्त करून घेता येते का? प्राप्त झाली असता त्यांचे लक्षण कोणते? जीवन्मुक्ताचे आचरण कसे असते? याविषयी ब्रह्मसूत्रात काही विचार केला आहे. त्यातील सूत्रे येथे दिली आहेत.

*'सदृश्य दिव्यस्वरूपसम्पन्न चिंतितन्मात्रेण तदात्मकत्वात् ।'*

*(४.४.६).*

अर्थ – केवळ चेतन मात्र जगदात्म्यात (स्वस्वरूपाचे ठायी) ब्रह्मस्वरूपात अभेदत्वाने स्थित होणे, कारण त्याचे वास्तविक स्वरूप तेच आहे. परमधामाला गेलेला

परममुक्तात्मा आपल्यामुळे परमचैतन्य स्वरूपात सबाह्य स्थित होतो. तसेच बृहदारण्यक उपनिषदात म्हटले आहे,

*'स यथा सैन्धवघनोऽनन्तरोऽबाह्य: कृत्स्नो रसघन*
*एवैवं वा अरेऽयमात्मानन्तरोऽबाह्य: कृत्स्न: प्रज्ञानघन एव ।'*

*(बृह. उप. ४.५.१३).*

अर्थ – सर्व कर्मांचा प्रलय झाला असता ज्याप्रमाणे सैंधवाचा खडा अनन्तर, अबाह्य, (अंतर्बाह्यरहित) संपूर्ण, रसघनच होय. त्याप्रमाणे हा आत्मा (देह प्रविलय झाल्यानंतर) अनन्तर, अबाह्य, कृत्स्न, प्रज्ञानघन आहे. पाण्यावर उत्पन्न होणारे तरंग, बुडबुडे, भवरे, फेस इत्यादी सर्व काही स्वरूपत: केवळ पाणीच होय. त्याप्रमाणे 'चिदेवदेहाद्यहमन्तमेतत्सर्व चिदेवैकरसं विशुद्धम् ॥' अर्थ – देहापासून शबल ब्रह्मापर्यंतचे सर्व पदार्थ विशुद्ध आणि एकरस चैतन्यमात्र आहेत' आणि म्हणूनच आत्मा परमात्म्यामध्ये लय पावण्यास, एकरूप होण्यास, मिळून जाण्यास कोणताच प्रत्यवाय येत नाही, अडचण येत नाही, हेच यावरून दिसून येते.

देहधारी जिवात्मा मृत्यूनंतर असा एकाएकी परमात्म्यामध्ये लीन होत नाही तर त्या योग्याच्या अनेक जन्मांची साधना ही त्याला कारण असते. जीवन्मुक्त ही अवस्था प्रत्येक जन्मामध्ये क्रमाक्रमाने प्राप्त होते. ती प्राप्त होण्यासाठी काही क्रम आहे. त्याचीही काही लक्षणे आहेत. त्याचेही वर्णन आपल्या पूर्वजांनी लिहून ठेवले आहे. तेही लक्षात घेण्यासारखे आहे.

*'तत: कृतार्थानां परिणाम क्रमसमाप्तिर्गुणानाम् ।'*

*(सू. ४.३२ पातंजल योगसूत्र).*

'योग्याच्या, महात्म्याच्या चित्तातील ज्ञानाच्या ठिकाणी आनन्त्य आणि ज्ञेयाच्या ठिकाणी अल्पता आल्याने प्रकृतीचे घटक असलेले सत्त्व, रज, तम हे तिन्ही गुण कृतार्थ होतात आणि म्हणूनच त्या महात्म्याच्या चित्तातील सूक्ष्म अस्मितेपासून स्थूल देहापर्यंतचा जो त्रिगुणांचा परिणामक्रम तो समाप्त होतो.'

'प्रकाश क्रियास्थितीशीलं भूतेंद्रियात्मकं भोगापवर्गार्थं दृश्यम् ।' (२.१८ पा. यो.) मध्ये प्रकाशशील सत्त्वगुण, क्रियाशील रजोगुण आणि स्थितीशील तमोगुण यांपासून निर्माण झालेले दृश्यजात पुरुषाला सुखदु:खांचे भोग घडवून आणून, अंती त्याच्या चित्तातील अविद्येचा नाश होऊन त्याला मोक्ष प्राप्त व्हावा म्हणूनच आहे असे

सांगितले. त्रिगुणांचा अस्मितेपासून देहापर्यंत होणारा परिणाम क्रम हा भोगापवर्गार्थतारूप प्रेरक शक्तीमुळे घडून येतो. महात्मा पदार्थाभाविनी या ज्ञानभूमीवर आरूढ झाला असता त्याला मागील अनेक जन्मांतील सुखदु:खांचे भोग मिळालेले असतातच आणि आता त्याचे चित्त मोक्षामध्ये स्थिर झाल्यामुळे बाह्य जगाच्या आत्मस्फुरणाला निमित्तमात्र होण्याइतपत उरलेले असते. म्हणजे त्रिगुणांची प्रेरक शक्ती या भूमीवर असता कृतार्थ होते. अर्थात त्रिगुणांच्या परिणामक्रमाची समाप्ती होते. म्हणजे त्रिगुणस्वरूप महत्तत्त्वातून अहंकार, अहंकारातून पंचतन्मात्रा, त्यांच्यातून अंत:करण, पंचप्राण, पंचकर्मेंद्रिये, पंचज्ञानेंद्रिये आणि पाच भौतिक स्थूल देह इत्यादी परिणामसाद ज्या क्रमाने होत असतात त्या परिणामक्रमाची समाप्ती होते. अशा अवस्थेला चित्त पोहचल्यावर त्या महात्म्याचे पुन्हा व्युत्थान होऊ शकत नाही. कारण त्याच्या चित्तात काहीच परिणामस्पंद होत नाही. परिणामस्पंद उत्पन्न होण्यास प्रेरक हेतू काहीच उरलेला नसतो. म्हणून त्याचे परत व्युत्थान होत नाही.

*'मृदुमध्याधिमात्रत्वात्ततोऽपि विशेष: ।'*

*(१.२१-२२ पा. यो.).*

स्थूल शरीर ज्या कर्माशयापासून निर्माण झाले, तो त्याचा कर्माशय निरुपक्रम म्हणजे चिरविषाकी कर्मात अंतर्भूत झाला. त्यामुळे नवीन देह निर्माण होण्याला त्याचा कर्माशयच उरलेला नाही. कारण त्याने केलेल्या उपासनेने, तपाने, कर्तव्यकर्मानि, ध्यान, धारणा, समाधीने तो पूर्ण निवृत्त झाला, संपला.

कोणतीही एक अवस्था, किशोरवयातून तारुण्य व तारुण्यातून वृद्धावस्था ही गणना करताना आपण वर्षांत त्याची विभागणी करतो. पण तशी ही अवस्था महिन्या-महिन्याने नव्हे तर दिवसादिवसाने बदलत असते. मग जीवन्मुक्त हा जन्माजन्मातून प्रवास करत असतो व क्रमाक्रमाने बदलत असतो. त्याचा विचार करताना पातंजल योगसूत्रात तर क्षणाक्षणाचा विचार केला आहे. तेही वाचून मनन करण्यासारखे आहे; म्हणजे उपासनेतील प्रत्येक क्षण किती महत्त्वाचा आहे हे लक्षात येते. म्हणून संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'देवाचिये द्वारी उभा क्षणभरी। तेणे मुक्ती चारी साधियेल्या ॥' (हरिपाठ - ज्ञानेश्वर महाराज).

*'क्षणप्रतियोगी परिणामापरान्तनिर्ग्राह्य: क्रम:।'*

*(४.३३).*

'हा परिणामक्रम क्षणप्रतियोगी असतो. म्हणजे एका क्षणाहून तो विलक्षण आणि अनेक क्षणांच्या प्रचयाच्या (समूहाच्या) आश्रयाने राहणारा असतो. हेच त्याचे क्षणप्रती योगित्व होय. त्याचप्रमाणे तो विशिष्ट परिणामप्रवाहाच्या अपरान्तापर्यंत म्हणजे शेवटच्या क्षणापर्यंत नि:शेषत्वाने ग्रहण केला जातो.'

त्रिगुण कृतार्थ झाल्याने त्याच्या परिणामक्रमाची समाप्ती होते असे मागील सूत्रात सांगितले आहे. येथे अशी शंका येते की, 'त्रिगुणाच्या परिणामक्रमाची जर येथे समाप्ती झाली तर मग त्याच क्षणी जीवन्मुक्ताच्या शरीराचा प्राणादिकांशी वियोग होऊन ते शरीर अचेतन होऊन का पडत नाही? परिणाम आणि परिणामक्रम यांतील सूक्ष्म फरक या सूत्रातून सांगितला आहे.

*'प्रतिक्षण परिणामिनो हि भावा ऋृ चितिशक्तेः ।'*

या सिद्धान्ताप्रमाणे भावावस्थेतही (सहज समाधीकालातही) या महात्म्याच्या स्थूल-सूक्ष्म शरीरात तुल्य परिणामस्पंद चालू असतात. ज्याप्रमाणे कुलालाने भांडे काढून नेल्यावरसुद्धा पूर्वगतीच्या जोरावर ते चक्र फिरतच राहते. तोपर्यंत स्थूल-सूक्ष्म देह जीवमान अवस्थेत राहणारच, जसे संत तुकाराम म्हणतात- 'तुका म्हणे आता उरलो उपकारापुरता।' मागील सूत्रात परिणामाची समाप्ती होते असे म्हटले आहे. ती समाप्ती वास्तविक परिणामाची नसून परिणामक्रमाची आहे. परिणाम क्षणोपजीवी आहेत. त्याचा अर्थ असा, की एका परिणामाचे स्पंदन म्हणजे एक क्षण होय. मात्र परिणामक्रम हा एका क्षणावर अवलंबून नसतो. अर्थात तो एका क्षणापासून विलक्षण असतो तसेच तो अनेक क्षणांचा प्रचयाच्या (समूहाच्या) आश्रयाने असला, तरी त्या प्रचयाचे स्वरूपही इतर कोणत्याही पदार्थांच्या प्रचयाहून भिन्न असते. या ठिकाणी इतर पदार्थांच्या समूहाप्रमाणे सर्व क्षण एकत्र नसून भूत, भविष्य व वर्तमान क्षणांचा समूह लक्षात घ्यावयास पाहिजे. कारण कोणत्याही पूर्वक्षणाचा अभाव होऊनच उत्तरक्षण उदित होत असतो. त्यामुळे एका क्षणाच्या नाशावर पुढील क्षण प्रतिष्ठित असतो.

महात्म्याचे जीवन प्रतिक्षणी कसे उत्क्रांत होत जाते याची दृष्टान्तरूपाने तुलना करावयाची झाल्यास पुढीलप्रमाणे विचार करता येईल. 'बी' परिपक्व झाल्यास तिच्यात

प्रतिक्षणास तुल्य परिणाम होत असतो. हा तुल्य परिणाम प्रवाह जोपर्यंत चालू आहे, तोपर्यंत ती 'बी' एकाच 'बी' रूपाने प्रतीत होत असते. पण पुढे माती-पाणी-उष्णता ही बाह्य सामग्री मिळताच 'बी' या धर्माचा अभिभाव होऊन अंकुर या धर्माचा प्रादुर्भाव होतो. येथे नव्या धर्म परिणामास प्रारंभ होतो, त्यामुळे 'बी' हा धर्म हळूहळू नाहीसा होऊन अंकुर हा धर्म अधिकाधिक प्रकट होतो. असे होता होता शेवटी त्या 'बी'ची टरफले गळून पडतात आणि 'बी' या धर्माचा पूर्ण क्षय होऊन 'अंकुर' या धर्माचा पूर्ण उदय होतो. तुर्यगा या भूमीचे स्वरूप यथार्थपणे ध्यानात येण्यासाठी अंकुर या धर्माचा अथपासून इतिपर्यंतचा प्रवास सूक्ष्मपणे पाहावयास हवा. हाच अंकुररूप धर्माचा परिणामक्रम होय. परिणामक्रमाची समाप्ती होताच महात्म्याचा देह अचेतन होऊन का पडत नाही? आणि जेथे उत्पन्न होत नाही त्या तुर्यगा भूमीवर चित्तारूढ झाले असता त्या निरुद्धावस्थेत चित्ताचा आत्माकार वृत्तीचा प्रवाह बंद न होता प्रत्ययांतरहित चालू राहतो. तो का? वरील 'बी'च्या उदाहरणात 'बी'पणा हा पूर्व धर्म आणि अंकुर हा उत्तर धर्म. या दोहोंच्या स्थानी व्युत्थान संस्कार हा पूर्वसंस्कार आणि निरोधसंस्कार हा उत्तर धर्म होय. आत्मसाक्षात्कार सर्व निरोधरूप निर्विकल्प समाधीत होतो. म्हणून व्युत्थानसंस्काराचा अभिभाव होऊन निरोध संस्काराचा प्रादुर्भाव होतो. तेव्हा आत्मसाक्षात्कार होतो. नंतर व्युत्थानसंस्कार क्षीण, क्षीणतर आणि क्षीणतम होतात आणि निरोधसंस्कार बलवत, बलवत्तर आणि बलवत्तम होतात. ही अवस्था म्हणजे वरील 'बी'पणा हा धर्म पूर्णपणे नाहीसा होऊन अंकुर हा धर्म पूर्णत्वाने प्रकट झाल्यासारखा होय. एकदा 'बी'पणा नाहीसा झाल्यावर पुन्हा तो धर्म प्रकट होऊ शकत नाही कारण तो वर्तमानावस्थेतून अतीतावस्थेत गेलेला असतो. त्याचप्रमाणे एकदा व्युत्थानसंस्काराचा पूर्णतया क्षय होऊन ते अतीतावस्थेत गेले म्हणजे पुन्हा ते वर्तमानावस्थेत येणे शक्यच नाही. अर्थात मग येथून पुढे सर्व निरोधरूप निर्विकल्प समाधीच अखंडपणे टिकून राहते. हीच तुर्यगा नावाची अंतिम ज्ञानभूमी होय. या अवस्थेचे वर्णन करताना संत तुकाराम म्हणतात, 'सांडिली त्रिपुटी। दीप उजळला घटी।' तसेच 'तुका म्हणे तुम्ही आईका हो मात। आम्ही या अतीत देहाहुनी ॥' हीच ती अवस्था होय.

ही स्थिती होण्याचे कारण म्हणजे चित्तातील व्युत्थानसंस्कार अतीतावस्थेत गेले आहेत म्हणजे ते सर्वथा उपशांत झाले आहेत. या अवस्थेत सत्त्वगुणाचा उद्रेक होतो. 'सत्त्वं सुखे संजयति ।' या गीतेतील वचनाप्रमाणे येथे चित्त आत्मसुखात निमग्न झाले होते. 'तुका म्हणे खातो आनंदाचे लाडू ।' किंवा 'आत हरि बाहेर हरि। हरिने घरी कोंडले ।।' हीच अवस्था ती होय. यामुळे अनेक जन्मकृत पुण्यपुंज परिपाकभूत अशी ही सहजानंदाची अखंडरूप स्थिती टिकून राहते. या अनुभवसुखाने शुद्ध सत्त्वगुण कृतार्थ होतो. ज्या प्रारब्धकर्मामुळे जिवाला हा सुखभोग घडतो, त्या प्रारब्धकर्माचा या सुखोपभोगाने क्षय झाला म्हणजे चित्तातील विशुद्ध सत्त्वगुणसुद्धा कृतार्थ होतो. अशा प्रकारे तीनही गुण कृतार्थ होताच चित्ताचे परिणामस्पंद चालू राहण्यास कोणताच प्रेरक हेतू शिल्लक नसल्यामुळे चित्तातील निरोधसंस्काराचे स्पंदसुद्धा उपशांत होतात. नंतर पुन्हा व्युत्थान शक्य नसल्यामुळे धर्मलक्षण अवस्था अशा प्रकारचा परिणामक्रमही समाप्त होतो. हीच परिणामक्रमसमाप्ती होय. येथे तुर्यगा अवस्थेचीही समाप्ती होते. आता तुर्यगा अवस्थेनंतर चित्ताची काय अवस्था होते. याचे वर्णन खालीलप्रमाणे आहे.

*'पुरुषार्थशून्यानां गुणानां प्रतिप्रसवः कैवल्यं ।*
*स्वरूपप्रतिष्ठा वा चितिशक्तिरीति ।।'*

*(४.३४).*

अर्थ – 'जिवाला भोग आणि अपवर्ग (मोक्ष) ही प्राप्त करून दिल्यामुळे त्रिगुणांना आता साधावयाचा असा कोणताच अर्थ राहिलेला नसतो. ही त्यांची पुरुषार्थशून्यता होय. अशा रीतीने पुरुषार्थशून्य झालेले गुण प्रयोजनाभावी आपआपल्या उपादान कारणात विलीन होतात. हा त्यांचा प्रतिप्रसव होय. हीच कैवल्यावस्था होय किंवा चितिशक्ती म्हणजे चेतनपुरुष अविद्येच्या नाशामुळे वृत्तीशी सारूप्य पावत नाही आणि अशा प्रकारे तो आपल्या नित्यसिद्ध स्वरूपाने प्रतिष्ठित असतो. हीच कैवल्यावस्था होय.'

त्रिगुणांच्या भोगापवर्गार्थतारूप प्रेरक शक्ती 'धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष' असे चतुर्विध पुरुषार्थ येतात. यांतील अर्थ आणि काम हे दोन प्रामुख्याने भोगार्थतेत येतात आणि धर्म व मोक्ष हे दोन प्रामुख्याने अपवर्गार्थतेत येतात. 'इदं मे स्यात् ।' 'मला हे असावे' अशा प्रकारची जी इच्छा तो काम होय. इंद्रिये स्वभावतः बहिर्मुख असल्याने ती बाह्य विषयांकडे धावत असतात. म्हणून चित्तविकासाच्या आरंभीच्या काळात

म्हणजे पश्वादी भोगयोनीत किंवा मनुष्ययोनीतही गाढ अज्ञानावस्थेत 'मला हे असावे' ही इच्छा बाह्य विषयास अनुलक्षून नसते. विषयोपभोगासाठी उपभोगाची साधने म्हणजेच अर्थ साधावा लागतो. असे अनेक जन्म गेल्यावर 'सुखं तु न विना धर्मात् तस्माद्धर्मपरो भवेत्।' हा बोध मनात उत्पन्न होतो. नंतर धर्माचरणातून मिळणारे सुखही विनाशीच आहे अशी अनेक जन्मातील अनुभवाने निश्चिती होते आणि मग अविनाशी अशा मोक्षाच्या उद्देशाने मनुष्य योग-वेदान्त-भक्ती अशा अध्यात्मशास्त्राकडे वळतो. अशा प्रकारे मनुष्याच्या सर्व प्रवृत्ती धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थ सिद्धींकरिता असतात. तुर्यगा या भूमीवर जीव येऊन पोचला म्हणजे त्याचे हे सर्व पुरुषार्थ सिद्ध झालेले असतात. कारण त्यास येथे प्रत्ययांतररहित 'अलिप्लवा विवेकख्याति।' होऊन त्याची प्रज्ञा सात प्रकारच्या प्रांतभूमीला पोहचलेली असते. म्हणजे येथे 'प्रेप्सा, जिहासा, जिज्ञासा, चिकिर्षा, शोक, भय आणि अतृप्ती' या सर्व प्रेरक शक्ती कृतकार्य झाल्या असल्यामुळे त्या चित्तातून नाहीशा झालेल्या असतात आणि चित्त केवळ सत्त्वगुणाभूयिष्ठ बनलेले असते. मागील सूत्रात सांगितल्याप्रमाणे चित्तातील व्युत्थानसंस्कार अतीत या अवस्थेला गेलेले असतात. त्यामुळे परत व्युत्थान नसते. या सुखाला कारणीभूत असलेले प्रारब्ध त्या उपभोगाच्या योगाने क्षीण होते.

*'एका जनार्दनी भोग प्रारब्धाचा। हरिकृपे त्याचा नाश झाला ।।'*

*(११४२ ए. भा.).*

या अवस्थेत जो सुखोपभोग घडतो त्याला सुखोपभोग हे नावही निरुपायाने द्यावे लागते. कारण तो केवळ निर्विषय आणि अतींद्रिय आनंद असतो. गाढ झोपेत जसा आपल्याला निर्विषय आनंदाचा उपभोग घडत असतो, तसाच हा निर्विषय आनंद असतो. दोहोत भेद इतकाच, की झोपेत अज्ञान असते आणि येथे अज्ञानाचा लेशही उरलेला नसतो. तेव्हा येथील सुखात्मतेने जीवन्मुक्तांच्या प्रारब्धकर्माचा क्षय झाला असता चित्तातील निरोधसंस्कारही उपशांत होतात. हे निरोधसंस्कार याप्रमाणे उपशांत झाले म्हणजे त्या चित्ताचे काय होते ते पुढे सांगितले आहे.

दृश्य पदार्थांतील अवस्था परिणाम उपशांत झाला, की त्याच्यात पुन्हा नवीन धर्म प्रादुर्भूत होत असतो आणि त्या धर्माचे पुन्हा 'धर्म-लक्षण-अवस्था' हे परिणामक्रमाने घडतात. नियमाप्रमाणे अखंड समाधिरूप धर्म उपशांत होतो पण येथे 'बी' धर्म उपशांत होताच नवीन 'अंकुर' धर्म जसा प्रादुर्भूत होतो, त्याप्रमाणे कोणताही एक नवा धर्म उत्पन्न होत नाही. कारण नवा धर्म उत्पन्न होणे म्हणजे

निरोधावस्थेला विरोधी असलेली व्युत्थानदशा येणे होय. पण त्रिगुणांचे सर्व पुरुषार्थ सिद्ध झाले असल्याने व्युत्थानदशेला प्रादुर्भावाला प्रेरक हेतूच उरलेला नसतो आणि म्हणूनच व्युत्थानदशेला अतीतावस्था प्राप्त झालेली असते. अर्थात येथे व्युत्थानदशा तर येत नाही. निरोधाकाररूप समाधी अवस्था तर संपलेली असते. म्हणून पुरुषार्थशून्य गुणांचा येथे प्रतिप्रसव होतो. प्रतिप्रसव म्हणजे आपल्या उपादान कारणात विलीन होणे. एकातून दुसरा पदार्थ उत्पन्न होणे व दुसऱ्यातून तिसरा उत्पन्न होणे अशा क्रमाने होणारी उत्पत्ती हा प्रसव होय व याच्या उलट क्रमाने कार्यरूप पदार्थ कारणात परत विलीन होणे म्हणजेच तिसऱ्यात दुसरा व दुसऱ्यात पहिला परत विलीन होणे हा प्रतिप्रसव होय. या ठिकाणी सत्त्व, रज व तम या तीन गुणांचा परिणामप्रवाह चालू राहण्यास प्रेरक हेतू कोणताच न राहिल्याने ते त्रिगुण पुरुषार्थशून्य झालेले असतात आणि म्हणूनच आता निरोधसंस्काराचा गाढ समाधिरूप परिणाम समाप्त होताच, त्या त्रिगुणांचा प्रतिप्रसव होतो. म्हणजे त्रिगुणापासून जो कार्यसंधानरूप परिणामप्रवाह निर्माण झालेला असतो तो आपआपल्या कारणात विलीन होत होत शेवटी त्रिगुणांत विलीन होतो. हे त्रिगुण म्हणजेच महत्तत्त्व होय.

## ज्ञानी जीवन्मुक्तीच्या मार्गावर

असेही कोणी म्हणतात की, परमेश्वराने सर्व मनुष्येतर प्राणी प्रथम निर्माण केले आणि ते आपआपल्या परीने या सृष्टीचा उपभोग घेत आहेत हे पाहून त्याला खूप आनंद झाला. कित्येक काळ लोटला, प्राण्यांच्या जीवनाचा क्रम काही बदलेना. आहार, निद्रा, मैथुन असे त्यांचे स्वाभाविक जीवन ते जगत होते, पण परमेश्वराने निर्माण केलेल्या या सृष्टीविषयी त्यांना काहीच वाटत नव्हते. कारण तशी बुद्धी परमेश्वराने त्यांना दिली नव्हती. तेव्हा परमेश्वराला वाटते की या सृष्टीचा उपभोग घेत असता या सृष्टीच्या निर्मात्याविषयीही विचार करणारा कोणी प्राणी असावा आणि त्यातून मनुष्याची निर्मिती झाली असावी. या प्राण्याला 'मन' असे एक जादा इंद्रिय दिले आणि त्यामुळेच त्याला 'मनुष्य' हे नाव प्राप्त झाले. 'मन' हे मनन-चिंतन करते. म्हणून त्याला 'मन' म्हटले आहे. आणि मग मनाने वेगवेगळ्या इंद्रियांच्या द्वारे या सृष्टीचा उपभोग घेण्यास सुरुवात केली. सृष्टीचा निर्माता परमेश्वर याविषयी ते मन मनन, चिंतन करू लागले. परमेश्वराचे श्रेष्ठत्व त्याला कळून आले. म्हणून त्याने परमेश्वराची स्तुतिस्तोत्रे गायली. बराच कालावधी गेला. मनुष्याने स्वतःच्या बुद्धीच्या बळावर सौख्याच्या, उपभोगाच्या अनेकविध गोष्टी निर्माण केल्या आणि त्या

सुखोपभोगांत तो रममाण झाला आणि ईश्वराला विसरला. मनुष्याच्या मनावर काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर अशा षड्विकारांचा पगडा बसला. त्याची अधोगती सुरू झाली आणि मग परमेश्वराने मानवाला सुधारण्यासाठी धर्माची उभारणी केली. शासनव्यवस्था निर्माण केली. मोकाट सुटलेल्या मनाला, विस्कळीत झालेल्या जीवनाला आकार दिला. नियम केले. कर्मामध्ये चांगल्या-वाईटाचा फरक केला. चांगल्या कर्मासाठी पुण्य व वाईट कर्मासाठी पाप वाट्याला आले. पुण्यकर्माचे बक्षीस स्वर्गसुख तर वाईट कर्माची शिक्षा नरक अशी व्यवस्था झाली. पापपुण्याचा हिशोब जन्मोजन्मी ठेवण्याची व्यवस्था झाली. पुण्यकर्माने सुखी जीवनाचा जन्म तर पापकर्माने दुःखी जीवनाचा जन्म देण्यात येऊ लागला. सातत्याने जन्मोजन्मी पुण्य करणाऱ्याला देवत्व व पुढे परमेश्वरस्वरूप होण्याविषयीची फळे मिळण्याची व्यवस्था झाली तर सातत्याने जन्मोजन्मी पापकर्मे करणाऱ्याला लोह, लोष्ट, पाषाण यांसारखे जड व दुःखदायक जन्म मिळण्याची शिक्षाही ठेवण्यात आली. असो.

बाह्य विषयात रममाण होणे हा मनाचा स्वभाव असल्याने व आवडीचा विषय कोणत्याही परिस्थितीत प्राप्त करून घ्यावयाचाच असा दुराग्रही स्वभाव असल्याने मन कोणतेही कर्म करण्यास मागेपुढे पाहात नाही आणि त्यातूनच दुःखाचे डोंगर उभे राहू लागले. अशा अनेक अनुभवांतून मनाला एक गोष्ट निश्चित कळते की विषयांपासून जे सुख मिळते असे वाटते ते खरे सुख नसून, केवळ सुखाचा भास असून दुःखच आहे आणि अशी साम्यावस्था प्राप्त होताच मनाचा कल सत्कर्माकडे, पुण्यकर्माकड़े झुकू लागतो आणि मग तो प्रगतिपथावर येतो. श्रीमत् भगवद्गीतेच्या आधारे जिवाची उत्क्रांती कशी होते, याचा एक तक्ता केला आहे. तो पूढीलप्रमाणे. जीव मनुष्यजन्माच्या प्रगतिपथावर जेव्हा येतो, तेव्हा जन्मोजन्मीच्या निष्ठेने आचरलेल्या उपासनेने तो एक एक पायरीने वर वर जात राहतो. अर्थात ही निष्ठा टिकून राहिली तर. जर कदाचित मध्येच कधी मोहाचे क्षण उभे राहिले तर त्याची पुन्हा अधोगती होते. याला दृष्टान्त देताना असा देता येईल, की सापशिडीच्या खेळात जर योग्य दान पडले गेले तर खेळाडू मोक्षाकडे जातो. पण जर अयोग्य दान पडले तर सापाच्या तोंडातून तो पुन्हा खाली येतो. शिडीने वर जाणे व सापाच्या तोंडातून खाली येणे हे वारंवार घडत असते.

## जिवाची उत्क्रांती अवस्था

(भक्तियोग — गुणातीत)

देहत्यागानंतर परब्रह्मस्वरूप होतो.
विदेही, जीवन्मुक्त अवस्था प्राप्त होते.
अखंड समाधी अवस्थेत वावरतो.
अभेद भावनेचा परमोच्च बिंदू गाठला जातो.
प्रेमातून भक्ती वाढते.
सर्वत्र ईश्वरी साक्षात्कारामुळे वृत्ती प्रेमस्वरूप होते.
ब्रह्म साक्षात्कार होतो.
व्यष्टी व समष्टी एकरूप होतात.
समाधीचा काळ वाढतो.

(ज्ञानयोग — सत्त्वगुण)

ज्ञान विज्ञानसहित प्राप्त होते.
मनाची एकाग्रता वाढते.
आहारावर नियंत्रण, विहारावर नियंत्रण येते.
अभ्यासासाठी ध्यानाची जरुरी.
ईशचिंतनाचा काळ व वेग वाढतो.
नैष्कर्म्यसिद्धी प्राप्त होते.

(कर्मयोग — रजोगुण)

निष्काम कर्म करण्याकडे वृत्ती.
कर्मच ईश्वरार्पण.
कर्मफल ईश्वरार्पण. इंद्रिये व विषय यांवर नियंत्रण.
शास्त्रविधिनिषेध, कर्तव्यतत्पर, ईशचिंतन, नित्य,
नियत, नैमित्तिक कर्म.
सकाम, पण चांगले कर्म.

(रजोगुणाधिक्यात तमोगुण)

विकारी, दुष्ट बुद्धी, कुकर्मवान.
८० लक्ष योनींतून आलेला जीव.
(आहार, निद्रा, मैथुन)

(उजवीकडील बाजू: क्रमशः दैवी संपत्तीकडे वाटचाल — आसुरी संपत्ती)

(जन्म: नीच मनुष्य योनी → सामान्य मनुष्य जन्म → श्रीमंत कुलात जन्म → योगी कुलात जन्म → जन्म नाही.)

पण या प्रयत्नात कधीतरी तो मोक्षास जाऊन पोचतो. मोक्ष प्राप्त करून घेणे हीच जिवाची इतिकर्तव्यता आहे. त्याचप्रमाणे जिवाच्या उत्क्रांतीच्या या पायऱ्यांवरून जातानाही जिवाला खूप कष्ट करावे लागतात. निष्ठेने व सातत्याने उपासना व तप चालवावे लागते. मध्येच अनेक वेळा मोहाचे क्षण निर्माण होतात. त्या वेळी जर जीव सावध राहिला नाही तर त्याची तपश्चर्या, उपासना थांबते. कधी तर त्याची तपश्चर्या, उपासना यांचा क्षयही होतो. त्यामुळे त्याने केलेले कष्ट वाया जातात. सापाच्या तोंडून खाली यावे व पुन्हा पहिल्यापासून सुरुवात करावी अशी त्याची अवस्था होते. म्हणून सर्व वैषयिक सुखांच्या बाबतीत सावध राहून, ही सुखे केवळ दुःख देणारी व नाशवंत आहेत, हे मनाने लक्षात ठेवावे.

## जीवन्मुक्त - दैवी संपत्ती

मनुष्यजन्म हा एक असा जन्म आहे, की ज्या जन्मात जिवाला प्रयत्न करून स्वतःत काहीतरी सुधारणा करता येते. ८४ लक्ष योनींपैकी ८० लक्ष योनी या मनुष्येतर प्राण्यांच्या आहेत. त्यामध्ये जलचर, (९ लक्ष), वनस्पती (१० लक्ष), खेचर (१० लक्ष), मृग (जनावरे - ३० लक्ष), कीटक (११ लक्ष) आणि मनुष्य (४ लक्ष). मनुष्य योनी सोडून इतर योनी या पापयोनी किंवा भोगयोनी आहेत. त्यांच्या नैसर्गिक गरजा फक्त आहार, निद्रा व मैथुन अशा आहेत. व त्या नैसर्गिक पद्धतीनेच पुरवल्या जातात. त्यासाठी त्यांना विशेष संकल्प करून मिळवाव्या लागत नाहीत. मनुष्यजन्म हा कर्मभूमीवरील जन्म आहे. या योनीत मनुष्याला 'मन' (बहिर्मन) हे खास इंद्रिय दिले आहे, की जे बुद्धी अहंकारासहित कार्य करते. ८० लक्ष योनींतून उत्क्रांत (अध्यात्म पद्धतीने) होऊन आलेला जीव हा खूपसा तमोगुणी व थोडासा रजोगुणी व सत्त्वगुणी असतो. त्याच्यासुद्धा या अवस्थेत (मागील तक्त्यात दाखवल्याप्रमाणे) आहार, निद्रा व मैथुन याच गरजा असतात. त्याचे जीवन पशुवत असते, पण या मनुष्य योनीत सुख व दुःख या भावनांना थोडी जाग आलेली असते. जे दुःखदायक आहे ते टाळण्यासाठी व सुखकारक मिळवण्यासाठी त्याची धारणा होते व त्याप्रमाणे प्रयत्न केला जातो. सुखाच्या मृगजळामागे धावून जेव्हा तहानेच्या दुःखाने जिवाचा ऊर फुटण्याची वेळ येते, तेव्हा जिवाच्या ठिकाणी एक शहाणपण येऊ लागते. यालाच साम्यावस्था म्हणतात. विषयातून सुखाची प्राप्ती हा केवळ एक भ्रम आहे, अशी जाणीव जिवाच्या ठिकाणी निर्माण होते व त्यात या विश्वाच्या अद्‌भुत अस्तित्वाबद्दल त्याच्या मनात विचार येऊ लागतो. (ही प्रगती होण्याला खूप जन्मांचा कालावधी लागतो. गीतेच्या

आधारे केलेल्या मागील तक्त्याप्रमाणे) व त्याचे मन ईश्वराविषयी विचार करू लागते. हाच पहिला दैवी संपत्तीच्या वृक्षाचा अंकुर होय. त्या अंकुराला सतविचार, सत्वाचन, चिंतन, मनन, ईश्वरपूजा, अर्चा, स्तोत्रपठण, भजन, कीर्तन, नामस्मरण, यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी, कर्तव्यनिष्ठा, निष्काम कर्मयोगाचे आचरण, त्याचबरोबर जप, दान, तप, यज्ञ या प्रकारचे खतपाणी घालून व योग्य संरक्षण करून जर तो अंकुर वाढवला तर त्याचा वृक्ष व्हावयास वेळ लागणार नाही. अशा जन्मोजन्मीच्या एकनिष्ठ उपासनेने, तपाने हे सहजसाध्य आहे आणि त्याला जी फळे येतील तीच दैवी संपत्ती होय. दैवी संपत्ती ही ईश्वरप्राप्तीचा, ब्रह्मस्वरूप होण्याचा एक मोठा दुवा आहे. अशा प्रकारे जिवाची उत्क्रांती ही सर्व बाजूंनी एकाच वेळी हळूहळू व क्रमाक्रमाने होत असते. त्यामुळे ज्या वेळी जीव हा आध्यात्मिक उन्नतीच्या पथावर पाऊल टाकतो, तेव्हा त्याची प्रगती ही सर्वांगीणच होत असते. ही प्रगती होत आहे की नाही याची तपासणी करून पाहण्याची साधकाची खूप इच्छा असते. पण त्याला काय प्रमाण वापरावे हे त्याला समजत नाही. म्हणून भगवंतांनीच अशी काही दैवी संपत्तीची यादी दिली आहे, की ती वाचल्यावर ज्याच्या त्यालाच आपण किती पाण्यात उभे आहोत याचा अंदाज येईल. आपला किती प्रवास झाला आहे व आता किती मजल मारावयाची आहे याचाही अंदाज येईल व आपणाजवळ या दैवी संपत्तीचे गुण शंभर टक्के उतरेपर्यंत कसोशीने प्रयत्न करावा याचेही ज्ञान त्याच्या ठिकाणी होईल.

भगवंत गीतेत सांगतात –

*अभयं सत्त्वसंशुद्धिः ज्ञानयोगव्यवस्थितिः ।*
*दानं दमश्च यज्ञश्च स्वाध्यायस्तप आर्जवम् ॥*

*अहिंसा सत्यमक्रोधः त्यागः शान्तिरपैशुनम् ।*
*दया भूतेष्वलोलुप्त्वं मार्दवं ह्रीरचापलम् ॥*

*तेजः क्षमा धृतिः शौचम् अद्रोहो नातिमानिता ।*
*भवन्ति संपदं दैवीम् अभिजातस्य भारत ॥*

*(१६.१ ते ३ भ. गी.).*

अर्थ – धैर्य, अंतःकरण शुद्धी (शुद्ध बुद्धी), ज्ञानविज्ञानपूर्वक कर्तव्यनिष्ठा, (पात्रापात्रविचारपूर्वक) परोपकार, इंद्रियनिग्रह, यज्ञ, भगवदुपासना, वेदशास्त्राध्ययन,

तपश्चर्या, सरळ वर्तन, प्राणिमात्रांस पीडा न देणे, सत्य भाषण, न चिडणे, स्वार्थत्याग, शांती, निष्कपटपणा, सर्वाभूती दया, निर्लोभता, (मनाचा) कोमलपणा, दुष्कृत्याची लाज, स्थिरबुद्धी, पाणीदारपणा, (शरणागताच्या अपराधाची) माफी करणे, धारणा, अंतर्बाह्य पवित्रता, द्वेषबुद्धीचा अभाव, अहंमन्यता नसणे, (हे गुण) अर्जुना, दैवी संपत्ती (संचित) घेऊन जन्मलेल्या योग्याच्या अंगी असतात.

एक गोष्ट आवर्जून लक्षात घेण्यासारखी आहे. ते सर्व गुण, तसेच स्थितप्रज्ञाची लक्षणे, त्रिगुणातीताची लक्षणे वगैरे ही सर्व द्वैतावर अवलंबून आहेत. जेव्हा आपपर भाव जागृत असतो, तेव्हाच या गुणांची आवश्यकता असते. म्हणजे आवर्जून पाळण्याची आवश्यकता असते आणि असे वागावे याचा अभ्यासही करावा लागतो. ज्या वेळी हा अभ्यास पूर्ण आत्मसात होतो व स्वभाव होतो त्या वेळी सर्वाभूती असलेल्या परमेश्वराचा साक्षात्कार होतो व तो मुक्त होतो आणि मनातील भेद नाहीसा होतो. सर्व सृष्टीच परमेश्वरस्वरूप आहे असे दिसू लागते. त्या वेळी या सर्व गुणांचे पालन आपोआपच होत राहते. ही मुक्ती दोन प्रकारची आहे.

## मुक्ती दोन प्रकारची असते

जीवन्मुक्त व विदेहमुक्ती अशी दोन प्रकारची मुक्ती असते. 'मी ब्रह्म आहे' या ज्ञानाने युक्त असलेल्या पुरुषाच्या शरीराचा प्रारब्ध भोगानंतर नाश होणे हीच विदेहमुक्ती होय. श्रीव्यासांनी 'भोगेनत्वितरे क्षययित्वा संपद्यते।' या सूत्रामध्ये या मुक्तीचा निर्देश केला आहे. सूत्रार्थ असा– ज्ञानवान पुरुष प्रारब्धप्राप्त सुखदुःखाचा अनुभव घेऊन प्रारब्ध पापपुण्याचा क्षय करतो आणि शरीरनाशानंतर अखंड, एकरस आनंद, ब्रह्मरूपाने स्थित होतो. त्यास पुनरपि जन्म घ्यावा लागत नाही. कारण आत्मज्ञानाच्या योगाने त्याचे संचित पापपुण्य नष्ट होते. आत्मज्ञानाच्या माहात्म्याने ज्ञानानंतर होणाऱ्या आगामी कर्माचा त्यास स्पर्श होत नाही. प्रारब्धाचा भोगाने क्षय होतो. त्यामुळे पुनर्जन्म घेण्याचे कारणच राहात नाही. अर्थात शरीरपातानंतर तो निर्विशेष ब्रह्मरूप होतो. या विदेहमुक्तीचे स्वरूप 'तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्षये।' इत्यादी छांदोग्य श्रुतीने सांगितले आहे. 'यावदधिकारमवस्थितिराधिकारिकाणाम्।' या सूत्रामध्ये भगवान व्यासांनी व त्यावरील भाष्यांत भाष्यकार श्रीमत् शंकरचार्यांनी असे वर्णन केले आहे– सृष्टीच्या प्रारंभी जगाचा व्यवहार चालवण्याकरिता परमेश्वराने ज्यास अधिकारी नेमले आहे असे इंद्रादी अधिकारी पुरुष आपला अधिकार असेपर्यंत राहतात, मध्यंतरी शापादिकांच्या योगाने जरी त्यास दुसरा जन्म घ्यावा लागला, तरी

त्यांच्या आत्मज्ञानाची हानी होत नाही व त्यांच्या अधिकाराचा काल तेव्हा समाप्त होतो. तेव्हा त्यास मोक्षही अवश्य मिळतो. याच न्यायाने ज्या पुरुषाचे प्रारब्ध अनेक जन्म देणारे आहे त्या पुरुषास जन्मामध्ये 'तत्त्वमसि।' इत्यादी महावाक्याच्या योगाने जरी आत्मसाक्षात्कार झालेला असला, तरी प्रबल प्रारब्धकर्माच्या योगाने त्यास दुसऱ्या जन्माची प्राप्ती होते व त्यामुळे त्याच्या ज्ञानासही बाधा येत नाही. कारण प्रारब्धाचे जन्मरूपी फल आत्मज्ञानाशी विरोध करत नाही. शिवाय जर आत्मज्ञानाशी विरोध करत असते तर इंद्रादी अधिकारी देवतांचे ज्ञानही त्यांच्या प्रारब्धाने नष्ट व्हावयास पाहिजे होते पण तसे होत नाही, असे सूत्रकार व भाष्यकार यांच्या सांगण्यावरून ठरते. अर्थात आत्मज्ञानाच्या योगाने मनुष्य मोक्षाचा अधिकारी होतो, ही गोष्ट निर्विवाद आहे. 'जो विद्वान विकल्पशून्य होतो व सदा पवित्र होऊन राहतो तो जेथून पुन्हा कोणी परत येत नाही अशा पदास पोचतो' अशा अर्थाची श्रुती व 'जो याप्रमाणे पुरुषास वा गुणासह प्रकृतीस जाणतो तो कसाही वागला तरी पुनरपि जन्म घेत नाही' अशा अर्थाची स्मृती असल्यामुळे ज्ञानवानास जन्म घ्यावा लागत नाही हीच अबाधित गोष्ट होय. जीवन्मुक्त - श्रवणादी साधनाच्या अनुष्ठानाने ज्याला ब्रह्मसाक्षात्कार झाला आहे अशा विद्वसंन्याशास जिवंतपणीच 'मी कर्ता मी भोक्ता' इत्यादी प्रतीती येईनाशी होते. या अवस्थेलाच जीवन्मुक्त म्हणावे. पण हे लक्षण संभवत नाही कारण प्रारब्ध असेपर्यंत 'मी कर्ता' इत्यादी प्रतीती अवश्य होणारच. त्यावाचून प्रारब्ध फलभोग होऊ शकणार नाही. शिवाय ज्ञानाच्या योगाने साक्षीगत कर्तृत्वादी बंध जरी निवृत्त झाला, तरी अंत:करणाच्या ठिकाणी स्वभावत:च असणारा जो धर्म निवृत्त होत नाही, तर तसे नाही. कारण तत्त्वज्ञानाहून प्रारब्ध प्रबल आहे. त्याचप्रमाणे प्रारब्धाहून योग्याभ्यास प्रबल आहे. यास्तव योगाभ्यासाच्या योगाने प्रारब्धाच्या भोगास अनुकूल असलेल्या कर्तृत्वादी बंधाची प्रचीती जरी सर्वथैव नष्ट न झाली तरी तिचा पराभव अवश्य होऊ शकतो व त्यामुळे जीवन्मुक्तीचे लक्षण संभवते. जीवन्मुक्तीविषयी श्रुती, स्मृती, इतिहास, पुराण यांची वचने प्रमाण आहेत. वसिष्ठ मुनींनी या मुक्तीचे वर्णन केले आहे. ते असे- 'यो जागर्ति सुषुप्तिस्थो यस्य जाग्रन्न विद्यते। यस्य निर्वासनो बोध: स जीवमुक्त उच्यते॥' म्हणजे इंद्रियांचा लय झालेला नसल्यामुळे वस्तुत: जो जागत असतो. पण विषयांचे ग्रहण करत नाही म्हणून ज्यास निजला आहे असे म्हणतात आणि त्यामुळेच व्यावहारिक लोकांप्रमाणे ज्याची जागृती नसते, ज्याचे ज्ञान वासनाशून्य असते, त्यास जीवन्मुक्त असे म्हणतात. भगवद्गीतेतही 'प्रजहाति यदा कामान्।' इत्यादी श्लोकांनी जीवन्मुक्ताचेच लक्षण सांगितले आहे. या श्लोकाचा भावार्थ असा - 'हे अर्जुना! ज्या वेळी हा पुरुष मनातील सर्व काम सोडून देतो व अखंड आनंदरूप आत्म्यामध्ये

संस्कारयुक्त मनाने तल्लीन होऊन जातो, तेव्हा त्यास स्थितप्रज्ञ म्हणतात. मी ब्रह्म आहे अशी ज्याची निश्चल भावना झालेली आहे तोच स्थितप्रज्ञ होय.

या जीवन्मुक्तासच महाभारंतात श्रीव्यासांनी ब्राह्मण म्हटले आहे. तो श्लोक –

*निरामिषमनारंभं निर्नमस्कारमस्तुतिं ।*
*अक्षीणं क्षीणकर्माणं तं देवा ब्राह्मणं विदुः ॥*

अर्थ – ज्याला कशाचाही लोभ नाही, जो कोणत्याही फलाच्या इच्छेने कर्माचा आरंभ करत नाही, जो सेवकभावाने स्वतः कोणास नमस्कार करत नाही व कोणाची स्तुती करत नाही किंवा जो कोणाकडून नमस्कार किंवा स्तुती करून घेत नाही, जो स्वतः उदार असून सर्व कर्मशून्य आहे, त्यास देव ब्राह्मण असे म्हणतात.

*'यथा निरिन्धनो वह्निः स्वयोनावुपशाम्यति ।*
*तद्वद्वृत्तिक्षयाच्चित्तं स्वयोनावुपशाम्यति ॥'*

हे श्रुतीप्रमाण आहे. अर्थ – ज्याप्रमाणे काष्ठ, गवत, कोळसे इत्यादी जळण नसल्यास अग्नी आपल्या कारणामध्ये म्हणजे सामान्य तेजामध्ये लीन होतो म्हणजे आपोआप शांत होतो त्याप्रमाणे अंतर्वृत्ती व बहिर्वृत्ती यांनी रहित झालेले मन आपल्या अधिष्ठानामध्ये लीन होते. अशा रीतीने त्याने आपल्या कारणामध्ये लीन होणे हाच त्याचा नाश होय. असो.

*समं सर्वेषु भूतेषु तिष्ठतं परमेश्वरम् ।*
*विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥*

*(१३.२७ भ. गी.).*

अर्थ – सर्व सृष्ट भूतमात्रांमध्ये, (सर्वत्र) सारखा असलेला आणि सर्व वस्तू नाश पावत असल्या, तरी स्वतः नाश न पावणारा असा परमात्मा जो पाहतो (जाणतो), तो (खरा) पाहणारा (ज्ञानी) होय.

*'यदा भूत पृथग्भावम् एकस्थमनुपश्यति ।*
*तत् एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥*

*अनादित्वान्निर्गुणत्वात्परमात्माऽयमव्ययः ।*
*शरीरस्थोऽपि कौन्तेय न करोति न लिप्यते ॥*

*यथा सर्वगतं सौक्ष्म्यात् आकाशं नोपलिप्यते।*
*सर्वत्रावस्थितो देहे तथात्मा नोपलिप्यते॥*

*यथा प्रकाशयत्येकः कृत्स्नं लोकमिमं रविः।*
*क्षेत्रं क्षेत्री तथा कृत्स्नं प्रकाशयति भारत॥'*

*(१३.३० ते ३३ भ. गी.).*

अर्थ – जेव्हा सृष्ट पदार्थांतील अनेकत्व एकाच (ब्रह्मतत्त्वाच्या) अधिष्ठानावर आहे (एका ब्रह्मतत्त्वाच्याच आश्रयाने व्यक्त झाले आहे) व त्यापासूनच (ब्रह्मतत्त्वापासूनच) सृष्टीचा विस्तार झाला आहे, असे जेव्हा (पुरुष) पाहतो (जाणतो) तेव्हा तो ब्रह्मसंपन्न होतो. (ब्रह्मस्वरूप होतो) अर्जुना! हा परमात्मा असा अनादी व निर्गुण असल्यामुळे अव्यय (अविकार्य) आहे. शरीराशी (क्षेत्राशी) याचा संबंध असतो, तथापि तो स्वतः काही करीत नाही (म्हणून) तो कशानेही लिप्त होत नाही. ज्याप्रमाणे सर्व ठिकाणी असलेले (व्यापक) आकाश अत्यंत विरल असल्यामुळे, त्याला काही चिकटत नाही. त्याप्रमाणेच सर्व देहांमध्ये (क्षेत्रामध्ये) असलेला आत्मा कशानेही लिप्त होत नाही (अलिप्त असतो). अर्जुना, ज्याप्रमाणे एकच सूर्य या सर्व जगास प्रकाशित करतो, त्याचप्रमाणे (एकच) क्षेत्रज्ञ (आत्मा) सर्व क्षेत्रांस (सृष्ट पदार्थांस) प्रकाशित करतो.

विविधत्व, अनेकत्व हा प्रकृतीचा धर्म आहे. सातत्याने बदल, विकास व शेवटी विनाश हाही प्रकृतीचा धर्म आहे, तर या अनेकत्वाला, विविधतेला असलेले अधिष्ठान मात्र एकच आहे व ते म्हणजे परब्रह्म आणि सातत्याने बदलणाऱ्या, विकास पावणाऱ्या व शेवटी विनाश पावणाऱ्या वस्तुमात्रात कधीही न बदलणारे आहे, तसेच कायम राहणारे व अविनाशी असे अधिष्ठानही परब्रह्मच आहे.

परमेश्वरप्राप्तीच्या उपासनेमध्ये व्यष्टी, समष्टी हा भेद नाहीसा होणे, सर्वत्र सर्वांठायी परमेश्वराची अनुभूती येणे ही फारच वरची पायरी आहे.

'समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम्।' हा एक अभ्यास आहे.

*विद्याविनय संपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि।*
*शुनि चैव श्वपाके च पण्डिताः समदर्शिनः॥*

*(५.१८ भ. गी.).*

*यो मां पश्यति सर्वत्र सर्वं च मयि पश्यति ।*
*तस्याहं न प्रणश्यामि स च मे न प्रणश्यति ।।*

*(६.३० भ. गी.).*

*आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन ।*
*सुखं वा यदि वा दु:खं स योगी परमो मत: ।।*

*(६.३२ भ. गी.).*

*अनन्यचेता: सततं यो मां स्मरति नित्यश: ।*
*तस्याहं सुलभ: पार्थ नित्ययुक्तस्य योगिन: ।।*

*(८.१४ भ. गी.).*

हा अभ्यास आहे आणि हा अभ्यासाचा क्रमही आहे. यासाठी सतत वाचन, चिंतन, मनन तर पाहिजेच; शिवाय ध्यानधारणाही आवश्यक आहे आणि ध्यानधारणेमध्ये याचे आलंबनही पाहिजे. या आलंबनात जेव्हा मनाचा लय परमेश्वराच्या चरणी होईल त्याच वेळी या वरील गोष्टी हळूहळू साध्य होत जातील, होऊ शकतील. हा अभ्यास वर्षानुवर्षांचा आणि तो जन्मोजन्मीचासुद्धा आहे. हा भाग अनुभूतीचा आहे. हा शब्दाने वर्णन करण्यासारखा नाही.

संत ज्ञानेश्वर या अवस्थेचे वर्णन करताना म्हणतात–

*'अंगारकणी बहुवसी । उष्णता समान जैसी । तैसा नाना जीवराशी । परेशु असे ।।*
*गगनभरी धारा । परि पाणी एकचि वारा । तैसा या भूताकारा । सर्वांगी तो ।।'*

*(१३.१०६३, ६४ ज्ञानेश्वरी).*

आपण सातत्याने धडपडतो ते सुखासाठी. सुख कोणाला होते? तर ते सुख देहाला होते. आपण म्हणतो 'माझा आत्मा संतुष्ट झाला.' पण हे विधान चूक आहे. आत्मा हा देहामध्ये असला तरी तो कवळ चैतन्यरूपाने शक्ती देण्यासाठी आहे, पण देहाकडून घडणाऱ्या कर्माचे, त्याला कोणत्याही प्रकारे बंधन पडत नाही. आत्मा कोणत्याही सुखदु:खाचा उपभोग घेत नाही. तो त्यापासून पूर्ण अलिप्त असतो. म्हणून आपण केवळ देहाच्या सुखासाठीच कर्मे करत असतो. देहाचा आणि आत्म्याचा एकमेकांशी असा संबंध आहे. देह कसा असतो, आत्मा कसा असतो याचे संत ज्ञानेश्वरांनी सुरेख वर्णन केले आहे. ते येथे मुळातून देत आहे-

*'आगी आणि कापूसा । दोरा सुवावा कैसा । केऊता सांदा आकाशा । पाषाणेसी ।।
एक निघे पूर्वेकडे । एक ते पश्चिमेकडे । तिये भेटीचेनि पाडे । संबंधु हा ।।
उजियेडा आणि अंधारेया । जो पाडु मृता उभेया । तोचि गा आत्मया । देहा जाण ।।
रात्री आणि दिवसा । कनका आणि कापुसा । अपाडु का जैसा । तैसाचि यासी ।।
देह तंव पांचाचे जाले । हे कर्माचे गुणी गुंथले । भंवतसे चाकी सूदिले । जन्ममृत्यूच्या ।।
हे काळानळाच्या तोंडी । घातली लोणियाची उंडी । माशी पांखु पाखडी । तंव हे सरे ।।
हे विपाये आगी पडे । तरि भस्म होऊनि उडे । जाहले श्वाना परिपडे । तरी ते विष्ठा ।।
या चुके दोही काजा । तरि होय कृमीचा पुंजा । हा परिणामु कपिध्वजा । कश्मलु गा ।।'*

*(१३.१०९९ ते ११०६ ज्ञानेश्वरी).*

अर्थ – आग आणि कापूस यांना दोऱ्यात एकत्र गुंफता येईल का? आकाश आणि पाषाण यांचा सांधा कसा बरे बसवला जाईल? एक पूर्वेकडे जात आहे तर दुसरा पश्चिमेकडे जात आहे. तेव्हा या दोघांची गाठ पडल्यासारखाच देह व आत्मा यांचा संबंध आहे. (म्हणजे गाठ कधीच पडणार नाही.) उजेड आणि अंधार, जिवंत आणि मेलेला यांत जितका सारखेपणा आहे तितकाच सारखेपणा देह आणि आत्मा यांमध्ये आहे. रात्र व दिवस, सोने आणि कापूस यांत जेवढा फरक तेवढाच फरक या दोघांत आहे. हा देह पाच भुतांचा बनला आहे. तो कर्माच्या बंधनाने जखडलेला आहे आणि जन्म-मृत्यूच्या चाकावर सारख्या गिरक्या खात आहे. काळरूपी अग्नीच्या तोंडात टाकलेली ही लोण्याची उंडी आहे आणि माशीला पंख फडकवण्याला जितका वेळ लागतो तितक्या वेळात हिचा नाश होणारा असतो. हा देह दैवाने आगीत पडला तर भस्म होऊन नाश पावेल पण जर कुत्र्याच्या तावडीत सापडले तर विष्ठारूप होऊन जाईल आणि जर या दोन्ही गोष्टी टळल्या तर हा देह किड्यांनी बुजबुजलेली रास होईल. एकंदरीत या देहाचा परिणाम एकूण किळसवाणाच आहे. अशा या देहात असणारा आत्मा कसा आहे याचेही वर्णन संत ज्ञानेश्वरांनी केले आहे. ते म्हणतात–

*'या देहाची हे दशा । आणि आत्मा तो एथ ऐसा । पै नित्य सिद्ध अपैसा । अनादिपणे ।।
सकळु ना निष्कळु । अक्रियु ना क्रियाशीळु । कृश ना स्थूळु । निर्गुणपणे ।। आभासु ना
निराभासु । प्रकाशु ना अप्रकाशु । अल्प ना बहुवसु । अरुपपणे ।। रिता ना भरितु ।
रहित ना सहितु । मूर्त ना अमूर्तु । शून्यपणे ।। आनंदु ना निरानंदु । एकु ना विविधु ।
मुक्त ना बद्धु । आत्मपणे ।। येतुला ना तेतुला । आइता ना रचिला । बोलता ना
उगला ।*

*अलक्षपणे ।। सृष्टीचा होणा न रचे । सर्व संहारे न वेचे । आथी नाथी या दोहीचे । पंचत्व तो ।। मवे ना चर्चे । वाढे ना खांचे । विटे ना वेचे । अव्ययपणे ।। एवंरूप पै आत्मा । देहीं जे म्हणती प्रियोत्तमा । ते मठाकारे व्योमा । नाम जैसे ।। तैसे तयाचिये अनुस्यूती । होती जाती देहाकृति । तो घे ना सांडी सुमति । जैसा तैसा ।। अहोरात्रे जैशी । येती जाती आकाशी । आत्मसत्ते तैसी । देहे जाण ।। म्हणोनि इये शरीरी । कांही करवी ना करी । आयताही व्यापारी । सज्जू नव्हे ।। या लागीं स्वरूपे । उणा पुरा न घेपे । हे असो तो न लिंपे । देही देहा ।।'*

*(१३.११०७ ते ११११ ज्ञानेश्वरी).*

अर्थ – अशी ही देहाची कहाणी आहे. पण आत्मा तर असा आहे, की तो अनादी असल्यामुळे शाश्वत व स्वयंपूर्ण आहे. निर्गुणपणामुळे तो कळासहित नाही आणि कलारहितही नाही. तो अक्रियही नाही आणि सक्रियही नाही. बारीक नाही की जाड नाही. तो अरूप असल्यामुळे त्याला आभास किंवा निराभास, प्रकाश किंवा अप्रकाश, अल्प किंवा विस्तृत असे काहीच म्हणता येत नाही. तो शून्यस्वरूप आहे. म्हणून तो पोकळ नाही की भरीव नाही. तो कशानेही सहित की विरहित नाही. मूर्तिमान नाही की अमूर्तही नाही. तो केवळ आत्मरूप असल्यामुळे त्याच्या ठिकाणी आनंद नाही की निरानंदही नाही. एकत्व नाही की अनेकत्वही नाही. तो मुक्त नाही की बद्धही नाही. तो अलक्ष्य असल्याने त्याला एवढा किंवा तेवढा, आइता किंवा घडलेला, बोलका किंवा मुका असे काहीच वर्णन करता येत नाही. सृष्टीबरोबर तो उत्पन्न होत नाही की तिच्या संहाराबरोबर नाशही पावत नाही. कारण तो 'होणे-जाणे' या दोहोंचेही लयस्थान आहे. तो अव्यय आहे म्हणून तो मापता येत नाही की वर्णन करता येत नाही. तो वाढत नाही की घटत नाही. तो फिका पडत नाही की संपत नाही. अशा स्वरूपाचा आत्मा असता तो या देहात आहे असे जे म्हणतात, ते म्हणजे, सख्या अर्जुना, मठाच्या आकाराप्रमाणे जसे आकाशाला नाव देण्यात येते, तसे आत्मा सर्वव्यापक असून देहाकृती होतात-जातात. परंतु आत्मा आपला जशाच्या तसाच असतो, असे सांगण्यासारखे आहे. दिवस-रात्र ही जशी होतात, जातात, तशीच आत्म्याच्या सत्तेने शरीरे होतात आणि मावळतात. म्हणून आत्मा शरीरात असून तो काही करवीत नाही की करीत नाही. आयते पुढे आलेले कर्मही करण्यास तो सजत नाही. म्हणून त्याच्या स्वरूपाला उणेपुरेपणा कधीच येत नाही. एकंदरीत तो देहात असूनही देहभावांनी लडबडत नाही. अशा प्रकारे देहाचा आणि आत्म्याचा एकदम विरोधाभास आहे.

त्यामुळे देहात आत्मा असूनही तो कशानेही लिप्त होत नाही. केवळ साक्षीभूतपणे तो देहाच्या व्यापाराकडे पाहात असतो आणि हाच अभ्यास महत्त्वाचा आहे.

परमेश्वराचे स्वरूप सर्वाठायी भरून राहिले आहे, असे समजणे हाच महत्त्वाचा अभ्यास आहे. याविषयी संत तुकारामही कळवळून सांगतात. ते म्हणतात–

*'विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद भ्रम अमंगळ ॥ आइका जी तुम्ही भक्त भागवत । कराल हित सत्यकरा ॥ कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वर पूजनाचे ॥ तुका म्हणे एका देहाचे अवयव । सुखदुःख जीव भोग पावे ॥'*

*(४६ तु. म.).*

परब्रह्म-परमेश्वराचे स्वरूप सर्वाठायी सर्वभूती आहे असे समजणे व त्याप्रमाणे वागणे हेच भक्तीचे रहस्य आहे. एका देहाचे जसे अवयव असतात तसेच परमेश्वराचे स्वरूप एक असून अनेक रूपांनी परमेश्वरच सर्व ठिकाणी आहे अशी दृढ भावना असणे, ठेवणे वा तसा अभ्यास करणे हाच भक्तियोग आहे, असेच या अभंगावरून संत तुकारामांना म्हणावयाचे आहे व तसे ते स्वतः वागले.

हा अभ्यास जेव्हा चालू होतो त्या वेळीच परमेश्वरीशक्तीचा प्रत्यय मनाला भावू लागतो व मन परमेश्वराविषयी चिंतन, मनन करू लागते. यालाच आपण अध्यात्ममार्गाला लागला असे म्हणतो. परमेश्वराला, त्याच्या स्वरूपाला, त्याच्या शक्तीला, त्याच्या व्यापकतेला जाणून घेण्याचा प्रयत्न करू लागतो व त्या दृष्टीने त्याचा (साधकाचा) अभ्यास व साधना चालू होते. मन, बुद्धी, अहंकार यांच्या साह्यानेच साधना करणे शक्य असते, पण या साधनेपासून प्राप्त होणारी फळे ही पुन्हा सुखदुःखाला म्हणजेच बंधनाला कारण होतात, हे साधकाच्या लक्षात येते आणि ईशचिंतनामध्ये या त्रयीचा लय कशा प्रकारे होतो, व्हावा, करावा याचे मार्गदर्शन त्याला गुरूकडून मिळते आणि त्याप्रमाणे साधक अभ्यास करू लागतो. यम, नियम, आंसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी अशी अष्टांगयोगाची साधना त्याच्याकडून सद्गुरू करून घेतो. त्यापुढे त्याला 'तत् त्वम् असि।', 'अहं ब्रह्मास्मि।', 'अयमात्मा ब्रह्म।' व 'प्रज्ञानं ब्रह्म।' अशा चार महावाक्यांचा क्रमाने उपदेश करून साधकाकडून उपासना करून घेतो आणि अशा प्रकारे साधना करून जेव्हा तो साधक सिद्ध होतो तेव्हाही सभोवतालचे सर्व विषय त्याच्याभोवती वावरत असतातच. पण ज्याप्रमाणे एकदा भोजनाने पूर्ण समाधान झालेला पुरुष पुढे अनेक प्रकारची पक्वान्ने आणून ठेवली तरी त्याच्याकडे साधे पाहातही नाही, तसे आत्मतुष्ट

झालेला तो सिद्ध पुरुष त्याच्या सभोवतालच्या विषयाकडे साधे पाहातही नाही. एवढेच नव्हे तर सभोवताली सर्व विषय आहेत याची त्याला जाणीवही राहात नाही. अशा स्थितीचे वर्णन संत ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीमध्ये केले आहे. ते म्हणतात–

*'ऐसा आत्मबोधे तोखला । जो परमानंदे पोखला ।*
*तोचि स्थितप्रज्ञु भला । वोळख तूं ।।'*

*(२.३६६ ज्ञानेश्वरी).*

असा आत्मसाक्षात्कार झाला तरीही त्याची जीवननौका चालूच असते. तो समाजात वावरत असतो. त्याचे शरीरधारणेसाठीचे सर्व व्यवहार चालू असतात. तो कर्मेही करत असतो. पण त्या कर्म करण्यात त्याचा संकल्प नसतो. कारण संकल्प हा देहभावाने, अहंकाराने केला जातो. आणि अशा सिद्ध पुरुषाचे देहभाव लय पावलेले असतात. अहंकार विरून गेलेला असतो आणि त्यामुळे समाजात तो अलिप्तपणे वावरत असतो. आळवावरचा पाण्याचा थेंब जसा अलिप्त असतो किंवा कमळाचे पान पाण्यावर तरंगत असून पाण्याने भिजत नाही, त्याप्रमाणे हा पुरुष समाजात वावरत असूनही तेथील विषयांतून फिरत असूनही त्याला ते विषय बाधा करत नाहीत. कारण विश्वातील विविधता त्याच्या दृष्टीने संपलेली असते. त्याला त्या सर्वांमधून एका ईश्वरी तत्त्वाचा प्रत्यय येत असतो व स्वतःलाही तो त्या परमेश्वरी तत्त्वाचा एक भाग समजत असतो.

संत ज्ञानेश्वर म्हणतात– 'तो अहंकाराते दंडुनी । सकळ कामु सांडुनी । विचरे विश्व होऊनी । विश्वामाजी ।।' (२.३६७ ज्ञानेश्वरी). अशी अवस्था प्राप्त झाली म्हणजे त्या सिद्ध पुरुषाचे पुढील आयुष्य असे अलिप्तपणे व्यतीत होते. ही ब्राह्मी अवस्था होय. यालाच जीवन्मुक्त, विदेही अवस्था म्हणतात.

संत रामदासस्वामींनी अशा ब्राह्मी स्थितीचे वर्णन केले आहे, ते असे–

*'सदा स्वरूपनुसंधान । हे मुख्य साधूचे लक्षण । जनी असोन आपण । जना वेगळा ।। स्वरूपी स्वरूप चि जाला । मग तो पडोनिच राहिला । अथवा उठोनि पळाला । तरी चळेना ।। बाह्य भलतैसे असावे । परी अंतर स्वरूपी लागावे । लक्षणे दिसती स्वभावे । साधु अंगी ।। अभ्यासाचा मुगुटमणी । वृत्ती राहावी निर्गुणी । संतसंगे निरुपणी । स्थिती बाणे ।। साधुस्वरूप निर्विकार । तेथे कैचा तिरस्कार । आपला आपण मत्सर । कोणावरी करावा ।। साधु वस्तु अनायासे । या कारणे मत्सर नसे । मदमत्सराचे पिसे ।*

*साधुसी नाही ।। साधु स्वरूप स्वयंभ । तेथे कैचा असेल दंभ । जैसे द्वैताचा आरंभ । जालाच नाही ।। जेणे दृश्य केले विसंच । तयास कैचा हो प्रपंच । याकारणे निःप्रपंच । साधु जाणावा ।। या कारणे लोभ नसे । साधु सदा निर्लोभ असे । जयासी वासना समरसे । शुद्धस्वरूपी ।। आपुला आपण आघवा । स्वार्थ कोणाचा करावा । म्हणोनि साधु तो जाणावा । शोकरहित ।। दृष्य सांडून नासिवंत । स्वरूप सेविले शाश्वत । याकारणे शोकरहित । साधु जाणावा ।। मोहे झळंबावे मन । तरी ते जाहले उन्मन । या कारणे साधुजन । मोहातीत ।। जेथ नाही द्वंद्वभेद । आपला आपण अभेद । तेथे कैचा उठला खेद । देहबुद्धिचा ।। मृदपणे जैसे गगन । तैसे साधुचे लक्षण । या कारणे साधुवचन । कठीण नाही ।। स्थिती बाणता स्वस्वरूपाची । चिंता सोडिली देहाची । या कारणे होणाराची । चिंता नसे ।। स्वरूपी लागता बुद्धी । तुटे अवघी उपाधी । या कारणे निरोपाधी । साधुजन ।। साधु स्वरूपी च राहे । तेथे संग चि न साहे । म्हणोनि साधु तो न पाहे । मानापमान ।। सकळ धर्मामधे धर्म । स्वरूपी राहणे हा धर्म । हेचि जाणिजे मुख्य वर्म । साधु लक्षणाचे ।।'*

*(दशक ८, समास ९, निवडक ओव्या दासबोध).*

अशा प्रकारच्या सततच्या अभ्यासाने, साधनेने साधकाच्या ठिकाणी ज्ञान उत्पन्न होते आणि पुढे जन्मजन्मांतराने तो ब्रह्मस्वरूप होतो. या ठिकाणी अशी शंका येण्याची शक्यता आहे की ज्ञान झाल्यावरही पुन्हा जन्मजन्मांतरीची वाट का पाहावी लागते? लोणचे घातले की ते मुरावे लागते. गणिताची रीत समजली तरी सराव करावा लागतो. गाणे किंवा वाद्ये शिकली तरी रियाज करावा लागतो. तसे ज्ञान झाले तरी ते अंगी मुरावे लागते. गाण्याचा रियाज सोडला तर थोड्याच दिवसांत गळा खराब होतो. गणिताची रीत समजली म्हणून पुढे दुर्लक्ष केले की काही दिवसांनी ती रीत विसरते. तसे सर्वभूती असलेल्या परमेश्वराच्या अस्तित्वाचा अभ्यास सोडला तर पुन्हा या सृष्टीतील विविधतेचा मोह होण्याची शक्यता असते. पण एकदा सायकल शिकलेला माणूस पुन्हा कधीही सायकल विसरत नाही. तो पुन्हा कधीही सायकल चालवू शकतो. तसे पोहणारा माणूस पुष्कळ वर्षांनी जरी पाण्यात उतरला तरी तो पोहणे विसरत नाही. कारण त्यातील मुख्य तोल सांभाळणे व पाण्यावर तरंगणे ही तत्त्वे त्याने आत्मसात केलेली असतात. तसे आत्मतत्त्वाचे ज्ञान आत्मसात झाले की मग त्याने अभ्यास सोडला तरी चालतो. त्याला अभ्यासाची आवश्यकता राहात नाही, जसा मुक्कामाला पोहचल्यावर प्रवास संपलेला असतो. या अवस्थेचे संत ज्ञानेश्वरांनी केलेले वर्णन–

*'जैसा रसौषध खरे । आपले काज करुनी पुरे । आपणही नुरे । तैसे होतसे ॥*
*देखोनि ठाकिता ठावो । धांवता थिरावे पावो । तैसा ब्रह्मसामिप्ये थावो । अभ्यासु सांडी ॥*
*घडता महोदधीसी । गंगा वेगु सांडी जैसी । का कामिनी कांतापासी । स्थिर होय ॥*
*ना ना फळतिये वेळे । केळीची वाढी मांटुळे । कां गावापुढें वळे । मार्गु जैसा ॥*
*तैसा आत्मसाक्षात्कारु । होईल देखोनि गोचरु । ऐसा साधनहतियेरु । हळूच ठेवी ॥*
*म्हणौनि ब्रह्मेसी तया । ऐक्याचा समो धनंजया । होतसे तै उपाया । वोहटू पडे ॥'*

*(१८.१०७९ ते १०८४ ज्ञानेश्वरी).*

'ऐसा साधन हतियेरु। हळूच ठेवी ॥' साधना म्हणजे उपासना, तप, अभ्यास वगैरे जी साधना चालू होती, ती साध्य जे परब्रह्मप्राप्ती ते पूर्ण होताच हळूहळू बाजूला ठेवली जाते. कारण त्या अभ्यासाने त्याला ते सर्व तत्त्व आत्मसात झालेले असते. ब्रह्माशी त्याचे ऐक्य होते. तो ब्रह्मस्वरूप होतो. ब्रह्मसंपन्न होतो. जीवन्मुक्त, विदेही होतो.

*ग्रंथमभ्यस्य मेधावी ज्ञानविज्ञानतत्त्वत: ।*
*पलालमिव धान्यार्थी त्यजेद् ग्रंथं अशेषत: ॥*

*(ब्रह्मबिन्दु उपनिषद).*

अर्थ – मेधावी पुरुषाने ज्ञानविज्ञानपूर्वक ग्रंथाचा तत्त्वत: अभ्यास करून, धान्यार्थी जसा फोल टाकून देतो. तसा ग्रंथ पूर्णतया टाकून द्यावा.'

म्हणजे या ठिकाणीही साध्य जेव्हा आत्मसात होते, तेव्हा त्यासाठी वापरलेली साधने बाजूला सारावी. कारण त्याचे कार्य झालेले असते. जे आत्मतत्त्व आत्मसात झाले की त्या ज्ञानाची जी अवस्था होते, त्याचे वर्णन भगवान श्रीकृष्णांनी गीतेत केले आहे. ते असे.

*विद्याविनयसंपन्ने ब्राह्मणे गवि हस्तिनि ।*
*शुनि चैव श्वपाके च पण्डिता: समदर्शिन: ।*

*(५.१८ भ. गी.).*

अर्थ – पंडित (म्हणजे वर वर्णन केलेला ज्ञानी) विद्या व विनय यांनी संपन्न अशा ब्राह्मणाविषयी, गाईविषयी, हत्तीविषयी, कुत्र्याविषयी आणि चंडालाविषयी समदृष्टी असतात.

म्हणजे शरीररूपाने असलेला त्यांच्यातील भेद पंडितांच्या दृष्टीस पडत नाही तर त्यांना सर्वांठायी आत्मतत्त्वाचेच अस्तित्व जाणवलेले असते. त्यांना सर्वांविषयीच प्रेम, दया, क्षमा, वाटत असते. कारण ते–

*आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति योऽर्जुन।*
*सुखं वा यदि वा दुःखं स योगी परमो मतः ॥*

*(६.३२ भ. गी.).*

ते आपल्या स्वतःप्रमाणेच सर्वांना पाहात असतात व त्यांची सुखदुःखे ते आपल्याप्रमाणेच जाणतात. एवढेच नव्हे तर त्या त्या रूपात जाऊन जाणण्याची त्यांची क्षमता असते. ते वाटेल ती रूपे घेऊ शकतात आणि हीच सर्वात श्रेष्ठ विद्या म्हणजे 'अवधूत विद्या' होय. ही विद्या नाथपंथीयांमध्ये सर्वांत शेवटची मानली जाते. त्याचा थोडा उल्लेख 'ज्ञान तेच देव' या अस्मादिकांच्या ज्ञानेश्वरमहाराज यांच्या चरित्रात्मक कादंबरीत आला आहे. तो येथे देत आहे.

## अवधूत विद्या

भक्ताला ही तन्मयता, समरसता साधली, की त्याचे अंतरंग प्रेममय, दयामय बनते. तो त्रिगुणाचा आविष्कार समजूनही त्यापासून तो (भक्त, ज्ञानी) दूर असतो. हेच त्याचे वैशिष्ट्य आहे. नाथपंथात याला अवधूत विद्या म्हणतात. सद्गुरू दत्तात्रयांनी ती विद्या मत्स्येंद्रनाथांना, गोरक्षनाथांना व गहिनीनाथांना दिली. गोरक्षनाथांना अवधूत विद्या दिली त्या वेळी घडलेली घटना जी मला कळली ती मी (निवृत्तीनाथ) तुला (ज्ञानदेवांना) सांगत आहे. योगविद्येचे संपूर्ण ज्ञान प्राप्त होऊनही गोरक्षनाथांना पूर्ण समाधान लाभेना. गोरक्षनाथांनी ही गोष्ट मत्स्येंद्रनाथांना सांगितली. मत्स्येंद्रनाथ म्हणाले, 'गोरक्षनाथा, तुला अवधूत विद्या प्राप्त झाल्याशिवाय पूर्ण समाधान लाभणार नाही. मला ती विद्या प्राप्त आहे. पण ती विद्या तुला प्रदान करण्याचा अधिकार नाही. तो अधिकार फक्त दत्तगुरूंना आहे. तू गिरनार पर्वतावर जा. तेथे त्यांचे वास्तव्य असते. त्यांच्याकडून तुला ही विद्या प्राप्त होईल पण दत्तमहाराज कोणत्याही रूपात असतात. तेव्हा तू त्यांना ओळखले पाहिजेस. दत्तगुरूंची भेट झाली की तुझे काम होईल.'

गोरक्षनाथ गिरनार पर्वतावरील एका डोंगरावर आले. तेथे दत्तगुरू एका साधुपुरुषाच्या वेषात ध्यानस्थ बसले होते. गोरक्षनाथांनी विचार केला की या

साधुपुरुषाजवळ दत्तगुरूंची चौकशी करावी, म्हणजे त्यांचे वास्तव्य कळेल. असे मनात आणून गोरक्षनाथ औदुंबराखालील ध्यानस्थ साधुपुरुषाकडे गेले. वाळलेल्या पाचोळ्याच्या आवाजाने साधुपुरुषाची समाधी भंग पावली. त्याने डोळे उघडले आणि समोर उभ्या असलेल्या गोरक्षनाथाकडे पाहिले. दत्तमहाराजांनी अंतरी सर्व ओळखले होतेच, पण बाह्यत: तसे न दाखवता ते म्हणाले, 'तुम्ही योगी दिसता. तुम्हाला सिद्धी प्राप्त झाल्याची चिन्हे मला दिसत आहेत. तुम्हाला काय पाहिजे?'

गोरक्षनाथ - मला दत्तगुरूंना भेटावयाचे आहे.

साधू- दत्तगुरू कोठे आहेत ते मला माहीत नाही. वर डोंगरावर दत्तपादुका आहेत, एवढेच मला माहीत आहे. हे पाहा. तू डोंगर चढून आलास, दमला असशील, तेव्हा थोडा फलाहार कर व या कमंडलूतील दूध घे.

गोरक्षनाथ - क्षमस्व. मी बाहेरचे काहीच खात नाही. तेव्हा मला काहीच नको. शिवाय मी दमलो वगैरे काही नाही.

साधू - बरं, ठीक आहे. हे पाहा, तू नाथपंथीय आहेस तसाच मीही नाथपंथीय आहे तेव्हा तुला गुरूने लपाछपीचा खेळ शिकवला असेलच?

गोरक्षनाथ - होय. साधुमहाराज.

साधू - मग आपण थोडावेळ तो खेळ खेळू या का?

गोरक्षनाथ - ठीक आहे.

साधू - तू आधी लपून बैस. मी तुला शोधीन. मग मी लपेन तेव्हा तू मला शोध.

गोरक्षनाथांनी ते मान्य केले व ते झटकन बेडूक रूपात गेले व बाजूलाच असलेल्या चिखलात खोल खोल दडून बसले. साधुपुरुषाने गोरक्षनाथांचे रूपांतर झटकन ओळखले. व गोरक्षनाथांच्या तेथे बेडूक रूपात जाऊन त्यांनी गोरक्षनाथांना शोधून बाहेर आणले. आता गोरक्षनाथांची शोधण्याची पाळी होती. साधूने क्षणार्धात पक्ष्याचे रूप घेतले व त्यांनी आकाशात भरारी मारली. आकाशात विहारणाऱ्या पक्ष्याला पाहून गोरक्षनाथांनी साधूला ओळखले व तेही पक्षी रूपाने साधूचा पाठलाग करू लागले. पक्षी (साधू) इतक्या वेगाने भरारी मारत होता की, गोरक्षनाथांना त्या वेगाने त्याचा पाठलाग करणे अवघड झाले, तरीही गोरक्षनाथांनी साधू (पक्षी) पुरुषाचा पाठलाग सोडला नाही. एक सूर मारून साधू पक्षी कमंडलूतील दुधात शिरला. गोरक्षनाथांनीही कमंडलूतील दुधात सूर मारला व एका कृमीचे रूप घेऊन ते साधूला

शोधू लागले, पण साधुपुरुष काही सापडेना. बराच वेळ झाला. कमंडलूतील दुधामध्ये पूर्ण फिरून झाले, पण साधुपुरुषाचा काही पत्ता लागेना. शेवटी गोरक्षनाथ बाहेर आले व जेथे साधुपुरुष बसले होते तेथे मस्तक टेकवले व म्हणाले 'हे साधुपुरुषा, मी हरलो. मी आपणाला शरण आलो. आपण मूळ स्वरूपात प्रकट व्हावे.'

आणि गोरक्षनाथांनी मान खाली घातली व त्यांना साधुपुरुषाचे दर्शन झाले. साधुपुरुष म्हणजेच दत्तमहाराज गोरक्षनाथांवर प्रसन्न झाले. ते म्हणाले–

'गोरक्षनाथा, तुझा निरहंकारी स्वभाव आम्हाला आवडला. तू ज्यांचा शोध घेत होतास तो मीच आहे आणि मी आता ज्या विद्येच्या साह्याने लपून राहिलो होतो, तीच अवधूत विद्या होय. ही विद्या म्हणजे जे समोर आले असेल त्यामध्ये तेच रूप होऊन मिळून जाणे म्हणजे कोणतेच वेगळेपण राहात नाही. कमंडलूत मी दूध होऊनच राहिलो होतो. तेव्हा तुला कसा सापडणार? अग्नीमध्ये अग्निरूप होऊन राहिल्यास अग्नी पोळणार नाही. जलामध्ये जलरूप होऊन राहिल्यास ते भिजणार नाही. तसे सुखामध्ये सुखरूप व दुःखामध्ये दुःखरूप होऊन राहिल्यास कोणतेच विकार बाधा करणार नाहीत,' असे सांगून दत्तगुरूंनी गोरक्षनाथांना अवधूत विद्या दिली. हीच समरसता, तन्मयता होय.

## जीवन्मुक्त - एक संकल्प

कोणतेही कार्य संकल्पाशिवाय होत नाही. आधी संकल्प, मग विचार, योजना, साधन आणि मग कर्म व त्यानंतर फल. संकल्प हे वासनांतून निर्माण होतात. वासना या अतृप्तीतून निर्माण होतात. अतृप्ती ही कमतरतेमुळे येते. कमतरता ही अक्षमता असल्याने असते आणि त्यामुळे उपभोगाची इच्छा तशीच राहून जाते व त्याच इच्छा पुढील जन्मी ज्या ठिकाणी पुऱ्या होऊ शकतात त्या ठिकाणी जीव जन्माला येतो. म्हणजे हा जन्मसुद्धा मागील जन्मातील संकल्पाचाच परिपाक आहे. जो जो जीव ज्या ज्या ठिकाणी जन्माला आलेला आहे हा त्याच्या संकल्पाचाच भाग आहे आणि संकल्पित आयुष्याबरोबर त्याचे परिणामही आपल्याला भोगावे लागतात आणि मग आपण म्हणतो, 'देवा, तू मला हा काय जन्म दिलास?' तेव्हा तो दोष देवाकडे न जाता दैवाकडे जातो. हे आपण आपल्या सोयीसाठी विसरून जातो. कारण आपण जे पेरतो तेच उगवत असते. कोणी म्हणेल की गरिबीत, घाण वस्तीत जन्म घेण्याविषयीचा कोणी संकल्प करतो का? जिवाच्या संकल्पामागे अनेक कारणे

असतात. त्यांतील मुख्य म्हणजे ऋणानुबंध. प्रत्येक प्राणिमात्राचा तसेच मनुष्याचाही जन्म ऋणानुबंधामुळेच येतो. परस्परांमध्ये जे राग, द्वेष असतील, देणी-घेणी असतील, सूड-उपकार यांची जाणीव असेल, प्रेम-जिव्हाळा, काम-क्रोध असेल त्याप्रमाणे त्या त्या व्यक्ती संबंधात येतात. राग-द्वेष, देणी-घेणी, सूड-उपकार, प्रेम-जिव्हाळा, काम-क्रोध हे किती प्रमाणात आहेत त्याप्रमाणे त्या त्या व्यक्ती क्षणिक संबंधात येतात नाही तर दीर्घकाळ संबंधात असतात. आणि आपले आपले हिशेब पूर्ण करतात. हे हिशेब पूर्ण होतात का अर्धवट राहतात हा भाग वेगळा पण हिशेब पूर्ण करता करता किती नवीन हिशेब तयार होतात हा भाग पण वेगळा असतो. ते आपल्याला काय, कोणालाच कळत नाही. म्हणून जन्म-मरणाची साखळी लांबत जाते.

### ऋणानुबंधाप्रमाणे जन्म

एका राजदरबारी एक विद्वान पंडित असतो. त्याला बऱ्याच वर्षांनी एक मुलगा होतो. मुलाचे भविष्य पाहात असताना त्याचा चेहरा आनंदाने फुलत असतो. त्याच्या शेजारी त्याची पत्नी बाळाला मांडीवर घेऊन हे सर्व पाहात असते. तिलाही ते पाहून आनंद होतो. काही वेळाने पंडिताचा चेहरा उतरतो. तो जरा खिन्न होतो. तेव्हा पत्नी विचारते, 'अहो, तुमचा चेहरा का उतरला? बाळाचे भविष्य चांगले आहे ना?' पंडित म्हणाला, 'तू काहीच काळजी करू नकोस. बाळाचे भविष्य उत्तम आहे. पुढे योग्य वेळ येताच मी तुला सांगेन.' दिवस जात होते. मुलगा दिवसामासांनी मोठा होत होता. होता होता मुलगा वीस वर्षांचा झाला. त्याचे सर्व शिक्षण त्याच्या वडिलांनी घरच्या घरीच पूर्ण केले. मुलगा वडिलांपेक्षाही हुशार झाला. एकदा पंडिताला परगावचे यज्ञाचे आमंत्रण आले. पंडिताने बायकोला व मुलाला जवळ बोलावले व सांगितले, 'आता मी काय सांगतो ते नीट ऐका. मुलाचे शिक्षण पूर्ण झाले आहे. आता हा कोणतीही धार्मिक कार्ये करण्यास, यज्ञकर्मे करण्यास, वादविवाद करण्यास योग्य झालेला आहे. त्याने ही कर्मे करण्यास काहीच हरकत नाही. कारण प्राप्त करून घेतलेल्या ज्ञानाचा उपयोग होणे आवश्यक आहे. पण या कर्माच्या मोबदल्यात त्याने काहीही घेता कामा नये. एवढेच नव्हे तर त्याने परान्नही सेवन करता कामा नये अशी माझी सूचना आहे.' 'आणि तूही या गोष्टीवर लक्ष ठेवावेस' असे शेवटी पंडिताने पत्नीला बजावले. दोघांनी माना डोलावल्या आणि पंडित चार दिवसांसाठी यज्ञासाठी निघून गेले.

पंडित गेला त्याच्या दुसऱ्या दिवशी राजदरबारी एक शास्त्री आले. पूर्वी विद्वान शास्त्री लोक राजदरबारी जाऊन वादविवाद करीत असत व विजयपत्रे मिळवीत. त्याप्रमाणे एक शास्त्री या पंडिताच्या राजाकडे वादविवादासाठी आला. विद्वानांची सभा भरली. वादविवाद झाला आणि शास्त्रीबुवांनी वादामध्ये राज्यातील सर्व विद्वानांना हरवले. दरबार बरखास्त झाला. राजाने विद्वानांशी चर्चा केली. तेव्हा सर्व विद्वांनानी पंडिताला बोलवावे व तो नसल्यास त्याच्या मुलाला बोलवावे असा राजाला सल्ला दिला. राजाने प्रधानाला चौकशी करण्याची आज्ञा दिली व त्याप्रमाणे पंडित किंवा त्याचा मुलगा यांना दरबारात वादविवादास हजर राहण्याविषयी निरोप देण्यास सांगितले. त्याप्रमाणे प्रधानाने पंडिताच्या मुलाला राजदरबारी वादविवादास हजर राहण्याविषयी राजाची आज्ञा कळवली. दुसऱ्या दिवशी सकाळी मुलगा राजदरबारी वादविवादास निघाला. आईने मुलाला पित्याच्या सूचनांची आठवण करून दिली. मुलाने मान हलवली. मुलगा दरबारात गेला. शास्त्रींशी वादविवाद झाला आणि शास्त्री वादविवादात हरले. राजाची मुलगी राजदरबारात वादविवाद ऐकण्यास बसत होती. तिलाही मुलाच्या विद्वतेविषयी खूपच आदर निर्माण झाला होता, राजाने मुलाचा गौरव केला व त्याला मानधन देण्यासाठी काही धन देऊ केले. पण मुलाने काही घेणे नाकारले व तसे 'माझे व्रत आहे' असे सांगितले. तेव्हा राजाने मुलाला स्वतःच्या पंक्तीला भोजनास राहण्याविषयीही विनंती केली. पण मुलाने 'परान्न वर्ज आहे' असे सांगितले. त्यामुळे राजाचा सर्व बाजूने नाईलाज झाला व मुलगा काहीही न घेता घरी गेला.

राजकन्येला राजाचे हे वागणे आवडले नाही. तिने राजाला सांगितले की 'तुम्ही राजे आहात. तेव्हा त्या अधिकारात तुम्ही ते त्यांना घेण्यास भाग पाडावयास पाहिजे होते. तेव्हा राजाने प्रधानाकरवी काही धन, रत्ने, मोती, हिरे व काही जमिनीची कागदपत्रे त्या मुलाकडे पाठवली. मुलाने ते घेण्यास नाकरले तरीही प्रधानाने ते सर्व त्या मुलाच्या घरी ठेवून निघून गेला. मुलाने ते सर्व पाहिले. कागदपत्रे वाचली आणि किंकाळी फोडून त्याने प्राण सोडला. मुलाची आई मुलाची किंकाळी ऐकून धावत आली. पण तोपर्यंत मुलाने प्राण सोडलेला होता. आईलाही खूप दुःख झाले. थोड्याच वेळात संध्याकाळी परगावी गेलेला पंडित घरी आला. त्याला सर्व प्रकार कळला. त्याने मुलाच्या प्रेताच्या भोवती असलेल्या वस्तू पाहिल्या व जमिनीची कागदपत्रे पाहिली व म्हणाला, 'जे होऊ नये असे वाटत होते तेच झाले. असो.'

पत्नीने विचारले, 'असे का झाले? हे सर्व धन घेतल्याने मुलगा का गेला?' पंडित म्हणाला, 'मागील जन्माची देणी देण्यासाठी हा मुलगा म्हणून आपल्या पोटी आला होता. हा मुळातच मुक्त होता. पण आपल्यासाठीच त्याला हा जन्म घ्यावा लागला होता. ते तेवढे देणे दिले व त्याचे काम झाले. म्हणून त्याने त्याचे जीवन संपवले.' पत्नी म्हणाली, 'मला आपल्या बोलण्याचा उलगडा होत नाही. तरी सर्व स्पष्ट करून सांगा.' पंडित म्हणाला- 'मागील जन्मी आपण मारवाडी होतो. तूच माझी पत्नी होतीस. आपल्याला मूलबाळ नव्हते. वय होत आले होते. शेवटी तीर्थयात्रा करावी म्हणून मी सर्व व्यापार बंद केला. पैसाअडका गोळा केला. त्याचे हिरे, माणिक, रत्ने खरेदी केली. जमिनीची कागदपत्रे तयार केली व तीर्थयात्रेला निघालो. एकदा आपल्या म्होरक्याने सांगितले की पुढे मोठे जंगल आहे. तेथे लुटारू असतात. तेव्हा तुमच्याजवळील धन तुम्ही येथील व्यापाऱ्याकडे ठेवा व पुढील मुक्कामातील व्यापाऱ्यांच्या नावाने हुंडी घ्या व तेथे गेल्यावर वटवा. म्हणजे प्रवासात धोका होणार नाही.' अशी आपल्या व्यवस्थापकाने सर्वांना सूचना दिली. तेव्हा आपण कोणत्याही व्यापाऱ्याकडे आपले धन न ठेवता जंगलाच्या एका बाजूला असलेल्या आश्रमातील एका साधूच्या हवाली केले आणि आपण पुढील प्रवासाला निघून गेलो. त्या साधूने आपली वाट पाहिली. तो मरणाच्या पायरीवर उभा होता. पण जीव जात नव्हता, कारण आपले धन परत करण्याची नैतिक जबाबदारी त्याच्यावर होती. शेवटी त्याने त्याच्या एका दुसऱ्या साधू मित्राला बोलावून आणून आणि आपली सर्व माहिती सांगून हे सर्व धन आपल्याला परत करण्याविषयी सांगून जीव सोडला. दुसऱ्या साधूनेही बराच काळ आपली वाट पाहिली. तोही वृद्ध झाला. त्याचीही मरणाची वेळ आली. तेव्हा त्याला हे धन परत करण्याचा प्रश्न पडला. त्याने त्याचा एक मित्र होता. तो खूप धनाढ्य होता. त्याचा खूप मोठा व्यापार चालत होता. साधूने त्याला बोलावले व आपले सर्व धन त्याच्या स्वाधीन केले व तो दुसरा साधूही मरण पावला. त्या धनाढ्य मित्राने आपली खूप चौकशी केली. तेव्हा त्याला कळले आपण त्या तीर्थक्षेत्रीच मरण पावलो, तेव्हा त्याने ती सर्व संपत्ती स्वतःच्या संपत्तीमध्ये जमा करून टाकली. तेव्हा आता ऐक.

पहिला साधू ज्याने प्रत्यक्ष आपणाकडून धन घेतले होते तो साधू आपला मुलगा होता. दुसरा साधू हा शास्त्रीरूपाने जन्माला आला होता की ज्याच्या कारणाने आपला मुलगा वादात जिंकला व जो धनाढ्य मनुष्य होता की ज्याच्याजवळ आपले सर्व धन जमा झाले होते. तो राजा आहे. त्यामुळे राजाकडून शास्त्रीच्या कारणाने आपल्या मुलाने आपले धन परत केले. त्याचे कार्य झाले व तो साधू मुक्त झाला.' (चंद्रकांत - सारांशरूपाने).

अशा प्रकारे कोणत्यातरी ऋणानुबंधाने जन्म घ्यावा लागतो. वैराची फेड वैराने व सूडाची परतफेड सूडाने करण्याने किती नुकसान होते याची जेव्हा जाणीव होते तेव्हा जीव वैराची परतफेड प्रेमाने करण्याच्या मागे लागतो व सूडाची परतफेड मैत्रीने करण्याच्या मागे लागतो. तेव्हा त्याच्या पुनर्जन्माच्या संकल्पातील हळूहळू एक एक संकल्प गळून पडू लागतो. अशा प्रकारे ज्या अनेक ऋणानुबंधांची कारणे पुनर्जन्माला कारण होत राहतात, त्या सर्वांचा त्याग करण्याकडे त्याची प्रवृत्ती होते. वाईट गोष्टी सोडणे हा संकल्प जसा केला जातो तसेच त्याची जागा भरून काढण्यासाठी चांगल्या गोष्टी करण्याचाही संकल्प होतो. सदाचरण, सत्कर्म, सत्संग या गोष्टी हळूहळू जीवनात प्रवेश करू लागतात. त्यांच्या प्रमाणात वाढ होत जाते. परमेश्वराविषयी जिज्ञासा उत्पन्न होते. त्याची स्तुतिस्तोत्रे वाचली, म्हटली जातात. भजन-पूजन केले जाते. कथा-कीर्तने ऐकली जातात आणि हळूहळू परमेश्वरप्राप्तीचाही संकल्प केला जातो. 'ज्याचे जया ध्यान। तेचि होय त्याचे मन। म्हणऊनि अवघे सारा। पांडुरंग दृढ धरा॥' (२३२८ तु. म.). असा संकल्प होताच त्याच्या सिद्धीसाठी जी जी पूरक व्यक्ती, गावे कारण होतील, त्यांच्याकडून उपासना, मंत्र, तंत्र, धार्मिक शिक्षण मिळेल असे जन्म घेतले जातात व त्या वेळी ते ते प्राप्त करून घेतले जाते. तशी जिवाला बुद्धी होते, तशी माणसे भेटतात. तसे मार्गदर्शन मिळते, तशी उपासना मिळते. तसे ग्रंथ वाचनात येतात, तसा अभ्यास होतो, तसे आचरण होते आणि जिवाची हळूहळू तशी प्रगती होत जाते. परमेश्वरप्राप्तीचा संकल्प जिवाच्या अगदी खोलवर रुजलेला असतो. त्यामुळे तो संकल्प पुरा होईपर्यंत जिवाला सारखा जन्म मिळत राहतो म्हणून भगवंतांनी गीतेमध्ये सहाव्या अध्यायात अशा जिवाला योगभ्रष्ट म्हटले आहे. योगभ्रष्ट म्हणजे ज्याचा योग पुरा झाला नाही तो. त्या योगभ्रष्टाला कोठे कोठे जन्म मिळतो तेही भगवंतांनी सूचित केले आहे. एक तर त्याच्या पुण्याईने श्रीमंत कुलात जन्म येतो किंवा योगीकुलात जन्म येतो. श्रीमंत कुलात जन्म मिळाल्यावर त्याच्यापुढे अनंत प्रकारची सुखसाधने व उपभोगाचे विषय हात जोडून उभे असतात. पण परमेश्वरप्राप्ती हाच ध्यास घेतला असल्याने त्याला ते विषयोपभोग रुचत नाहीत. ती सुखसाधने त्याला दुःखदायक वाटतात आणि त्यामुळे त्याचा भगवंतचिंतनात अडथळा येऊ लागतो. आणि मग काकुळतीला येऊन तो भगवंताला विनवतो. त्याचे संत ज्ञानेश्वरांनी सुरेख वर्णन केले आहे.

'मग तेथीचे जे अमोघ। अलौकिक भोग। भोगिताही सांग। कांटाळे मन॥ हा अंतरायो अवचिता। का वोढविला भगवंता। ऐसा दिविभोग भोगिता। अनुतापी

नित्य ॥' (६-४४२, ४४३ ज्ञानेश्वरी) आणि असा जन्म गेला की पुढील जन्मी तो योगियांच्याच कुळी जन्म घेतो. की जेथे केवळ भगवंतांची उपासना, ध्यान, धारणा, समाधी असाच प्रकार चालतो. संत ज्ञानेश्वर याचे वर्णन करताना म्हणतात, 'अथवा ज्ञानाग्निहोत्री। जे परब्रह्मश्रोत्री। महासुखक्षेत्री। आदिवंत ॥ जे सिद्धांताचिया सिंहासनी ॥ राज्य करिती त्रिभुवनी। जे कुंजती कोकिळ वनी। संतोषाच्या ॥ जे विवेकद्रुमाचे मुळी। बैसले आहाति नित्यफळी। तया योगियांचिया कुळी। जन्म पावे ॥' (६-४४९ ते ४५१ ज्ञानेश्वरी). आणि अशा प्रकारे ज्ञानाची उपासना करून काही जन्मांनंतर तो कोणत्या योग्यतेला जातो. याचे वर्णन पुढे करतात- 'मोटकी देहाकृति उमटे। आणि निजज्ञानाची पहाट फुटे। सूर्यापुढे प्रगटे। प्रकाशू जैसा ॥ तैसी दशेची वाट न पाहता। वयसेचिया गावा न येता। बाळपणीच सर्वज्ञता। वरी तयाते ॥ तिये सिद्धप्रज्ञेचेनि लाभे। मनचि सारस्वत दुभे। मग सकळ शास्त्रे स्वयंभे। निघती मुखे ॥' (६-४५२ ते ४५४ ज्ञानेश्वरी).

'सर्वज्ञता' या शब्दाचा नेमका अर्थ काय असावा? सन २०००चा विचार केला असता. विज्ञानाची एवढी व्यापक प्रगती झाली आहे की पूर्वीच्या काळी यातील एक शतांश/सहस्रांशसुद्धा साधने नव्हती व जग एवढे वेगवान झाले नव्हते. संपर्काच्या दृष्टीने ते इतके जवळही आले नव्हते. आणखी अनेक क्षेत्रांत खूप प्रगती झालेली आहे की जिचा विचार करता याच्या साधारण शंभर वर्षांपूर्वी माणसे कशी जगत होती, हा प्रश्न मनात येतो. जर शंभर वर्षांपूर्वी ही अवस्था होती तर हजार, दहा हजार वर्षांपूर्वी काय अवस्था असेल याची कल्पनाही करता येणार नाही. मग अशा त्या वेळी आध्यात्मिक प्रगतीने जीवन्मुक्त दशेला जे पोचले होते, ते कोणत्या अर्थाने 'सर्वज्ञ' होते? हे कळत नाही. या बाबतीत जेव्हा मी काही मित्रांशी, विद्वानांशी चर्चा केली तेव्हा त्यांचा सूरही असाच आला की, आजच्या या विज्ञानाची त्यांना काहीच कल्पना नसणार कारण हे विज्ञान गेल्या पन्नास-शंभर वर्षांत जन्माला आलेले आहे. पण दोन अधिक दोन अशा साध्या गणिताने विचार करता हा प्रश्न बरोबर आहे व त्याचे उत्तरही बरोबर आहे. पण जेव्हा या 'सर्वज्ञता' शब्दाचा विचार केला जातो, तो तो खूपच सार्थ आहे असे वाटते. तरीही एक गोष्ट निश्चितच कबूल करावयास पाहिजे की, विज्ञानाने जी प्रगती केली त्याचा फायदा सर्वसामान्य लोकांना घेता येतो. कारण ती सर्व प्रगती भौतिक वस्तुमात्राच्या द्वारे केली आहे. त्यामुळे त्या वस्तूचा वापर करणे ज्यांना शक्य आहे, त्यांना त्या वैज्ञानिक प्रगतीचा फायदा मिळतो. पण आध्यात्मिक प्रगतीचे तसे नाही. ज्याने स्वतःच्या साधनेने, तपाने, सामर्थ्य मिळवले असेल त्याचा उपयोग

त्यांनाच होतो. त्याचा फायदा इतरांना देणे शक्य असल्यास त्या व्यक्तीच्या मर्जीवर अवलंबून राहावे लागते. उदा- पूर्वीचे ऋषी एका ठिकाणाहून दुसऱ्या ठिकाणी क्षणभरात जाऊ शकत होते. पण इतरांना तसे घेऊन जावयाचे की नाही हे मात्र त्यांच्या मर्जीवर अवलंबून असते. यात एक गोष्ट महत्त्वाची आहे की, एका वेळी ते एकासच नव्हे तर अनेकांना घेऊन जाऊ शकत होते. (गुरुचरित्र). व्यासांनी संजयाला दिव्य दृष्टी देऊन कुरुक्षेत्रावरील युद्धाचा भाग पाहण्याचे सामर्थ्य दिले होते. तसेच तेथील संभाषण ऐकण्याचीही शक्ती दिली होती. (महाभारत) व्यासमुनींना भूत-भविष्यातील सर्व काही त्या त्या वेळेचे चिंतन करता स्पष्ट दिसत होते. असे सामर्थ्य असलेले आणखीही ऋषी होते. योगी लोक हजार हजार वर्षे तपश्चर्या करू शकत होते व आपला प्राण पुन्हा धारण करून जीवन जगत होते. म्हणजे अन्नपाण्याशिवाय शरीर इतका काळ टिकवून कसे ठेवावे याचे त्यांना ज्ञान होते. (वाल्याकोळी वगैरे). काही तपस्वी एका वेळी दोन दोन शरीरे धारण करू शकत होते. म्हणजे शरीराची निर्मिती कशी होऊ शकते व तेही क्षणात याचे ज्ञान त्यांना होते. तसेच दोन्ही शरीरांत केलेल्या कर्माचे ज्ञानही त्यांना होत होते (योगी कथामृत). काही सिद्ध पुरुष कोणतेही खाद्यपदार्थ, फळफळावळ एकदम तयार करून पुढे करत. ती खाऊन पाहिली तरी त्याची चव तीच असे व त्याने पोटही भरे. (स्वामी विवेकानंद यांच्या पुस्तकातून). कारण कोणतीही वस्तू ही पंचमहाभूतांपासूनच तयार होते. त्यांच्या संयोगाचे प्रमाण वेगवेगळे असते. ते त्यांचे प्रमाण जाणून व तशा प्रमाणात पंचमहाभूतांचा संयोग करून (सिद्धीच्या योगाने) ते सिद्ध पुरुष अशा वस्तू तयार करत असतात. काही सिद्ध पुरुष मेलेली माणसेसुद्धा जिवंत करतात. म्हणजे शरीराचा, प्राणाचा, आत्मरूपाचा त्यांचा एवढा अभ्यास झालेला असतो की, मृताच्या ठिकाणी कोणते तत्त्व कमी आहे याची ते अंतर्ज्ञानाने माहिती करून घेतात व ते तत्त्व त्या मृताच्या शरीरात कोणत्याही बाह्य स्थूल पदार्थाचा, साधनाचा उपयोग न करता प्रेरित करतात व ती व्यक्ती जिवंत होते. एकूण सिद्धी या अनेक प्रकारच्या आहेत. सध्याच्या युगाला ते चमत्कार वाटत असले तरी ते विज्ञानच आहे. ते विज्ञान अतींद्रिय साधनाचा उपयोग करून त्याचे प्रयोग केले जातात, त्यामुळे ते अगम्य वाटतात. पण ज्या अर्थी अशा सिद्धी अनेक संतमहात्मे, ऋषीमुनी यांच्याकडे होत्या त्यावरून त्या त्या उपासनेने, साधनेने कोणालाही करणे प्राप्त होणे शक्य आहे. फक्त तशी निष्ठा व सातत्य साधना करताना टिकणे महत्त्वाचे आहे.

या वरील वर्णनावरून मागील काळात सध्याची स्थूल वैज्ञानिक प्रगती नव्हती असे जरी असले व पूर्वीच्या ऋषीमुनींनी केलेली प्रगती त्या वेळेच्या समाजाला जास्त उपयोगी पडत नव्हती, असे जरी असले तरी जी काही प्रगती, आध्यात्मिक प्रगती त्यांनी केलेली होती यावरून त्यांना सर्व शास्त्रांचे उत्तम ज्ञान होते. भौतिक साधने जरी त्या वेळी नसली तरी त्यातील मुख्य तत्त्वे त्यांना उत्तम अवगत होती व भौतिक साधनांशिवाय ते सर्व काही साध्य करू शकत होते, असेच सिद्ध होते. म्हणजे आजचे विज्ञान त्यांच्या दृष्टीने अज्ञात आहे असे वाटत नाही. उलट त्या वेळच्या आध्यात्मिक पातळीवरून वैज्ञानिक प्रगती ज्या मर्यादेपर्यंत पोहचली होती तेथपर्यंत सध्याचे वैज्ञानिक पोहचू शकत नाहीत आणि म्हणून कित्येक शास्त्रज्ञांनी, वैज्ञानिकांनी ईश्वरी सामर्थ्यापुढे, त्याच्या गूढ स्वरूपापुढे श्रद्धापूर्वक मस्तक टेकवले आहे, हाच सर्वज्ञतेचा अर्थ होतो. असो.

तेव्हा सर्वज्ञता ही 'बालपणीच सर्वज्ञता वरी तयाते।' असे जे म्हटले आहे ते अक्षरश: खरे आहे आणि हा सर्व प्रभाव आहे तो केवळ संकल्पाचा, परमेश्वरप्राप्ती या संकल्पाचा. भगवंत गीतेत म्हणतात,

*तत: पदं तत्परिमार्गितव्यं यस्मिन्गता न निवर्तन्ति भूय: ।*
*तमेव चाद्यं पुरुषं प्रपद्ये यत: प्रवृत्ति: प्रसृता पुराणी ॥*

*(१५.४ भ. गी.).*

ज्यापासून हा प्राचीन विश्वपसारा निघाला त्या आदी पुरुषाला (परब्रह्माला) आपण प्राप्त व्हावे असा संकल्प करून ते पद (ब्रह्मपद) शोधावे (त्याचा साक्षात्कार संपादण्याचा प्रयत्न करावा) की ज्याच्या ठिकाणी पोचलेले (पुरुष) पुन्हा परत येत नाहीत. (जन्ममरणरूप संसारात पडत नाहीत म्हणजे मुक्त होतात).

संकल्प केवळ परमेश्वरप्राप्ती हाच असावा लागतो. बाकी विषयप्राप्तीचे सर्व संकल्प सोडून द्यावे लागतात. भगवंत त्याचे वर्णन करताना म्हणतात–

*संकल्पप्रभावान्कामान् त्यक्त्वा सर्वानशेषत: ।*
*मनसैवेन्द्रियग्रामं विनियम्य समन्तत: ॥*

*(६.२४ भ. गी.).*

अर्थ – विषयचिंतनापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व वासनांचा नि:शेष त्याग करून इंद्रियसमूहाचे बाह्य विषयांपासून मनानेच नियमन करून परमेश्वरप्राप्तीच्या उपासना

कराव्यात. म्हणजे मन हळूहळू विषयापासून दूर जाऊन परमेश्वराच्या ठिकाणी रत होत जाईल. मन जितक्या प्रमाणात परमेश्वराशी एकनिष्ठ होईल तितका काळ ते विषयापासून दूर राहील आणि असे झाले म्हणजे साधकाच्या ठिकाणी असलेले षड्विकार हळूहळू लय पावतात व तो जीवन्मुक्त होण्याच्या मार्गावर येतो. त्या वेळी त्याच्या ठिकाणी कोणते गुण आवश्यक आहेत याचा निर्देश भगवंत करीत आहेत.

*निर्मानमोहा जितसङ्गदोषा: अध्यात्मनित्या विनिवृत्तकामा: ।*
*द्वंद्वैर्विमुक्ता: सुखदु:खसंज्ञैर् गच्छन्त्यमूढा: पदमव्ययं तत् ॥*

*(१५.५ भ. गी.).*

अर्थ – ज्यांनी मानापमानाची पर्वा सोडली नाही, ज्यांचा मोह (काम) नाहीसा झालेला असतो (म्हणजे ज्याची बुद्धी निर्योगक्षेम झालेली असते), ज्यांनी आसक्ती व तज्जन्य दोष जिंकलेले असतात (म्हणजे ज्यांची बुद्धी नित्य सत्त्वस्थ असते), जे प्रकृती व परमात्मा यांचा नित्य विचार करणारे ज्ञानविज्ञानसंपन्न असतात (म्हणजे जे आत्मवान् झालेले असतात), ज्यांच्या (सात्त्विक, राजस व तामस उपभोगाच्या) सर्व वासना नष्ट झालेल्या असतात (म्हणजे ज्यांची बुद्धी निस्त्रैगुण्य झालेली असते), जे सुखदु:ख इत्यादी द्वंद्वापासून मुक्त झालेले असतात (म्हणजे ज्यांची बुद्धि निर्द्वंद्व झालेली असते), असे मोहरहित (स्थितप्रज्ञ) पुरुष त्या निर्विकार ब्रह्मपदाला पोचतात.

असे हे जीवनमुक्त कसे असतात, त्यांच्या ठिकाणी कोणते गुण असतात, म्हणून त्यांना ही अवस्था प्राप्त झालेली असते. याचे सविस्तर वर्णन पुढे येईलच.

## जीवन्मुक्ताच्या ठिकाणी आवश्यक गुण

एखादी व्यक्ती सुंदर आहे असे म्हटले म्हणजे फक्त त्याचा चेहराच सुंदर असावा असे नाही तर त्याचे हात, पाय, शरीराची ठेवण, सडपातळपणा, शरीरसौष्ठव, उंची वगैरे सर्वच अवयवांसहित ती व्यक्ती सुंदर डौलदार असली तर ती खरी सुंदर होय. म्हणून मूर्तिकार मूर्ती घडवताना अशीच सर्वांगसुंदर मूर्ती घडवतो. तेव्हाच ती मनमोहक होते. तसेच एखादा विद्यार्थी हुशार असून त्याचा पहिला क्रमांक येत असेल तर तो फक्त गणित, इंग्रजी विषयांतच उत्तम गुण मिळवणारा नसतो तर इतिहास, भूगोल, शास्त्र, हिन्दी, मराठी, संस्कृत वगैरे सर्वच विषयांत उत्तम गुण मिळणारा असतो. म्हणूनच त्याच्या गुणांची बेरीज सर्वांत जास्त होऊन त्याचा पहिला क्रमांक येतो. कोणत्याही एका विषयात नापास होऊन त्याचा पहिला क्रमांक येऊच शकत नाही.

अगदी त्याचप्रमाणे परमेश्वर हा जरी निर्गुण, निराकार, निर्विकार असा असला तरी तो सर्वगुणसंपन्न आहे आणि त्याची प्राप्ती करून घेऊ इच्छिणाऱ्या साधकालाही तसेच सर्वगुणसंपन्न होणे आवश्यक आहे. त्यांतील एकही गुण जरी कमी असला तरी त्याला परमेश्वराजवळ स्थान मिळणे शक्य नसते. यात आणखी एक गोष्ट महत्त्वाची आहे. परीक्षेतील गुणांमध्ये इतरांपेक्षा जास्त गुण असले म्हणजे ९५ टक्के, ९७ टक्के वगैरे गुण असले तरी पहिला नंबर येतो. तसे परमेश्वरप्राप्तीसाठी ९५ टक्के, ९७ टक्के वगैरे गुण चालत नाहीत तर १०० टक्के गुण लागतात. तरच परमेश्वरस्वरूपात जाऊन मिळणे शक्य होते. म्हणून सद्‌गुणांची यादी मोठी आहे व कोणकोणते सद्‌गुण असावे लागतात. हेही कळणे आवश्यक आहे. म्हणून त्याची यादी येथे देण्याचा प्रयास केला आहे. भगवंतांनीसुद्धा भगवद्‌गीतेतसुद्धा अशा प्रकारे वेगवेगळ्या ठिकाणी वेगवेगळ्या प्रसंगाने या सद्‌गुणांची यादी दिली आहे.

*अमानित्वमदम्भित्वम् अहिंसा क्षान्तिरार्जवम् ।*
*आचार्योपासनं शौचं स्थैर्यमात्मविनिग्रहः ॥*

*इंद्रियार्थेषु वैराग्यम् अनहंकार एव च ।*
*जन्ममृत्युजराव्याधिदुःखदोषानुदर्शनम् ॥*

*असक्तिरनभिष्वङ्गः पुत्रदारगृहादिषु ।*
*नित्यं च समचित्तत्वम् इष्टानिष्टोपपत्तिषु ॥*

*मयि चानन्ययोगेन भक्तिरव्यभिचारिणी ।*
*विविक्तदेशसेवित्वम् अरतिर्जनसंसदि ॥*

*अध्यात्मज्ञाननित्यत्वं तत्त्वज्ञानार्थदर्शनम् ।*
*एतज्ज्ञानमिति प्रोक्तम् अज्ञानं यदतोऽन्यथा ॥*

*(१३.७ ते ११ भ. गी.).*

अर्थ – अमानित्व (आत्मश्लाघेकडे प्रवृत्ती नसणे, म्हणजे लोकांनी आपली स्तुती करावी किंवा आपल्याला मोठेपणा द्यावा अशी इच्छा नसणे), दंभाचा म्हणजे पोकळ डोलाचा अभाव असणे, प्राणिमात्रास विनाकारण उपद्रव न देणे, क्षमाशीलता (म्हणजे शरणांगताला त्याच्या अपराधाची क्षमा करणे), (मनाचा) सरळपणा, गुरुजनांची शुश्रूषा करणे, (अंतर्बाह्य) पवित्र असणे, बुद्धी स्थिर ठेवणे, मनोनिग्रह करणे (म्हणजे मनावर शुद्धबुद्धीचे नियमन ठेवणे), विषयोपभोगांविषयी वैराग्य असणे, कर्तृत्वाभिमान न

बाळगणे, जन्म-मरण-वार्धक्य व रोग इत्यादिकांतील दुःखरूप दोष नेहमी ध्यानात ठेवणे (म्हणजे ही सर्व दुःखासच कारण आहेत हे न विसरणे), फलाविषयी आसक्ती न ठेवणे, पुत्र, स्त्री, घर (संपत्ती) इत्यादिकांत गुरफटून न राहणे, बऱ्यावाईट (कशाही) परिस्थितीत नेहमी सम म्हणजे शांतचित्त असणे, माझ्या (परमेश्वराच्या) ठिकाणी अनन्य भावाने अस्खलित प्रेम ठेवणे, कोणाचा उपद्रव न होईल अशा एकांत जागी राहणे, लोकांच्या संगतीची आवड नसणे, ज्ञानविज्ञानाची नेहमी चर्चा करणे, ब्रह्मज्ञानाचे तत्त्व नेहमी लक्षात ठेवणे, या सर्वांना ज्ञान (ज्ञानप्राप्तीची साधने किंवा ज्ञानाची लक्षणे) असे म्हणतात, आणि जे याच्या विरुद्ध (म्हणजे आत्मश्लाघा, दांभिकता, हिंसा वगैरे दुर्गुण) ते अज्ञान (म्हणजे अज्ञानोत्पादक किंवा अज्ञानाची लक्षणे) होय.

तापमापक यंत्र असे असते, की जे उष्णतामान असेल ते तेथील दर्शकावर दाखवते. तसे हे भगवंताचे गुणदर्शक यंत्र आहे. या यंत्रामुळे साधक किती प्रमाणात पूर्णत्वाकडे चालला आहे हे समजते. हे सर्व गुण पूर्णपणे आत्मसात होणे आवश्यक आहे. हे गुण ज्ञानाचे निदर्शक आहेत. या प्रत्येक गुणाच्या स्वाभाविक आचरणाने सर्वांभूती परमेश्वर आहे याचा प्रत्यय येतो, असा अर्थ होतो. याच्या एकनिष्ठेने व सततच्या अभ्यासाने साधक पूर्णत्वाकडे, जीवन्मुक्त अवस्थेकडे, विदेही अवस्थेकडे वाटचाल करत असतो असे दिसते किंवा याउलट साधकाला या गुणांच्या आधारे आपली प्रगती किती झाली आहे याचाही अंदाज येतो. आपली साधना योग्य दिशेने चालली आहे याचा अंदाज येतो. हे गुणच परमेश्वरप्राप्तीच्या मार्गावरील खुणा आहेत. सद्गुरू काही प्रत्यक्षपणे प्रत्येकाला प्राप्त होणे शक्य नाही. तेव्हा असे ग्रंथच आपले गुरू असून आपणास मार्गदर्शक होतात. त्याचा उपयोग होतो, उपयोग करून घ्यावयाचा आहे. परमेश्वराचे स्वरूप ज्ञानरूप आहे. परमेश्वर निर्गुण, निराकार असल्याने सत्, चित् आनंदरूप असल्याने तो काही एका ठिकाणी आहे असे नाही. त्यामुळे त्याच्या प्राप्तीसाठी 'तसे' कोठे जाणे नाही. तर त्याच्या स्वरूपाची जी लक्षणे सांगितली आहेत ती लक्षणे साधकाच्या ठिकाणी दिसू लागली की तो परमेश्वरस्वरूपच होतो. त्या ज्ञानाची लक्षणे वर दिली आहेत. याउलट जर लक्षणे असतील तर ते अज्ञानाचे लक्षण होय. इतक्या सोप्या व साध्या शब्दांत भगवंतांनी अज्ञानाची लक्षणे सांगितली आहेत. अज्ञानाची लक्षणे खूपच आहेत. एवढेच नव्हे, तर सर्वसामान्य जन जे लौकिकात वागतात ती अज्ञानाचीच लक्षणे आहेत. तेव्हा त्याची वर्णने करणे शक्य नाही. म्हणून भगवंतांनी ज्ञानाची लक्षणे वर्णन करून सांगितली आहेत की जी सर्वसामान्यांमध्ये आढळत नाहीत. यापुढे भगवंतांनी ज्ञानी साधकाची काही लक्षणे सांगितली आहेत.

*समं सर्वेषु भूतेषु तिष्ठन्तं परमेश्वरम् ।*
*विनश्यत्स्वविनश्यन्तं यः पश्यति स पश्यति ॥*

*समं पश्यन् हि सर्वत्र समवस्थितमीश्वरम् ।*
*न हिनस्त्यात्मनात्मानं ततो याति परां गतिम् ॥*

*प्रकृत्यैव च कर्माणि क्रियमाणानि सर्वशः ।*
*यः पश्यति तथात्मानम् अकर्तारं स पश्यति ॥*

*यदा भूतपृथग्भावम् एकस्थमनुपश्यति ।*
*तत् एव च विस्तारं ब्रह्म संपद्यते तदा ॥*

*(१३.२७ ते ३० भ. गी.).*

अर्थ – सर्वसृष्ट भूतमात्रामध्ये (सर्वत्र) सारखा असलेला आणि सर्व वस्तू नाश पावत असताही स्वतः नाश न पावणारा असा परमात्मा जो पाहतो (जाणतो) तो (खरा) पाहणारा (ज्ञानी) होय. ईश्वर सर्व ठिकाणी सारखा भरलेला आहे असे पाहणारा (जाणणारा) स्वतःचा घात स्वतः करीत नाही (आत्मघातकी होत नाही). म्हणून तो परमश्रेष्ठ गतीला (मोक्षाला) जातो. ज्याला सर्व कर्मे प्रकृतीकडूनच केली जातात असे कळून येते आणि म्हणून आत्मा अकर्ता आहे हे जे पाहतो (जाणतो) तोच खरा पाहणारा (ज्ञाता) होय. जेव्हा सृष्ट पदार्थातील अनेकत्व एकाच (ब्रह्मतत्त्वाच्या) अधिष्ठानावर आहे (एका ब्रह्मतत्त्वाच्याच आश्रयाने व्यक्त झाले आहे) व त्यापासूनच (ब्रह्मतत्त्वापासूनच) सृष्टीचा विस्तार झाला आहे असे जेव्हा (पुरुष) पाहतो (जाणतो) तेव्हा तो ब्रह्मसंपन्न होतो (ब्रह्मस्वरूप होतो).

'हरिदासाची कथा मूळ पदावर' असे म्हणण्याची पद्धत आहे आणि ती खरी आहे. कारण निरूपणाला जो अभंग घेतलेला असतो, त्याच्या पुष्ट्यर्थच त्याच्या पूर्वरंगामध्ये विवेचन असते व उत्तररंगामध्ये त्यावरच कथाभाग असतो. तेव्हा कथा संपताच कीर्तनकार मूळ अभंगाचे पुन्हा उच्चारण करतात आणि कथा संपवतात. त्यांच्या कीर्तनात वारंवार तोच विषय वेगवेगळ्या पद्धतीने, रूपाने, अभंगाने, गोष्टीने पटवण्याचा, स्पष्ट करण्याचा प्रयत्न असतो. कारण केवळ तत्त्व हे सूत्ररूपात असते. त्यामुळे त्याचा खुलासा हा अनेक अंगांनी करणे आवश्यक असते. त्याशिवाय ते तत्त्व पूर्ण समजत नाही. त्यामुळे पुनरावृत्तीचा दोष त्यामध्ये येतो. अर्थात त्याला दोष असेही म्हणता येत नाही. ती पुनरावृत्ती होणे अगदी अपरिहार्य आहे.

अगदी याच पद्धतीने भगवंतांनी ज्ञानी पुरुषाची आणखी काही लक्षणे सांगितली आहेत. त्यांतील काहींचा उल्लेख वर आलेला आहे. त्यांची जरी पुनरावृत्ती झाली असे वाटत असले, तरी ती काही वेळा आवश्यकच असते. पारायण, पुनरावृत्ती करणे हीसुद्धा, नव्हे हीच अभ्यासाची पद्धत आहे. त्यामुळे विषय पक्का होतो. त्यामुळे ब्रह्मसंपन्न होण्यासाठी कोणत्या गुणांची आवश्यकता आहे ते जे भगवंतांनी पुन्हा सांगितले आहे व संत ज्ञानेश्वरांनी त्याचे जे विवरण केले आहे, ते पाहू.

## मुक्तांचे लक्षण

जीव सुखप्राप्तीसाठीच धडपडत असतो. भुंगा जसा फुलाफुलातून मध गोळा करत असतो, तसा जीव हा विविध विषयांमधून सुखाचा शोध घेत असतो. काही विषयांपासून त्याला सुख मिळालेसे वाटते. पण ते सुख नसून सुखाचा भ्रम असतो. त्या भ्रमाचा भोपळा फुटला, की त्याला दुःखाचा गाभा उपभोगावा लागतो. या भ्रामक सुखानुभूतीच्या उपभोगातून ज्या वेळी तो सावध होतो त्या वेळी त्याला त्या विषयाची साम्यावस्था आली असे होते आणि मग वाचन, चिंतन, मनन, श्रवण, सद्गुरू उपदेश या सर्वांतून त्या जिवाच्या हे लक्षात येते, की सुख हे विषयांत नसून विषयत्यागातच खरे सुख आहे. परमेश्वरप्राप्तीतच खरे सुख आहे आणि त्यानंतर त्याची उपासना चालू होते. अनेक जन्मांच्या उपासनेने, तपश्चर्येने, ध्यानाने तो निर्विकल्प समाधीपर्यंत येऊन पोहोचतो. परमेश्वराचा त्याला अपरोक्ष साक्षात्कार होतो आणि मग तो जीवन्मुक्त होतो. विदेही अवस्थेला जातो. त्याला सगळीकडे परमेश्वराचेच स्वरूप प्रत्ययाला येत असते. दिसणाऱ्या विविधतेतून त्याला परमेश्वराचे तात्त्विक स्वरूप जाणवते. हे सर्व होऊनही त्याला मृत्यू प्राप्त झालेला नसतो कारण त्याच्या प्रारब्धवशात त्याच्या जन्माच्या वेळी त्याच्या वाटेला दिलेल्या आयुष्याचा अवधी अजून शिल्लक असतो. त्यामुळे त्याचे जीवन चालू असते. अशा जीवनाला नेहमी एक दृष्टान्त दिला जातो. तोच जास्त समर्पक आहे आणि तो म्हणजे कुलालचक्राचा. कुंभार मातीचे भांडे तयार झाल्यावर चाकावरून काढून घेऊन जातो पण ते भांडे तयार करण्यासाठी चक्राला जी गती दिलेली असते, ती थांबलेली नसते. त्यामुळे ते चक्र फिरतच राहते. या वेळी त्या चक्राची गती हेतूविना असते, उद्देशरहित असते. ज्या वेळी आपोआप गती कमी होऊन त्याची गती थांबेल, त्या वेळी ते चक्र थांबेल. पण चक्र स्वतः ती गती थांबवण्यासाठी कोणताच प्रयत्न करत नाही. तसे ब्रह्मसाक्षात्कार झालेला जीव हा आता 'जीव' या दशेला न राहता आत्मरूप, परमेश्वरस्वरूप झालेला असतो. तरीही त्याच्या

आयुष्याची गती थांबलेली नसते. त्याचे जीवन चालूच असते. तो साक्षात परमेश्वस्वरूपच झालेला असतो. अशा वेळी तो कसा वागतो, कसे जीवन जगतो, असा प्रश्न मनात येतो. त्याचे उत्तर भगवंतांनी गीतेत दिले आहे.

*प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान् ।*
*आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥*

*दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।*
*वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥*

*यः सर्वत्रानभिस्नेहः तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।*
*नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥*

*यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।*
*इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यः तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥*

*(२.५५ ते ५८ भ. गी.).*

अर्थ – श्रीभगवान म्हणाले, 'अर्जुना! मनुष्य जेव्हा मनातील सर्व विषयवासना पूर्णपणे टाकतो व मनानेच आत्मसंतुष्ट असतो, तेव्हा (त्याला) स्थितप्रज्ञ म्हणतात. (त्याचप्रमाणे) ज्याचे मन दुःखाविषयी निर्भय (व) सुखाविषयी निःस्पृह असते (म्हणजे) ज्याच्या मनातून अभिलाषा, भीती व क्रोध नाहीसे झालेले असतात, अशा विवेकी मनुष्याला स्थितप्रज्ञ म्हणतात. जो सर्व बाबतींत निर्लोभ राहून कोणताही बरावाईट प्रसंग प्राप्त झाला, तरी अनुक्रमे अभिनंदन (प्रसंशा) किंवा तिरस्कार करीत नाही, त्याची बुद्धी स्थिर झालेली असते (तोच स्थितप्रज्ञ झाला). जेव्हा हा (स्थितप्रज्ञ पुरुष) कासवाच्या अवयवांप्रमाणे आपली इंद्रिये त्यांच्या त्यांच्या अर्थापासून (विषयापासून) सर्वथैव आवरून घेतो तेव्हा त्याची बुद्धी स्थिर झाली (असे म्हणावे).

ज्या वेळी एखादे फळ परिपक्व अवस्थेला येते त्या वेळी ते देठापासून सुटते आणि खाली पडते. त्या फळाच्या भूमिकेतून विचार केला असता असे दिसते की, ते फळ जीवन्मुक्तदशेला आलेले असते. त्या वेळी त्या झाडावर आणखीन बरीच फळे असतात. झाडाकडून त्या फळांना तसाच रस पोचवून त्यांचे पोषण करण्याचे कार्य चालू असते. बाकीची काही फळे नवीनपणाने धारणा करीत असतील. काही अर्धवट परिपक्व झाली असतील, काही परिपक्व होण्याच्या मार्गात असतील, पण ज्या वेळी या फळाची परिपक्वता पूर्ण झालेली असते, त्या वेळी ते देठापासून अलग होते; म्हणजे त्या

फळाच्या दृष्टीने ते पूर्णावस्थेस, मुक्तावस्थेस आलेले असते. त्याच्या परिपक्वतेच्या क्षणी त्याला आणखी रस मिळवण्याची आवश्यकता नसते. त्यामुळे त्याने त्याचा स्वीकार केलेला नसतो. तसेच त्याचे जे बन्धू अनेक फळे- त्यांच्याविषयी, त्याच्या ठिकाणी कोणतेही ममत्व उरलेले नसते. बाकीच्यांचा संसार जरी तसाच चालू असला तरी त्याने (मुक्ताने) त्यांच्याकडे दुर्लक्ष केलेले असते. पूर्वी वाऱ्यावर डोलणारे, पानांच्या आड लपून लपंडाव खेळणारे, फुलांच्या बरोबर झोका घेणारे ते फळ आता बाकीचे सर्व काही तसेच चालू असतानाही अलिप्त, उदासीन होऊन ते पाहात असते. कारण ते जीवन्मुक्तीच्या क्षणाच्या उंबरठ्यावर उभे असते. अर्थात हा अलिप्तपणा, उदासीनपणा अगदी शेवटच्या क्षणीच आलेला असतो असे नाही, तर जेव्हा त्याचे रंग बदलू लागतात. तेव्हाच त्याला याची जाणीव होते. आपले वेगळेपण त्याला जाणवू लागते आणि हा अल्पितपणा, उदासीनपणा कणाकणाने वाढू लागतो. आता केवळ ते जीवन जगण्यासाठीच झाडाच्या रसाचे शोषण करत असते. आता आणखी पुढे वाढावे, फुलावे, भरावे असे त्याला वाटतच नसते. ही उदासीनता, आत्मसाक्षात्कार झालेल्या जीवन्मुक्ताच्या ठिकाणी प्रत्ययाला येते. पूर्वीप्रमाणेच सर्व जग चाललेले असते. तेच विषय सभोवताली नाचत असतात. पण आता त्याचा मोह त्या मुक्ताला पडत नाही. तीच आप्तमंडळी सभोवताली फिरत असतात. तरी त्यांच्याविषयीचे ममत्व आता आटलेले असते. तेच प्रसंग सभोवताली घडत असतात पण आता राग-लोभाच्या, सुख-दुःखाच्या ऊर्मी येईनाशा झालेल्या असतात. आता वासनांचे तरंग उठणे कमी झालेले असते व पुढे थांबूनही जातात. कारण जीवनातील भावनांचा सागर आता आटून गेलेला असतो आणि आता राहता राहिलेली असते केवळ ओल. संकल्प-विकल्पांच्या मासोळ्या मरून गेलेल्या असतात. कारण त्यांचे जीवनच संपलेले असते. आता केवळ देठापासून सुटण्याच्या क्षणाची वाट पाहणे असते, बाकी काही नाही. हाच स्थितप्रज्ञपणा होय. त्याचे वर्णन भगवंतांनी केलेले आहे.

*तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।*
*वशे हि यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।।६१ ।।*

*रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।*
*आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ।।६४ ।।*

*प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते ।*
*प्रसन्नचेतसो ह्याशुः बुद्धिः पर्यवतिष्ठते ।।६५ ।।*

*तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।*
*इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यः तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ।।६८ ।।*

*या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।*
*यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ।।६९ ।।*

*आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।*
*तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी ।।७० ।।*

*विहाय कामान् यः सर्वान् पुमांश्चरति निःस्पृहः ।*
*निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ।।७१ ।।*

*एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनं प्राप्य विमुह्यति ।*
*स्थित्वास्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ।।७२ ।।*

*(अध्याय २ भ. गी.).*

अर्थ – स्थितप्रज्ञाने त्या सर्व इंद्रियांचे संयमन करून, मत्परायण (ईश्वरपरायण) असावे. कारण इन्द्रिये ज्याच्या ताब्यात येतात त्याचीच प्रज्ञा प्रतिष्ठित होते. राग, द्वेषरहित व पूर्णपणे स्वाधीन अशा इंद्रियांनी विषयांत वावरणाऱ्या (व्यवहार करणाऱ्या) शुद्ध अंतःकरणाच्या पुरुषाला प्रसाद (समाधान) प्राप्त होतो. (याप्रमाणे) समाधान प्राप्त झाल्यावर त्याच्या सर्व दुःखांचा नाश होतो. कारण प्रसन्नचित्त पुरुषाची बुद्धी तत्काळ सर्व बाजूंनी स्थिर होते. म्हणून हे अर्जुना! ज्यांची इंद्रिये त्या त्या विषयांपासून पूर्णपणे आवरून धरली आहेत (ज्याने पूर्णपणे इंद्रियनिग्रह केला), त्याची प्रज्ञा (बुद्धी) स्थिर झाली असे म्हणावे. सर्व प्राणिमात्रांची जी रात्र (नावड) तिच्यामध्ये संयमी (स्थितप्रज्ञ) जागृत (आवड धरून) असतो. (आणि) जिच्यामध्ये सर्व प्राणिमात्र जागृत असतात (आवड धरतात) ती ज्ञानी स्थितप्रज्ञाची रात्र (नावड) असते. ज्याप्रमाणे चोहोकडून (पाणी) भरत असताही मर्यादा अढळ राखणाऱ्या समुद्रात ज्या प्रकारे पाणी प्रवेश करत असते (पाण्याच्या भरण्याने त्याची स्थिती बदलत नाही) त्या प्रकारे ज्यास सर्व कामोपभोग सहज घडतात. (कामोपभोगामुळे ज्याची स्थिती चलबिचल होत नाही) त्या स्थितप्रज्ञासच शांतिसुख प्राप्त होते. कामोपभोगपरायण मनुष्यास केव्हाही सुखप्राप्ती होत नाही. जो पुरुष सर्व विषयवासना सोडून, निरिच्छ, ममत्वशून्य व निरभिमान होऊन कर्तव्य करत राहतो, त्याला शांती मिळते. अर्जुना! हीच ब्राह्मी स्थिती (म्हणजे मुक्तावस्था) होय. ही स्थिती ज्याला प्राप्त होते तो केव्हाही मोह पावत नाही आणि

अंतकाळीदेखील अशाच स्थितीत तो राहिल्याने त्याला ब्रह्मानंद म्हणजे अमृतत्व प्राप्त होते.

संत एकनाथमहाराजांचाही अनुभव वेगळा नाही. तेव्हा भागवतावरील विवेचनात ते म्हणतात, 'श्लोकार्थ - समाधी अवस्थेमध्ये ज्याप्रमाणे योग्यांना दृश्य नामरूपाचे भान राहात नाही. महासागरामध्ये प्रविष्ट झालेल्या नद्यांना निराळे अस्तित्वच राहात नाही. त्याप्रमाणे प्रेमातिशयाने ज्यांची अंत:करणे माझ्याच ठिकाणी एकरूप झाली आहेत अशा गोपी आपला देह, जीव, स्वर्ग किंवा जगत माझ्याशिवाय इतर सर्व काही संपूर्णपणे विसरल्या होत्या. संत एकनाथांचे ओवीरूप विवेचन.

*'यावरी मजवेगळ्या असतां । मागे माझी कथा वार्ता । सदा माझे स्मरण करितां । मदा करता पावल्या ।। करितां दळण कांडण । माझे दीर्घ स्वरे गाती गुण । की आदरिल्या दधिमंथन । माझे चरित्र्य गायन त्या करिती ।। करिता सडासंमार्जन । गोपिकांसी माझे ध्यान । माझेनि स्मरणे जाण । परिये देणे बाळकां ।। गायीचे दोहन करितां । माझे स्मरणी आसक्तता । एवं सर्व कर्मी वर्ततां । माझ्या विसराची वार्ता विसरल्या ।। करितां गमनागमन । अखंड माझ्या ठायी मन । आसन भोजन प्राशन । करितां मत् ध्यान तयांसी ।। एवं मज गेलिया पाठी । ऐशी माझी आवडी मोठी । अखंड माझ्या ठायी दृष्टी । माझ्याचि गोष्टी सर्वदा ।। ऐशी अनन्य ठायीच्या ठायी । गोपिकांसी माझी प्रीति पाही । त्या वर्तताही देहगेही । माझ्या ठायी विनटल्या ।। यापरी बुद्धी मदाकार । म्हणोनि विसरल्या घरदार । विसरल्या पुत्रभ्रतार । निजव्यापार विसरल्या ।। विसरल्या विषयसुख । विसरल्या द्वंद्व दु:ख । विसरल्या तहानभूक । माझेनि एक निदिध्यासे ।।*
*जेणे देहे पतिपुत्रांते । आप्त मानिले होते चित्ते । ते चित्त रातले माते । त्या देहाते विसरोनी ।। विसरल्या इहलोक परलोक । विसरल्या कार्यकारण नि:शेख । विसरल्या नामरूप देख । माझे ध्यान सुख भोगिता ।। निरसोनि तत्त्वाचे विकार । समाधि पावे मुनिश्वर । तो विसरे जेवी संसार । तेवी मदाकार गोपिका ।। जेवी का नाना सरितां । आलिया सिंधूते ठाकिता । तेथे पावोनि समरसता । नामरूपता विसरल्या ।। तेवी गोपिका अनन्य प्रीति । माझी लाहोनिया प्राप्ती । नामरूपाची व्युत्पत्ति । विसरल्या स्फूर्ति स्फूरेना ।। सच्चिदानंद स्वरूप प्रभावो । नेणता माझा निजस्वभावो । गोपिकांचा अनन्यभावो । परब्रह्म पहा हो पावल्या ।।*

*(अध्याय १२, श्लोक १२, ओवी १७६ ते १९० ए. भा.).*

ब्रह्मस्वरूप झालेल्या साधकाची अवस्था संत तुकारामांनीही वर्णन केली आहे. 'व्यापक हा विश्वंभर। चराचर ज्याचेनि ॥' हा विश्वंभर चराचराचे केवळ तटस्थ निमित्तकारण नसून उपादान कारणही असल्यामुळे चराचरात व्यापक आहे. हे मी प्रत्यक्ष पाहिले आहे. जगत्कारण ईश्वर ब्रह्मव्यापक आहे. तोच माझ्या मागे, पुढे मला दिसत आहे. 'आसन, शयन, भोजन गोविंदे। भरले आनंद त्रिभुवन ॥' माझे बसणे, झोपणे, जेवणे इत्यादी सर्व व्यवहार किंबहुना माझ्यासह सारे गोविंदाच्या आनंदाने व्यापले आहे.

*निजल्याने गाता उभा नारायण। बसल्या कीर्तन करिता डोले ॥*
*उभा राहोनिया मुखी नाम वदे। नाचे हा गोविंद नाना छंदे ॥*
*मारगी चालतां मुखी नामवाणी। उभा चक्रपाणी मागे पुढे ॥*

माझ्या अखंड नामचिंतनात मी निजलो असता हा जवळच उभा असतो. मी बसलो असता माझ्याबरोबर प्रेमाने डोलतो. मार्गाने चालत असता माझ्या मागे-पुढे रक्षण करण्याकरिता माझ्यासोबत सज्ज असतो. तुकोबांची अशी भावारूढ अवस्था क्षणाक्षणाला होत होती आणि त्या अवस्थेत सर्वत्र विठ्ठलच भरला आहे असा तुकोबांना प्रत्यक्ष भास होई.

*आंत हरि बाहेर हरि। हरिने घरी कोंडिले ॥१ ॥*
*हरिने कामा घातला चिरा। वित्तवरा मुकविले ॥२ ॥*
*हरिने जीवे केली साटी। पाडिली तुटी सकळांसी ॥३ ॥*
*तुका म्हणे वेगळा नव्हे। हरि हा भोवें भोवताला ॥४ ॥*

'या संपूर्ण जगात ओतप्रोत हरीच व्यापून आहे. हरीने मला स्वस्वरूपाच्या घरात कोंडून टाकले. शरीराच्या सर्व क्रिया थांबल्या आणि भौतिक संपत्ती तुच्छ वाटते आहे. श्रीहरीने माझ्या जिवालाच हरीरूप केले. माझ्यापेक्षा हरी वेगळा नसून माझ्या सभोवती सर्व बाजूला हरीच व्यापून आहे.' राजा जनकाप्रमाणे तुकोबाची अशी विदेही अवस्था झाली. श्रीहरीच्या प्रत्यक्ष दर्शनाची ही पूर्वतयारी होती आणि एक महामंगल दिवस उजाडला. तुकोबांना देवाचे साक्षात अपूर्व दर्शन झाले.

महाप्रलयाच्या वेळी आकाश जलमय होऊन सर्वत्र पाणीच पाणी होते. विहिरी, नदी, सागर हा भेद पृथ्वीसह हरपून जातो. नामरूपाचा भेदच मावळला तर नदी-नद्यांचा प्रवाह तरी वेगळे कसे राहणार? कल्पांतसमयी चंद्रसूर्याचा उदय-अस्तदेखील

राहात नाही. मग जेव्हा साधकाच्या जीवनात (अनेक जन्मांनंतर) त्याच्या उग्र, तीव्र, उपासनेने प्रलय होतो, त्या वेळी त्याच्या ठिकाणी भेदाभेदाचा उदय-अस्त होतच नाही. नामरूपाची नावनिशाणी राहात नाही. त्याचे वर्णन संत तुकाराम करतात, 'तुका म्हणे कल्प झाला। अस्त गेला उदय॥' याप्रमाणे आत्मज्ञान झाल्यावर मनाचा व्यवहार नाहीसा होऊन कर्मक्षय झाल्याने भेदाभेद मावळला (लयाला गेला) आणि सर्वत्र आत्मतत्त्वच शिल्लक राहिले, प्रत्ययाला आले.

*नाही आम्हा शत्रु सोईरे पिशुन। दाटले हे घन माहियेर॥*
*पाहे तेथे पांडुरंग रखुमाई। सत्यभामा राही जननीया॥*

*(तुका. महा.).*

आम्हाला ना कोणी शत्रू, ना कोणी मित्र लहान-मोठा हा भेद दिसतच नाही. जिकडे तिकडे चोहोकडे माझे पंढरी माहेरच घनदाट भरलेले दिसते.

## जीवन्मुक्ताची लक्षणे

मुक्तीसाठी प्रयत्न करणाऱ्या जिवांची अनेक जन्मांतून प्रगती होत असते. निष्ठेने उपासना करणे, वाचन, अभ्यास, चिंतन, मनन, यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, ध्यान, धारणा, समाधी अशा चढत्यावाढत्या निष्ठेने साधना करून तो जीव वैराग्याची तसेच ज्ञानाची परिसीमा गाठण्याचा प्रयत्न करत असतो आणि या त्याच्या तपश्चर्येला एकदा फळ येते. त्याला सद्‌गुरूंची प्राप्ती होते आणि मग जिवाला सद्‌गुरूंच्या आधाराने साधनेत वेग येतो आणि त्याच्या संकल्पाप्रमाणे जन्माजन्मातून त्याची प्रगती होत राहते. गीतेत भगवंत म्हणतात–

*प्राप्य पुण्यकृताँल्लोकानुषित्वा शाश्वती: समा:।*
*शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभि जायते॥*

*अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम्।*
*एतद्धि दुर्लभतरं लोके जन्म यदीदृशम्॥*

*तत्र तं बुद्धिसंयोगं लभते पौर्वदेहिकम्।*
*यतते च ततो भूय: संसिद्धौ कुरुनन्दन॥*

*(६.४१ ते ४३ भ. गी.).*

त्याच्या साधनेला, उपासनेला योग्य अशा कुलामध्ये त्याला जन्म मिळत जातो व त्या त्या जन्मात योग्य वेळ, वय येताच त्याला पूर्वी केलेल्या अभ्यासाची आठवण होऊन तो आपला अभ्यास पुढे चालू करतो व अशा प्रकारे अनेक जन्मांतून तो मुक्तीच्या अवस्थेकडे प्रगत होत जातो. तेव्हा अशा प्रगत झालेल्या जिवाची नेमकी लक्षणे काय असतात, याबाबत संत ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीमध्ये जागोजागी त्याचा उल्लेख केलेला आहे. ते पाहणे-वाचणे व त्याचे मनन करणेही व त्याचप्रमाणे आपले आचरण, आपली प्रगती तपासून पाहणेही इष्ट ठरेल. आपण अजून किती मागे आहोत याचाही अंदाज घेता येईल. म्हणून त्या लक्षणांचे संकलन केले आहे. योगभ्रष्टाचा प्रारब्धाप्रमाणे जन्म येतो. तो श्रीमंत कुलात वा योगीकुलात असेल. पण मागील जन्मी जेथपर्यंत अभ्यास झाला असेल त्याच्याच पुढे तो अभ्यास चालू होतो हे निश्चित. त्याचे एकनाथी भागवतात संत एकनाथांनीही वर्णन केले आहे.

ऐहिक व आयुष्मिक विषयांपासून तो पूर्ण विरक्त असल्यामुळे, लहान मुलाप्रमाणेच, दोषयुक्त कर्मापासून बुद्धीने परावृत्त होत नाही. त्याचप्रमाणे कर्मगुण फलदायी असले तरी प्रवृत्त होत नाही. तो गुण आणि दोष या दोहोंच्याही पलीकडे गेलेला असतो. (अध्याय ७ श्लोक ११ ए. भा.).

*'संकल्पु नाही वृत्ति। हेतु स्फुरेना चित्ती। ऐसी कर्मे ज्ञाते करिती। शरीरस्थिती केवळ॥ तेथ सत्कर्म सिद्धि गेले। तेणे फुगे ना म्या हे केले। अथवा माझारी विकळ पडिले। तेणे तगमगिलेपण नाही॥ निद्रितामागे बैसला वाघू। अथवा पुढे आला स्वर्गभोगु। त्यासी नाही रागविरागू। तैसा लागु ज्ञात्याचा॥ गुणदोषी चित्तवृत्ती। सांडोनिया सहज स्थिती। बाळके जेवी क्रिडती। तैशी स्थिती ज्ञात्याची॥ तेथ गुरुवाक्य अनुवृत्ती। अभ्यासुनि यथानुगती। अज्ञाने सहित निरसिती। अभिमान स्थिती निजबोधे॥ शेष-प्रारब्धाचेनि मेळे। निराभिमाने देह चळे। ज्ञाते कर्मे करिती सकळे। जाण केवळ शरीरे॥ केवळ शरीर कर्मे होती। तीच 'अहेतुक' बोलिजेती। अर्भक दृष्टांते उपपत्ती। हेचि स्थिती सांगितली॥'*

*(अध्याय ७ ओवी १२२ ते १३१ ए. भा.).*

खालील ज्ञानेश्वरी ओव्या अर्थाने सोप्या आहेत. त्या सरळ वाचल्या असता अर्थाचा बोध होईलच. तरीही थोडा भावार्थ देण्याचा प्रयास केला आहे.

*'तो मनुष्यासारिखा तरी आवडे। परी मनुष्यत्व तया न घडे। जैसे जळाधारे न बुडे। भानुबिंब ॥ तेणे न पाहतां विश्व देखिले। न करिता सर्व केले। न भोगिता भोगिले। भोग्यजात ॥ एकेचि ठायी बैसला। परि सर्वत्र तोचि गेला। हे असो विश्व जाहला। अंगेचि तो ॥ जया पुरुषाच्या ठायी। कर्माचा तरी खेदु नाही। परी फळापेक्षां कांही। संचरेना ॥ आणि हे कर्म मी करीन। अथवा आदरले सिद्धि नेईन। येणे संकल्पेही जयाचे मन। विटेळा ना ॥ ज्ञानाग्नीचेनी मुखे। जेणे जाळिली कर्मे अशेखे। तो परब्रह्मचि मनुष्यवेखे। वोळख तूं ॥ जो शरीरी उदासु। फळभोगी निरासु। नित्यता उल्हासु। होऊनि असे ॥ तो संतोषाच्या गाभारां। आत्मबोधाचिया वोगरां। पुरे न म्हणेचि धनुर्धरा। आरोगितां ॥ कैसी आधिकाधिक आवडी। घेत महासुखाची गोडी। सांडोनिया आशा कुरोंडी। अहंभावेसी ॥ म्हणोनि अवसरे जे जे पावे। तेणेचि तो सुखावे। आपले आणि परावे। दोन्ही नाही ॥ तो दिठी जे पाहे। ते आपणचि होऊनि जाये। आईके ते आहे। तोचि जाहला ॥ चरणी हन चाले। मुखे जे जे बोले। ऐसे चेष्टजात तितुले। आपणचि जो ॥ हे असो विश्व पाही। जयासि आपणपे वाचूनि नाही। आतां कवण ते कर्म कायी। बाधी तयाते ॥ हा मत्सरु जेथ उपजे। तेतुले नुरेचि जया दुजे। तो निर्मत्सरु काई म्हणिजे। बोलवरी ॥ म्हणोनि सर्वा परी मुक्तु। तो सकर्मुचि कर्मरहितु। सगुण परि गुणातितु। एथ भ्रांती नाही ॥ तो देहसंगे तरी असे। परि चैतन्यासारिखा दिसे। पाहतां परब्रह्माचेनि कसे। चोखाळू भला. ॥'*

*(४.१०० ते ११५ ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – जीवन्मुक्त दशा हा शेवटचा जन्म असतो. ज्या वेळी कोणताही संकल्प राहिलेला नसतो. सर्व प्रारब्ध व संचित ही संपलेली असतात. आतापर्यंतच्या जन्मांतून ईश्वरप्राप्तीसाठी केलेली उपासना फळाला आलेली असते. आता पुढील जन्माला काहीच कारण राहिलेले नसते. सध्याचा जन्म हा शिल्लक राहिलेल्या प्रारब्धाप्रमाणे आलेला असतो व त्या प्रारब्धाप्रमाणेच जीवनाची आयुष्यमर्यादाही ठरलेली असते, पण परमेश्वरी साक्षात्कार झाल्यावरही काही काळ आयुष्यमर्यादा शिल्लक असते. त्या काळात जीवन्मुक्तांचे जीवन, कर्मे चालूच असतात. मग ते कसे वागतात? त्याचे वर्णन अशा जीवन्मुक्त दशेचा अनुभव घेतलेल्यांनीच करून ठेवले आहे. त्या काळात त्यांच्याकडून जी कर्मे झाली असतील त्या कर्मानासुद्धा फळे आहेतच. मग त्या कर्मफळांचे काय होते? त्या कर्मफळांच्या उपभोगासाठी त्यांना पुन्हा जन्म घ्यावा लागतो का? त्यांना पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. कारण त्यांच्या कर्मफलांची वाटणी होऊन त्यांच्या नावे काहीच शिल्लक राहात नाही आणि त्यामुळे कर्मफलाच्या

उपभोगासाठी त्यांना जन्म घ्यावा लागत नाही. त्यांची सत्कर्मांची फळे त्यांच्या सेवेकऱ्यांना, हितचिंतकांना व असत्कर्मांची फळे त्यांच्या निंदकांना वाटली जातात.

जीवन्मुक्त कसा ओळखावा याची काही लक्षणे वरील ओव्यांतून आली आहेत. जीवन्मुक्त दिसायला सर्वसाधारण माणसासारखाच दिसतो. कपडे, बोलणे, चालणे या बाह्य स्वरूपावरून जीवन्मुक्त ओळखता येणार नाही. 'मनुष्यासारिखा तरी आवडे।' पण सर्वसाधारण माणसाची जी वृत्ती असते ती मात्र त्याची नसते. हे त्यांचे वैशिष्ट्य आहे. तो एके ठिकाणीच बसून असल्यासारखे आपणास दिसत असेल पण सभोवतालच्या सर्व घडणाऱ्या घटनांचीही त्यांना कल्पना असते. बाह्य स्वरूपाच्या स्थूल घटनांविषयीच नव्हे तर मानसिक स्तरावरसुद्धा कोणत्याही प्रकारच्या प्रक्रिया घडत असतील, तर त्याचे त्या जीवन्मुक्तांना ज्ञान असते. त्यांना त्यांच्या जीवनात काही कमी आहे म्हणून मिळवावयाचे नसते. त्यामुळे कोणतेही कर्म करण्याबद्दल अथवा न करण्याबद्दल त्यांचा काहीच आग्रह नसतो. जेथे कर्माचाच आग्रह नाही तेथे कर्मफलाबद्दल उत्सुकता, इच्छा, अभिलाषा कोठून असणार? शरीराविषयी उदास असला तरी त्यांच्या चेहऱ्यावर कायम आनंद ओसंडत असतो. हसत बोलणे, उत्साहाने वागणे असते. त्यांच्याभोवती असणारी मंडळी- त्यांनाही त्या पुरुषाकडे पाहून उत्साह, आनंद वाटतो. कामामध्ये समाधान मिळते. जीवन्मुक्तांच्या चेहऱ्यावरील आनंद आत्मतुष्टीचा असतो. साधारण माणूस त्याच्या आवडीचे जेवण समोर आले म्हणजे कसा आनंदून जातो व वारंवार पदार्थांची मागणी करून अगदी आकंठ जेवतो. तसा जीवन्मुक्ताचा विषयाचा आनंद नसतो. त्याला सर्वांठायी परमेश्वराचाच प्रत्यय येत असतो. सर्व विविध रूपांत परमेश्वराचे एकच रूप प्रत्ययाला येत असते. त्यामुळे तो सदैव आनंदी असतो. त्यामुळे आनंदावाचून अन्य भाव त्याच्या ठिकाणी नसतो. त्याच्या चेहऱ्यावर प्रसंगानुरूप जरी अन्य भाव प्रकट झाल्यासारखे वाटत असले, तरी तो अंतरी आनंदीच असतो. बाह्यत: त्याने अनेक कर्मे केली आहेत. कर्माप्रमाणे सत्त्व, रज, तम गुणाप्रमाणे कर्मे करत आहे असे दिसत असते, तरी तो या सर्वांपासून अलग म्हणजे गुणातीत अवस्थेतच असतो. या बाबतीत संत एकनाथांचा अनुभवही असाच आहे.

*'प्रकृतीसी पर। प्रकृतिरूपी ते अविकार। आकार-विकार-व्यवहार। त्याचेनि साचार बाधीना॥ ते भोगावरी न विटती। त्यागावरी न उठती। आपुलिये सहज स्थिती। स्वये वर्तती सर्वदा॥ ते ज्ञातेपणा न मिरविती। पिसेपण न दाविती। स्वरूप फुंज विस्मृती। गिळून वर्तती निजांगे॥ प्रेमा आंगीचि जिराला। विस्मयो येवोचि विसरला। प्रपंच*

*परमार्थु एकु जाहला । हाही ठेला विभागु ।। स्मरण विस्मरणेशी गेले । देह देहीच हारपले । आतुं बाहेरपण गेले । गेले ठेले स्मरेना ।। स्वप्न जागृती जागता गेली । सुषुप्ति साक्षित्वेसी बुडाली । उन्मनीही वेडावली । तुर्या ठेली तटस्थ ।। दृश्य द्रष्टेनशी गेले । दर्शन एकलेपणे निमाले । ते निमणेपणही विराले । विरविते नेले विरणेनिशी ।। ज्ञान अज्ञानाते घेऊनि गेले । तंव ज्ञातेपणही बुडाले । विज्ञान अंगी घडले । परी नवे जडले हे न मनी ।।'*

*(अध्याय १ ओवी ४७ ते ५४ ए. भा.).*

*जो देखिलिया देखणे सरे । जो चाखिलीया चाखणे पुरे । जो ऐकिलिया ऐकणे वोसरे । जो चिंतितां नुरे चित्तवृत्ति ।। ज्यासी झालीया भेटी । भेटीसी न पडे तुटी । ज्यासी बोलतां गोठी । पडे मिठी परमार्थी ।।*

*(अ. १ ओ २७३, २७४ ए. भा.).*

असे जीवन्मुक्त जेव्हा लौकिकासाठी काही कर्मे करतात, तेव्हा त्या कर्मांमध्ये त्यांची कोणतीही कामना, हेतू नसतो. केवळ निरपेक्ष भावनेने त्यांचे कर्म करणे असते. लोकांना योग्य मार्गदर्शन व्हावे व लोकांच्या समोर उत्तम आदर्श असावा हा त्यांचा हेतू असतो की, जेणे करून समाज धर्माचे आचरण करेल. ते कर्म कसे करतात?

*'जया अविद्याजात जाळितां । जे उरले निजस्वभावता । जेथ अग्नि आणि होता । उरेचिना ।। जेथ यजितयाचा कामु पुरे । यज्ञीचे विधान सरे । मागुते जेथुनि वोसरे । क्रियाजात ।। विचार जेथ न रिगे । हेतु जेथ न निगे । जै द्वैतदोषसंगे । सिंपेचिना ।। ऐसे अनादिसिद्ध चोखट । जे ज्ञान यज्ञावशिष्ट । ते सेविती ब्रह्मनिष्ठ । ब्रह्माहं मंत्रे ।। ऐसे शेषामृत धाले । की अमर्त्य भावा आले । म्हणोनि ब्रह्म ते जाहाले । अनायासे ।।'*

*(४.१४८, १५२ ज्ञानेश्वरी).*

*'जेथ प्रवृत्ति पांगुळ जाहली । तर्काची दिठी गेली । जेणे इंद्रिये विसरली । विषय संगु ।। मनाचे मनपण गेले । जेथ बोलाचे बोलकेपण ठेले । जयामाजी सांपडले । ज्ञेय दिसे ।। जेथ वैराग्याचा पांगु फिटे । विवेकाचाही सोसु तुटे । जेथ न पाहता सहज भेटे । आपणपे ।।'*

*(४.१६१ ते १६३ ज्ञानेश्वरी).*

'जेणे भ्रांति पासुनी हिरतले। गुरुवाक्ये मन धुतले। मग आत्मस्वरूपी घातले। हरौनिया ।। जैसे समुद्री लवण न पडे। तंव वेगळे अल्प आवडे। मग होय सिंधुचि एवढे। मिळे तेंव्हा ।। तैसे संकल्पौनि काढिले। जयाचे मनचि चैतन्य जाहले। तेणे एकदेशिय परी व्यापिले। लोकत्रय ।। आतां कर्ता कर्म करावे। हे खुंटले जया स्वभावे। आणि करी जऱ्ही आघवे। तऱ्ही अकर्ता तो ।। जे पार्था तया देही। मी ऐसा आठऊ नाही। तरी कर्तृत्व कैचे काई। उरे सांगे ।। ऐसे तनु त्यागेवीण। अमुर्ताचे गुण। दिसती संपूर्ण। योगयुक्ता ।। एऱ्हवी आणिकांचिये परी। तोही एक शरीरी। अशेषही व्यापारी। वर्ततु दिसे ।। तोही नेत्री पाहे। श्रवणी ऐकतु आहे। परि तेथीचा सर्वथा नोहे। नवल देखे ।। स्पर्शासी तरी जाणे। परिमळू सेवी घ्राणे। अवसरोचित्त बोलणे। तयाहि आथी ।। आहाराते स्वीकारी । त्यजावे ते परिहारी। निद्रेचिया अवसरी। निदिजे सुखे ।। आपुलेनि इच्छावसे। तोहि गा चालतु दिसे। पै सकळ कर्म ऐसे। राहटे किर ।। हे सांगो काई एकैक। देखे श्वासोश्वासादिक। आणि निमिषोन्निमिष। आदि करूनी ।। पार्था तयाच्या ठायी। हे आघवेचि आथी पाही। परी तो कर्ता नव्हे कांही। प्रतीतिबळे ।। जै भ्रांतिसेजे सुतला। तै स्वप्नसुखे भूतला। मग तो ज्ञानोदयी चेइला। म्हणोनिया ।। आतां अधिष्ठानसंगती। अशेषही इंद्रियवृत्ति। आपुलालिया अर्थी। वर्तत आहाती ।। दीपाचेनि प्रकाशे। गृहीचे व्यापार जैसे। देही कर्मजात तैसे। योगयुक्ता ।। तो कर्मे करी सकळे। परी कर्मबंधा नाकळे। जैसे न सिंपे जळी जळे। पद्मपत्र ।।'

(५.३४ ते ५० ज्ञानेश्वरी).

'योगिये तोही करिती। परी कर्मे ते न बांधिजती। जे सांडिली आहे संगति। अहंभावाची ।। आतां जाहालिया भ्रमहत। जैसे पिशाचाचे चित्त। मग इंद्रियांचे चेष्टित। विकळु दिसे ।। स्वरूप तरी देखे। आळविले आइके। शब्दु बोले मुखे। परी ज्ञान नाही ।।

(५.५६ ते ५९ ज्ञानेश्वरी).

'तरी आत्मयोगे आथिला। जो कर्मफळाशी विटला। तो घर रिघोनि वरिला। शांती जगी ।। येरु कर्मबंधे किरीटी। अभिलाषाचिया गाठी। कळासला खुंटी। फळभोगाच्या ।। जैसा फळाचिये हांवे। तैसे कर्म करी आघवे। मग न कीजेचि येणे भावे। उपेक्षी जो ।। तो जयाकडे वासु पाहे। तेऊती सुखाची सृष्टि होये। तो म्हणे तेथ राहे। महाबोधु ।। नवद्वारे देही। तो असतुचि परि नाही। करितुचि न करी कांही। फलत्यागी ।।'

(५.७१ ते ७५ ज्ञानेश्वरी).

जन्मोजन्मीच्या साधनेने जेव्हा सर्व अविद्याच नाहीशी होते, तेव्हा कोणतेच द्वैत उरत नाही. जीवन्मुक्त अशा काळात त्याच्या सहजावस्थेत असतो. त्या वेळी त्याचे जीवन म्हणजे एक यज्ञ असतो. त्या यज्ञात तो यजमान असतो. तोच 'होता', तोच हवनकर्ता, तोच हवनीय वस्तू आणि एवढेच काय पण तोच अग्नी असतो. त्याची प्रवृत्ती लुळीपांगळी झालेली असते आणि त्याच्या तर्काला विविधता दिसत नाहीशी होते. या जन्मोजन्मीच्या प्रगती टप्प्यावर सद्‌गुरूची कधी एकदा भेट झालेली असते. सृष्टीतील विविधतेमुळे निर्माण झालेला भ्रम सद्‌गुरूच्या उपदेशाने, केलेल्या साधनेने मावळत गेलेला असतो. जे मन ही विविधता जाणत असते त्या मनाचे मनपणच गेल्याने त्याला विविध विषयांचे विस्मरण झालेले असते. जेथे मनच नाही तेथे कर्म तरी कोठे असते? अशा स्थितीत शरीराकडून जरी कर्मे घडत असली, तरी ज्या कर्मात मन नाही त्या कर्माचे कर्तेपणही नसते. त्यामुळे कर्मे करूनही तो अकर्ता असतो. एवढेच काय पण जे कर्म त्याच्याकडून घडले जाते त्याचे स्मरणही त्याला नसते. ज्याप्रमाणे बालक वेगवेगळ्या लीला करत असते, पण त्याला आपण काय करतो याची जाणीव नसते; तसे जीवन्मुक्ताची कर्मे म्हणजे बाललीलाच असतात. त्याची इंद्रिये त्यांच्या त्यांच्या धर्माप्रमाणे वर्तन करीत असतात. पण ती काय करतात याची जाणीव जीवन्मुक्ताला नसते, कारण सर्व कर्मांच्या मागे असणारे मन व असणारा अहंभाव त्याच्या ठिकाणी उरलेला नसतो. ज्याप्रमाणे घरातील व्यापार दिव्याच्या उजेडात चाललेला असतो, पण लोक काय करतात याची जाणीव दिव्याला नसते, तो केवळ साक्षीभूतपणे पाहात असतो; त्याप्रमाणे जीवन्मुक्ताचा आत्मा साक्षीभूतपणे असतो. त्याचे चैतन्य इंद्रियांना जरी चेतना देत असले, तरी त्या इंद्रियांकडून घडणाऱ्या कर्माला तो जबाबदार नसतो; तसे जीवन्मुक्ताचे जीवन चाललेले असते. त्यामुळे जीवन्मुक्ताकडून घडणाऱ्या कर्माचे फळबंधन त्याला पडत नाही.

*'बुद्धि निश्चये आत्मज्ञान। ब्रह्मरूप भावी आपणा आपण। ब्रह्मनिष्ठा राखे पूर्ण। तत्परायण अहर्निश ॥ ऐसे व्यापक ज्ञान भले। जयांचिया हृदया गिवसित आले। तयांचि समता दृष्टि बोले। विशेषुकाई ॥ एक आपणपांचि जैसे। ते देखती विश्व तैसे। हे बोलणे कायसे। नवलु एथ ॥ परी दैव जैसे कवतिके। कांहीचि दैन्य न देखे। कां विवेकु हा नोळखे। भ्रांताते जेवी ॥ ना तरी अंधकाराची वानी। जैसा सूर्य न देखे स्वप्नी। अमृत नायके कानी। मृत्युकथा ॥ हे असो संतापु कैसा। चंद्र न स्मरे जैसा। भूती भेदु नेणती तैसा। ज्ञानिये ते ॥ मग हा मशकु हा गजु। की श्वपचु हा द्विजु। पैल इतरु हा आत्मजु। हे उरले के ॥ ना तरी हे धेनु हे श्वान। एक गुरु एक हीन। हे असो कैचे स्वप्न।*

जागतया ॥ एथ भेदु तरी की देखावा । जरी अहंभाव उरला होआवा । तो आधीचि नाही आघवा । आतां विषमु काई ॥ म्हणोनि सर्वत्र सदा सम । ते आपणचि अद्वय ब्रह्म । हे संपूर्ण जाणे वर्म । समदृष्टीचे ॥ जिही विषय संगु न सोडिता । इंद्रियाते न दंडिता । परि भोगिला निःसंगता । कामनेविण ॥ जिही लोकांचेनि आधारे । लौकिकेचि व्यापारे । परि सांडिले निदसुरे । लौकिकु हे ॥ जैसा जनामाजी खेचरु । असतुचि जना नोहे गोचरु । तैसा शरीरी तो परि संसारु । नोळखे तयाते ॥ हे असो पवनाचेनि मेळे । जैसे जळीचि जळ लोळे । ते आणिके म्हणती वेगळे । कल्लोळ हे ॥ तैसे नामरूप तयाचे । एऱ्हवी ब्रह्मचि तो साचे । मन साम्या आले जयाचे । सर्वत्र गा ॥ ऐसेनि समदृष्टि जो होये । तया पुरुषा लक्षणही आहे । अर्जुना संक्षेपे सांगेन पाहे । अच्युत म्हणे ॥ तरी मृगजळाचेनि पूरे । जैसे न लोटिजे का गिरीवरे । तैसा शुभाशुभी न विकरे । पातलिया जो ॥ तोचि तो निरुता । समदृष्टि तत्त्वतां । हरि म्हणे पांडसुता । तोचि ब्रह्म ॥ जो आपणपै सांडुनि काही । इंद्रियाग्रामावरी येणेचि नाही । तो विषय न सेवि हे काई । विचित्र येथ ॥ सहजे स्वसुखाचेनि अपारे । सुरवाडलेनि अंतरे । रचिला म्हणऊनि बाहिरे । पाऊल न घाली ॥ सांगे कुमुददळाचेनि ताटे। जो जेविला चंद्रकिरणे चोखटे। तो चकोरु काई वाळुवंटे। चुंबित असे ॥ तैसे आत्मसुख उपाइले । जयासी आपणपेचि फावले । तया विषयो सहज सांडवले । म्हणो काई ॥'

(५.८७ ते १०८ ज्ञानेश्वरी).

'ज्ञानियांच्या हन ठायी । याची मातुही कीर नाही । देही देहभावो जिही । स्ववश केले ॥ परि ते वेगळेपणे भोगिजे । जैसे पक्षिये फळ चुंबिजे । तैसे नव्हे तेथ विसरिजे । भोगितेपणही ॥ भोगी अवस्था एक उठी । ते अहंकाराचा अंचलु लोटी । मग सुखेसि घे आटी । गाढेपणे ॥ तिये अलिंगनमेळी । होय आपेआप कवळी । तेथ जळ जैसे जळी । वेगळे न दिसे ॥ कां आकाशी वायु हारपे । तेथ दोन्ही हे भाष लोपे । तैसे सुखचि उरे स्वरुपे । सुरती तिये ॥ ऐशी द्वैताची भाष जाये । मग म्हणो जरी एकचि होय । तरी तेथ साक्षी कवणु आहे । जाणते जे ॥ म्हणोनि असो हे आघवे । एथ न बोलणे काय बोलावे । ते खुणचि पावेल स्वभावे । आत्माराम ॥ जे ऐसेनि सुखे मातले । आपणपांचि आपण गुंतले । ते मी जाणे निखिल वोतले । सामरस्याचे ॥ ते आनंदाचे अनुकार । सुखाचे अंकुर । की महाबोधे विहार । केले जैसे ॥ ते विवेकांचे गांव । की परब्रह्मीचे स्वभाव । ना तरी अलंकारले अवयव । ब्रह्मविद्येचे ॥ ते सत्त्वाचे सात्त्विक । की चैतन्याचे आंगिक । हे बहु असो एकैक । वानिसी काई ॥

(५.१२९ ते १४० ज्ञानेश्वरी).

*'जिही विषयापासोनि हिरतले । चित्त आपुले आपण जिंतिले । ते निश्चित जेथ सुतले । चेतींचिना ।। ते परब्रह्म निर्वाण । जे आत्मविंदाचे कारण । तेचि ते पुरुष जाण । पांडुकुमरा ।। ते ऐसे कैसेनि जहाले । जे देहीचि ब्रह्मत्वा आले । ते पुससी तरी भले । संक्षेपे सांगो ।।'*

*(५.१४८ ते १५० ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – वरील ओव्यांतून संत ज्ञानेश्वर आत्मज्ञानाचा शेवटचा क्रम सांगतात. मनाचे मनपण जरी गेले, तरी मनामागे असणारी बुद्धी महत्त्वाची आहे. ती बुद्धी जेव्हा एका ठिकाणी स्थिर होईल, जीवनात काय प्राप्त करून घ्यावयाचे आहे याचा जेव्हा निश्चय होईल, आणि तो निश्चयसुद्धा आत्मज्ञान प्राप्तीचाच असेल, तेव्हाच ते आत्मज्ञान प्राप्त होईल. कारण 'संकल्पात् सिद्धी' असे सूत्र आहे. तेव्हा आत्मज्ञानप्राप्तीचा संकल्प असणे हे महत्त्वाचे आहे. अशा संकल्पकारणाने एकनिष्ठेने साधना केली जाते व त्या साधनेचे फळ म्हणून आत्मसाक्षात्कार होतो. हेच आत्मज्ञान आणि त्याची परिणती म्हणजे ब्रह्मभावाची प्राप्ती होय. ब्रह्मभाव, ब्रह्मप्राप्ती ही एक अशी अवस्था आहे की, ती कधीही नाहीशी होत नाही. म्हणजे ब्रह्मज्ञानी पुरुष पुन्हा कधीही विकारवश होत नाही. आणि जर होत असेल तर तो ब्रह्मज्ञानी झाला नाही हे निश्चित समजावे. म्हणून ब्रह्मभाव हा जीवन्मुक्ताचा सहज भाव असतो आणि त्याच अवस्थेत तो कायम राहतो आणि जीवन्मुक्ताची सर्व लक्षणे त्याच्या ठिकाणी स्पष्ट दिसू लागतात. ज्याप्रमाणे सूर्याला स्वप्नातसुद्धा अंधार माहीत नाही किंवा अमृताला मृत्यू म्हणजे काय याची कल्पनाच नसते, त्याप्रमाणे जीवन्मुक्ताच्या जाणिवेला संसारातील विविधतेमुळे पडणारा मोह व्यापून टाकत नाही. त्या विविधतेत त्याला स्वतःचीच प्रचीती येत राहते. त्यामुळे अनेक विषयांच्या मध्ये राहून तो निःसंग असतो. त्याची इंद्रिये विविध विषयांचे सेवन करीत असूनही तो कामनाहीन असतो. तो सर्वसामान्य माणसासारखा वागत असूनही तो असामान्य असतो. समुद्रामध्ये वेगळेपणाने जाणवणाऱ्या लाटा या खऱ्या वेगळ्या नसतातच. तो एक पाण्याचा आविष्कार असतो. तसे जीवन्मुक्ताचे जीवन असते. विविध विषयांच्या सेवनाने तो विकारवश होत नाही. जो विकारवशच होत नाही त्याला त्यापासून होणारे सुखदुःख तरी कसे होणार? ज्या एका आनंदाच्या अवस्थेमध्ये तो असतो त्यातून तो कधीच

बाहेर येत नाही. हा दृष्टान्त देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात की 'ज्या चकोरांनी कमलदलाच्या ताटात चंद्रकिरणाच्या अमृताचे सेवन केले आहे, ते वाळवंटात उगवणाऱ्या फुलातील मधाची अपेक्षा करतील काय? अशा प्रकारे ज्यांनी संसारी विषयापासून मनच काढून ईश्वराशी लावून टाकले आहे, ज्यांनी विषयापासून मिळणाऱ्या तथाकथित सुखाचा त्याग करून आत्मानंदाच्या सुखात मन रमवले आहे, ते मन तेथून बाहेर पडतच नाही.'

संत एकनाथांनीही त्यांच्या अनुभूतीतून भागवताचे निरूपण अशाच पद्धतीने केले. 'सर्व संग सोडून देऊन जो मोकळा झाला आहे, मन व इंद्रिये ताब्यात ठेवून जो तृप्त आहे, जो सर्वत्र भगवत्स्वरूप पाहणारा आहे. माझ्या स्वरूपातच ज्याचे मन रमले आहे, त्याला हे सर्व विश्वच सुखमय आहे.'

*'ओवी-देखता नानाभूत विषमता । ज्यासी साचार दिसे समता । तो माझिया निजसुखाचे माथा । क्रिडे सर्वार्थतासमसाम्ये ॥ सर्प त्वचा जेवी पांपरी । माथा हालविल्या फडा न करी । तेवी धनदारागृह पुत्री । छळितां ज्या भितरी क्रोध नुमसे ॥ काम क्रोध मावळले देही । साचार शांति ज्याच्या ठायी । माझे निजसुख ज्याच्या पायी । लोळत पाही सर्वदा ॥ माझे ठायी अर्पित चित्त । ऐसे माझे निजभक्त । माझेनि सुखे सुखी सतत । ते अनासक्त सर्वार्थी ॥ माझ्या ठायी नित्य भक्ति । आणि लोकलोकांतर आसक्ति । ते भक्ति नव्हे कामासक्ति । जाण निश्चिती उद्धवा ॥ भक्ति सुखे सुखावली स्थिती । यालागी आवडे माझी भक्ति । पायां लागती चारी मुक्ति । भक्त न घेती मजवीण ॥ एक मजवाचूनी कांही । भक्तासी आणिक प्रिय नाही । माझेनि भजनसुखे पाही । लोकी तिही न समाती ॥ आदि करुनि चारी मुक्ति । मजवेगळी जे सुख प्राप्ती । भक्त सर्वथा न घेती । माझ्या अभेद भक्ति लाधले ॥ मजवेगळे जे जे सुख । तुच्छ करुनि सांडती देख । माझ्या भजनाचा परम हरिख । अलौकिक मद् भक्ता ॥'*

*(अ. १४ श्लोक १३ ओवी १०५ ते १३४ निवडक ए. भा.).*

*'जैसा किडाळाचा दोषु जाये । तरी पंधरे तेचि होये । तैसे जीवा ब्रह्मत्त्व आहे । संकल्पलोपी ॥ हा घटकारु जैसा । निमालिया तया अवकाशा । नलगे मिळो जाणे आकाशा । आना ठाया ॥ तैसा देहाहंकारु नाथिला । हा समूळ जयाचा नाशिला । तोचि परमात्मा संचला । अधीचि आहे ॥'*

*(६.८२ ते ८४ ज्ञानेश्वरी).*

'ऐसा शरीरीचि परि कौतुके । परब्रह्माचेनि पाडे तुके । जेणे जिंतली एकें । इंद्रिये गा ।। तो जितेंद्रियु सहजे । तोचि योगयुक्तु म्हणिजे । जेणे साने थोर नेणिजे । कवणे काळी ।। देखे सोनयाचे निखळ । मेरुयेसणे ढिसाळ । आणि मातियेचे डिखळ । सरिसेचि मानी ।। पाहतां पृथ्वीचे मोल थोडे । ऐसे अनर्घ्य रत्न चोखडे । देखे दगडाचेनि पाडे । निचाडु ऐसा ।। तेथ सुहृद आणि शत्रु । कां उदासु आणि मित्रु । हा भाव भेदु विचित्रु । कल्पू कैचा ।। तया बंधु कोण काह्याचा । द्वेषिया कवणु तयाचा । मीचि विश्व ऐसा जयाचा । बोधु जाहला ।। मग तयाचिये दिठी । अधमोत्तम असे किरीटी । काय परिसाचिया कसवटी । वानिया कीजे ।। ते जैसी निर्वाण वर्णुचि करी । तैसी जयाचि बुद्धि चराचरी । होय साम्याचि उजरी । निरंतर ।। जे ते विश्वाळंकाराचे विसुरे । जरी आहाती अनाने आकारे । तरी घडले एकचि भांगारे । परब्रह्मे ।। ऐसे जाणणे जे बरवे । ते फावले तया आघवे । म्हणोनि आहाचवाहाचे न झकवे । येणे आकार चित्रे । घापे पटामाजि दृष्टि । दिसे तंतुची सैंघसृष्टी । परी तो एकावाचूनि गोठी । दुजी नाही ।। ऐसेनि प्रतिती हे गवसे । ऐसा अनुभव जयाते असे । तोचि समबुद्धि हे अनारिसे । नव्हे जाणे ।। पुढती अस्तवेना ऐसे । जया पाहले अद्वैत दिवसे । मग आपणपांचि आपणु असे । अखंडीत ।। ऐसिया दृष्टि जो विवेकी । पार्था तो एकाकी । सहजे अपरिग्रही जे तिही लोकी । तोचि म्हणऊनि ।।

(६.९० ते १०६ ज्ञानेश्वरी).

'भूताचेनि अनेकपणे । अनेक नोहे अंतःकरणे । केवळ एकत्वचि माझे जाणे । सर्वत्र जो ।। मग तो एक हा मियां । बोलता दिसतसे वायां । एऱ्हवी न बोलिजे तरी धनंजया । तो मीचि आहे ।। दीपा-आणि प्रकाशा । एकवंकीचा पाडु जैसा । तो माझ्याठायी तैसा । मी तयामाजी ।। जैसे उदकाचेनि आयुष्ये रसु । कां गगनाचेनि माने अवकाशु । तैसा माझेनि रुपे रुपसु । पुरुष तो गा ।। जेणे ऐक्याचिये दिठी । सर्वत्र मातेचि किरीटी । देखिला जैसा पटी । तंतु एकु ।। कां स्वरुपे तरी बहुते आहाती । परी तैसी सोनी बहुवे न होती । ऐसी ऐक्यचळाची स्थिती । केली जेणे ।। ना तरी वृक्षाची पाने जेतुली । तेतुली रोपे नाही लाविली । ऐसी अद्वैत दिवसे पाहिली । रात्री जया ।। तो पंचात्मकी सांपडे । तरी मग सांग पां कैसेनि अडे । जो प्रतीतीचेनि पाडे । मजसी तुके ।। माझे व्यापकपण आघवे । गवसले तयाचेनि अनुभवे । तरी न म्हणता स्वभावे । व्यापकु जाहला ।। आतां शरीरी तरी आहे । परी शरीराचा तो नोहे । ऐसे बोलवरी होये । ये करु कोई ।। म्हणोनि असो ते विशेखे । आपणपेयासारिखे । तो चराचर देखे । अखंडीत ।। सुखदुःखादि वर्मे । कां शुभाशुभें कर्मे । दोनी ऐसी मनोधर्मे । नेणेचि जो ।। हे समविषम भाव । आणिकही विचित्र जे सर्व । ते मानी जैसे अवयव । आपुले होती ।। हे एकैक काय सांगावे । जया त्रैलोक्यचि आघवे । मी

*ऐसे स्वभावे । बोधा आले ॥ तयाही देह एकु कीर आथी । लौकिकि सुखदुःखी तयाते म्हणती । परी आम्हाते ऐसी प्रतिती । परब्रह्मची हा ॥ म्हणोनि आपणपां विश्व देखिजे । आणि आपण विश्व होईजे । ऐसे साम्यचि एक उपासिजे । पांडवा गा ॥'*

*(६.३९४ ते ४०१ ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – शुद्ध सोन्यामध्ये इतर धातूंची मिसळ करत गेले, की त्याचा कस उतरत जातो, त्याची किंमत कमी होत जाते. पण जर त्यातील ती मिसळ काढून टाकली तर ते सोने पुन्हा शुद्ध होते. या दृष्टान्तात सोने हे केव्हाही शुद्ध असते. त्यामुळे सोने शुद्ध करणे म्हणजे त्यातील मिसळ धातू काढणे एवढेच काम असते. तसे मानव हा मुळातून शुद्ध ब्रह्मच आहे. पण वासना, इच्छा, संकल्प या अशुद्धाचे जेव्हा त्यात मिश्रण होते, त्या वेळी ब्रह्मरूप जीव रूपाला येतो. वासनापूर्तीच्या कर्मामुळे सुखदुःखाला कारण होते व जन्माजन्मांतरीच्या चक्रामध्ये अडकला जातो. पण जेव्हा तो या संकल्पाचा त्याग करेल, वासना, इच्छा, सोडून देईल त्या वेळी तो मूळ शुद्धस्वरूप अशा ब्रह्माला प्राप्त होईल. ज्याप्रमाणे घटामध्ये असलेल्या अवकाशाला घट फुटल्यावर महाकाशाला मिळून जाण्याला कोठे वेगळ्या ठिकाणी जावे लागत नाही. घटाचे बंधन सुटले, की ते महाकाशात सहजी मिळून जाते; तसे जिवाला संकल्प, वासना, इच्छा यांचे बंधन पडलेले असते, ते बंधन नाहीसे झाले की जीव ब्रह्मरूप होऊन जातो. कारण ब्रह्म हे सर्व ठिकाणी समभावाने आहेच. त्यामुळे जिवाला ब्रह्मरूप होण्याला कोठेही जावे लागत नाही.

वासना, इच्छा, संकल्प यांचा त्याग केला म्हणजे नेमके काय केले याचा विस्तार पुढील ओव्यांतून संत ज्ञानेश्वरांनी केला आहे. त्यांची समदृष्टीची उदाहरणे म्हणजे सोने, आणि माती असे वस्तुनिष्ठ भेद, तसेच रत्न आणि दगड, त्याचप्रमाणे व्यक्तिनिष्ठ भेद म्हणजे शत्रू आणि सुहृद, उदास आणि मित्र, जीवन्मुक्ताच्या ठिकाणी नसतात. त्याला सारे विश्व स्वतःप्रमाणेच चैतन्यमय, ब्रह्ममय वाटत असते. याला दृष्टान्त देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'परिसाला जसे सोने आणि लोखंड सारखेच वाटते, कारण लोखंडालाही स्पर्श झाल्यावर त्याचे सोनेच होते. विश्वातील या विविध आकारमानांत, रंगरूपांत, वस्तुमात्राकडे जीवन्मुक्ताची दृष्टी जाताच त्यातील एक ब्रह्मरूपच प्रत्ययाला येत असते. त्यामुळे त्याला त्या विविधतेचा मोह पडत नाही. ज्याप्रमाणे सूर्यावर अंधार नाही, तसे सकाळ व संध्याकाळही नाही, त्याचप्रमाणे उदय-अस्तही नाही, तर तो प्रकाश सातत्याने समप्रमाणात सारखाच असतो; त्याप्रमाणे

जीवन्मुक्ताला विश्वातील विविधता दिसत नसून एक समप्रमाणात पसरलेले परब्रह्मच दिसत असते. याला दृष्टान्त देताना संत ज्ञानदेव म्हणतात, 'दिवे अनेक पण त्यांचा प्रकाश एकच, अनेक चवी, पण त्यांतील जलातील रसत्व एकच. आकारमानाने अनेक अवकाश पण ते सर्व एका गगनाच्या अवकाशातच सामावलेले. अलंकाररूपाने अनेक भासणारे सोने एकच. वृक्षाची पाने पुष्कळ पण वृक्ष एकच. अशा अद्वैत भूमिकेवर तो जीवन्मुक्त स्थिर झालेला असतो. त्याचा बोध, त्याची जाणीव केवळ एका ब्रह्मस्वरूपाचाच प्रत्यय घेत असते. अशा प्रकारे साऱ्या विश्वात तो एकरूप संचार करीत असतो. सर्वांचा उपभोग घेत असतो आणि एका ब्रह्मानंदात बुडून गेलेला असतो.

*'जे आतांचि सांगितले होते । अगा अधियज्ञ म्हणितला जयाते । जे आदीचि तया माते । जाणोनि अंती ।। ते देह झोळ ऐसे मानुनी । ठेले आपणपे आपण होऊनि । जैसा मठ गगना भरुनी । गगनीचि असे ।। ये प्रतीतीचिया माजघरी । तया निश्चयाची वोवरी । आली म्हणौनि बाहेरी । नव्हेचि से ।। ऐसे सबाह्य ऐक्य संचले । मीचि होऊनी असतां रचिले । बाहेर भुतांची पांचही खवले । नेणतांचि पडिली ।। आंतां उभया उभेपण नाही जयाचे । मा पडिलिया गहन कवण तयाचे । म्हणोनि प्रतीतीचिये पोटीचे । पाणी न हले ।। ते ऐक्याची आहे वोतिली । की नित्यतेचिया हृदयी घातली । जैसी समरससमुद्री धुतली । रुळेचिना ।। पैं अथावी घट बुडाला । तो आंतबाहेरी उदके भरला । पाठी दैवगत्या जरी फुटला । तरी उदक काय फुटे।। ना तरी सर्पे कवच सांडिले । कां उबारेने वस्त्र फेडिले । तरी सांग पां काय मोडले । अवेवामाजी ।। तैसा आकार हा आहाच भ्रंशे । वाचूनि वस्तु ते सांचलीचि असे । तेचि बुद्धि जालिया विसकुसे । कैसेनि आतां ।। म्हणोनि यापरी माते । अंतकाळी जाणत सांते । जे मोकलिती देहाते । ते मीचि होती ।।'*

*(८.५१ ते ६८ ज्ञानेश्वरी).*

*'तो जडाजडातें विरवितु । भ्रूलतांमाजी संचरतु । जैसा घंटानाद लयस्थु । घंटेसीच होय ।। कां झाकलिया घटीचा दिवा । नेणिजे काय जाहला केंव्हा । या रीती जो पांडवा । देह ठेवी ।। तो केवळ परब्रह्म । जया परमपुरुष ऐसे नाम । ते माझे निजधाम । होऊनि ठाके ।।'*

*(८.१७ ते १९ ज्ञानेश्वरी).*

*'आंतु अग्निज्योतिचा प्रकाशु । बाहेरी शुक्लपक्षु आणि दिवसु । आणि सा मासामाजी मासु । उत्तरायण ।। ऐशिया समयोगाची निरुती । लाहोनि जे देह ठेविती । ते परब्रह्मचि होती । ब्रह्मविद ।। अवधारी गा धनुर्धरा । येथवरी सामर्थ्य यया अवसरा । तेवीचि हा उजु*

*मार्ग स्वपुरा । यावया पै ।। एथ अग्नि हे पहिले पायतरे । ज्योतिर्मय हे दुसरे । दिवस जाणे तिसरे । चौथे शुक्लपक्ष ।। आणि सामास उत्तरायण । ते वरचील गा सोपान । येणे सायुज्य सिद्धिसदन । पावती योगी ।। हा उत्तम काळू जाणिजे । याते अर्चिरादि मार्गु म्हणिजे । आतां अकाळू तोही सहजे । सांगेन आईक ।।'*

*(८.२२० ते २२५ ज्ञानेश्वरी)*

*'ते वेळी म्हणितले हे नव्हे । वाया अवचट काय पावे । देह त्यजुनि वस्तू होआवे । मार्गेचि की ।। तरी आता देह असो अथवा जावो । आम्ही तो केवळ वस्तूचि आहो । कां जे दोरी सर्पत्व वावो । दोराचिकडूनी ।। मज तरंगपण असे की नसे । ऐसे हे उदकासी कही प्रतिभासे । ते भलतेंव्हा जैसे तैसे । उदकची की ।। तरंगाकारे न जन्मेचि । ना तरंगलोपे न निमेचि । ते विदेही जे देहेचि । वस्तू जाहले ।। आतां शरीराचे तयाचिया ठाई । आडनांवही उरले नाही । तरि कोणे काळे काई । निमे ते पाहे पां ।। मग मार्गाते कासया शोधावे । कोणे कोठूनि के जावे । जरी देशकालादि आघवे । आपणाचि असे ।। आणि हा गा घटु जे वेळी फुटे। ते वेळी तेथीचे आकाश लागे नीट वाटे। वाटा लागे तरि गगना भेटे। एऱ्हवी काय चुके ।। पाहे पां ऐसे हन आहे । की तो आकारुचि जाये । येर गगन ते गगनीचि आहे । घटत्वाहि आधी ।। ऐसिया बोधाचेनि सुरवाडे । मार्गामार्गाचे सांकडे । तयां सोहंसिद्धा न पडे । योगियांसी ।। याकारणे पांडुसुता । तुवां होआवे योगयुक्ता । येतुलेनि सर्वकाळी साम्यता । आपैसया होईल ।। मग भलतेथ भलतेंव्हा । देहबंध असो अथवा जावा । परि अबंधा नित्य ब्रह्मभावा । विघड नाही. ।। तो कल्पादि जन्मा नागवे । कल्पांती मरण नाप्लवे । माजी स्वर्गसंसाराचेनि लाघवे । झकवेना ।। येणे बोधे जो योगी होये । तयासीचि या बोधाचे नीटपण आहे । कां जे भोगाते पेलुनि पाये । निजरुपा ये ।।'*

*(८.२४७ ते २५९ ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – प्रत्येक घटाच्या आतबाहेर अवकाश असते किंवा तोच घट जर पाण्यात असेल तर तो जसा आतबाहेर पाण्यानेच भरून असतो, तसा या देहाच्या खोळीत आत-बाहेर परब्रह्मच भरून आहे. याची प्रचीती जीवन्मुक्ताला येत असते. त्यामुळे स्थूल रूपाने असणाऱ्या जगताची जाणीव त्याच्या ठिकाणी नसते. अशा या मद्रूप अवस्थेत त्यांच्या शरीराचे पंचकोश केव्हा गळून पडतात याचे त्यांना भानच राहात नाही व एका आनंदकोशातील आनंदाचाच त्याला सतत अनुभव येत राहतो. त्या आत्मानंदातच तो सतत रममाण झालेला असतो. याला दृष्टान्त देताना संत ज्ञानेश्वर सांगतात 'पाण्यात असलेला व पाण्याने भरलेला घट जर फुटला तर त्या घटातील

पाण्याला मूळ पाण्यात मिळून जाण्याला काही कोठे जावे लागणार आहे का? का काही कष्ट पडणार आहेत? सर्पाने कात टाकली किंवा उकाड्यामुळे अंगावरील वस्त्र काढून टाकले तर मूळ शरीराच्या अवयवांची काय मोडतोड थोडीच होते? त्याप्रमाणे नानाविध आकारांनी ही शरीरे जरी विविधता दाखवत असली, तरी ब्रह्मरूपामध्ये काहीच फरक पडत नाही. त्या ऐक्याची कोणतीच मोडतोड होत नाही. ते ब्रह्मरूप समभावाने सगळीकडे सारखेच भरून राहिलेले आहेच. अशा जाणिवेच्या क्षणी जीवन्मुक्ताने देहाचा त्याग केला, तर तो ब्रह्मरूपच होतो. अन्य ठिकाणी जाणार नाही. ज्याप्रमाणे घटाखाली झाकलेला दिवा जसा आपोआप शांतपणे मालवून जातो, तसा जीवन्मुक्त देह ठेवतो. अशा वेळी, काळी जीवन्मुक्त जेथे जातात तेच परमेश्वराचे निजधाम होय.

जीव ब्रह्मरूप होण्यासाठी त्याने देह सोडून जाणे हे आवश्यक आहे. या देहत्यागाविषयी, योग्य व अयोग्य कालाविषयी भगवंतांनी स्पष्टीकरण दिले आहे. या योग्य व अयोग्य काळाचा विचार जीवन्मुक्तासाठी नाही, तर फक्त योगभ्रष्ट साधकांसाठीच आहे. कारण आपण जेव्हा नव्या गावात जातो व आपल्याला पत्ता शोधावयाचा असतो, तेव्हा आपण दिवसाच त्या गावात जाऊन पत्ता शोधण्याचे कार्य करू शकतो. त्या वेळी चौकशी करण्यासाठी भोवताली माणसे असण्याची शक्यता तरी असते. त्यामुळे थोड्याफार कष्टाने पत्ता मिळू शकतो, पण रात्रीच्या वेळी चौकशीला कोणी माणसेच नसतात. त्यामुळे पत्ता शोधणे जिकिरीचे होऊन जाते व वाट चुकण्याचीच जास्त शक्यता असते. पण जो आपल्याच गावात जातो तो मग दिवसा वा रात्री, अगदी बेरात्री गेला तरी त्याला जसा काहीच फरक पडत नाही, कारण त्याची पायवाट ओळखीची असते. तसे जीवन्मुक्तांनी त्यांच्या अनेक जन्मोजन्मीच्या साधनेने या पायवाटेचा चांगलाच सराव, अभ्यास केलेला असतो. त्यामुळे जीवन्मुक्तीच्या शेवटच्या जन्मात त्यांना योग्य-अयोग्य काळाचे बंधन राहात नाही. त्यांनी त्यांच्या प्रारब्धाने केव्हाही देह ठेवला तरी ते परब्रह्माशी ऐक्य पावतात. मिळून जातात. परमेश्वराच्या निजधामाला जातात. हा तर लौकिक विचार झाला. पण आध्यात्मिक अवस्थेचा विचार करता ते जिवंत असतानाच त्यांचा देहभाव गेलेला असतो. देह उभा का आडवा याची जाणीवही त्यांच्या ठिकाणी राहिलेली नसते. वृत्तीने ते केवळ ब्रह्मानंदातच लय पावलेले असतात. त्या अवस्थेत देह पडल्यावर जिवात्मा ब्रह्मरूपातच विलीन होऊन जाणार हे निश्चितच. संत ज्ञानेश्वर दृष्टान्त देताना म्हणतात, 'घट फुटला म्हणून त्यातील अवकाश पुन्हा महावकाशातच

मिळून जाणार, का अन्य ठिकाणी जाऊन ते रस्ता चुकणार आहे! तसे होऊच शकत नाही, तर ते महावकाशातच मिळून जाणार' आणि असे झाले म्हणजे पुन्हा जन्म नाही.

श्रीमत् भागवतावर विवेचन करताना संत एकनाथसुद्धा हेच सांगतात–

आणि ज्ञानी सिद्धाला स्वस्वरूपाचा साक्षात्कार झालेला असतो. म्हणून तो हा नश्वर देह पडला आहे किंवा उठून चालतो आहे, हे काही पाहात नाही. पूर्वकर्माप्रमाणे देहाची हालचाल कोणत्याही प्रकारची झाली, तरी त्याला त्याची भीती वाटत नाही. दारू पिऊन धुंद झालेल्या माणसाला आपले वस्त्र नेसलेले आहे की सुटले आहे याचे भान नसते किंवा पर्वा नसते (त्याप्रमाणे सिद्धपुरुषाच्या स्वदेहासंबंधी स्थिती असते. तो देहाभिमानरहित असा सर्वकाळ ध्यानारूढ असतो.).

*विवेचन – 'एवं पावोनिया माझ्या स्वरूपासी । स्वानंदपूर्ण साधकासी । सुखे सुखरुपता जाहली त्यासी । निजदेहासी विसरोनी ।। मग उठले की बैसले । चालते की राहिले । जागते की निजले । हे स्मरण ठेले देहाचे ।। हे धाले की भूकेले । हिवले की तापले । प्याले की तान्हेले । राहिले उगले स्मरेना तो ।। हे येथे की तेथे । मुके की बोलते । होते की नव्हते । स्मरण सहिते स्मरेना तो ।। हे ओवळे की सोवळे । चोखट की मैळे । डोळस की आंधळे । अंगी पांगुळले स्मरेना तो ।। हे आले की गेले । होते की केले । जाहले की मेले । तटस्थ राहिले स्मरेना तो ।। हे खाटे की भुयी । ठायी की कुठायी । आहे की नाही । हेही पाही स्मरेना तो ।। हे मंत्री की तंत्री । तीर्थी की क्षेत्री । विष्ठि की मुत्री । आहे पवित्री स्मरेना तो ।। जनी की वनी । अथवा निरंजनी । जपी की ध्यानी । हेही मनी स्मरेना तो ।। हे सुजनी की दुर्जनी । बंदी की विमानी । मंदिरी की मसणी । पाहती कोणी स्मरेना तो ।। हे गजी की तुरगी । की अंगना संभोगी । खरी की उरगी । अंगीच्या अंगी स्मरेना तो ।। हे काशी की कैकटी । नरकी की वैकुंठी । घरी की कपाटी । राहिले नेहटी स्मरेना तो ।। हे पूजीले कां गांजिले । धरीले का मारीले । देहाचे येकही केले । अथवा काय झाले स्मरेना तो ।। मी शेषशयनावरी । की मातंगाच्या घरी । की बैसलो शुलावरी । हेही न स्मरी सहसा तो ।। ऐशी ज्ञात्याची निराभिमानता । माझेनि न सांगवे तत्त्वता । जे पावले माझी सायुज्यता । त्यांची कथा न बोलवे ।। जेथ वेदां मौन पडे । स्वरवर्णेसी वाचा बुडे । त्या संतांचे पवाडे । माझेनिही निवाडे न सांगवती ।।'*

*(अ. १३, श्लोक ३६, ओवी ५९५ ते ६११ ए. भा.).*

संत ज्ञानेश्वरांनी अमृतानुभवामध्ये जीवन्मुक्तांची काही लक्षणे सांगितली आहेत. सेव्य देव व सेवक भक्त हे स्वामी-सेवक दोन्ही भाव ब्रह्मचैतन्य आपल्या सच्चिदानंद रूपावर दाखवते. म्हणजे एक ब्रह्मचैतन्यच देव-भक्तरूपाने नटते व सहजस्थितीरूप सेवेच्या द्वारा आपणच आपला भोग घेते; म्हणजे जेथे अविशिष्ट प्रारब्धाच्या योगाने भक्ताकडून कायिक, वाचिक, मानसिक होणाऱ्या साहजिक सर्व चेष्टा ही भक्तीच आहे. कारण आपला देह, वाचा, मानस हे सर्व परमात्मरूप आहे. असा त्याचा अनुभव असतो. फार काय सांगावे! व्यष्टी, समष्टी, जीवेशांचे चारी देह हे मी एक आत्माच आहे. असा त्या तत्त्ववेत्त्याचा दृढनिश्चय असतो. अर्थात अशा बोधाने भक्तांकडून ज्या काही चेष्टा होतील, त्याही सर्व आत्मरूपच आहेत. अशा तऱ्हेने एक आत्माच भक्ताच्या याचत् चे मिषाने आपणच आपली भक्ती करीत आहे. जसे सुगंध हेच नाक होऊन आपला भोग आपणच घेत आहे. शब्द हाच श्रवण होऊन आपलाच भोग आपण घेत आहे. अथवा आरसाच डोळा बनून आपल्यातच आपल्याला पाहून सुखी होत आहे. पंखा व वायू हे दोन्ही एकच झाले, मस्तकच चाफा झाले, जिव्हा रसरूप झाली, कमळच सूर्य झाले, चंद्र चकोर झाला, भ्रमरच फुले झाले, तसे सच्चिदानंदरूप परब्रह्माच्या विकासात म्हणजे ब्रह्माच्या दृढ अपरोक्ष ज्ञानात भोग्य (शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध), भोक्ता (जीव) व भोग आणि दृश्य, द्रष्ट व दर्शन इत्यादी सर्व त्रिपुटी नाहीशा होऊन संभराभरीत एक चिदैक्यभाव राहिला. या प्रमाणे नव्या नव्या अनुभवांचा जरी संबंध घडला, तरी अक्रिय जे ब्रह्म त्याच्या ठिकाणी त्या नव्या नव्या अनुभवाचे ज्ञान नसते. कारण नवे अनुभव जरी इंद्रियांस कळाले, तरी तत्त्ववेत्त्याचे अंत:करण हे सर्व ठिकाणी एक ब्रह्मवस्तूच पाहते. सराफाचे डोळे दागिने पाहतात पण त्याची बुद्धी एक सोनेच पाहात असते. ज्या चैतन्यावर अनेक आकृती भासतात, त्या चैतन्याच्या तत्त्ववेत्त्यास अनुभव झाल्यामुळे जिकडेतिकडे चैतन्याशिवाय त्यास दुसरे काहीच दिसेनासे झालेले असते.

'म्हणोनि तोंडा आडपडे। तेही वाचा वावडे। परी समाधी न मोडे। मौनमुद्रेची॥' (९.१९ अमृतानुभव). जो विषय तोंडापुढे येईल, त्याविषयी तोंड बोलतेच आहे. परंतु मौनमुद्रेची समाधी मोडत नाही. भावार्थ असा, की ज्ञात्यापुढे जे जे विषय येतात, ते ते सर्व त्याला आपल्या आत्मस्वरूपाहून वेगळे भासत नाही. त्याची दृष्टी सर्व विषयांतून निर्विषय असणाऱ्या स्वात्मभावासच अनुभवत असते. ज्ञात्याची ज्ञानवृत्ती आत्मानात्म विचाराने इतकी तीक्ष्ण झालेली असते, की ती अनेक नामरूपात्मक दृश्य विषयांचे

आवरण भेदून त्याच्या खाली असणाऱ्या अस्तिभातिप्रियरूप, अदृश्य व निर्विषय स्वात्मभावास विषय करते.

संत ज्ञानेश्वर आता आणखी काही लक्षणे सांगत आहेत-

*'तरी जयाचिये चोखट मानसी । मी होऊनी असे क्षेत्र संन्यासी । जया निजेलियाते उपासी । वैराग्य गा ।। जयाचिया आस्थेचिया सद्भावा ।। आतूं धर्म करी राणिवा । जयांचे मनी ओलवा । विवेकाचा ।। जे ज्ञानगंगे नाहाले । पूर्णता: जेऊन धाले । जे शांतीसि आले । पालव नवे ।। जे परिणामा निघाले कोंभ । जे धैर्यमंडपाचे स्तंभ । ते आनंदसमुद्री कुंभ । चुबकळोनि भरिले ।। जया भक्तीची येतुली प्राप्ति । जे कैवल्याते परौते सर म्हणती । जयांचिये लीळेमाजी नीति । जियाली दिसे ।। जे आघवांचि करणी । लेईले शांतीची लेणी । जयांचे चित्त गवसणी । व्यापका मज ।। ऐसे हे महानुभाव । दैविये प्रकृतिचे दैव । जे जाणोनिया सर्व । स्वरूप माझे ।। मग वाढतेनि प्रेमे । माते भजती जे महात्मे । परि दुजेपण मनोधर्मे । शिवतले नाही ।। ऐसे मीचि होऊनि पांडवा । करिति माझी सेवा । परि नवलावो तो सांगावा । असे आइक ।। तरी कीर्तनाचेनि नटनाचे । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे । जे नामचि नाही पापाचे । ऐसे केले ।। यमदमा अवकळा आणिली । तीर्थे ठायावरुनि उठविली । यमलोकीची खुंटली । राहटी आघवी ।। यमु म्हणे काय यमावे । दमु म्हणे कवणाते दमावे । तीर्थे म्हणती काय खावे । दोष ओखदासि नाही ।। ऐसे माझेनि नामघोखे । नाहीचि करिति विश्वाची दु:खे । अवघे जगची महासुखे । दुमदुमित भरले ।। ते पाहाटेवीण पाहावित । अमृतेवीण जीववित । योगेवीण दावित । कैवल्य डोळा ।। परी राया रंका पाड धरुं । नेणती सानेया थोरा कडसणी करुं । एकसरे आनंदाचे आवारु । होत जगा ।। कही एकाधेनि वैकुंठा जावे । ते तिही वैकुंठचि केले आघवे । ऐसे नामघोषगौरवे । धवळले विश्व ।। तेजे सूर्य तैसे सोज्वळ । परि तोहि अस्तवे हे किडाळ । चंद्र संपूर्ण एखादे वेळ । हे सदा पुरते ।। मेघ उदार परी वोसरे । म्हणऊनि उपमेसी न पुरे । हे नि:शंकपणे सपांखरे । पंचानन ।। जयाचे वाचे पुढां भोजे । नाम नाचत असे माझे । जे जन्मसहस्री वोळगिजे । एकवेळ यावया ।। तो मी वैकुंठी नसे । वेळ एक भानुबिंबीही न दिसे । वरी योगियांचीही मानसे । उमरडोनि जाय ।। परी तयापांशी पांडवा । मी हारपला गिवसावा । जेथ नामघोषु बरवा । करिति माझा ।। कैसे माझ्या गुणी धाले । देश काळाते विसरले । कीर्तने सुखी झाले । आपणपांचि ।। कृष्ण विष्णू हरि गोविंद । या नामांचे निखळ प्रबंध । माझी आत्मचर्चा विदश । उदंड गाती ।। हे बहु असो यापरी । कीर्तित माते अवधारी । एक विचरती चराचरी । पांडुकुमरा ।।'*

*(९.१८८ ते २११ ज्ञानेश्वरी).*

*'तरी दोन्ही पालववेरी । जैसा एक तंतु अंबरी । तैसा मीवाचुनि चराचरी । जाणती ना ॥ आदि ब्रह्मा करुनी । शेवटी मशक धरुनी । माजी समस्त हे जाणोनि । स्वरूप माझे ॥ मग वाड धाकुटे न म्हणती । सजीव निर्जीव नेणती । देखिलिये वस्तु उजु लुंठिती । माचि म्हणोनि ॥ आपुले उत्तमत्व नाठवे । पुढील योग्यायोग्य नेणवे । एकसरे व्यक्तिमात्राचेनि नांवे । नमुचि आवडे ॥ जैसे उंची उदक पडिले । ते तळवटवरी ये उगेले । तैसे नमिजे भूतजात देखिले । ऐसा स्वभावोचि तयांचा ॥ का फळलिया तरुचि शाखा । सहजे भूमीसि उतरे देखा । तैसे जीवमात्रां अशेखा । खालावती ते ॥ अखंड अगर्वता होऊनि असती । तयांची विनय हेचि संपत्ति । जे जयजयमंत्रे अर्पिती । माझ्या ठायी ॥ नमिता मानापमान गळाले । म्हणोनि अवचिंता मीचि जहाले । ऐसे निरंतर मिसळले । उपासिती ॥ अर्जुना हे गुरवी भक्ति । सांगितली तुज प्रति ।'*

*(९.२२० ते २२८ ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – कोणाच्या हृदयात परमेश्वराचा वास असतो किंवा परमेश्वर कोणाच्या हृदयात वास करतो? याचे प्रमाण देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात– 'चोखट मानसी।' 'चोखट' म्हणजे चोख, शुद्ध, पवित्र, निर्मळ, स्पष्ट, निर्विकारी वगैरे असे ज्याचे मानस म्हणजे मन, बुद्धी, चित्त असेल त्या ठिकाणी परमेश्वराचा वास असतो. असे मन कसे असते? तर त्या ठिकाणी विवेकाचा ओलावा असतो. जे ज्ञानगंगेत न्हाऊन निघाले आहेत, जे शांतीवेलीला नवीन फुटलेली पालवीच जणू, ज्यामधून या जगाची उत्पत्ती होते व त्यात हे विश्व लय पावते त्या परब्रह्माला फुटलेला जणू कोंबच होय. हे जीवन्मुक्त म्हणजे भक्तीची परिसीमाच होय. हे शांतीचे आधारस्तंभ, नीतीचे जिवंत आदर्श, दैवी संपत्तीचे आधारस्तंभच होय. जे अहंकार सोडून केवळ माझ्या स्वरूपीच लीन होतात, अशांच्या हृदयात परमेश्वराचा वास असतो. ते मीच होऊन माझी भक्ती करतात. असे हे स्वतः जीवन्मुक्त होतात, पण यांच्या सहवासाने आजूबाजूचे प्राणी असतील तेही एकमेकांशी वागताना आपले स्वाभाविक वैरभाव विसरून जातात आणि त्यामुळे प्राण्यांकडून कोणतेही हिंसक कार्य, कृत्य घडत नाही. म्हणून त्यांच्याकडून काही पापही होत नाही. आणि असे झाले म्हणजे पापी लोकांची यमलोकांची रहदारी बंद होते. परिसाच्या स्पर्शाने जसे सर्व धातू सुवर्ण होऊन जातात, तसे या जीवन्मुक्ताच्या सहवासात असणारी माणसेही जीवन्मुक्त होऊन जातात. त्यामुळे लोकांकडून होणारी पापे होईनाशी होऊन यमलोकीचा व्यवहार थंडावत जातो असे वर्णन संत ज्ञानदेव करतात. जीवन्मुक्तांच्या सहवासाने सर्व परिसर, प्राणिमात्रे सुखाने

भरून जातात. सगळीकडे आनंदीआनंद होतो. हे जीवन्मुक्त कसे असतात याचा दृष्टान्त देताना संत ज्ञानदेव म्हणतात–

हे सूर्याप्रमाणे सोज्वळ म्हणजे शुद्ध म्हणावे तर सूर्य अस्ताला जातो. हा त्याचा दोष आहे. पण हे सदैव परोपकारासाठी तत्पर असतात. मेघ उदार म्हणावा खरा पण तो पाऊस पाडून ओसरून जातो. हा त्याचा दोष होय पण संत हे कधीही लोकांची दु:खे कमी करण्यासाठी कमी पडत नाहीत. या संतांच्या तोंडी सदैव माझ्या (परमेश्वराच्या) नामाचा घोष चालू असतो. त्यामुळे भगवंत म्हणतात, 'एक वेळ मी वैकुंठात सापडणार नाही किंवा सूर्यबिंबातही माझे अस्तित्व असणार नाही आणि माझ्या ध्यानामध्ये समाधी लावून बसणाऱ्या योग्यांच्याही मनाला ओलांडून मी धावत जाईन. पण या सर्व ठिकाणी जरी मी नसलो, तरी एका ठिकाणी मी अवश्य असेन आणि ते ठिकाण म्हणजे जेथे माझा नामघोष 'कृष्ण विष्णू हरि, गोविंद' असा चालू असेल तेथेच मी असतो. जेथे माझ्या गुणांचे गान, कीर्तन, सतत चालू असते तेथे मी असतो. ज्याप्रमाणे वस्त्रामध्ये केवळ एकच तंतू सर्वत्र फिरलेला असतो, तसे या सृष्टीत माझ्यावाचून अन्य काहीच नाही असे मानतात आणि त्यामुळे साहजिकच प्रत्येक वस्तुमात्राविषयी त्यांच्या ठिकाणी आदर असतो. त्या सर्व वस्तू त्यांना वंदनीय असतात. मग त्या वस्तू कशाही म्हणजे श्रेष्ठ-कनिष्ठ, हलक्या-भारी, उपयोगी-निरुपयोगी असल्या तरी त्यांना त्या सारख्याच वाटतात. अगर्वता, विनय, दया, क्षमा, प्रेमभाव हा त्यांचा स्वभावच होऊन बसलेला असतो.

याला दृष्टान्त म्हणून एक आठवते– पैठणात एक दंडवतस्वामी होते. ते सर्वांठायी परमेश्वराचे रूप पाहात आणि त्यामुळे दिसेल त्या प्राणिमात्रांना दिसेल तेथे ते साष्टांग दंडवत घालत. त्यामुळे त्यांना दंडवतस्वामी म्हणत. एकदा एक गाढव गोदावरीच्या वाळवंटात मरून पडलेले होते. टवाळखोर नाहीत असे गाव सापडणे मुश्किल. त्याप्रमाणे पैठणातही टवाळखोर लोक होते. तेथे कुचरकट्टा म्हणून प्रसिद्धच होता. तेथे टवाळखोर बसत व येणाऱ्या-जाणाऱ्याची टवाळी करत. ते टवाळखोर गोदावरीवरून स्नान करून येत होते. त्यांनी ते मेलेले गाढव पाहिले. त्याच वेळी त्या टवाळखोरांना दंडवतस्वामी दिसले. त्यांनी दंडवतस्वामींना सांगितले, 'अहो! स्वामी! हे पाहा तुमचे परब्रह्म इथे झोपलेले आहे!' आणि हे ऐकताच स्वामींनी त्या मेलेल्या गाढवाला दंडवत घातले व चालू लागले. पण मागे ते गाढव मात्र जिवंत झाले व उठून चालू लागले. ते पाहून त्या टवाळखोरांचे डोळे विस्फारले गेले. ही बातमी संत एकनाथांपर्यंत गेली. त्यांनी दंडवतस्वामींना बोलावून घेतले व सांगितले की, 'तुम्ही जे काही केले त्याने

तुम्हाला पुढे त्रास होईल, लोक तुम्हाला मेलेली माणसे उठवावयास सांगतील. तर तुम्ही आता समाधी घ्या?' आणि दंडवतस्वामींचा अधिकार असा होता की त्यांनी संत एकनाथांच्या समोर समाधी लावली व प्राणत्याग केला. असो-

संत तुलसीदासांनाही सर्वांभूती परमेश्वराची अनुभूती आलेली आहे. ते म्हणतात-

*जड चेतन जग जीव जत सकल राममय जानि।*
*बंदउँ सब के पदकमल सदा जो रि जुगपानि॥*

(सोपान १०, तु. रामायण).

अर्थ – जगात जेवढे म्हणून जड-चेतन प्राणिमात्रे आहेत, ते सर्व राममय समजून त्या सर्वांच्या पदकमलांना करद्वय जोडून मी वंदन करतो.

सर्व वस्तुमात्रांत भगवंताचे रूप पाहणाऱ्या प्रल्हादाच्या भक्तीने खांबातून नृसिंहरूप प्रकट झाले. नामदेवाला कोरडी पोळी खाणारा कुत्रा हे विठ्ठलाचे रूप दिसले. कोरडी पोळी खाऊन त्याचे पोट दुखू नये म्हणून त्याच्या मागे तुपाची वाटी घेऊन धावणारे नामदेव. त्याच प्रकारची श्रद्धा असणारे तुलसीदास ग्रंथारंभीच्या स्तवनामध्ये सर्वांभूती असलेल्या प्राणिमात्रांना राममय समजून दोन्ही हात जोडून विनम्रपणे नमस्कार करत आहेत व ग्रंथाचे काम शेवटास जावे ही मनोमन प्रार्थना करतात.

जड व चेतन वस्तुमात्रांत परमेश्वराचे स्वरूप मानणे हा जसा भक्तिभाव असतो तसा तो विनम्रभावही असतो. श्रेष्ठ-कनिष्ठ, उच्च-नीच असल्या कोणत्याही प्रकारच्या द्वैताला, भेदभावाला तेथे जागा नसते. एवढेच नव्हे तर सर्वांविषयी आदर व श्रेष्ठपणाची भावना असून स्वतःकडे कमीपणा घेणे हेही मोठेपणाचे लक्षण असते, संतपणाचे लक्षण असते.

संत ज्ञानेश्वर आणखीही काही लक्षणे सांगत आहेत-

*'तरी रजाचेनि माजे। देही कर्माचे आणोजे। प्रवृत्ति जै घेईजे। वेटाळूनि॥ तै मीचि का कर्मठु। ऐसा नये श्रीमाठु। का दरिद्रलिये बुद्धि विटु। तोही नाही। अथवा सत्त्वेचि अधिके। जै सर्वेंद्रियी ज्ञान फाके। तै सुविद्यतातोखे। उभेजेही ना॥ का वाढिलेनि तमे। न गिळेजेचि मोह भ्रमे। तै अज्ञानत्वे न श्रमे। घेणेही नाही॥ तै मोहाच्या अवसरी। ज्ञानाची चाड न धरी। ज्ञाने कर्मे नादरी। होता न दुःखी॥ सांयप्रातर्मध्यान्हा। या तिही काळाची गणना। नाही जेवि तपना। तैसा असे॥ तया वेगळाचि काय प्रकाशे। ज्ञानित्व*

यावे असे । कायि जळार्णव पाऊसे । साजा होय ।। ना प्रवर्तलेनि कर्में । कर्मठत्व तया कां गमे ।। सांगे हिमवंतु हिमे । कापे कायि ।। ना तरि मोह आलिया । काई पां ज्ञाना मुकिजेल तया । हो मा आगीते उन्हाळेया । जाळवत असे ।। तैसे गुणकार्य हे । आघवेचि आपण आहे । म्हणौनि एकेका नोहो । ताडातोडी ।। येवढेया गा प्रतीती । तो देहा आलासे वस्ती । वाटे जाता गुति- । माजी जैसा ।। तो जिणता ना हारवी । तैसे गुण नव्हे ना करवी । जैसी का श्रोणवी । संग्रामीची ।। का शरीराआतील प्राणु । घरी आतिथ्याचा ब्राह्मणु । नाना चोहटाचा स्थाणु । उदासु जैसा ।। आणि गुणाचा यावाजावा । ढळे चळे ना पांडवा । मृगजळाचा हेलावा । मेरू जैसा ।। हे बहुत कायि बोलिजे । व्योम वारेनि न वचिजे । कां सूर्यु ना गिळीजे । अंधकारे ।। स्वप्न कां गा जियापरी । जगतयाते न सिंतरी । गुणी तैसा अवधारी । न बांधिजे तो । गुणांसि कीर नातुडे । परि दुरुनि जै पाहे कोडे । तै गुणदोष सायिखडे । सभ्यु जैसा ।। सत्त्वधर्म सात्त्विकी । रज ते रजोविषयकी । तम मोहादिकी । वर्तत असे ।। परि तयाचिया ना सत्ता । होती गुणक्रिया समस्ता । हे फुडे जाणे सविता । लौकिका जेवी ।। समुद्रचि भरती । सोमकांतची द्रवति । कुमुदे विकासती । चंद्रु तो उगा ।। कां वाराचि वाजे विझे । गगने निश्चळ असिजे । तैसा गुणाचिये गजबजे । डोलेना जो ।। अर्जुना येणे लक्षणे । तो गुणातीतु जाणणे । परिस आता आचरणे । तयाची जी ।। तरि वस्त्रासि पाठी पोटी । नाही सूतावाचूनि किरीटी । ऐसे सूये दिठी । चराचर मद्रुपे ।। म्हणोनि सुखदुःखासरिसे । कांटाळे आचरे ऐसे । रिपुभक्ता जैसे । हरीचे देणे ।। एऱ्हवी तरी सहजे । सुखदुःख तैचि सेविजे । देहजळी होईजे । मासोळी जै ।। आतां ते तंव तेणे सांडिले । आहे स्वस्वरूपेसीचि मांडिले । सस्यांती निवडले । बीज जैसे ।। का ओघ सांडुनि गांग । रिघोनि समुद्राचे आंग । निस्तरली लगबग । खळाळाची ।। तेवि आपणपांचि जया । वस्ती जाली गा धनंजया । तया देही अपैसया । सुख तैसे दुःख ।। रात्री तैसे पाहले । हे धारणा जेवि एक जाले । आत्मारामुदेही आतले । द्वंद्व तैसे ।। पै निद्रिताचेनि अंगेसी । साप तैशी उर्वशी । तेवि स्वरूपस्था सरिसी । देही द्वंद्वे ।। म्हणोनि तयाच्या ठायी । शेणा सोनया विशेष नाही । रत्ना गुंडेया कांही । नेणिजे भेदु ।। घरा येवो पां स्वर्ग । कां परिपडो वाघ । तरि आत्म बुद्धिसी भंग । कदा नोहे ।। निवडले न उपवडे । जळीनले न विरुढे । साम्यबुद्धि न मोडे । तयापरी ।। हा ब्रह्म ऐसेनि स्तविजो । कां नीच म्हणोनि निंदिजो । परि नेणे जळो विझो । राखोडी जैसी ।। तैसी निंदा आणि स्तुती । न ये कोण्हेचि व्यक्ती । नाही अंधारे कां वाती । सूर्याघरी ।। ईश्वर म्हणोनि पूजिला । कां चोरु म्हणोनि गांजिला । वृषगजी वेढिला । केला रावो ।। का सुहृद पासी आले । अथवा वैरी वरपडे जाले । परि नेणे राती पाहाले । तेज जेवी ।। साही ऋतु येतां आकाशे । लिंपिजेचि ना जैसे । तेवि वैषम्य मानसे । जाणिजेना ।। आणीकही येकु पाही । आचारु तयाच्या

*ठायी ।। तरि व्यापारासि नाही । जाले दिसे ।। सर्वारंभा उटकले । प्रवृत्तीचे तेथ मावळले । जळती गा कर्मफळे । ते तो आगी ।। दृष्टादृष्टचेनि नांवे । भावचि जीवी नुगवे । सेवीजे का स्वभावे । पैठे होय ।। सुखे ना शिणे । पाषाणु कां जेणे माने । तैसी सांडीमांडी मने । वर्जिली असे ।।'*

*(१४.३२७ ते ३६८ ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – जीवन्मुक्ताला परमेश्वरी साक्षात्कार झाल्यावरही त्याचे जीवन चालू असते. आणि जोपर्यंत जीवन चालू आहे, तोपर्यंत शरीरयात्रा चालवण्यासाठी कर्मे ही करावीच लागतात. जीवन्मुक्त ही दशा गुणातीत अवस्थाच असते. पण कर्माचरणाच्या वेळी कधी सात्त्विक, राजस वा तामसही गुणांचा उत्कर्ष होतो व त्याप्रमाणे कर्मे घडतात. पण अशा गुणांच्या उत्कर्षामुळे तो कधीही सुखी वा दुःखी झालेला नसतो. याला दृष्टान्त देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'समुद्राच्या पृष्ठभागावर कितीही मोठमोठ्या लाटा उत्पन्न झालेल्या दिसत असल्या, तरी त्याचा अंतर्भाग शांतच असतो किंवा कितीही पाऊस पडला तरी त्यामुळे समुद्राच्या पाण्यात काहीही भर पडली आहे असे होत नाही. तो तसा कायम समपातळीतच असतो किंवा कितीही कडक उन्हाळा आला म्हणून अग्नीला जाळू शकेल काय? तर शक्यच नाही. त्याउलट कितीही थंडी पडली तर हिमालयाला कधी कापरे भरेल काय? तसे एकदा जीवन्मुक्ताला गुणातीत अशी अवस्था प्राप्त झाली असता या वरवरच्या गुणांच्या उत्कर्षाने किंवा प्रक्षोभाने ती अवस्था कधी भंग पावत नाही किंवा त्याच्या ज्ञानाच्या अवस्थेला कधी बाधा येत नाही. या सर्व अवस्था तो साक्षीभूतपणे पाहात असतो. ज्याप्रमाणे मृगजळाचा पूर हा मेरू पर्वताला हलवू शकत नाही किंवा सूर्याला अंधकार गिळू शकत नाही. या दोन दृष्टान्तांवरून जीवन्मुक्ताच्या ठिकाणी त्रिगुणांचा उत्कर्ष किती नगण्य असतो हेच सिद्ध होते. समुद्रामध्ये शिरताना नदीची खळखळ शांत होते. समुद्र ती खळखळ स्वत:मध्ये सामावून घेऊनही शांत असतो. त्याप्रमाणे प्रक्षुब्ध गुणांचे विकार जीवन्मुक्त सहजपणे सामावून घेतो. त्याला सुखदु:ख हे विकार समानच वाटतात. झोपलेल्या पुरुषाजवळ जसे साप किंवा उर्वशी ही दोन्ही सारखीच असतात किंवा अज्ञानाला सोने व शेण वा दगड व रत्न यांची किंमत सारखीच असते, त्याप्रमाणे कोणत्याही परिस्थितीत त्याच्या

मनाची एकाग्रता भंग पावत नाही. त्यांची स्तुती करो वा निंदा करो, त्यांची ईश्वर म्हणून पूजा करो व चोर म्हणून त्यांना मार देवो त्यांच्या चित्ताची शांती कधीही ढळत नाही, असे जीवन्मुक्ताचे वागणे असते.

*'जया पुरुषाचे कां मन। सांडोनि गेले मोहमान। वर्षाती जैसे घन। आकाशाते॥ निकवड्या निष्ठुरा। उबगिजे जेवि सोयरा। तैसे नागविती विकारा। वेटांळू जे॥ फळली केळी उन्मळे। जैसी आत्मलाभे प्रबळे। जयांची क्रिया ढाळे ढाळे। गळती आहे॥ आगी लागलिया रुखी। देखोनि सैरा पळती पक्षी। तैसे सांडिले अशेखी। विकल्पीजे॥ आइके सकळ दोषतृणी। अंकुरजती जिये मेदिनी। तिये भेदबुद्धिची काहाणी। नाही जयाते॥ सूर्योदयासरिसी। रात्री पळोनि जाय अपैसी। गेली देह अहंता तैसी। अविद्येसवे॥ पै आयुष्यहीना जीवाते। शरीर सांडी जेवि अवचितें। तेवि निदसुरे द्वैते। सांडिले जे॥ लोहाचे साकडे परिसा। न जोडे अंधारु रवि जैसा। द्वैत बुद्धिचा तैसा। सदा दुकाळु जया॥ अगा सुखदुःखाकारे। द्वंद्वे देही जिये गोचरे। तिये जया कां समोरे। होतीचि ना॥ स्वप्नीचे राज्य का मरण। नोहे हर्षशोकासि कारण। उपवढलिया जाण। जियापरी॥ तैसे सुखदुःखरूपी। द्वंद्वी जे पुण्यपापी। न घोपिजती सर्पी। गरुड जैसे॥ आणि अनात्मवर्गुनीर। सांडुनि आत्मरसाचे क्षीर। चरतात्ति जे सविचार। राजहंस॥ जैसे वर्षोनि भूतळी। आपुला रसु अंशुमाळी। मागौत आणी राश्मिजाळी। बिंबासीचि॥ तैसे आत्मभ्रांतीसाठी। वस्तु विखुरली बारावाटी। ते एकवटिती ज्ञानदृष्टी। अखंड जे॥ किंबहुना आत्मयाचा। निर्धारी विवेकु जयाचां। बुडाला वोघु गंगेचा। सिंधुमाजी जैसा॥ पै आघवेचि आपुलेपणे। नुरेचि तया अभिलाषपणे। जैसे तेथुनि पऱ्हा जाणे। आकाशा नाही॥ जैसा अग्निचा डोंगरु। नेघे कोणी बीजे अंकरु। तैसा मनी जया विकारु। उदैजेना॥ जैसा काढिलिया मंदराचळू। राहे क्षीराब्धि निश्चळु। तैसा नुठी जया सळू। कामोर्मीचा॥ चंद्रमा कळी धाला। न दिसे कोणे अंगी वोसावला। तेवि अपेक्षेचा अवखळा। न पडे जया॥ हे किती बोलु असांगडे। जेवि परमाणु नुरे वायु पुढे। तैसे विषयाचे नावडे। नांवचि जया॥ एवं जे जे कोणी ऐसे। केले ज्ञानाग्नि हुताशे। ते तेथ मिळती जैसे। हेमीहेम॥ तेथ म्हणिजे कवणे ठायी। ऐसेहि पुससी कांही। तरि ते पद गा नाही। वेचु जया॥ दृष्यपणे देखिजे। कां ज्ञेयत्वे जाणिजे। अमुक ऐसे म्हणिजे। ते जे नव्हे॥'*

*(१५.२८५ ते ३०७ ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – केळी फळली म्हणजे किंवा केळीचा घड तयार झाला म्हणजे, केळी तोडून टाकतात व मग फणा काढून घेतात. म्हणजे तिचे जीवन सार्थकी लागले असे होते. कारण प्रत्येक केळीला एक घड येत असतो. तसे जीवन्मुक्ताच्या आयुष्यात आत्मसाक्षात्काराचा लाभ झाला म्हणजे त्याचे जीवनाचे सार्थक झाल्यासारखेच असते. त्यापेक्षा आणखी पुन्हा काही मिळवावयाचे शिल्लक राहिलेले नसते. त्यामुळे आत्मसाक्षात्कारापर्यंत ज्या ज्या उपासना चालू असतात, त्या हळूहळू बंद पडू लागतात. त्याच्या ठिकाणी ईश्वरप्राप्तीरूपी पूर्ण फळाची धारणा झालेली असते. त्यामुळे आशा, आकांशा, मोह हे सर्व मावळून गेलेले असतात. सृष्टीच्या विविधतेत दिसणारा भेद संपून गेलेला असतो. एवढेच काय पण स्वत:च्या देहभावाविषयीची भावनाही लोप पावलेली असते. जीवन्मुक्ताच्या सर्व वृत्ती त्यांनी आवरून घेतलेल्या असतात. अर्थात 'आवरून घेणे' ही प्रक्रिया होत नाही. कारण त्यात अहंभाव जागा असल्याचा भास होतो. म्हणून संत ज्ञानेश्वर एक सुरेख दृष्टान्त देतात. ते म्हणतात– 'सूर्याच्या उष्णतेमुळे ढग निर्माण होतात व पाऊस पडतो आणि ते पाणी सूर्य किरणांच्या उष्णतेने पुन्हा शोषून घेतो किंवा असाही अर्थ आणखीन काढता येतो, की सूर्य उदयाला येऊन चौफेर आपली किरणे पसरवून देतो व अस्ताला जाताना पुन्हा ती गोळा करून बिंबामध्ये सामावून घेतो. अशी स्वाभाविक प्रक्रिया जीवन्मुक्ताच्या ठिकाणी घडते. आत्मसाक्षात्कार होताच त्याच्या सर्व वृत्ती या आपोआपच त्याच्या ठिकाणी लय पावतात, त्यामुळे आत्मानंदाची जी स्थिती जीवन्मुक्ताला प्राप्त होते त्यात कधीही बिघाड होत नाही. आगीच्या डोंगरावर जसे कोणतेच बी अंकुरत नाही, तसे त्याच्या ठिकाणी कोणताच विकार डोके वर काढत नाही. अशा स्थितीत प्रारब्धाप्रमाणे ज्या वेळी आयुष्याची मर्यादा संपते, त्या वेळी त्या जीवन्मुक्ताचा आत्मा, परमेश्वराशी मिळून जातो. याला दृष्टान्त देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'ज्याप्रमाणे शुद्ध सोन्यामध्ये शुद्ध सोने मिळून जाते तसे, असे एकरूप झाल्यावर ते सोने जसे वेगळे काढता येत नाही तसे या जीवन्मुक्ताच्या आत्म्याला पुन्हा जन्म नाही.' ती जी अवस्था आहे ती शब्दाने सांगता येत नाही. सिद्धांच्या देहव्यापाराविषयी विवेचन करताना संत एकनाथ भागवतामधे सांगतात– 'देहाचे व्यापार ज्याचे ज्याप्रमाणे दैव असते त्याप्रमाणे चालतात. त्याप्रमाणे या सिद्धांचाही देह जन्माला आल्याबरोबर मागील जन्माच्या कर्माची जी शिदोरी बरोबर आणलेली असते तिच्यानुसार प्राण व इंद्रिये यांसह जिवंत राहतो. समाधीपर्यंत त्याचा अभ्यास पूर्ण झाला आहे आणि त्यामुळे

ज्याने ब्रह्मस्वरूप आत्मसात करून घेतले आहे असा ज्ञानी पुरुष स्वप्नाप्रमाणे असलेले हे दृश्य जग आणि त्यातील विषय यावर कधीही आसक्त होत नाही.

*विवरण – 'निरभिमान निरवधी । त्या नांव अखंड समाधी । परी काष्ठाते त्रिशुद्धी । नव्हे समाधी सर्वथा ।। सर्व संकल्पाची अवधी । त्या नांव निर्विकल्प समाधी । सकळ शास्त्र हेचि प्रतिपादी । समाधी त्रिशुद्धी या नांव । स्वस्वरूप देखता प्रथमदृष्टी । न संवरतु विस्मयो उठी । तोहि जीरवुनिया पोटी । दशा जे उठी ते समाधी ।। नि:शेषकल्पना जेथ विरे । तेथ विस्मयो कोठे स्फूरे । सूक्ष्म कल्पना थावरे । तेणे वोसरे विस्मयो ।। जेथ साचार ब्रह्मप्राप्ति होये । तेथे देहचि स्फुरो न लाहे । तेव्हा तटस्थ की चालताहे । हे देखणे होय पुढीलांचे ।। एवं देहचि तेथ मिथ्यापणे । त्याची कवण लक्षी लक्षणे । हो कां मृगजळाचेनि नाहाणे । जेवी कां निवणे सज्ञानी ।। तैशी साचार वस्तुप्राप्ति । तो नातळे देहस्थिती । तरी देह वर्ते कोणे रिती । तो प्रारब्ध गतीचेनि शेषे ।। स्थंडिली अग्नि विझोनि जाये । तरी भूमिये उष्णता राहे । कपूर सरल्याही पाहे । सुवासो आहे ते देशी ।। पाळणा हालेविता वोसरे । तरी तो हाले पूर्व संस्कारे । तेवी अविद्यानाशे प्रारब्धे उरे । तेणे देहो वावरे मुक्तांचा ।। हेतुवीण अनायासे । पुरुषासवे छाया असे । तेवी सज्ञानासरिसे । देह दिसे मिथ्यात्वे ।। जैसे गळितपत्र वारेनि चळे । तैसे देह वर्ते प्राचिन मेळे । परी देहकर्मचेनि विटाळे । ज्ञाता न मैळे निजबोधे ।। त्या प्रारब्धाच्या पोटी । सांगो सकळ जगेसी गोठी । कां धरोनि मौनाची मिठी । गिरिकपाटी पडो सुखे ।। तो आचरो सकळ कर्मे । अथवा पिसा हो कां निजभ्रमे । तेणे तेणे अनुक्रमे । जाण परिणामे प्रारब्धे ।। तो चढो पालखी गजस्कंधी । का विष्ठामूत्र संधी । ते ते पारब्धाची सिद्धि । जाण त्रिशुद्धी ज्ञात्यासी ।। जेथ बाध्यबाधकता फिटली । सकळ अहं अविद्या तुटली । सहज समाधि त्या नांव झाली । हे संख्या केली सिद्धांती ।। त्यासी स्त्री म्हणे माझा भर्ता । पुत्र म्हणे माझा पिता । शिष्य म्हणे स्वामी तत्त्वतां । त्याहुनी परता त्यामाजी वर्ते ।। तो व्यवहारी दिसो जनीं । की पिसेपणी नाचो वनी । अथवा तटस्थ राहो विजनी । दशा अधिक उणी बोलू नये ।। तेवी पावोनि स्वरूप प्राप्ति । योगी प्रारब्धाच्या स्थिती । ना ना कर्मे करितां दिसती । परी निजात्म स्थिती भंगेना ।।'*

*(अ. १३, श्लो. ३७, ओवी ६६४ ते ७१३ निवडक ए. भा.).*

संत ज्ञानेश्वर जीवन्मुक्तांची आणखी काही लक्षणे सांगत आहेत.

*'तिये आत्मस्थितीचा रावो । मग तो देही इये जाणेल ठावो । काय प्रलयांबुचा उन्नावो । वोघु मानी । तैसी ते पूर्ण अहंता । का देहपणे पांडुसुता । आवरे काई सविता । बिंबे*

धरिला ॥ पै मथुनि लोणी घेपे । ते मागुती ताके घापे । तरी ते अलिप्तपणे सिंपे । तेणेसी काई ॥ नाना काष्ठौनि विरेशा । वेगळविलिया हुताशा । राहे काष्ठाचिया मांदुसा । कोंडलेपणे ॥ का रात्रीचिया उदरा आतुं । निगाला जो हा भास्वतु । तो रात्री ऐसी मातु । ऐके कायी ॥ तैसे वेद्य वेदकपणेसी । पडिले का जयाच्या ग्रासी । तया देह मी ऐसी । अहंता कैची ॥ आणि आकाशे जेथ जेथौनि । जाईजे तेथ असे भरोनी । म्हणोनि ठेले कोंदोनी । आपेआप ॥ तैसे जे तेणे करावे । ते तोंचि आहे स्वभावे । मा कोणे कर्मी वेष्टावे । कर्तेपणे ॥ नुरेचि गगनाविण ठावो । नोहेचि समुद्रा प्रवाहो । नुठीचि ध्रुवा जावो । तैसे जहाले ॥ ऐसेनि अहंकृतिभावो । जयाचा बोधी जाहला वावो । तऱ्ही देहां जव निर्वाहो । तंव आथी कर्मे ॥ वारा जरी वाजोनि वोसरे । तरी डोल रुखी उरे । कां सेंद्रे द्रुति राहे कापुरे । वेचलेनही ॥ का सरलेया गीताचा समारंभु । न वचे राहिलेपणाचा क्षोभु । भूमी लोळोनि गेलिया अंबु । वोल थोर ॥ अगा माळवलेनि अर्के । संध्याचिये भूमिके । ज्योतिदीप्ति कौतुके । दिसे जैसी ॥ पै लक्ष भेदिलियाही वरी । बाण धावेचि तंववरी । तंव भरली आथी उरी । बळाची तया ॥ नाना चाकी भांडे जाले । ते कुलाले परते नेले । परी भ्रमेचि ते मागिले । भवंडिलेपणे ॥ तैसा देहाभिमानु गेलिया । देह जेणे स्वभावे धनंजया । जाले ते अपैसया । चेष्टवीच ते ॥ संकल्पेवीण स्वप्न । न लाविता दांगीचे वन । न रचितां गंधर्वभुवन । उठी जैसे ॥ आत्मयाचेनि उद्यमेवीण । तैसे देहादि पंचकारण । होय आपणया आपण । क्रिया जात ॥ पै प्राचिन संस्कारवशे । पांचही कारण सहेतुके । कामविजती गा अनेके । कर्माकारे ॥ तया कर्मामाजी मग । संहारो आघवे जग । अथवा नवे चांग । आन करों ॥ परी कुमुद कैसेनि सुके । ते कमळ कैसे फांके । ही दोन्ही रवि न देखे । जयापरी ॥ कां वीजु वर्षोनि आभाळ । ठिकरिया आतो भूतळ । अथवा करु शाड्वळ । प्रसन्ना वृष्टि ॥ तरी तया दोहीते जैसे । नेणिजेचि कां आकाशे । तैसा देहीच जो असे । विदेही दृष्टी ॥ तो देहादिकी चेष्टी । घडतां मोडतां हे सृष्टी । न देखे स्वप्नदृष्टी । चेईला जैसा ॥ एऱ्हवी चामाचे डोळेवरी । जे देखती देहचिवरी । ते कीर तो व्यापारी । ऐसेचि मानती ॥ का तणाचा बाहुला । जो आगारेमेरे ठेविला । तो साचचि राखता कोल्हा । मनिजेना ॥ पिसे नेसले कां नागवे । हे लोके येऊनि जाणावे । ठाणोरियाचे मवावे । आणिकी घाय ॥ का महासतीचे भोग । देखे कीर आघवे जग । परी ते आगी ना आंग । ना लोकु देखे ॥ तैसा स्वस्वरूपे उठिला । जो दृश्येसी दृष्टा आटला । तो नेणे काय राहटला । इंद्रियग्रामु ॥ अगा थोरी कल्लोळी कल्लोळ साने । लोपतां तिरीचेनि जने । एकी एक गिळिले हे मने । मानिजे जऱ्ही ॥ तऱ्ही उदकाप्रति पाही । कोण ग्रासितसे काई । तैसा पूर्णा दुजे नाही । जे तो मारी ॥ सुवर्णाचिया चंडिका । सुवर्णशूळेचि देखा । सुवर्णाचिया महिखा । नाशु केला ॥ तो

देवलवसिया कडा । व्यवहारु गमला फुडा । वाचूनि शूळ महिष चामुंडा । सुवर्णचि ते ॥ पै चित्रिचे जळ हुताशु । तो दृष्टीचाचि आभासु । परी आगी वोलांशु । दोन्ही नाही ॥ मुक्ताचे देह तैसे । हालत संस्कार वशे । ते न देखोनि लोक पिसे । कर्ता म्हणती ॥ आणि तया कारणेयाआंतु । घडो तिही लोकां घातु । परी तेणे केला हे मातु । बोलो नये ॥ अगा अंधारुचि देखावा तेजे । मग तो फेडिजे हे बोलिजे । तैसे ज्ञानिया नाही दुजे । जे तो मारील ॥ म्हणोनि तयाची बुद्धि । नेणे पापपुण्याची गंधी । गंगा मीनलिया नदी । विटाळू जैसा ॥ आगीसी आगी झगडलीया । काय पोळे धनंजया । की शस्त्ररूपे आपणया । आपणचि ॥ तैसे आपणपयापरौते । जो नेणे क्रियाजाताते । तेथ काय लिंपवी बुद्धिते । तयाचिये ॥ म्हणोनि कार्य कर्ता किया । हे स्वरूपचि जाहले जया । नाही शरीरादिकी तया । कर्मी बंधु ॥'

(१८.४१३ ते ४५३ ज्ञानेश्वरी).

'तरी देहादिक हे संसारे । सर्वही मांडलेसे गुंफिरे । तेथ नातुडे तो वागुरे । वारा जैसा ॥ पै परिपाकाचिये वेळे । फळ देठे ना देठु फळे । न धरे तैसे स्नेह खुळे । सर्वत्र होय ॥ पुत्र वित्त कलत्र । हे जालियाही स्वतंत्र । माझे न म्हणे पात्र । विषाचे जैसे ॥ हे असो विषयजाती । बुद्धि पोळली ऐसी माघौती । पाऊले घेऊनि एकांती । हृदयाचां रिगे ॥ ऐसया अंत:करण । बाह्य येता तयाची आण । न मोडी समर्था भेण । दासी जैसी ॥ तैसे ऐक्याचिये मुठी- । माजिवडे चित्त किरीटी । करुनि वेधी नेहटी । आत्मयाचा ॥ तेव्हा दृष्टादृष्टस्पृहे । निमणे जालेचि आहे । आगी दडपलिया धुये । राहिजे जैसे ॥ म्हणोनि नियमिलिया मानसी । स्पृहा नासोनि जाय आपैसी । किंबहुना तो ऐसी । भूमिका पावे ॥ पै अन्यथाबोधु आघवा । मावळोनि तया पांडवा । बोधमात्रीची जीवा । ठावो होय ॥ धरवणी वेचे सरे । तैसे भोगे प्राचिन पुरे । नवे तव नुपकरे । कांहीचि करू ॥ ऐशी कर्मसाम्य दशा । होय तेथ विरेशा । मग श्रीगुरु आपैसा । भेटेचि गा ॥ रात्रीची चौपाहरी । वेचलिया अवधारी । डोळ्या तमारी । मिळे जैसा ॥ का येऊनि फळाचा घडु । पारुषवी केळीची वाढु । श्रीगुरु भेटोनि करी पाडु । मुमुक्षु तैसा ॥ मग आलिंगला पुर्णिमा । जैसा उणीव सांडी चंद्रमा । तैसे होय वीरोत्तमा । गुरुकृपा तया ॥ तेव्हा अबोधुमात्र असे । तो तंव तया कृपा नासे । तेथे निशीसवे जैसे । आंधारे जाय ॥ तैसी अबोधाचिये कुशी । कर्म कर्ता कार्य ऐशी ॥ त्रिपुटी असे ते जैशी । गाभिणी मारिली ॥ तैसे अबोधनाशासवे । नाशे क्रियाजात आघवे । ऐसा समूळ संभवे । संन्यासु हा ॥ येणे समूळाज्ञानसंन्यासे । दृष्याचा जेथ ठावो पुसे । तेथ बुझावे ते आपैसे । तोचि आहे ॥ चेईलियावरी पाही । स्वप्नीचिया तिये डोही । आपणयाते काई । काढू जाईजे ॥ तै मी

नेणे आतां जाणेन। हे सरले तया दुःस्वप्न। जाला ज्ञातृज्ञेयाविहिन। चिदाकाश॥ मुखाभासेसी आरिसा। परौता नेलिया विरेशा॥ पाहातेपणेवीण जैसा। पाहाता ठाके॥ तैसे नेणेणे जे गेले। तेणे जाणणेही नेले। मग निष्क्रिय उरले। चिन्मात्रचि॥ तेथ स्वभावे धनंजया। नाही कोणीचि क्रिया। म्हणोनि प्रवादु तया। नैष्कर्म्यु ऐसा॥ ते आपुले आपणपे। असे तेचि होऊनि हारपे। तरंगु का वायु लोपे। समुद्र जैसा॥ तैसे न होणे निफजे। ते नैष्कर्म्यसिद्धि जाणिजे। सर्वसिद्धित सहजे। परम हेचि॥ देऊळाचिया कामा कळसु। उपरम गंगेसी सिंधुप्रवेशु। कां सुवर्णशुद्धि कसु। सोळावा जैसा॥ तैसे आपुले नेणणे। फेडिजे कां जाणणे। तेही गिळूनि असणे। ऐसी जे दशा॥ तिये परते कांही। निपजणे आन नाही। म्हणोनि म्हणिपे पाही। परमसिद्धिते॥'

(१८.९५६ ते ९८३ ज्ञानेश्वरी).

'तयापरी थडथांद। साध्यसाधनातीत शुद्ध। ते मी होऊनि एकवद। भोगितो माते॥ घडोनि सिंधुचिया आंगा। सिंधुवरी तळपे गंगा। तैसा पाडु तया भोगा। अवधारिजो॥ कां आरिसयासि आरिसा। उटूनि दाविलिया जैसा। देखणा अतिशयो तैसा। भोगणा तिये॥ हे असो दर्पणु नेलिया। तो मुख बोधुही गेलिया। देखलेपण एकलेया। आस्वादिजे जेवी॥ चेइलया स्वप्ननाशे। आपले ऐक्यचि दिसे। ते दुजेनवीण जैसे। भोगिजे कां॥ तरंग सर्वांगी तोय चुंबी। प्रभा सर्वत्र विलसे बिंबी। ना ना आकाश नभी। लुंठतु जैसा॥ तैसा रुप होऊनि माझे। माते क्रियाविण जो भजे। अलंकारु कां सहजे। सोनयाते जेवी॥ का चंदनाची द्रुती जैसी। चंदनी भजे अपैसी। का अकृत्रिम शशी। चंद्रिका ते॥ तैसी क्रिया कीर न साहे। तऱ्ही अद्वैती भक्ति आहे। हे अनुभवाचिजोगे नव्हे। बोला ऐसे॥ तेंव्हा पूर्व संस्कार छंदे। जे कांही तो अनुवादे। तेणे आळविलेनि वो दे। बोलता मीचि॥ बोलतया बोलताचि भेटे। तेथे बोलले हे न घटे। ते मौन तंव गोमटे। स्तवन माझे॥ म्हणोनि तया बोलतां॥ बोली बोलता मी भेटतां। मौन होय तेणे तत्वतां। स्तवितो माते॥ तैसेचि बुद्धि कां दिठी। जे तो देखो जाय किरीटी। ते देखणे दृष्य लोटी। देखतेचि दावी॥ आरसिया आधी जैसे। देखतेचि मुख दिसे। तयाचे देखणे तैसे। मेळवी दृष्टे॥ दृष्य जाऊनिया द्रष्टे। द्रष्ट्यासीचि जै भेटे। तै एकलेपणे न घटे। द्रष्टेपणही॥ तेथ स्वप्नीचिया प्रिया। चेवोनि झोंबो गेलिया। ठायि जे दोन्ही न होनिया। आपणची जैसे॥ कां दोही काष्ठाचिये धृष्टि। माजी वन्हि येक उठी। तो दोन्ही हे भाष आटी। आपणचि होय॥ ना ना प्रतिबिंब हाती। घेऊ गेलिया गभस्ती। बिंबताही असती। जाय जैसी॥ तैसा मी होऊनी देखते। तो घेऊ जाय दृष्यातें। तेथ दृष्य ने तिथे। दृष्टत्वेसी॥ रवि आंधारु प्रकाशिता। नुरेचि जेवि

प्रकाश्यता । तेवि दृश्यी नाही दृश्यता । मी जालिया ।। मग देखिजे ना न देखिजे । ऐसी जे दशा निपजे । ते ते दर्शन माझे । साचोकारे ।। ते भलतयाही किरीटी । पदार्थाचिया भेटी । दृष्टदृश्यातीता दृष्टी । भोगितो सदा ।। आणि आकाश हे आकाशे । दाटले न ढळे जैसे । मियां आत्मेन आपणपे तैसे । जाले तया ।। कल्पांती उदक उदके । रुंधिलिया वाहो ठाके । तैसा आत्मेनि मिया येके । कोंदला तो ।। पावो आपणपयां वोळघे । केवि वन्ही आपणपया लागे । आपणपां पाणी रिघे । स्नाना कैसे ।। म्हणौनि सर्व मी जालेपणे । ठेले तया येणे जाणे । तेचि गा यात्रा करणे । अद्वया मज ।। पै जळावरील तरंगु । जरी धावित्रला सवेगु । तरी नाही भूमिभागु । क्रमिला तेणे ।। जे सांडावे का मांडावे । जे चालणे जेणे चालावे । ते तोयचि एक आघवे । म्हणोनिया ।। गेलियाही भेलतेऊता । उदकपणे पांडुसुता । तरंगाची एकात्मका । न मोडेचि जेवि ।। तैसा मीपणे हा लोटला । तो आघवेयाचि मजआतु आला । या यात्रा होय भला । कापडी माझा ।। आणि शरीरस्वभाववशे । कांही येक करुं जरी बैसे । तरी मीचि तो तेणे मिषे । भेटे तया ।। तेथ कर्म आणि कर्ता । हे जाऊनि पांडुसुता ।। मिया आत्मेनि मज पाहतां । मीचि होय ।। पै दर्पणाते दर्पणे । पाहिलिया होय न पाहणे ।। सोने झाकिलिया सुवर्णे । न झाके जेवी ।। दीपाते दीपे प्रकाशिजे । ते न प्रकाशिणेचि निपजे । तैसे कर्म मियां कीजे । ते करणे कैचे ।। कर्महीं करितचि आहे । जै करावे हे भाष जाये । तै न करणेचि होये । तयाचे केले ।। क्रियाजात मी जालेपणे । घडे कांहीचि न करणे । तयाचि नांव पुजणे । खुणेचे माझे ।। म्हणोनि करीतयाही वोजा । ते न करणे हेचि कपिध्वजा । निफजे तिया महापूजा । पूजी तो माते ।। एवं तो बोले ते स्तवन । तो देखे तो दर्शन । अद्वया मज गमन । तो चाले तेचि ।। तो करी तेतुली पूजा । तो कल्पि तो जपू माझा । तो असे तेचि कपिध्वजा । समाधि माझी ।। जैसे कनकेसी कांकणे । असिजे अनन्यपणे । तो भक्तियोगे येणे । मजसी तैसा ।। उदकी कल्लोळु । कापुरी परिमळु । रत्नी उजाळु । अनन्यु जैसा ।। किंबहुना तंतूसी पटु । कां मृत्तिकेसी घटु । तैसा तो एकवटु । मजसी माझा ।। इया अनन्यसिद्धा भक्ति । या आघव्याचि दृष्यजाती । मज आपणपेया सुमति ।

*दृष्याते जाणे ॥ तिन्ही अवस्थाचेनि द्वारे । उपाध्युपहिताकारे । भावरुप स्फुरे । दृष्य जे हे ॥ ते हे आघवेचि मी द्रष्टा । ऐसिया बोधाचा माजिवटा । अनुभवाचा सुभटा । धेंडा तो नाचे ॥'*

*(१८.११३७ ते ११८७ ज्ञानेश्वरी).*

*'तैसे जे कांही आथी नाथी । येणे होय ज्ञेयस्फूर्ति । ते ज्ञाताचि मी हे प्रतीति । होऊनि भोगी ॥ जाणे अजु मी अमरु । अक्षयो मी अक्षरु । अपूर्वु मी अपारु । आनंदु मी ॥ अचळु मी अच्युतु । अनंतु मी अद्वैतु । आद्यु मी व्यक्तु । व्यक्तुही मी ॥ ईश्यु मी ईश्वरु । अनादि मी अजरु । अभय मी आधारु । आधेय मी ॥ स्वामी मी सदोदितु । सहज मी सततु । सर्व मी सर्वगतु । सर्वातीतु मी ॥ नवा मी पुराणु । शून्य मी संपूर्णु । स्थुल अणु । जे कांही ते मी ॥ अक्रियु मी येकु । असंगु मी अशोकु । व्याप्यु मी व्यापकु । परुषोत्तमु मी ॥ अशब्दु मी अश्रोत्रु । अरुपु मी अगोत्रु । समु मी स्वतंत्रु । ब्रह्म मी परु ॥ ऐसे आत्मत्वे मज एकाते । इया अद्वयभक्ती जाणोनि निरुते । आणि याही बोधा जाणते । तेही मीचि जाणे ॥'*

*(१८.११९२ ते १२०० ज्ञानेश्वरी).*

भावार्थ – आत्मस्थिती प्राप्त झालेला, जीवन्मुक्त दशेला आलेला या संसारापासून कसा अलिप्त असतो, तो संसारात राहून, सभोवताली सारे विषय असूनही तो कसा अलिप्त असतो, याविषयी दृष्टान्त देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'ज्याप्रमाणे ताक घुसळून लोणी काढावे व पुन्हा ताकात ठेवून द्यावे, ते काही पुन्हा ताकात मिसळून जात नाही; तसा हा आत्मस्थिती प्राप्त झालेला संसारापासून अलिप्त असतो. रात्रीच्या उदरातून वर आलेला सूर्य जसा अंधाराने काळवंडून जात नाही, तर त्या अंधारापासून अलिप्त असतो. मुक्ताला कोठे जाणे नसते. काही मिळवणे नसते. असे त्याचे जीवन असते. ज्याप्रमाणे संकल्पाशिवाय स्वप्ने पडत असतात किंवा न लावताच रानातील झुडपे उगवत, वाढत असतात किंवा आकाशात कोणीही काहीही न करता ढगांचे आकार सारखे बदलत असतात, तशी जीवन्मुक्ताकडून स्वाभाविकपणे कर्मे घडत असतात. त्याच्या हातून घडणाऱ्या कर्मांमुळे सभोवताली त्याचे काय परिणाम होतात याची जीवन्मुक्तालाही दखल नसते. याला दृष्टान्त देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात– सूर्योदयाबरोबर कुमुद सुकून जाते तर कमळ विकास पावते. पण या प्रक्रियेची सूर्याला कल्पना नसते. आषाढात विजांच्या कडकडाटाने, वीज पडल्याने, भूतलावर काय पडझड होते किंवा पावसाचा वर्षाव होऊन सर्व जमिनीवर किती सुरेख हिरवळ उत्पन्न

होते, याची आभाळाला कल्पना नसते. तशी जीवन्मुक्ताच्या देहाकडून घडणाऱ्या कर्मामुळे विदेह दृष्टी असलेल्या त्याला काय घडते याची कल्पना येत नाही. जगाने त्याच्या जीवनाकडे, घडणाऱ्या कर्माकडे पाहावे आणि काय ते ठरवावे. जीवन्मुक्ताला त्याची काहीच जाणीव नसते, पर्वा नसते. त्याचा देह संस्काराप्रमाणे हलत असतो आणि लोक त्याचा अर्थ त्यांच्या त्यांच्या दृष्टीने लावत असतात. संत ज्ञानदेव याला दृष्टान्त देताना म्हणतात– 'सागरात उठणाऱ्या लाटा या लहान-मोठ्या असतात. तीरावर उभी असलेली माणसे तो खेळ पाहात असतात. तेव्हा ते म्हणतात की मोठ्या लाटेने लहान लाटेला गिळले. वास्तविक पाहता लहान-मोठी लाट ह्या पाणीपणाने एकच असतात. त्यात कोणी कोणाला गिळले हा व्यवहारच होत नाही. देवळामध्ये सुवर्णाची चामुंडादेवीची मूर्ती असते, तिच्या हातात शूल हासुद्धा सोन्याचा असतो व तिने पायाखाली दाबून महिषासुराला मारलेले असते. तो महिषासुरसुद्धा सोन्याचाच असतो. यामध्ये सर्व काही एक सुवर्णच असते त्यात कोणी कोणाला मारले हा व्यवहार होत नाही. चित्रामधील आग व पाणी यांच्या ठिकाणी ना उष्णता असते ना ओलावा असतो. अशा प्रकारे स्वाभाविक हालचालीत जी कर्मे घडतील, ती चांगली वा वाईट याची कल्पना जीवन्मुक्ताला नसते आणि त्या चांगल्या-वाईट कर्मापासून जगाचे कल्याण होवो वा जगाचे नुकसान होवो, याविषयीचे पाप-पुण्य जीवन्मुक्ताला भोगावे लागत नाही. कारण काही चांगले-वाईट घडावे असा त्याचा हेतू, उद्देशच नसतो. अशा प्रकारचे अलिप्तत्व त्याला प्राप्त होते. पिकलेले फळ हे देठाला धरून ठेवू शकत नाही. ते देठापासून अलग होतेच किंवा देठही फळाला धरून ठेवू शकत नाही. तसे या संसारातील वस्तूंमधील बायको, मुले, घरदार, जमीन, जुमला यांविषयी जीवन्मुक्ताला ममत्व राहात नाही. त्याला अशाच वेळी सद्‌गुरूची प्राप्ती होते. त्याच्या सर्व त्रिपुट्या भोक्ता, भोग, भोग्य वस्तू, द्रष्टा, दृश्य व दर्शन, क्रिया, कर्म व कर्ता लयाला जातात. ज्या वेळी त्याला पूर्ण वैराग्य प्राप्त झालेले असते त्याच वेळी त्याला ज्ञानाची प्राप्ती होते आणि ज्ञानप्राप्तीनंतर त्याच्या ठिकाणी संसाराविषयी संन्यस्त वृत्ती तयार होते. अशा वेळीच परमेश्वरी साक्षात्कार होतो. हीच नैष्कर्म्य स्थिती, हीच परमसिद्धी होय. या अवस्थेला दृष्टान्त देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात– गंगेच्या प्रवासाचा शेवट सागराला मिळण्याने होतो. सोन्याच्या शुद्धतेत कस सोळावा असतो. तसे आपले देहभावाचे विस्मरण आणि जाणावयाच्या सीमेपाशी 'भगवंताचे जाणणे' येऊन थांबते. या सर्व जाणण्याच्या क्रियांचा जो शेवट तीच परमसिद्धी होय.

अशा प्रकारे जन्मोजन्मीच्या सततच्या निष्ठेने चालवलेल्या साधनाचे फळ त्याला मिळालेले असते. आता तो केवळ आत्मानंदाचाच उपभोग घेत असतो. या अवस्थेचे वर्णन करताना संत ज्ञानेश्वरांनी दिलेले दृष्टान्त–

सागराच्या पोटात शिरताना गंगेचे पाणी सागरावर तरंगल्याचा भास होतो किंवा दोन आरसे एकमेकाकडे तोंड करून ठेवले म्हणजे कोणचे प्रतिबिंब कोणात पडले आहे, असे विचार करता त्याच्या बिंबाची व प्रतिबिंबांची रांगच लागते किंवा मुखाचे दर्शन घेण्यासाठी आरसा पुढे करावा आणि आपणच आपल्या दर्शनाचा आनंद घ्यावा आणि तो आरसा बाजूला केल्यावर काय आपणही नाहीसे होतो काय? तर नाही. आपण आपल्या ठिकाणीच असतो. तसेच ते अद्वैतपण जीवन्मुक्तांचे असते. सूर्य-चंद्रबिंबामध्ये सर्वत्र प्रकाश असतो, आकाशात सर्वत्र अवकाशच असते. अलंकारात सर्वत्र सोनेच असते. चंदनामध्ये सर्वत्र सुगंधच भरलेला असतो. हा प्रकार केवळ अनुभवण्याजोगा असतो. त्याचे शब्दांत वर्णन करणे केवळ अवघड असते. म्हणून संत ज्ञानेश्वरांच्या सिद्धहस्ते जे वर्णन उतरले ते त्यांच्या मूळ शब्दांतूनच वाचावे म्हणून एवढा विस्तार केला आहे. असो.

त्याचप्रमाणे संत रामदासस्वामी यांनीही साधूची म्हणजे जीवन्मुक्ताची लक्षणे सांगितली आहेत. त्यातून जीवन्मुक्ताची लक्षणे, आणखीन स्पष्ट होईल.

*'जो जो ज्ञाने गुप्त झाला। जो विवेके विराला। जो अनन्यपणे उरला। नाहीच कांही ॥ तयास कैसे गवसावे। शोधु जाता तोचि व्हावे। तो चि होता म्हणावे। न लगे कांही ॥ दिसतो तरी देहधारी। परी कांही च नाही अंतरी। तयास पांहता वरिवरि। कळेल कैसा ॥ कळाया शोधावे अंतर। तंव तो नित्य निरंतर। जयास धुंडिता विकार। निर्विकार होती ॥ तो परमात्मा केवळ। तयास नाही माया मळ। अखंड हेतुचा विटाळ। जालाच नाही ॥ ऐसा जो कां योगीराज। तो आत्मा सहजी सहज। पूर्ण ब्रह्म वदे बीज। देहाकारे कळेना ॥ ज्ञानी तो सत्यस्वरूप। अज्ञान देखे मनुष्यरुप। भावासारिखा फलद्रुप। देव तैसा ॥ तैसा साधू आत्मज्ञानी। बोधे पूर्ण समाधानी। विवेके आत्मनिवेदनी। आत्मरुपी। बीज भाजले उगवेना। वस्त्र जळाले उकलेना। वोघ निवडिता निवडेना। गंगेमध्ये ॥ वोघ गंगेमागे दिसे। गंगा येकदेशी असे। साधु कांहीच न भासे। आणि आत्मा सर्वगत ॥'*

*(दशक ९, समास ३, निवडक ओव्या).*

## जीवन्मुक्ताला काहीच कर्तव्ये नसतात

नदी जोपर्यंत समुद्राला मिळालेली नसते, तोपर्यंत वाहात असते. समुद्राला जाऊन मिळणे हे तिचे ध्येय असते. ते साध्य झाल्यावर तिचा प्रवाह म्हणजे पुढे जाण्याचे कार्य थांबते. नदी समुद्राला मिळाली तरी काही अंतरापर्यंत तिचे अस्तित्व असते, जोर असतो. पुढे जरा खोल गेल्यावर तिचे स्वत:चे अस्तित्वही संपलेले असते. त्यामुळे तिचा प्रवाह तर थांबलेला असतो पण नाव, पाण्याचा गोडपणा हाही संपलेला असतो. पण समुद्राच्या मुखाशी आल्यावर तरी ती प्रवाहित असते काय? नाही. तिचे साध्य तिला प्राप्त झालेले असते. त्यात तिला पुढे जाणे राहिलेले नसते, तर मागील पाणी तिला पुढे ढकलून नेत असते. समुद्राच्या पोटात ढकलत असते. तसेच लग्न लागल्यावर स्त्री ही पतीची झालेली असते, पण रात्री तिच्या सख्या तिला तिच्या पतीच्या खोलीत ढकलून देतात व दार बंद करून घेतात. तसा आत्मसाक्षात्कार झालेला आहे, पण अजून जीवन शिल्लक आहे. फळ परिपक्व झालेले आहे. पण अजून देठापासून सुटलेले नाही, कुंभाराने मातीचा घडा पूर्ण करून काढून घेतला आहे, पण चक्राची गती अजून थांबलेली नाही. ही मधली अवस्था जीवन्मुक्त, विदेही, आत्मतुष्ट पुरुषाची असते.

जीवन्मुक्त, विदेही, आत्मतुष्ट या शब्दांचे अर्थ तसे सारखेच आहेत. प्रत्येक प्राणिमात्राचे, मनुष्यमात्राचे जीवन हे अपूर्ण, अतृप्त वासनांचे, इच्छेचे, संकल्पाचे फळ आहे. त्यामुळे पुन्हा नव्या देहात आल्याबरोबर त्या पुऱ्या करण्याकडे त्याचे लक्ष असते व त्यासाठीच तो जीवनभर धडपडत असतो. पण विषयामध्ये सुख नसून केवळ दु:खच आहे याची जाणीव होताच तो ईश्वरप्राप्तीच्या प्रयत्नाला लागतो. अनेक जन्म निष्ठेने उपासना करतो. यम, नियमांचे पालन करतो. ध्यान, धारणा, समाधीपर्यंत त्याची प्रगती होतो व एकदा त्याला आत्मसाक्षात्कार होतो व त्याचे जीवन परमेश्वरप्राप्तीच्या मुखाशी आलेले असते. पती परमेश्वराशी याचा विवाह झालेला असतो. परिपक्वतेची सीमा गाठलेली असते आणि आता त्याला जीवनात काहीच मिळवावयाचे राहिलेले नसते. कुंभाराच्या रिकाम्या चक्राप्रमाणे त्याचे जीवन कोणत्याही उद्देशाशिवाय, हेतूशिवाय चालू असते. जोपर्यंत प्रारब्धात त्याच्या जीवनाचा शेवटचा क्षण येत नाही, तोपर्यंत त्याला जगणे भाग असते. ती त्याची जीवन्मुक्त अवस्था होय.

सर्व उपाधींपेक्षा देहाची उपाधी ही फार महत्त्वाची उपाधी आहे. नाव, गाव, नोकरी, हुद्दा, पैसा, धन, दौलत, शेती, घरदार, घोडा, गाडी, पत्नी, मुले, घराणे,

अशा अनेक उपाध्या असतात. यांतील काही काही उपाध्या मनुष्य सोडू शकतो. कदाचित सर्वही उपाधी टाकून देऊ शकतो. पण शरीर टाकता येत नाही. देहाच्या उपाधींमध्ये रूप, सौंदर्य, सौष्ठव, तसेच रोग, दुखणी या उपाधी तर मनुष्याला क्षणभरसुद्धा स्वस्थ बसू देत नाहीत. यालाच देहभाव म्हणतात. या देहभावातून सुटणे फारच अवघड असते. पण ज्यांनी आपले जीवन तसाच देहसुद्धा ईश्वरार्पण केला आहे, ते या देहाच्या उपाधीकडेही लक्ष देत नाहीत. नव्हे त्यांच्या ते लक्षातही येत नाही. त्यांना तहान, भूकही लक्षात राहात नाही, तर सुख-दुःख, रूप, सौंदर्य वगैरे गोष्टी कशा लक्षात राहतील? याला विदेही अवस्था म्हणतात.

आपण सारे सुखासाठीच धडपड असतो. कारण आपण कायमच असंतुष्ट असतो. जो जो सुख मिळेल, तो तो अधिकाधिक सुखाची इच्छा वाढत जाते व ते मिळवण्यासाठी अधिकाधिक कष्ट करणेही चालू असते आणि अशी धडपड जन्मोजन्मी चालू असते. पण सुखसमाधान काही मिळत नाही. पण सुख हे बाह्य विषयात नाही तर ते सुख अंतरीच आहे, याची जाणीव होताच अनेक प्रकारच्या उपासना, साधना केल्या जातात. जन्मोजन्मीच्या निष्ठेने चालवलेले हे तप कधीतरी फळाला येते आणि आत्मसाक्षात्कार होतो. आता काही मिळवावयाचे आहे, काही कमी आहे, म्हणून ते प्राप्त करावयाचे आहे, काही उणीव आहे आणि ती आता भरून काढली पाहिजे, हा भाग संपलेला असतो. सर्व उपभोगून झालेले आहे किंवा उपभोगातून काय सुख मिळते, याचा अंदाज आलेला आहे. विषयातून प्राप्त होणाऱ्या सुखाची सीमा कळलेली आहे आणि म्हणून आता मन हे विषयात न गुंतता आत्मस्वरूपाशीच रममाण होऊ लागले आहे, आनंदी होऊ लागले आहे. ही आत्मतुष्टता होय.

जीवन्मुक्त, विदेही व आत्मतुष्ट या अवस्था तशा समांतरच आहेत. त्यांत फरक नाही. या तिन्हींना मिळूनच ब्राह्मी अवस्था म्हटले आहे असे दिसते. अशी अवस्था प्राप्त होऊनही जर काही कर्मे घडली तरी त्यात काहीच स्वार्थ नसल्याने त्याच्यापासून उत्पन्न झालेल्या कर्मफळाचे बंधन पुरुषाला लागत नाही. अशा आत्मतुष्ट, ब्राह्मी अवस्था प्राप्त झालेल्या पुरुषांनी काही कर्मे केली तरी चालतात; नव्हे भगवंत म्हणतात, की अशा व्यक्तीने कर्मे करून समाजापुढे निष्काम कर्मे करण्याचा आदर्श ठेवावा म्हणजे समाजाला ते प्रत्यक्ष उदाहरण मिळते.

*यस्त्वात्मरतिरेव स्यात् आत्मतृप्तश्च मानवः ।*
*आत्मन्येव च संतुष्टः तस्य कार्यं न विद्यते ॥*

*नैव तस्य कृतेनार्थो ना कृतेनेह कश्चन ।*
*न चास्य सर्वभूतेषु कश्चिदर्थव्यपाश्रयः ॥*

*(३.१७, १८ भ. गी.).*

*न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन ।*
*नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि ॥*

*(३.२२ भ. गी.).*

परंतु जो मनुष्य आत्मज्ञानात रममाण असणारा, आत्मज्ञानाने तृप्त व आत्मज्ञानानेच संतुष्ट असतो, त्याला (स्वतःचे) कार्य म्हणजे करावयाचे काही राहिले नसते. कारण या जगात (काही) करण्याने किंवा (काही) न करण्याने त्याला (स्वतःकरिता) काहीच मिळवावयाचे नसते. त्याचप्रमाणे त्याचे स्वतःचे हित कोणत्याही प्राणिमात्रांवर अवलंबून नसते. भगवंत म्हणतात, अर्जुना! या तिन्ही लोकी मला (स्वतःकरिता) काहीच कर्तव्य (करावयाचे) नाही (कारण) मला अप्राप्त असे काही प्राप्त करून घ्यावयाचे नाही. तथापि मी कर्मामध्येच वर्तत आहे. (म्हणजे कर्मयोग आचरत आहे).

संत ज्ञानेश्वरांनी जीवन्मुक्तांची लक्षणे सांगताना अमृतानुभवाच्या नवव्या अध्यायात केलेल्या ओवीरूप वर्णनाचे ह. भ. प. विष्णुपंत जोग महाराज यांनी केलेले सविस्तर विवेचन मनन करण्यासारखे आहे. ते असे–

*'म्हणोनि तोंडा आड पडे । तेही वाचा वावडे ।*
*परी समाधी न मोडे । मौनमुद्रेची ॥'*

*(९.१९ अमृतानुभव).*

विवरण – 'ज्ञाने कां जयाचे डोळे। देखोनि न राहाती देहीचे खोळे। सूर्यरश्मी आणियाळे। ग्रीष्मी जैसे॥' (१५.३८२ ज्ञानेश्वरी). अशी ही ज्ञात्याला सर्वत्र स्वात्मप्रतीती असल्यामुळे कोणत्याही विषयासंबंधाने जरी तो बोलला तरी त्याच्या मौनपणात बिघाड होत नाही. 'बोलतया बोलताची भेटे। तेथे बोलि हे न घटे। ते मौन तव गोमटे। स्तवन माझे॥' (१८.११५३ ज्ञानेश्वरी). अशा या केवळ आत्मस्थिती

अवशिष्ट प्रारब्धाच्या योगाने जरी मुक्त बोलला तरी ते बोल व मी बोलणारा, असा भेद त्याच्या हृदयात नसून एक मी आत्माच आहे, असा सहज प्रत्यय असतो म्हणून ते बोलणे नाही तर मौनच आहे. 'सुरस कथा सांगे वाडे कोडे। अथवा लौकिक बोलणे घडे। परी त्याची समाधिमुद्रा न खंडे। मौन न मोडे बोलता॥ बोलताही न मोडे मौन। हेचि अनुभवाची आतुली खूण। शब्दामाजी नि:शब्द गुण। सज्ञान जाण जाणती॥' (११.३२९, ३३० ए. भा.). अशा तऱ्हेने ज्ञान्यांना हे मौनच आहे आणि हेच खरे मौनव्रत आहे. ज्ञान्याच्या देहाकडून जरी असंख्य कर्मे झाली तरी त्याचा अक्रिय असंग स्वात्मभाव काही बिघडत नाही. कारण आत्मा हा सर्व कर्मातीत व नैष्कर्म्य असा आहे आणि सर्व कर्मे बाहेरच्या बाहेर प्रकृती आश्रित असणाऱ्या गुणाकडून होत आहेत. 'कर्म तंव पराधीनपणे। निपजतसे प्रकृतिगुणे। येरी धरी मोकली अंत:करणे। वाहिजे वाया॥' (३.५९ ज्ञानेश्वरी) जसा ज्या गुणाचा उत्कर्ष असेल तशी कर्मे होतात.

*'कैवल्याही चढावा। करित विषयसेवा।*
*जाला भृत्यु भज्य कालोवा। भक्तिच्या घरी॥'*

*(९.२९ अमृतानुभव).*

ज्ञान्याचे विषयसेवन अभेदातील असते म्हणून ते मोक्षावर ताण करते. भक्तीच्या घरी भज्य व भजक म्हणजे स्वामी व सेवक एक झाले. भावार्थ असा, की हा विषय व मी विषयी असा भेद ज्या बुद्धीवर नाही, त्या आत्मविषयक बुद्धीने केलेले विषयसेवन न केल्यासारखेच आहे. म्हणजे ज्ञात्यास विषय हे स्वात्मरूपाहून वेगळे नाहीत. 'विषयांतरी कांही। आपण पे वाचोनी नाही। मग विषय कवण कायी। बाधितील कवणा॥' (२.३३५ ज्ञानेश्वरी). अशा आत्मैक्य अनुभवस्थितीत ज्ञानी पुरुषाच्या इंद्रियांनी जरी विषयसेवन केले, तरी त्याचे ते करणे कैवल्यावर चढाव करत आहे. म्हणजे सजातीय, विजातीय व स्वगतभेद शून्य, देशकाळवस्तुपरिच्छेदशून्य, केवळ ज्ञानरूप अक्रिय भावास कैवल्य संज्ञा आहे. हा कैवल्यभाव ज्ञान्यांच्या विषयसेवन, अर्जनादी व्यवहाराने न बिघडता जशाचा तसा राहतो. येथे कोणी असे म्हणेल की ज्ञान्यांच्या विषयसेवन व्यवहाराने वर सांगितलेला केवळ स्वात्मभाव बिघडत नाही, तर अज्ञान्यांच्या विषयसेवनाने तरी कोठे बिघडतो? तर त्याचे समाधान असे आहे की, ज्ञानी व अज्ञानी या उभयतांचा केवळ स्वात्मभाव एकच आहे व उभयतांच्या विषयसेवन व्यवहारामध्ये तो बिघडत नाही. तथापि अज्ञानामध्ये केवळ स्वात्मभावाचा अविवेक असल्यामुळे देह इंद्रिय मनबुद्धी स्थूल सूक्ष्म संघाताकडून अर्जन व सेवन

व्यवहार असत. अक्रिय, त्रिकाल एकरूप ज्ञानरूप अशा केवळ स्वात्मस्वरूपाच्या ठिकाणी तो अज्ञानी आरोपित करतो. म्हणजे स्थूल सूक्ष्म संघाताकडून झालेला व्यवहार मी केला अशा समजुतीने अहंवृत्तीचा विषय जो शुद्ध कूटस्थ, त्याच्याकडे कर्तृत्व, भोक्तृत्व लादतो, पण असा प्रकार ज्ञान्यांचा नाही. म्हणजे संघाताकडून होणाऱ्या विषयअर्जनसेवनादी व्यवहाराचा अहं (मी) कर्ता अशा बुद्धीने केवल अक्रिय, असंग ज्ञानरूप स्वात्मतत्त्वावर ज्ञानी हा कर्तृत्व, भोक्तृत्व लादत नाही. 'इंद्रियद्वारा यथानुगति। प्राप्त विषयाते सेविती। परी सेविले ऐसेहि नेणती। विषय स्फूर्ती स्फुरेना॥ गुण पोखिती गुणावस्था। इंद्रिये घेती इंद्रियार्था। मी उभय साक्षी अकर्ता। चिन्मत्रता अलिप्त॥ तो इंद्रियाचेनी खेळेमेळे। सुखेविषयामाजी जरी लोळे। तरी विकाराचेनि विटाळे। कदा काळे मैळेना॥' (ए. भा.). असा ज्ञान्यांचा बोध असल्यामुळे विषयसेवनादी व्यवहाराने ज्ञान्यांचा केवळ स्वात्मभाव बिघडत नाही. 'तैसे भलते करिता। येथे पाविजे कांही आतां। ऐसे नाही न करितां। ठाकिजेना॥' (९.३१ अमृतानुभव).

तसे ज्ञानी पुरुषाला अनेक साधने करून, म्हणजे स्नानसंध्या, भजनपूजन, जपहोम, श्रवण मननादिक साधने करून आत्मस्वरूपाच्या ठिकाणी प्राप्त होण्याची काही जरुरी नाही. कारण भेदशून्य सच्चिदानंदरूप नित्यपरिपूर्ण स्वात्मभाव त्याला नित्य प्राप्त आहे. म्हणजे आत्मभाव हेच माझे स्वरूप आहे असा त्याचा दृढ बोध आहे. याकरिता नित्यप्राप्ताच्या प्राप्तीविषयी काही खटपट करण्याची जरुरी नाही व न जाण्यात काही तोटाही नाही. जसे एखाद्या देहात्मवादी बहिर्मुख जिवाने स्नानसंध्या, जपहोम, भजनपूज़न अथवा श्रवणमननादिक काहीही पारमार्थिक साधने केली नाहीत तर तो जसा आपल्या स्वात्मस्वरूपापासून भ्रष्ट होऊन अधोगतीस जाईल, तसे ज्ञान्यांचे नाही. कारण ज्ञानी नित्यमुक्त व स्वात्मबोधसंपन्न असल्यामुळे तो कृतार्थ आहे. त्याला काही कर्तव्य नाही.

*अवघीयाचि उपचारा। जपध्यान निर्धारा। नाही आन संसारा। देवेवांचुनि॥*

*(९.३९ अमृतानुभव).*

वर सांगितल्याप्रमाणे एक चैतन्यच देवभक्त या रूपाने असल्यामुळे देवाचे जप, ध्यान, पूजा, देवपूजाकाली देवास अर्पण करण्याचे पुष्पगंधादी उपचार, हे सर्व ज्ञानी भक्तास एक चैतन्यावाचून नाहीत. 'आता भक्ति अभक्ति। जाले ताट एकी पांती। कर्माकर्माचिया वाती। माल्हवूनियां॥' (९.४९ अमृतानुभव).

आता भक्ती अभक्तीची प्रकाशक जी सत्कर्मे व असत्कर्मरूप ज्योती ती मालवून भक्ती, अभक्ती ही ताटे एका पंगतीला मांडली गेली. भावार्थ असा की, ज्ञानी भक्त हा सच्चिदानंदरूप भेदशून्य ब्रह्मात्मरूप झाला आहे. म्हणून सत्कर्म व असत्कर्म ही दोन्हीही ज्ञान्याला आत्मत्वाहून स्फुरत नाही. 'म्हणऊनि ब्रह्म तेचि कर्म। ऐसे बोधा आले जया सम। तया कर्तव्य ते नैष्कर्म्य। धनुर्धरा॥' (४.१२१ ज्ञानेश्वरी). अशा तऱ्हेने यावत् बरी-वाईट कर्मे जी जी म्हणून काही सहज रीतीने ज्ञानी भक्ताकडून होत आहेत, ती ती सर्व ज्ञानी भक्ताला स्वात्मरूपानेच जर स्फुरत आहेत, तर ज्ञानी भक्ताकडून ज्या काही म्हणून सहज चेष्टा होतील ती सर्व भक्तीच आहे. 'जे जे कांही करितो देवा। ते ते सेवा समर्पे॥ भेद नाही सर्वात्मका। नारायणा तुज मज॥ आम्ही दुजे नेणो कोणा॥ हेचि मना मन साक्ष॥ तुका म्हणे जगन्नाथा। हे अन्यथा नव्हे की॥' (तु. म.).

सारांश – ज्ञानी भक्त जे काही देहाने करेल ते भगवंताचे पूजनच आहे. जे काही वाणीने बोलेल, ती सारी हरीची स्तुती आहे. अथवा मनाने ज्या ज्या काही कल्पना करेल तो तो सर्व हरीचा जप आहे. 'एवं तो बोले ते स्तवन। तो देखे ते दर्शन। अद्वया मज गमन। तो चाले तेचि॥ तो करी तेतुली पूजा। तो कल्पी तो जपु माझा। तो असे तेचि कपिध्वजा। समाधी माझी॥' (१८.११८०, ८१ ज्ञानेश्वरी). अशा प्रकारे जी काही ज्ञानी भक्ताकडून कायिक, वाचिक व मानसिक कर्मे होतील ती सर्व भगवत्सेवाच आहे.

ईशावास्य उपनिषदामधूनही काही मंत्र जीवन्मुक्ताविषयी आले आहेत-

*'यस्तुसर्वाणि भूतानि आत्मन्येवानुपश्यति।*
*सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते॥'*

अर्थ – जो निरंतर आत्म्यातच सगळी भुते आणि सगळ्या भुतांत आत्मा पाहतो, तो मग कोणालाही आणि कशालाही कंटाळत नाही.

*'यस्मिन् सर्वाणि भूतानि आत्मैवाभूद् विजानतः।*
*तत्र को मोहः कः शोकः एकत्वमनुपश्यतः॥'*

*(मंत्र ६ व ७).*

अर्थ – ज्याच्या दृष्टीने आत्माच सर्व भुते झाला, त्या निरंतर एकत्व पाहणाऱ्या विज्ञानी पुरुषाला मोह कुठला व शोक कुठला?

## जीवन्मुक्ताचे जीवन विकाररहित

जीवन्मुक्ताचे जीवन ज्या अनेक अंगांनी पाहावयाचे असते त्यात विकाररहितपणा हेही एक अंग आहे. आपले जीवन विकारांनीच पूर्ण भरले आहे. आपण काम, क्रोध, मोह, मद, मत्सर, दंभ अशा षड्विकारांनी पछाडलेले असतो. एका वेळी यांपैकी अनेक जण आपल्या मनामध्ये घर करून असतात, कारण सभोवताली सगळीकडे विषय पसरलेले आहेत. मन त्या विषयांच्या मागे सतत धावत असते. त्यामुळे त्या विषयप्राप्तीसाठी हे षड्विकार मनामध्ये जोर करत असतात. तसेच त्रिगुणांमध्ये सत्त्वगुणाला बाजूस सारून रजोगुण व तमोगुण हे सतत डोके वर काढू पाहात असतात आणि अशा या गुणांना आणि विकारांना आवरणे अगदी अशक्यच असते. सर्व विकार कदाचित आवरता येतील तरी काम व क्रोध हे विकार आवरणे मोठमोठ्या तपस्वी, मुनींना अवघड झाले होते, म्हणून मनुष्यजन्मातच हा अभ्यास करणे शक्य असते. जरी अनेक बाजूंनी या जीवन्मुक्त दशेचा विचार केला असला, तरी ही अवस्था सर्व बाजूंनीच क्रमशः उत्क्रांत होत असते. म्हणजे देहाच्या उपाधी आधी सोडून द्याव्यात, मग विकार सोडावेत, मग यम-नियम पाळावेत, ते साध्य झाले की मग निष्काम कर्मयोगाचे आचरण करावे, मग ध्यानधारणा करावी, मग ईशचिंतन करावे, मग मनाचा संयम करून प्राणायामाचा अभ्यास करावा, मग विषयापासून मन आवरावे, मग जिज्ञासू होऊन ईश्वराविषयी ज्ञान प्राप्त करून घेण्याच्या मागे लागावे, मग समाधी लावावी, मग दया, क्षमा, शांती अंगात बाणवावी. मग निर्लोभ व्हावे, मग परमेश्वराचे तत्त्व जाणून घेण्याचा प्रयत्न करावा, मग 'निर्वैरः सर्वभूतेषु।' व्हावे, मग सर्वांभूती परमेश्वर पाहण्याचा प्रयत्न करावा आणि मग जीवन्मुक्त दशा प्राप्त करून घ्यावी.

तर हे असे नसते. ज्याप्रमाणे एका बाजूने डोंगरावर आपण चढू लागलो, की त्याच्या पायथ्यापासून आपण सर्व बाजूंनीच वर जाऊ लागतो. आपण ज्या बाजूने वर जाऊ लागतो त्याच बाजूने फक्त वर जातो. बाकीच्या भोवतालच्या डोंगराच्या बाबतीत आपण खालीच असतो असे होत नसते. तर डोंगराभोवतालचा सर्व प्रदेश क्रमशः खाली खाली जात असतो आणि आपण जेव्हा शिखरावर जाऊन पोहचतो तेव्हा आपणास असे दिसते की, डोंगराच्या सर्व भोवतालच्या प्रदेशाला आपण खाली टाकले असून आपण सर्वात वर आहोत. जीवन्मुक्त दशा ही स्वतःपासून चालू होते. जीवन जगणे असेल तर कर्म आलेच. तेव्हा ते कर्म कसे करावे येथून पहिला पाठ सुरू होतो. कर्म स्वतःसाठी असते तसे इतरांसाठी आपण स्वतः कर्म करणे हाही भाग असतो. सर्वांभूती परमेश्वर आहे ही धारणा या पहिल्या धड्यापासून सुरू होते. ते आपण

वाचलेले असते, आपणास समजलेले असते तरी अंगात बाणलेले असते असे नाही, तर आपपर भावाचे मूळ टाकणे तसे सोपे काम नाही, पण हा अभ्यासच आहे. मनामध्ये वारंवार आपपर भाव जागृत होत राहतात व त्याप्रमाणे दुटप्पी वागणे घडत असते. तरीही चूक लक्षात येताच सुधारणे व पुन्हा तसे न वागणे आवश्यक असते.

एकदा रामकृष्ण परमहंस गंगेच्या काठी बसले होते. जवळ दोन ढीग होते. एक होता पैशाचा व दुसरा होता दगडाचा. ते एकदा पैशाला पैसा व दगडाला दगड म्हणून एक पैसा व एक दगड गंगेत टाकत व दुसऱ्यांदा दगडाला पैसा व पैशाला दगड म्हणून गंगेत टाकत. त्यांच्या भक्ताने हा प्रकार पाहून त्यांना विचारले की, 'स्वामी आपण असे का करता?' तेव्हा रामकृष्ण परमहंस म्हणाले, 'माझ्या मनात जे द्वैत आहे की हा पैसा व हा दगड आहे. ते द्वैत घालवण्याचा मी अभ्यास करीत आहे.' अशा प्रकारे अभेदभाव मनात रुजवण्यासाठी प्रत्येक कर्मामध्ये अभ्यास करावा लागतो म्हणजे हळूहळू विषयांविषयी समभाव निर्माण होईल. कोणी श्रेष्ठ, कोणी कनिष्ठ वाटत नाही. उपभोगाविषयी उदासीनता निर्माण होते. त्यामुळे विषय मिळाले वा नाही मिळाले तरी राग, द्वेष, दुःख, सुख निर्माण होत नाही. कोणी सर्व सुखाचा उपभोग घेत आहे आणि ती सुखे आपणास मिळत नाहीत, याबद्दल वैषम्य वाटत नाही. दुसऱ्या व्यक्तीविषयी राग, द्वेष, मत्सर वाटत नाही आणि विषयांचा संग टाकण्याच्या अभ्यासाबरोबरच मन ईश्वराकडे हळूहळू झुकू लागते. परमेश्वराचे नामस्मरण, चिंतन, पूजा, भजन, कीर्तन, ह्या विषयांत गोडी वाढू लागते. परमेश्वराचे तात्त्विक स्वरूप जाणण्याची जिज्ञासा मनात निर्माण होते आणि या पद्धतीने अभ्यास चालू होतो. अशा पद्धतीने परमेश्वरप्राप्तीच्या शिखराकडे त्याची वाटचाल सुरू होते. गीतेत भगवंत म्हणतात–

*वीतरागभयक्रोधा मन्मया मामुपाश्रिताः ।*
*बहवो ज्ञानतपसा पूता मद्भावमागताः ॥*

*(४.१० भ. गी.).*

अर्थ – ज्यांचे विषयानुराग, भीती, क्रोध (इत्यादी विकार) नष्ट झाले आहेत व अशा रीतीने जे शुद्ध झाले आहेत, ज्यांना मीच श्रेष्ठ वाटत आहे व ज्यांनी माझाच आश्रय केला आहे, असे अनेक (स्थितप्रज्ञ) ज्ञानयुक्त, तपश्चर्येने माझ्या स्वरूपाला (परमात्म स्वरूपाला) प्राप्त झाले आहेत.

संत ज्ञानेश्वर या श्लोकाच्या विवरणामध्ये म्हणतात– 'ते मद्‌भावा सहजे आले। मी तेचि ते होऊनि ठेले। ते मज तया उरले। पदर नाही ॥' (४.६३ ज्ञानेश्वरी) याचा शब्दश: अर्थ तर सरळच आहे. पण त्यातही जो विशेष भाव आहे तो असा की 'मद्‌भावा सहज आले।' लौकिकात कोणतीही गोष्ट ही प्रयत्नाने, कष्टाने प्राप्त करून घेता येते. कदाचित प्रयत्नांचे, कष्टाचे व फलप्राप्तीचे काहीतरी गणित मांडता येईल. समीकरण ठरवता येईल. पण परमेश्वरप्राप्तीसाठी केलेल्या उपासना, तप, साधना यांचे काहीच गणित मांडता येत नाही. अमुक एक जप झाला की अमुक एक फळ मिळणार असे जरी सर्व उपासनांच्या फलश्रुतीमध्ये सांगितले असले, तरी तसेच नेमके घडेल असे नाही. कारण ती उपासना किती निष्ठेने, सातत्याने, एकाग्रतेने, शुद्धतेने वगैरे केली जाते त्यावर अवलंबून असते. त्यामुळे तशी फलप्राप्ती झाली नाही की काहीतरी कमी पडले असे कारण सांगितले जाते. एखादे डोंगरावरील ठिकाण इतक्या वर असते व इतक्या आडवळणाच्या एखाद्या कोपऱ्यात व दाट झाडीत असते की अगदी त्या ठिकाणाच्या पायरीपर्यंत गेले तरी ते ठिकाण आले असे वाटत नाही, म्हणून केवळ चालत राहणे अशी तेथील परिस्थिती असते किंवा एखाद्या गुहेचे तोंड हे काही केल्या दिसतच नाही कारण गुहा इतकी वळणावळणाची असते की, अगदी गुहेच्या तोंडाशी गेल्यावर एकदम उजेड दिसू लागतो. बाकी प्रवासात एकदम काळाकुट्ट अंधार असतो. तसे परमेश्वरप्राप्तीच्या उपासनेबाबतीत म्हणता येईल. कारण उपासना, साधनेची तीव्रता वाढते, निष्ठा वाढते, अंत:करणात ओढ लागलेली असते, जीव तळमळत असतो पण परमेश्वरप्राप्तीचे कोणतेही चिन्ह दिसत नसते आणि म्हणून सर्व संतांच्या जीवनात त्यांना विरहिणी गाव्या लागल्या होत्या. अशा या तळमळीच्या क्षणी, परमेश्वर आता कधी भेटेल या विचाराने जीव विटून गेला असता. अगदी सहजपणे गुहेचे द्वार समोर यावे तसा परमेश्वराचा साक्षात्कार होतो. साधक सिद्ध होतो. शिष्य गुरू होतो. भक्त देव होतो आणि हे इतक्या सहज (म्हणजे कल्पना नसताना, सहज म्हणजे बिना कष्टाने नव्हे) घडते की त्याची कल्पनाच येत नाही. असे ते 'मद्‌भावा सहज आले।' आहे आणि याच क्षणापासून देव व भक्त हे एकरूप होतात. ते किती एकरूप होतात त्याचे प्रमाण देताना संत ज्ञानेश्वर पुढे सांगतात की 'ते मज तया उरले। पदर नाही ॥', 'पदराच्या' पातळपणाची कल्पना सर्वांनाच आहे. तो इतका पातळ असतो की, पदरापलीकडील व्यक्ती पूर्णपणे सहजच दिसत असते, पण तितकाही आडपडदा देव व भक्तामध्ये नसतो. तितकाही दुरावा, अंतर देव-भक्तामध्ये नसते. इतके ते जवळ आलेले असतात, इतके ते एकरूप झालेले असतात. असा साक्षात्कार झाल्यावरसुद्धा

त्या मुक्ताचे जीवन चालू असते. त्या वेळीही त्याच्याकडून कर्मे केली जातात. त्या वेळी त्याचे भाव कसे असतात. त्याचे वर्णन भगवंत गीतेत करतात. ते म्हणतात–

*ब्रह्मार्पणं ब्रह्महविः ब्रह्माग्नौ ब्रह्मणाहुतम् ।*
*ब्रह्मैव तेन गन्तव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥'*

*(४.२४ भ. गी.).*

अर्थ – ब्रह्म हेच अर्पण म्हणजे ज्याला अर्पण करावयाचे ती देवता, ब्रह्म हेच हवि, म्हणजे हवन द्रव्य, ब्रह्मरूप अग्नीमध्ये ब्रह्मरूपकर्त्याने केलेली हवनक्रिया (आहुती टाकणे) ही ब्रह्मच. (याप्रमाणे) कर्माविषयी ज्याची बुद्धी ब्रह्ममय झाली आहे त्याला ब्रह्मच प्राप्त व्हावयाचे.

अशा प्रकारे ब्रह्मभावाने त्याची कर्मे चाललेली असतात आणि मृत्यूनंतर तो ब्रह्मपदाला पोहचतो, जेथून परत येणे नाही.

## जीवन्मुक्त त्रिगुणातीत

सृष्टीच्या उत्पत्तीचा क्रम जर पाहिला तर ब्रह्म-शबल ब्रह्म - पुरुष - प्रकृती - त्रिगुण (सत्त्व, रज, तम) असा आहे. त्यात त्रिगुणाचे स्थान तर खूपच वर आहे. त्रिगुणापासूनच पुढे पंचमहाभूते व सर्व सृष्टीची उत्पत्ती झाली. सृष्टीतील प्रत्येक वस्तू, प्राणिमात्र हे त्रिगुणात्मकच आहेत. तसेच मनुष्यप्राणीसुद्धा त्रिगुणात्मक आहे. मनुष्य अशिक्षित, खेडवळ, व्यसनी वा सुशिक्षित, शहरी आणि निर्व्यसनी वगैरे कसाही असला तरी, तो त्रिगुणात्मकच असतो. त्रिगुणांचे वर्चस्व सुशिक्षितपणा, अडाणीपणा, गरीब-श्रीमंत, विद्वान-अज्ञानी, रोगी-निरोगी वगैरे कोणत्याही बाह्य स्वरूपावर अवलंबून नसते. यात मुख्य मनाची धारणा, संस्कार, अभ्यास, वाचन, चिंतन, मनन वगैरे आंतरिक गोष्टींवर अवलंबून असते. मनच तमोगुणी, रजोगुणी, सत्त्वगुणी वगैरे काहीतरी एक असते किंवा प्रसंगानुरूप ते या तिन्हींपैकी काहीतरी एक होते. कोणत्या गुणाचे वर्चस्व केव्हा असेल हेही सांगता येत नाही. जसा प्रसंग असेल तसे गुणाचे वर्चस्व वाढते व त्याप्रमाणे वर्तन घडते व कर्महीही त्रिगुणात्मक होतात. जसे कर्म तसे संचित व प्रारब्ध बनते व तसा जन्म येतो. त्यामुळे जोपर्यंत या त्रिगुणात्मक धारणेमधून जीव बाहेर पडत नाही, तोपर्यंत त्याच्या मागचा जन्म-मरणाचा फेरा चुकत नाही, हे निश्चित होय. पण त्रिगुण ही काही एखादी वस्तू नाही की जी काढून फेकून देता येते. आपण त्रिगुणांत किती अडकलो आहोत याचे दिग्दर्शन भगवंतांनी उत्तम केले आहे.

श्रद्धा व त्याप्रमाणे उपासना, आहार, यज्ञ, तप, दान, कर्म, कर्ता व त्याचप्रमाणे फळ व ज्ञान, बुद्धी, धृती व त्याप्रमाणे सुख असे हे सर्वच त्रिविध म्हणजे सात्त्विक, राजस व तामस आहे. त्यामुळे या त्रिगुणांतून सुटका होणे हे फारच कठीण आहे. तरीही या त्रिगुणांतून पूर्णपणे सुटल्याशिवाय परमेश्वरप्राप्ती अगदीच अशक्य आहे.

त्रिगुणांपासून सुटणे जरी कठीण असले, तरी अशक्य आहे असे मात्र नाही आणि वरील प्रकारे त्रिगुणांनी जरी पूर्णपणे वेढले आहे असे दिसत असले तरी हा विळखा सोडवणेसुद्धा अशक्य नाही. 'मन एव मनुष्याणां कारणं बन्धमोक्षयो: ।' असे म्हटले आहे. एका मनामुळेच हा विळखा आहे. एका मनालाच या त्रिगुणाने मिठी मारली आहे. ही मनाची मिठी सोडवली की मनच त्रिगुणांपासून मोकळे होण्यास वेळ लागत नाही. पण ही मिठी हळूहळू सुटते. याला सोडावयास पुष्कळ वर्षांची तपस्या, अभ्यास लागतो. हा अभ्यास म्हणजेच अष्टांग योगसाधना, धार्मिक ग्रंथांचे वाचन, चिंतन, मनन होय. याने मन त्रिगुणांपासून मुक्त होते. एवढेच काय पण मनाचे मनपणही शिल्लक राहात नाही. जिथे मनाचाही लय झाला, जेथे कोणताही संकल्प नाही, वासना नाही, इच्छा नाही, तेथे त्रिगुण कोठे असणार आणि अशी अवस्था झाली म्हणजे तिला जीवन्मुक्त दशा म्हणतात, विदेही अवस्था म्हणतात आणि या अवस्थेचे वर्णन भगवंत गीतेत करतात. ते म्हणतात–

*प्रकाशं च प्रवृत्तिं च मोहमेव च पाण्डव ।*
*न द्वेष्टि संप्रवृत्तानि न निवृत्तानि काङ्क्षति ।।*

*उदासीनवदासीनो गुणैर्यो न विचाल्यते ।*
*गुणा वर्तन्त इत्येव योऽवतिष्ठति नेङ्गते ।।*

*समदु:खसुख: स्वस्थ: समलोष्टाश्मकाञ्चन: ।*
*तुल्यप्रियाप्रियो धीर: तुल्यनिन्दात्मसंस्तुति: ।।*

*मानापमानयोस्तुल्य: तुल्यो मित्रारिपक्षयो: ।*
*सर्वारम्भपरित्यागी गुणातीत: स उच्यते ।।*

*मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते ।*
*स गुणान् समतीत्यैतान् ब्रह्मभूयाय कल्पते ।।*

*(१४.२२ ते २६ भ. गी.).*

अर्थ – अर्जुना, तेजस्विता, प्रवृत्ती (चळवळ) व मोह (भ्रांती) हे (अनुक्रमे सत्त्व, रज व तम या तिन्ही गुणांचे) विकार उत्पन्न झाले, तरी जो त्यांचा द्वेष करीत नाही (त्याबद्दल खेद करीत नाही) आणि विकार नाहीसे झाले, तरी त्यांची इच्छा करीत नाही (तो गुणातीत होय). जो तटस्थाप्रमाणे (तिऱ्हाइताप्रमाणे) असून त्रिगुणांनी (त्रिगुणांच्या विकारांनी) विचलित होत नाही; गुणच वर्तन करत आहेत (आत्म्याकडे ज्या कर्तृत्वाचा संबंध नाही) असे जाणून जो स्थिर असतो, चंचल होत नाही (तो गुणातीत होय). ज्याला सुख व दुःख सारखेच असते, (त्यामुळे जो विचलित होत नाही) जो शांत असतो, ज्याला माती, दगड, व सोने सारखेच असते, (स्वार्थ, लोभ नसतो. ज्याला आवड, नावड सारखी असते (आवड नावड नसते). जो स्थितप्रज्ञ असतो व ज्याला (दुसऱ्याने केलेल्या) स्वतःच्या निंदेची किंवा स्तुतीची पर्वा वाटत नाही, (तो गुणातीत होय)- जो (स्वतःविषयीचा) आदर व अनादर यांविषयी सारखा (निःस्पृह), शत्रू व मित्र या दोन्ही पक्षांशी सारखा (न्यायाने वा हितबुद्धीने वागणारा), सर्व कर्मांच्या खटाटोपांच्या कर्मफळाचा त्याग करणारा (फलाभिसंधीरहित कर्मे करणारा) असतो, त्याला गुणातीत असे म्हणतात आणि जो अस्खलित (व ज्ञानविज्ञानमय) भक्तियोगाने माझी (परमेश्वराची) सेवा (आराधना) करतो तो या तीन गुणांचे अतिक्रमण करून ब्रह्मरूप होण्यास पात्र होतो.

या ठिकाणी भगवंतांनी अतिशय महत्त्वाची गोष्ट सांगितली आहे. त्रिगुण हे कोणालाही सोडत नाहीत. मग जीवन्मुक्ताला तरी कसे सोडतील? कारण कोणतेही कर्म करणे आले, की सत्त्व, रज, तम या गुणांमध्येच असणार. श्री अक्कलकोट स्वामी महाराज लोकांना दगड मारत, शिव्या देत. या कृती बाह्यतः तामस गुणांच्या जरी दिसत असल्या तरी श्री अक्कटलकोट स्वामी महाराज यांची धारणा मात्र तशी नव्हती. लहान मूल मातेच्या मांडीवर झोपले असता, पाय मारते तेव्हा 'लाथ मारणे' हा उद्देश त्याच्या ठिकाणी नसतो. नव्हे लाथा मारण्याने आपण काही वाईट करतो याची त्या बाळाला कल्पनाच नसते. यालाच बाललीला म्हणतात व अशा संतांच्या वागण्याला बाल-पिशाच्चवत् वृत्ती म्हणतात. म्हणजे ज्या कृतीच्या ठिकाणी मन जाणीवपूर्वक नसते, ते कोणत्याही गुणांचे असले तरी त्याचे बंधन त्या व्यक्तीला म्हणजेच जीवन्मुक्ताला लागत नाही.

म्हणून भगवंत म्हणतात की, 'हे त्रिगुणात्मक विकार उत्पन्न झाले, तरी तो त्याचा द्वेष करत नाही व ते विकार नाहीसे झाले तरी त्याची इच्छा करत नाही. कोणतेही कर्म हे त्रिगुणात्मकच असते व जेथे कर्म तेथे फळ हे असतेच. मग जीवन्मुक्ताने केलेल्या त्रिगुणात्मक कर्माचे फळ त्यांना मिळणार का? या प्रश्नापूर्वी आपण एक गोष्ट लक्षात घेतली पाहिजे की, कर्म करण्यामागे जीवन्मुक्ताची प्रवृत्तीच नसते. संकल्प नसतो, उद्देश नसतो, हेतू नसतो. त्यामुळे त्यापासून जी कर्मफळे उत्पन्न होतात त्याच्याशी जीवन्मुक्ताचा काहीच संबंध नसतो. त्या कर्मफळाचे बंधन त्यांना पडत नाही व ती कर्मफळे त्यांना पुनर्जन्माला संचित वा प्रारब्धही होऊ शकत नाहीत. मग ती कर्मफळे कोठे जातात, असा प्रश्न उत्पन्न होतो. कर्म तेथे फळ आलेच. तेव्हा जीवन्मुक्ताच्या देहपतनानंतर त्या कर्मफळांची विभागणी होते. ब्रह्मसूत्रामध्ये याचा उल्लेख आला आहे. जीवन्मुक्ताच्या देहपातानंतर त्याच्याकडून घडलेल्या शुभकर्माची फळे त्यांची सेवा करणारे, शुभ चिंतणारे यांना मिळतात व अशुभ कर्माची फळे त्यांची निंदा करणारे, अशुभ चिंतणारे, त्यांना त्रास देणारे यांना मिळतात व अशा प्रकारे जीवन्मुक्ताच्या सर्व कर्मफळांचा हिशेब पूर्ण होतो.

### जीवन्मुक्त नित्य संन्यासी

संन्यास म्हणजे सम्यक्पूर्ण न्यास. न्यास म्हणजे टाकणे. त्याला संन्यास म्हणतात. सम्यक्पूर्ण म्हणजे ज्ञानपूर्ण, सारासार, सत्‌असत्, अविनाशी-विनाशी अशा सर्व दृष्टींनी विचार करून, समजून उमजून, ज्याचा त्याग केला जातो, जे टाकून दिले जाते, त्याला संन्यास म्हणतात. जीवन्मुक्त हा संन्यासीही असतो. संत ज्ञानदेव त्याग व संन्यास यांतील फरक ज्ञानेश्वरीमध्ये स्पष्ट करताना म्हणतात, 'जे निपटुनि कर्म सांडिजे। ते सांडणे संन्यासु म्हणिजे। आणि फल मात्र कां त्यजिजे। तो त्यागु गा॥' (१८.९२ ज्ञानेश्वरी). जीवन्मुक्ताने ऐहिक सुखभोगाचा, काम्य कर्माचा पूर्ण त्याग केलेला असतो. म्हणून तो संन्यासी झाला तर जीवनप्रवाह चालू राहावा म्हणून जी आवश्यक कर्मे आहेत ती तर सर्वांनाच करावी लागतात. ती कर्मे जीवन्मुक्तही करतो, पण त्यापासून कोणत्याही फळाची अपेक्षा नसते. म्हणून तो त्यागीही झाला कारण त्या कर्म आचरण्यामागे धोरण असे असते. भगवंत म्हणतात,

*कर्मणैव हि संसिद्धिम् आस्थिता जनकादयः ।*
*लोकसंग्रहमेवाऽपि संपश्यन्कर्तुमर्हसि ॥*

*(३.२० भ. गी.).*

एकूण जीवन्मुक्त हा त्यागी व संन्यासीही असतो. म्हणजे खऱ्या अर्थाने, पूर्णत्वाने तो संन्यासी असतो. अशा जीवन्मुक्ताचे आचरण कसे असते, ते पाहणे आवश्यक आहे. कारण जीवनामध्ये अनेक प्रसंग उभे राहतात. त्या प्रत्येक प्रसंगाच्या वेळी कसे वागावे हे समजत नाही. आपणास वाटते आपण आता निवृत्त झालो. आपणास संसाराच्या कोणत्याही विषयात रस नाही. आपण संसारात अलिप्तपणे राहात असतो. पण वेळोवेळी संसारातील गोष्टीत, व्यवहारात आपणाकडून डोकावले जाते. त्या वेळी जर कोणी म्हटले की तुम्ही संसारात का लक्ष घालता तर त्या वेळी आपण अनेक कारणे सांगतो आणि तरीही आपण आपणाला निवृत्त, अलिप्त, संन्यासी म्हणवून घेत असतो. म्हणून ही लक्षणे डोळ्यासमोर असली म्हणजे आपण खरोखरीच निवृत्त, अलिप्त, संन्यासी झालो आहोत का याचे उत्तर लगेचच मिळेल. भगवंत म्हणतात,

*ज्ञेय: स नित्यसंन्यासी यो न द्वेष्टि न काङ्क्षति।*
*निर्द्वंद्वो हि महाबाहो सुखं बन्धात्प्रमुच्यते॥*

(५.३ भ. गी.).

अर्थ – अर्जुना, जो (कशाचाही) द्वेष करत नाही व (कशाचीही) आसक्ती ठेवत नाही, तोच नित्य संन्यासी समजावा. कारण (रागद्वेषादी) द्वंद्वरहित झालेला पुरुष कर्मबंधापासून अनायासे मुक्त होतो.

भगवंतांनी भगवत् गीतेमध्ये नित्य संन्यासाचे लक्षण सांगितले आहे. ज्याप्रमाणे कुंभाराचे चाक हे भांडे काढून नेल्यावरही विनाउद्देश फिरत असते, तसे जीवन्मुक्ताचे जीवन परमेश्वरी अपरोक्ष साक्षात्कार झाल्यावर चालू असते. प्रारब्धवशात् त्याचा जो जीवनकाल निश्चित झाला असेल तेवढे आयुष्य त्याला काढणे भाग असते. साक्षात्कारानंतर जरी जीवननिर्वाहाकरिता जीवन्मुक्ताकडून कर्मे घडत गेली, तरी त्या कर्म करण्यात निष्कामता असते. त्या अवस्थेत कर्मामध्ये अडथळा आणणाऱ्याविषयी त्याच्या ठिकाणी ना द्वेष असतो, ना कर्मे सुलभ होण्यासाठी म्हणून कोणी मदत केली तरी त्याच्याविषयी त्याला प्रेम असते. तसेच त्याला ना कर्मापासून मिळालेल्या फळामुळे आनंद होतो, ना कर्म बिघडल्यामुळे दुःख होते. कारण त्याची बुद्धी निष्काम कर्मयोगाचे आचरण करून पवित्र झालेली असते. त्याने मन जिंकलेले असते. त्याने इंद्रिये ताब्यात ठेवलेली असतात. सर्वांभूती असलेल्या आत्मतत्त्वाशी त्याच्या आत्म्याचे ऐक्य झालेले असते. त्यामुळे कर्मे करूनही त्याने तो लिप्त होत नाही. त्याला कर्माचा

बंध लागत नाही. अशा प्रकारच्या निष्काम कर्माच्या आचरणाने त्याची बुद्धी आत्मज्ञानसंपन्न झालेली असते. 'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।' याची त्या जीवन्मुक्ताला जाण असल्याने त्याची ज्ञानावर निष्ठा असते. ज्ञान हेच त्याच्या जीवनाचे आश्रयस्थान असते. कारण ज्ञानानेच अंत:करणातील मळ नि:शेष धुऊन जाऊन तो पवित्र होतो. या अवस्थेलाच साम्यावस्था म्हणतात. सर्व लौकिक सुखोपभोगाविषयी मन जेव्हा निरस होते व केवळ परमेश्वर हेच सर्व सुखाचे स्थान आहे असे वाटते तीच साम्यावस्था होय. या अवस्थेत कायम राहिल्यानेच तो जन्म जिंकल्यासारखा झालेला असतो. यापुढे जीवन्मुक्ताला जन्म-मरण नाही कारण ब्रह्म सम आहे, एकरूप आहे, पवित्र आहे, सर्वसमावेशक आहे. आणि त्याच स्थितीत जीवन्मुक्त गेलेला असतो व तेथेच तो स्थिर झालेला असतो.

भगवंतांनी जीवन्मुक्ताची आणखी काही लक्षणे सांगितली आहेत-

*न प्रहृष्येत्प्रियं प्राप्य नोद्विजेत् प्राप्य चाप्रियम् ।*
*स्थिरबुद्धिरसंमूढो ब्रह्मविद् ब्रह्मणि स्थितः ॥*

*(५.२० भ. गी.).*

अर्थ – (इंद्रियांना) प्रिय वाटणारी वस्तू प्राप्त झाली असता त्याबद्दल हर्ष किंवा अप्रिय वाटणारी वस्तू नशिबी आल्यामुळे विषाद न मानता ब्रह्मज्ञानी मनुष्य स्थितप्रज्ञ व सदसद्विवेकाविषयी जागृत असून ब्रह्माच्या ठिकाणी स्थिर राहतो.

*बाह्यस्पर्शेष्वसक्तात्मा विन्दत्यात्मनि यत्सुखम् ।*
*स ब्रह्मयोगयुक्तात्मा सुखमक्षय्यमश्नुते ॥*

*(५.२१ भ. गी.).*

अर्थ – विषयेन्द्रियसंयोगाच्या ठिकाणी ज्याचे अंत:करण जडलेले नसते असा ध्यानयोगी पुरुष आत्मनि म्हणजे आत्मस्वरूपाच्या ध्यानामध्ये जे सुख अनुभवतो, ते सुख ज्याची बुद्धी ब्रह्मयोगाने म्हणजे समत्वयोगाने संपन्न झाली आहे, तो स्थितप्रज्ञ अक्षय्य अनुभवतो.

जिवाच्या उत्क्रांतीच्या तक्त्यामध्ये (प्रकरण ज्ञानी - जीवन्मुक्ताच्या मार्गावर पा. नं. ३२७ प्रमाणे) दिल्याप्रमाणे जीवन्मुक्त दशेपर्यंत गेलेला पुरुष हा स्थितप्रज्ञ व ध्यानयोगीही असतो. कारण या सर्व प्रकारच्या अभ्यासातूनच त्याला जीवन्मुक्त ही अवस्था प्राप्त झालेली असते. तो कायमच परमेश्वराच्या अनुसंधानामध्ये मग्न असतो.

संत ज्ञानेश्वर या स्थितीचे वर्णन करताना म्हणतात, 'देह तरी वरिचिलीकडे। आपुलियापरी हिंडे। परि बैसका न मोडे। मानसीची॥' (१३.४८६ ज्ञानेश्वरी) जीवन्मुक्ताचे सर्व व्यवहार चालू असतात. देह हालत असतो, पण मन मात्र परमेश्वराच्या ठिकाणी लय पावलेले असते. ते कधीच उन्मन होत नाही. कारण आत्मानुभूती हेच परमश्रेष्ठ सुख होय. हेच खरे विश्रांतीचे स्थान होय. हेच खरे धाम होय. हीच ब्रह्मैकरूप सायुज्य मुक्ती होय. हिलाच विदेही अवस्था म्हणतात. आणि हीच जीवन्मुक्त अवस्था होय.

जीवन्मुक्ताची आणखी काही लक्षणे पाहणे फायद्याचे ठरेल-

*लभन्ते ब्रह्मनिर्वाणम् ऋषयः क्षीणकल्मषाः ।*
*छिन्नद्वैधा यतात्मानः सर्वभूतहिते रतः ॥*

*(५.२५ भ. गी.).*

अर्थ – ज्याचा द्वैतभाव (भेदबुद्धी) नष्ट झाला आहे; ज्याचे अंतःकरण नियत (शुद्धबुद्धीनियंत्रित) झाले आहे व ज्याचे पाप (कर्मबंध) नाहीसे झाले आहे असे ऋषी सर्व प्राणिमात्रांच्या (जगाच्या) कल्याणाविषयी तत्पर असून ब्रह्मानंदाचा लाभ घेतात. 'आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति।' अशी जेव्हा पक्की धारणा होते त्याच वेळी द्विधा भाव नष्ट होऊ शकतो. कारण कोणीच स्वतःचा द्वेष, मत्सर करू शकत नाही. ज्या वेळी आपपर भाव असतो, त्याच वेळी द्वेष, मत्सर काम, क्रोध, आदी विकार उत्पन्न होतात. पण सर्व ठिकाणीच आत्मरूपाने परमेश्वर आहे. जसा तो माझ्या हृदयात आहे तसा तो सर्व प्राणिमात्रांच्या हृदयातही आहे, याची जाणीव झाली म्हणजे स्वतःच्या सुखप्राप्तीसाठी इतरांना त्रास देण्याची जी बुद्धी होते ती होत नाही. आपणास जे सुख हवे असते, तसे सुख इतरांनाही हवे असते, असे वाटते. एवढेच नव्हे तर तसे सुख इतरांना देण्याकडे बुद्धी होते आणि मग इतरांचे सुख ते माझे सुख व इतरांचे जे दुःख ते माझे दुःख अशी धारणा त्याच्या ठिकाणी उत्पन्न होते, आणि मग द्विधा भाव लयाला जातो. हीच मनाची, बुद्धीची शुद्धता होय. तेव्हाच सर्व प्राणिमात्रांच्या हितासाठी, सुखासाठी धडपड करण्याची बुद्धी होते. अर्थात सर्व प्राणिमात्रांविषयी समभाव निर्माण होणे ही गोष्ट तितकी साधी, सोपी व चटकन आत्मसात होणारी नव्हे तर त्यासाठी तसा अभ्यास करावा लागतो. तसे सारखे चिंतन करून मनाला शिकवावे लागते व वेळप्रसंग आल्यावर मनाकडून तसे वर्तन करवून घ्यावे लागते. नवीन चालणारे मूल जसे पडत पडत चालत राहते व थोड्याच दिवसांत चांगले चालावयास

शिकते, तसे मनाला जरी समभावाच्या गोष्टी कितीही पटवल्या, तरी वारंवार आपपर भाव जागृत होतो, वर उफाळून येतो व वारंवार त्याला दाबून समभावाचे धडे द्यावे लागतात. तसे वर्तन त्याच्याकडून करून घ्यावे लागते. असे झाले म्हणजे कालांतराने, जन्मांतराने हा अभ्यास पक्का झाला की द्विधा भाव नष्ट होतो. वस्तुमात्रांविषयीची आसक्ती नष्ट होते. निष्काम कर्माचरणाचा अभ्यास पुरा होतो. तेव्हाच तो खरा त्यागी, संन्यासी होतो आणि तेव्हाच तो खरा जीवन्मुक्त होतो.

संत ज्ञानेश्वरांप्रमाणेच संत तुकारामांनीही जीवन्मुक्तांची लक्षणे दिली आहेत. त्याचाही अभ्यास केल्यास एका वेगळ्या अंगाची ओळख होण्याची शक्यता आहे. हाच विषय आणखी चांगल्या प्रकाराने लक्षात येण्यासारखा आहे म्हणून देत आहे.

ज्यांना परमेश्वराचा साक्षात्कार झाला आहे, त्यांना सर्वभूती परमेश्वराचीच प्रचीती येते. त्यांच्या ठिकाणी भोग, वासना नसतात. कसल्याही इच्छा नसतात आणि संकल्पही नसतात. कारण त्यांना जे मिळवावयाचे असते ते त्यांनी मिळवलेले असते. त्याहून आणिक काही मिळवावयाचे शिल्लक राहिलेले नसते. राजवाड्यात राहणाऱ्याला जसे त्याहून छोट्या घराची इच्छा होत नसते. पक्वान्न खाऊन पोट भरलेल्याला कोणतेही अन्न खावे अशी वासनाच होत नाही. उत्तम, भरजरी कपडे घातलेल्याची कोणत्याही वस्त्राकडे नजर जात नाही. त्याप्रमाणे सर्व सामर्थ्यवान, ऐश्वर्यवान अशा परमेश्वराशी ज्याचे सख्य जडले जाते तो कशाला इतर कोणाशी सख्य करण्याची अपेक्षा धरेल? म्हणजे याचा अर्थ त्याला जीवनाविषयी कोणतीच आत्मीयता राहिलेली नसते. अशाच पुरुषाला जीवन्मुक्त म्हणतात. ही जीवन्मुक्त अवस्था संत तुकारामांनी अनुभवली होती आणि म्हणून त्यांनीही या अवस्थेचे वर्णन करून ठेवले आहे व तसाच जाता जाता इतरांनीही उपदेश केला आहे.

'न करी संग राहे रे निश्चल। लागो नेदी मळ ममतेचा। ईश्वराचा जय वासनेचा क्षय। संकल्पा ही न ये वरी मन॥ तुका म्हणे न ये जाणीव अंतरा। अंतरी या थारा आनंदाचा॥' (११२ अभंग तु. म.). 'विषयी विसर पडला निःशेष॥ अंगी ब्रह्मरस ठसावला॥' (१५३१ अभंग तु. म.). परमेश्वराचा साक्षात्कार झाला. सद्गुरुने कृपा केली. अशा या आनंदी क्षणी जेव्हा देव म्हणतो. 'कांही माग' तेव्हा संत तुकाराम काय मागतात. 'शोधिता चि न ये। म्हणोनि वोळगतो पाये॥ आता दिसो नये जना। ऐसे करा नारायणा॥ परतोनि मन। गेले ठायीचि मुरोन। विसरला तुका। बोलो चालो जाला मुका॥' (१५८६ अभंग तु. म.).

संत तुकारामांनी मागितले आणि देवांनी दिले त्यामुळे संत तुकारामांना काय मिळाले?

'रज्जु सर्पाकार। भासयले जगडंबर॥ तुकी तुकला तुका। विश्वी भरोनि उरला लोका॥ (१५८७ अभंग तु. म.). अशा विश्वामध्ये भरून उरलेल्या संत तुकारामांना मग परमेश्वराचे सान्निध्य दुरावणार तरी कसे? तर ते जेथे जेथे जातात तेथे त्यांना परमेश्वराचे सान्निध्य जाणवत असतेच. तो हा अनुभव सांगताना ते म्हणतात. 'जेथे जेथे जासी। तेथे मज तू चि पासी॥ ऐसा पसरीन भाव। रिता नाही कोणी ठाव॥ (१६६५ अभंग तु. म.). पुढे दुसऱ्या एका अभंगात ते पुन्हा आपला अनुभव सांगताना म्हणतात, 'जेथे देखे तेथे तुझीच पाऊले। विश्व अवघे कोंदाटले॥ रूप गुण नाम अवघा मेघश्याम। वेगळे ते काय उरले॥ अवघा आम्हा तू च जालासी देवा। संसार हेवा कामधंदा॥ न लगे जाणे कोठे कांही च करणे। मुखी नाम ध्यान सदा॥' (१८३० अभंग तु. म.).

*'अहमात्मा गुडाकेश सर्वभूताशय स्थित: ॥'*

*(१०.२० भ. गी.).*

भगवंतांनी आपल्या विभूतियोगामध्ये जे सांगितले त्याची प्रचीती संत तुकारामांनाही आली म्हणूनच अनुभूतीच्या उत्कटतेने त्यांच्या तोंडून हा अभंग बाहेर पडला. 'मुंगी आणि राव। आम्हा सारखाचि जीव॥ सोने आणि माती। आम्हा समान हे चित्ती॥' (१८९५ अभंग तु. म.). सर्वांभूतीच परमेश्वर आहे. परमेश्वराचे अधिष्ठान नाही अशी वस्तू नाही. चराचरामध्ये तो पूर्ण भरून राहिला आहे. मग दिसणाऱ्या या जड वस्तूमध्येही परमेश्वर आहे असे म्हणावयाचे काय? हो आहे, परमेश्वर त्या वस्तूमध्ये तर आहेच पण तो आपल्या ठिकाणी आहे, आपल्या भावात आहे. म्हणून म्हटले आहे की 'भाव तेथे देव.' त्याच अर्थाचे एक सुभाषित आहे. 'देवो न विद्यते काष्ठे न पाषाणे, न मृण्मये। भावो हि विद्यते देवो तस्मात् भावो हि कारणम्॥' आणि याच अनुभूतीचे बोल संत तुकारामांचे आहेत. ते म्हणतात, 'पाषाण देव पाषाण पायरी। पूजा एकावरी पाय ठेवी॥ सार तो भाव सार तो भाव। अनुभवी देव ते चि जाले॥ उदका भिन्न पालट काई। गंगा गोड येरां चवी काय नाही॥ तुका म्हणे हे भाविकांचे वर्म। येरी धर्माधर्म विचारावे॥' (२२७० अभंग तु. म.).

जीवन्मुक्त अवस्थेचे वर्णन करताना संत तुकाराम पुढे म्हणतात–

*'आपुले मरण पाहिले म्यां डोळां। तो जाला सोहळा अनुपम्य ॥*
*फिटले सुतक जन्म-मरणाचे। मी माझ्या संकोचे दुरी जालो ॥'*

*(२६६९ अभंग तु. म.).*

असे अलौकिक मरण आल्यानंतर जे जीवन राहते, त्या जीवनात काय करावयाचे याचेही मार्गदर्शन संत तुकाराम करतात. ते मार्गदर्शन केवळ सांगण्यासाठीचे नाही तर स्वत:च्या आचरणातून ते सिद्धही करतात.

'हेचि माझे तप हेचि माझे दान। हेचि अनुष्ठान नाम तुझे ॥ हेचि माझे तीर्थ हेचि माझे व्रत। सत्य सुकृत नाम तुझे ॥ हाचि माझा धर्म हेचि माझे कर्म। हाचि नित्य नेम नाम तुझे ॥ हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ। हेचि जपध्यान नाम तुझे ॥ हेचि माझे ज्ञान श्रवण मनन। हेचि निजध्यान नाम तुझे ॥ हाचि कुळाचार हाचि कुळधर्म। हाचि नित्यनेम नाम तुझे ॥ हा माझा आचार हा माझा विचार। हा माझा निर्धार नाम तुझे ॥' (३७५५ अभंग तु. म.). असे हे सर्व वर्म नामातच साठवलेले आहे व त्याचे प्रत्यंतर श्री गोंदवलेकर महाराज, संत नामदेवादी मंडळींना आले आहे.

नामामध्ये सतत राहणे याचा अर्थ परमेश्वराला अनन्य शरण जाणे होय. परमेश्वराला शरण जाणे, परमेश्वराजवळ करुणेने याचना करणे याचाच अर्थ अहंकार सोडणे होय. अहंकाराने काहीच साधत नाही. अहंकार मनुष्याच्या उत्क्रांतीचा, प्रगतीचा सर्वांत मोठा एकमेव शत्रू आहे. भगवंत गीतेत अर्जुनाला मुद्दाम सावधगिरीचा इशारा देतात की 'जर अहंकाराने तू माझे न ऐकशील तर नाश पावशील.' इतकेच नव्हे तर केवळ माझ्या प्रसादानेच तू तरून जाशील. तेव्हा त्या परमेश्वरालाच तू शरण जा, सर्व भावाने शरण जा, म्हणजे त्याच्याच प्रसादाने तू तरून जाऊन तुला शाश्वत शांती मिळेल. भगवंत अर्जुनाला पुन:पुन्हा शरण जाण्यास सांगत आहेत. अर्जुनाला म्हणजे आपणाला - तर ते कसे?

*सर्वधर्मान् परित्यज्य मामेकं शरणं व्रज।*
*अहं त्वां सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥*

*(१८.६६ भ. गी.).*

संत ज्ञानेश्वरांनी याचे विवरण करताना अगदी समर्पक दृष्टान्त दिले आहेत. ते शरण जाण्याची पद्धत सांगत आहेत. ते म्हणतात–

'सुवर्णमणि सोनया। ये कल्लोळु जैसा पाणिया। तैसा मज धनंजया। शरण ये तू॥' (१८.१४०० ज्ञानेश्वरी). ही अनन्यशरण जाण्याची सीमा आहे आणि याच साधनेचा अभ्यास करून संत तुकाराम आपल्या अनुभूतीने म्हणतात–

'जरी हा हो कृपा करिल नारायण। तरी हे चि ज्ञान ब्रह्म होय॥ कोठोनिया कांही न लगे आणावे। न लगे कोठे जावे तरावया॥ जरी देव कांही धरिल पै चित्ति। तरि हेचि होती दिव्य चक्षू॥ तुका म्हणे देव दाविल आपणा। तरि जीवपणा ठाव नाही॥' (४०८९ अभंग तु. म.). अशा प्रकारे भगवंतांना शरण गेल्यावर त्याचे सारे जीवनच परमेश्वरमय होऊन जाते. ते करतील तो व्यवहार हा परमेश्वरासाठीच केला जातो. त्याची नजर जाईल तेथे त्यांना परमेश्वराचेच रूप दिसते. ते जे जे ऐकतात ते ते परमेश्वराचेच नाम असते. ते जे जे स्पर्श करतात तेथे तेथे त्यांच्या परमेश्वराच्याच सुखद स्पर्शाचा अनुभव येतो. ते जे जे बोलतात ते परमेश्वराचे नाम असते, स्तुती असते. ते जे जे काम करतात ती परमेश्वराचीच पूजा होते. त्यांच्या ध्यानी, मनी, चित्ती केवळ एक परमेश्वरच असतो. त्याचे स्वत:चे देहभान हरपलेले असते. त्यांना त्यांच्या तहान भुकेचीही शुद्ध राहिलेली नसते. त्यांना स्थलकालाचेही ज्ञान राहिलेले नसते. त्यांना स्वत:च्या जातिवर्णाचाही विसर पडलेला असतो. इतके ते परमेश्वराच्या स्मरणाने सुखी, आनंदित झालेले असतात आणि हीच खरी पराकोटीची जीवन्मुक्त दशा. संत तुकारामांनी या अवस्थेचे वर्णन करताना खूप अभंग रचलेले आहेत, पण गोपींची कृष्णभक्तीची पराकोटी कळणेच शक्य नाही, पण शब्द काहीतरी कल्पना देतात. म्हणून संत तुकारामांच्या अभंगांतील काही भाग नमुन्यासाठी खाली दिला आहे.

*'ज्याचे ध्यानी मनी सर्वभावे हरि। देह काम करी चित्त त्या पे॥*
*कृष्ण तया ध्यानी आसनी शयनी। कृष्ण देखे स्वप्नी कृष्णरूप॥'*

*(४५२१ अभंग तु. म.).*

*'नावडे तुम्हास आणीक बोलिले। मग हे लागले हरिध्यान॥'*

*(४५२२ अभंग तु. म.).*

*'ताटस्थ राहिले सकळ शरीर। इंद्रिये व्यापार विसरली॥*
*विसरल्या तान भूक घर दार। नाही हा विचार असो कोठे॥*
*विसरल्या आम्ही कोणीचे जातीच्या। वर्णा ही चहूच्या एक जाल्या॥*

*(४५२३ अभंग तु. म.).*

अशी ही अवस्था प्राप्त झाली असता प्रारब्धाप्रमाणे आयुष्याच्या अवधीची सीमा गाठली जाते. आत्मरूप मर्त्य शरीराचा त्याग करून परमेश्वरामध्ये विलीन होऊन जाते. ते परमेश्वराचे स्वरूप कसे आहे, याचे मंडूकोपनिषदामध्ये आलेले वर्णन–

*'यदा पश्यः पश्यते रुक्मवर्णं कर्तारमीशं पुरुषं ब्रह्मयोनिम् ।*
*तदा विद्वान पुण्यपापे विधूय निरंजनः परमं साम्यमुपैति ॥'*

*(मंत्र. ३८).*

अर्थ – सुवर्णाप्रमाणे चकाकणारा, जगताचा कर्ता, चैतन्यमय प्रकृतीचे मूळ कारण जो ईश्वर, त्याचा साक्षात्कार जेव्हा द्रष्ट विद्वान करतो, तेव्हा तो पुण्यपाप झटकून निरंजन होऊन परम् साम्यास प्राप्त होतो.

## नासदीय सूक्तात जीवन्मुक्ताचे केलेले वर्णन

जीवन्मुक्त हा कर्मयोगी आहे. सरसकट सर्व कर्मे त्यागणारा नाही, युक्त कर्माचे सम्यक् आचरण करणारा आहे. अकर्मात स्तब्ध बसणारा नाही. नियत कर्मात रत होणारा आहे. तथापि त्यातही वर वर्णन केलेले विदेही मुक्ताच्या ज्ञानावस्थेचे सर्व गुण आहेत. म्हणजे तो निस्त्रैगुण्य, निर्द्वंद्व, नित्य सत्त्वस्थ, निर्योगक्षेम असा आत्मवान होत्साता, परम शांतीच्या अनामय ब्रह्मनिर्वाणाला प्राप्त झालेला आहे. विदेही मुक्ताला जर संन्यासी म्हटले तर जीवन्मुक्त हा योगी होय. तथापि या दोन परस्परांविरुद्ध कोटी एकाच ज्ञानाची स्थिती दर्शवतात. यावरून ज्ञान दोन रूपांत प्रकट होते. १) क्रियास्तब्ध होऊन. २) क्रिया चालू राहून. ही क्रिया स्वतःच्या देहाद्वारे घडणारी असते म्हणून एक देह त्यागून मुक्त तर दुसरा देह भोगून मुक्त. एकाची दृष्टी सामान्य देहधारणात्मक कर्मापासून सुटते, तर दुसऱ्या देहाचे उत्तम प्रकारे रक्षण करून त्याद्वारे सर्व नियत कर्मे 'योगाने' म्हणजे कौशल्याने आचरवतो. एकाचा भर संन्यासावर असतो तर दुसऱ्याचा त्यागावर असतो. संन्यास कामनांचा, त्याग ममत्वाचा. एकाचे देहावरील ममत्व सुटले की तो देहाकडे पूर्ण दुर्लक्ष करतो. दुसरा अममत्वाने त्या देहाकडून सर्व कर्मे विधिपूर्वक यथासांग पार पाडतो. म्हणून मुक्तीला एकच मार्ग नाही. जशी संन्यासात तशीच त्यागात मुक्ती आहे. तथापि संन्यास निराळा व त्याग निराळा. 'काम्यानां कर्मणां न्यासं ।' तो संन्यास. 'सर्वकर्मफलत्यागं ।' तो त्याग. त्यागाची मुख्य दृष्टी कर्मावर आहे. सर्वच कर्मे फलाच्या अनुषंगाने प्रवृत्त होत असल्याने काम्य कर्माचा त्याग हा संन्यास तर सर्वच फले कर्माच्या अनुषंगाने सिद्धी पावत असल्यामुळे कर्मफलाचा संन्यास हा त्याग होय. असे संन्यास व त्याग यांत जसे वैषम्य आहे तसे

साम्यही आहे. त्यातील वैषम्यामुळे त्यागी हा योगी म्हटला तर संन्यासी हा अयोगी ठरतो. तथापि पुन्हा त्यातील साम्य पाहिले की संन्यासी व योगी एकच दिसतात. म्हणूनच गीतेत भगवंतांनी अर्जुनाला 'यं संन्यासमिति प्राहुर्योगं तं विद्धि पांडव' त्याला संन्यास म्हणतात. तोच योग जाण असे सांगितले आहे. कारण सर्व संकल्पाचा म्हणजे सर्व कर्मफलाचा संन्यास केल्यावाचून कोणालाही योगी होता येत नाही. 'न ह्यसंन्यस्तसंकल्पो योगी भवति कश्चन'– तर योगाचा म्हणजे फलाशारहित कर्माचा आश्रय केल्याखेरीज संन्यासप्राप्ती दुष्कर असते.

'संन्यासस्तु महाबाहो दु:खमाप्तुमयोगत:' असे म्हटले आहे आणि शेवटी जो मुनी म्हणजे संन्यासी योगयुक्त होईल, तोच तत्काळ ब्रह्मपदाला जाईल असे आपले मत दिले आहे. 'योगयुक्तो मुनिर्ब्रह्म न चिरेणाधिगच्छति।' सारांश, योगात संन्यास व त्याग दोन्ही आहेत. तथापि संन्यासात त्याग आहे. योग नाही. पण त्यागात योग निश्चयाने आहे. असा योग, त्याग, संन्यास यांचा संबंध आहे. तसेच योगात सांख्य आहे व कर्म आहे व ज्ञान आहे. ज्ञान आहे व भक्ती आहे. भक्ती आहे व वैराग्य आहे. वैराग्य आहे व उपासना आहे. उपासना आहे व श्रद्धा आहे. श्रद्धा आहे व बुद्धी आहे. बुद्धी आहे व आत्मसिद्धी आहे. आत्मसिद्धी आहे व ब्रह्मप्राप्ती आहे.

जीवन्मुक्त हा जिवंत राहून म्हणजे देह धारण करून मुक्त म्हटला तर विदेही मुक्त हा देह त्यागून म्हणजे मृत्यू पावून मुक्त होय. एक सर्व कर्माचा न्यास करत असल्यामुळे 'कर्मसंन्यासी' आहे. तर दुसरा सर्व कर्मफल त्यागपूर्वक आचरत असल्यामुळे 'कर्मयोगी' आहे. मुक्तीच्या परम स्थितीत दोन्ही सारखेच.

## तेजोवलय

*'हो कां जे शारदियेचेनि वोले। चंद्रबिंब पाल्हेले।*
*कां तेजाचि मूर्त बैसले। आसनावरी॥'*

*(६.२५८ ज्ञानेश्वरी).*

या ओवीवरून मागे एक वाचलेली गोष्ट आठवते. एक राजा होता. त्याच्याकडे दोन मित्र होते. ते दोघेही चित्रकार होते. राजाने त्यांची परीक्षा पाहण्यासाठी दोघांनाही एक चित्र काढावयास सांगितले, पण दोघांनी ते चित्र होईपर्यंत एकमेकाला भेटावयाचेसुद्धा नव्हते व एकमेकांचे चित्रही पाहावयाचे नव्हते. राजाने एका मोठ्या महालात दोघांना समोरासमोरील भिंतीवर चित्र काढण्यास सांगितले. मध्ये फक्त एक पडदा उभा केला व पहारेकरी ठेवले- दोघांनी एकमेकांशी बोलूही नये म्हणून- पण

चित्र मात्र एकदम हुबेहूब आले पाहिजे अशी अट होती. काही काळाने चित्र तयार झाल्याची राजाला खबर देण्यात आली. राजा चित्र पाहण्यास आला. पहिल्याकडे गेला तेव्हा राजाने चित्र पाहून समाधान व्यक्त केले. मधला पडदा दूर करण्यात आला आणि काय आश्चर्य दुसऱ्यानेही अगदी हुबेहूब चित्र काढलेले राजाला दिसते. राजाने समाधान व्यक्त केले. राजा आनंदीही झाला. - राजाने विचारले की, 'तू हे चित्र अगदी हुबेहूब कसे काढले - चित्रकार म्हणाला, 'राजा मी चित्र काढलेच नाही. ही भिंत घासून मी फक्त गुळगुळीत व चकचकीत केली आहे. समोरील चित्राचे ते प्रतिबिंब आहे.' राजा त्याच्या कल्पनेवर खुश झाला.

सततच्या साधनेने, तपाने, जपाने आपलेही मन इतके स्वच्छ, निर्मळ, पारदर्शक करणे आहे की परमेश्वराच्या तेजाचे प्रतिबिंब अगदी, स्वच्छ व स्पष्टपणे त्यात पडले पाहिजे. खालील सुभाषितही तेच सांगत आहे.

*'क्षुद्रोऽपि तनुते तात तेजतेजस्विसङ्गत: ।*
*अर्क संपर्कत: पश्य दर्पणे दहनद्युतिम् ॥'*

अर्थ – तेजस्वी लोकांच्या संगतीत सामान्य लोकांनाही तेज प्राप्त होते. पाहा की सूर्याच्या सहवासाने आरशाला प्रखर तेज प्राप्त होते.

त्याचप्रमाणे परमेश्वराच्या नाम, जप, रूप, तप, चिंतन, मनन, ध्यान, धारणा, समाधी अशा सततच्या सहवासाने नराचा नारायण होतो आणि परमेश्वराचे तेजही त्याला मिळते. म्हणून साधू, संत, महात्मे यांच्या चित्रांमध्ये, फोटोंमध्ये त्यांच्या डोक्याभोवती तेजाचा गोल दाखवलेला असतो. तसेच देवादिकांच्याही डोक्याभोवती तेज पसरलेले दाखवलेले असते. तेच तेज साधकाला प्राप्त होते. हे तेज फोटो किंवा चित्र काढताना नंतर काढलेले असते हे आपणास माहीत आहे आणि त्यामुळेच असे तेज खरोखरीच असते की नाही याविषयी आपल्या मनात शंका निर्माण होते, पण तसे नाही. अशा तऱ्हेचे प्रकाशवलय असते हे विज्ञानानेच सिद्ध केले आहे. तर ते खालीलप्रमाणे–

**'किरलियन फोटोग्राफी'** – एका स्वीडिश मानसशास्त्रज्ञ विदूषीने मानसिक अवस्थेचा मानवाच्या शरीराच्या तेजोवलयावर (Aura) कसा परिणाम होतो, या सध्या प्रयोगावस्थेत असलेल्या 'किरलियन फोटोग्राफी' (Kirlian photography) या विषयावर अत्यंत मनोरंजक व माहितीपूर्ण निवेदन केले. या तंत्राने असे सिद्ध केले आहे, की प्रत्येक सजीव व निर्जीव वस्तूला स्वत:चे असे तेजोवलय असते. योगाच्या

दृष्टीने सजीवामध्ये दिसणारे हे तेजोवलय त्यांच्या प्राणशक्तीचे द्योतक असते. (सकाळ १९.३.१९८९ ले.– स्वानंद घाटपांडे).

आणि या लेखात वनस्पतींच्या पानाभोवती असलेले तेजोवलय दाखवलेले आहे. आध्यात्मिक दृष्ट्या पाहता वनस्पती या तमोगुणी असतात आणि असे असून जर त्यांच्या भोवती तेजोवलय त्या फोटोग्राफीने दिसत असेल, तर सत्त्वशुद्ध माणसाच्या ठिकाणी असे तेजोवलय असणारच यात शंका नाही. मग साधू, संत, महात्मे व देवदेवता यांच्याभोवती असणारे तेजोवलय निश्चितच प्रखर असणार. मग ते तेजोवलय आपणास का दिसत नाही असा प्रश्न मनात येतो. प्रखर सूर्याला जर पाहावयाचे असेल तर डोळ्यांसमोर गडद काळी काच धरतात. त्यामुळे सूर्याचे प्रखर किरण त्या काळ्या काचेला भेदू शकत नाहीत आणि त्यामुळे सूर्य सौम्य दिसतो. समजा अशा चार-पाच काचा एकमेकांवर धरून सूर्याकडे पाहिल्यास तो सूर्यही दिसणार नाही. मग सूर्याला तेज नाही असेच म्हणावयाचे काय? तसे साधू, संत, सत्पुरुष यांचे तेज आपणास दिसत नाही कारण आपल्या डोळ्यांत दोष आहे असाच त्याचा अर्थ होतो. बाकी काही नाही. हेच डोळे तपाने, जपाने, साधनेने व समाधीच्या योगाने स्वच्छ झाले की आपणास तेज दिसू लागेल. हेच आध्यात्मिक भाषेत सांगावयाचे म्हणजे अज्ञानरूपी तमोगुणाचा जाडपणा कमी होऊन, विषयोपभोगाचा, रजोगुणाचा सारा जेव्हा साफ विरघळून, वितळून जातो तेव्हाच सात्त्विक सत्त्वगुणाची काच स्वच्छ होते. दृष्टी पारदर्शक बनते आणि मग तेजोवलये दिसू लागतात, यात शंका नाही. तेजोवलयाप्रमाणे प्रत्येक वस्तुमात्राला, शरीराला एक प्रकारचा गंध असतो. प्रत्येक प्राण्याच्या शरीराला, मानवी शरीरालाही एक विशिष्ट गंध असतो. मानवी शरीर सोडून इतर प्राणी व वस्तुमात्र यांचा गंध ठराविकच असतो. कारण त्यांच्या ठिकाणी सत्त्व, रज व तम या त्रिगुणासंबंधाने कोणताही फरक होण्याची शक्यता नसते. कारण त्यांचे गंध, चव व षड्रस हे पक्के ठरलेलेच असतात, पण मानवी शरीराचे तसे नसते. मानवी शरीर व मन हे तमोगुणापासून ते शुद्ध सत्त्वगुणापर्यंतचे कोणत्याही प्रकारचे असू शकते. त्यामुळे त्याच्या ठिकाणी असलेल्या गंधातही खूप फरक असू शकतो. पूर्वी वाचलेल्या एका पुस्तकातून असा उल्लेख आला आहे की मानवी शरीराचा गंध हा जिवंतपणी फारसा प्रभावीपणे जाणवत नसेल पण त्याच्या मृत्यूनंतर चांगलाच जाणवतो. याविषयी आयुर्वेदातील शरीरशास्त्राच्या ग्रंथांतूनही चर्चा आली आहे. हा गंध जितका सुगंधित असेल तितकी ती व्यक्ती ही सत्शील, सदाचारी, सत्त्वगुणी, आध्यात्मिक वृत्तीची असेल व जितका तो गंध दुर्गंधाकडे झुकलेला असेल तितकी ती व्यक्ती ही दुराचारी, दुर्गुणी, व्यसनी असेल. मृत्यूनंतर जीवात्मे आपल्या सूक्ष्म शरीराने

हिंडत असतात. त्यांच्या शरीराला हा गंध स्पष्टपणे जाणवतो आणि त्यामुळे 'समानशीले व्यसनेषु सख्यम्।' असे जे म्हटले जाते तसे समान गंध असलेल्या त्या व्यक्तींची (भुतांची) मैत्री जमते. त्यातून आणखी विशेष गोष्ट म्हणजे आपल्यापेक्षा श्रेष्ठ गंधांची भुते आपणास दिसत नाहीत. पण आपल्यापेक्षा निकृष्ट गंध असलेली भुते आपणास दिसतात पण आपण त्यांच्याशी मैत्री करू शकत नाही. कारण आपण त्यांना दिसत नसतो. असो.

एकूण तेज व गंध हे जपाने, तपाने, साधनेने, ध्यान-धारणा-समाधीने वाढू शकते म्हणजे ही उत्क्रांतीचीच लक्षणे आहेत. असाच त्याचा अर्थ होतो. ही उत्क्रांती परमेश्वरी साक्षात्काराशी, परमेश्वरप्राप्तीपाशी थांबते. या साधनेने परमेश्वरप्राप्ती होते. याविषयी खुद्द भगवंतच खात्री देत आहेत.

*'तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर।'*

*(८.७ भ. गी.).*

या चरणाचे निरूपण संत ज्ञानदेवांनी सुरेख व स्पष्ट शब्दात केले आहे.

*'तू मनबुद्धी साचेसी। जरी माझिया स्वरूपी अर्पिसी।*
*तरी मातेचि गा पावसी। हे माझी भाक॥*

*हेच कायिसया वरी होये। ऐसा संदेहो वर्ततु आहे।*
*तरी अभ्यासूनि आदी पाहे। मग नव्हे तरी कोपे॥'*

*(८.७९ व ८० ज्ञानेश्वरी).*

या तेजोवलयाप्रमाणेही अशा संतपुरुषांना प्राप्त झालेल्या अतींद्रिय शक्तीविषयी लोकांच्या मनात संशय आहे. साधुसंतांनी अनेक चमत्कार केले. मेलेली माणसे उठवली, (संत चांगदेवांनी), देऊळ फिरवले (औंढ्यानागनाथाचे संत नामदेवांनी), रेड्यामुखी वेद वदवला, भिंत चालवली (संत ज्ञानेश्वर), दगडी नंदीला चारा खाऊ घातला व त्यालाच गंगेत समाधी घेण्यास सांगितली (संत एकनाथ), एका मुसलमान संताने (भक्तिविजय) तर चित्रातील श्रीकृष्णाला विडा खावयास दिला व त्याने तो खाल्ला. असे एक का अनेक चमत्कार संतांकडून घडले आहेत. तेव्हा हे शक्य आहे का? आणि बुद्धिवादी लोक विज्ञानाने ते सिद्ध करण्याविषयी नेहमी आग्रह धरतात. एका गोष्टीचे नेहमी आश्चर्य वाटते की असे जे म्हणतात ते कधीही त्याच्या सत्यतेविषयीचा विचार करून स्वत: तशी मेहनतही घेत नाहीत. दुसऱ्यावर आरोप करावयाचे व ते सिद्ध करण्याची जबाबदारीही दुसऱ्यावरच टाकावयाची आणि आपण

स्वत: मोकळे व्हावयाचे. जे खरे जिज्ञासू असतात ते तसे नसतात. ते दुसऱ्याचे ऐकतात व त्यात कितपत खरेपणा आहे याचा विचार करून व स्वत: तसे प्रयोग करून अनेकांच्या मुलाखती घेऊन ते खरे-खोटे अजमावून पाहतात. अर्थात हे काम बहुतांशी परदेशी लोकच करतात. तसेच या अतींद्रिय शक्तीविषयी 'आर्यभट' यांनी 'सकाळ' दि. २७.३.९९ रोजी एक माहिती दिली आहे. त्यातील सारांश खालीलप्रमाणे आहे. 'वॉशिंग्टन'-अमेरिकेतील पेन्सिल्व्हानिया विद्यापीठातील शास्त्रज्ञांनी अतींद्रिय शक्तीविषयी अतिशय गांभीर्याने संशोधन केले आहे. शास्त्रज्ञांच्या मते, प्रत्येक व्यक्तीमध्ये अतींद्रिय शक्ती असते. या अतींद्रिय शक्तीचा संबंध माणसाच्या विशिष्ट मानसिक अवस्थेशी आहे. अतिशय तीव्र विद्युतचुंबकीय क्षेत्रामध्ये अतींद्रियशक्ती जागृत केल्यास एखादी व्यक्ती बशा, कप, प्लॅस्टिकच्या बाटल्या, चाकू अशा वस्तू आपोआप हलवू शकते. हे शास्त्रज्ञांनी प्रयोगशाळेत सप्रमाण दाखवून दिले आहे. मनाची एकाग्रता साधल्यास अतींद्रिय शक्ती जागृत करता येते असे त्यांचे म्हणणे आहे. प्रयोगशाळेत कृत्रिम रीत्या निर्माण केलेल्या विद्युतचुंबकीय क्षेत्राच्या मदतीने मनाची एकाग्रता साधून जर आजूबाजूच्या वस्तू आपोआप हलवता येऊ शकतात, तर या चमत्कृतिपूर्ण घटनांचा उपयोग करून एका ठिकाणी बसून वेगवेगळी यंत्रे आपोआप चालवता येतील असे मत शास्त्रज्ञांनी व्यक्त केले.'

संत ज्ञानदेवांनी ज्ञानेश्वरीच्या सहाव्या अध्यायात अशा प्रकारच्या काही सिद्धींचे वर्णन केले आहे. ते म्हणतात–

*'मग समुद्रापैलीकडील देखे। स्वर्गीचा आलोचु आईके। मनोगत ओळखे।*
*मुंगियेचे ॥ पवनाचा वारिका वळघे। चाले तरी उदकी पाऊल न लागे।*
*येणे येणे प्रसंगे। येती बहुता सिद्धि ॥'*

*(६.२६९, २७० ज्ञानेश्वरी).*

*देखे साधकु निघोनि जाये। मागां पाऊलांची वोळ राहे। तेथ ठायी ठायी होये।*
*आणिमादिक ॥ परि तेणे काय काज आपणपया।'*

*(६.१९७, १९८ ज्ञानेश्वरी).*

शेवटी संत ज्ञानदेव म्हणतात की 'आपणास या सिद्धींशी काहीच काम नसते. या सिद्धींसाठी ही साधना, तपश्चर्या नसते तर परमेश्वराप्रत पोचण्याच्या मार्गातील ही विश्रांतीस्थळे आहेत. येथे साधकाने थांबावयाचे नसते, त्यात रममाण व्हावयाचे नसते तर ध्येय गाठेपर्यंत सतत चालत राहिले पाहिजे, अशी संत ज्ञानदेवांची सूचना आहे.

इतर सर्व बाबतीत 'आपला तो बाळ्या व दुसऱ्याचे ते कार्टे' अशी सर्वांची धारणा असते पण आध्यात्मिक विषय निघाला की लोकांना आपल्याच 'बाळ्याची' लाज वाटते. आणि मग ते उलट बोलतात. 'आपले ते कार्टे व पाश्चिमात्यांचे ते बाळ'. नुसते बाळच नव्हे तर 'फारच सुंदर, गोंडस, गुटगुटीत' वगैरे. म्हणजे त्यांच्याकडील सर्व विशेषणे त्या बाळाला लावली जातात. कारण एकच, ते म्हणजे त्या बाळाला भौतिक सुखाचे बाळसे आलेले असते. जास्त टॉनिक देऊन लहान मुले एकदम गुटगुटीत होतात. पण त्यांचे ते टॉनिक बंद झाले व ती मुले पुढे मोठी होऊ लागली, की थोड्याच दिवसांत ती हडकून मूळ प्रकृतीवर येतात. पण निसर्गत: पोसलेले बाळ जरी गुटगुटीत झाले नसले, तरी त्याची प्रकृती ही चांगलीच ठणठणीत असते, ती सर्व प्रकारच्या रोगांचा उत्तम प्रतिकार करते व कायमस्वरूपी दमदार व घट्ट शरीरयष्टी तयार होते.

अगदी हीच स्थिती, गेल्या शंभर वर्षांत वैज्ञानिक प्रगतीने जे एकदम बाळसे धरले आहे (अर्थात ते वाईट नव्हेच); त्यापुढे आपले आध्यात्मिक बालक (त्याला बालक म्हणणे चूक आहे. कारण आपल्या आध्यात्मिक परंपरेला हजारो वर्षांचा इतिहास आहे) फारच कृश वाटते. पण कित्येक हजार वर्षांची त्याची प्रकृती ठणठणीत असूनही त्याच्याविषयी कोणाला आपुलकी वाटत नाही. हे आश्चर्य आहे. कोणताही आध्यात्मिक, पौराणिक विषय काढला की बुद्धिवादी त्याला पुरावा मागतात व तो पुरावा सर्वसामान्यांजवळ नसल्याने त्यांच्यावर गप्प बसण्याची पाळी येते. पण जे विज्ञानवादी आहेत, त्यांच्या कोणाजवळही अशी आस्था नाही की 'ठीक आहे वेद-पुराणामध्ये जे काही म्हटले असेल त्याप्रमाणे प्रयोग करून पाहावा व त्यातून काय निष्पन्न होते त्यावर त्याचा निकाल लावता येईल.' पण या बाबतीत खरोखरच पाश्चिमात्य लोकांमध्ये उत्सुकता आहे. त्यांनी तसे प्रयोग केले व पूर्वीच्या वेद, पुराण, उपनिषदे वगैरे ग्रंथांमधून नमूद केलेले चमत्कार हे चमत्कार नसून विज्ञानाच्या प्रयोगाने सिद्ध होणारी गोष्ट आहे हे त्यांनी कबूल केले आहे.

अशाच प्रकारची उत्सुकता मनात धरून कॅलिफोर्निया विद्यापीठातील प्राध्यापकाने केलेल्या प्रयोगाची माहिती श्री. अरुण बापट यांनी 'सकाळ' २८.२.९८ शनिवारच्या अंकात दिली आहे. त्याचा संक्षिप्त भाग खालीलप्रमाणे–

'काही शास्त्रज्ञांना ब्रह्मज्ञान प्राप्त झाल्यास वैज्ञानिक ज्ञान सहज प्राप्त होते हे कॅलिफोर्निया विद्यापीठातील एका पदार्थविज्ञानाच्या प्राध्यापकाने (त्यांचे नाव फिलिप्स असे आहे) १९८० ते १९९२मध्ये 'एक्स्ट्रा सेन्सरी परसेप्शन ऑफ क्वॉर्क' व

'रिसेंट क्लेअरव्हायंट ऑब्झरव्हेशन ऑफ सब ॲटॉमिक पार्टिकल्स' या दोन पुस्तकांत नमूद केले आहे. गेल्या काही वर्षांपूर्वी क्वॉर्कचा शोध फर्मी प्रयोग शाळेत लागला. (Quark) क्वॉर्क हा एक अतिसूक्ष्म कण (Partical) आहे. सध्या उपलब्ध असलेल्या छापील पुराव्यानुसार क्वॉर्कची पूर्ण कल्पना गेल्या शतकात ब्रह्मज्ञान प्राप्त झालेल्या दोन व्यक्तींना होती. १८९५मध्ये अणुविज्ञान व अणुरचना यांची काहीच कल्पना नव्हती. प्रख्यात तत्त्ववेत्त्या माननीय ॲनी बेझंट व त्यांचे सहाध्यायी सी. डब्ल्यू. लीडबिटर यांना ब्रह्मज्ञान प्राप्त झाले होते. अशा अवस्थेत पोचल्यावर त्या व्यक्तीला हवे असेल त्या क्षेत्रातील माहिती अथवा ज्ञान मिळू शकते. ब्रह्मज्ञान अवस्थेत कसे पोचायचे याचे शिक्षण वरील दोघांना भारतीय गुरूंनी दिले होते. त्यांना अणू अथवा द्रव्य (मॅटर) याची काय घटना असते ते पाहायचे होते आणि त्याप्रमाणे त्यांनी ध्यानामध्ये जाऊन पाहायला सुरुवात केली. त्यांना जे आढळून आले ते सर्व ज्ञान व माहिती थिऑसॉफिकल सोसायटीच्या 'ऑकल्ट केमेस्ट्रि' या प्रकाशनात १८९५मध्ये छापले आहे. त्यांच्या म्हणण्यानुसार हे सर्व त्यांना प्राप्त झालेल्या सिद्धीमुळेच होऊ शकले. ॲनी बेझंट व लीडबिटर यांना त्यांचे स्नेही व पत्रकार ए. पी. सिनेट यांनी विनंती केली की अणूची रचना व द्रव्याची घटना काय आहे हे त्यांना प्राप्त झालेल्या सिद्धीच्या साहाय्याने तपासावे. त्याप्रमाणे त्यांनी बघायला सुरुवात केली व जोपर्यंत पाहणे शक्य होते तेवढे त्यांनी पाहिले. जेव्हा पुढील काही दिसेनासे झाले ती अंतिम अवस्था, असा निष्कर्ष त्यांनी काढला. त्यांना त्या वेळी काय काय दिसले? त्यांना एकूण ९२ मूलद्रव्ये (एलिमेंट्स) आढळली. याचा प्रारंभ हायड्रोजनपासून होता व अंतिम मूलद्रव्य युरेनियम आढळले. यात त्यांना असेही आढळून आले की हायड्रोजन अणूमध्ये एकूण अठरा सूक्ष्म कण (सबॲटॉमिक पार्टिकल्स) आहेत. १९२०-३०च्या सुमारास बोर व श्रोडिंजर यांनी अणूच्या रचनेची कल्पना मांडली. त्यामध्ये एका हायड्रोजन अणूमध्ये एक प्रोटॉन व एक इलेक्ट्रॉन असे चित्र होते. त्या वेळी ॲनी बेझंट यांनी लिहिलेले हायड्रोजन अणूमध्ये १८ सूक्ष्म कण आहेत व युरेनियमच्या अणूमध्ये ४२६७ सूक्ष्म कण आहेत या कल्पना चुकीच्या धरल्या गेल्या. तथापि क्वॉर्क या सूक्ष्म कणाचा शोध लागल्यावर प्रोट्रॉनमध्ये तीन क्वॉर्क आहेत हे आढळून आले आहे. आणखी काही वर्षांनी ही संख्या १८पर्यंत जाईल असे वाटते.

ॲनी बेझंट यांना दहा क्रमांकाच्या मूलद्रव्यात दोन समान गुणधर्म आढळले. त्यांनी त्यास निऑन व मेटानिऑन असे नाव दिले. १९१२मध्ये ॲस्टन या शास्त्रज्ञाने यास 'आयसोटोप'अशी संज्ञा दिली. यापासून आयसोटोप केमेस्ट्रीचा विकास झाला.

ॲनी बेझंट यांनी द्रव्याची अंतिम रचना कशी असते याची चर्चा करताना द्रव्य हे रंध्र अथवा बुडबुड्याच्या मालेसारखे असते असे वर्णन केले आहे. यांना एकूण १११ प्रकारचे सूक्ष्म अणू व मूलद्रव्ये आढळून आली आहेत. सध्या जे पिरियोडिक टेबल आहे, ते त्यांनी संपूर्णपणे वर्णन केलेले आहे. सुवर्ण या मूलद्रव्यात एकूण ३५४६ सूक्ष्म कण (ॲटॉमिक व सब ॲटॉमिक / सब न्यू क्लिअर पार्टिकल्स) आहेत असे लिहिले आहे. सध्याच्या क्वॉर्कचा विचार केल्यास वरील संख्या योग्य आहे असे दिसते. एकूण विवेचनावरून असे आढळून येते, की ब्रह्मज्ञानाने मिळवलेले अणूचे चित्र व सध्या आधुनिक तंत्रज्ञानाने प्राप्त झालेले अणूचे चित्र हे जवळजवळ सारखेच आहे. वरील सर्व माहिती ही १८९५मध्ये प्रसिद्ध झालेली आहे. कॅनडातील टोरांटो या ठिकाणी राहणारे रोनाल्ड कोबेन हे गृहस्थ ब्रह्मज्ञान अवस्थेस पोचले आहेत. रोनाल्ड कोबेन यांच्या ब्रह्मज्ञानाची परीक्षा घेण्यासाठी म्हणा अथवा जाणून घेण्यासाठी डॉ. फिलिप्स हे टोरांटो येथे गेले. त्यांनी बरोबर एका काचेच्या बाटलीत आठ वेगवेगळी मूलद्रव्ये ठेवली होती. बंद बाटलीकडे बघून त्यात असलेल्या विविध मूलद्रव्यांची अणुरचना रोनाल्ड यांनी ब्रह्मज्ञानाद्वारे सांगितली. ॲनी बेझंट व लीडबिटर यांनी अणूच्या रचनेसंबंधी दिलेले वर्णन हे रदर फोर्ड यांनी सांगितलेल्या अणुरचनेच्या आधी दोन वर्षे, बोर यांच्या हायड्रोजन थिअरीच्या पाच वर्षे आधी, चाडविक यांच्या न्यूट्रॉन शोधाच्या आधी चोवीस वर्षे, गेल-मान यांच्या क्वॉर्क शोधाच्या आधी छप्पन्न वर्षे सांगितले आहे. प्राचीन भारतीय विद्या आत्मसात करून ब्रह्मविद्या शिकून, सिद्धी प्राप्त करून ब्रह्मज्ञानाने अणूची रचना ॲनी बेझंट यांनी सांगितली. एवढेच नव्हे तर जे दिसले ते लिखित रूपात प्रसिद्ध केले. त्यामुळे भारतीय प्राचीनशास्त्रांना अमेरिकेत मान्यता प्राप्त झाली असे नव्हे तर इतर क्षेत्रांमध्येही याचा प्रभाव पडत आहे.

वरील लेखावरून ब्रह्मज्ञानाची व तेथपर्यंत घेऊन जाणाऱ्या अध्यात्ममार्गाची श्रेष्ठता कळून येते. हे देण्याचे एवढेच कारण आहे की, जे कोणी प्रयोगशील असतील त्यांनी या क्षेत्रात प्रयोग करून भारतीयांची पुरातन परंपरा जतन करावी, वाढवावी, सर्वांना त्यांची गोडी लावावी व एकूण जीवन हे शांत, सुख, आनंदमय करून टाकावे. कारण विज्ञानाने जी प्रगती होते ती भौतिक होते. त्यामुळे स्पर्धा, ईर्षा, द्वेष याचीच जोपासना होते, पण आध्यात्मिक प्रगतीने मनाचा विकास होतो. मनोविज्ञानाचा विकास होतो व परस्परांविषयी समता, बंधुभाव, आपलेपणा याची जाणीव वाढते. सर्वांठायी एकाच परमेश्वराची प्रचीती येते आणि हेच अखेर साधावयाचे आहे.

## PIP AURA SCAN
(The Centre for Human Energy Field Research, Pune)



Before Meditation (Time 15:35)



During Meditation (Time 15:38)

## अनेकविध रंगांचा समन्वय साधून छायाचित्रणाची पद्धत.
## (Polycontrast Interference Photography - PIP)

या पद्धतीच्या छायाचित्रणाचे इंग्लंडमधील संशोधक डॉ. हॅरी ओल्ड फिल्ड याविषयी माहिती देताना म्हणतात–

माणसाचे डोळे ज्याप्रमाणे काम करतात त्याच पद्धतीची कार्यप्रणाली येथे वापरण्यात आली आहे. अंधारात आपल्या दृष्टीच्या कक्षा कमी झालेल्या असतात, तर उजेडात त्या विस्तार पावलेल्या असतात. रंगांच्या प्रकाशलहरींमध्येही अशाच लांब व आखूड प्रकाशलहरी असतात. लाल रंगाच्या प्रकाशलहरी या लांब व आखूड प्रकाशलहरी या जांभळ्या रंगाच्या असतात. अशा या प्रकाशलहरींच्या लांबीच्या कमी-जास्तपणाचा फायदा घेऊन या छायाचित्रणाच्या तंत्राची रचना केली आहे.

या तंत्ररचनेत कॅमेरा हा डोळा, कॉम्प्यूटर हा मेंदू तर या दोघांना जोडणारी तार ही मज्जारज्जू होय. मानवी शरीर हे मन, आत्मा व स्थूल शरीर यांचे एक मोठे संयुग आहे. आपल्या शरीरातून ज्या शक्तीचे उत्सर्जन होत असते, ती शक्ती बाहेरील प्रकाशाशी मिळून जाते. त्यामुळे अनेक प्रकारचे संमिश्र रंग तयार होतात. ज्या द्रष्ट्यांना अशा संवेदना पाहण्याची शक्ती आहे, त्यांना ती प्रकाशवलये त्याच्या स्वरूपात दिसतात आणि अशाच प्रकारची शक्ती या यंत्रणेमध्ये आहे. याला विज्ञानभाषेत विद्युत चुंबकीय शक्ती असे म्हणतात. प्राचीन हिंदू ग्रंथांमधून, उपनिषदांमधून अशा प्रकाशवलयांची माहिती व चित्रणे आलेली आहेत.

मानवी शरीरात अशा प्रकारची सात शक्तिकेंद्रे आहेत. त्यांना सात चक्रे म्हणतात. १) मूलाधार, २) स्वाधिष्ठान, ३) मणिपूर, ४) अनाहत, ५) विशुद्ध, ६) आज्ञा व ७) सहस्त्रदल. या चक्रांमधून शरीराच्या त्या त्या पातळीवरील अवयवांना शक्ती पुरवली जाते. त्याचप्रमाणे या शक्तीच्या उत्सर्जनातून एका विशिष्ट प्रकाशाची वलये उत्पन्न होत असतात. ते त्या चक्रांचे खास रंग समजले जातात. रंगांची विशिष्ट स्पंदने या PIP पद्धतीमध्ये नोंदून त्याचे चित्रीकरण करण्याची खास योजना कॉम्प्यूटरमध्ये केलेली असते. या सात चक्रांमधील दलांची (पाकळ्यांची) संख्या विशिष्ट आहे. उदा. १) मूलाधार (४), २) स्वाधिष्ठान (६), ३) मणिपूर (१०), ४) अनाहत (१२), ५) विशुद्ध (१६), ६) आज्ञा (२) व ७) सहस्त्रदल (१०००) ही दले म्हणजेच त्या त्या चक्रांची 'सूक्ष्म सुसंगत स्पंदन शक्ती' आहे. त्याला 'प्रमाणित कंपन शक्ती' असेही म्हणतात.

ही सूक्ष्म स्पंदने साध्या डोळ्यांना दिसत नाहीत. संवेदनाक्षम लहरी जाणणाऱ्या द्रष्ट्यांना ती दिसतात, पण ते ती इतरांना दाखवू शकत नाहीत. या छायाचित्रीकरणाच्या शोधामुळे ती सर्वसामान्यांना पाहता येण्याची सोय झाली आहे व त्याची चिकित्सासुद्धा एका ठराविक पद्धतीने होत असल्याने सर्वांबाबत ती एकसारखीच असते. प्राण्यांमध्ये अशा संवेदनाक्षम लहरी जाणण्याची क्षमता आहे. उदा. कुत्र्याला काही संवेदनाक्षम लहरी समजतात, वटवाघुळाला काही वेगळ्याच तर मनुष्याला याहीपेक्षा वेगळ्या. त्यामुळे त्यांचे संबंध जुळवून घेणे अवघड जाते. तसे या छायाचित्रणाच्या बाबतीत घडू शकणार नाही.

कॉम्प्यूटरमध्ये बसवलेल्या खास यंत्रणेमध्ये (Software) विद्युत चुंबकीय स्पंदनांना विशिष्ट आकडे दिले आहेत. त्यांची नोंद करून चित्रीकरणाच्या वेळी पुन्हा त्या आकड्यांचे रंगात परिवर्तन करण्याची सोय केलेली आहे. त्यामुळे मानव, प्राणी यांच्या शरीरातील व शरीराबाहेरील उत्सर्जन होणारी शक्ती ही विशिष्ट रंगछटांमध्ये दाखवली जाते. यालाच PIP म्हणतात.

यामुळे त्या व्यक्तीविषयी खूप प्रकारचे ज्ञान प्राप्त होते. तरीही या रंगछटांचा उपयोग करून मानवी शरीराचे आरोग्य कसे आहे याची चिकित्सा या रंगछटांवरून केली जाते. त्यावर योग्य तो उपचारही करता येतो. तसेच पुढे होणारे आजारही या पद्धतीने कळतात व त्यावर अगाऊ उपचार करू शकतो.

चक्रांचे रंग

प्रत्येक चक्राचे रंग ठराविक असतात. ज्या वेळी एखादे चक्र अचूक काम करीत असते त्या वेळी त्या चक्राचा रंग जास्त प्रभावित दिसतो. हा नियम इतर सर्व चक्रे व त्याचे रंग या बाबतीत लागू पडतो, पण ज्या वेळी ते चक्र पूर्णपणे निर्दोष नसते, त्या वेळी मूळ रंग व त्याच्या आसपासचे रंग यांचे संमिश्र दर्शन या प्रकारच्या छायाचित्रणामध्ये दिसते.

*लाल रंग* – हा रंग मूलाधार चक्राशी निगडित आहे. तो कुंडलिनी शक्तीचे प्रतिनिधित्व करतो. हा रंग मूलाधार चक्रामध्ये तसेच सर्व शरीरभरातील विशिष्ट भागामध्ये दिसतो. ज्या वेळी प्राणशक्ती संतुलित असते त्या वेळी हे रंग अरुंद मार्गामध्ये दिसतात. जेव्हा प्राणशक्ती असंतुलित असते तेव्हा हे मार्ग रुंदावतात किंवा लाल रंगाचे चट्टेही दिसतात. समजा एखाद्या व्यक्तीला ज्या भागात आजार असेल, तर त्या भागातील चट्टे जास्त रुंदावलेले असतात. कदाचित सध्या जरी त्या भागात आजार नसला तरी पुढील थोड्याच अवधीत त्या ठिकाणी आजार होण्याची शक्यता असते. वैद्यकीय चिकित्सा केली असता केलेले असे अंदाज खरे झालेले आहेत.

*नारिंगी* – हा रंग स्वाधिष्ठान चक्राशी निगडित आहे.

*पिवळा* – हा रंग मणिपूर चक्राशी निगडित आहे. पण हा रंग PIP पद्धतीमध्ये निरीक्षण केले असता अनाहत चक्राशी निगडित दिसतो.

*हिरवा* – लोलकामुळे होणाऱ्या रंग विभाजनामध्ये ज्याप्रमाणे हिरवा रंग मध्यात दिसतो, त्याप्रमाणे हिरवा रंग हा या सप्तचक्रामधील मध्यात असलेल्या चक्राशी म्हणजेच अनाहत चक्राशी निगडित आहे. पण PIP पद्धतीमध्ये तो पुष्कळ वेळा मणिपूर चक्राशी निगडित असलेला दिसतो.

*निळा* – निळा रंग हा विशुद्ध चक्राशी निगडित आहे. तसा तो पाण्याशीही निगडित आहे. शरीरामध्ये ज्या ज्या ठिकाणी पाणी साठले जाते त्या त्या ठिकाणी निळा रंग प्रामुख्याने दिसतो.

*जांभळा* – आज्ञा चक्राशी हा रंग निगडित आहे.

*पांढरा* – हा रंग सहस्त्रदलाशी निगडित आहे. PIP पद्धतीमध्ये हा पांढरा रंग सर्वात जास्त प्रभावी स्पंदनशक्ती दर्शवतो. ज्या व्यक्तीचे हे चक्र संतुलित असेल त्याच्या डोक्यावर हा पांढरा रंग दिसून येतो.

*काळा रंग* – हा रंग कोणत्याही चक्राशी निगडित नाही. हा रंग प्राणशक्ती व तिचे स्पंदन नसलेल्या भागात दिसून येतो. प्रचंड औदासीन्य प्राप्त झालेल्या व्यक्तीच्या डोक्यावर हा रंग दिसून

येतो. तसेच ज्या भागातील पेशी मृतवत झालेल्या आहेत त्या भागातही PIP हा रंग काळा दाखवतो.

सर्वसाधारण निरीक्षण

PIP मध्ये फक्त रंग व रंगाचे मिश्रण पाहिले जाते असे नाही तर चक्राचे आकारमानही अभ्यासले जाते.

आकृतिबंध – जीवनशक्तीचे क्षेत्र हे एका विशिष्ट आकृतिबंधाचे असते व ते ठराविक ठिकाणीच असते. या PIPमधील चित्रीकरण हे दोन मितींमध्येच शक्य असल्याने शरीराची पूर्ण चिकित्सा होण्यासाठी शरीराच्या चोहो बाजूंनी याची चिकित्सा केली जाते. त्यामुळे चक्राचेही सर्व कोनांतून चित्रण करून अभ्यासता येते.

आकृती – चक्राच्या आकृतीचा विस्तार जेव्हा मोठा होतो त्या वेळी त्याची व्याप्ती शरीराबाहेरही जाते व जेव्हा त्याचा विस्तार लहान असतो त्या वेळी त्याची व्याप्ती केवळ केंद्राजवळच असते. चक्राच्या शक्तीचा आकार गोलाकार किंवा लंबगोलाकार असतो. त्या वेळी ते निर्दोष असतात पण जेव्हा त्याचा गोलाकार हा अनियमित वर्तुळाकार होतो, त्या वेळी त्या चक्रातील शक्तीची गती असंतुलित झाली आहे असे समजावे. हीच परिस्थिती जास्त काळ राहिली तर तेथे कोणता तरी रोग आहे वा उद्‌भवण्याची शक्यता आहे हे निश्चित समजावे. म्हणजेच त्या चक्राची व तेथील शारीरिक क्षमतेची, तेथील स्नायू, रक्तवाहिन्या यांची शक्ती कमी झालेली असते असे दिसते. (आध्यात्मिक साधना या चक्रातील शक्ती जागृत करून त्याचा विस्तार वाढवण्याचे कार्य करते. याचा खुलासा या पुस्तकात आला आहेच.)

तीव्र व मंद प्रकाश शक्ती

मानवी मेंदू व नेत्र यांच्या क्षमतेप्रमाणे अशा पद्धतीच्या (PIP) छायाचित्रणामध्ये या शक्तीच्या प्रकाशलहरींची तीव्रता व मंदपणा यांची निवड करता येते. काही रंगाकृती या इतरांच्या मानाने जास्त तीव्र असतात. हिरवा, नारिंगी व पिवळा हे रंग तीव्र असतात. शरीराची प्रतिकारशक्ती अतिउत्तम असून शरीरातील जीवनशक्तीचा समतोलपणा दर्शवला जातो, असा अर्थ होतो. याउलट लाल रंगाची तीव्रता हा दाट ऊर्जा संचाचा भाग किंवा जीवनशक्तीचा तीव्र असमतोल असून शारीरिक तक्रारी निर्माण होण्याची वा असण्याची शक्यता असते. या सर्व रंगांच्या मंद छटा जीवनशक्तीचा प्रवाह योग्य गतीने, उत्साहाने वाहात नसून शक्तीचा ऱ्हास होत आहे असे दर्शवतात.

तीव्र व मंद शक्तीच्या प्रकाशलहरी शरीराबाहेरही दिसू शकतात.

*सोबत ध्यानाला बसलेल्या व्यक्तीचा **PIP** पद्धतीने घेतलेला फोटो आहे. त्याच्या रंगवलयांचा विचार करता ती वलये नियमित लंबगोलाकार आहेतच पण ध्यानाला बसल्यामुळे उत्तेजित होणाऱ्या चक्रांच्या कारणाने रंगाच्या वलयाचे स्वरूपही बदलत गेलेले दिसून येत आहे. ही गोष्ट लक्ष वेधणारी आहे.*

'यद् गत्वा न निवर्तन्ते तद् धाम परमं मम ॥'

जीवन्मुक्त पुरुष जेव्हा आपला देह सोडतात, तेव्हा ते ब्रह्मपदाला जाऊन पोहोचतात. तेथे गेल्यावर त्यांना पुनरावृत्ती नाही. म्हणजे त्यांना पुन्हा जन्म नाही, ते पूर्णतया मुक्त होतात. असा एकदा मित्रांमध्ये चर्चेचा विषय होता, श्रीगीतेच्या वरील श्लोकाचा नेमका अर्थ काय होतो, या विषयीचा विचार चालू होता. त्या वेळी काही दृष्टान्तांचा आधार घेतला गेला.

संत ज्ञानेश्वर म्हणतात– 'का लवणाची कुंजरी। सुदलिया लवणसागरी। होयचि ना माघारी। परती जैसी ॥ नाना गेलिया अंतराळा। न येतीचि वन्हिज्वाळा ॥ नाही तप्तलोहौनि जळा। निघणे जेवी ॥' (१५.३१८ ते ३१९ ज्ञानेश्वरी). या ठिकाणी दिलेल्या दृष्टान्तामध्ये मिठाची बाहुली सागरात गेल्यावर विरघळून जाणार म्हणजे तिचे अस्तित्व मिठाच्या रूपात का होईना असणार. फक्त ते मीठ पाण्यात सूक्ष्मरूपाने अस्तित्वात असणार, पण मिठाची बाहुली या आकृतीला मात्र तेथे अस्तित्व असणार नाही. म्हणजे मिठाची बाहुली ही मुक्त झाली, असे म्हणता येईल. पुढच्या दृष्टान्तात अग्नीच्या ज्वाळा या अंतराळात विलीन होतात. त्याही परत येत नाहीत पण आकाररूपाने त्या ज्वाळा नसतातच. शिवाय अग्निज्वाळांच्या सर्व गुणधर्मासहित त्यांचे अस्तित्व संपलेले असते. म्हणजे अग्निज्वाळा मुक्त झाल्या, त्या नामरूपासहित झाल्या. त्यापुढील दृष्टान्तामध्ये तप्त लोहावर (तव्यावर) जर पाणी शिंपडले तर पाण्याची वाफ होऊन जाईल. म्हणजे पाणीपणाने जरी त्याचे अस्तित्व संपले असले, तरी वाफेच्या रूपाने त्या पाण्याचे अस्तित्व असणारच, पण त्या आकारमानाने व पाणीपणाने जी वस्तू होती ती मात्र मुक्त झाली असे म्हणता येईल. पण त्याच आकारमानाने ते पाणी पुन्हा निर्माण होऊ शकणार नाही हे निश्चित. म्हणजे वरील दोन्ही दृष्टान्तांत ज्या वस्तुमात्राचे अस्तित्व ज्या आकारमानात व वस्तुरूपात होते ते नाहीसे झालेले होते व ते वेगळ्याच आकारमानात व वस्तुरूपात परावर्तित, रूपांतरित झाले होते. म्हणजे येथे असे म्हणता येईल की मुक्ती ही त्या विशिष्ट आकारमानाला असते. कारण सृष्टीच्या नियमाप्रमाणे कोणतीही वस्तू नष्ट होत नाही, तर ती रूपांतरित होते. तर मग त्याचा अर्थ असा होईल की प्रत्येक रूपांतरित झालेली वस्तू ही मुक्त होते का? तर तसे नाही. कारण दृष्टान्ताचे अर्थ मर्यादित मर्यादेपर्यंत घेतले जातात. मग वरील श्लोक हा कोणासाठी आहे? तर तो फक्त मानवी मुक्तीच्या संदर्भात आहे. मग मानवी मुक्ती केव्हा होते व त्याचे स्वरूप कसे असते? त्याचे वर्णन करताना संत

ज्ञानेश्वर म्हणतात–'तेवि मजसी एकवाट। जे जाले ज्ञाने चोखट। तया पुनरावृत्तिची वाट। मोडली गा॥' (१५.३२० ज्ञानेश्वरी).

मानवेतर प्राणी या सर्व भोगयोनी आहेत. पण मनुष्यजन्मातच मुक्तीसाठी प्रयत्न करण्याची संधी आहे. त्यामुळे मुक्तीचा प्रश्न फक्त मनुष्याबाबतचा आहे. त्याला वरील ओवी उत्तर देते- 'जे ज्ञानाने शुद्ध झाले त्यांना पुनरावृत्तीची वाट मोडून गेलेली, बंद झालेली असते.' जे परमेश्वराशी, परब्रह्माशी एकरूप झाले त्यांना पुन्हा जन्म नाही. या ठिकाणीही संत ज्ञानेश्वरांनी अर्जुनाच्या रूपाने आमच्याच मनातील शंकेला उत्तर दिले आहे. परमेश्वराशी एकरूप झालेला जीव हा परमेश्वरापासून अलग राहतो का? म्हणजे सागरात विरघळलेले मीठ हे सूक्ष्म रूपाने अस्तित्वात असतेच. तसा जीव परमेश्वरात एकरूप होऊनसुद्धा सूक्ष्म रूपाने अस्तित्व राखून असतो का? यावर दृष्टान्त देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात–'फुलाजवळ भ्रमर गेला तर तो फूलच होऊन जात नाही किंवा लक्ष्यावर सोडलेला बाण लक्ष्याला लागल्यावर वेगळेपणानेच राहतो. या ठिकाणी दोन्ही वस्तू या एकमेकांपासून गुणधर्माने पूर्ण भिन्न आहेत तेव्हा त्यांच्यामध्ये एकरूपता होणे शक्य नाही. तेव्हा परमेश्वर आणि जीव हे दोन्ही भिन्न आहेत. मग तेही असेच वेगळे राहतील काय?' याला उत्तर देताना संत ज्ञानेश्वर म्हणतात– 'जे विवेके खोले पाहिजे। तरि मी तेचि ते सहजे। ना आहाचवाहाच तरि दुजे। ऐसेहि गमती॥ जैसे पाणियावरी वेगळ। तळपता दिसती कल्लोळ। एऱ्हवी तरी निखिळ। पाणीचि ते॥ कां सुवर्णाहूनि आने। लेणे गमती भिन्ने। मग पाहिजे तंव सोने। अवघेचि ते॥ तैसे ज्ञानाचिये दिठी। मज अभिन्नचि ते किरीटी। येर भिन्नपण ते उठी। अज्ञानास्तव॥' (१५.३३१ ते ३३४ ज्ञानेश्वरी). पाण्यावर दिसणाऱ्या लाटा या आकारमानाने वेगळ्या भासतात पण ते केवळ पाणीच असते. अलंकारामध्ये तर केवळ सुवर्णच असते. पण आकारमानाने ते वेगवेगळे भासतात. लाटांमध्ये पाणी पाहणे, अलंकारात सुवर्ण पाहणे ही ज्ञानदृष्टी होय. त्याचप्रमाणे सृष्टीतील विविधतेत परमेश्वरी स्वरूप पाहणे ही ज्ञानदृष्टीच होय. अज्ञानीपणामुळेच सृष्टीतील विविधता दिसते. त्याचप्रमाणे जे परमेश्वरस्वरूप झाले, जे ज्ञानप्राप्तीमुळे शुद्ध झाले, ते देहत्यागानंतर परमेश्वरस्वरूपच होतात. परमेश्वराशी एकरूपच होतात. त्यांना कधीच पुन्हा जन्म घ्यावा लागत नाही. जसे पाण्यामध्ये पाणी, दुधामध्ये दूध सहजपणे एकरूप होते, त्याचप्रमाणे ज्ञानाने शुद्ध झालेला जीव हासुद्धा परब्रह्माशी एकरूप होतो. त्याचे वेगळेपण अस्तित्वात राहात नाही. जे शेवटच्या जन्मी जीवन्मुक्त अवस्थेला पोहचतात, त्याच जन्मात ते परमेश्वरस्वरूप झालेले असतात. ते मृत्यूनंतर,

देहत्यागानंतर अन्य कोठे जाणार? तर ते परब्रह्मस्वरूपच होणार. त्यांना पुन्हा जन्म नाही. त्या ब्रह्मधामाचे वर्णन करणारा एक मंत्र कठोपनिषदात आहे. तो असा–

*'न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकं नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ।*
*तमेव भान्तं अनुभाति सर्वं तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥'*

अर्थ – तेथे न सूर्य प्रकाशतो, न चंद्र-तारका, विजाही तेथे चमकत नाहीत, तर मग हा अग्नी कोठून चमकणार? त्या प्रकाशणाऱ्याच्या मागोमागच त्याला अनुसरूनच सर्व प्रकाशते. त्याच्या प्रभेने हे सर्व प्रकाशित होते.

## ब्रह्मरूप झाली काया

साधकाची, भक्ताची शेवटच्या जन्मातील शेवटची अवस्था असते ती जीवन्मुक्त दशा, विदेही अवस्था, ब्रह्मरूप, बालपिशाच्च अवस्था, ब्रह्मीभूत अवस्था अशा प्रकारच्या विशेषणांनी वर्णन केली जाते आणि त्याचा मृत्यू- खरे म्हणजे त्याला मृत्यू न म्हणता ब्रह्मामध्ये लीन होणे, ब्रह्मरूपाशी एकरूप होणे, ब्रह्मरूपात लय पावणे वगैरे असेच काहीसे म्हणावयास पाहिजे. कारण जेथे मृत्यू तेथे पुन्हा जन्म आलाच, पण या महात्म्यांना पुन्हा जन्म नसतो. त्यामुळे त्याला मृत्यू म्हणता येत नाही. लाट समुद्रात लीन होते. लय पावते, असे आपण म्हणतो. कारण जी लाट समुद्रात मिळून गेली. तीच पुन्हा उत्पन्न होत नाही. तर दुसरी उत्पन्न होते. त्यामुळे लाटेचा समुद्रात मृत्यू होत नसून लय पावते असे आपण म्हणतो. त्याच प्रकारे अशा शेवटच्या अवस्थेत पोहचलेले महात्मे परब्रह्मामध्ये लय पावतात, मिळून जातात. आता यांच्या या शेवटच्या प्रक्रियासुद्धा वेगवेगळ्या असतात, असे आतापर्यंत ज्या ज्या संत सत्पुरुषांनी देह ठेवला त्याचे स्वरूप पाहता लक्षात येते. संत ज्ञानेश्वरादी भावंडांनी संजीवन समाधी घेतली. संत मुक्ताबाई वादळी चक्रातून आकाशात गेली. संत मीराबाई श्रीकृष्ण मूर्तीमध्ये मिळून गेली. संत कान्होपात्राने विठ्ठलासमोर देह ठेवला. संत तुकाराम सदेह वैकुंठाला गेले. संत एकनाथांनी जलसमाधी घेतली. अशा अनेक प्रकारे संतांनी आपले देह ठेवले आहेत. काही घटनांबाबत वाद होत आहेत, होत असतात व होत राहणारच. ते लोक म्हणतात हे शक्य आहे का? असते का? याला काही आधार आहे का? शास्त्रामध्ये याची काही चिकित्सा केली आहे का? तेव्हा या सर्व प्रश्नांची शक्य तितकी चर्चा पूर्वी आली आहेच. शिवाय येथेही थोडी माहिती देण्याचा शास्त्राधार प्रयत्न केला आहे. असो. श्रुती म्हणतात–

*१) आथाकामाय मनो यो कामो निष्काम आप्तकाम आप्त कामो*
*न तस्य प्राणा उत्क्रामन्ति ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति ॥६ ॥*

*(बृहदारण्यक उपनिषद अं. ४ ब्रा. ४).*

अर्थ – अकामायमान - जो अकाम, निष्काम, आप्तकाम असतो. त्याचे प्राण उत्क्रान्त नाहीत. तो ब्रह्मच होऊन ब्रह्माला प्राप्त होतो. ज्या वेळी त्याच्या हृदयाचा आश्रय करून असलेले जे सर्व काम ते सर्वथा नाहीसे होतात; तेव्हा हा मर्त्य (शरीर) अमृत होतो. या शरीरात असतानाच ब्रह्मत्वास प्राप्त होतो.

*२) यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिता: ।*
*अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुते ॥१४ ॥*

अर्थ – ज्या वेळी त्याच्या हृदयाचा - बुद्धीचा आश्रय करून राहिलेले जे सर्व काम ते क्षीण होतात, त्या वेळी मर्त्य अमृत होतो. तो या शरीरातच ब्रह्म होतो. (कामाचा आश्रय आत्मा नव्हे, अंत:करण आहे. ज्ञानापूर्वी अंत:करणात राहणारे काम नष्ट झाले म्हणजे अविद्यावस्थेत मर्त्य असलेला साधक- ज्ञानोत्तर अविद्या- कामकर्म-रूप मृत्यूचा नाश झाल्यामुळे अमृत होतो व गमनाचे निमित्त जो मृत्यू त्याच्या अभावी दीपाच्या निर्वाणाप्रमाणे तो सर्व बंधरहित शांत ब्रह्म होतो).

*यदा सर्वे प्रभिद्यन्ते हृदयस्येह ग्रन्थय: ।*
*अथ मर्त्योऽमृतो भवत्येतावद्धि अनुशासनम् ॥१५ ॥*

*(कठोपनिषद अ २ व ३).*

अर्थ – जेव्हा जीवदशावस्थेतच हृदयाच्या सर्व ग्रंथी- दृढ अविद्या प्रत्यय भेद पावतात, तेव्हा मर्त्य अमृत होतो. सर्व वेदान्ताचा हा एवढाच उपदेश आहे. (सर्व विशेषरहित व सर्वव्यापी ब्रह्मच आत्मा आहे अशा ज्ञानाने ज्याच्या अविद्यादी सर्व ग्रंथी तुटल्या आहेत. त्या जिवंत असतानाच ब्रह्म झालेल्या विद्वानाला गती नाही. त्याला कोठे जावे लागत नाही. कारण चौदाव्या मंत्रात 'अत्र ब्रह्म समश्नुते।' असे म्हटले आहे. दुसऱ्या श्रुतीतही 'आत्मज्ञाचे प्राण त्याच्या शरीरास सोडून जात नाहीत तर तो स्वत: शरीरासह ब्रह्म होऊन ब्रह्मास मिळतो' असे म्हटले आहे.)

*३) कामक्रोधवियुक्तानां यतीनां यतचेतसाम् ।*
*अभितो ब्रह्मनिर्वाणं वर्तते विदितात्मनाम् ॥*

*(५.२६ भ. गी.).*

अर्थ – काम, क्रोध यांनी विरहित असलेले मन स्वाधीन केलेले आणि आत्मस्वरूपाला जाणारे पुरुष येथेच (या देहातच) ब्रह्म बनतात (जे देहीचि ब्रह्मत्वा आले।' ज्ञानेश्वरी) ब्रह्मरूप झाले.

त्याचप्रमाणे ब्रह्माच्या रंगात जिवाच्या रंगाचे मिश्रण या (शरीराच्या) मुशीत तयार होते. विविध भेद मावळल्यामुळे जीव-ब्रह्म ऐक्य दृढ झाले. त्यामुळे हा जीव आपल्या मूळ स्वरूपाला म्हणजे आत्मत्वाला प्राप्त झाला. सागरात पडलेला पाण्याचा लहानसा थेंब कोणत्याही उपायाने वेगळा काढता येत नाही. तो सागररूप होतो. त्याप्रमाणे जीव ब्रह्माशी ऐक्य पावल्यावर ब्रह्मरूप होतो. जीवरूपाने तो वेगळा असू शकत नाही. याला प्रमाण श्रुती देते. ते असे–

*यथोदकं शुद्धेशुद्धमसिक्तं तादृगेव भवति।*
*एवं मुनेर्विजानतः आत्मा भवति गौतम ॥*

*(कठ. उप. २.१.१५).*

यमराज नचिकेताला आत्म्याचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठी तसेच आत्म्याचे अलिप्तत्व सांगण्यासाठी वरील उदाहरण देत आहेत. यमराज म्हणतात–

अर्थ – जसे शुद्ध जलात टाकलेले शुद्ध जल त्याच्यासारखेच होते. हे गौतमा (नचिकेता) विज्ञानी, अनुभवी मुनीचा आत्मा तसाच होतो.

अशा प्रकारे जीवन्मुक्ताचा, विदेही स्थिती प्राप्त झालेल्या महात्म्याचा आत्मा ब्रह्मरूप झाला असला, तरी देहाला येणारा स्वाभाविक मृत्यू आलेला नसतो. तो तसाच संकल्पविरहित, वासनाविरहित अशा अवस्थेत असतो. त्याला दृष्टान्त देताना. कुलालचक्राचा दृष्टान्त देतात. ज्याप्रमाणे कुलालाने मातीचे भांडे तयार करण्यासाठी चक्राला गती दिलेली असते व ते भांडे पूर्ण होऊन काढून नेल्यावरही ते चक्र फिरत राहते. ते फिरणे जसे हेतूरहित, उद्देशाविना असते. तसे ब्रह्मरूप झालेल्या, आत्मसाक्षात्कार झालेल्या महात्म्याचे पुढील जीवन असते. त्याचीही अनुभूती या सर्व संतमंडळींची सारखीच असते. शब्द वेगळे असतील पण अनुभव तोच असतो.

ज्ञानयज्ञात त्रिगुणाचे हवन, देहत्रयाचे हवन होते. त्यानंतर उरला तो शुद्ध जीवात्मा- पिंजऱ्याबाहेर पडलेल्या राघूप्रमाणे निरंजन प्रदेशात मुक्त संचार करू लागतो. पूर्वसंचित व अवशेष कर्मभोग संपेपर्यंत 'आता दिवस चारी खेळी मेळी।' या नात्याने जनमानसात सामान्या प्रमाणे (देहधारी) तो महात्मा दिसू लागतो. हीच त्या

पुरुषांची दिव्य काया होय. त्यांचा देह सामान्य नसतो, तर तो पार्षद देह असतो. कापुराप्रमाणे अंतर्बाह्य सुगंध, शुद्ध ब्रह्ममय असतो.

*निरंजनी आम्ही बांधियले घर । निराकारी निरंतर राहिलेसे ॥१ ॥*
*निराभासी पूर्ण झालो समरस । अखंड ऐक्यास पावलो आम्ही ॥२ ॥*
*तुका म्हणे आतां नाही अहंकार । झाला तदाकार नित्य शुद्ध ॥३ ॥*

*(तु. म.).*

*'ब्रह्मैवाहं समं शान्तः सच्चिदानंदलक्षणः ॥'*

*(अपरोक्षानुभूती २४).*

'अशा या शुद्ध ब्रह्माच्या अधिष्ठानावर आम्ही घर बांधले व तेथे अखंड ऐक्याने निराकार रूपाने राहिलो आहे', असे संत तुकाराम सांगतात व श्रुतीही तेच सांगते–

*'अविभागेन दृष्टत्वात् ।'*

*(ब्रह्मसूत्र ४/४/४).*

अविभागेन = या मुक्तात्म्याची स्थिती ब्रह्माशी अविभक्त रूपाने होते.

दृष्टत्वात = कारण ही गोष्ट श्रुतिप्रमाण आहे.

*यथा नद्यः स्यन्दमानाः समुद्रे अस्तुं गच्छन्ति नामरुपे विहाय ।*
*तथा विद्वान्नामरुपाद्विमुक्तः परात्परं पुरुषमुपैति दिव्यम् ॥*

*(मंडूक उपनिषद)*

ज्याप्रमाणे एक सारख्या वाहात राहणाऱ्या गंगादी नद्या समुद्रास प्राप्त होऊन व नामरूप सोडून समुद्रात अस्तास, अदर्शनास, अविशेषात्म भावास प्राप्त होतात. तसा अविद्याकृत नामरूपापासून विशेषतः मुक्त झालेला पुरुष पूर्वोक्त पर अक्षराहून पर - दिव्यपुरुषास प्राप्त होतो. यालाही श्रुतीचे प्रमाण आहे.

*स यो ह वै तत्परमं ब्रह्म वेद, ब्रह्मैव भवति ।*

*(मुंडक उप. ३/२/९)*

अर्थ – जो कोणी या लोकी (अनन्य भक्तीने) त्या परमब्रह्माला 'साक्षात मीच ते आहे' अशा प्रकारे (स्वानुभवाने) जाणतो तो ब्रह्मच होतो.'

## ब्रह्मप्राप्तीची दुर्लभता

जीवन्मुक्त, विदेही अवस्था यांचे वर्णन आतापर्यंत झाले. जीवन्मुक्ताच्या ठिकाणी असलेली गुणवत्तेची यादीही पाहिली गेली आणि त्यातील अवघडपणाही लक्षात आला. जीवन्मुक्ती प्राप्त करणे खरोखरीच अवघड आहे. हे केवळ आपल्यालाच वाटते असे नाही तर ते सर्वांनाच वाटते. जीवन्मुक्त दशा ही जन्मोजन्मीच्या तपश्चर्येने प्राप्त होणारी अवस्था आहे. जन्मोजन्मीची गोष्ट काढली की आपल्या अंगावर काटा येतो व आपण त्याचा नाद सोडून देतो. वाटते, जी गोष्ट अनेक जन्मांनंतर मिळणारी आहे, तिच्यासाठी प्रयत्न करणे मूर्खपणाचे आहे. या जन्मी मिळणारी सर्व सुखे सोडून द्यावयाची व मृगजळामागे धावायचे हा वेडेपणा कोण करेल? असे म्हणून आपण विषयसुखाच्या मागे धावत राहतो. ते सुख भ्रामक व क्षणभंगुर आहे याची प्रत्येक जन्मात शेवटी शेवटी जाणीव होत राहते. तरीही त्या भ्रामक व क्षणभंगुर सुखासाठी आपण जन्मोजन्मी धावावयास तयार असतो. ते सुख आपणास कधीही मिळणार नाही याची आपल्याला थोडीबहुत कल्पनाही आलेली असते. तरीही त्याचा मोह सुटत नाही. पण जे सुख, शाश्वत सुख मिळाल्यावर आपणास निरंतर आनंद मिळणार असून या जन्म-मरणाच्या चक्रातून सुटण्याची शक्यता असते. त्यासाठी मात्र आपण काही जन्म परमेश्वराच्या उपासनेमध्ये, घालवावयास तयार होत नाही. ही जीवन्मुक्त स्थिती प्राप्त करून घेण्याचा अभ्यास अवघड आहे यात शंका नाही. पण खाली वर्णन केल्याप्रमाणे आपण निश्चितपणे कोठे उभे आहोत याचा विचार केल्यास आतापर्यंत आपले निश्चितच खूप जन्म गेले आहेत व आता केवळ हाताच्या बोटावर मोजण्याइतकेच जन्म बाकी आहेत याची जाणीव होईल. तेव्हा आता याविषयी कोणी काय काय म्हटले आहे ते पाहू.

श्री आद्य शंकराचार्यांनी त्यांच्या 'विवेकचूडामणी'मध्ये जीवन्मुक्तीच्या अवघडपणाचे वर्णन करून ठेवले आहे. संत तुलसीदासांनी 'तुलसी रामायणा'मध्ये श्रीप्रभू रामचंद्रांनी भृशुंडीला केलेल्या उपदेशामध्येही ते वर्णन आले आहे, तर भगवंतांनी अर्जुनाला केलेल्या गीतेच्या उपदेशातून व काही उपनिषदांमधूनही वर्णने आली आहेत.

*जन्तूनां नरजन्म दुर्लभम् अतः पुंस्त्वं ततो विप्रता ।*
*तस्मात् वैदिक धर्ममार्गपरता विद्वत्तम् अस्मात् परम् ॥*

*आत्मानात्म विवेचनं स्वनुभावो ब्रह्मात्मना संस्थितिः ।*
*मुक्तिर्नो शत जन्मकोटी सुकृतैः पुण्यैर्विना लभ्यते ॥*

*(विवेकचूडामणिः श्रीमत् शंकराचार्य).*

८४ लक्ष योनींपैकी ८० लक्ष योनी या वनस्पती, जलचर, कीटक, मृग, प्राणी, पक्षी अशा जन्मांमध्येच जातात. या सर्व भोग योनी आहेत. आपल्या प्रारब्धाप्रमाणे जेव्हा आपले भोग संपून पाप-पुण्याचा भाग समसमान होतो, त्या वेळी नरजन्मामध्ये प्रवेश मिळतो. म्हणजे नरजन्म मिळणे किती दुरापास्त आहे याची कल्पना येते. वरील श्लोकात नरजन्मामध्ये पुरुष जन्माचे महत्त्व सांगितले आहे. त्या अर्थी नरजन्मामध्ये जिवाला प्रथम स्त्रीजन्म मिळत असावा असे दिसते. तसे एकूण परिस्थिती पाहताही पुरुषजन्मापेक्षा स्त्रीजन्म हा अधिक कष्टाचा, त्रासाचा, दुःखाचा व परावलंबी असा आहे. स्त्रीलाच संसाराची जास्त आवड असते. तीच संसारात जास्त रममाण होते व तीच संसारात जास्त अडकून राहाते, असते. भगवंत गीतेमध्येही हेच सांगतात–

*मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।*
*स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥*

*(९.३२ भ. गी.).*

असे म्हटले आहे. यावरून स्त्रीजन्म हा नरजन्मातील प्रवेशद्वार असे वाटते. पण स्त्री ही संसाराला इतकी बांधलेली असते की, शिवाय तिच्या स्त्रीत्वाच्या नैसर्गिक रचनेमुळे तिला तिची आध्यात्मिक प्रगती करून घेणे खूपच अवघड आहे, असेच दिसते. तरीही वृत्ती, स्वभाव सुधारणे हे कार्य स्त्री करू शकते. 'यद् गत्वा न निवर्तन्ते तद् धाम परमं मम।' या प्रकरणात ज्या प्रगतीच्या टप्प्यांचे वर्णन आहे, त्यातील कितीतरी भाग स्त्रियांना आचरण्यास मोकळा आहे. त्यामुळे आध्यात्मिक दृष्ट्या स्त्रियांचीही खूप प्रगती होऊ शकते. अशा या प्रगत जन्मानंतर पुरुषजन्म प्राप्त होत असेल तर नरजन्मामध्ये तामस, राजस यांच्या गुणाधिक्याने अनेक जन्म गोते खावे लागतात. तेव्हा कोठे सात्त्विक गुणाचा उत्कर्ष होतो व तो सात्त्विक गुण धर्मग्रंथवाचनाने स्थिर होऊ पाहात असतो. निरनिराळ्या उपासना, अष्टांगयोगसाधना वगैरेंच्या आचरणाने शरीर, मन शुद्धी होत जाते. पुन्हा काही जन्म जातात. पुढे वैदिक ज्ञानाची ओढ लागून त्याचाही अभ्यास केला जातो व वैदिक धर्माचे आचरण करण्याची धारणा होते. यात काही जन्म जातात. अशा वैदिक धर्ममार्गपरायण असणाऱ्याला विप्र म्हणतात. विप्रता असूनही 'विद्वत्वम्' असणे हे भाग्याचे लक्षण होय. वेदांचे पठण हे

कितीही चांगले, उत्तम असेल तरीपण परमेश्वराविषयी जिज्ञासा असणे व परमेश्वराविषयीचा विचार करून आपण कोण? आपले व परमेश्वराचे काय नाते आहे? याचा शोध घेणे, याला त्यांनी विद्वत्ता म्हटले आहे. या जिज्ञासेतूनच पुढे 'स्व'चा अनुभव येऊ लागतो. सद्‌गुरूची भेट होते व आपणाला सद्‌गुरूचे मार्गदर्शन लाभते. सद्‌गुरूकडून आपणाला योग्य अशी वेळोवेळी उपासना मिळत राहते व एकदा आपणाला आत्मसाक्षात्कार होतो. आत्मसाक्षात्कार होतो ते आयुष्य हे त्या साधकाचे, सिद्धाचे शेवटचे आयुष्य असते. साक्षात्कारानंतरचे जीवन ही जीवन्मुक्त दशा होय, विदेही अवस्था होय. हे जीवन संपले की देहपातानंतर तो जीव ब्रह्मस्वरूप होतो व मुक्त होतो.

विवेकचुडामणितील श्लोकाचा अर्थ हा असाच टप्प्याटप्प्याचा आहे.

प्राणिमात्रांचा जन्म – नरजन्म – पुरुषत्व – विप्रत्व – वैदिक धर्ममार्गपरायण – विद्वत्ता – आत्मानात्मविवेक – स्वानुभव – निरंतर ब्राह्मी स्थितीत – मुक्ती.

हा क्रम एकापेक्षा श्रेष्ठ, भाग्याने, पुण्याईने, विद्वत्तेने, साधनेने, भक्तीने, ज्ञानाने प्राप्त होणारा आहे व शेवटी भगवंत गीतेत म्हणतात त्याप्रमाणे 'मत् प्रसादात् तरिष्यसि।' परमेश्वराचा प्रसाद, कृपा प्राप्त झाल्यावर मुक्ती मिळते. हा सर्व प्रवास शतकोटी जन्मांचा आहे. पण आपण ज्या निष्ठेने, सातत्याने अभ्यास करू त्याप्रमाणे कोटी कोटी जन्म कमी कमी होत जातात व शेवटी काही जन्मांतच परमेश्वरी प्रसाद होण्याची वेळ येते.

प्रभू रामचंद्रांनी भृशुंडीला केलेला उपदेशही असाच आहे.

*मम माया संभव परिवारा। जीव चराचर विविध प्रकारा॥*
*सब मम प्रीय सब मम उपयाये। सबते अधिक मनुज मो हि भाये॥*
*तिन्ह मुहँ द्विजद्विज महँ स्रुतिधारी। तिन्ह महँ निगम-धर्म-अनुसारी॥*
*तिन्ह महँ प्रिय बिरक्त पुनि ज्ञाना। ज्ञानि हुँ ते अतिप्रिय बिज्ञानी॥*
*तिन्ह ते पुनि मोहि प्रिय निजदासा। जे हि गति मोरि न दुसरि आसा॥*

*(सप्तम सोपान - १२७ तुलसी रामायण).*

अर्थ – विविध प्रकारचे चराचर जीव हा माझ्याच मायेपासून उत्पन्न झालेला विस्तार आहे. ते सर्वच मला प्रिय आहेत. कारण सर्वांचाच मी जनक आहे. परंतु त्यांमध्ये मला मनुष्य सर्वांपेक्षाही अधिक आवडतो. मानवातही द्विज, द्विजातही

वेदपाठक, वेदपाठकांतही वैदिक धर्मानुसारी, त्यांमध्येही विरक्त मला प्रिय असूनही त्यांत ज्ञानी आणि ज्ञानाहूनही विज्ञानी (ज्ञानानुभवी) मला अधिक प्रिय आहे. या सर्वांहूनही मला अनन्यगतिक ज्याला इतरत्र आशाच नाही, असा भक्त मला प्रिय वाटतो. वरील दोघांमध्येही अशीच प्रगती दाखवली आहे.

चराचर जीव – मनुष्य – द्विज – वेदपाठक – वैदिक धर्मानुसारी – विरक्त – ज्ञानी – विज्ञानी (ज्ञानानुभवी) – भक्त.

ब्रह्मज्ञानी पुरुषाचे वर्णन करणारे सुभाषित खालीलप्रमाणे आहे-

*जन्मना जायते शूद्रः संस्कारात् द्विज उच्यते ।*
*वेदपाठी भवेद्विप्रो ब्रह्मजानाति ब्राह्मणः ।।*

जन्मतःच जीव हा शूद्र असतो. जन्मानंतर सबंध जन्मात त्याच्यावर एकूण चाळीस संस्कार होत असतात. त्यात पाचवी पूजेपासून ते मृत्यूनंतरचे तेराव्या-चौदाव्या दिवसांपर्यंत सर्व संस्कार येतात. त्यांतील मौंजीबंधन या संस्कारानंतर जिवाला द्विज म्हणतात. कारण त्याचा दुसरा जन्म झालेला असतो व नवीन नाव मिळालेले असते. म्हणून तो द्विज होय. हा संस्कार ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या तीनही वर्णांत करतात. पुढे वेदपाठी जो असेल त्यालाच विप्र म्हणतात व शेवटी ब्रह्मस्वरूपाचा ज्याला अपरोक्ष साक्षात्कार झाला असेल त्यालाच, आत्मानुभव आलेल्यास ब्राह्मण म्हणतात. ब्राह्मण हा संस्काराने प्राप्त झालेली अवस्था आहे. वरील सुभाषितामध्ये 'ब्रह्म जानाति ब्राह्मणः ।' असे म्हटले आहे. यामधे 'ब्राह्मणां'चा व ब्राह्मण जातीशी काही संबंध आहे असे वाटत नाही. कारण ब्रह्मज्ञानावर जीवन्मुक्त अवस्था प्राप्त होते व त्या अवस्थेचा विचार करता कितीतरी संतांची नावे डोळ्यांसमोर येतात. संत ज्ञानेश्वरादी भावंडे, जातीने ब्राह्मण होती तरी त्यांच्यावर कोणतेही (लौकिक) संस्कार झालेले नव्हते कारण ती संन्याशाची मुले होती. त्यानंतर संत नामदेव शिंपी, नरहरी सोनार, सेना न्हावी, गोरा कुंभार, सावता माळी, चोखा महार, तुकाराम वाणी, जनाबाई दासी, कान्होपात्रा वेश्या, मीराबाई मारवाडी, राजकन्या वगैरे. ही तर सर्व (जातीने) ब्राह्मणेतर होती. पण ब्रह्म जाणणारी होती म्हणून ती सर्व 'ब्राह्मण' म्हणावयास पाहिजे. पण या सर्वांनाही अनेक जन्मांच्या कठीण परिश्रमाने हे साध्य झाले होते असेच दिसते. यावरून 'ब्राह्मण'पण कोणालाही (ब्राह्मणेतर जातीशिवाय) प्राप्त होण्यासारखे असते असे दिसते. पण ते अनेक जन्मांनंतर.

भगवान श्रीकृष्णांनीही गीतेत असेच म्हटले आहे-

*'बहूनां जन्मनामन्ते ज्ञानवान्मां प्रपद्यते।'*
*वासुदेवः सर्वमिति स महात्मा सुदुर्लभः ॥*

*(७.१९ भ. गी.).*

संत ज्ञानेश्वरांनीही ब्रह्म होण्याला शत जन्मांची जरुरी आहे असे म्हटले आहे. 'का शत एक जन्मा। जो जन्मोनि ब्रह्मकर्मा। करि तोचि ब्रह्मा। आनु नोहे॥' (१५.३० ज्ञानेश्वरी). पुढे एक सापशिडीचा खेळ दिला आहे. ज्ञानेश्वर साधू यांनी करमणुकीसाठी रचलेला हा खेळ असेल. त्यावर निवेदन दिलेले आहे. त्यामधील घरे व त्यांना दिलेली नावे याचा विचार करता ब्रह्मप्राप्ती किती दुर्लभ आहे लक्षात येते. हा खेळ असला तरी त्यातही ब्रह्मप्राप्ती अवघड आहे. यात सापाची तोंडे आहेत. त्या ठिकाणी अविवेक, द्वेष, दृष्टमोह, ज्ञानमोह, अहंकार आणि अहंकारातही सात्त्विक, राजस, तामस असे स्पष्ट वेगळे दाखवले आहेत. पहिला अहंकार हा सर्वसामान्य अहंकार असावा पण शेवटचे तीनही अहंकार हे ज्ञानप्राप्तीनंतरचे असावेत. कारण त्या अहंकारांच्या तोंडी गेलेले एकदम खाली. म्हणजे राजस अहंकारामुळे होणारे अधःपतन शून्यात होते म्हणजे काहीच शिल्लक राहात नाही, तर सात्त्विक अहंकार व तामस अहंकारामुळे होणारे अधःपतन हे क्रोधात होते. कितीही मोठा विद्वान असो, त्याच्या ठिकाणचा अहंकार गेलेला नसतो. म्हणून या अहंकाराची जागा वरून दुसऱ्या ओळीत दाखवली आहे आणि साधकाचा सर्वांत मोठा शत्रू हा अहंकारच होय. अहंकाराने आलेल्या क्रोधामुळे केवढे अधःपतन होते हे या खेळातून दिसते.

ईशोपनिषदातही म्हटले आहे की–

*अंधं तमः प्रविशन्ति ये अविद्यामुपासते।*
*ततो भूय इव ते तमः ये उ विद्यायां रताः॥*

*(ईशा. ९ वा मंत्र).*

अर्थ – जे नेणिवेत गढून गेले, ते गाढ अंधारात शिरले. जे जाणिवेत रमले ते जणू त्याहून घोर अंधारात शिरले.

सापशिडीच्या खेळात सर्वांत वरच्या ओळीमध्ये ७९व्या घरात वैकुंठ आहे. तेथून फक्त एक दान पडले तर मुक्ती मिळते. पण जर एकाहून अधिक दान पडले तर ब्रह्मलोक, विष्णुलोक, सत्यलोक, तपोलोक व पुन्हा वैकुंठ असा प्रवास करावा लागतो व जिवाची गती त्याच लोकातून होत राहते व कधीतरी मुक्तीची वेळ येते. आकाश या घरातून जर एकदम क्रियाशक्ती या घरात व त्यापुढील घरात जाण्याइतके दान पडले

तर साधकाला पुन्हा कधीही सापाच्या तोंडी जावे लागत नाही. याचा अर्थ क्रियाशक्ती या घरापासून जिवाला पुन्हा परत येणे होत नाही. मुक्तीपर्यंत जीव वरच्या वर घोटाळत राहतो असे दिसते.

कौषितकि उपनिषदामध्ये जिवाच्या गतीचे वर्णन केले आहे.

*स एतं देवयानं पंथानमापद्य । अग्निलोकं आगच्छति ॥*
*स वायु-लोकम् । स आदित्य-लोकम् । स वरुण-लोकम् ।*
*स इंद्र-लोकम् । स प्रजापति-लोकम् । स ब्रह्म-लोकम् ॥*
*स ब्रह्मालंकारेण अलंकृत: ब्रह्म विद्वान् ब्रह्म अभिप्रैति ॥*

अर्थ – तो देवयान मार्गाला प्राप्त करून अग्निलोकाला जातो. मग वायुलोकाला, मग आदित्यलोकाला, मग वरुणलोकाला, मग इंद्रलोकाला, मग प्रजापतिलोकाला आणि शेवटी ब्रह्मलोकाला पोहचतो. तो ब्रह्मालंकाराने आलंकृत झालेला ब्रह्माला जाणणारा, ब्रह्माभिमुख होतो.

या क्रमाचा विचार करता वरील सापशिडीचा खेळही वायुलोकातून शिडीच्या साह्याने वैकुंठात जाता येते व तेथूनच ब्रह्मप्राप्ती होते किंवा ब्रह्मलोक, विष्णुलोक वगैरे असे येणे-जाणे होऊन शेवटी मुक्ती मिळते.

## सारांश

### परब्रह्म ते परब्रह्म (आध्यात्मिक पातळीवर)

परब्रह्म – शबल ब्रह्म – पुरुष – प्रकृती – त्रिगुण (सत्त्व, रज, तम) – (महास्फोट) – पंचमहाभूते – (आकाश, वायू, तेज, आप, पृथ्वी) – उत्पत्ती – सजीव सृष्टीची सुरुवात – उद्भिज, मणिज, स्वेदज, जारज – (उत्क्रांतिवादाने हा क्रम) – जलचर (९ लक्ष), वनस्पती (२० लक्ष), कीटक (११ लक्ष), खेचर (पक्षी - १० लक्ष), मृग (जनावर - ३० लक्ष) – मनुष्य (४ लक्ष) – मनुष्यप्राण्यातील उत्क्रांती सुरू – प्रथम मानवी शरीरात जन्म (प्राणीजीवनातील संस्काराप्रमाणे प्रथम तमोगुणी वृत्तीमुळे आलेली गरज) – आहार, निद्रा, मैथुन – विकारी, दुष्ट बुद्धी, कुकर्मवान – सकाम कर्म (राजस गुणी) – सकाम पण चांगले कर्म – नित्य, नियमित, नैमित्तिक कर्म – शास्त्रविधिनिषेध पाळणारा, कर्तव्यतत्पर, ईशचिंतन – इंद्रिये व विषयावर नियंत्रण – कर्मफळ ईश्वरार्पण – कर्मच ईश्वरार्पण – निष्काम कर्म करण्याकडे प्रवृत्ती – नैष्कर्म्य सिद्धी प्राप्त होते – ईशचिंतनाचा काळ व वेग वाढतो – अभ्यासासाठी

ध्यानाची जरुरी – आहारविहारावर नियंत्रण – मनाची एकाग्रता वाढते – ज्ञान विज्ञानासहित प्राप्त होते – समाधीचा काल वाढतो – व्यष्टी समष्टी एकरूप होतात – परब्रह्म साक्षात्कार होतो – ईश्वरी साक्षात्कारामुळे वृत्ती प्रेमस्वरूप होते – प्रेमातून भक्ती वाढते – अभेद भावनेचा परमोच्च बिंदू गाठला जातो – अखंड समाधी अवस्थेत वावरतो – विदेही, जीवन्मुक्त अवस्था प्राप्त होते – देहपातानंतर परब्रह्मस्वरूप होतो.
*अशा प्रकारे वर्तुळ पूर्ण होते.*

विज्ञानाप्रमाणे जगाची उत्पत्ती व उत्क्रांती

(महास्फोट कशाचा झाला हे विज्ञानाला नक्की माहीत नाही)

महास्फोट – प्रोटॉन्स, इलेक्ट्रॉन्स, न्यूट्रॉन्स यांची निर्मिती – अणू – मूलद्रव्ये – दीर्घिका (Galaxis) – सूर्यमाला – पृथ्वी – सजीवाची सुरुवात (वरीलप्रमाणेच) – (उत्क्रांती तत्त्वाप्रमाणे) वनस्पती, प्राणी, मनुष्य यांची निर्मिती – पुढे मानवाची भौतिक प्रगती (विज्ञानामध्ये मनाला स्थान नाही, भौतिक प्रगतीचा शेवट कशात आहे? मनुष्याच्या जीवनाचे नेमके ध्येय काय आहे? मनुष्याची ही भौतिक प्रगतीची धडपड कशासाठी आहे? सुखासाठी असेल तर भौतिक प्रगतीने कोणत्या प्रकारचे समाधान मिळते? व ते सुख शेवटचेच असेल काय?)
*यावरून विज्ञानाने वर्तुळ पूर्ण केले नाही.*

वरीलप्रमाणे आध्यात्मिक पातळीवर विचार केला असता निर्गुण निराकार परमेश्वर सगुण साकार कसा झाला? सूक्ष्मातीत सूक्ष्म परमेश्वर स्थूल रूपात कसा अवतरला व तो सर्व विश्वात, सृष्टीत, प्राणिमात्रांत, वनस्पतींत कसा भरून राहिला आहे याची कल्पना येते. स्थूल रूपात असलेल्या सृष्टीत जे चैतन्यमय आहे ते परमेश्वराचे स्वरूप आहे. प्रत्येक स्थूल रूपसुद्धा बदलत असते. म्हणजे त्यात सातत्याने बदल होत जातो. याचा अर्थ त्यात सूक्ष्म रूपाने चैतन्य असते. ते विज्ञानभाषेत इलेक्ट्रॉन, न्यूट्रॉन, प्रोटॉनच्या रूपात आहे, तर आध्यात्मिक भाषेत सत्त्व, रज व तमरूपाने आहे. हे ज्या वेळी आपल्या जाणिवेत, अनुभवात, अनुभूतीत येईल त्या वेळीच आपणास परमेश्वराचा साक्षात्कार होईल. सर्वांठायी समभाव निर्माण होईल. 'निर्वैरः सर्वभूतेषु।' अशी आपली वृत्ती होईल. हीच जीवन्मुक्त विदेही अवस्था होय. कारण या भावात स्वतःचे वेगळेपण विसरले जाते आणि हीच प्रक्रिया होणे हे जीवनाचे ध्येय आहे. मुक्तीची अवस्था आहे. वासनाशून्यता आहे. हीच परमेश्वराची स्वरूपता आहे.




## ज्ञानेश्वर साधु यांनी करमणुकीसाठी बनविलेला खेळ

हा खेळ दोघांना किंवा चौघांना खेळता येतो. जितके खेळणारे असतील तितकी निरनिराळ्या रंगाची प्यादी किंवा फलादि अन्य पदार्थ घेऊन ते पहील्या घरात ठेवावे. नंतर ७ कवड्या घेऊन त्या जमिनीवर टाकाव्या. जितक्या उताण्या पडतील तेवढ्या संख्येइतके दान पडले असे समजून खेळणाऱ्याने दान लावावे. आकड्यांच्या अनुक्रमाने पुढे ज्या घरी प्यादे घावयाचे असेल, त्या घरी जर सर्पाचे मुख असेल तर ते प्यादे सर्पाचे पुच्छ असेल त्या घरी ठेवावे. उदा. १४वे घरी घावयाचे असल्यास ५वे कोष्टकांत ठेवावे. याचप्रमाणे १९ । २२ । २५ । ४२ । ७२ । ७३ या घरी प्यादे येत असल्यास अनुक्रमाने १८ । १५ । १२ । २४ । १८ । १३ या घरी ठेवावे आणि ५६ या घरी घावयाचे असेल तर एकदम ७९ वे घरी ठेवावे. अनुक्रमाने किंवा ५६ घरावरून प्यादे ७९ या वैकुंठ घरी पोहचल्यावर फक्त एकाचे दान पडेल तर मात्र मोक्षघरी ठेवावे. एकाहून अधिक दान पडल्यास उजवे हातास ८३ पर्यंत घरे मोजून घावी. दान संपले तर पुन्हा ७९ पर्यंत मोजावे. ७९ या घरांत येऊन जर फक्त १च दान पडले तर तो मोक्षास गेला. नाही तर पुन्हा ७९ पासून ८३ व तेथून मागे ७९ पर्यंत भ्रमण करावे.

मोक्ष ८४

टीप: या खेळात, मनुष्यप्राण्यास मोक्षास जाण्यास किती स्थाने मध्ये आहेत हे सुचविले आहे. अविवेक, द्वेष, दुष्टमोह, ज्ञानमोह, अहंकार, तामसअहंकार, राजसअहंकार, क्रियाशक्ति यांत अडकला तर तो महापातक, क्रोधसमुद्र, संसार, स्थूलदेह, क्रोध, शून्य, याते पावतो व ज्यास समाधि सापली तो वैकुंठास जातो. तेथून मोक्ष प्राप्त न झाला तर ब्रह्मलोक, सत्यलोक, तपोलोक यांत फिरत राहातो असे सुचविले आहे. सोपान पटावरही ७ कवड्या याप्रमाणेच खेळतात.

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ७४ क्रियाशक्ति | ७५ ज्ञानशक्ति | ७६ त्रिगुण | प्रकृतिभाव ७७ | प्रकृतिमाया | वैकुंठ ७९ | ८० ब्रह्मलोक | ८१ विष्णुलोक | ८२ सत्यलोक | ८३ तपोलोक |
| राजस अहंकार ७३ | सात्विक, तामस अहंकार ७२ | आकाश ७१ | शब्द ७० | ६९ वाचा | श्रोत्र ६८ | ममः ६७ | प्राण ६६ | ६५ विश्वदेवता | भूर्लोक ६४ |
| योग ५५ | | वायु ५६ | ५७ स्पर्श | पाणी ५८ | त्वचा ५९ | बुद्धि ६० | अपान ६१ | वाग्देवता ६२ | भुवर्लोक ६३ |
| ज्ञानयोग ५४ | | तेज ५३ | रूप ५२ | पाद ५१ | घुघु ५० | चित्त ४९ | व्यान ४८ | सूर्य ४७ | स्वर्लोक ४६ |
| कर्मयोग ३७ | | गुरूपद ३८ | रस ३९ | शिश्न ४० | जिव्हा ४१ | अहंकार ४२ | उदान ४३ | अरूण ४४ | जनलोक ४५ |
| धर्मयोग ३६ | | पृथ्वीपुरूष ३५ | गंध ३४ | गुद ३३ | घ्राण ३२ | ३१ ज्ञान | समान ३० | २९ अश्विनीकुमार | महर्लोक २८ |
| द्वेष १९ | | सुख २० | हर्ष २१ | दुष्टमोह २२ | देहदीक्षा २३ | स्थूलदेह २४ | ज्ञानमोह २५ | सर्वदेवता २६ | अतलः २७ |
| क्रोध १८ | | देव १७ | दैव १६ | १५ समुद्र | अविवेक १४ | शून्य १३ | संसार १२ | सुखसंग ११ | वितल १० |
| जन्मस्थान १ | | संयोग २ | जीव ३ | उद्योग ४ | महापातके ५ | पाताल ६ | रसातल ७ | महातल ८ | सुतल ९ |

# विभाग ४ - परब्रह्माची नामे

## नाम व रूप यांचा अभेद

'उपजलिया बाळकासी। नांव नाही तयापासी। ठेविलेनि नांवेसी। ओ देत उठी॥' (१७.३३० ज्ञानेश्वरी). याचा अर्थ आधी रूप आणि मग नाम. बाळ जन्माला येते. मग त्याला नाव ठेवले जाते. आपण व्यवहारात म्हणजे बाळाचे नाव ठेवण्यात तसे काही तारतम्य बाळगत नाही. आई-वडिलांना जे नाव आवडते ते ठेवले जाते. त्या नावाचा आणि बाळाच्या ठिकाणी असलेल्या गुणांचा क्वचितच मेळ जमतो. म्हणूनच म्हणतात ना 'नाव सोनुबाई हाती कथलाचा वाळा.' पण परमेश्वराला दिलेल्या नामाचा व त्याच्या ठिकाणी असलेल्या गुणांचा निश्चितपणेच विचार केलेला असतो. एवढेच काय पण परमेश्वराची नावे व त्याचे गुण तसेच त्याचे रूप यांत अभेदच असतो, इतकी ती एकमेकाला साजेशी असतात. परमेश्वराचे रूप दिसताच त्याच्या नामाचे स्मरण व्हावे वा परमेश्वराचे नाम घेतल्यावर त्याचे रूप डोळ्यांसमोर उभे राहावे इतके ते एकमेकांवर अवलंबून असते, अभेद असते आणि म्हणूनच भक्तांना नामरूपाच्या जोरावरच, साधना करून परमेश्वराचे सगुण दर्शन झाले आहे. याचेच वर्णन संत तुकाराम एका अभंगात करतात. की– अर्थ –भगवंताचे नाम व रूप ही दोन्हीही त्याचे 'अनध्यस्त विवर्त' आहेत. त्यामध्ये प्रधान व गौण असा भेदच नाही. अमृत व अमृताची गोडी यांत भेद नाही. तद्वतच हरी व हरिनाम हे दोन नाहीत. 'तुका म्हणे नाम वेदासी आगळे। ते दिले गोपाळे फुकासाठी॥' सगुण अवतार जसे निर्गुण ब्रह्माचे 'अनध्यस्त विवर्त'. त्याप्रमाणे भगवंतनामही श्रीहरीचे 'अनध्यस्त विवर्त' होय. अवतार जसे ब्रह्माहून भिन्न नाही, त्याप्रमाणे नामही ब्रह्माहून भिन्न नाही. तेसुद्धा ब्रह्मरूपच आहे.

*'नाम चैतन्याचा मुंढा। नाम परब्रह्माचा हुडा।*
*ब्रह्म नामाचिया पुढां। नाचे धडधडां स्वानंदे॥'*

*(भावार्थ रामायण सुंदर कांड - ७.७४).*

एकूण सर्वच ब्रह्मरूप आहे. नामरूपात म्हणजे स्थूल व सूक्ष्म विश्वरूपात काहीच भेद नाही, हेच सिद्ध होते.

## नामाधिष्ठित परब्रह्माचे स्वरूप

एका मोठ्या समारंभामध्ये जर एखाद्या व्यक्तीला शोधावयाचे असेल की जिला आपण पाहिलेले नाही, तर त्या व्यक्तीचे वर्णन तरी आपणास माहीत पाहिजे. त्या वर्णनात आपणास रंग, उंची, जाडी, ठेवण, केसांचा रंग, केसांची ठेवण, चेहऱ्याची विशिष्ट ठेवण, चेहऱ्यावरील खूण, चालण्याची ढब, कपड्यांची पद्धत, ठराविक कपड्याचा प्रकार, पायांत बूट, चप्पल वगैरे, बोलण्याची, हसण्याची लकब, एखादी सवय, वगैरे ही सर्व माहिती असेल, तेव्हा कोठे आपण ती व्यक्ती ओळखू शकतो, पण ज्याला शरीरधारणा आहे त्या व्यक्तीच्या बाबतीत हे सर्व ठीक आहे. पण निर्गुण, निराकार, व्यापक, देशकालस्थिती, अनिर्देश्य अशा परब्रह्माविषयी काय काय वर्णन करणार! ज्याची केवळ अनुभूतीच येते, ज्याचे अस्तित्वच केवळ जाणवते, जे सूक्ष्माहून अतिसूक्ष्म असून सर्वाठायी समभावाने ते पसरलेले आहे, अशी ज्यांना प्रत्यक्ष अनुभूती आलेली आहे, ज्यांना त्याचे अपरोक्ष ज्ञान झालेले आहे, असे कोणी सद्गुरू भेटले तर ते कृपा करून प्रत्यक्षानुभूती देऊ शकतील. ही नामेच परमेश्वराचे वर्णन आहे. पण जर कोणी भेटले नाही तर आपणास परमेश्वराच्या नामाचा अभ्यास करून त्याला शोधण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे. ही परमेश्वराची नामे आहेत असे म्हणावयाचे पण नाम जेथे असते तेथे रूप असतेच. रूपाशिवाय नाम असूच शकत नाही, पण येथे तर परमेश्वर निराकार, निरावयव, अरूप असाच आहे. मग त्याला नाम कसे असेल? आकाश ही वस्तू तरी कोठे आहे? तरी तिला नाम आहे, पण नामातच आकाशाचे स्वरूप, वर्णन आहे. तसेच वात्सल्य ही वस्तू तरी कोठे आहे? तसेच प्रेम, दया, क्षमा, शांती या वस्तू तरी कोठे आहेत, पण त्या प्रत्ययाला येणाऱ्या अवस्था आहेत. त्यामुळे त्यांना नावे आहेत. तसा परमेश्वर ज्यांना ज्यांना प्रत्ययाला आला आहे त्यांना तो जशा जशा पद्धतीने प्रत्ययाला आला आहे तसे तसे त्यांनी त्या परमेश्वराला नाम दिले आहे. त्यामुळे ही नामे त्या भक्तांच्या हृदयात साकारलेल्या रूपाची

असतील. त्यांनी अनुभवलेल्या भावांची असतील, त्यांना जाणवलेल्या कृत्याची असतील, त्यांच्या बाबतीत घडलेल्या घटनांवरून नावे दिली असतील. या सृष्टीकडे पाहिल्यावर दिसलेल्या प्रसंगावरून दिली गेली असतील. ज्याला जसा परमेश्वर भावला असेल तसे त्याने त्याचे वर्णन करून ठेवले आहे आणि त्याला अनेक नामे आहेत, तरी त्याचे सर्वतोपरी वर्णन पूर्ण झाले आहे असे नाही. आणखीही वेगवेगळी नामे त्याला मिळू शकतील. ही नामे म्हणजे परमेश्वराची विशेषणेच आहेत. ही एवढी अनेक नामे, विशेषणे कशासाठी दिली गेली, कारण परमेश्वर हा 'एकमेवाद्वितीय' असा आहे. त्याच्या सारखे, त्याच्या समान, त्याच्या तुलनेत, त्याला योग्य असे दुसरे उपमान वगैरे काही नाही. कारण शब्दाची, पदार्थांच्या अर्थाची व्याप्ती अतिशय मर्यादित असते, पण परमेश्वर त्या मर्यादित अर्थात सामावून जाण्यासारखा नसतो. म्हणून त्याच्या अर्थाची व्याप्ती वाढवण्यासाठी पुन्हा दुसऱ्या विशेषणाची, शब्दाची जरुरी भासते. म्हणून दुसरे विशेषण त्याला दिले जाते. पण तेही अर्थाने मर्यादित असल्याने तिसरे, चौथे... सहस्र वगैरे विशेषणे योजली जातात आणि शेवटी एवढी विशेषणे देऊनही परमेश्वराचे स्वरूप तरी पूर्ण वर्णन केले गेले आहे का? तर नाही. याविषयी संत ज्ञानेश्वर म्हणतात, 'जिही विशेषणी विशेषिजे। ते दृश्य नव्हे रूप तुझे। हे जाणे मी म्हणोनि लाजे। वानणां इही ।।' (१८.१२ ज्ञानेश्वरी).

अमृतानुभवामध्येही संत ज्ञानेश्वरांनी असेच वर्णन केले आहे. शब्द वेगळे असले तरी अर्थ तोच आहे. 'म्हणवूनि उपनिषदे। दशे येती निंदे। निंदाची विशदे। स्तोत्रे होती ।।' (९.५० अमृतानुभव). म्हणून उपनिषदांनी विधिमुखाने जेवढी ब्रह्माची स्तुती केली आहे, तेवढी निंदा होते व निंदा हीच उत्तम स्तोत्रे होतात. भावार्थ असा, की ब्रह्म हे विशेष गुणधर्मरहित आहे. म्हणून उपनिषदे ज्या ज्या गुणाने ब्रह्माचे वर्णन करतात अगर जी जी विशेषणे ब्रह्माच्या वर्णनात उपयोग करतात. त्या त्याप्रमाणे ब्रह्म नसल्यामुळे व ती सर्व मायिक असल्यामुळे ब्रह्माची स्तुती न होऊन उलट निंदा मात्र होते. परंतु अन्वय दृष्टीने कार्यकारणरूपाने एक चैतन्याची व्याप्ती असल्यामुळे श्रुतीने ज्या गुणधर्माच्या योगाने ब्रह्माचे वर्णन केले आहे, ती सर्व ब्रह्माची यथार्थ स्तोत्रे आहेत.

विशेषण हे विशेष्याचे स्वरूप स्पष्ट करण्यासाठी, समजून सांगण्यासाठी बरोबरीच्या तुलनात्मक स्वरूपाने समजून दिलेले असते, योजलेले असते. पण जेव्हा विशेषण हे विशेष्याच्या जवळपासही साधर्म्य सांगण्याच्या योग्यतेचे नसते तेव्हा वर्णन करणाऱ्याला ते विशेषण योजल्याबद्दल लाज वाटते. हेच वर्णन वरील ओवीत केलेले आहे. तसे जरी परमेश्वराची हजारो नावे असली, नामे, विशेषणे असली तरी ती त्याचे

खरे स्वरूप वर्णन करू शकत नाहीत. पण त्याविषयी थोडीफार कल्पना देण्यास समर्थ होतात. म्हणून त्या सर्व प्रकारच्या विशेषणांच्या एकत्रीकरणानेच परमेश्वराचे स्वरूप थोडेफार उमजण्याची शक्यता आहे. आता ही विशेषणे वाचली असता ती एकमेकांच्या विरुद्ध गुणधर्मही दाखवणारी असतात, असे दिसते. मग हे कसे शक्य आहे, असा विचार मनात येतो. तो भोक्ताही आहे. अभोक्ताही आहे. तो दृश्य आहे. तसा अदृश्य आहे. तो निरावयव आहे तसा तो सावयवही आहे. म्हणून संत ज्ञानदेव म्हणतात, 'तुज सगुण म्हणू की निर्गुण रे। सगुण निर्गुण एक गोविंदु रे॥' किंवा ऋग्वेदातील दहाव्या मंडलातील पुरुषसूक्तामध्ये म्हटले आहे, 'सहस्रशीर्षा पुरुषः सहस्राक्षः सहस्रपात्।' किंवा भगवद्गीतेत वर्णन केले आहे की 'अनेक वक्त्रनयनमनेकाद्भूतदर्शनम्।' (११.१०). पण या वर्णनातून परमेश्वराचे खरे स्वरूप कसे आहे, हा प्रश्न पुन्हा उभा राहतोच. तर परमेश्वर हा असा स्थूल रूपात न पाहता त्याचे तात्त्विक स्वरूप ओळखावे म्हणजे तो सर्वांठायीच भरून राहिला आहे, याची प्रचीती येते. ते तात्त्विक स्वरूप कसे ओळखावे हेसुद्धा संत ज्ञानेश्वर सांगतात. ते म्हणतात, 'जे अग्निचे दीपन। जे चंद्राचे जीवन। सूर्याचे नयन। देखती जेणे॥ जयाचे उजियेडे। तारांगण उभडे। महातेज सुरवाडे। रहाटे जेणे। जे आदीची आदि। जे वृद्धिची वृद्धि। बुद्धिची बुद्धि। जीवाचा जीवू॥ जे मनाचे मन। जे नेत्राचे नयन। कानाचे कान। वाचेचि वाचा॥ जे प्राणाचा प्राण। जे गतीचे चरण। क्रियेचे कर्तेपण। जयाचेनि॥ आकारु जेणे आकारे। विस्तारु जेणे विस्तारे। संहारु जेणे संहारे। पांडुकुमरा॥ जे वायुचा श्वासोश्वासु। जे गगनाचा अवकाशु। हे असो आघवाचि आभासु। आभासा जेणे॥ किंबहुना पांडवा। जे आघवेचि असे आघवां। जेथ नाही रिगावा। द्वैतभावासी॥' (१३.९२७ ते ९३५ ज्ञानेश्वरी). याचाच अर्थ स्थूल रूपाने दिसणारी विविधता ही खरी विविधता केवळ त्याला असलेल्या चैतन्याच्या अधिष्ठानामुळेच दिसते आणि तेच चैतन्य अधिष्ठान समजून घ्यावयाचे असते. अवयवांना शक्तिसामर्थ्य नसते. कान ऐकत नसतात, डोळे पाहात नसतात. वाचा बोलत नसते. ही सर्व इंद्रिये जड आहेत. त्यांना चालविणारा, पाहविणारा, बोलविणारा, ऐकविणारा एक परमेश्वर म्हणजे चैतन्याचे स्वरूप आहे. मृताच्या ठिकाणी ही सर्व इंद्रिये आहेत, पण त्या ठिकाणी केवळ एक चैतन्य नसते. म्हणून ती इंद्रिये असून उपयोगी नसतात. यावरून एक छोटी गोष्ट आठवते.

श्रीकृष्णाच्या सोळाहजार एकशेआठ बायका एकदा व्रतस्थ असतात. त्यांना नदीपलीकडे असणाऱ्या दुर्वास ऋषींच्या आश्रमात व्रताचे उद्यापन करावयास जावयाचे असते. त्या प्रत्येकीने ताटामधून अनेक खाद्यपदार्थ घेतलेले होते. नदी जवळ आल्यावर त्यांना दिसले की नदी भरून वाहात आहे. पलीकडे जाणे शक्य नव्हते.

तेव्हा रुक्मिणीने एकीला पाठवून श्रीकृष्णाला नदीपलीकडे जाण्याचा उपाय विचारून येण्यास सांगितले. ती परत आली. तिने कृष्णाचा असा निरोप आणला की, 'नदीला सांगावे की श्रीकृष्ण जर ब्रह्मचारी असेल तर नदीने वाट करून द्यावी.' तसे नदीला सांगताच नदीचे पाणी दुभंगले व त्यांना वाट मिळाली. सर्व स्त्रिया नदी ओलांडून पलीकडे गेल्या. दुर्वास मुनींची पूजाअर्चा झाली. सर्व ताटातील फराळांचे दुर्वास मुनींनी भोजन केले आणि सर्व स्त्रिया नदीजवळ आल्या. तो त्यांना दिसले की नदी पुन्हा सलग वाहात आहे. स्त्रियांना पुन्हा प्रश्न पडला. त्यांनी दुर्वास मुनींना अडचण सांगितली. दुर्वासांनी विचारले, 'मग तुम्ही आल्या कशा?' तेव्हा श्रीकृष्णाचा निरोप सांगून आलो असे त्या म्हणाल्या. श्रीकृष्णाचा निरोप ऐकून दुर्वास म्हणाले 'ठीक आहे. आता नदीला सांगा की दुर्वासाने सोळाहजार एकशे आठ ताटांतील फराळाचा आस्वाद घेऊनही तो निराहारी असेल तर वाट दे.' नदीला तसा निरोप दिल्यावर नदीने दुभंगून वाट दिली व सर्व स्त्रिया नदीला पार करून आल्या. तेव्हा इतर स्त्रियांनी रुक्मिणीला विचारले की, 'दोघांची ही गोष्ट कशी सत्य आहे?' तेव्हा रुक्मिणी म्हणाली- 'श्रीकृष्ण हे परब्रह्मस्वरूपच आहेत. त्यांच्याशिवाय या विश्वात अन्य वस्तूच नाही. ही जी दिसते ती माया आहे. त्याने उपभोगावी अशी त्याच्या वेगळी कोणतीच गोष्ट म्हणजे स्त्रीरूपही नसल्याने तो ब्रह्मचारीच आहे. तसेच दुर्वास हे शंकराचे म्हणजे प्रलयंकारी अग्निरूप असल्याने त्यांनी कितीही आहार घेतला तरी त्यांची भूक कधीच शमत नाही. कारण सर्व पदार्थ हे अग्नीचे खाद्यच आहे. म्हणून ते निराहारी आहेत, असे म्हटले आहे.' तसा परमेश्वर हा अनंत नामांनी, विशेषणांनी जरी निर्देशित केला गेला, तरी त्याचे तात्त्विक स्वरूप शब्दांत अडकण्यासारखे नसते तर ते ओळखण्याच्या सोयीच्या दृष्टीने ते वर्णन केलेले असते. त्यासाठीच ही नावे दिली आहेत. पुढील प्रकरणात अशी अनेक नामे - विशेषणे दिली आहेत व त्याहीपेक्षा जास्त असू शकतील. पण त्याचा अर्थ एवढाच की सर्व चराचरात, नामरूपात परमेश्वर भरून राहिला आहे. तो सापडावा, त्याची जाणीव व्हावी, अनुभूती व्हावी एवढेच त्यातून साधावे.

संत रामदासस्वामींनीही आपला अनुभव अशाच प्रकारच्या शब्दांत वर्णन केला आहे. 'परब्रह्म हे अनिर्वाच्य आहे. त्याची लक्षणे, गुण वगैरे शब्दाने व्यक्त होण्यासारखे नसतात. जर शब्दामध्ये परब्रह्माचे वर्णन होऊ शकले तर शब्द मोठे होतील. कोणत्याही प्रकारच्या विशेषणानेही परब्रह्माचे वर्णन पुरे होऊ शकत नाही. एवढेच नव्हे तर अनेक विशेषणांची योजना केली तरी ते वर्णन पूर्णपणे योग्य होत नाही. त्यात काहीतरी उणेपणा राहतोच आणि अगदी अशाच प्रकारची अवस्था संत रामदासस्वामी यांची झालेली दिसते. ते म्हणतात, 'शब्दकरिता वस्तु भासे। वस्तु

पाहता शब्द नासे। शब्द फोल अर्थ असे। घनवटपणे ।। भूसाकरितां धान्य निपजे। धान्य घेऊन भूंस टाकिजे। जैसे शब्द भूंस जाणिजे। अर्थ धान्य ।। पोचटामध्ये घनवट। घनवटी उडे पोचट। तैसा शब्द हा फलकट। परब्रह्मी ।। शब्द बोलोनि राहे। अर्थ शब्दापूर्वीच आहे। या कारणे न साहे। उपमा तया अर्थासी ।। भूंस सांडोनि कण घ्यावा। तैसा वाच्यांश त्यजावा। कण लक्षांश लक्षांवा। शुद्ध स्वानुभवे ।।' (दशक - ६, समास, १०, ओवी २० ते ४० दासबोध).

*श्रीरामा पुरुषोत्तमा नरहरे नारायणा केशवा ।*
*गोविंदा गरुडध्वजा गुणनिधे दामोदरा माधवा ।*

*श्रीकृष्णा कमलापते यदुपते सितापते श्रीपते ।*
*वैकुंठाधिपते चराचरपते लक्ष्मीपते पाहि मां ।।*

परमेश्वराची नामे ही त्याच्या कार्यावरून, गुणांवरून कशी पडली यासाठी त्यांच्या काही नावांची फोड करून अर्थ दिला आहे. त्यावरून थोडा खुलासा होण्याची शक्यता आहे. त्यावरून सर्व नामांतून परमेश्वरी तत्त्वाचा शोध घ्यावयास पाहिजे.

## श्रीविष्णुसहस्रनामावली व इतर काही नामांचे अर्थ

विश्वम् – ज्याने सर्व विश्व निर्माण केले व जो या सर्व विश्वात सामावून गेला आहे, भरून राहिला आहे त्याच्याशिवाय विश्वच नाही व विश्वाशिवाय तोही नाही असा.

विष्णू – 'वेवेष्टि व्याप्नोति इति विष्णुः ।' ज्याने सर्वांस व्यापून टाकले आहे.

वषट्कारः – वैदिक यज्ञात बळी देताना - ज्या देवतेला आवाहन केले जाते व जिचे आराधन केले जाते - मंत्राच्या शेवटी 'वषट्' उच्चारून हवन केले जाते. ते 'वषट्कार' ही परमेश्वराचे नामरूप आहे.

भूतभव्यभवत्प्रभुः – जो भूत, भविष्य व वर्तमान या तिन्ही काळांचा प्रभू आहे, एवढेच नव्हे तर ज्याला भूत, भविष्य व वर्तमानकाळाचे पूर्ण ज्ञान आहे, तिन्ही काळांतील घडणाऱ्या घटनासुद्धा ज्ञात असतात तो.

भूतकृत – 'भूतानि करोति इति भूतकृत् ।' ज्याने सर्व भुतांना निर्माण केले तो 'भूतकृत'.

भूतभृत – जो सर्व भुतांचे पालन-पोषण करतो व त्यांचे संरक्षण करतो तो.

भाव: – 'भवति इति भाव: ।' जो सर्व चराचरांमध्ये व सजीव, निर्जीव, ज्ञात व अज्ञात, दृश्य व अदृश्य अशा सर्व ठिकाणी भरून आहे त्याला 'भाव:' म्हणतात.

भूतात्मा – 'एको वशी सर्वभूतान्तरात्मा रूपं रूपं प्रतिरूपो बहिश्च ।' (कठ) आत्मरूपाने सर्व सजीवांत जो असतो त्याला भूतात्मा म्हणतात.

भूतभावन: – जो सर्व भुतांना उत्पन्न करतो आणि जो या सृष्टीचा, भुतांचा, विस्तारही करतो तो 'भूतभावन: ।' होय.

पूतात्मा – जो अत्यंत शुद्ध आहे, म्हणजे जो मायेने कधीही बद्ध होत नाही, जो मायेने कधीही मोहात पडत नाही, तो 'पूतात्मा'.

परमात्मा – ज्याने अपुरेपणाच्या व उच्चतेच्या, श्रेष्ठपणाच्या, अलौकिकतेच्या सर्व मर्यादा ओलांडल्या आहेत व जो केवळ अनुभवगम्य आहे.

मुक्तानां परमा गति: – 'मुक्तांना मिळणाऱ्या गतीचा शेवट सर्व प्राण्यांचे शेवटचे ध्येय, उद्दिष्ट, परम प्राप्तव्य.

अव्यय: – व्यय म्हणजे नाश, नाश हा बदलातून घडतो. म्हणून जे की कधीही बदलत नाही, म्हणून ते नाश पावत नाही म्हणून ते अव्यय.

पुरुष: – जो शरीररूपी किल्ल्यात राहतो. या शरीररूपी किल्ल्याला नऊ द्वारे आहेत. ज्याच्या अस्तित्वाने त्या वस्तूला पूर्णत्व येते. 'पुरयति इति पुरुष: ।'

साक्षी – सर्वांच्या हृदयात असणारा. जीवनातील प्रत्येक क्षणी प्रत्येक घटनेचा साक्षीदार. 'साक्षात् दृष्टि साक्षीस्यात् ।' (अमरकोश).

क्षेत्रज्ञ: – जो सर्व क्षेत्राला (शरीराला) जाणतो, क्षेत्राचा अनुभव घेतो, त्याला 'क्षेत्रज्ञ' म्हणतात.

अक्षर: – अविनाशी. ज्या वस्तू सान्त असतात, त्यांना वेळेचे आणि स्थितीचे बंधन असते. याउलट ज्या अविनाशी असतात त्यांना हे बंधन नसते. म्हणून त्यांना 'अक्षर' म्हणतात.

योग: – जो केवळ जाणवतो किंवा अनुभवला जातो तो केवळ योगामुळेच. परमेश्वराला जाणण्यासाठी इंद्रियातीत, मनातीत अशा स्थिर समाधीच्या अवस्थेतच जावे लागते त्याला योग म्हणतात. म्हणून तो 'योग:'. 'समत्वम् योग उच्चते ।'

योगविदां नेता: – जो मनुष्याच्या सर्व कर्मांचे नियोजन करतो, जो 'योग' म्हणूनच ज्ञात आहे. जो सर्वश्रेष्ठ असून देवांचाही देव आहे.

प्रधान पुरुषेश्वर – प्रधान व पुरुष यांचा जो ईश्वर. प्रधान म्हणजे माया. पुरुष म्हणजे जीव. जो प्रत्येक प्राणिमात्रात असतो. जो सत्य असून माया, जीव व ईश्वर यांच्यामध्ये प्रकट होऊन कार्य करतो.

नारसिंहवपु: – ज्याचे शरीर मानवाचे असून तोंड सिंहाचे होते. हा परमेश्वराचा प्रसिद्ध अवतार असून प्रल्हादावर कृपा करून त्याने हिरण्यकश्यपूला ठार करावे, या उद्देशाने प्रकट झाला.

श्रीमान् – जो सदैव 'श्री'च्या समवेत असतो. 'श्री' म्हणजे लक्ष्मी. लक्ष्मी ही परमेश्वराचे शक्तिरूप आहे आणि लक्ष्मी सदैव ज्याच्यांजवळ असते तो 'श्रीमान'.

केशव: – जो केशामुळे अतिशय सुरेख आणि देखणा दिसतो, असा तो भगवान कृष्ण. कंसाला ठार मारण्यासाठी तो 'केशव:'.

पुरुषोत्तम: – जीव-शिव, क्षर-अक्षर याहूनही जो वेगळा व श्रेष्ठ तो पुरुषोत्तम. जो अतिउत्तम, श्रेष्ठ व अनुभवगम्य तो.

सर्व: – जो सर्व काही आहे. ज्याच्यापासून हे सर्व तयार झाले, विस्तार पावले व जो या सर्वांचे कारण आहे तो 'सर्व:'.

शर्व – मंगलदायक, मंगलकारक, जो त्याचे गुणगान ऐकतो, जो त्याचे दर्शन करतो व जो त्याचे ध्यान करतो. त्यांना तो आनंद देतो. सुख देतो.

स्थाणू: – खांब, स्थान, ठिकाण, की जे कधीही जागचे हलत नाही. जे सदा सत्य असून शुद्धातील शुद्ध असते ते 'स्थाणु:'.

भूतादि: – पंचमहाभूतांचे आदिकारण.

अव्यय: निधि: – सर्व विश्वाचा मूलभूत आधार. ज्याच्यामध्ये सर्व विश्व सामावलेले आहे व जे कधीही नाश पावत नाही, ज्याचा कधीही व्यय होत नाही. असा तो 'अव्यय: निधि:'.

सम्भव: – जो स्वत:च्या इच्छेने जगताच्या कल्याणासाठी अवतरत असतो, ज्याने सर्व जगताची निर्मिती केली, तो 'सम्भव:'.

भावन: – ज्याच्या त्याच्या इच्छेप्रमाणे देणारा तो 'भावन:'.

भर्ता – जो जगताचे पोषण करतो. प्राणिमात्रांचे रक्षण करतो व त्यांना आनंद देऊन त्यांचा उत्कर्ष करतो. प्राणिमात्रांचे रक्षण करतो व त्यांना आनंद देऊन त्यांचा उत्कर्ष साधतो.

प्रभवः – पंचमहाभूते, काल, यांची निर्मिती ज्याच्यापासून झाली तो.

प्रभूः – सर्वश्रेष्ठ असा परमेश्वर की ज्याच्याजवळ कर्तुं, अकर्तुं व अन्यथा कर्तुं अशी शक्ती आहे. त्याला 'प्रभुः' म्हणतात.

ईश्वरः – 'ईष्टे इति ईश्वरः ।' जो कोणाच्याही मदतीशिवाय काय वाटेल ते करू शकतो, तो ईश्वर.

स्वयंभूः – जो स्वतःला स्वतःमधूनच प्रकट करतो. प्रत्येक वस्तू तयार होण्याला काहीतरी कारण व निमित्त लागते. तसे परमेश्वराला निर्माण होण्याला कारण व निमित्तही तोच आहे.

संभूः – जो आपल्या भक्तांच्या जीवनात आतून चांगलेपणा व बाहेरील वैभवाने मांगल्य निर्माण करतो. तो शंभू. शंभू हे शिवशंकराचेही नाव आहे.

आदित्यः – सत्य जे सूर्यातील प्रकाशमान मंडळातून सोनेरी रूपाने चकाकते त्याला आदित्य म्हणतात.

पुष्कराक्षः – ज्याचे डोळे कमलाप्रमाणे आहेत असा. ज्याच्या डोळ्यांतून शांतता व आनंद ओसंडत असतो असे डोळे ज्याचे आहेत, तो.

महास्वनः – ज्याची गर्जना प्रचंड आहे असा. स्वन म्हणजे आवाज. तसेच स्वन म्हणजे श्वास. ज्याचा श्वास मोठा आहे असा. म्हणजे ज्याच्या निःश्वासातून वेद निर्माण झाले असा.

अनादि निधनः – ज्याला जन्म-मृत्यू नाही असा. ज्याच्यामध्ये कधीही व कोणत्याही प्रकारचे परिवर्तन नसते. अमर व निश्चल अशा वस्तूमध्ये कधीही कोणताही बदल होत नसतो. त्याला 'अनादि निधनः' म्हणतात.

धाता – नामरूप जगताचा जो आधारभूत आणि जो सर्व अनुभूतींचाही आधार आहे त्याला धाता म्हणतात.

विधाता – जो कर्माच्या फलांचे वाटप करतो, एवढेच नव्हे तर याला भिऊनच पंचमहाभुते कार्य करतात. सूर्य वेळेवर उगवतो, वारा धावतो, अग्नी उष्णता देतो व मृत्यू आपले आपले कार्य वेळेवर करतात. तो विधाता.

धातुरुत्तमः – धातू म्हणजे मूळ स्वरूप. ज्याच्या आधारे काही प्रक्रिया घडून नवीन वस्तू, सध्याची वस्तू तयार झाली आहे, होते. ज्याच्यामधून हे सर्व जग निर्माण झाले तो.

अप्रमेयः – जो कोणत्याही प्रकाराने उल्लेखिता येत नाही वा स्पष्ट करता येत नाही असा. निर्गुणाला कोणतेच गुणधर्म नसल्याने त्याचे ज्ञान होणे सहजपणे शक्य नाही असा तो अप्रमेयः.

हृषिकेशः – ज्याचे केस कुरळे आहेत असा. तसेच जो इंद्रियांना नियंत्रित करतो, प्रोत्साहित करतो, प्रकाशित करतो, तो.

पद्मनाभः – ब्रह्मदेवाचे जन्मस्थान जे कमळ, ते परमेश्वराच्या नाभीमधून उत्पन्न झालेले आहे. कोणतीही क्रियाशक्ती किंवा स्फुरण हे नाभीमधून म्हणजेच परेतून होत असते. म्हणून सर्व शक्तीचा मूळ स्रोत म्हणून भगवंतांना 'पद्मनाभ' म्हणतात.

अमरप्रभूः – देवांचे निवासस्थान जो स्वर्ग, त्या ठिकाणी असलेले दिव्य भोग भोगत देवलोक दीर्घकाल तेथे राहतात. हा काल मनुष्याच्या आयुष्याच्या मानाने एवढा दीर्घ असतो की जणू ते अमरच असतात. परमेश्वर असे दिव्य भोग आपल्या भक्ताला देतात. म्हणून ते अमरप्रभू होय.

विश्वकर्मा – वस्तुनिष्ठ जगाची निर्मिती व त्यासाठी लागणारे साहित्य साधन यांची निर्मिती करणारा जो ईश्वर, त्याला विश्वकर्मा म्हणतात.

मनुः – जो मानवामध्ये श्रेष्ठ आहे. 'मनूचा अर्थ मंत्र असाही होतो'. जो वैदिक मंत्राच्या रूपाने अवतीर्ण झाला आहे म्हणून त्याला 'मनू' म्हणतात.

त्वष्टा – जो प्रचंड आकारमानाला अतिसूक्ष्म अणूमध्ये रूपांतरित करतो. प्रलयाच्या वेळेला हे दृष्टमान विश्व अशा प्रकारे विरघळून, वितळून, विखरून जाते की त्याचा एक अणू-रेणूसुद्धा दिसत नाही कळत नाही, जाणवत नाही. त्याला 'त्वष्टा' म्हणतात.

स्थविष्ठः – 'महास्थूलं' जे सूक्ष्मातील सूक्ष्म असूनही जे प्रचंडाहून प्रचंड, स्थूलाहून स्थूल आहे. ज्याच्यापासून या विश्वाची निर्मिती झाली ते.

स्थविरो ध्रुवः – पूर्वज, स्थिर, ज्याच्यापासून या विश्वाची निर्मिती झाली तो पूर्वज. जे जगताचे सत्य आहे की जे कधीही बदलू शकत नाही, तो ध्रुव असतो. म्हणून 'स्थिर पूर्वज' 'स्थविरोध्रुवः' होय.

''नित्य, शुद्ध, बद्ध, मुक्त, सत्य, परमानंद, अनंत व अद्वय असे जे ब्रह्म तेच चेतन व अज्ञानादी इतर सर्व जडसमूह अचेतन होय. आता ब्रह्माला नित्य, शुद्ध इत्यादी अनेक विशेषणे देण्याचे कारण काय? वस्तुतः चैतन्याचे कोणत्याही अनात्मरूप पदार्थाशी जरी तादात्म्य होत नाही तरी भ्रांतीमुळे त्याचे प्रपंचाशी तादात्म्य झाल्यासारखे वाटते. या भ्रांतीजन्य तादात्म्याची निवृत्ती करण्याकरिता नित्यादिक विशेषणांची योजना केली आहे. नित्य हे कार्याशी होणाऱ्या ब्रह्माच्या तादात्म्याचे निवारण करीत आहे, कारण कार्य नित्य कधीच होऊ शकत नाही. ब्रह्म नित्य आहे याविषयी 'हा ईश्वर आकाशाप्रमाणे सर्वव्यापी व नित्य आहे.' हे श्रुतिप्रमाण आहे. कार्यरूप प्रपंचाचे जे धर्म आहेत त्यांच्याशीही ब्रह्माचे तादात्म्य होत नसते. असे 'शुद्ध' विशेषण सुचवते व 'स्थूलशरीरशून्य, शुद्ध व पापाने विद्ध न झालेले' अशा अर्थाची ईशावास्योपनिषत् श्रुती त्याच्या शुद्धत्वाविषयी प्रमाण आहे. राग द्वेष इत्यादिकांनी रहित असणे हेच त्या परब्रह्माचे शुद्धत्व होय. बुद्ध हे विशेषण कारणभूत अज्ञानाच्या तादात्म्याची निवृत्ती करते. सर्वदा ज्ञान हे एक अखंड रसाने युक्त असणे हा बुद्ध शब्दाचा अर्थ आहे. 'हा परमात्मा प्रधानघन आहे.' अशा अर्थाची श्रुती याविषयी प्रमाण आहे. मुक्त हे विशेषण अज्ञानकृत आवरणादिकांच्या तादात्म्याची निवृत्ती करते. मुक्त म्हणजे बंधनशून्य, ही ब्रह्माची मुक्तता, 'विमुक्तश्च विमुच्यते।' या श्रुतिवचनावरून सिद्ध होते. सत्य हे विशेषण मिथ्यात्वाची व्यावृत्ती करते. सत्य म्हणजे भूत, भविष्य व वर्तमान किंवा उत्पत्ती, स्थिती व लय या तिन्ही काळी बाधित न होणारे. 'सत्यं ज्ञानं अनन्तं ब्रह्म।' ही श्रुतीच याविषयी प्रमाण आहे. आनंद हे विशेषण ब्रह्माला पुरुषार्थपणा दाखवते. 'आनंदच ब्रह्म आहे असे भृगु जाणता झाला.' 'ब्रह्म विज्ञान व आनंदरूप आहे.' इत्यादी अनेक श्रुती याविषयी प्रमाण आहेत. अनंत हे विशेषण ब्रह्माच्या परिच्छिन्नतेची निवृत्ती करत आहे. अद्वय हे विशेषण ब्रह्माची अखंड एकसत्ता दाखवत आहे. ज्याला द्वैताचा स्पर्शही नाही ते अद्वय होय. म्हणजे पाच प्रकारच्या भेदांनी शून्य. १) जिवांचा परस्पर भेद. २) जीव व ईश्वर यांचा भेद. ३) सर्व जड पदार्थांचा परस्पर भेद. ४) ईश्वर व जड जगत् यांचा भेद आणि ५) जीव व जड जगत् यांचा भेद. असे पाच प्रकारचे भेद असतात. पण हे सर्वही कल्पित आहेत. कल्पित म्हणजे अधिष्ठानाच्या अज्ञानामुळे काही काळ भसणारे. समाधी, सुषुप्ती व मूर्च्छा या अवस्था

प्रत्ययास येत नाहीत. हे प्रत्येकाच्या अनुभवावरून सिद्ध आहे. अर्थात ते कल्पित आहेत. सारांश ब्रह्म या पाच प्रकारच्या द्वैताने हीन आहे किंवा अद्वय म्हणजे सजातीय, विजातीय, व स्वगत भेदशून्य, 'एकमेकाद्वितीयं ब्रह्म।' ही श्रुती याविषयी प्रमाण आहे.'' (सुबोध अद्वैत सिद्धांत – पं. द. वा. जोग).

*ॐ खं ब्रह्म – (यजु: अ. ४० मंत्र १७).*

अर्थ – ॐ इत्यादी नावे ही सार्थक आहेत. जसे ॐ खं। 'अवतीत्योम आकाशमिव व्यापकत्वात् खम् सर्वेभ्यो बृहत्वाद् ब्रह्म।' रक्षण करतो म्हणून, आकाशाप्रमाणे आहे. म्हणून (खम्) आणि सर्वांत मोठा आहे म्हणून परमेश्वराचे नाव ब्रह्म आहे.

*ओमित्येतदक्षरमुग्दीथमुपासीत।*

*(छांदोग्य उप.).*

अर्थ – ॐ ज्याचे नाव आहे व जे कधीही नष्ट होत नाही, ज्याची उपासना करावयास पाहिजे असा तो. इतरांची नाही.

*ओमित्येतदक्षरमिद सर्वं तस्योपव्याख्यानम्।'*

*(मांडुक्य)*

अर्थ – सर्व वेदादी शास्त्रामध्ये परमेश्वराचे मुख्य व सहज नाव ॐ हेच आहे. बाकी सर्व नावे गौण आहेत.

*सर्वे वेदा यत्पदमामनन्ति तपांसि सर्वाणि च यद्वदन्ति।*
*यदिच्छन्तो ब्रह्मचर्यं चरन्ति तत्ते पदं संग्रहेण ब्रवीम्योमित्येतत्।*

*(कठोपनिषद).*

अर्थ – कारण सर्व वेद, सर्व धर्मानुष्ठानरूप तपश्चरण हे ज्याचे सांगणे आहे, ज्यांना मान्य आहे आणि ज्याच्या प्राप्तीसाठी ब्रह्मचर्याश्रमाचे पालन केले जाते, त्या ईश्वराचे नाव ॐ आहे.

*प्रशासितारं सर्वेषामणीयां समणोरपि। रुक्माभं स्वप्नधीगम्यं विद्यात्तं पुरुषपरम्॥*

अर्थ – जो सर्वांना शिक्षा देणारा, सूक्ष्माहून सूक्ष्म, स्वप्रकाश स्वरूप, समाधिस्थ अवस्थेतील बुद्धीने जाणण्यास योग्य आहे, त्यालाच परमपुरुष जाणणे योग्य आहे.

*एतमग्नि वदन्त्येके मनुमन्ये प्रजापतिम् । इन्द्रमेके परे प्राणमपरे ब्रह्म शाश्वतम् ॥*

*(मनु - अध्याय १२ श्लोक १२३ वरील दोन मिळून).*

अर्थ – स्वप्रकाशमान असल्याने 'अग्नी' विज्ञानस्वरूप आहे म्हणून 'मनू', सर्वांचा पालनकर्ता म्हणून 'प्रजापती' आणि परम ऐश्वर्यवान आहे म्हणून 'इन्द्र', सर्वांच्या जीवनाचे मूळ असल्याकारणाने 'प्राण' आणि निरंतर व्यापक म्हणून परमेश्वराचे नाव 'ब्रह्म' आहे.

*स ब्रह्मा स विष्णु: स रुद्रस्सशिवस्सोऽक्षरस्सपरम: स्वराट् ।*
*स इंद्रस्स कालाग्निस्सचंद्रमा: ॥*

*(कैवल्यउपनिषद).*

अर्थ – सर्वच जगताला निर्माण केले म्हणून ब्रह्मा, सर्वव्यापक आहे म्हणून 'विष्णू', दुष्टांना शिक्षा करून रडवितो म्हणून 'रुद्र', मंगलमय आणि कल्याणकारक म्हणून 'शिव'.

*'य: सर्वमश्नुते न क्षरति न विनश्यात तदक्षरम् ।' 'य: स्वयं राजते स स्वराट् ।'*
*'यो ऽ ग्निरिव काल: कलयिता प्रलयकर्ता स कालाग्निरीश्वर: ।'*

अक्षर – जो सर्वत्रव्याप्त असून अविनाशी आहे. स्वराट्- जो स्वत: प्रकाशस्वरूप आहे आणि कालाग्नी - प्रलयाच्या वेळी जो सर्वांचा काल आहे आणि कालाचाही काल आहे म्हणून परमेश्वराचे नाव 'कालाग्नी' आहे.

विश्व – विश्-प्रवेशणे- या धातूवरून विश्व शब्द सिद्ध होतो. 'विशन्ति प्रविष्टानि सर्वाव्याकाशादीनि भूतानि यस्मिन् । यो वा ऽऽ काशादिषु सर्वषु भुतेषु प्रविष्ट स विश्व ईश्वर:' ज्यामध्ये आकाशादी सर्व भुते प्रवेश करत आहेत किंवा जो यामध्ये व्याप्त होऊन प्रवेश करत आहे म्हणून त्या परमेश्वराला विश्व हे नाव आहे. अशा नावाचे ग्रहण आकारमानानेच होते.

विष्णू – विष्लु व्याप्तौ – या धातूला 'नु' प्रत्यय लागून 'विष्णू' हा शब्द तयार झाला. 'वेवेष्टि व्याप्नोति चरा ऽ चरं जगत् विष्णु: ।' चराचर जगतामध्ये व्यापून असल्याने परमेश्वराला 'विष्णू' हे नाव मिळाले आहे.

'वायो ते ब्रह्मणे नमोऽस्तु ।' बृह, बृहि वृद्धौ - या धातूने ब्रह्म शब्द तयार झाला आहे. जो सर्वांच्यावर विराजमान आहे, सर्वांहून मोठा व अनंत बलाने युक्त असा परमेश्वर आहे, अशा ब्रह्माला आम्ही नमस्कार करतो.

अत सातत्यगमने - या धातूवरून 'आत्मा' शब्द तयार होतो. 'योऽताति व्याप्नोति स आत्मा।' जो जीवादी जगतास सातत्याने व्यापून राहिला आहे. परश्चासावात्मा च य आत्मभ्यो जीवेभ्यः सूक्ष्मेभ्यः परोऽतिसूक्ष्मः स परमात्मा।' जो सर्व जिवांमध्ये उत्कृष्ट, आणि जीव, प्रकृती तसेच आकाश यांहूनही अतिसूक्ष्म आणि सर्व जिवांमधील अंतर्यामी आत्मा आहे. यावरून ईश्वराला 'परमात्मा' म्हणतात. सामर्थ्यवान असल्यानेच 'परमेश्वर' हे नाव आहे.

'य ईश्वरेषु समर्थेषु परमः श्रेष्ठः स परमेश्वरः' जो ईश्वरामध्ये व समर्थामध्ये समर्थ, ज्याच्या तुलनेत कोणीही येऊ शकत नाही, त्याचे नाव 'परमेश्वर' आहे.

*आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः ।*
*या यदस्यायनं पूर्व तेन नारायणः स्मृतः ॥*

*(मनु अ. १ श्लोक १०).*

पाणी आणि जीव यांना 'नारा' म्हणतात. ते 'आयनं' म्हणजेच निवासस्थान आहे. म्हणून सर्व जिवांमध्ये व्यापून असलेल्या परमेश्वराला 'नारायण' म्हणतात.

अज गतिक्षेपणयोः – जनी प्रादुर्भावे – या धातूवरून 'अज' शब्द तयार झाला आहे. 'यो ऽ जति सृष्टिं प्रति सर्वान् प्रकृत्यादीन् पदार्थान पक्षिपति, जानाति कदाचिन्न जायते सो ऽ जः' जो सर्व प्रकृतीचे अवयव आकाशादी भूत परमाणूंचे योग्य प्रकारे मीलन करणारा, शरीराबरोबर जिवाचा संबंध जोडून जन्माला घालणारा परंतु स्वतः कधीही जन्म न घेणारा म्हणून ईश्वराला 'अज' असे म्हणतात.

टुनादि समृद्धौ – आङ् सहित या धातूपासून 'आनंद' शब्द तयार झाला. 'आनन्दन्ति सर्वे मुक्ता यस्मिन् यद्वा यः सर्वाज्जीवनानन्दयति स आनन्दः' जो आनंदस्वरूप असून ज्यामध्ये सर्व मुक्त जीव आनंदाला प्राप्त होतात आणि सर्व धर्मात्मा जिवाला आनंदित करतात. म्हणून ईश्वराचे नाव 'आनंद' असे आहे.

अस भूवि – या धातूवरून 'सत्' शब्द तयार होतो. 'यदस्ति त्रिषुकालेषु न बाध्यते तत्सद् ब्रह्म' जो सदा वर्तमान अर्थात भूत-भविष्य कालामध्येही ज्याला बाधा येत नाही अशा परमेश्वराला 'सत्' म्हणतात. 'चिती संज्ञाने' या धातूवरून 'चित्त' असा शब्द तयार होतो. 'यश्चेतति, चेतयति, संज्ञापयति, सर्वान् सज्जनान् योगिनस्तच्चित्परं ब्रह्म।' जो सर्व चेतनस्वरूप जिवांना सावध ठेवणारा व सत्यासत्याचा ज्ञाता आहे म्हणून परमेश्वराला 'चित्' असे नाव पडले. या तीनही विशेषणांवरून परमेश्वराला 'सच्चिदानन्दस्वरूप' म्हणून ओळखतात.

नित्य – यो नित्यध्रुवोऽचलोऽविनाशी स नित्यः।' जो निश्चल, अविनाशी आहे तो 'नित्य' शब्दवाचक ईश्वर आहे.

शुन्ध शुद्धौ – यावरून 'शुद्ध' शब्द तयार होतो. 'यः शुन्धति, सर्वान् शोधयति वा स शुद्ध ईश्वरः' जो स्वतः पवित्र, सर्व अशुद्धपणापासून अलिप्त आणि सर्वांना शुद्ध करणारा म्हणून त्याला 'शुद्ध' म्हणतात.

बुध अवगमने – या धातूला 'क्त' प्रत्यय लागून 'बुद्ध' शब्द तयार झाला. 'यो बुद्धवान सदैव ज्ञाताऽस्ति स बुध्दौ जगदीश्वरः' जो सदा सर्वांना जाणणारा आहे म्हणून परमेश्वराला 'बुद्ध' असे नाव आहे.

मुच्लु मोचने – या धातूवरून 'मुक्त' शब्द तयार होतो. 'यो मुञ्चति मोचयति वा मुमुक्षुन् स मुक्तो जगदीश्वरः' जो सदैव अशुद्धीपासून वेगळा आणि सर्व मुमुक्षूंना त्रासापासून सोडवतो म्हणून परमेश्वराला 'मुक्त' म्हणतात. 'अत एव नित्यशुद्धबुध्दमुक्त स्वभावो जगदीश्वरः।' याच कारणाने परमेश्वराचा स्वभाव नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त असा आहे. म्हणून ते नावही तसेच आहे.

निर् आणि आङ्पूर्वक (डुकृञ करणे) या धातूपासून 'निराकार' हा शब्द तयार होतो. 'निर्गत आकारात्स निराकारः।' ज्याला कोणताच आकार नाही, नसतो व जो कधीही जन्मास येत नाही म्हणून परमेश्वराला 'निराकार' म्हणतात.

'अञ्जु व्यक्तिम्लक्षणकान्तिगतिषु।' अञ्जु या धातूपासून 'अञ्जन' शब्द व 'निर्' उपसर्ग लागून 'निरंजन' शब्द तयार होतो. 'अञ्जन व्यक्तीम्लणं कुकाम इन्द्रियैः प्राप्तिश्चेत्यस्माद्यो निर्गतः पृथग्भूतः सनिरंजनः।' जी व्यक्ती म्हणजेच आकृती म्लेच्छाचार, दुष्ट कामना आणि नेत्रादी इंद्रियांच्या विषयापासून सदैव वेगळी असते त्या ईश्वरालाच 'निरंजन' म्हणतात.

कूटस्थ : – 'यो कूटे ऽ नेकविधव्यवहारे स्वस्वरुपेणैव तिष्ठति स कूटस्थः परमेश्वरः।' जो सर्व व्यवहाराला व्यापून असून सर्व व्यवहाराचा आधार असतो तरीही जो स्वतःचे स्वरूप बदलत नाही त्या ईश्वराला 'कूटस्थ' म्हणतात.

शक्लृ शक्ती – या धातूपासून 'शक्ती' शब्द तयार होतो. 'यः सर्व जगत् कर्तुं शक्नोति स शक्तिः।' जो सर्व जगताला तयार करण्यास समर्थ आहे, त्या ईश्वराला 'शक्ती' म्हणतात.

अत सातत्यगमने - या धातूवरून 'आत्मा' शब्द तयार होतो. 'योऽताति व्याप्नोति स आत्मा।' जो जीवादी जगतास सातत्याने व्यापून राहिला आहे. परश्चासावात्मा च य आत्मभ्यो जीवेभ्यः सूक्ष्मेभ्यः परोऽतिसूक्ष्मः स परमात्मा।' जो सर्व जिवांमध्ये उत्कृष्ट, आणि जीव, प्रकृती तसेच आकाश यांहूनही अतिसूक्ष्म आणि सर्व जिवांमधील अंतर्यामी आत्मा आहे. यावरून ईश्वराला 'परमात्मा' म्हणतात. सामर्थ्यवान असल्यानेच 'परमेश्वर' हे नाव आहे.

'य ईश्वरेषु समर्थेषु परमः श्रेष्ठः स परमेश्वरः' जो ईश्वरामध्ये व समर्थामध्ये समर्थ, ज्याच्या तुलनेत कोणीही येऊ शकत नाही, त्याचे नाव 'परमेश्वर' आहे.

*आपो नारा इति प्रोक्ता आपो वै नरसूनवः ।*
*या यदस्यायनं पूर्व तेन नारायणः स्मृतः ॥*

*(मनु अ. १ श्लोक १०).*

पाणी आणि जीव यांना 'नारा' म्हणतात. ते 'आयनं' म्हणजेच निवासस्थान आहे. म्हणून सर्व जिवांमध्ये व्यापून असलेल्या परमेश्वराला 'नारायण' म्हणतात.

अज गतिक्षेपणयोः – जनी प्रादुर्भावे – या धातूवरून 'अज' शब्द तयार झाला आहे. 'यो ऽ जति सृष्टिं प्रति सर्वान् प्रकृत्यादीन् पदार्थान पक्षिपति, जानाति कदाचिन्न जायते सो ऽ जः' जो सर्व प्रकृतीचे अवयव आकाशादी भूत परमाणूंचे योग्य प्रकारे मीलन करणारा, शरीराबरोबर जिवाचा संबंध जोडून जन्माला घालणारा परंतु स्वतः कधीही जन्म न घेणारा म्हणून ईश्वराला 'अज' असे म्हणतात.

टुनादि समृद्धौ – आङ् सहित या धातूपासून 'आनंद' शब्द तयार झाला. 'आनन्दन्ति सर्वे मुक्ता यस्मिन् यद्वा यः सर्वाज्जीवनानन्दयति स आनन्दः' जो आनंदस्वरूप असून ज्यामध्ये सर्व मुक्त जीव आनंदाला प्राप्त होतात आणि सर्व धर्मात्मा जिवाला आनंदित करतात. म्हणून ईश्वराचे नाव 'आनंद' असे आहे.

अस भूवि – या धातूवरून 'सत्' शब्द तयार होतो. 'यदस्ति त्रिषुकालेषु न बाध्यते तत्सद् ब्रह्म' जो सदा वर्तमान अर्थात भूत-भविष्य कालामध्येही ज्याला बाधा येत नाही अशा परमेश्वराला 'सत्' म्हणतात. 'चिती संज्ञाने' या धातूवरून 'चित्त' असा शब्द तयार होतो. 'यश्चेतति, चेतयति, संज्ञापयति, सर्वान् सज्जनान् योगिनस्तच्चित्परं ब्रह्म।' जो सर्व चेतनस्वरूप जिवांना सावध ठेवणारा व सत्यासत्याचा ज्ञाता आहे म्हणून परमेश्वराला 'चित्' असे नाव पडले. या तीनही विशेषणांवरून परमेश्वराला 'सच्चिदानन्दस्वरूप' म्हणून ओळखतात.

नित्य – यो नित्यध्रुवोऽचलोऽविनाशी स नित्य: ।' जो निश्चल, अविनाशी आहे तो 'नित्य' शब्दवाचक ईश्वर आहे.

शुन्ध शुद्धौ – यावरून 'शुद्ध' शब्द तयार होतो. 'य: शुन्धति, सर्वान् शोधयति वा स शुद्ध ईश्वर:' जो स्वत: पवित्र, सर्व अशुद्धपणापासून अलिप्त आणि सर्वांना शुद्ध करणारा म्हणून त्याला 'शुद्ध' म्हणतात.

बुध अवगमने – या धातूला 'क्त' प्रत्यय लागून 'बुद्ध' शब्द तयार झाला. 'यो बुद्धवान सदैव ज्ञाताऽस्ति स बुध्दो जगदीश्वर:' जो सदा सर्वांना जाणणारा आहे म्हणून परमेश्वराला 'बुद्ध' असे नाव आहे.

मुच्लु मोचने – या धातूवरून 'मुक्त' शब्द तयार होतो. 'यो मुञ्चति मोचयति वा मुमुक्षुन् स मुक्तो जगदीश्वर:' जो सदैव अशुद्धीपासून वेगळा आणि सर्व मुमुक्षूंना त्रासापासून सोडवतो म्हणून परमेश्वराला 'मुक्त' म्हणतात. 'अत एव नित्यशुद्धबुध्दमुक्त स्वभावो जगदीश्वर: ।' याच कारणाने परमेश्वराचा स्वभाव नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त असा आहे. म्हणून ते नावही तसेच आहे.

निर् आणि आङ्पूर्वक (डुकृञ करणे) या धातूपासून 'निराकार' हा शब्द तयार होतो. 'निर्गत आकारात्स निराकार: ।' ज्याला कोणताच आकार नाही, नसतो व जो कधीही जन्मास येत नाही म्हणून परमेश्वराला 'निराकार' म्हणतात.

'अञ्जु व्यक्तिम्लक्षणकान्तिगतिषु ।' अञ्जु या धातूपासून 'अञ्जन' शब्द व 'निर्' उपसर्ग लागून 'निरंजन' शब्द तयार होतो. 'अञ्जन व्यक्तीम्लणं कुकाम इन्द्रियै: प्राप्तिश्चेत्यस्माद्यो निर्गत: पृथग्भूत: सनिरंजन: ।' जी व्यक्ती म्हणजेच आकृती म्लेच्छाचार, दुष्ट कामना आणि नेत्रादी इंद्रियांच्या विषयापासून सदैव वेगळी असते त्या ईश्वरालाच 'निरंजन' म्हणतात.

कूटस्थ : – 'यो कूटे ऽ नेकविधव्यवहारे स्वस्वरुपेणैव तिष्ठति स कूटस्थ: परमेश्वर: ।' जो सर्व व्यवहाराला व्यापून असून सर्व व्यवहाराचा आधार असतो तरीही जो स्वत:चे स्वरूप बदलत नाही त्या ईश्वराला 'कूटस्थ' म्हणतात.

शक्लृ शक्ती – या धातूपासून 'शक्ती' शब्द तयार होतो. 'य: सर्व जगत् कर्तुं शक्नोति स शक्ति: ।' जो सर्व जगताला तयार करण्यास समर्थ आहे, त्या ईश्वराला 'शक्ती' म्हणतात.

शक्तिमान – सर्वा: शक्तयो विद्यन्ते यस्मिन् स सर्वशक्तिमानीश्वर:' जो आपले कार्य करताना इतर कोणाच्याही मदतीची अपेक्षा ठेवत नाही, आपल्याच स्वत:च्या सामर्थ्याने सर्व कामे पूर्ण करतो म्हणून त्या परमेश्वराला सर्व 'शक्तिमान' म्हणतात.

अद्वैत – 'द्वयोर्भावो द्वाभ्यामितं सा द्विताद्वीतं वा सेव तदेव वा द्वैतम् न विद्यते द्वैतं द्वितीयेश्वरभावो यस्मिंस्तदद्वैतम्।' अर्थात 'सजातीयविजातीयस्वगतभेदशून्यं ब्रह्म॥' दोन असणे किंवा दोघांनी युक्त असणे यालाच 'द्विता, द्वित, किंवा द्वैत' असे नसणे. सजातीय म्हणजे माणसाप्रमाणे दुसरा माणूस, विजातीय म्हणजे माणूस, पशू, पक्षी वगैरे व स्वगत म्हणजे माणसाचे हात, पाय, कान, नाक वगैरे अवयवांचा भेद. या ईश्वरामध्ये सजातीय, विजातीय व स्वगत भेद नाहीत. म्हणून त्याला 'अद्वैत' म्हणतात.

निर्गुण: – 'गण्यन्ते ये ते गुणा वा यैर्गणयन्ति ते गुणा: यो गुणेम्यो निर्गत:, स निर्गुण ईश्वर:।' सत्त्व, रज, तम, रूप, रस, स्पर्श, गन्धादी जडांचे गुण आणि अविद्या, अल्पज्ञता, राग, द्वेष आणि अविद्यादी क्लेश अशा जिवांच्या गुणापासून जो अगदी वेगळा आहे, त्याला 'अशब्दमस्पर्शमरूपमव्ययम्' असे उपनिषदाचे प्रमाण आहे. जो शब्द, स्पर्श, रूपादी, गुणरहित आहे, अशा परमेश्वराचे नाव 'निर्गुण' आहे.

अंतर्यामी – 'अन्तर्यन्तु नियन्तुं शीलं यस्य सोऽयमन्तर्यामी।' जो सर्व प्राणी आणि अप्राणीरूप जगताच्या आत व्यापून राहून शिवाय सर्वांचे नियमन करतो. म्हणून परमेश्वराचे नाव 'अंतर्यामी' आहे.

भगवान – भज सेवायम् - या धातूने 'भग' व सेवायोग्य म्हणून 'भगवान' हा शब्द तयार झाला. 'भग: सकलैश्वर्यं सेवनं वा विद्यते यस्य स भगवान्।' जो सकल ऐश्वर्याने युक्त व भजन करण्यास योग्य आहे म्हणून त्याचे नाव 'भगवान' आहे.

पुरुष: – पृ पालन पूर्णयो:।' या धातूपासून 'पुरुष:' हा शब्द तयार झाला 'य:स्वव्याप्त्या चराचरं जगत् पृणाति पुरयति वा स पुरुष:' जो सर्व जगतात 'पूर्ण' म्हणून संबोधला जातो त्याला म्हणजेच परमेश्वराला 'पुरुष' म्हणतात.

विश्वम्भर – 'डुभृञ धारणपोषणयो:' – 'विश्व' पूर्वक या धातूपासून 'विश्वम्भर' शब्द तयार झाला. 'यो विश्वं बिभर्ति धरति पुष्णाति वा स विश्वम्भरो जगदीश्वर:।' जो जगताचे धारणपोषण करतो त्या परमेश्वराचे नाव 'विश्वम्भर' पडले आहे.

स्वयंभू – 'स्वयं'पूर्वक या धातूपासून 'स्वयंभू' हा शब्द तयार झाला 'य: स्वयं भवति स स्वयम्भूरीश्वर:।' जो स्वत:पासूनच स्वत: निर्माण झाला म्हणजे इतर कोणापासूनही जो निर्माण झाला नाही त्याला 'स्वयंभू' हे नाव आहे.

## वर्णानुक्रमाप्रमाणे नामे

अ – अर्क, अक्रूर, अकलकलाकमलापती, अक्रिय, अकर्ता, अकर्तव्य, अक्लेद, अखिल, अखंड, अखंडकर्मा, अग्राह्य, अग्रणी, अग्रज, अगुण, अगम्य, अगोचर, अगणित, अगोत्र, अच्युत, अर्चित, अर्चिष्मान, अचिन्त्य, अचल, अच्छेद्य, अछेद, अज, अजिंक्य, अजित, अजन्मा, अढळ, अणू, अणुरेणुव्याप्य, अतींद्र, अतींद्रिय, अतुल, अतिशयसूक्ष्म, अतीत, अंतरात्मा, अतर्क्यस्वरूप, अंतरंगा, अंतर्यामी, अतिदुर्धर, अश्वम्, अदृश्य, अदेही, अद्‌भुत, अद्वितीय, अद्वय, अद्वैत, अखंडभरिता, अदाह्य, अधिष्ठान, अधोक्षय, अधृत, अधाता, अंधकाराहून पलीकडचा, अध्यक्ष, अधिपती, अनादिनिधन, अनुत्तम, अनादिसिद्ध, अनघ, अनिरुद्ध, अनिमिष, अनिल, अनल, अनन्तजित, अनंतअवतारधरितया, अनुकूल, अनय, अनिर्विण्ण, अनर्थ, अनन्तात्मा, अन्तक, अनिवर्ती, अनीश, अनिर्देश्यवपु, अनन्त, अनामय, अनेकमूर्ती, अनियम, अनियन्ता, अनन्तरूप, अनन्तश्री, अनादि, अन्न, अन्नाद, अनिर्देश्य, अनाथनाथा, अनंतनामी, अनाम, अनुभवगम्य, अनेक, अनुपम, अनेकनाम, अनिंद्य, अनाकलनीय, अपराजित, अप्यय, अपार, अपरिमिता, अपारा, अपरांपरा, अप्रत्यक्ष, अपरांपरस्वरूप, अभू, अभिप्राय, अभेद्य, अभोक्ता, अमरप्रभू, अमेयात्मा, अमोघ, अमोघशक्ती, अमृत, अमृत्यू, अमृतांशूद्‌भव, अमिताशन, अमृतप, अमितविक्रम, अम्भोनिधि, अमूर्तिमान, अमानी, अमृतांशू, अमृतवपू, अमूर्ती, अमाईक, अमर्यादित, अमूर्त, अमर, अमरपालका, अमनस्क, अमंत्र, अयोध्यापती, अरविन्दाक्ष, अरौद्र, अर्ह, अर्थ, अरूप, अलक्षा, अलिप्त अलक्ष्य, अव्यय, अव्ययनिधी, अव्यंग, अविज्ञाता, अव्यक्त, अविनाशी, अवीट, अविकृत, अवर्णनीय, अविकारी, अश्वत्थ, अशोक, असंख्येय, असत्, असूरमर्दना, असुरा, असंगा, अहसंवर्तक, अक्षर, अक्षोभ्य, अक्षै, अक्षरपुरुष, अज्ञानरहित, अज्ञानभंजन, असीम.

आ – आकाशवासी, आगम, आत्मवान, आत्मयोगी, आत्मरूपा, आत्मस्वरूप, आत्मारामा, आत्मा, आद्य, आदित्य, आदिदेव, आद्यपुरुष, आधारनिलय, आनंद, आनंदी, आनंदस्वरूप, आनंदकंद, आनंदघना, आवर्तन, आश्रम.

